॥ श्रीः ॥

# सभाष्य भगवद्गीता.

## अध्याय १ ते ४.

मराठी भाषांतर व स्पष्टीकरणासह.

संपादक,

काशीनाथ वामन लेले

ह्यांनीं

आर्यधर्मरहस्य मासिकपुस्तकद्वारा

प्रसिद्ध केलेलें.

मोदवृत्त छापखाना वाई



शके १८२०

किंमत ३॥ रुपये

श्रीः

# शांकरभाष्योपेतं

## गीताशास्त्रं

### महाराष्ट्रतात्पर्यसमेतम् ।

ॐम् ॥ नारायणः परोऽव्यक्तादण्डमव्यक्तसंभवम्।
अण्डस्यान्तस्त्विमे लोकाः सप्तद्वीपा च मेदिनी ॥

ॐम् ॥ नारायणः परोऽव्यक्तादण्डमव्यक्तसंभवम्। अण्डस्यान्तस्त्विमे लोकाः सप्तद्वीपा च मेदिनी ॥ श्रुतिस्मृतिपुराणानामालयं करुणालयम् । नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम् ॥ शंकरं शंकराचार्यं केशवं बादरायणम् । सूत्रभाष्यकृतौ वन्दे भगवन्तौ पुनः पुनः ॥ नारायण हा अव्यक्ताहून पर आहे ह्मणजे मायातीत आहे; ह्या मायेपासून अपंचीकृतपंचमहाभूतात्मक हिरण्यगर्भरूप अंड उत्पन्न झालें आहे; ह्या अंडांत ह्या विराडात्मक भूरादि लोकांचा कार्यरूपानें अंतर्भाव होता व ह्मणूनच तो सर्वलोकात्मक विराट्पुरुष त्या हिरण्यगर्भापासून उत्पन्न झाला.

([1]सर्व चराचर जगत् वास्तविक नसून सच्चिदानंद परमात्म्याचे ठिकाणीं तें मायेनें कल्पिलेलें आहे व ती मायाही परमात्म्याहून वास्तविक कांहीं भिन्न पदार्थ ह्मणून नाहींच. ती माया स्वतंत्र नसून ईश्वराधीन आहे.

[1] कंसांतील मजकूर भाष्यांतील नसून पदरचा असतो असें समजावें.

शुद्धसत्त्वरूप व मलिनसत्त्वरूप असे हिचे दोन भेद आहेत. पहिल्या प्रकारच्या मायेमध्यें रज व तम ह्या गुणांच्या योगानें मालिन्य आलेलें नसल्यामुळें तिला शुद्धसत्त्वरूप ह्मणतात व दुसऱ्या प्रकारच्या मायेंतील सत्त्वगुण–रज व तम ह्यांच्या संपर्कानें–किंचित मलिन झालेला असल्यामुळें तिला मलिनसत्त्वरूप असें ह्मणतात. पहिल्या प्रकारच्या मायेला ह्मणजे शुद्धसत्त्वरूप मायेला मायाच ह्मणतात व तिचे ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला जो सच्चिदानंदस्वरूप परमात्मा त्याला ईश्वर, जगत्कर्ता, सर्वज्ञ, भोगप्रद इत्यादि संज्ञा लावितात. ईश्वर आपल्या मायोपाधीला स्वाधीन ठेवितो; तिच्या अधीन आपण होत नाहीं. मलिनसत्त्वप्रधान जी दुसऱ्या प्रकारची माया तिला अविद्या असें ह्मणतात व तिचे ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला जो चिदात्मा त्यास जीव असें ह्मणतात. जीव हा स्वतंत्र नसून अविद्येचे आधीन आहे. कारणशरीर, सूक्ष्मशरीर व स्थूलशरीर अशीं तीन शरीरें प्रत्येक जीवाला आहेत. सूक्ष्मशरीरास लिंगशरीर असेंही ह्मणतात. ह्या तीन शरीरांचें प्राबल्य सुषुप्ति, स्वप्न व जागृति ह्या तीन अवस्थांचे ठिकाणीं क्रमानें असतें. अविद्यारूप जो जीवाचा उपाधि त्याला कारणशरीर ह्मणतात. ह्या कारणशरीरावर अभिमान ठेवणारा जो सुषुप्त्यवस्थेंतील जीव त्याला प्राज्ञ असें ह्मणतात; लिंगशरीरावर अभिमान ठेवणारा जो स्वप्नावस्थेंतील जीव त्याला तैजस असें ह्मणतात आणि स्थूलशरीराभिमानी जो जागृत्यवस्थेंतील जीव त्याला विश्व असें ह्मणतात. त्रिगुणात्मक मायेपासून आकाश, वायु, तेज, उदक आणि पृथ्वी अशीं पांच सूक्ष्म भूतें उत्पन्न झालीं; ह्यांना तन्मात्रें असेंही ह्मणतात. ह्या भूतांच्या सत्त्वांशांपासून अनुक्रमें, श्रवण, त्वक्, चक्षु, रसना व घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें उत्पन्न झालीं. ह्या सूक्ष्मभूतांच्या रजोगुणांशांपासून अनुक्रमें वाक् , हस्त, पाद, गुद व उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें उत्पन्न झालीं व ह्या आकाशादि सर्व पंचभूतांच्या पांच सत्त्वांशांपासून मिळून अंतःकरण उत्पन्न झालें. ह्या अंतःकरणाचे

मन आणि बुद्धि असे दोन प्रकार आहेत. अंतःकरणाच्या संशयात्मक वृत्तीला मन असें ह्मणतात व निश्चयात्मक वृत्तीला बुद्धि असें ह्मणतात. आकाशादि सर्व पांच सूक्ष्मभूतांच्या पांच रजोगुणांशांपासून प्राण उत्पन्न झाला. ह्या प्राणाचे पांच भेद—प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे—प्रसिद्धच आहेत. पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, पांच प्राण, बुद्धि व मन ह्या सर्वांच्या समुदायास लिंगशरीर ह्मणतात. व्यष्टि ह्मणजे प्रत्येक व्यक्ति आणि समष्टि ह्मणजे व्यक्तींचा समुदाय. झाड ही व्यष्टि आणि झाडांचा समुदाय जें वन ती समष्टि होय. शुद्धसत्वप्रधानमायोपाधिक परमेश्वर जेव्हां लिंगशरीरांचे समष्टीवर अथवा व्यष्टिलिंगशरीराभिमानी तैजससंज्ञक जीवसमुदायावर अभिमान ठेवितो तेव्हां त्याला हिरण्यगर्भ असें ह्मणतात. तो जीव व्यष्टीचा अभिमानी असल्यामुळें अल्पज्ञ आहे व हिरण्यगर्भ समष्ट्यभिमानी असल्यामुळें सर्वज्ञ आहे. आतांपर्यंत सांगितलेली सृष्टि अपंचीकृत पंचभूतांपासून झालेली आहे. अपंचीकृत ह्मणजे परस्परांत परस्पर मिश्र नसणें. पंचीकरण ह्मणजे पांच भूतांचा परस्पर मिश्रभाव. आकाश, वायु, तेज, अप् व पृथ्वी ह्या पांच भूतांपैकीं प्रत्येकाचे आठ आठ भाग सारखे कल्पावेत; कल्पिलेल्या आठ आठ भागांपैकीं प्रत्येकाचे चार चार भाग वेगवेगळे ठेवावेत व बाकी राहिलेल्या चार चार भागांपैकीं एकेक भाग दुसऱ्या चार भूतांच्या वेगळ्या ठेविलेल्या चार भागांमध्यें मिळवावा. उदाहरणार्थः—पृथ्वीचे आठ भाग कल्पिले. पैकीं चार वेगळे ठेविले आणि चार शिलक राहिले. ह्या शिलक राहिलेल्या चोहोंपैकीं एकेक भाग अप्, तेज, वायु व आकाश ह्यांच्या वेगळ्या ठेविलेल्या चारचार भागांमध्यें मिळविला व त्याचप्रमाणें अप, तेज वायु व आकाश ह्यांच्या शिलक राहिलेल्या चारचार भागांपैकीं एकेक भाग पृथ्वीच्या वेगळ्या ठेविलेल्या चार भागांत मिळविला. तात्पर्य, पंचीकृत भूतांमध्यें स्वतःचे चार अंश व इतर चोहोंचे मिळून चार अंश असे आठ अंश असतात.

**स भगवान्सृष्ट्वेदं जगत्तस्य च स्थितिं चिकीर्षुर्मरीच्यादीनग्रे सृष्ट्वा प्रजापतीन्प्रवृत्तिलक्षणं धर्मं ग्राहयामास वेदोक्तम् । ततोन्यांश्च सनकसनन्दनादीनुत्पाद्य निवृत्तिधर्मं ज्ञानवैराग्यलक्षणं ग्राहयामास ॥**

---

पंचीकृत पंचमहाभूतांपासून ब्रह्मांड उत्पन्न होतें. ह्या ब्रह्मांडांत वर सात आणि खालीं सात मिळून एकंदर चवदा लोक आहेत. भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक हीं वरील सात लोकांचीं अनुक्रमें नांवें असून अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल आणि पाताल हीं अनुक्रमें खालच्या सात लोकांचीं नांवें आहेत. ह्या लोकांना चतुर्दश भुवनेंही ह्मणतात. ह्या चतुर्दश भुवनांतील प्राण्यांचीं स्थूल शरीरें व त्या शरीरांचें उपभोग्य अन्नपानादिक जड पदार्थ ह्या सर्वांची उत्पत्ति पंचीकृत पंचमहाभूतांपासूनच होतें. प्राण्यांच्या स्थूल शरीरांचे समष्टीवर अभिमान ठेवणारा जो हिरण्यगर्भ त्याला विराट्पुरुष असें ह्मणतात. )

त्या भगवान् नारायणानें हें जगत् उत्पन्न केलें आणि तें कायम राखण्याकरितां मरीचिप्रभृति प्रजाधिपति प्रथम उत्पन्न करून त्यांना त्या भगवानानें प्रवृत्तिरूप वेदोक्त धर्म पढविला व मरीचिप्रभृतींहून अन्य असे सनकसनंदनप्रभृति पुत्र उत्पन्न करून त्यांना निवृत्तिरूप वेदोक्त धर्म त्यानें पढविला. ज्ञान व वैराग्य हें ह्या निवृत्तिरूप धर्माचें स्वरूप आहे.

( " अहं प्रजाः सिसृक्षुस्तु तपस्तप्त्वा सुदुश्चरम् । पतीन्प्रजानामसृजं महर्षीनादितो दश ॥ मरीचिमत्र्यङ्गिरसं पुलस्त्यं पुलहं क्रतुम् । प्रचेतसं वसिष्ठं च भृगुं नारदमेव च ॥" ह्याप्रमाणें मनुस्मृतींत श्लोक आहेत आणि ' मरीचिं च स्वनेत्राभ्यां हृदयाद्भृगुमेव च । शिरसोऽङ्गिरसं चैव तथोदानाद्द्विजोत्तमाः । पुलस्त्यं पुलहं व्यानादपानात्क्रतुमीश्वरः । दक्षं प्राणात्तथैवात्रिं श्रोत्राभ्यां मुनिपुङ्गवाः ॥ समानाच्च वसिष्ठाख्यं संकल्पाद्ध-

द्विविधो हि वेदोक्तो धर्मः प्रवृत्तिलक्षणो निवृत्तिलक्षणश्च जगतः स्थितिकारणं प्राणिनां साक्षादभ्युदयनिः-

---

मैसंज्ञितम् । एवमेतानजः श्रीमानसृजत्साधकोत्तमान् " असे स्कंदपुराणांत श्लोक आहेत. तेव्हां भाष्यांतील ' मरीच्यादीन् ' ह्या शब्दानें मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, प्रचेतस, वसिष्ठ, भृगु, नारद, दक्ष व धर्म असे बारा समजावेत किंवा मनुस्मृत्युक्त अगर सूतसंहितोक्त दहाच घेऊन कल्पभेदानें व्यवस्था समजावी. ' मरीच्यादीन्प्रजापतीन् ' असें लिहून आचार्यांनीं मरीचिप्रभृति प्रजाधिपति सांगितले. " भृगुं मरीचिमत्रिं च पुलस्त्यं पुलहं क्रतुम् । वसिष्ठं च महातेजाः सोसृजन्मनसा सुतान् ॥ सप्त ब्रह्माण इत्येते पुराणे निश्चयं गताः' ह्या पुराणश्लोकांत भृगुप्रभृतिप्रजापति सांगितले आहेत. ' ततः प्रजानां पतयः प्राभवन्नेकविंशतिः ' ह्या महाभारतांतील श्लोकार्धावरून एकवीस प्रजापति असल्याचें सिद्ध होतें. ' ऋषयः सप्त पूर्वे ये मनवश्च चतुर्दश एते प्रजानां पतय एभिः कल्पः समाप्यते ' ॥ ह्या ब्रह्मांडपुराणस्थ श्लोकांतही एकवीस प्रजापतींचा निर्देश केला आहे. महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा । मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ह्या भगवद्गीतेंतील दशमाध्यायस्थ श्लोकांतही ( मधुसूदनसरस्वतीप्रभृतींच्या मतानें ) एकवीस प्रजापति सांगितले आहेत असें होतें. ' ततोन्यांश्च सनकसनन्दनादीन् ' ह्या भाष्यांतील ' ततः ' शब्द 'अनन्तरं ' ह्या शब्दाशीं समानार्थक न समजतां ' तेभ्यः ' ह्या शब्दाशीं समानार्थक समजून ' ततोन्यान् ' ह्या दोन शब्दांचा अर्थ ' मरीचिप्रभृतींहून अन्य ' असा केला आहे. कारण, सनकसनंदनादिकांची उत्पत्ति मरीचिप्रभृति महर्षींच्या पूर्वीं झाली असल्याचें पुराणांतून आढळतें.)

जगताच्या स्थितीला कारणीभूत जो वेदोक्त धर्म तो दोन प्रकारचा आहे; प्रवृत्तिरूप आणि निवृत्तिरूप. प्राण्यांच्या अभ्युदयाला व मोक्षाला

श्रेयसहेतुर्यः स धर्मो ब्राह्मणाद्यैर्वर्णिभिराश्रमिभिश्च श्रेयोर्थिभिरनुष्ठीयमानो दीर्घेण कालेनानुष्ठातॄणां कामोद्भवाद्धीयमानविवेकविज्ञानहेतुकेनाधर्मेणाभिभूयमाने धर्मे प्रवर्धमाने चाधर्मे जगतः स्थितिं परिपिपालयिषुः स आदिकर्ता नारायणाख्यो विष्णुर्भौमस्य ब्रह्मणो ब्राह्मणत्वस्य रक्षणार्थं देवक्यां वसुदेवादंशेन किल संबभूव । ब्राह्मणत्वस्य हि रक्षणे रक्षितः स्याद्वैदिको धर्मस्तदधीनत्वाद्वर्णाश्रमभेदानाम् ॥

---

जो साक्षात् कारण तो धर्म होय. हा जो दोन प्रकारचा वेदोक्त धर्म त्याचें अनुष्ठान वर्णाश्रमधर्मांनीं युक्त असलेले कल्याणेच्छु ब्राह्मणादिक करीत असतात ( आणि तो धर्म अनुक्रमें प्राण्यांच्या अभ्युदयाला व मोक्षाला साक्षात् कारणीभूत होतो. (सारांश, प्रवृत्तिरूप धर्माचें अनुष्ठान यथाविधि केलें असतां त्यापासून साक्षात् अभ्युदय होऊन ज्ञानद्वारा मोक्षप्राप्तीलाही तो प्रवृत्तिरूप धर्म कारणीभूत होतो आणि निवृत्तिरूप धर्मानें वागलें असतां तो प्रत्यक्षच मोक्षाला कारणीभूत होतो. कृत व त्रेता हीं युगें संपूर्ण होऊन द्वापराच्या समाप्तीपर्यंत ) दीर्घ काल लोटल्यामुळें वेदोक्त धर्मानें वागणारे जे ब्राह्मणादिक त्यांचे ठिकाणीं कामक्रोधादि वृत्तींचें प्राबल्य होऊं लागलें. तेव्हां विवेक आणि ज्ञान ह्यांचा ऱ्हास होऊन अधर्म होऊं लागला व ह्याप्रमाणें धर्माला ग्रासून टाकून तो वृद्धिंगत होऊं लागला असतां ( ईश्वरानें घालून दिलेली जगताची मर्यादा नाहींशी होत चालली. ह्मणून ती) स्वकृत जगन्मर्यादा रक्षण करण्याच्या उद्देशानें ( ह्मणजे जगताची स्थिति कायम राखण्याच्या उद्देशानें ) तो आदिकर्ता सर्वव्यापी नारायण भूमिगत ब्रह्माचें ह्मणजे ब्राह्मणत्वाचें रक्षण करण्याकरितां वसुदेवापासून देवकीचे ठिकाणीं आपल्या अंशानें ( कृष्ण ह्मणून ) अवतीर्ण झाला असें पुराणप्रसिद्ध आहे-सर्व वर्ण व सर्व आश्रम हे ब्राह्मणत्वावर अवलंबून असल्यामुळें ब्राह्मण-

स च भगवाञ्ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः सदा संपन्नस्त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां प्रकृतिं वशीकृत्याजोऽव्ययो भूतानामीश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावोपि सन्स्वमायया देहवानिव जात इव च लोकानुग्रहं कुर्वँल्लक्ष्यते स्वप्रयोजनाभावेपि भूतानुजिघृक्षया वैदिकं धर्मद्वयमर्जुनाय शोकमोहमहोदधौ निमग्नायोपदिदेश गुणाधिकैर्हि गृहीतोनुष्ठीयमानश्च धर्मः प्रचयं गमिष्यतीति । तं धर्मं भगवतोपदिष्टं सर्वज्ञो भगवान्वेदव्यासो गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैरुपनिबबन्ध॥ तदिदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं दुर्विज्ञेयार्थं तद-

---

त्याच्या रक्षणानें वैदिक धर्माचें परिपालन होईल हें अगदीं उघड आहे.

ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बल, वीर्य आणि तेज ह्यांनीं सर्वदा संपन्न असलेल्या त्या भगवानानें सर्वांचे उत्पत्तीला कारणीभूत अशी जी आपली वैष्णवी माया तिला आपल्या अधीन ठेविली असतांही व जन्ममरणरहित आणि भूतांचा ईश्वर असून नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त अशा स्वरूपानें तो युक्त असूनही त्या मायेच्या योगानें देहधारी व जन्मास आल्यासारखा तो भासून लोकांवर अनुग्रह करीत आहे असा दृष्टोत्पतीस येतो आणि त्यानेंच स्वतःला गरज नसतांनाही प्राण्यांवर अनुग्रह करण्याच्या उद्देशानें ( ह्मणजे अभ्युदय आणि मोक्ष ह्यांकडे प्राण्यांची प्रवृत्ति व्हावी ह्या उद्देशानें ) प्रवृत्तिरूप आणि निवृत्तिरूप अशा दोन वेदोक्त धर्मांचा, शोकमोहरूप महासागरांत निमग्न झालेल्या अर्जुनाला, उपदेश केला. गुणी पुरुषांनीं धर्म समजून घेऊन त्याचें अनुष्ठान केलें असतां त्याची वृद्धि होते ( असें मनांत आणून इतर साधारण प्राण्यांना उपदेश न करितां अर्जुनालाच भगवानांनीं धर्मोपदेश केला ) असो. भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाला उपदेशिलेला तो धर्म सर्वज्ञ आणि भगवान् अशा वेदव्यासांनीं गीतासंज्ञक सातशें श्लोकांनीं ग्रथित केला आहे.

र्थाविष्करणायानेकैर्विवृतपदपदार्थवाक्यार्थन्यायमप्यत्यन्तविरुद्धानेकार्थत्वेन लौकिकैर्गृह्यमाणमुपलभ्याहं विवेकतोर्थनिर्धारणार्थं संक्षेपतो विवरणं करिष्यामि ॥ तस्यास्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं सहेतुकस्य संसारस्यात्यन्तोपरमलक्षणं तच्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञाननिष्ठारूपाद्धर्माद्भवति । तथेममेव गीतार्थं धर्ममुद्दिश्य भगवतैवोक्तं स हि धर्मः सुपर्याप्तो ब्रह्मणः पदवेदन इत्यनुगीतासु । किंचान्यदपि तत्रैव चोक्तं नैव धर्मी न चाधर्मी न चैव हि शुभाशुभी । यः स्यादेकासने लीनस्तूष्णीं किंचिद-

---

त्या ह्या गीताशास्त्रामध्यें सर्व वेदांतील अर्थाचें सार संगृहीत केलें आहे; ह्या शास्त्राचा ( वास्तविक ) अर्थ समजणें कठीण आहे व त्याचा अर्थ स्पष्ट होण्याकारितां अनेक वृत्तिकारांनीं—मूळ ग्रंथांतील पदच्छेद, पदांचा अर्थ, विग्रहाच्या द्वारानें वाक्यार्थनिर्देश व त्याकारितां अपेक्षित असलेला आक्षेपसमाधानरूप न्याय—हीं दर्शविलीं आहेत. तथापि ( शास्त्राचा चांगला परिचय नसलेले समुच्चयवादी वगैरे ) लोक गीताशास्त्राचा अत्यंत विरुद्ध आणि अनेक प्रकारचा अर्थ करीत आहेत असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें मी अर्थनिश्चयाकारितां विवेचनपूर्वक संक्षेपानें गीताशास्त्राचें विवरण करितों. "समूल संसाराचा कायमचा नाश" ह्या लक्षणानें युक्त असलेलें जें सर्वोत्कृष्ट कैवल्य ( ह्मणजे मुक्ति ) तें ह्या गीताशास्त्राचें संक्षेपतः फल होय. तें कैवल्य सर्वकर्मसंन्यासपूर्वक जी आत्मज्ञानाविषयीं निष्ठा तिच्या पासूनच होतें, ( तात्पर्य, आत्मज्ञाननिष्ठा हा ह्या गीताशास्त्रांतील मुख्यत्वेंकरून प्रतिपाद्य विषय होय ). "ब्रह्मपदाची प्राप्ति करून देण्यास तो धर्मच समर्थ आहे" असें अनुगीतेमध्यें भगवानांनींच ह्याच गीतार्थानें निश्चित होणाऱ्या ज्ञाननिष्ठारूप धर्माला उद्देशून ह्मटलें आहे. शिवाय 'बाह्येंद्रियव्यापाररहित असून अंतःकरणांतही कसलेंच चिंतन न करितां केवळ अद्वितीय ब्रह्माचेच

चिन्तयन् ॥ ज्ञानं संन्यासलक्षणमिति च । इहापि चान्त उक्तमर्जुनाय सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रजेति । अभ्युदयार्थोपि यः प्रवृत्तिलक्षणो धर्मो वर्णानाश्रमांश्चोद्दिश्य विहितः स देवादिस्थानप्राप्तिहेतुरपि सन्नीश्वरार्पणबुद्ध्यानुष्ठीयमानः सत्त्वशुद्धये भवति फलाभिसंधिवर्जितः शुद्धसत्त्वस्य च ज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तिद्वारेण ज्ञानोत्पत्तिहेतुत्वेन च निःश्रेयसहेतुत्वमपि प्रतिपद्यते। तथा चेममर्थमभिसंधाय वक्ष्यति ब्रह्मण्याधाय कर्माणि० योगिनः कर्म

---

ठिकाणीं लय लावून जो बसलेला असतो त्याला धर्म, अधर्म, शुभ अथवा अशुभ ह्याचा संपर्क होत नाहीं. असंप्रज्ञातसमाधिनिष्ठ पुरुषांचें सर्वकर्मत्यागजन्य ज्ञानच मुक्तीला कारणीभूत होतें ' असेंही आणखीं त्या अनुगीतेमध्येंच सांगितलें आहे. इतकेंच नव्हें; परंतु, ह्या गीताशास्त्रांतही शेवटीं " सर्व धर्म आणि अधर्म ह्यांचा त्याग करून ह्मणजे सर्व कर्मांचा त्याग करून सर्वात्मा, सर्वभूतांतर्यामी वगैरे मीच आहें; माझ्याहून दुसरें कांहींही नाहीं असें जाण " ह्मणून सांगितलें आहे.

प्रत्यक्ष अभ्युदयार्थही वर्णाश्रमांना उद्देशून विहित असलेला जो प्रवृत्तिरूप धर्म तो देवादिकांचें स्थान प्राप्त होण्याला जरी कारणीभूत होणारा असला तरी फलाची इच्छा न धरितां ईश्वरार्पणबुद्धीनें त्याचें अनुष्ठान केलें ह्मणजे त्याच्या योगानें अंतःकरणाची शुद्धि होते आणि ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे त्याला ज्ञाननिष्ठेविषयीं योग्यता ह्या प्रवृत्तिरूप धर्मानेंच येत असल्यामुळें व ज्ञानोत्पत्तीलाच हा धर्म कारणीभूत होत असल्यामुळें मोक्षालाही हा (परंपरेनें) कारणीभूत होतो. हाच अर्थ मनांत धरून भगवानांनीं " ज्याप्रमाणें कमलपत्र उदकानें लिप्त होत नाहीं त्याचप्रमाणें मोक्षफलाविषयींही आसक्ति न धरितां (मालकाकरितां काम करणाऱ्या नोकराप्रमाणें) केवल

कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धय इति ॥ इमं द्विप्रकारकं धर्मं निःश्रेयसप्रयोजनं परमार्थतत्त्वं वासुदेवाख्यं च परब्रह्माभिधेयभूतं विशेषतोभिव्यञ्जयद्विशिष्टप्रयोजनसंबन्धाभिधेयवद्गीताशास्त्रं यतस्तदर्थविज्ञाने समस्तपुरुषार्थसिद्धिरतस्तद्विवरणे यत्नः क्रियते मया ॥

धृतराष्ट्र उवाच ॥

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय ॥ १ ॥

अत्र च धृतराष्ट्र उवाच धर्मक्षेत्र इत्यादि ।

---

ईश्वराकरितांच जो तत्त्ववेत्ता सर्व कर्में करितो तो पापानें लिप्त होत नाहीं. तत्त्वज्ञान न झालेले कर्मठ फलाविषयीं आसक्ति न धरितां जें कर्म करितात तें त्यांच्या अंतःकरणशुद्धीला कारणीभूत होतें" असें पुढें ह्मटलें आहे. सारांश, मुक्ति हें ज्याचें फल आहे असा हा दोन प्रकारचा धर्म, आणि परब्रह्म ज्याला ह्मणतात तें वासुदेवसंज्ञक परमार्थतत्व हीं स्पष्टपणें ह्या गीताशास्त्रांत दर्शविलीं असल्यामुळें हें गीताशास्त्र विशेषफल, संबंध आणि विषय ह्या त्रयी(नें ह्मणजे अनुबंधत्रया)नेंयुक्त ( आहे आणि ह्मणूनच व्याख्यानालाही तें योग्य ) आहे. करितां, ज्याअर्थीं ह्या गीताशास्त्राचा अर्थ समजल्यानें सर्वपुरुषार्थप्राप्ति होणारी आहे त्याअर्थीं त्याचें विवरण करण्याविषयीं मी यत्न करीत आहें.

ह्या गीताशास्त्रांतर्गत प्रथमाध्यायांतील धृतराष्ट्र उवाच धर्मक्षेत्रे इत्यादि ह्या प्रथम श्लोकाचें तात्पर्य कथासंदर्भ दाखविण्याकडें आहे.

( वैशंपायन सांगतात—हे जनमेजया, नंतर ) धृतराष्ट्रानें प्रश्न केला:— कीं, हे संजया, धर्माच्या उत्पत्तीला व वृद्धीला कारणीभूत अशा

---

१ दुसऱ्या अध्यायांतील अकराव्या श्लोकापर्यंतचें प्रकरण महत्त्वाचें नसल्यामुळें त्यावर भाष्य नाहीं. सबब, तेथपर्यंत नुसत्या श्लोकांचेंच भाषांतर पुढें दिलें आहे.

कुरुक्षेत्रामध्यें युद्धाकरितां एकत्र जमलेल्या माझ्या दुर्योधनादिकांनीं व युधिष्ठिरादिक पांडवांनीं काय केलें ? १.

( क्षेत्र ह्या शब्दाचा मूळ अर्थ शेत असा आहे. ज्याप्रमाणें शेतांत धान्य उगवून वाढतें त्याचप्रमाणें कुरुक्षेत्रामध्यें पुरुषाचें आगमन झालें असतां पूर्वी धर्मबुद्धि त्याचे ठिकाणीं नसली तरी तेथें ती उत्पन्न होऊन वृद्धिंगत होतें. तात्पर्य, तें स्थान धर्मरूप धान्याच्या उत्पत्तीचें व वृद्धीचें ठिकाणच आहे; ह्मणून त्याला धर्मक्षेत्र असें ह्मटलें आहे. कुरुक्षेत्र ही देवांची यज्ञभूमि असल्यामुळें पुण्यकारक आहे आणि ह्मणूनच ती धर्माच्या उत्पत्तीला व वृद्धीला कारणीभूत आहे. कुरुक्षेत्राला समंतपंचक असेंही ह्मणतात. कुरुक्षेत्र ही देवांची यज्ञभूमि आहे अशा अर्थाच्या श्रुतिस्मृतिही आहेत. 'बृहस्पतिरुवाच याज्ञवल्क्यं देवानां देवयजनं सर्वेषां भूतानां ब्रह्मसदनम्' अशी जाबालश्रुति आहे; 'कुरुक्षेत्रं वै देवयजनं' असें शतपथ ब्राह्मणांत सांगितलें आहे ; " देवा वै सत्रमासत । ऋद्धिपरिमितं यशस्कामाः । तेऽब्रुवन् । यन्नः प्रथमं यश ऋच्छात् । सर्वेषां नस्तत्सहासदिति । तेषां कुरुक्षेत्रं वेदिरासीत् । " असें तैत्तिरीयारण्यकांत ह्मटलें आहे आणि " तरन्तुकारन्तुकयोर्यदन्तरं रामह्रदानां च मचक्रुकस्य । एतत्कुरुक्षेत्रसमन्तपञ्चकं प्रजापतेरुत्तरवेदिरुच्यते " असें महाभारतांतील शल्यपर्वांत सांगितलें आहे. दुर्योधन वगैरे धृतराष्ट्राचे पुत्र होते त्याप्रमाणें युधिष्ठिरादिक पांडवही कोणी परकी नसून धृतराष्ट्राच्या भ्रात्याचेच पुत्र होते. तेव्हां वास्तविक पाहिलें असतां ' मामकाः किमकुर्वत ' एवढ्याच प्रश्नानें निर्वाह होत होता. ' पाण्डवाश्च ' असा वेगळा निर्देश करण्याचें कांहीं कारण नव्हतें. परंतु, ह्या धृतराष्ट्रप्रश्नविषयक प्रथम श्लोकामध्यें ' मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत ' असें ह्मटलें आहे; त्यावरून पांडवांचे ठिकाणीं धृतराष्ट्राची ममत्वबुद्धि नसून द्रोहबुद्धि असल्याचें व्यक्त होतें. युद्ध करण्याच्या इच्छेनें समरांगणावर जमलेल्या कौरवपांडवांनीं युद्धच केलें असेल हें

सञ्जय उवाच ॥

दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

---

अर्थात सिद्ध असतांना त्यांनीं काय केलें ? ह्मणून धृतराष्ट्राला प्रश्न करण्याचें कारण नव्हतें. परंतु, ज्याअर्थीं त्यानें प्रश्न केला आहे त्याअर्थीं त्याचा कांहीं तरी तो प्रश्न करण्यामध्यें उद्देशही असला पाहिजेच. समरांगणामध्यें उभयपक्षांकडील योद्धे युद्ध करण्यास तयार झाले असूनही त्यांनीं युद्ध करण्याचा आपला उद्देश सोडून दिला असेल असें धृतराष्ट्राला वाटण्यास कांहीं कारणें होतीं आणि ह्मणूनच त्यानें तसा प्रश्न केला. ‘भीष्म, द्रोण, अर्जुन इत्यादि मोठमोठे वीर पुरुष उभयपक्षांकडे असल्यामुळें परस्परांना परस्परांची भीति उत्पन्न होऊन दोन्ही पक्षांकडील योद्ध्यांनीं युद्ध करण्याचें रहित केलें असेल; किंवा पांडव हे पूर्वीच धार्मिक असल्यामुळें युद्ध केल्यानें दोन्ही पक्षांकडील वीरांची विनाकारण हिंसा होईल ती न व्हावी अशी धर्मबुद्धि पुण्यभूमींत गेल्यामुळें त्यांची झाली असल्यास ते आपण होऊनच युद्धापासून निवृत्त झाले असतील; अथवा कुरुक्षेत्र ही पुण्यभूमि असल्यामुळें तेथें गेल्यावर माझ्या पापी पुत्रांच्या मनांतही शुभ वासना उत्पन्न होऊन त्यांनीं कदाचित् कपटानें पूर्वीं हरण केलेलें राज्य युद्धावांचूनच पांडवांच्या स्वाधीन केलें असेल’ अशा प्रकारच्या शंका धृतराष्ट्राचे अंतःकरणांत उद्भवल्या व त्यामुळें त्यानें संजयाला तसा प्रश्न केला ) ॥ १ ॥

( चर्मचक्षूंनीं अंध असून कृपा व लोकव्यवहार ह्या नेत्रांनींही हीन असल्यामुळें महान अंध जो धृतराष्ट्र त्याच्या प्रश्नाचा अभिप्राय जाणून त्याला अतिधार्मिक ) संजय प्रत्युत्तर देतोः—समरांगणांत गेल्यावर व्यूहरचनेनें उभें राहिलेलें पांडवसैन्य अवलोकन करून राजा दुर्योधन द्रोणाचार्यांसमीप जाऊन ह्मणाला २

( " पांडवांना भीष्मद्रोणादिकांचें भय वाटण्याचा संभवही नाहीं; दयेमुळें अर्जुनाला मोह होऊन पांडवांकडूनच युद्ध बंद होण्याचा प्रसंग आला होता खरा; परंतु, तो प्रसंग भगवानांनीं टाळला. हे धृतराष्ट्रा, कुरुक्षेत्रासारख्या पुण्यभूमींत गमन झाल्यामुळें दुर्योधनादिकांना पश्चात्ताप होऊन त्यांनीं धर्मबुद्धीनें पांडवांना राज्य परत दिलें असेल अशी शंका घेऊन तूं उगीच मनांत खिन्न होऊं नकोस " अशा प्रकारें संजयाचा आशय टीकाकारांनीं काढिलेला आहे. द्रोणाचार्यांना आपणाजवळ न बोलवितां पांडवांचें सैन्य अवलोकन केल्यावर दुर्योधन आपण होऊनच त्यांच्याकडे गेला असें सांगण्यांत पांडवसैन्य अवलोकन केल्याबरोबर दुर्योधनाच्या मनांत भय उत्पन्न झाल्याचें संजयानें धृतराष्ट्राला सुचविलें. ' दुर्योधनोऽब्रवीत् ' ह्या दोन पदांनींच निर्वाह होत असतांना ' राजा ' आणि ' वचनम् ' हे दोन शब्द ह्या श्लोकांत अधिक घातले आहेत. " पांडवसेना अवलोकन केल्यावर भय उत्पन्न झाल्यामुळें दुर्योधन जरी स्वतःचें रक्षण व्हावें ह्याच उद्देशानें आपल्या रक्षणकर्त्या आचार्यांकडे गेला होता तरी ' हा भीतीमुळें आला आहे ' असें द्रोणाचार्यांना न वाटतां ' माझा गौरव करण्याच्या उद्देशानें हा आपण होऊनच मजकडे आला आहे ' असें त्यांना वाटावें आणि आपण भयभीत झालों असल्याचें बाहेर पडूं नयें " अशा प्रकारची राजनीति लढविण्यामध्यें तुझा पुत्र दुर्योधन मोठा कुशल आहे हें धृतराष्ट्राला सुचविण्याकरितां ' राजा ' हें पद श्लोकांत घातलें आहे आणि नुसतें कांहींतरी न बोलतां त्यानें द्रोणाचार्यांशीं अर्थयुक्त भाषण केलें हें धृतराष्ट्राला सुचविण्याकरितां ह्या श्लोकांत ' वचनं ' हें पद आहे )॥ २॥

( पांडव प्रिय शिष्य असल्यामुळें त्यांच्या बरोबर द्रोणाचार्य मनापासून युद्ध करणार नाहींत असें मनांत आणून त्यांच्याविषयीं द्रोणाचार्यांच्या मनांत अतिशय क्रोध उत्पन्न करण्याकरितां ' पांडव आपली, धडधडीत अवज्ञा करीत आहेत ' असें सुचविण्याच्या उद्देशानें दुर्यो-

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

---

धन द्रोणाचार्यांना ह्मणाला ) ' हे आचार्य , आपला बुद्धिमान शिष्य जो द्रुपदपुत्र ( धृष्टद्युम्न ) त्यानें युद्धाकरितां सज्ज केलेली ही पांडुपुत्रांची प्रचंड सेना आपण अवलोकन करावी अशी माझी आपणांस प्रार्थना आहे ३.

( ' आचार्य, पांडव आपले प्रिय शिष्य आहेत. परंतु, तुमची परवा न करितां अगदीं तुमच्या जवळ उभी असलेली ही पांडुपुत्रांची सेना आपण विलंब न करितां अवलोकन करा. ह्मणजे त्या सेनेनें आपली कशी अवज्ञा केली आहे हें आपणांला आपोआपच समजून येईल. बरें, पांडवांचा प्रतीकार करणें अशक्य असल्यामुळें त्यांनीं केलेली अवज्ञा निमूटपणें आह्मांला सहन करणें भागच आहे ' असें ह्मणणेंही आपणांस नीट दिसणार नाहीं. कारण, ती सेना आपल्या शिष्यानें सज्ज केली असल्यामुळें तिचें निरसन करणें आपणांला मुळींच कठीण नाहीं. शिष्यापेक्षां गुरु अधिक असणार हें सिद्धच आहे. ' असें ह्या श्लोकाचें तात्पर्य टीकाकारांनीं काढिलें आहे. ह्या श्लोकांत ' व्यूढां तु धृष्टद्युम्नेन ' असें न ह्मणतां ' द्रुपदपुत्रेण ' असें ह्मणण्याचा उद्देश—आपला पूर्वींचा वैरी जो द्रुपद त्याच्या पुत्रानें आपणाविरुद्ध सैन्य तयार केलें आहे ही गोष्ट द्रोणाचार्यांच्या मनांत ठसविणें—हा होय. पांडवांना दुर्योधन सर्वदा अगदीं पाण्यांत पहात असतांना त्यांचे बाजूस असलेल्या धृष्टद्युम्नालाही त्यानें जें धीमान् ( ह्मणजे बुद्धिमान ) हें विशेषण दिलें आहे तें त्याचा गुण घेण्याकरितां दिलेलें नसून ' धृष्टद्युम्न बुद्धिमान असल्यामुळें त्यानें सिद्ध केलेल्या सैन्याची उपेक्षा करणें आपणांला नीट नव्हे ' हें द्रोणाचार्यांना सुचविण्याकरितां दिलेलें आहे. ' पश्य ' हा (लोटाचा) प्रयोग प्रार्थनार्थी आहे आणि पांडवांचा उद्धटपणा दाखवून स्वतःचा विनय

दर्शविणें हाच तो प्रयोग घालण्यांत दुर्योधनाचा उद्देश आहे. आचार्य ह्या पदाचा अन्वय ' पांडुपुत्राणाम् ' ह्या पदाशीं केला ह्मणजे ह्या श्लोकाचें दुसरें एक तात्पर्य निघतें तें असें:-अहो, पांडुपुत्रांचें आचार्य, ( माझें आचार्य आपण नव्हेच; कारण, त्यांच्यावरच आपलें प्रेम अतिशय आहे ) द्रुपदाचा पुत्र आणि तुमचा शिष्य जो धृष्टद्युम्न त्याचा हा प्रताप पहा ! अहो काय सांगावें ! बोलून चालून तुमच्या वधाकरितां उत्पन्न झालेला जो तुमच्या वैऱ्याचा पुत्र त्यालाही आपण पढविलात ! तेव्हां खरोखर आपला मूढपणाच पुढें मागें माझ्यावर अनर्थ गुदरण्याला कारणीभूत होणार आहे. शत्रूच्या वधाला उपयोगी पडणारी विद्या ज्यानें प्रत्यक्ष त्या शत्रूपासूनच घेतली तो वास्तविकच बुद्धिमान आहे. सारांश, अशा गुरुद्रोही बुद्धिमान शिष्यानें सिद्ध केलेली सेना पाहण्यापासून दुसऱ्या कोणालाही आनंद न होतां मूढपणामुळें तो आपणांलाच होणारा आहे; तेव्हां आपणच ती पहा. असो. धृतराष्ट्राच्या प्रश्नाला प्रत्युत्तर देतांना संजयानें दुर्योधन गुरुद्रोही असल्याचें सुचविलें आणि ' धर्मक्षेत्रांत गेल्यावरही ज्याची अशा प्रकारची दुष्ट बुद्धि कायम राहिली त्याला पश्चात्ताप होऊन त्यानें पांडवांस राज्य परत दिलें असेल अशी शंका तरी तुला पाहिजे कशाला ? कारण, द्रोणादिकांविषयीं सुद्धां शंका घेत असलेल्या त्या दुर्योधनाची बुद्धि अतिशयच दुष्ट आहे ' असेंही त्याला त्यानें दर्शविलें ) ॥ २ ॥

( ' आतां, यःकश्चित् द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नाच्या ताब्यांत असलेल्या सेनेचा पराजय माझ्या पक्षाचा कोणीही करील तेव्हां तूं कशाला उगींच भीत आहेस ' असें ह्मणाल तर हे आचार्य, केवळ धृष्टद्युम्न हाच एक प्रतिपक्ष्यांकडे शूर आहे असें नाहीं. तो एकटाच असतां ह्मणजे कदाचित् त्या सैन्याची उपेक्षा करणेंही चाललें असतें. परंतु, ह्या पांडवसेनेमध्यें शूर बहुत आहेत. ह्याकरितां, तिचा पराजय करण्याविषयीं अवश्य झटलें पाहिजे. शिवाय जे शूर आहेत ते सामान्य आहेत असेंही

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥
अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥

---

नाहीं. परंतु, ) युद्ध करण्यामध्यें भीमार्जुनांसारखे प्रचंड धनुर्धारी शूर ह्या पांडवसेनेंत आहेत. महारथी सात्यकि, विराट व द्रुपद; बलाढ्य धृष्टकेतु, चेकितान व काशिराज; पुरुषसिंह पुरुजित् , कुंतिभोज आणि शैब्य ५ ; पराक्रमी युधामन्यु ; बलाढ्य उत्तमौजा; सुभद्रापुत्र अभिमन्यु आणि द्रौपदीपुत्र असे योद्धे पांडवसेनेंत असून हे सर्व महारथी आहेत ६.

(' मग अतिप्रचंड शत्रुसैन्य अवलोकन करून जर भ्यायला असशील तर शत्रूंशीं तह करणें बरें; युद्धाचा आग्रह कशाला ? ' असें कदाचित् द्रोणाचार्य ह्मणतील ह्मणून दुर्योधन ह्मणतो ) हे द्विजोत्तमा, आह्मा सर्वांमध्यें जे सर्वोत्कृष्ट वीर आहेत ते तर आपण ऐकाच व जे माझ्या सेनेचे नायक आहेत तें ही आपण श्रवण करा. मी आपल्या स्मरणार्थ नामनिर्देशपूर्वक त्यांतले कांहीं सांगत आहे ७.

---

१ ( युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव ह्या पांच पांडवांपासून द्रौपदीला अनुक्रमें प्रतिविंध्य, सुतसोम, श्रुतकीर्ति, शतानीक आणि श्रुतकर्मा असे पांच पुत्र झाले होते. २ शस्त्रास्त्रविद्येंत प्रवीण असून दहा हजार धनुर्धारी योद्ध्यांबरोबर जो एकटा युद्ध करितो त्याला महारथी ह्मणतात व असंख्य योद्ध्यांबरोबर युद्ध करणाऱ्याला अतिरथी ह्मणतात. त्याचप्रमाणें एकाशीं युद्ध करणाऱ्याला रथी ह्मणतात व रथ्यापेक्षां पराक्रमानें किंचित् कमी असणाऱ्याला अर्धरथी ह्मणतात. एको दश सहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च स महारथ उच्यते ॥ अमितान्योधयेद्यस्तु स प्रोक्तोतिरथाभिधः । रथस्त्वेकेन यो योद्धा तन्न्यूनोर्धरथः स्मृतः ॥

भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥
अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

---

( पांडवसेना अवलोकन करून अंतःकरणांत जी भीति उत्पन्न झाली होती ती छपवून वरकरणी आपलें धैर्य दाखविण्याच्या उद्देशानें दुर्योधनानें तु ( ह्मणजे तर ) ह्या शब्दाचा प्रयोग केला आहे आणि तिन्ही वेद जाणणाऱ्या त्रैवार्णिकांमध्यें आपण श्रेष्ठ असल्यामुळें जरी आपणाला सर्व माहितच आहे तरी माझ्या पक्षांकडील असंख्य वीरांपैकीं अवशिष्ट राहिलेल्यांचें आपणांला स्मरण होण्याकरितां मी नामनिर्देशपूर्वक कांहीं आपणाला सांगत आहें. आपणाला माहीत नसलेलें कांहीं सांगत आहें अशांतला प्रकार मुळींच नाहीं—हें दुर्योधनानें द्विजोत्तम ह्या संबोधनाच्या योगानें दर्शविलें आहे. द्विजोत्तम हें संबोधन कुत्सित बुद्धीनें घातलेलें आहे असें धरिलें ह्मणजे ह्या श्लोकाचा आशय दुसराच निघत असतो तो असाः——ब्राह्मण असल्यामुळें अर्थातच युद्ध करण्यामध्यें आपण प्रवीण नाहीं. तेव्हां पांडवांवर प्रेम अधिक असल्यामुळें जरी आपण युद्ध केलें नाहीं तरी भीष्मप्रभृति क्षत्रियश्रेष्ठ आमचे बाजूला असल्यामुळें आमचा कांहीं मोठासा तोटा होणार नाहीं. आतां आपले प्रिय शिष्य जे पांडव त्यांचें सैन्य अवलोकन केल्यानें हर्षाच्या अतिरेकामुळें भान नाहींसें होऊन आमच्या कडील वीरांचें विस्मरणही आपणांला पडलें असेल. ह्यास्तव, त्यांची आपल्याला आठवण देण्याकरितां अस्मत्पक्षीय असंख्य वीरांपैकीं मी कांहींचा नामनिर्देश येथें करितों ) ॥ ७ ॥

आपण, भीष्म, कर्ण व संग्रामविजयी कृप हे चार आह्मा सर्वांमध्यें सर्वोत्कृष्ट वीर असून अश्वत्थामा, विकर्ण आणि सोमदत्तपुत्र भूरिश्रवा हे सेनानायक आहेत व शिवाय आणिकही माझ्या करितां जीव

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भिमाभिरक्षितम् ॥ १० ॥

---

देण्यासही तयार झालेले असे ( शल्य, कृतवर्मा वगैरे ) इतर पुष्कळ शूर असून सर्वही नानाप्रकारच्या शस्त्रांनीं शत्रूंवर प्रहार करणारे आणि ह्मणूनच युद्धकलेंत निपुण असे आहेत ८, ९.

( शौर्यासंबंधानें पाहूं गेलें असतां भीष्मांचा निर्देश प्रथम करावयास पाहिजे होता; परंतु, कार्यसाधु दुर्योधनाचें हें बोलणें द्रोणाचार्यांशींच चाललें असल्यामुळें त्यानें त्यांचाच उल्लेख प्रथम केला. कृपाचार्यांचा निर्देश योग्यतेच्या मानानें कर्णाचे पूर्वीं हवा होता; परंतु, दुर्योधनाचें कर्णाशीं फारच सख्य असल्यामुळें त्याच्या तोंडांतून कर्णाचें नांव प्रथम आलें. तथापि इतक्यांत दुर्योधन उमगला आणि कृपाचार्यांचा निर्देश कर्णानंतर केल्याबद्दल कदाचित् द्रोणाचार्यांस क्रोध येईल असें समजून त्यानें कृपाचार्यांना समितिंजय ( ह्मणजे संग्राम जिंकणारा ) असें विशेषण दिलें. सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा आणि आपला कनिष्ठबंधु शूर विकर्ण ह्यांचे पूर्वीं अश्वत्थाम्याचा निर्देश करण्यांत द्रोणाचार्यांची प्रीति संपादन करणें हाच दुर्योधनाचा उद्देश आहे. बहवः ह्या विशेषणानें आपलें सैन्य पुष्कळ आहे असें द्रोणाचार्यांस दुर्योधनानें सुचविलें; शूराः ह्या विशेषणानें सैन्याचें शौर्य दर्शविलें; मदर्थे त्यक्तजीविताः ह्या शब्दांनीं सैन्याची आपले ठिकाणीं अमर्याद प्रीति असल्याचें सुचविलें; नानाशस्त्रप्रहरणाः ह्या विशेषणानें सैन्याची युद्धाविषयीं उद्युक्तता दर्शविली आणि युद्धविशारदाः ह्या विशेषणानें सेनेचें युद्धकौशल दुर्योधनानें व्यक्त केलें ) ॥ ८॥ ९ ॥

(इतकें जरीं स्वसैन्याविषयीं सांगितलें तरी द्रोणाचार्यांना कदाचित् दोन्ही सैन्यें सारखींच वाटतील तर तीं न वाटावींत ह्मणून आपलें सैन्य अधिक असल्याचें द्रोणाचार्यांना समजाविण्याच्या उद्देशानें दुर्योधन

ह्मणतोः—तशाप्रकारच्या गुणवान् वीरांचें ताब्यांत असलेलें ) तें आमचें सैन्य ( अकरा अक्षौहिणी असल्यामुळें पांडवसेनेच्या मानानें ) अपरिमित आहे व ( ज्याची कीर्ति प्रख्यात ) आहे अशा सूक्ष्मबुद्धि ) भीष्मांनीं त्याचें सर्व बाजूंनीं रक्षण केलें आहे. ह्या पांडवांचे हें सैन्य तर ( सात अक्षौहिणीच असल्यामुळें आमच्या सैन्याचे मानानें ) परिमित असून ( अत्यंतचंचलबुद्धि )भीमानें त्याचें रक्षण केलें आहे (तस्मात्, आमचा विजय हें ठरलेलेंच आहे )१०.

( पर्याप्तं=समर्थ; अपर्याप्तं=असमर्थ असा ह्या दोन शब्दांचा अर्थ करून त्यांचा अन्वय ‘ अस्माकं बलं ’ ह्या पदांशीं व ‘ एतेषां बलं ’ ह्या पदांशीं अनुक्रमें केला असतां ह्या श्लोकाचें तात्पर्य वेगळें निघतें तें असें:—अकरा अक्षौहिणींनीं युक्त असलेलें आमचें अपरिमित सैन्य प्रख्यात महाकीर्तिमान् अशा सूक्ष्मबुद्धि भीष्मांनीं रक्षित असल्यामुळें पर्याप्त आहे ह्मणजे शत्रूंचा पराभव करण्याला समर्थ आहे. परंतु, ह्या पांडवांचें सैन्य जर ह्मणाल तर सात अक्षौहिणीच असल्यामुळें अल्प असून चंचलबुद्धि आणि केवळ अडदांड अशा भीमसेनाच्या ताब्यांत असल्यामुळें अपर्याप्त ह्मणजे आमचा पराभव करण्यास असमर्थ आहे. ‘ अपर्याप्तं ’ ह्या शब्दाचा अर्थ परंपरेनें अजिंक्य आणि “ पर्याप्तं ” ह्या शब्दाचा अर्थ परंपरेनें ह्याचे उलट करून अपर्याप्तं ह्यापदाचा अन्वय पूर्वार्धांतील इतर पदांशीं व “ पर्याप्तं ” ह्या पदाचा अन्वय उत्तरार्धांतीलच पदांशीं कायम ठेविला ह्मणजे ह्या श्लोकाचें आणखी एक तात्पर्य निघत असतें तें असें:—तें हें आमचें सैन्य भीष्मांनीं अधिष्ठित असल्यामुळें अपर्याप्त=अपरिमित=शत्रूंना अजिंक्य आहे आणि ह्या पांडवांचें सैन्य भीमानें अधिष्ठित असल्यामुळें पर्याप्त=परिमित=जिंकण्यास शक्य आहे. पूर्वार्धांतील ‘ तत् ’ ह्या पदानें पांडवसेनेचा परामर्श व ‘ इदं ’ ह्या उत्तरार्धांतील पदानें कौरवसेनेचा परामर्श होतो असें मानून भीष्माभिरक्षितं ” व “ भीमाभिरक्षितम् ” हे दोन्ही बहु-

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥

---

व्रीहि समास मानिले ह्मणजे ह्या श्लोकाचें आणखी एक तात्पर्य निघतें तें असें:—तें पांडवांचें सैन्य आमच्याशीं टक्कर देण्याजोगें नाहीं. कारण, त्या सैन्याकरितां आह्मी भीष्मांना राखून ठेविलें आहे. हें आमचें सैन्य तर पांडवांचा समाचार घेण्यास पुरेसें आहे. तें सहज पांडवांचा पराभव करील. कारण, ह्या आमच्या सैन्याचा पराभव करण्याकरितां पांडवांनीं काय तो चंचलबुद्धि भीमच राखून ठेविला आहे. तस्मात्, आह्मांला भिण्याचें यत्किंचित्ही कारण दिसत नाहीं. कांहीं टीकाकार ह्या श्लोकाचा आशय वेगळाच काढीत असतात तो असाः—भीष्मांना कौरव आणि पांडव हे दोन्ने सारखेच आहेत. तेव्हां भीष्मांच्या हुकमतींत वागणारें आमचें सैन्य पांडवसैन्याला जिंकीलसें दिसत नाहीं व भीम हा पांडवांचाच पक्षपाती असल्यामुळें त्याच्या ताब्यांतील पांडवसेना आमच्या सेनेचा सहज पराभव करील. भीष्मांबद्दल दुर्योधनाचे मनांत असें पाप येण्याचें कारण भीष्मांच्या बोलण्यावरून दुर्योधनाचा जिवलग मित्र कर्ण रण सोडून गेला हें असेलसें दिसतें ) ॥ १० ॥

( पांडवांचें सैन्य अवलोकन केल्याबरोबर दुर्योधन गर्भगळित झाला व आपलें भय दूर होण्याच्याच उद्देशानें तो द्रोणाचार्यांकडे गेला. परंतु, द्रोणाचार्यांना अंतस्थ उद्देश न भासवितां गौरव करण्याकरितां आपण आल्याचें खोटेंच भासविण्याचा जेव्हां त्यानें प्रयत्न केला तेव्हां ' हा अद्यापिही माझ्याशीं कपट करीत आहे ' असें समजून द्रोणाचार्य असंतुष्ट झाले व त्यांनीं दुर्योधनाचा नुसत्या शब्दानें देखील आदर केला नाहीं. तेव्हां द्रोणाचार्य आपणांकडे मुळींच लक्ष्य देत नाहींत असें पक्कें समजून आल्यावर भीष्मांची स्तुति त्यांना ऐकूं जाईल अशा रीतीनें करण्याकरितां दुर्योधन द्रोणाचार्यांना ह्मणालाः—सेनापति जे भीष्म त्यांचें

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

---

रक्षण झालें असतां त्यांच्या कृपेनें सर्व सुरक्षित होईल. तस्मात् , युद्धाच्या आवेशामुळें इकडे तिकडे किंवा पुढेंमागें मुळींच पहात न बसणाऱ्या सेनापति ) भीष्मांचेंच रक्षण आपण सर्वही योद्ध्यांनीं आपआपली युद्धभूमि न सोडितां त्यांनीं नेमून दिलेलीं सर्व तोंडें रोंखून करावें ११.

( ही प्रशंसा ऐकिल्यावर ' आपली स्तुति करो अथवा निंदा करो ह्याच्या करितां आपला देह संग्रामामध्यें पडणार हें ठरलेलेंच आहे; तेव्हां आतां द्रोणाचार्यांप्रमाणें ह्याचा अनादर करून आपण ह्याचें मन तरी उगीच कां दुखवावें असा विचार करून ) त्या दुर्योधनाच्या अंतःकरणांत उल्लास उत्पन्न करण्याकरितां सर्व कुरुवंशजांमध्यें वृद्ध आणि ( दुर्योधनादिकांचे ) पितामह असे जे महाप्रतापी भीष्म त्यांनीं सिंहाप्रमाणें मोठी गर्जना करून शंख फुंकला १२.

( दुर्योधनाच्या अंतःकरणांत उल्लास उत्पन्न करण्याकरितां भीष्मांची प्रवृत्ति कां झाली ही शंका येऊं नये ह्मणून ह्या श्लोकांत पितामह असें भीष्मांना ह्मटलें आहे आणि ते दुर्योधनाचे पितामह असल्यामुळें द्रोणाचार्यांप्रमाणें त्याची उपेक्षा न करितां त्याचें भय दूर करण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली हें त्या पितामहशब्दानें सुचविलें आहे. द्रोणाचार्य व दुर्योधन ह्यांचा अभिप्राय जाणण्याचें सामर्थ्य भीष्मांना होतें आणि त्यांनीं त्यांचा अभिप्राय जाणूनच सिंहनादपूर्वक शंख फुंकला हें धृतराष्ट्राला सुचविण्याकरितां संजयानें भीष्मांना कुरुवृद्ध [ ह्मणजे सर्व कुरुवंशजांमध्यें वयानें, तपानें व ज्ञानानें वृद्ध ] असें विशेषण दिलें आहे. कारण, भीष्म सर्वप्रकारें वृद्ध असल्यामुळें त्यांना दुर्योधनाचा व द्रोणाचार्यांचा अभिप्राय समजणें मुळींच कठीण नव्हतें. ऐकिल्याबरोबर प्रतिपक्ष्यांकडील योद्ध्यांना भयच उत्पन्न व्हावें अशासारखा भयंकर सिंहनाद पराक्रमी भीष्मांनीं

ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोभवत् ॥ १३ ॥
ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥
काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥

---

केला हें दर्शविण्यास प्रतापवान् हें विशेषण त्यांना दिलें आहे ) ॥ १२ ॥

( सेनापति भीष्मांनीं शंख फुंकण्यास आरंभ केल्या ) नंतर ( कौरव सैन्यामध्यें ) शंख, नौबद, डंके, मृदंग व गोमुख हीं वाद्यें एकदम वाजूं लागलीं व तो शब्द फारच मोठा झाला ( तथापि पांडवांची मुळींच धांदल उडाली नाहीं ) १३.

( असो—ह्याप्रमाणें दुर्योधनाकडे वाद्यें वाजूं लागल्या ) नंतर श्वेतवर्ण अश्वांनीं युक्त अशा अजिंक्य रथांत बललेल्या कृष्णार्जुनांनीं आपआपले दिव्य शंख वाजविले १४. पैकीं हृषीकेशानें पांचजन्य व धनंजयानें देवदत्तनामक शंख वाजविला आणि तसाच भयंकर कृत्यें करणाऱ्या वृकोदरानें पौंड्रनामक प्रचंड शंख वाजविला १५ व त्याचप्रमाणें कुंती-पुत्र युधिष्ठिर राजानें अनंतविजय, नकुल व सहदेव ह्यांनीं अनुक्रमें सुघोष आणि मणिपुष्पक हे १६,—व महाधनुर्धारी काशिराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अजिंक्य सात्यकि १७, द्रुपद, द्रौपदीपुत्र आणि महा-

पराक्रमी सुभद्रापुत्र अभिमन्यु ह्या सर्वांनीं—आप आपले शंख, हे पृथ्वी-पते धृतराष्ट्रा, वेगवेगळे वाजविले १८.

( भीमसेनप्रभृति सर्व योद्धे रथांतच बसले असतांना कृष्णार्जुन रथांत बसले होते असें विशेषतः सांगण्याचें व " श्वेतैर्हयैर्युक्ते " आणि " महति " हीं दोन विशेषणें रथाला देण्याचें कारण—अग्नीनें दिलेल्या अजिंक्य रथामध्यें बसलेल्या कृष्णार्जुनांचा पराजय करणें सर्वथा अशक्य आहे असें धृतराष्ट्राला सुचविणें—हें होय. पांडवांकडील सैन्यामध्यें स्वतःच्या नांवांनीं प्रख्यात असलेले शंख पुष्कळ असून तुमच्या सैन्यांत एक देखील शंख प्रसिद्ध नाहीं. तेव्हां पांडवांचेंच वर्चस्व होणार असें धृतराष्ट्राला सुचविण्याकरितां संजयानें पांचजन्य, देवदत्त इत्यादि नामांचा निर्देश केला आहे. हृषीक ह्मणजे इंद्रिय व ईश ह्मणजे अधि-पति; तेव्हां हृषीकेश ह्मणजे इंद्रियाधिपति = सर्वांतर्यामी असा अर्थ होतो. सर्वांतर्यामी परमेश्वर पांडवांना सहाय आहे हें सुचविण्याकरितां हृषीकेश ह्या नांवानें श्रीकृष्णाचा उल्लेख केला आहे. कुंतीपुत्र पांडवांचा उल्लेख अर्जुन, भीम व धर्म ह्या प्रसिद्ध नांवांनीं न करितां धनंजय, वृकोदर व युधिष्ठिर ह्या नांवांनीं करण्यांतही संजयाचा कांहीं उद्देश आहे. दिग्विजयसमयीं सर्व राजांचा पराजय करून ज्यानें धन जमविलें तो सर्वस्वीं अजिंक्यच आहे हें सुचविण्याकरितां धनंजय ह्या नांवानें अर्जुनाचा उल्लेख केला आहे. वृकनामक अग्नि उदरांत असल्यामुळें पुष्कळ अन्न पचवून भीमसेन अतिबलिष्ठ झाला आहे हें सुचविण्याकरितां वृकोदर ह्या नांवानें त्याचा उल्लेख केला असून हिडिंबवधासारखीं भयंकर कृत्यें करणाऱ्यांशीं तुझ्या पुत्रांची गांठ पडली आहे हें सुचवि-ण्याकरितां भीमकर्मा हें विशेषण घातलेलें आहे. मोठ्या तपश्चर्येनें यमधर्माला प्रसन्न करून कुंतीनें पुत्र प्राप्त करून घेतला आहे हें सुचवि-ण्याकरितां कुंतीपुत्र हें धर्माला विशेषण दिलें आहे. दिग्विजय करून राजसूय याग केल्यामुळें राजा ही पदवी धर्मालाच योग्य आहे तेव्हां

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥
अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पाण्डवः ॥ २० ॥
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।
सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥

---

शेवटींही राज्य त्यालाच मिळणार असें सुचविण्याकरितां राजा असें धर्माला ह्मटलें आहे आणि युद्धामध्यें जयाचा वाटेकरी असल्यामुळें हाच स्थिर होणारा असून तुझे पुत्र स्थिर राहणार नाहींत हें युधिष्ठिर ह्या शब्दानें धर्माचा उल्लेख करून धृतराष्ट्राला संजयानें सुचविलें. अरे आहेस कोठें, पारिजातहरण, बाणासुरांशीं युद्ध इत्यादि मोठमोठ्या संग्रामांतही पराजय न पावलेला सात्यकि सुद्धां तिकडेच आहे हें सुचविण्याकरितां पृथ्वीपते हें संबोधन धृतराष्ट्राला उद्देशून घातलें असून अपराजित = हें विशेषण सात्यकीला दिलें आहे ) १४।१५।१६।१७।१८॥

( कौरवांच्या सैन्यामध्यें शंखादि वाद्यांचा ध्वनि अति प्रचंड झाला असतांही पांडवांकडे मुळींच गडबड झाली नाहीं. परंतु, पांडवांच्या सैन्यामध्यें झालेल्या ) त्या शंखनादाच्या योगानें तुज धृतराष्ट्राच्या पक्षाचे ( भीष्मद्रोणप्रभृति जे ) योद्धे त्यांना ( ही ) हृदय विदीर्ण होण्यासारखी व्यथा झाली. कारण, तो नाद फारच तीक्ष्ण असून ( प्रतिध्वनीच्या योगानें ) आकाश व पृथ्वी ह्यांना नादित करीत होता १९. असो. ( शंखनाद श्रवण केल्याबरोबर घाबरून गेलेल्या वीरांनीं पळून जाणें योग्य असतांही तसें न करितां युद्धास तयार झालेल्या धृतराष्ट्रपक्षाकडील वीरांना वानरध्वज अर्जुनानें अवलोकन केलें व ( प्रतिपक्ष्याकडील ) शस्त्रसमुदाय सुटण्याच्या बेतांत आला असतांना त्या पांडुपुत्र अर्जुनानेंही धनुष्य उचलिलें २० आणि हे भूपते, त्या अर्जुनानें

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

---

त्यावेळीं हृषीकेशाशीं असें भाषण केलें कीं:—हे अच्युता, (प्रतिपक्षी ह्या नात्यानें ) युद्ध करण्याच्या इच्छेनें स्थित असलेल्या ह्या भीष्मद्रोणप्रभृति वीरांना अवलोकन करीपर्यंत दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं माझा रथ ( नेऊन ) उभा कर. कारण, बंधुबंधूंच्या ह्या युद्धव्यापारामध्यें मला कोणाशीं युद्ध करावयाचें व माझ्याशीं कोण युद्ध करणार? ( हें एकदां समजलें पाहिजे ) २१, २२. सारांश, अधर्मनिष्ठ जो धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन त्याचें प्रिय समरांगणामध्यें करण्याकरितां जे येथें आले आहेत त्या अत्यंत युद्धोत्सुक राजांना मी (एकदां) अवलोकन करितों २३.

( शस्त्रसंपाते ह्या समासांतील संपातशब्दाचा अर्थ समुदाय असा कांहीं टीकाकारांनीं केला असून कांहींनीं प्रयोग असा अर्थ केला आहे. ध्वजरूपत्वानें प्रत्यक्ष महावीर हनूमान अर्जुनाला साहाय्य करीत आहे तेव्हां त्याला युद्धामध्यें कसलेंही भय नाहीं हें धृतराष्ट्राला सुचाविण्याकारितां कपिध्वजः हें विशेषण अर्जुनाला दिलें आहे. इंद्रियप्रवर्तक असल्यामुळें अंतःकरणांतील सर्व वृत्ति जाणणारा भगवान् श्रीकृष्ण असा हृषीकेशशब्दाचा अर्थ टीकाकारांनीं केला आहे. दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं अर्जुनानें श्रीकृष्णाला रथ नेऊन उभा करण्यास सांगितला ही गोष्ट मोठीशीं महत्वाची नसतांना तिचाही उल्लेख संजयानें केला आहे त्यांतील उद्देश व महीपते हें संबोधन धृतराष्ट्राला उद्देशून घालण्याचा उद्देश असा आहे:—हे धृतराष्ट्रा, श्रीकृष्णाच्या विचारावांचून अर्जुन कांहीं एक करीत नाहीं. शत्रुसैन्यांतील वीर अवलोकन करणें ह्या यःकश्चित् गोष्टीलाही त्यानें श्रीकृष्णाचें अनुमोदन घेतलें. सारांश, प्रत्येक

संजय उवाच ॥

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

---

गोष्ट अर्जुनाची विचारपूर्वक होत असल्यामुळें नीति व धर्म हीं दोन्ही त्याचे ठिकाणीं संपूर्ण असल्याचें दिसत आहे आणि तूं तर अविचारानें पांडवांचें राज्य घेतलें असल्यामुळें तुझे ठिकाणीं नीति व धर्म ह्या उभयतांचाही पूर्ण अभाव असल्याचें व्यक्त होत आहे. तेव्हां कांहीं झालें तरी युद्धामध्यें तुला जय येणेंच नाहीं. ' अरे धृतराष्ट्रा, भगवद्भक्तांना कोणतीही गोष्ट अशक्य नाहीं. अखिलब्रह्मांडनायक जो परमात्मा त्यालाही ते आज्ञा करितात व तोही त्यांची आज्ञा निमूटपणें पाळितो. तेव्हां ह्या युद्धामध्यें भगवद्भक्त पांडवांचाच जय होणार हें निर्विवाद आहे ' असेंही एक तात्पर्य एकविसाव्या श्लोकाचें कांहीं टीकाकारांनीं काढिलें आहे. दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं रथ नेऊन मी उभा करूं लागलों असतां कदाचित् शत्रुपक्षाकडील वीर रथापासून तुला च्युत करतील ही शंकाही तुला नको आहे. कारण, देश, काल व वस्तु ह्यांचे ठिकाणीं तुला कधींही च्युति नाहीं. तेव्हां युद्धकाळीं समरांगणरूप प्रदेशामध्यें रथरूप वस्तुपासून तुला च्युत करण्यास कोण समर्थ होणार आहे ? " असा अर्जुनाचा आशय अच्युत हें संबोधन श्रीकृष्णाला उद्देशून घालण्याचा दिसत आहे व सर्व प्रकारें अच्युत असल्यामुळें तूं शांतीपासूनही च्युत होणार नाहींस तेव्हां भक्तानें आज्ञा केल्यामुळें तुला कोपही येण्याचा संभव नाहीं " असें सर्वांतर्यामी भगवानालाही अर्जुनानें ह्या संबोधनानें सुचविलें आहे ) ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥

( ह्याप्रमाणें भगवानांना अर्जुनानें आपला रथ दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं उभा करण्याविषयीं प्रेरणा केल्यानंतर अहिंसारूप धर्माचा आश्रय करून भगवान् श्रीकृष्णांनीं प्रायशः त्या अर्जुनाला युद्धापासून परावृत्त

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

---

केला असेल असें कदाचित् धृतराष्ट्राला वाटेल तर तें न वाटावें ह्मणून धृतराष्ट्राला ) संजय ह्मणतोः—हे भारता, निद्राधिपति ( असल्यामुळें सर्वस्वीं सावध असलेल्या ) अर्जुनानें ह्याप्रमाणें हृषीकेशाला सांगितलें असतां दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं भीष्मद्रोणप्रभृति वीरांच्या व इतरही शत्रुपक्षाकडील सर्व राजांच्या संमुख तो सर्वोत्कृष्ट रथ नेऊन उभा केल्यावर तो सर्वांतर्यामी ईश्वर ) त्याला ह्मणाला " हे पार्था, ह्या एकत्र जुळलेल्या कौरवपक्षीय वीरांना तूं अवलोकन कर " २४, २५.

( गुडाका=निद्रा; ईश=अधिपति; गुडाकेश=निद्राधिपति=निद्राजिंकलेला=सावध. " अरे, भरतवंशाची मर्यादा लक्ष्यांत आणून तरी तूं अजून आपल्या बांधवांचा द्रोह करण्याचें सोडून दे " असें सुचविण्याच्या उद्देशानें धृतराष्ट्राला उद्देशून संजयानें भारत हें संबोधन योजिलें आहे. अग्नीनें दिलेला विजयी दिव्य रथ अर्जुनाचा असून त्यावर सारथी ह्या नात्यानें प्रत्यक्ष ईश्वर आरुढ झालेला आहे हें धृतराष्ट्राला रथोत्तमं ह्या शब्दानें संजयानें सुचविलें. अर्जुनानें श्रीकृष्णांस विवाक्षित स्थलीं रथ नेण्याविषयीं सांगितल्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं तो रथ नेऊन उभा केला इतकेंच धृतराष्ट्राला संजयानें सांगितलें असतें तर पुरें झालें असतें. कारण, प्रतिपक्ष्याकडील योद्ध्यांना अवलोकन करण्याचें जर अर्जुनानें ठरविलेंच होतें तर सैन्यांच्या मध्यभागीं रथ जाण्याबरोबर त्यानें त्या योद्ध्यांना श्रीकृष्णांनीं न सांगताच अवलोकन केलें असतें. " हेपार्था, तूं ह्यांना अवलोकन कर " असें अर्जुनाला श्रीकृष्णांनीं सांगण्याचें प्रयोजन नव्हतें. सारांश, " उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति " ह्या श्लोकार्धाची अपेक्षा नाहीं—अशी शंका ह्या ठिकाणीं येतें. परंतु, टीकाग्रंथांतून ह्या शंकेचें निरसन

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा॥२६॥**

केलेलें आहे. " सैन्यांच्या मध्यभागीं रथ नेला असतां प्रतिपक्षाकडील योद्धे मला रथापासून च्युत करतील अशी स्वतः मला शंका येईल ह्मणून जें तूं दर्शविलेस तें अगदीं योग्य नाहीं. सारथ्यकर्मा-विषयीं मी अतिशय सावध आहें. तूं मात्र आतां मोहानें रथी-पणाचा त्याग करशील. तेव्हां तुला शत्रुसेना अवलोकन करून कर्तव्य काय आहे ?" असें सारथ्याविषयीं शंका आलेल्या अर्जुनाला सुचवून त्याचे ठिकाणीं धैर्य उत्पन्न करण्याच्या उद्देशानें " ह्या एकत्र जुळलेल्या कौरवपक्षीय योद्ध्यांना तूं निःशंकपणें अवलोकन कर " ह्मणून श्रीकृष्णांनीं त्याला सांगितलें. सर्वांचा अतःस्थ अभिप्राय जाणणाऱ्या सर्वांतर्यामी परमेश्वरानें अर्जुनाचे ठिकाणीं शोक व मोह उपस्थित झाल्याचें जाणून उपहासपूर्वक त्याच्याशीं संभाषण केलें हें सुचविण्याकरितां हृषीकेश ह्या शब्दानें श्रीकृष्णांचा निर्देश करून पार्थ ह्या शब्दानें अर्जुनाचा निर्देश केलेला आहे. पृथा हें कुंतीचें नांव होतें. तेव्हां पार्थ ह्मणजे कुंतीपुत्र असा अर्थ होतो. पृथा ही जात्या स्त्री असल्यामुळें ज्याप्रमाणें शोक व मोह ह्यांनीं ग्रस्त आहे त्याचप्रमाणें तूंही तिचा पुत्र असल्यामुळें शोकमोहांनीं ग्रस्त आहेस हें अर्जुनाला सुचविण्याकरितां त्याला उद्देशून पार्थ असें संबोधन श्रीकृष्णांनीं योजिलें आहे. पांडव हें संबोधन योजिलें नाहीं. शिवाय पृथा ही माझी आत असून तूं तिचा पुत्र आहेस. तेव्हां तुझा व माझा नात्याचा संबंध असल्यामुळें तुझें रक्षण मला कर्तव्यच आहे असेंही अर्जुनाला सुचवून त्याला धीर देण्याकरितां पार्थ ह्या संबोधनानें श्रीकृष्णांनीं नात्याचा उल्लेख अप्रत्यक्षपणें केला आहे ) ॥ २४ ॥ २५ ॥

संग्रामाला आरंभ करण्याकरितां सैन्य पाहण्याची अनुज्ञा भगवानांनीं

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बन्धूनवस्थितान् ॥२७॥
कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

---

दिल्यानंतर दोन्ही सैन्यामध्यें–( भूरिश्रव्यादि ) चुलते, ( भीष्म, सोमदत्त वगैरे ) अजे, ( द्रोण, कृप वगैरे) आचार्य, (शल्य, शकुनि वगैरे ) मातुल, ( दुर्योधनदुःशासनप्रभृति )भ्राते, ( लक्ष्मणप्रभृति ) पुत्र, पौत्र (–ह्मणजे लक्ष्मणप्रभृतींचे पुत्र–, अश्वत्थामा, जयद्रथ वगैरे ) समवयस्क, ( कृतवर्मा, भगदत्त वगैरे ) मित्र आणि ( पांड्यप्रभृति ) श्वशुर असे सर्व –स्वकीय जनच असल्याचें अर्जुनानें अवलोकन केलें आणि त्या दोन्ही सैन्यांत युद्धाच्या तयारीनें असलेल्या त्या बंधुजनांना अवलोकन करून त्या कुंतीपुत्र अर्जुनाला पराकाष्ठेची दया आली व दुःख करीत करीत तो ( भगवानांना ) ह्मणाला २६, २७.

( शंखादि वाद्यांची गर्जना होऊन युद्धरूप धर्मकृत्याला पूर्वीं आरंभ झाला असतांही युद्धामध्यें हिंसा करणें ह्मणजे मोठा अधर्म आहे ह्या विपरीत बुद्धीनें आणि शोकमोहरूप अशा ज्ञानप्रतिबंधक चित्तव्यथेनें अर्जुन अगदीं ग्रस्त झाला व मोठ्या अनर्थाला कारणीभूत होणारी अशी युद्धरूप स्वधर्मापासून निवृत्त होण्याची इच्छा त्याला झाली हें कौंतेयः ह्या शब्दानें सुचविलें आहे. अर्जुनः कृपां आविष्टः असें न ह्मणतां कृपया परयाविष्टः असें अर्जुनाला विशेषण देऊन प्रवेशक्रियेचें कर्तृत्व कृपेकडे दिलें आहे; त्यावरून अर्जुन हा स्वतःसिद्ध दयाळु होता असें सुचविलें आहे व हेंच विशेषरीतीनें व्यक्त करण्याकरितां परया हें विशेषण योजिलें आहे. कृपयापरया ह्या ठिकाणीं कृपया अपरया अशीं पदें पाडिलीं तर ‘ स्वसैन्याविषयीं अर्जुनाचें अंतःकरणांत पूर्वीच कृपा होती; परंतु, त्यावेळीं तर कौरवसैन्याविषयींही त्याच्या अंतःकरणांत आणखी कृपा उद्भवली ’ असें त्या पदांचें तात्पर्य निघतें. “ विषीदन्निदमब्र-

अर्जुन उवाच ॥

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥
निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

---

वीत्" ह्या चरणामध्यें भाषण आणि दुःख ह्या दोहोंची अर्जुनाचे ठिकाणीं समकालता दर्शवून बोलतांना अश्रूंनीं कंठ दाटून येणें वगैरे दुःखामुळें होणारी स्थिति अर्जुनाची झाली होती असें सुचविलें आहे ॥२६ ॥२७॥

अर्जुन ह्मणतोः– हे कृष्णा, युद्ध करण्याच्या इच्छेनें समरांगणामध्यें प्राप्त झालेल्या ह्या स्वकीय बंधुवर्गाला अवलोकन करून माझे हातपाय मोडत आहेत, तोंड कोरडें पडत आहे, कांपरें भरून अंगावर तर अगदीं कांटा येत आहे २८,२९, गांडीव धनुष्य हातांतून गळत आहे, दाह तर अगदीं सर्वांगाचाच होत आहे आणि वेरी आल्यासारखें होत असल्यामुळें मला उभें राहण्याचें अगर बसण्याचेंही आतां सामर्थ्य राहिलें नाही ३०. हे केशवा, मला तर युद्धापासून परिणाम विपरीत दिसत आहेत. युद्धामध्यें स्वकीय बंधुवर्गाला मारून ( दृष्ट अथवा अदृष्ट असा कोणताच ) पुरुषार्थ ( प्राप्तहोईलसें ) मला विचाराअंतीं देखील दिसत नाहीं ३०.

( योगनिष्ठ संन्यासी आणि रणामध्यें संमुख वध पावलेला वीर हे जगतांत दोन पुरुष सूर्यमंडलाचा भेद करून जाणारे आहेत अशा अर्थाच्या " द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डलभेदिनौ । परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः॥ " ह्या स्मृतिवचनावरून रणामध्यें संमुख वध पावले-

न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२॥
येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च॥ ३३ ॥

---

ल्यालाच पुरुषार्थप्राप्ति होत असल्याचें सिद्ध होतें; वध करणाऱ्याला कांहींच लाभ होत नाहीं. सारांश, परकीय जनांचा वध केल्यानेंही पुरुषार्थप्राप्ति होत नाहीं; तेव्हां स्वजनांचा वध करून तर ती होण्याचा मुळींच संभव नाहीं असें सुचविण्याकरितां " न च श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे " ह्मणजे स्वकीय बंधुजनांचा युद्धामध्यें वध करून विचारा-अंतींही पुरुषार्थप्राप्ति होईलसें दिसत नाहीं असें ह्मटलें आहे ॥ ३१ ॥

( आतां स्वकीय बंधुजनांचा वध केल्यानें विजय, राज्य व विषय-सुख हीं प्राप्त होणार आहेत असें ह्मणशील तर ) हे कृष्णा, मला जयाची इच्छा नाहीं; राज्याची गरज नाहीं आणि विषयसुखांचीही मी परवा बाळगीत नाहीं. कारण, हे गोविंदा, राज्य, विषयसुख आणि जीवितसाधन विजय ह्यांची आह्मांला काय बरें गरज आहे ? ३२. ( राज्य, विषयसुख, आणि कौरवविजय ह्यांवांचून अरण्यांत राहणाऱ्या आह्मा पांडवाचें जीवित वनवासामुळेंच विशेष स्तुत्य आहे. तेव्हां ह्या राज्यादिकांची इच्छा करून आह्मांला वास्तविक फायदा तो काय हें दुसऱ्या श्लोकार्धाचें तात्पर्य होय. गोविंद ह्या संबोधनानें " इंद्रियाधिपति असल्यामुळें ऐहिक फलाविषयीं माझी ही विरक्ति झाली असल्याचें तुला समजतच आहे " हें अर्जुनानें सुचविलें. ) ॥ ३२ ॥

( वृद्ध मातापितर, सुशील भार्या आणि बालक पुत्र ह्यांचें पोषण शेंकडो निंद्य कृत्यें करूनही करावें अशा अर्थाचें " वृद्धौ च माता-पितरौ साध्वी भार्या शिशुः सुतः । अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् " हें स्मृतिवचन असल्यामुळें शेंकडों निंद्य कृत्यें करूनही

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबन्धिनस्तथा॥३४॥
एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते॥ ३५॥
निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

---

पोषणीय असलेल्या ) ज्या स्वकीय जनांकरितां राज्य, भोग आणि सुखें हीं आह्मांला ईप्सित आहेत तेच हे पितर, आचार्य, पुत्र, पितामह, मातुल, श्वशुर, पौत्र, श्याल ( ह्मणजे मेहुणे ) आणि संबंधी प्राणांची व धनाची आशा सोडून ( केवळ मरण्याकरितां ) युद्धभूमीमध्यें प्राप्त झाले आहेत ३३, ३४. तस्मात्, ह्यांच्या वधानें त्रैलोक्याचें राज्य जरी मिळणार असलें आणि त्यांतूनही हे होऊन जरी आमचा वध करण्यास उद्युक्त झाले असले तरी सुद्धां मी ह्यांचा वध करण्याचें मनांतही आणणार नाहीं. मग, हे मधुसूदना, केवळ पृथ्वीच्याच प्राप्ती-करितां मी ह्यांचा वध करीन ही गोष्ट तरी कशाला पाहिजे? ३५.

(आतां अत्यंत क्रूरपणाचें कृत्य करून नानाप्रकारांनीं दुःख देणाऱ्या कौरवांचा वध केला असतां स्वतःला कांहीं सुख होईल असें ह्मणशील तर ) हे जनार्दना, धृतराष्ट्रपुत्रांचा वध करून आह्मांला काय बरें सुख होणार आहे ? ( खरोखर मूढ जनांनाच मोह पाडण्यास उचित असा जो क्षणमात्र टिकणारा बंधुवधजन्य सुखाभास त्याचा लोभ धरून चिर-काल नरकयातनांना कारणीभूत होणारा बंधुजनांचा वध करणें आह्मांला योग्य नाहीं. ह्यांचा वध करणें जर अवश्यच असेल तर तूंच ह्यांना मार. कारण, प्रलयकालीं सर्व लोकांची तूं हिंसा करीत असतांनाही पापानें लिप्त होत नाहींस असें जनार्दन ह्या संबोधनानें श्रीकृष्णांनां अर्जुनानें सुचविलें. आतां—जाळणारा, विषघालणारा, शस्त्र उपसून आपल्या जिवावर

उठणारा, धनापहार करणारा, शेत बळकावणारा व स्त्री हरणकरणारा हे सहा आततायी आहेत व आपला वध करण्यास उद्युक्त होऊन येत असलेल्या आततायी पुरुषाचा कांहीं एक विचार न करितां वध करावाच; आततायी पुरुषाच्या वधाला यत्किंचितही दोष नाहीं—अशा अर्थाचीं “ अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारापहर्ता च षडेते ह्याततायिनः ॥ आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् । नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन ” हीं स्मृतिवचनें आहेत व ह्या धृतराष्ट्रपुत्रांनींही तुह्मांला जाळून व विष घालून मारण्याचा प्रयत्न केलेला आहे आणि त्याचप्रमाणें कपटद्यूतानें तुमचें सर्व द्रव्य व राज्य ह्यांचा अपहार करून तुमच्या स्त्रीलाही हरण करण्यास ह्यांनीं मागें पुढें पाहिलेलें नाहीं. तेव्हां ह्यांचा वध केल्यानें कसलाही दोष तुह्मांला लागण्याचा संभव नाहीं—असें ह्मणशील तर हे श्रीकृष्णा,) ह्या आततायी धृतराष्ट्रपुत्रांचा वध करून आह्मांला पाप मात्र लागेल ३६ ( दुसरा कसलाही लाभ होण्याचा संभव नाहीं ). कारण, आततायी पुरुषाचा वध दोषावह नाहीं अशा अर्थाचें वरील वचन अर्थशास्त्रविषयक असून यज्ञयागांवांचून कोणत्याही प्राण्याची हिंसा करूं नये अशा अर्थाचें “ न हिंस्यात्सर्वा भूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः॥”हें छांदोग्यश्रुत्यंतर्गत वचन धर्मशास्त्रविषयक आहे. शिवाय, कुलाचा नाश करणारा पुरुष सर्वांत महापातकी अशा अर्थाचें “ स एव पापिष्ठतमो यः कुर्यात्कुलनाशनम् ” हें स्मृतिवचनही धर्मशास्त्रविषयक असून अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्राचें प्राबल्य अधिक हें निर्विवाद आहे. कारण—दोन स्मृतींमध्यें विरोध आला असतां व्यवहारदृष्ट्या ठरणारा न्याय प्रबल मानावा; परंतु, अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र अधिक प्रबल हें ठरलेलें आहे--अशा अर्थाचें “ स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः । अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ” हें याज्ञवल्क्यमुनींचें वचन आहे. तस्मात्, आततायित्वदोषापेक्षां दुर्योधनादिकांच्या वधानें येणारा कुलनाशकत्वदोष अधिक असल्यामुळें तो आह्मांला

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबान्धवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**
**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥**

---

अवश्य टाळला पाहिजे. "अस्मान्" हें हननक्रियेचें कर्म मानून "एतान् आततायिनः" हीं पदें आश्रयणक्रियेचीं कर्मभूत मानिलीं ह्मणजे ह्या श्लोकांतील उत्तरार्धाचा दुसरा एक अर्थ होतो तो असाः—आह्मी अपराधी नसतांनाच जर हे दुर्योधनप्रभृति कौरव युद्धभूमीमध्यें आमचा वध करतील तर पूर्वींच पातकी असलेल्या ह्या आततायी पुरुषांना निरपराधी स्वकीय बंधुजन मारल्याचें आणखी मात्र जास्त पातक लागेल. दुसरें कोणतेंही सुख ह्यांना होणार नाहीं. सारांश, आह्मी युद्ध करीत नसतांना जर ह्यांनीं आमचा वध केला तर हेच पातकी होतील; पापाचा संबंध आह्मांला नसल्यामुळें आमची कांहींच हानि होणार नाहीं. "आततायिनः" ह्या पदाचा अन्वय "अस्मान्" ह्या पदाशीं करून हीं दोन्हीं पदें आश्रयणक्रियेचीं कर्मभूत मानिलीं तर आणखी एक अर्थ सदर्हू श्लोकांतील उत्तरार्धाचा होत असतो तो असाः—ह्या भ्रात्यांचा वगैरे वध केला असतां आह्मी आततायी होऊं आणि असें झालें ह्मणजे त्यांनीं केलेलें पातक आह्मा आततायींनाच लागेल. तस्मात्, युद्धापासून निवृत्त होणें हेंच आह्मांला श्रेयस्कर आहे ) ॥ ३६ ॥

( ह्याकरितां, स्वकीय बांधव जे धृतराष्ट्रपुत्र त्यांचा वध करणें आह्मांला योग्य नाहीं. शिवाय, स्वजनाच्या सुखाकरितां प्रत्येकजण झटत असतो. तेव्हां ) हे माधवा, स्वजनांचा वध करून आह्मी सुखी कसे होऊं? ३७.

( संपत्तीचा अधिपति तूं असतांना विपत्तिकारक कृत्य करविण्याविषयीं तूं प्रवृत्त होणारच नाहींस हें श्रीकृष्णांना सुचविण्याकरितां अर्जुनानें "माधव" असें संबोधन त्यांना उद्देशून घातलेलें आहे ) ॥ ३७ ॥

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥
कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोभिभवत्युत ॥ ४० ॥
अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥
संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥ ४२ ॥

---

( आतां—हा विचार उभयतांनाही साधारण आहे. तेव्हां दुर्योधनादिक जर हें कांहींच मनांत आणीत नाहींत तर तूंच ह्याचा विचार कां करावास ?—ह्मणून विचारशील तर ) हे जनार्दना, कुलक्षय केल्यानें प्राप्त होणारा अनर्थ आणि मित्रद्रोह झाल्यानें लागणारें पातक जरी चित्त लोभग्रस्त झाल्यामुळें हे ( दुर्योधनादिक ) पहात नाहींत तरी कुलक्षय केल्यापासून होणारा अनर्थ आह्मांला समजत असतांनाही आह्मी ह्या पापापासून निवृत्त होण्याचा विचार कसा करूं नये ! ३८,३९.(आतां—ज्या अनर्थाच्या विचारामुळें युद्धापासून परावृत्त होणेंच तुला उचित दिसतें असा कोणता अनर्थ कुलक्षय झाल्यानें होणार ? असें विचारशील तर हे श्रीकृष्णा,) कुलक्षय झाला असतां ( ह्मणजे कुलांतील जे धर्मप्रवर्तक पुरुष त्यांचा क्षय झाला असतां अग्निहोत्रादिकर्मानुष्ठान करणाऱ्यांचा अभाव झाल्यामुळें ) वंशपरंपरेनें चालत आलेले कुलधर्म नाहींसे होतात; धर्मनाश झाला असतां सर्वही कुलामध्यें जिकडे तिकडे अनाचाराचें प्राबल्य होतें ४० आणि हे कृष्णा, अनाचार वाढला असतां ( आमच्या पतींनींच जर धर्माचें उल्लंघन करून कुलक्षय केला आहे तर आह्मांलाही व्यभिचार करण्यास काय प्रत्यवाय आहे ? अशा कुतर्कानें ग्रस्त झालेल्या) कुलस्त्रिया ( दुराचरणानें ) दूषित होतात व हे वृष्णिकुलोत्पन्न कृष्णा,

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥४३॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥
यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥
सञ्जय उवाच ॥

---

स्त्रिया दूषित झाल्या ह्मणजे वर्णसंकर होतो ४१. ( बरें, ही अनर्थपरंपरा येथेंच थांबते असेंही नाहीं; परंतु, ) कुलामध्यें झालेला संकर कुलघातकपुरुषांच्या ( ह्मणजे कुलधर्मव्यवस्थापक पुरुषांचा घात करणाऱ्यांच्या ) नरकाला कारणीभूत होतो. इतकेंच नव्हे; परंतु, ह्या कुलघातकी पुरुषांचे पितरही ( पुत्रादिकांचा अभाव झाल्यानें ) पितृप्रीत्यर्थ होणारीं—पिंडदान व तर्पण हीं—कर्में लुप्त झाल्यामुळें नरकांत पडतात ४२. वर्णसंकराला कारणीभूत होणारे जे हे कुलघातक पुरुषांचे दोष त्यांच्या योगानें श्रुतिमूलक असे जातिधर्म व कुलधर्म ( आणि आश्रमधर्म ) ह्यांचा उच्छेद होतो ४३ व हे जनार्दना, ज्यांचा कुलधर्म उच्छिन्न झाला त्या पुरुषांचें नरकामध्यें सतत वास्तव्य होतें असें आह्मीं ऐकिलें आहे ४४. अरेरे ! काय आश्चर्य हें ! राज्यसुखाला लंपट होऊन आह्मी स्वकीय बंधुजनांचा वध करण्यास उद्युक्त झालों ह्मणजे खरोखर महापातक करण्यालाच आह्मी सिद्ध झालों आहोंत ४५. ह्याकरितां, निःशस्त्र होऊन प्राणरक्षणार्थही हालचाल करीत नसतांना जर शस्त्रपाणि धृतराष्ट्रपुत्र माझा रणामध्यें वध करतील तर त्यांत माझें अत्यंत हित होणार आहे. ( कारण, बंधुजनांचा वध करण्यास तयार होणें ह्या महापातकाची

एवमुक्त्वार्जुनः सङ्ख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

शुद्धि मरणांत प्रायश्चित्तानेंच होणार आहे )४६. संजय सांगतोः—हे धृत-राष्ट्रा, संग्रामाला सुरवात व्हावयाची असतांना शोकामुळें ज्याच्या मनाला अत्यंत उद्वेग झाला आहे असा तो अर्जुन ह्याप्रमाणें श्रीकृष्णांना सांगितल्या-नंतर धनुष्यबाण टाकून देऊन रथावर बसला ४७. ह्याप्रमाणें महामुनि व्यास-प्रणीत लक्षग्रंथात्मक श्रीमहाभारतांतर्गत भीष्मपर्वांतील—ब्रह्मविद्या आणि योगशास्त्र एतद्विषयक व श्रीकृष्णार्जुनसंवादात्मक श्रीमद्भगवद्गीतासंज्ञक उपनिषदांपैकीं अर्जुनविषादयोगनामक पहिला अध्याय समाप्त झाला १.

(—पापभीरुता आणि वैराग्य प्राप्त झाल्याबरोबर पुरुष मोक्षाला अधिकारी होतो. तस्मात्, स्वकुलघातानें प्राप्त होणारें जें राज्यसुख त्यापासून अर्जुन पापभीरुपणानें निवृत्त झाल्यामुळें मोक्षाधिकारी झाला असें समजून श्रीकृष्णही क्षात्रधर्माला अनुरूप असा ब्रह्मज्ञानाचा उप-देश त्याला तत्काल करण्यास उद्युक्त झाले—असें पहिल्या अध्यायाचें तात्पर्य परमार्थप्रपानामकटीकाकारानें[१] "सद्यो मोक्षाधिकारी स भवति खलु यः पापभीरुर्वितृष्णस्तादृक्पार्थोस्ति तस्मान्निजकुलदननाद्राज्यभोगा-न्निवृत्तः ।मत्वैवं यादवेशोऽप्यनुपदमकरोद्ब्रह्मविद्योपदेशं भूभृद्धर्मानुरूपं तादि-दमभिहितं त्वादिमाध्यायकृत्यम्" असा श्लोक लिहून काढिलें आहे ॥१॥

( वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, भिक्षेवर उपजीविका कर-ण्याचा प्रसंग आला तरी चिंता नाहीं; परंतु, अहिंसा हाच श्रेष्ठ धर्म असें मनांत येऊन अर्जुन युद्धापासून परावृत्त झाल्याचें ऐकतांक्षणीं आपल्या

---

१ परमार्थप्रपा ह्मणजे मोक्षाची पाणपोई.

संजय उवाच ॥

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ॥

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

---

पुत्रांचें राज्य जाण्याची आतां भीति नाहीं असें समजून आनंदित झालेल्या धृतराष्ट्राचा संशय दूर करण्या करितां) संजय ह्मणतोः—तशा रीतीनें कृपाविष्ट झाल्यानें शोक करीत असल्यामुळें ज्याचे नेत्र अश्रूंनीं भरून येऊन पहाण्यास असमर्थ झाले आहेत अशा त्या अर्जुनाला मधुसूदन असें ह्मणाला १.

( " कृपयाविष्टम् " ह्या विशेषणामध्यें कृपेचें कर्तृत्व व अर्जुनाचें कर्मत्व दर्शवून अर्जुनाचे ठिकाणीं कृपा स्वतःसिद्ध असल्याचें संजयानें धृतराष्ट्राला सुचविलें आहे आणि " विषीदन्तम् " ह्या विशेषणामध्यें विषादाचें कर्मत्व व अर्जुनाचें कर्तृत्व दर्शवून अर्जुनाचे ठिकाणीं विषाद आगंतुक आला असल्याचें सुचविलें आहे.—कृपा व शोक ह्यांनीं उद्विग्न झालेल्या अर्जुनाची उपेक्षा न करितां भगवानांनीं त्याला उपदेश केला. कारण, भगवान् दुष्टांचा निग्रह करणारे असल्यामुळें अर्जुनाला ग्रस्त करून टाकणाऱ्या शोकमोहांचाही त्यांनीं उपदेशानें निग्रहच केला—हें सुचविण्यास "मधुसूदनः" ह्या शब्दानें त्यांचा उल्लेख केलेला आहे ) ॥१॥

श्रीभगवान् ह्मणतातः— हे अर्जुना, आर्यजन ज्याचा स्वीकार करीत नाहींत आणि स्वर्ग अथवा कीर्तिही ज्यापासून प्राप्त होण्याचा संभव नाहीं असा हा मोह तुला अशा अणीबाणीच्या प्रसंगीं कोठून प्राप्त झाला? २.

" ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना " ह्या स्मृतिवचनांत सांगितलेल्या सहा गुणांना

भग असें ह्मणतात व ते ज्याच्यापाशीं असतील त्याला भगवान् असें ह्मणतात. मदहू वचनांतील "समग्रस्य" ह्या षष्ठ्यंत विशेषणाचा अन्वय " ऐश्वर्यस्य, धर्मस्य, यशसः " इ० सहा विशेष्यांपैकीं प्रत्येकाशीं केला पाहिजे. वचनांतील मोक्षशब्दाचा अर्थ मोक्षसाधन=ज्ञान असा करावा. इंगना ह्या शब्दाचा अर्थ संज्ञा असा आहे. तेव्हां ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, वैराग्य आणि ज्ञान हीं सहा संपूर्णपणें अप्रतिहत अशीं ज्याचे ठिकाणीं नित्य असतात तो भगवान् असा एकंदरींत वरील वचनाचा अर्थ होतो. भगवान् कोणाला ह्मणावें अशाबद्दल दुसरेंही एक वचन आहे तें असें:—"उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ". ह्या वचनांतील प्रत्येक द्वितीयांत पदाचा अन्वय " भूतानां " ह्या षष्ठ्यंतपदाशीं करावा. आगति ह्मणजे भावी संपत्ति आणि गति ह्मणजे भावी आपत्ति. तेव्हां प्राण्यांचें जन्म, मरण, भावी संपत्ति व आपत्ति, ज्ञान आणि अज्ञान हीं जो जाणितो त्याला भगवान् असें ह्मणावें—हा एकंदरींत ह्या दुसऱ्या वचनाचा अर्थ होतो. युद्धापासून एकाएकीं परावृत्त होण्यास योग्य अशीं कारणें तीन संभवतातः—मोक्षाची इच्छा, स्वर्गाची इच्छा आणि कीर्तीची इच्छा. परंतु, हीं तिन्हीं कारणें तुझे ठिकाणीं संभवत नाहींत हें अर्जुनाला सुचविण्याकरितां " कश्मलं " ह्या विशेष्याला अनार्यजुष्टं, अस्वर्ग्यं व अकीर्तिकरं " हीं तीन विशेषणें अनुक्रमें भगवानांनीं दिलीं आहेत. आर्य ह्मणजे मुमुक्षु; मुमुक्षूंनीं जें न स्वीकारिलेलें तें अनार्यजुष्ट. स्वधर्माचरणानें अंतःकरणशुद्धिद्वारा मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे लोक स्वधर्मत्याग कोठून करणार ? हें " अनार्यजुष्टं " ह्या विशेषणानें सुचविलें.—स्वर्गप्राप्तीची ज्याला इच्छा आहे तोही अशा मोहांत पडणार नाहीं. कारण, स्वधर्मत्याग हा स्वर्गप्राप्तीला विरुद्ध आहे—असें " अस्वर्ग्यं " ह्या विशेषणानें दर्शविलें आणि संग्रामांत येऊन परावृत्त होणें हें अपकीर्तिकारक असल्यामुळें कीर्तीची इच्छा करणारा पुरुष असें कधींही करणार नाहीं हें

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

---

" अकीर्तिकरं " ह्या विशेषणानें सुचविलें. तात्पर्य—मुमुक्षु, स्वर्गेच्छु आणि कीर्तीच्छु ह्या सर्वांनाहीं जो स्वधर्मत्याग वर्ज आहे तो तूं स्वीकारीत आहेस. तेव्हां हें तुझें करणें खरोखर अनुचित आहे— असें अर्जुनाला श्रीकृष्णांनीं ह्या श्लोकानें दर्शविलें )॥ २ ॥

हे कुंतीपुत्रा, नामर्दपणाचा स्वीकार करूं नकोस. कारण, हें तुला योग्य नाहीं. ह्या करितां, हे शत्रुनाशका, कमीपणा आणणाऱ्या ( अथवा तेव्हांच नाहींसा होणाऱ्या ) नामर्दपणाचा त्याग करून तूं युद्धाला तयार हो ३.

( कुंतीला देवप्रसादानें जे पुत्र झाले ते अतिशय वीर्यवान् ह्मणून प्रसिद्धि आहे. तस्मात्, तुला हा भितरेपणा शोभत नाहीं हें सुचविण्याकारितां श्रीकृष्णांनीं " पार्थ " असें संबोधन योजिलें आहे. " क्लैब्यं मा स्म गमः " एवढ्यानें निर्वाह होत असतांना " नैतत्त्वय्युपपद्यते " हें आणखी पुनरपि कां सांगितलें अशी ह्या ठिकाणीं शंका येते; तिचें निरसन टीकाकारांनीं—साक्षात् महेश्वराबरोबरही युद्ध करून ज्याचा प्रभाव प्रख्यातीला आलेला आहे त्या तुला असला नामर्दपणा योग्य नाहीं हें अर्जुनाला सुचविण्या करितां " नैतत्त्वय्युपपद्यते " ह्मणून भगवानांनीं ह्मटलें—असें केलें आहे. तथापि " क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वा " असें सांगण्यांत पूर्वींचे सांगण्यापेक्षां मतलब जास्त दिसत नाहीं तेव्हां अर्थदृष्ट्या ही द्विरुक्ति कां केली अशीही एक शंका येथें संभवते. परंतु, असला नामर्दपणा तुला कमीपणा आणणारा आहे; ह्यास्तव, तूं तो सोडून दे असें सुचविण्याकारितां " क्षुद्रं० त्यक्त्वा " असें ह्मटलें. सबब, वास्तविक विचार केला असतां पुनरुक्तिदोष ह्या ठिकाणीं येत नाहीं. अशा तऱ्हेनें पुनरुक्तिदोषाचें निरसन कांहीं टीकाकारांनीं केलें आहे; परंतु, ह्या निरसनावरही—" मग नैतत्त्वय्युपपद्यते " आणि

अर्जुन उवाच ॥

कथं भीष्ममहं सङ्ख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

---

" क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वा " ह्यांत वेगवेगळें तें काय सुचविलें— अशी शंका येते. ह्मणून " क्षुद्र " ह्या शब्दाचा अर्थ कमीपणा आणणारें असा न करितां " निरसन होण्यास सुलभ=तेव्हांच नाहींसें होण्याला योग्य " असा कांहीं टीकाकारांनीं केला आहे ) ॥ ३ ॥

( भगवान् श्रीकृष्णांचा आशय न समजतां " मी शोकमोहादिकांच्या अधीन होऊन हा स्वधर्मत्याग करीत नाहीं. परंतु, हें युद्ध धर्मरूप नसून अधर्मस्वरूपच असल्यामुळें त्याचा त्याग मी करीत आहें " असें सुचविण्याच्या उद्देशानें श्रीकृष्णांना ) अर्जुन ह्मणतो:—हे शत्रुनाशका मधुसूदना, ( पुष्पादिकांनीं ) पूजन करण्यास योग्य असे जे द्रोणाचार्य व भीष्म ह्यांच्याशीं प्रतिपक्षी ह्या नात्यानें रणामध्यें मी बाणांनीं कसें बरें युद्ध करूं ? ४.

( मधुनामक दैत्य हा शत्रु असल्यामुळें त्याचा वध भगवानांनीं केला व तेव्हांपासून त्यांना मधुसूदन हें नांव प्राप्त झालें. ह्मणून वास्तविक पाहूं गेलें असतां " मधुसूदन " आणि " अरिसूदन " हे दोन्ही शब्द जवळजवळ समानार्थकच आहेत. तेव्हां, हीं दोन्हीं संबोधनें एकाच अर्थाचीं एकाच श्लोकांत भगवानांना उद्देशून घातलीं असल्यामुळें अर्थदृष्ट्या ह्या ठिकाणीं पुनरुक्तिदोष येतो अशी शंका येथें उद्भवते; परंतु, अर्जुन शोकमोहादिकांनीं अगदीं व्याप्त होऊन गर्भगळित झाला असल्यामुळें आपण पूर्वीं काय बोलून गेलों व आतां काय बोलत आहोंत ह्याचें अनुसंधान त्याला ठेवितां आलें नाहीं. ह्यास्तव, अशा प्रसंगीं अर्जुनाकडून पुनरुक्ति होणें हा दोष नसून उलट अलंकारच आहे असें समजावें. कोणी झाला तरी युद्ध प्रति-

पक्ष्याशींच करीत असतो व रणभूमि हेंच युद्धाचें स्थान ठरलेलें असून बाण वगैरे हींच साधनें ठरलेलीं असतात. तेव्हां 'रणामध्यें व बाणांनीं' असें ह्या श्लोकांत कां ह्मटलें? ह्मणून शंका येण्याचा संभव आहे. परंतु, —"पूज्य पुरुषांसहवर्तमान क्रीडास्थानामध्यें केवल वाणीच्या योगानें हर्षपर्यवसायी लीलायुद्ध करणें सुद्धां जर योग्य नाहीं तर युद्धभूमीमध्यें बाणांच्या योगानें मृत्युपर्यवसायी युद्ध करणें कसें योग्य होईल?" असें भगवानांना सुचविण्याच्या उद्देशानें अर्जुनानें 'संख्ये' व 'शरैः' हे शब्द घातले आहेत—अशा रीतीनें टीकाकारांनीं त्या शंकेचें निरसन केलेलें आहे. 'पूज्यांशीं कसल्याही प्रकारचें युद्ध करणें जर योग्य नव्हे तर त्यांचा वध करणें दूरापास्तच आहे' हें सुचविण्याकरितां 'योत्स्ये' अगर 'योत्स्यामि' असें न ह्मणतां 'प्रतियोत्स्यामि' असें ह्मटलें आहे. मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाचें तात्पर्य काढिलें आहे तें येणें प्रमाणें:— भीष्मद्रोणांना पुढें केल्यावांचून दुर्योधनादिक युद्धाला सज्ज होत नाहींत; परंतु, पूजनादि कर्मांप्रमाणें त्यांच्याशीं युद्धकर्म करणें विहित नसल्यामुळें तो धर्म नव्हें. बरें, निषेध नसल्यामुळें त्यांच्याशीं युद्ध करणें अधर्मही नव्हें असें ह्मणावें तर तें योग्य नाहीं. कारण, शब्दांनीं सुद्धां होणारा गुरुद्रोह जर निषिद्ध आहे तर पूज्य जे भीष्मद्रोण त्यांच्याशीं संग्राम करणें धर्मविरुद्ध व निषिद्ध आहे हें कशाला सांगितलें पाहिजे? ) ॥ ४ ॥

(— आतां 'ज्या कांहीं देवता आहेत त्या सर्व वेदवेत्त्या ब्राह्मणाचे ठिकाणीं वास्तव्य करून असतात. ह्याकरितां, वेदवेत्त्या ब्राह्मणांना प्रतिदिवशीं नमस्कार करावा; त्यांच्या संबंधानें अश्लील भाषण करूं नये' अशा अर्थाची 'यावतीर्वै देवतास्ताः सर्वा वेदविदि ब्राह्मणे वसन्ति तस्माद्ब्राह्मणेभ्यो वेदविद्भ्यो दिवेदिवे नमस्कुर्यान्नाश्लीलं कीर्तयेत' ही तैत्तिरीयश्रुति असल्यामुळें; 'राजसूय याग वगैरे केल्यानें क्षत्रिय जरी पराकाष्ठेच्या योग्यतेला चढत असतो तरी स्वधर्माचरणाच्या योगानें त्याला शेवटीं ब्राह्मणजन्मच प्राप्त होत असतो; तस्मात्, श्रेष्ठाची हिंसा

**गुरूनहत्वा हि महानुभावाञ्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥५॥**

---

करून ज्याप्रमाणें पुरुष पातकी होतो त्याचप्रमाणें शेवटीं आपल्याला प्राप्त होणारें जें ब्राह्मणरूप स्थान त्याचा घात करणारा क्षात्रिय पापी होतो ' अशा अर्थाची ' तस्माद्यद्यपि राजा परमतां गच्छति ब्रह्मैवान्तत उपनिश्रयति स्वां योनिं य उ एनꣳ हिनस्ति स्वाꣳ सयोनिमृच्छति स पापीयान्भवति यथा श्रेयाꣳ सꣳ हिꣳ सित्वा ' ही शतपथश्रुति असल्यामुळें आणि " सत्यरूप वेदानें जो दोन्ही कान मरून काढितो तोच पिता व माता होय. ह्यास्तव, त्याचा द्रोह कधींही करूं नये " अशा आशयाचें ' य आवृणोत्यवितथं ब्रह्मणा श्रवणावुभौ । स माता स पिता ज्ञेयस्तं न द्रुह्येत्कदाचन ' हें मनुवचन असल्यामुळें द्रोणाचार्यांशीं--आणि भीष्म सर्व कुलामध्यें वयानें व गुणांनीं वृद्ध असल्यामुळें त्यांच्याशीं--युद्ध करणें योग्य नव्हें. परंतु, " गर्वानें फुगून जाऊन कार्याकार्य न जाणितां मार्गाला सोडून वागूं लागलेल्या गुरूलाही शासन करणें न्याय्य आहे " अशा आशयाचें ' गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः । उत्पथप्रतिपन्नस्य न्याय्यं भवति शासनम् ' ॥ हें स्मृतिवचन आहे. तेव्हां युद्धगर्वानें चढून जाऊन ज्यांनीं उघड उघड तुह्मांशिष्यजनांशीं द्रोह केला व ज्यांनीं तुमचें राज्य अन्यायानें हरण करण्यास औदासीन्यामुळें दुर्योधनादिकांना मदत केली ते द्रोणाचार्यप्रभृति गुरुजन मार्गाला सोडून वागत असल्याचें स्पष्ट होत असल्यामुळें त्यांचा वध करणेंच तुह्मांला श्रेयस्कर आहे---असें कदाचित् श्रीकृष्ण आपणाला ह्मणतील ह्मणून अर्जुन पुनरपि त्यांना ह्मणतो ) महाप्रभावी गुरूंचा वध करण्यापेक्षां इहलोकीं भिक्षान्नावर उपजीविका करणेंही श्रेयस्कर आहे. कारण, गुरुजन जरी अर्थलुब्ध अस ( ल्यामुळें क्षम्य नस ) ले तरी त्यांचा वध केल्यानें काय ते रक्तपातामुळेंच ह्मम्य होणारे

विषयोपभोग व तेही फक्त इहलोकींच मला प्राप्त होणार आहेत ६.

(---युद्ध हें धर्मविरुद्ध नाहीं असें जरी ह्मटलें तरी देखील त्यांत जय आल्यानें आपला चारितार्थ उत्तमप्रकारें चालण्यापेक्षां दुसरा कांहीं एक फायदा नाहीं हें मनांत आणून अर्जुनानें, गुरुवध न करितां भिक्षेवरही उपजीविका करणें श्रेयस्कर, असें ह्मटलें आहे. वेद व शास्त्र ह्यांचें अध्ययन, तपश्चर्या, आचार इत्यादिकांमुळें ज्यांनीं काल, काम इत्यादिकांनाही जिंकून टाकिले आहेत त्या अत्यंत पुण्यवान् भीष्मादिकांचे ठिकाणीं प्रसंगविशेषीं गर्वामुळें उन्मार्गाला प्रवृत्त झाल्याचा क्षुद्र दोष कायम राहणार नाहीं व ह्मणूनच त्यांचें गुरुत्वही नाहींसें होण्याचा संभव नाहीं---हें दर्शविण्या करितां " महानुभावान् " हें विशेषण ह्याठिकाणीं योजिलें आहे. ' हि ' हें पद वेगळें न मानितां ' हिमहानुभावान् ' असें एकच पद मानिलें तर त्याचा अर्थ--सूर्याप्रमाणें अथवा अग्नीप्रमाणें सामर्थ्यवान् ह्मणजे अत्यंत तेजस्वी--असा होतो. कारण, हिमह=शैत्यनाशक=अग्नि, सूर्य.---' धर्माचें उल्लंघन व साहस हीं समर्थांचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतात; परंतु, ते अत्यंत तेजस्वी असल्यामुळें सर्वभक्षक अग्नीप्रमाणें त्यांचें तें करणें दोषावह होत नाहीं ' अशा आशयाचें ' धर्मव्यतिक्रमो दृष्ट ईश्वराणां च साहसम् । तेजीयसां न दोषाय वन्हेः सर्वभुजो यथा ' हें स्मृतिवचन असल्यामुळें अत्यंत तेजस्वी जे भीष्मादिक त्यांचे ठिकाणीं अवलिप्तत्वादि दोष नाहींत---हें सुचविण्या करितां ' हिमहानुभावान् ' हें विशेषण घातलें आहे असें समजावें. '---अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित् । इति सत्यं महाराज बद्धोस्म्यर्थेन कौरवैः ॥ [ ह्मणजे पुरुष अर्थाचा दास आहे व अर्थ कोणाचाही दास नाहीं. ह्मणून हे महाराज युधिष्ठिरा, खरोखर अर्थाच्याच योगानें कौरवांनीं मला जखडून टाकिलें आहे ] ' असें जर प्रत्यक्ष भीष्मांनींच धर्मराजाला सांगितलें आहे तर त्या भीष्मादिकांनीं अर्थाला आपला आत्मा विकला असल्याचें उघड होत आहे. सारांश, अर्थाला

लुब्ध होऊन युद्ध करण्यास प्रवृत्त झालेल्या भीष्मादिकांचा मोठेपणा आतां उरला कोठें ?—असें कदाचित् श्रीकृष्ण ह्मणतील ह्मणून ' अर्थ-कामांस्तु ' ( ह्मणजे द्रव्यलुब्ध असलेल्याही ) हीं दोन पदें अर्जुनानें घातलीं आहेत.—भीष्मादिक जरी अर्थलुब्ध असले तरी माझ्यापेक्षां मोठेच आहेत—हें श्रीकृष्णांना सुचविण्याकरितां उत्तरार्धांतही पुनरपि गुरुशब्दाचा प्रयोग भीष्मादिकांना उद्देशून अर्जुनानें केला आहे. ' अर्थकामान् ' ह्या विशेषणाचा अन्वय ' गुरून् ' ह्या पदाशीं न करितां ' भोगान् ' ह्या पदाशीं केला तर—गुरुवध करून धर्माची अगर मोक्षाची प्राप्ति न होतां केवळ अर्थ व काम ह्यांनीं भरलेल्या आणि रक्तपातानें साध्य होणाऱ्या विषयोपभोगांची मात्र प्राप्ति होणार आहे—असें उत्तरार्धाचें तात्पर्य निघतें. ' अर्थकामान् ' ह्या विशेषणाचा अर्थ शंकरानंदस्वामींनीं धर्मोपदेशक असा केला आहे. असो. ह्या श्लोकांत दोन्ही ठिकाणीं ' गुरून् ' असें बहुवचनांत पद आहे व त्याचें स्पष्टीकरण शंकरानंदप्रभृति टीकाकारांनीं ' भीष्मद्रोणकृपादीन् ' असें केलें आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं ' महानुभावान् ' हें विशेषण द्रोणाचार्यां-नाच उद्देशून लाविलें असल्यामुळें बहुवचन आदरार्थीं समजून ' गुरून् ' ह्या शब्दानें गुरुद्रोणाचार्यच त्यांनीं घेतले असल्याचें दिसतें. गुरुश-ब्दाचा रूढार्थ ' विद्या शिकविणारा ' असा मराठीमध्यें आहे आणि टीकाकारांनीं ' गुरून् ' ह्या पदाचें विवरण ' भीष्मद्रोणकृपादीन् ' असें केलें आहे. तेव्हां ह्या श्लोकांतील गुरुशब्दाचा ' अध्यापन करणारा ' इतकाच संकुचित अर्थ न घेतां नात्यानें वडील माणसें असा व्यापक अर्थ घ्यावा. गुरुशब्दाचा मुख्य अर्थ पिता अगर अध्यापन करवि-णारा असा असून वडील माणसें असा व्यापक अर्थही स्मृतींतून केला असल्याचें दृष्टीस पडतें. ' गर्भाधानादि संस्कार यथाविधि करून जो अन्नानें वाढवितो तो विप्र गुरु होय ' अशा आशयाचें ' निषेकादीनि कर्माणि यः करोति यथाविधि । संभावयति चान्नेन स विप्रो गुरुरुच्यते '

हें मनुस्मृतींत वचन आहे त्यावरून गुरु ह्मणजें पिता असें होतें. कारण, गर्भाधानादि संस्कार करण्याचा अधिकार पित्यालाच आहे. 'थोडें बहुत शास्त्र अथवा वेद पढवून जो उपकार करितो त्यालाही त्या अध्यापनरूप उपकारामुळें गुरु समजावें' अशा अर्थाचेंही 'अल्पं वा बहु वा यस्य श्रुतस्योपकरोति यः। तमपीह गुरुं विद्याच्छ्रुतोपक्रियया तया' हें मनुवचन आहे. त्यावरून गुरु ही मुख्य संज्ञा पित्यालाच असून पढविणाऱ्याला गौण असल्याचें सिद्ध होतें. शिष्ट लोक तर्पणांत वगैरे गुरुशब्दानें प्रथम पिताच घेत असून नंतर आचार्यगुरु ह्मणून अध्यापक घेत असल्याचें सर्वांस महशूर आहेच. 'उपाध्याय, पिता, ज्येष्ठ भ्राता, राजा, मातुल, श्वशुर, रक्षणकर्ता, मातामह, पितामह, श्रेष्ठवर्णाचा पुरुष आणि पितृव्य हे पुरुषांपैकीं गुरु होत; आणि माता, मातामही, गुरुपत्नी, पित्याचे आणि मातेचे सहोदर ( बंधु व भगिनी ), सासू, पितामही आणि ज्येष्ठ दाई ह्या स्त्रीजातीमध्यें गुरु होत' असें 'उपाध्यायः पिता ज्येष्ठो भ्राता चैव महीपतिः। मातुलः श्वशुरस्त्राता मातामहपितामहौ॥ वर्णज्येष्ठः पितृव्यश्च पुंस्वेते गुरवः स्मृताः॥ माता मातामही गुर्वी पितुर्मातुश्च सोदराः। श्वश्रूः पितामही ज्येष्ठा धात्री च गुरवः स्त्रियाम्॥' ह्या हारीतस्मृतींत सांगितलें असल्यामुळें गुरुशब्दाचा अर्थ वडील माणसें असा व्यापक असल्याचें सिद्ध होतें. ह्या श्लोकांतील 'रुधिरप्रदिग्धान्' ह्या पदाचा खुलासा ह्मणण्यासारखा कोणींच केलेला दिसत नाहीं. मधुसूदनसरस्वतींनीं 'रुधिरप्रदिग्धा इवायशोव्याप्तत्वेनात्यन्तजुगुप्सिता इत्यर्थः' असें ह्मटलें आहे व त्याचा अर्थ 'अपकीर्तीनें व्याप्त झाल्यामुळें रक्तानें चोपडल्यासारिखे अत्यंत निंद्य विषय' असा होत असून त्यापासून चांगलासा बोध होत नाहीं. प्रासिद्ध

---

उपजीविकेकरितां वेदाची शाखा अथवा व्याकरणप्रभृति वेदांगें जो पढवितो त्याला उपाध्याय असें ह्मणतात. एकदेशं तु वेदस्य वेदाङ्गान्यपि वा पुनः। योध्यापयति वृत्त्यर्थमुपाध्यायः स उच्यते॥ मनुस्मृतिः॥

महापंडित कै० रघुनाथशास्त्रीबुवा पर्वते ह्यांनीं भाषाविवृतिदीप ह्मणून भगवद्गीतेवर एक मराठी विस्तृत टीका लिहिली आहे व ती प्रायः मधुसूदनसरस्वतींनीं केलेल्या गूढार्थदीपिकेच्याच आधारानें विशेषें करून लिहिली असल्याचें दिसत आहे. ‘ अर्थांची इच्छा ज्यांस आहे अशा द्रोणादिक गुरूंस मारलें तर रक्तानें भिजलेल्या प्रमाणें निंदित जे भोग ह्मणजे विषय त्यांस इहलोकींच मी भोगीन ’ असें कै० पर्वते ह्यांच्या भाषाविवृतिदीपांत सदर्हू श्लोकाच्या उत्तरार्धाचें स्पष्टीकरण केलें आहे. परंतु, ‘ रक्तानें भिजल्याप्रमाणें निंदित विषय ’ ह्या शब्दांच्या योगानें ‘ रुधिर प्रदिग्धान् ’ ह्या विशेषणाचा आशय मला तर नीट समजत नाहींच. शंकरानंदस्वामींनीं ‘ रक्तधाराप्रसिक्तान्रुधिरमयान् ’ असें व्याख्यान केलें आहे; परंतु, त्यावरूनही नीटसा खुलासा होत नाहीं. ‘ रुधिरेण प्रदिग्धान्प्रकर्षेण लिप्तान् ’ असें श्रीधरस्वामींनीं विवरण केलें आहे; परंतु, तेंही मजसारिख्याला दुर्बोधच आहे. ‘ लोहितलिप्तानिवात्यन्तगर्हितान् ’ असें स्पष्टीकरण आनंदगिरींनीं केलें आहे तेंही दुर्ज्ञेयच आहे व ‘ गुरून्हत्वा रुधिरप्रदिग्धांस्तद्रुधिराक्तान् ’ असें परमार्थप्रपानामक टीकेंत आहे त्यावरूनही नीट खुलासा होत नाहीं. ज्ञानेश्वरीवांचून गीतेवरील मराठी टीकांवरूनही ‘ रुधिरप्रदिग्धान् ’ ह्या विशेषणाचा आशय मनामध्यें नीटसा येत नाहीं. ‘ धनार्थि हे मारुनि याच लोकीं भोगूं रक्तें भोग माखूनियां कीं ’ वामनपंडित. ‘ न स्वार्थकाम गुरुच्या हननें रुधिराक्त राज्य भोगावें ’ मोरोपंत. ‘ वडील वधोनी भोग भोगणें । ते रुधिराक्त भोग जाणपा ॥ ’ मुक्तेश्वर. ‘ यांच्या रक्तें भोग माखुनी भोगावे । भक्षी मांसासवें मद्य जैसें ॥ ’ तुकाराम. ह्या चारी मराठी टीकांवरून ‘ रुधिरप्रदिग्धान् ’ ह्या विशेषणाचा खुलासा नीटसा होत नाहीं. आह्मां अज्ञजनांना समजण्यासारखें ह्या विशेषणाचें स्पष्टीकरण फक्त ज्ञानेश्वरमहाराजांनीं मात्र थोडेसें केलेलें आहे. ते लिहितातः—देवा नवनिशितीं शरीं । वावरोनि यांचा जिव्हारीं । भोग गिंवसावे रुधिरीं बुडाले जे ॥ अर्थः—

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥६॥**

---

हे देवा, नुकत्याच पाजळलेल्या बाणांच्या योगानें या गुरूंच्या मर्मस्थानीं प्रहार करून रक्तांत बुडालेले भोग मी सोधावे नां ? ' विषयोपभोग हे रक्ताच्या डोहामध्यें बुडालेले आहेत. तेव्हां त्या डोहांत बुड्या मारल्यावांचून ते हातीं लागणें शक्य नाहीं. सारांश, लक्षावधि सेनेसहवर्तमान द्रोणाचार्यप्रभृतींचा वध करून रक्ताचे पूर वाहविल्या वांचून राज्यसुखादि विषयांचा उपभोग मिळणें दूरापास्त आहे. ' असें ज्ञानेश्वर महाराजांच्या ओवीचें तात्पर्य समजून मी मूळ श्लोकाचें भाषांतर यथामति केलें आहे व इतर संस्कृत आणि प्राकृत टीकाकारांचींही मतें वर दिलीं आहेत. सुज्ञ जनांनीं योग्य वाटेल त्या अर्थाचा स्वीकार करावा ) ॥ ५ ॥

( आतां ' भिक्षेवर निर्वाह करणें क्षत्रियाला निषिद्ध असून युद्ध विहित आहे. तेव्हां स्वधर्म ह्मणून युद्ध करणेंच तुला श्रेयस्कर आहे ' असें श्रीकृष्ण कदाचित् ह्मणतील ह्मणून अर्जुन ह्मणतोः— हिंसारहित असल्यामुळें ) भिक्षान्नावर उपजीविका करणें अथवा स्वधर्म ह्मणून युद्ध करणें ह्यांपैकीं आह्मांला कोणतें उत्तम हें समजत नाहीं. ( युद्धाला आरंभ जरी केला तरी ) आह्मी त्यांना जिंकूं अथवा ते आह्मांला जिंकितील ( किंवा उभयतांची बरोबरी होईल हें कांहींच सांगतां येत नाहीं. बरें, कदाचित् आमचा जरी जय झाला तरी परिणामावर नजर दिली असतां तो पराजयच ठरणार आहे. कारण, विषयोपभोगाची तर गोष्टच राहूं द्या परंतु ) ज्यांचा वध केल्यानंतर आह्मी जिवंत राहणें देखील शक्य नाहीं ते धृतराष्ट्रपक्षीय ( भीष्मद्रोणादिक मरण्याचा निश्चय करून ) संमुख उभे राहिले आहेत ( सारांश, भिक्षान्नावर उपजीविका करण्यापेक्षां युद्ध करणें श्रेष्ठ असें सिद्ध होत नाहीं ) ६.

( मधुसूदनसरस्वतीप्रभृति टीकाकारांनीं ह्या श्लोकाचे शेवटीं पहिल्या

अध्यायापासून दुसऱ्या अध्यायांतील सहा श्लोकांपर्यंतचें तात्पर्य ह्या ठिकाणीं काढून ठेविलें आहे त्याचा सारांशः—" न चैतद्विद्मः " ह्या श्लोकापर्यंत जो ग्रंथ पूर्वीं गेला त्यांत ब्रह्मज्ञानाचा अधिकार प्राप्त होण्यास अवश्यक लागणाऱ्या गोष्टी सांगितल्या आहेत.—रणामध्यें वध पावणाऱ्याच पुरुषाची योग्यता सूर्यमंडल भेदून जाणाऱ्या योगयुक्त भिक्षूप्रमाणें ' द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डलभेदिनौ । परिव्राडयोगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ' ह्या वचनांत सांगितली आहे. तस्मात्, रणांत वध पावणें श्रेयस्कर आहे; वध करणें श्रेयस्कर नाहीं-—असें " स्वकीय बंधुजनांचा युद्धामध्यें वध करून विचाराअंतींही पुरुषार्थप्राप्ति होईलसें दिसत नाहीं " अशा अर्थाच्या ' न च श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ' ह्या श्लोकार्धानें सूचित करून ब्रह्मज्ञानाचा अधिकार प्राप्त होण्याला अवश्यक जीं साधनें त्यांतील नित्यानित्यवस्तुविवेक हें पहिलें साधन दर्शविलें. ' हे कृष्णा, मला जयाची इच्छा नाहीं; राज्याची गरज नाहीं आणि विषयसुखाचीही मी परवा बाळगीत नाहीं ' अशा अर्थाच्या 'न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ' ह्या श्लोकार्धानें इहामुत्रफलभोगविराग हें जें ब्रह्मज्ञानाचा अधिकार प्राप्त होण्याचें दुसरें साधन त्यापैकीं एक भाग ह्मणजे ऐहिक फलाविषयीं विरक्तता दर्शविली. "ह्यांच्या वधानें त्रैलोक्याचें राज्य जरी मिळणार असलें तरी " इत्यादि आशयाच्या ' अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः ' ह्या पसतिसाव्या श्लोकांतील ग्रंथानें सदर्हू साधनाचा दुसरा भाग ह्मणजे पारलौकिक फलाविषयीं वैराग्य दर्शविलें. ' हे जनार्दना, कुलधर्म उच्छिन्न झालेल्या पुरुषांचें वास्तव्य सतत नरकामध्यें होतें असें आह्मीं ऐकिलें आहे ' अशा आशयाच्या ' उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन । नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ' ह्या बेचाळिसाव्या श्लोकानें आत्मा स्थूल देहाहून भिन्न असल्याचें सुचविलें. शमदमादिषट्कसंपत्ति हें ब्रह्मज्ञानाचा अधिकार प्राप्त होण्याचें तिसरें साधन होय. वृत्ति-

साठ्या श्लोकांतील उत्तरार्धानें शम व दम दर्शविले. पैकीं ' हे गोविंदा, राज्याचा आह्मांला काय उपयोग आहे? ' अशा आशयाच्या 'किं नो राज्येन गोविन्द ' ह्या शब्दांनीं शम सुचविला आणि ' भोगांशीं तरी काय करावयाचें आहे? ' अशा अर्थाच्या ' किं भोगैः ' ह्या शब्दांनीं दम सुचविला. 'चित्त लोभग्रस्त झाल्यामुळें जरी हे पहात नाहींत' इत्यादि आशयाच्या ' यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ' ह्या ग्रंथानें निर्लोभता दर्शविली आणि, ' निःशस्त्र होऊन प्राणरक्षणार्थही धडपड करीत नसतांना जर धृतराष्ट्रपुत्रांनीं हातांत शस्त्रें घेऊन माझा रणामध्यें वध केला तर त्यांत माझें हित अधिक आहे ' अशा आशयाच्या 'यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः । धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ' ह्या श्लोकानें तितिक्षा दर्शविली. ह्याप्रमाणें मधुसूदन-सरस्वतीप्रभृति टीकाकारांनीं पहिल्या अध्यायाचें तात्पर्य काढिलें आहे त्याचा सारांश होय.– ' इहलोकीं भिक्षान्नावर उपजीविका करणेंही श्रेयस्कर आहे' अशा अर्थाच्या ' श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ' ह्या दुसऱ्या अध्यायांतील ग्रंथानें भिक्षाचरणानें सूचित होत असलेला संन्यास दर्शविला आहे '–असें मधुसूदनसरस्वती ह्मणतात.

मधुसूदनसरस्वतींनीं काढिलेल्या पहिल्या अध्यायाच्या तात्पर्याचा जो सारांश वर दिला आहे तो समजण्यास कांहीं पारिभाषिक माहितीची जरूर आहे. विवेक, वैराग्य, शमदमादिगुण व मुमुक्षुता हीं चार ज्याचे जवळ आहेत त्यालाच ब्रह्मज्ञानाची योग्यता आहे असें समजावें. कारण, ब्रह्मज्ञान प्राप्त होण्याला हीं चार साधनें विद्वानांनीं अवश्य सांगितलीं आहेत. तीं जर असतील तरच ब्रह्मनिष्ठा प्राप्त होते नसतील तर होत नाहीं. प्रथम नित्यानित्यवस्तुविवेक; नंतर इहामुत्रफलभोग-

---

१ विवेकिनो विरक्तस्य शमादिगुणशालिनः। मुमुक्षोरेव हि ब्रह्मजिज्ञासायोग्यता मता ॥ विवेकचूडामणिः ॥ २ साधनान्यत्र चत्वारि कथितानि मनीषिभिः । येषु सत्स्वेव सन्निष्ठा यदभावे न सिध्यति ॥ वि० चू० ॥

विराग; तदनंतर शमादिषट्कसंपत्ति आणि नंतर मुमुक्षुत्व हीं ब्रह्मविद्येला अवश्यक असलेलीं चार साधनें होत. हें साधनचतुष्टय स्ववर्णाश्रमधर्माचरणरूप तपश्चर्येच्या योगानें ईश्वराला संतुष्ट केलें असतां पुरुषांना प्राप्त होतें.—आत्म्याचें स्वरूप नित्य ह्मणजे अविनाशि असून आत्मव्यतिरिक्त सर्व दृश्य वस्तु अनित्य ह्मणजे नश्वर आहेत—अशाप्रकारचा जो पक्का निश्चय त्याला नित्यानित्यवस्तुविवेक ह्मणावें. देहादिकांपासून तों ब्रह्मलोकांपर्यंत असलेल्या ज्या अनित्य भोग्य वस्तु त्यांचे विषयीं दर्शन, श्रवण इत्यादिकांच्या योगानें जो कंटाळा उत्पन्न होतो त्याला वैराग्य असें ह्मणतात. शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान ह्यांना शमादिषट्क असें ह्मणतात. कधींही कसलीच वासना नसणें ह्याला शम असें ह्मणतात. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें हीं दोन्हीं विषयांपासून परावृत्त करून आप आपल्या गोलकाचेच ठिकाणीं स्थापन करणें ह्याला दम असें ह्मणतात. बाह्य विषयांपासून मनोवृत्ति सर्वस्वीं परावृत्त होणें ह्याला उपरति असें ह्मणतात. प्रतीकार, चिन्ता व विलाप ह्यांपैकीं कांहीं एक न करितां येईल तें दुःख सहन करणें ह्याला तितिक्षा असें ह्मणतात. शास्त्र आणि गुरुवचन ह्यांच्या सत्यतेविषयीं मनाचा निश्चय असणें ह्याला विद्वान लोक श्रद्धा असें ह्मणतात व ह्या

---

१ आदौ नित्यानित्यवस्तुविवेकः परिगण्यते ॥ इहामुत्रफलभोगविरागस्तदनन्तरम् ॥ शमादिषट्कसंपत्तिर्मुमुक्षुत्वमिति स्फुटम् ॥ विवेकचूडामणिः ॥ २ स्ववर्णाश्रमधर्मेण तपसा हरितोषणात् । साधनं प्रभवेत्पुंसां वैराग्यादिचतुष्टयम ॥ अपरोक्षानुभूतिः ॥ ३ नित्यमात्मस्वरूपं हि दृश्यं तद्विपरीतगम् । एवं यो निश्चयः सम्यग्विवेको वस्तुनः स वै॥ अ० ॥ ४ तद्वैराग्यं जिहासा या दर्शनश्रवणादिभिः । देहादिब्रह्मपर्यन्ते ह्यनित्ये भोग्यवस्तुनि ॥ वि० चू० ॥ ५ सदैव वासनात्यागः शमोयमिति शब्दितः ॥ अ० ॥ ६ विषयेभ्यः परावृत्य स्थापनं स्वस्वगोलके । उभयेषामिन्द्रियाणां स दमः परिकीर्तितः ॥ वि० चू० ॥ ७ विषयेभ्यः परावृत्तिः परमोपरतिर्हि सा ॥ अ० ॥ ८ सहनं सर्वदुःखानामप्रतीकारपूर्वकम् । चिन्ताविलापरहितं सा तितिक्षा निगद्यते ॥ वि० चू० ॥ ९ शास्त्रस्य गुरुवाक्यस्य सत्यबुद्ध्यवधारणम् । सा श्रद्धा कथिता सद्भिर्यया वस्तूपलभ्यते ॥ वि० चू० ॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः। यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥७॥**

---

श्रद्धेच्या योगानें आत्मवस्तु उपलब्ध होते. सर्वदां शुद्ध ब्रह्माकडे बुद्धीचें लय लागणें ह्याला समाधान असें ह्मणतात; इष्ट पदार्थ प्राप्त करून घेऊन चित्ताचें लाड करणें हें समाधान नव्हें. अहंकारादिकांपासून तों देहापर्यंत जे अज्ञानकल्पित बंध ते आपल्या स्वरूपज्ञानाच्या योगानें सोडण्याची जी इच्छा ती मुमुक्षुता समजावी; किंवा, हे विधात्या, संसारबंधापासून माझी सुटका कशी व केव्हां होईल अशाप्रकारें एकसारखी जी मनाला रुखरुख लागून राहते ती मुमुक्षुता असें ह्मणावें. ) ॥ ६ ॥

अज्ञाननिमित्तक दोषानें शौर्यादिजातिस्वभाव लुप्त झाल्यामुळें धर्मनिर्णय करण्याविषयीं माझें अंतःकरण अगदीं गोंधळून गेलें आहे. ह्मणून मी तुला विचारीत आहें; तर निश्चित असें श्रेयःसाधन जें असेल तें तूं मला सांग. ( हा शिष्य नाहीं असें समजून माझी उपेक्षा करूं नकोस, मी तुझा शिष्य आहें. तस्मात्, मज शरणागताला तूं उपदेश कर ७.

( कृपणशब्दाचा व्यवहारामध्यें प्रसिद्ध अर्थ = कवडीचुंबक, हातून पैसा न सोडणारा असा आहे ; परंतु, ह्या श्लोकामध्यें कार्पण्यशब्दाचा अर्थ सर्वस्वीं तसा नाहीं. ‘ हे गार्गि, हें आत्मस्वरूप जाणिल्यावांचून जो इहलोक सोडून जातो तो कृपण ’ अशा अर्थाची ‘ यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वास्माल्लोकात्प्रैति स कृपणः ’ ही शतपथश्रुति असल्यामुळें ह्या ठिकाणीं कार्पण्यशब्दाचा अर्थ अज्ञान असा समजावा. तमोगुणाचें प्राधान्य असल्यामुळें अज्ञानाच्या योगानें वस्तूचें स्वरूपज्ञान यथार्थ होत नाहीं. तेव्हां हाच अज्ञाननिमित्तक दोष होय. स्वभाव ह्या

---

१ सर्वदा स्थापनं बुद्धेः शुद्धे ब्रह्मणि सर्वदा । तत्समाधानमित्युक्तं न तु चित्तस्य लालनम्॥विवेकचूडामणिः॥ २ अहंकारादिदेहान्तान्बन्धानज्ञानकल्पितान्। स्वस्वरूपावबोधेन मोक्तुमिच्छा मुमुक्षुता ॥ वि० चू० ॥ ३ संसारबन्धनिर्मुक्तिः कथं मे स्यात्कदा विधे । इति या सुदृढा बुद्धिर्वक्तव्या सा मुमुक्षुता ॥ अ० ॥

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

संजय उवाच ॥

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥

---

शब्दाचा अर्थ जातिधर्म असा असल्यामुळें व अर्जुन क्षत्रिय असल्यामुळें ह्या ठिकाणीं त्या शब्दाचा अर्थ शौर्य वगैरे असा होतो. तेव्हां, ' कार्पण्यदोषोपहतस्वभावः ' ह्या सर्व समस्तपदाचा अर्थ—अज्ञाननिमित्तकदोषामुळें ज्याचा शौर्यादि जातिस्वभाव लुप्त झाला आहे--असा समजावा. ' धर्मसंबंधीं निश्चय होण्यासारखें प्रमाण माझ्या दृष्टीं पडलें नसल्यामुळें ह्या प्रतिपक्ष्यांचा वध करणें धर्म आहे किंवा ह्यांचें परिपालन करणें धर्म आहे; त्याचप्रमाणें पृथ्वीचें परिपालन करणें धर्म आहे किंवा अरण्यांत रहाणेंच धर्म आहे इत्यादि संशयांनीं माझें चित्त गोंधळून गेलें आहे ' असें अर्जुनानें ' धर्मसंमूढचेताः ' ह्या विशेषणानें दर्शविलें. ' ब्रह्मज्ञानाकरितां ब्रह्मनिष्ठ आणि श्रोत्रिय अशा गुरूकडेच हातामध्यें समिधा घेऊन जावें ' अशा अर्थाची ' तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ' ही श्रुति असल्यामुळें ' शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ' असें सांगून यथाविधि गुरूला शरण जाणाऱ्यालाच ब्रह्मज्ञानाचा अधिकार आहे हें दर्शविलें ) ॥ ७ ॥

( आतां ' तूं स्वतःच ज्ञाता असल्यामुळें कल्याणकारक गोष्ट कोणची हें तुझें तुलाच समजेल. तेव्हां दुसऱ्याचें शिष्यत्व पत्करून तुला काय उपयोग होणार आहे? असें कदाचित् श्रीकृष्ण ह्मणतील असें समजून अर्जुन त्यांना ह्मणतोः—स्वजनांची हिंसा करून ) शत्रुरहित व संपत्तींनीं भरलेलें असें सार्वभौम राज्य आणि देवांचेंही आधिपत्य जरी प्राप्त झालें तरी इंद्रियांना शुष्क करून टाकणारा माझा

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥**

स्वजनवधनिमित्तक शोक ज्यामुळें नाहींसा होईल अशी वस्तुच मला दिसत नाहीं. ( ह्यास्तव, युद्धावांचून कांहीं उपाय असेल तर सांग )८.

( इतकें झाल्यावर अर्जुनानें काय केलें? युद्ध न करितां माझ्या पुत्रांना राज्य अर्पण करून तो बंधूंसहवर्तमान अरण्यांत निघून गेला कीं काय ? असें कदाचित् धृतराष्ट्र विचारील ह्मणून अगोदरच त्याला ) संजय ह्मणालाः—ह्याप्रमाणें इंद्रियाधिपति गोविंदाला सांगून आणि ' मी युद्ध करणार नाहीं ' असेंही कळवून शत्रूंना संताप देणारा निरलस अर्जुन कांहीं बोलेनासा झाला ९.

( गोविंद ह्या शब्दाचा अर्थ सर्वज्ञ असा मधुसूदनसरस्वतींनीं केला आहे. गोविंद व हृषीकेश हीं पदें अनुक्रमें ईश्वराचें सर्वज्ञत्व व सर्वशक्तिमत्त्व सुचविणारीं असल्यामुळें भगवान् श्रीकृष्णांना अर्जुनाचा मोह निवृत्त करणें अगदीं सहज होतें असें संजयानें धृतराष्ट्राला सदहू पदांनीं दर्शविलें आणि त्याचप्रमाणें अर्जुन स्वभावतः आलस्यरहित असून शत्रुतापक असल्यामुळें त्याचे ठिकाणीं आगंतुक आलेलें आलस्य व अताषकत्व फार वेळ टिकलें नाहीं हेंही ' गुडाकेशः ' आणि ' परंतपः ' ह्या विशेषणांनीं धृतराष्ट्राला संजयानें सुचविलें. गुडाकेश ह्या शब्दाचा अर्थ शंकरानंदांनीं—काठीसारख्या लांब केसांनीं युक्त—असा केला आहे ) ॥९॥

( ह्याप्रमाणें अर्जुनानें जरी युद्धाची उपेक्षा केली तरी भगवान् श्रीकृष्णांनीं उपेक्षा केली नाहीं असें सुचवून धृतराष्ट्राच्या दुराशेचे निरसन करण्याकरितां संजय पुनरपि त्याला ह्मणाला ) हे भारता, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं मोह पावत असलेल्या त्या अर्जुनाला हंसल्या सारखें करीत करीत इंद्रियाधिपति श्रीकृष्णांनीं असें भाषण केलें १०.

( ह्या दहाव्या श्लोकाचें स्पष्टीकरण टीकाकारांनीं केलें आहे तें येणेंप्रमाणें :—युद्धाचा हुरूप धरून दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं आला अस-

तांही युद्धाला विरुद्ध जो मोह त्यानें ग्रस्त होणाऱ्या अर्जुनाचा उपहास करण्याकरितांच कीं काय—ह्मणजे त्याचें आचरण अनुचित आहे असें दर्शवून त्याला लज्जारूप सागरामध्यें बुडविण्याकरितांच कीं काय- सर्वांतर्यामी भगवानांनीं पराकाष्ठेच्या गंभीर अर्थानें अगदीं भरलेलें असून त्याच्या आचरणाचा अयोग्यपणा दर्शविणारें असें भाषण त्याच्याशीं केलें. त्याची उपेक्षा केली नाहीं. आचरण अयोग्य आहे असें दर्शवून तें करणाऱ्याचे ठिकाणीं लज्जा उत्पन्न करणें हा प्रहासशब्दाचा अर्थ होय. लज्जा ही दुःखरूप असल्यामुळें ती उत्पन्न करणें हें खरोखर द्वेषमूलक आहे; परंतु, अर्जुनाला दुःख देण्याचा उद्देश भगवानांचा नव्हता. विवेक उत्पन्न होण्याकारितां त्याचें अयोग्य वर्तन त्याला दर्शविणें हा उद्देश त्यांचा असल्यामुळें व त्याच्यावर त्यांची कृपा असल्यामुळें ह्याठिकाणीं 'प्रहसन्' ह्या शब्दाचा मुख्य अर्थ विवक्षित नसून गौण अर्थ विवक्षित आहे व हेंच 'इव' ह्या शब्दानें दर्शविलें आहे. सारांश, प्रतिस्पर्धी ज्याप्रमाणें प्रतिपक्ष्याला लाजविण्याचा उद्देश मनांत धरून त्याचें अनुचित आचरण त्याच्या दृष्टोत्पत्तीस आणितो तसें न कारितां अर्जुनाचे ठिकाणीं विवेक उत्पन्न व्हावा हा उद्देश मुख्यतः मनांत धरून त्याचें अनुचित आचरण भगवानांनीं दर्शविलें आहे. तात्पर्य, विवेक उत्पन्न करणें हा मुख्य उद्देश भगवानांचा होता; लज्जा उत्पन्न करणें हा मुख्य उद्देशच नसल्यामुळें ती उत्पन्न होवो अगर न होवो भगवानांना तिची मुळींच परवा नव्हती असें 'प्रहसन्निव' ह्या शब्दांनीं सुचविलें आहे.—युद्धाला आरंभ होण्यापूर्वीं ह्मणजे घरीं असतांनाच जर अर्जुनानें युद्धाची उपेक्षा केली असती तर तें त्याचें करणें अयोग्य दिसलें नसतें; परंतु, मोठा हुरूप धरून युद्धभूमीवर आपण होऊन आल्यानंतर त्याची उपेक्षा करणें अत्यंत अयोग्य आहे—हें दर्शविण्याकरितां 'सेनयोरुभयोर्मध्ये' ( ह्मणजे दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं ) असें ह्मटलें आहे. युद्ध करणें हा क्षत्रियांचा धर्म असून अर्जुनाची त्या स्वधर्माचे ठिकाणीं आपोआप

प्रवृत्ति झाली होती. परंतु, दोन प्रकारच्या मोहामुळें व तन्निमित्तक शोकामुळें त्याच्या त्या प्रवृत्तीला प्रतिबंध झाला तेव्हां मुख्यतः अर्जुनाचा दोन्ही प्रकारचा मोह भगवानांना नाहींसा करावयाचा आहे. वास्तविक पाहूं गेलें असतां स्वयंप्रकाश असा जो परमानंदरूप आत्मा त्याचे ठिकाणीं कोणत्याही संसारविषयक गुणदोषांचा संपर्क नाहीं. तथापि, स्थूलदेह, लिंगदेह व ह्या दोहोंचें कारण अविद्या ह्या तीन उपाधींचें ज्ञान नसल्यामुळें मिथ्याभूत जो संसार तो खरा वाटून त्या संसाराचे जे गुणदोष ते आत्म्याचे भासूं लागतात. हा मोह सर्वप्राण्यांना साधारण असल्यामुळें तो अर्जुनालाही होताच. हिंसा वगैरे अतिशय होत असल्यामुळें युद्धरूप स्वधर्माविषयींही अर्जुनाची अधर्मबुद्धि झाली हा दुसऱ्या प्रकारचा मोह करुणादि दोषांमुळें अर्जुनालाच मात्र झाला होता. हा सर्व प्राण्यांना होतोच असा नियम नाहीं. असो. ज्याप्रमाणें तीन उपाधींचें अज्ञान असल्यामुळें मोह उत्पन्न होतो त्याचप्रमाणें तिन्ही उपाधींविषयीं विवेक उत्पन्न झाला असतां शुद्ध जो आत्मा त्याचें स्वरूपज्ञान होऊन तें पहिल्या प्रकारच्या—सर्वांना साधारण असलेल्या—मोहाचे निवृत्तीला कारणीभूत होतें.—हिंसादिकांनीं युक्त जरी युद्धकर्म असलें तरी तो स्वधर्म असल्यामुळें दोषावह नाहीं आणि

---

१ त्वङ्मांसरुधिरस्नायुमेदोमज्जास्थिसंकुलम्। पूर्णं मूत्रपुरीषाभ्यां स्थूलं निन्द्यमिदं वपुः ॥ पञ्चीकृतेभ्यो भूतेभ्यः स्थूलेभ्यः पूर्वकर्मणा । समुत्पन्नमिदं स्थूलं भोगायतनमात्मनः ॥ ... सर्वोपि बाह्यसंसारः पुरुषस्य यदाश्रयः । विद्धि देहमिदं स्थूलं गृहवद्गृहमेधिनः ॥ विवेकचूडामणिः ॥ पञ्चीकृतमहाभूतसंभवं कर्मसंचितम्। शरीरं सुखदुःखानां भोगायतनमुच्यते ॥ वागादि पञ्च श्रवणादि पञ्च प्राणादि पञ्चाभ्रमुखानि पञ्च । बुद्ध्याद्यविद्यापि च कामकर्मणी पुर्यष्टकं सूक्ष्मशरीरमाहुः ॥ इदं शरीरं शृणु सूक्ष्मसंज्ञितं लिङ्गं त्वपञ्चीकृतभूतसंभवम्। सवासनं कर्मफलानुभावकं स्वाज्ञानतोनादिरुपाधिरात्मनः ॥ वि० चू० ॥ पञ्चप्राणमनोबुद्धिदशेन्द्रियसमन्वितम् । अपञ्चीकृतभूतोत्थं सूक्ष्माङ्गं भोगसाधनम् ॥ अनाद्यविद्यानिर्वाच्या कारणोपाधिरुच्यते । उपाधित्रितयादन्यमात्मानमवधारयेत् ॥ आत्मबोधः ॥

# ॥ श्रीशांकरभाष्यम् ॥



**दृष्ट्वा तु पाण्डवानीकमित्यारभ्य यावन्न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव हेत्येतदन्तः प्राणिनां शोकमोहादिसंसारदुःखबीजभूतदोषोद्भवकारणहेतुप्रदर्शनार्थत्वेन व्याख्येयोयं ग्रन्थः ।**

---

ह्मणूनच युद्धामध्यें हिंसा करणें अधर्मही होत नाहीं—असें ज्ञान दुसऱ्या प्रकारचा मोह निवृत्त करणारें आहे. तेव्हां ह्या दोन साधनांच्या योगानें अर्जुनाचा दोन्ही प्रकारचा मोह निवृत्त करण्याच्या उद्देशानें भगवानांनीं त्याच्याशीं भाषण केलें. मोह हेंच शोकाचें कारण असल्यामुळें मोहनिवृत्ति झाल्यानें शोकनिवृत्ति अर्थात् होणारच आहे असें समजून भगवानांनीं अर्जुनाच्या शोकनिवृत्तीकरितां वेगळा प्रयत्न केला नाहीं ) ॥ १० ॥

**भाष्य.** ‘ दृष्ट्वा तु पाण्डवानीकम् ’ ह्मणजे पांडवसैन्य अवलोकन करून ) येथपासून तों ‘ न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ( ह्मणजे युद्ध करणार नाहीं असें गोविंदाला सांगून अर्जुन स्वस्थ बसला ) ’ येथपर्यंत जो हा ग्रंथ आहे त्याचें तात्पर्य—प्राण्यांच्या संसाररूप दुःखाला बीज होऊन राहिलेले शोकमोहादि दोष कोणत्या कारणानें उत्पन्न होतात व त्या कारणाच्या तरी मुळाशीं काय असतें—हें दर्शविण्याकडे आहे.

( शोक=प्रिय गोष्टीचा वियोग झाल्यामुळें होणारा मानसिक संताप. मोह=अविवेक. प्राण्यांना संसाररूप दुःख प्राप्त होण्यास शोक, मोह वगैरे दोष कारण आहेत व ते दोष अहंकार व ममता ह्यांमुळें उत्पन्न होत असून तीं अविद्येमुळें उत्पन्न होतात हें दर्शविण्याकरितां ‘ दृष्ट्वा तु पाण्डवानीकं ’ येथपासून तों ‘ न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं

बभूव ह ' येथपर्यंतचा ग्रंथ असल्याचें समजावें हा वरील भाष्याचा आशय होय. शोक हें मोहाचें कार्य आहे. तेव्हां वास्तविक पाहिलें असतां मोह हाच काय तो संसाराला कारणीभूत होय व त्याचीच निवृत्ति झाली असतां संसारबंधापासून मुक्तता होते. कारणावांचून कार्याची उत्पत्ति नाहीं हा सिद्धांत असल्यामुळें मोहरूप कारण नाहींसें झालें असतां शोकरूप कार्य उत्पन्न होण्याचा संभव नाहीं हें अर्थात् सिद्ध आहे. मोह हेंच संसाराचें मुख्य कारण होय असें आचार्यांनींही स्पष्टपणें कांहीं ठिकाणीं दर्शविलें आहे. तस्मात् , प्रबल जो मोह त्याचा आणि अर्थातच मोहरूप संसाराचा आत्मज्ञानानें त्याग केला असतां सर्व वस्तु व्यापून असलेल्या अशा अद्वैत ब्रह्मस्वरूपानेंच जीव असतो; जीवपणानें तो भिन्न असत नाहीं ' अशा आशयाच्या ' तस्मात्परं स्वकीयं मोहं मोहात्मकं च संसारम् । स्वज्ञानेन जहित्वा पूर्णः स्वयमेव शिष्यते नान्यत् ' ह्या स्वात्मनिरूपणनामक ग्रंथांतील श्लोकांत आचार्यांनीं ह्मटलें आहे व हाच अर्थ विवेकचूडामणीमध्यें दोन श्लोकांनीं विशेषतः स्पष्ट केला आहे. ' देहादिकांचे ठिकाणीं असलेला मोह हाच मुमुक्षु पुरुषाचा महामृत्यु होय. ह्याकरितां, मोह ज्यानें जिंकिला असेल त्याला मुक्तीची योग्यता प्राप्त होते. ह्यास्तव, हे शिष्या, देह, भार्या, पुत्र इत्यादिकांचे ठिकाणीं असलेला मोह सोडून दे. कारण, तो जिंकून मुनि विष्णूचें तें परम पद पावतात ( ह्मणजे मुक्त होतात ) ' असें विवेकचूडामणीमध्यें आचार्यांनीं ' मोह एव महामृत्युर्मुमुक्षोर्वपुरादिषु । मोहो विनिर्जितो येन स मुक्तिपदमर्हति ॥ मोहं जहि महामृत्युं देहदारासुतादिषु । यं जित्वा मुनयो यान्ति तद्विष्णोः परमं पदम् '

---

१ " शोकमोहौ ", " शोकमोहादि " असे समास आचार्यांनीं ह्या ठिकाणीं केले आहेत त्यांवरूनही शोक व मोह ह्यांमध्यें कार्यकारणरूप संबंध असल्याचें आचार्यांना अभिमत असावें असा माझा तर्क आहे व ह्या तर्काला कहोलब्राह्मणांतील पहिल्या कंडिकेवरील आचार्यांच्या भाष्याचा आधार आहे.

ह्या श्लोकांत ह्मटलेलें आहे. ह्याचा विचार केला असतां संसाराचें मुख्य बीज मोहच असून शोक तदनुषंगिक असल्याचें सिद्ध आहे. कारण, देह हाच मी व भार्या, पुत्र वगैरे हे माझे अशाप्रकारचा मोह नाहींसा झाला असतां शारीरिक व्याधीमुळें अगर भार्यादिकांचा वियोग झाल्यामुळें शोक होण्याचा संभवच नाहीं. आतां—आचार्यांनीं गीताभाष्याचे आरंभीं दुःखाचें बीज ह्मणून नुसत्या मोहाचाच निर्देश न करितां शोकाचाही आणखी निर्देश करण्याचें कारण काय ?—असा प्रश्न ह्या ठिकाणीं उद्भवतो त्याचें समाधान पुढें लिहिल्याप्रमाणें करावें असें मला वाटतें. ‘परमात्म्याशीं आपला ऐक्यभाव अवलोकन करणाऱ्याला मोह तरी कसला आणि शोक तरी कसला ?’ अशा आशयाच्या ‘तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः’ ह्या श्रुतींमध्यें मोह व त्याचें कार्य शोक ह्या दोहोंचाही निर्देश केलेला आढळतो. शिवाय, ‘इंद्रियांना शुष्क करून टाकणारा माझा स्वजन-वधनिमित्तक शोक ज्याच्या योगानें नाहींसा होईल अशी गोष्टच मला दिसत नाहीं’ असें अर्जुनानें ‘न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमु-च्छोषणमिन्द्रियाणाम्’ ह्या श्लोकार्धांत प्रत्यक्ष ह्मटलें आहे व गीतेचे शेवटीं ‘तूं शोक करूं नकोस; मी सर्व पातकांपासून तुला मुक्त करीन’ असें भगवानांनींही अर्जुनाला ‘अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः’ ह्या श्लोकार्धानें सांगितलें आहे. असो. शोक हें मोहाचें कार्य असल्यामुळें त्याचा नाश करण्याकरितां भगवानांनीं वेगळी खटपट केल्याचें गीतेमध्यें विशेषसें दिसत नाहीं. कारणाची निवृत्ति झाली असतां कार्याची उत्पत्ति होण्याचा संभवच नाहीं असें समजून त्यांनीं अर्जुनाचा फक्त मोह दूर करण्याची खटपट केली

[१] “तुला शोक करणें योग्य नाहीं” असें अनेक वेळां भगवानांनीं अर्जुनाला गीतेमध्यें सांगितलें आहे. परंतु, हें सांगण्याला जीं कारणें ठिकठिकाणीं दर्श-विलीं आहेत तीं मोहनिवर्तक आहेतच.

**तथा ह्यर्जुनेन राज्यगुरुपुत्रमित्रसुहृत्स्वजनसंबन्धिबान्धवेष्वहमेषां ममैत इत्येवंभ्रान्तिप्रत्ययनिमित्तस्नेहविच्छेदादिनिमि-**

---

असल्याचें दिसतें. ' हे पार्था, एकाग्र अंतःकरणानें तूं हें श्रवण केलेस कां ? व हे धनंजया, तुझा अज्ञाननिमित्तक मोह नाहींसा झाला कां ? ' असें जें शेवटीं ' कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा । कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ' ह्या श्लोकानें भगवानांनीं अर्जुनाला विचारिलें आहे त्यांतही फक्त मोहाचाच निर्देश आहे; शोकाचा नाहीं. त्याचप्रमाणें ' हे अच्युता, तुझ्या प्रसादामुळें मोह नाहींसा होऊन मला आत्मस्मृतीचा लाभ झाला. मी संदेहरहित झालों असून तुझ्या आज्ञेमध्यें आहें; तेव्हां, तुझ्या सांगण्याप्रमाणें मी आतां वागेन ' असें जें अर्जुनानें त्या प्रश्नाला उत्तर ' नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत । स्थितोस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ' ह्या श्लोकानें दिलें आहे त्यांतही शोकाचा उल्लेख केलेला नाहीं. उत्तरादाखल असलेल्या ह्या शेवटल्या अध्यायांतील श्लोकावरील भाष्यांत आचार्यांनीं मोहशब्दाचा अर्थ ' समस्तसंसारानर्थहेतुः ( ह्मणजे सर्व संसाररूप अनर्थाचें कारण ) ' असा केला आहे आणि ' अनेन मोहनाशप्रश्नप्रतिवचनेन सर्वशास्त्रार्थज्ञानफलमेतावदेवेति निश्चितं दर्शितं भवतीति ( ह्मणजे सर्व शास्त्रार्थाच्या ज्ञानाचें फल मोहनाश होणें एवढेंच हें निश्चयेंकरून ह्या मोहनाशविषयक प्रश्नप्रतिवचनानें दर्शविल्याचें सिद्ध होतें ) ' असेंही त्याच श्लोकाच्या भाष्यांत त्यांनीं लिहून ठेविलें आहे तेंही विचार करण्यासारखें आहे. तात्पर्य, संसाराचें मुख्य बीज मोहच असून शोक वगैरे तदनुषंगिक असल्याचें सिद्ध आहे. )

**भाष्य.** कारण, राज्य, गुरु, पुत्र, मित्र, सुहृद् , स्वजन, संबंधी आणि बांधव ह्यांविषयीं ' मी ह्यांचा, हे माझे ' अशाप्रकारची भ्रममूलक समज झाल्यामुळें आपले ठिकाणीं मोह उत्पन्न झाल्याचें आणि

त्तावात्मनः शोकमोहौ प्रदर्शितौ कथं भीष्ममहं सङ्ख्ये इत्यादिना। शोकमोहाभ्यां ह्यभिभूतविवेकविज्ञानः स्वत एव क्षत्रधर्मे युद्धे प्रवृत्तोपि तस्माद्युद्धादुपरराम परधर्मं च भिक्षाजीवनादिकं कर्तुं प्रववृते ।

---

ह्मणूनच स्वकीय ह्मणून गृहीत धरलेल्या गुरुप्रभृतींविषयीं असलेलें प्रेम वगैरे विच्छिन्न होणार अशी समज होऊन स्वतःला शोक झाल्याचें अर्जुनानें 'कथं भीष्ममहं संख्ये ( ह्मणजे प्रतिपक्षी ह्या नात्यानें मी संग्रामामध्यें भीष्मांशीं बाणांनीं युद्ध कसें करूं?)' इत्यादि शब्दसमूहानें दर्शविलें आणि आपण होऊनच तो आपल्या क्षात्रधर्मरूप युद्धामध्यें प्रवृत्त झाला असतांही शोक व मोह ह्यांनीं विचाराला व बुद्धीला घेरून टाकिल्यामुळें त्या युद्धापासून परावृत्त होऊन भिक्षेवर निर्वाह करणें वगैरे जो परकीय धर्म तो करण्यास प्रवृत्त झाला.

( राज्य ह्मणजे राजाचें परिपालनादि कर्म. द्रोणाचार्य, कृपाचार्य, भीष्म, सोमदत्त, शल्य, शकुनि, वगैरे मंडळी गुरुशब्दानें घ्यावी. अभिमन्यु, घटोत्कच, प्रतिविंध्य, सुतसोम, श्रुतकीर्ति, शतानीक, श्रुतकर्मा, लक्ष्मण वगैरे पुत्रशब्दानें घ्यावे. अश्वत्थामा, जयद्रथ, कृतवर्मा, भगदत्त वगैरे मित्रशब्दानें घ्यावे. सुहृद ह्या शब्दानें मनापासून प्रेम करणारे भगवान् श्रीकृष्ण वगैरे घ्यावे असें आनंदगिरि ह्मणतात. दुर्योधन, दुःशासन, विकर्ण वगैरे स्वजन समजावे. विराट वगैरे संबंधी समजावे. 'संबन्धिनः श्वशुरश्यालप्रभृतयो द्रुपदधृष्टद्युम्नादयः' असें लिहून आनंदगिरींनीं संबंधी ह्या शब्दाचा अर्थ—श्वशुर, श्याल वगैरे ह्मणजे द्रुपद, धृष्टद्युम्न वगैरे—असा केला आहे. परंतु, पहिल्या अध्यायाच्या चवतिसाव्या श्लोकांत श्वशुर, श्याल व संबंधी ह्यांचा निर्देश वेगळा वेगळा केलेला आहे. 'मी ह्यांचा, हे माझे, अशा प्रकारची भ्रांतिमूलक समज मोहाच्या उत्पत्तीला कारणीभूत असल्यामुळें 'भ्रांतिप्रत्ययनिमित्त'

**तथा च सर्वप्राणिनां शोकमोहादिदोषाविष्टचेतसां स्वभावत एव स्वधर्मपरित्यागः प्रतिषिद्धसेवा च स्यात् । स्वधर्मे प्रवृत्तानामपि तेषां वाङ्मनःकायादीनां प्रवृत्तिः फलाभिसंधिपूर्विकैव साहंकारा च भवति तत्रैवं सति धर्माधर्मोपचयादिष्टानिष्टजन्ममरणसुखदुःखसंप्राप्तिलक्षणः संसारोऽनुपरतो भवतीत्यतः संसारबीजभूतौ शोकमोहौ तयोश्च सर्वकर्मसं-**

---

एवढ्याचा अन्वय मोहशब्दाकडे करावा व ' स्नेहविच्छेदादिनिमित्त ' ह्याचा संबंध शोकाकडे समजावा. ' कथं भीष्ममहं संख्ये ' इत्यादि ग्रंथानें राज्य, गुरु, पुत्र, मित्र, सुहृद्, स्वजन, संबंधी व बांधव ह्यांविषयीं अर्जुनानें आपले शोकमोह प्रदर्शित केले असें भाष्यांत ह्मटलें आहे. परंतु, ' कथं भीष्ममहं संख्ये ' ह्या श्लोकापासून पुढल्या सातही श्लोकांत पुत्र, मित्र, सुहृद्, स्वजन, संबंधी व बांधव ह्यांपैकीं एकही शब्द दिसत नाहीं. शोक व मोह हे मात्र ' कथं भीष्ममहं ' ह्या श्लोकापासून ' न हि प्रपश्यामि ' ह्या श्लोकाच्या अखेरीपर्यंत मिळून दर्शविले आहेत. तेव्हां ' तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ' ह्या पहिल्या अध्यायांतील सविसाव्या श्लोकापासून तों ' स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ' ह्या सदतिसाव्या श्लोकाच्या समाप्तीपर्यंतचा मजकूर लक्ष्यांत घेऊन वरील भाष्य लाविलें पाहिजे )

**भाष्य.** तेव्हां (आह्मांसारख्या) कोणत्याही प्राण्यांचें अंतःकरण शोकमोहादिदोषांनीं व्याप्त झालें असतां स्वधर्मपरित्यागपूर्वक प्रतिषिद्ध कर्माचें अवलंबन करण्याकडे त्यांची प्रवृत्ति स्वाभाविकच होऊं लागेल. कारण, ते जरी स्वधर्मामध्यें प्रवृत्त झालेले असतात तरी त्यांची वाचिक, मानसिक, शारीरिक वगैरे प्रवृत्ति फलविषयक अभिलाषपूर्वक आणि अहंकारपूर्वकच झालेली असते. तेव्हां असा प्रकार असल्यामुळें धर्म व अधर्म ह्यांची वृद्धि झाल्यानें बरावाईट जन्म येऊन सुखदुःखादिकांची

**न्यासपूर्वकादात्मज्ञानान्नान्यतो निवृत्तिरिति तदुपदिदिक्षुः सर्वलोकानुग्रहार्थमर्जुनं निमित्तीकृत्याह भगवान्वासुदेवोऽशोच्यानित्यादि ॥**

---

प्राप्ति होणें असा जो संसार तो कधींही थांबणार नाहीं. तस्मात्, शोक व मोह हें संसाराचें बीज होय. त्या शोकमोहांची निवृत्ति सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञानावांचून कशानेंही होत नाहीं. तेव्हां सर्वलोकांवर अनुग्रह करण्याकरितां अर्जुनाचें निमित्त करून त्या आत्मज्ञानाचा उपदेश करण्याच्या इच्छेनें भगवान् वासुदेव त्याला ' अशोच्यानित्यादि ( ह्मणजेशोक करण्यास अयोग्य जे भीष्मादिक त्यांच्या करितां तूं शोक केलास वगैरे )' ह्मणाले.

( ' भिक्षाजीवनादिकम् ' ह्या भाष्यस्थ पदांतील आदिशब्दाचा अर्थ–सर्वकर्मत्यागपूर्वक संन्यासाश्रम, आत्मचिंतन वगैरे–असा आनंदगिरींनीं केला आहे. त्याचप्रमाणें ' शोकमोहादिदोषाविष्टचेतसां ' ह्या पदांतील आदिशब्दानें–मिथ्याभिमान,स्नेह, निंदा इत्यादिकांचें ग्रहण होतें असें ते ह्मणतात. ' वाङ्मनःकायादीनां ' ह्या समस्तपदांतील आदिशब्दाचा अर्थ–वाणी आणि मन ह्यांवांचून इतर इंद्रियें–असा त्यांनीं केला आहे. मी कर्ता, मी भोक्ता अशाप्रकारचा जो अभिमान तो अहंकार. विवेकचूडामणीमध्यें आचार्यांनीं अहंकाराची व्याख्या विशेष स्पष्टरीतीनें केली आहे ती अशीः–अन्तःकरणमेतेषु चक्षुरादिषु वर्ष्मणि । अहमित्यभिमानेन तिष्ठत्याभासतेजसा ॥ अहंकारः स विज्ञेयः कर्ता भोक्ताभिमान्ययम् । सत्त्वादिगुणयोगेन चावस्थात्रयमश्नुते ॥ विषयाणामानुकूल्ये सुखी दुःखी विपर्यये । सुखं दुःखं च तद्धर्मः सदानन्दस्य नात्मनः ॥ अर्थः— चिदाभासाच्या तेजानें ह्या चक्षुरादि इंद्रियांचे ठिकाणीं ' मी ' अशा अभिमानाचा अवलंब करून असलेली जी अंतःकरणाची वृत्ति तोच कर्ता, भोक्ता इत्यादि प्रकारचा अभिमान बाळगणारा अहंकार समजावा.

**तत्र केचिदाहुः सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञाननिष्ठामात्रा-देव केवलात्कैवल्यं न प्राप्यत एव किं तर्ह्यग्निहोत्रादिश्रौतस्मा-र्तकर्मसहिताज्ज्ञानात्कैवल्यप्राप्तिरिति सर्वासु गीतासु निश्चि-तोर्थ इति। ज्ञापकं चाहुरस्यार्थस्याथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं**

---

ह्या अहंकाराला सत्त्व, रज व तम ह्या गुणांच्या योगानें तीन अवस्था प्राप्त होतात. विषयांची अनुकूलता असल्यास हा सुखी असतो व प्रतिकूलता असल्यास दुःखी असतो आणि ह्मणूनच सुख व दुःख हे त्या अहंकाराचे धर्म आहेत; सदानंदस्वरूप आत्म्याचे नाहींत. —शुभ कर्मांच्या अनुष्ठानानें धर्मवृद्धि झाल्यानें इष्ट असा देवादि-कांचा जन्म प्राप्त होऊन त्यापासून सुख होणें; अशुभ कर्मांच्या आच-रणानें अधर्म वृद्धिंगत झाल्यानें अनिष्ट असा पशुपक्ष्यादिकांचा जन्म येऊन दुःख होणें आणि शुभाशुभांनीं मिश्र असलेल्या कर्मानुष्ठानानें धर्म व अधर्म ह्या दोहोंचीही वृद्धि झाल्यामुळें मनुष्यजन्म येऊन सुख व दुःख हीं दोन्हीं प्राप्त होणें अशा प्रकारचा संसार एकसारखा सुरूच राहतो—असें ‘ धर्माधर्मोपचयादिष्टानिष्टजन्मसुखदुःखादिप्राप्ति-लक्षणः संसारोनुपरतो भवति ’ ह्या भाष्याचें तात्पर्य होय. स्वध-र्मानुष्ठानानें चित्त शुद्धि झाली नसल्यामुळें अर्जुनाला ब्रह्मज्ञानाचा अधि-कार प्राप्त झाला नव्हता तेव्हां त्याला भगवानांनीं ब्रह्मज्ञानाचा उपदेश कसा केला अशी शंका गीतेवर येण्याचा संभव आहे तिचें निरसन कर-ण्याच्या उद्देशानें अर्जुनाचें निमित्त करून सर्व लोकांवर अनुग्रह करण्याक-रितां भगवानांनीं अर्जुनाला उपदेश केला असें भाष्यकारांनीं ह्मटलें. )

**भाष्य.** ह्याबद्दल कांहीं ( वृत्तिकार ) असें ह्मणतातः—सर्वकर्मसंन्या-सपूर्वक जी आत्मज्ञाननिष्ठा तिच्याच योगानें केवळ मोक्षप्राप्ति होत नाहीं; तर अग्निहोत्रादि श्रौतस्मार्तकर्मांसह ज्ञानाच्या योगानें मोक्षप्राप्ति होते असा सर्वगीतेमध्यें सिद्धांत आहे. ह्या आपल्या सिद्धांताला ते (वृत्तिकार )

**न करिष्यसि कर्मण्येवाधिकारस्ते कुरु कर्मैव तस्मात्त्वमित्यादि । हिंसादियुक्तत्वाद्वैदिकं कर्माधर्मायेतीयमप्याशङ्का न कार्या कथं क्षात्रं कर्म युद्धलक्षणं गुरुभ्रातृपुत्रादिहिंसालक्षणमत्यन्तं क्रूरमपि स्वधर्म इति कृत्वा नाधर्माय तदकरणे च ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसीति ब्रुवता यावज्जीवादिश्रुतिचोदितानां पश्वादिहिंसालक्षणानां च कर्मणां प्रागेव नाधर्मत्वमिति सुनिश्चितमुक्तं भवतीति ॥**

---

'अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि' ( ह्मणजे धर्माला अनुसरून असलेलें हें युद्ध जर तूं न करशील ), 'कर्मण्येवाधिकारस्ते ( ह्मणजे कर्माचेच ठिकाणीं तुझा अधिकार आहे )', 'कुरु कर्मैव तस्मात्त्वम् ( ह्मणजे तस्मात्, तूं कर्मच कर )' इत्यादि आधारही ज्ञापक ह्मणून देत असतात. हिंसादिकांनीं युक्त असल्यामुळें वैदिक कर्म धर्मविरुद्ध होय ( अशी जर शंका कोणीं केली तर ते वृत्तिकार ह्मणतात ) अशीही शंका करणें योग्य नाहीं. कारण, गुरु, भ्राते, पुत्र इत्यादिकांची हिंसा असें जरी युद्धरूप क्षात्र कर्माचें स्वरूप आहे तरी तें कर्म स्वधर्म असल्यामुळें धर्मविरुद्ध नाहीं असें—'युद्ध हा क्षत्रियाचा स्वधर्म आहे. तेव्हां त्याच्याकडे पाहूनही तुला युद्धापासून परावृत्त होणें योग्य नाहीं. कारण, धर्म्य अशा युद्धाहून क्षत्रियाला दुसरी कोणतीही गोष्ट कल्याणकारक नाहीं'—अशा आशयाच्या "स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि। धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोन्यत्क्षत्रियस्य न विद्यते" ह्या श्लोकानें सांगून "ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ( ह्मणजे तें स्वधर्मरूप युद्ध न करशील तर स्वधर्माला व कीर्तीला मुकावें लागून तुला आणखी पापही लागेल )" असें सांगणाऱ्या भगवान् श्रीकृष्णांनीं 'यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात् ( ह्मणजे आजन्म अग्निहोत्र कर्म करावें )' अशाप्रकारच्या श्रुतींनीं विहित असलेल्या कर्मांचें व पश्वादिहिंसारूप कर्मांचें

तदसत्। ज्ञानकर्मनिष्ठयोर्विभागवचनाद्बुद्धिद्वयाश्रययोरशोच्यानित्यादिना ग्रन्थेन भगवता यावत्स्वधर्ममपि चावेक्ष्येत्येतदन्तेन ग्रन्थेन यत्परमार्थात्मतत्त्वनिरूपणं कृतं तत्साङ्ख्यं तद्विषया बुद्धिरात्मनो जन्मादिषड्विक्रियाभावादकर्तात्मेति प्रकरणार्थनिरूपणाद्या जायते सा साङ्ख्या बुद्धिः सा येषां ज्ञानिनामुचिता भवति ते साङ्ख्याः। एतस्या बुद्धेर्जन्मनः प्रागात्मनो देहादिव्यतिरिक्तस्य कर्तृत्वभोक्तृत्वाद्यपेक्षो धर्माधर्मविवेकपूर्वको मोक्षसाधनानुष्ठाननिरूपणलक्षणो योगस्तद्विषया बुद्धिर्योगे बुद्धिः सा

---

अधर्मत्व तर अगदीं निश्चयपूर्वक सांगितल्याचें स्पष्ट होत आहे. ( तस्मात् ज्ञान व कर्म ह्या दोहोंमुळें मोक्षप्राप्ति होत असल्याचें सिद्ध आहे. )

हें ( वृत्तिकारांचें ) ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, सांख्यबुद्धीच्या आश्रयानें असलेली ज्ञाननिष्ठा व योगबुद्धीच्या आश्रयानें असलेली कर्मनिष्ठा ह्या दोन्ही वेगवेगळ्या सांगितल्या आहेत. “ अशोच्यान् ” इत्यादि ह्मणजे ( शोचनीय होण्यास अयोग्य इत्यादि ) ग्रंथापासून “ स्वधर्ममपि चावेक्ष्य ( ह्मणजे स्वधर्माकडेही पाहून ) ह्या ग्रंथापर्यंत जें परमार्थतः आत्मतत्वनिरूपण केलें आहे तें सांख्य होय. (“ नजायते म्रियते वा कदाचित् ” इत्यादि ) प्रकरणांतील अर्थाच्या निरूपणावरून—जन्मादि सहा विकार आत्म्याला नसल्यामुळें आत्म्याकडे कसलेंही कर्तृत्व नाहीं—अशी जी तद्विषयक बुद्धि उत्पन्न होते तिला सांख्याविषयक ( ह्मणजे परमार्थवस्तुविवेकाविषयक ) बुद्धि ह्मणतात व ही बुद्धि ज्या ज्ञानी जनांना आनंददायक होते त्यांना सांख्य ( ह्मणजे परमार्थवस्तु जें ब्रह्म त्याचा विचार करणारे ) असें ह्मणतात. ही बुद्धि उत्पन्न होण्यापूर्वी देहादिव्यतिरिक्त जो आत्मा त्याचे ठिकाणीं कर्तृत्व, भोक्तृत्व आहे असें मानून धर्माधर्मविवेचनपूर्वक जें मोक्षाला साधनीभूत अशा धर्मानुष्ठानाचें निरूपण ‘ स्वधर्ममपि चावेक्ष्य ’ येथपासून पुढें केलें आहे

येषां कर्मिणामुचिता भवति ते योगिनः । तथा च भगवता विभक्ते द्वे बुद्धी निर्दिष्टे एषा तेभिहिता साङ्ख्ये बुद्धियोंगे त्विमां शृण्विति। तयोश्च साङ्ख्यबुद्ध्याश्रयां ज्ञानयोगेन निष्ठां साङ्ख्यानां विभक्तां वक्ष्यति पुरा वेदात्मना मया प्रोक्तेति ।तथा च योगबुद्ध्याश्रयां कर्मयोगेन निष्ठां विभक्तां वक्ष्यति कर्मयोगेन योगिनामिति । एवं साङ्ख्यबुद्धिं योगबुद्धिं चाश्रित्य द्वे निष्ठे विभक्ते भगवतैवोक्ते ज्ञानकर्मणोः कर्तृत्वाकर्तृत्वैकत्वानेकत्वबुद्ध्याश्रययोरेकपुरुषाश्रयत्वासंभवं पश्यता । यथैतद्विभागवचनं तथैव दर्शितं शातपथीये ब्राह्मणे ।एतमेव

---

तो योग होय व तद्विषयक जी बुद्धि ती योगविषयक बुद्धि ( ह्मणजे कर्मानुष्ठानविषयक ज्ञान ) होय. ही बुद्धि ज्या कर्मठ लोकांना आनंददायक होते ते योगी होत. " एषा तेभिहिता सांख्ये बुद्धियोंगे त्विमां शृणु ( ह्मणजे तुला ही सांख्यविषयक बुद्धि सांगितली; आतां ही योगविषयक श्रवण कर ) " ह्मणून भगवानांनींच दोन बुद्धि वेगळ्या सांगितल्या आहेत. ' मीं वेदरूप सर्वज्ञ ईश्वरानें पूर्वीं दोनप्रकारची निष्ठा[1] सांगितली आहे ' ह्मणून पुढें भगवानच त्या दोन निष्ठांपैकीं सांख्यबुद्धीच्या आश्रयाला असलेली ज्ञानरूप योगानें ज्ञानीजनांची निष्ठा वेगळी सांगतील व त्याचप्रमाणें योगबुद्धीचें अवलंबन करून असलेली कर्मठांची निष्ठा " कर्मयोगेन योगिनाम् " ह्मणून वेगळी सांगतील. कर्माला कर्तृत्व, अनेकत्व इत्यादिकांची अपेक्षा असून ज्ञानाला अकर्तृत्व, एकत्व इत्यादिकांची अपेक्षा असल्यामुळें ज्ञान व कर्म हीं दोन्ही एका पुरुषाच्या आश्रयाला असण्याचा संभव नाहीं असें समजून वर दर्शविल्याप्रमाणें प्रत्यक्ष भगवानांनींच सांख्यबुद्धि व योगबुद्धि ह्यांचें अवलंबन करून असलेल्या दोन निष्ठा वेगळ्या वेगळ्या सांगितल्या आहेत. हा

---

१ निष्ठाशब्दाचा अर्थ " स्थिति " असा भाष्यकारांनीं पुढें केला आहे.

**प्रव्राजिनो लोकमिच्छन्तो ब्राह्मणाः प्रव्रजन्तीति सर्वकर्मसंन्यासं विधाय तच्छेषेण किं प्रजया करिष्यामो येषां नोयमात्मायं लोक इति । तत्रैव च प्राग्दारपरिग्रहात्पुरुष आत्मा प्राकृतो धर्मजिज्ञासोत्तरकालं लोकत्रयसाधनं पुत्रं द्विप्रकारं च वित्तं मानुषं दैवं च तत्र मानुषं वित्तं कर्मरूपं पितृलोकप्राप्तिसाधनं विद्यां च दैवं वित्तं देवलोकप्राप्तिसाधनं सोकामयतेत्यविद्याकामवत एव कर्माणि श्रौतादीनि दर्शितानि तेभ्यो व्युत्थाय प्रव्रजन्तीति व्युत्थानमात्मानमेव**

---

विभाग गीतेमध्यें ज्या प्रमाणें सांगितला आहे त्याचप्रमाणें शतपथ ब्राह्मणामध्यें दर्शविला आहेः—" एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तो ब्राह्मणाः प्रव्रजन्ति ( ह्मणजे ह्याच स्वात्मरूप लोकाची प्राप्ति करून घेण्याकरितां अत्यंत वैराग्यशाली ब्राह्मणांनीं सर्व कर्मापासून निवृत्त व्हावेंच ) " ह्मणून सर्व कर्मांचा संन्यास करण्याविषयीं विधि सांगून " किं प्रजया करिष्यामो येषां नोयमात्मायं लोकः ( ह्मणजे ज्ञान झालें असल्यामुळें ज्यांना आत्मव्यतिरिक्त बाह्य लोक नाहीं त्या आह्मांला प्रजेनें काय फल प्राप्त करून घेणें आहे ? )" हा जो त्या विधीचा अर्थवाद त्याच्या योगानें मोक्ष हेंच ज्ञानाचें फल सांगितलें आहे आणि त्या शतपथ ब्राह्मणामध्येंच धर्मजिज्ञासा झाल्यानंतर व भार्येचा परिग्रह करण्यापूर्वीं आत्मा ह्मणजे जो अज्ञानी पुरुष त्याला तीन लोक प्राप्त होण्याचें साधन जें अपत्य व दोन प्रकारचें वित्त त्यांची इच्छा झाली असें श्रुत आहे. मानुष्य आणि दैव हें दोन प्रकारचें वित्त होय. पैकीं पितृलोकाच्या प्राप्तीला साधन जें कर्मरूप वित्त तें मानुष्य वित्त होय व देवलोकाच्या प्राप्तीला साधन जें विद्यारूप वित्त तें दैव वित्त होय. तात्पर्य, " सोकामयत ( ह्मणजे त्याला इच्छा झाली ) " इत्यादि शतपथश्रुतीमध्यें अज्ञानी आणि सकाम पुरुषालाच सर्व श्रौतादि कर्में विहित असल्याचें दर्शविलें असून

लोकमिच्छतोकामस्य विहितम् । तदेतद्विभागवचनमनुपपन्नं स्याद्यदि श्रौतकर्मज्ञानयोः समुच्चयोभिप्रेतः स्यात् ॥

न चार्जुनस्य प्रश्न उपपन्नो भवति ज्यायसी चेत्कर्मणस्त इत्यादिः। एकपुरुषानुष्ठेयत्वासंभवं बुद्धिकर्मणोर्भगवता पूर्वम-

---

'तिन्ही लोकांची व ते लोक प्राप्त होण्यास उपयोगीं पडणाऱ्या साधनांची आशा सोडून सर्व कर्मांपासून निवृत्त व्हावें" अशा आशयाच्या श्रुतीनें व्युत्थानविधि तरी स्वात्मरूप लोकाचीच इच्छा करणाऱ्या निष्काम पुरुषाविषयीं सांगितला आहे. तस्मात्, श्रौत कर्म आणि ज्ञान ह्यांचा समुच्चय जर इष्ट असेल तर हा विभाग सांगितलेला जुळत नाहीं.

शिवाय, "ज्यायसी चेत्कर्मणस्ते इत्यादि (ह्मणजे कर्मापेक्षां जर ज्ञान श्रेष्ठ असल्याचें तुला अभिमत आहे तर वगैरे) अर्जुनाचा प्रश्नही योग्य होत नाहीं. (कारण, कर्म व ज्ञान ह्या दोहोंच्या योगानें मिळून मुक्ति होते असें जर भगवानांना विवक्षित असेल तर ज्ञानमार्ग व कर्ममार्ग ह्या दोन्ही मार्गांचें आचरण एकाच पुरुषानें करण्याविषयीं त्यांनीं अर्जुनाला सांगितलें असलें पाहिजे व अर्जुनानेंही तसेंच ऐकिलें असलें पाहिजे हें उघड आहे. परंतु, असें जर मानिलें तर अर्जुनाला वरील प्रमाणें प्रश्न करण्याचें कारण उरतच नाहीं. कारण, एकाच पुरुषाच्या हातून दोन्ही मार्गांचें आचरण होण्याचा संभव नाहीं. असो. ज्ञानमार्ग व कर्ममार्ग ह्या दोहोंचें आचरण एकाच पुरुषाकडून होण्याचा संभव आहे अशाप्रकारें अर्जुनाला भगवान् श्रीकृष्णांच्या सांगण्याचा बोध झाला असल्यावांचून वर दर्शविल्याप्रमाणें प्रश्न करण्याचें त्याच्या मनांत येणें शक्य नाहीं) तेव्हां ज्ञानमार्ग व कर्ममार्ग ह्या दोहोंचें अनुष्ठान एका पुरुषाचे हातून होण्याचा संभव नाहीं असें

---

१ मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक ह्यांच्या प्राप्तीचीं–पुत्र, मानुष्य वित्त व दैव वित्त हीं–जीं साधनें त्यांविषयीं निरिच्छ होणें ह्याला व्युत्थान असें ह्मणतात.

**नुक्तं कथमर्जुनोऽश्रुतं बुद्धेश्च कर्मणो ज्यायस्त्वं भगवत्यध्यारोपयेन्मृषैव ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिरिति । किं च यदि बुद्धिकर्मणोः सर्वेषां समुच्चय उक्तः स्यादर्जुनस्यापि**

---

भगवानांनीं पूर्वीं सांगितलें नसतांना व अर्जुनानेंही तें वास्तविक ऐकिलें नसतांना तें त्यांनीं सांगितलें ह्मणून तो खोटेंच त्यांच्यावर कसें लादील? (तें सांगितल्याचा आरोप भगवानांवर केल्यावांचून " तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि—ह्मणजे हें युद्धरूप अतिक्रूर कर्म करण्याविषयीं तूं मला कां आग्रह करीत आहेस ?—" अशा अर्थाचा प्रश्न अर्जुनाकडून भगवानांना होणें शक्यच नाहीं. सारांश, प्रश्नाचें पर्यालोचन केलें असतां वक्ता व पृच्छक ह्या उभयतांनाही ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय मुक्तीकरितां अभिमत असल्याचें दिसत नाहीं ). दुसरें असें कीं ( ज्ञान व कर्म ह्या दोहोंच्या योगानें मिळून मुक्ति होते असें जर भगवानांना इष्ट असेल तर योग्यता दोहोंची सारखीच असली पाहिजे हें उघड आहे. कारण, समुच्चयाची मुक्तीला अवश्यकता मानिल्यावर कर्मापेक्षां ज्ञानाची अगर ज्ञानापेक्षां कर्माची योग्यता जास्त असणें संभवणार कोठून ? ज्ञान व कर्म ह्या दोहोंपैकीं कोणतेंहीं एक मोक्षप्राप्तीला निरुपयोगींच ठरणार. तेव्हां मोक्ष प्राप्त होण्यास ज्ञान व कर्म ह्या उभयतांचा समुच्चय अवश्यक आहे असें जर भगवानांचें मत असल्याचें गृहीत धरिलें तर ) " ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिः ( ह्मणजे कर्मापेक्षां जर तुझ्या मतानें ज्ञानश्रेष्ठ आहे ) " असें ह्मणून अर्जुन तरी कर्मापेक्षां ज्ञानाचें श्रेष्ठत्व सांगितल्याबद्दल भगवान् श्रीकृष्णांवर खोटाच आरोप कसा करील ? आणखी असें कीं मोक्ष प्राप्त होण्यास भगवानांनीं ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय जर सर्वांनाच अवश्यक सांगितला असेल तर सर्वांबरोबर तो अर्जुनालाही अवश्यक सांगितला असलाच पाहिजे ( ह्मणजे ज्ञान व कर्म हीं दोन्ही मोक्ष-

स उक्त एवेति यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितमिति कथमुभयोपदेशे सत्यन्यतरविषय एव प्रश्नः स्यात् । नहि पित्त-प्रशमनार्थिनो वैद्यन मधुरं शीतं च भोक्तव्यमित्युपदिष्टे

---

प्रातीला अवश्यक असल्याचें भगवानांनीं त्याला सांगितलेंच असलें पाहिजे.) तेव्हां दोन्हीं अवश्यक सांगितलीं असतांना अर्जुन तरी " यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ( ह्मणजे कर्म व कर्मत्याग ह्यांपैकीं अधिक श्रेयस्कर कोणतें तें एक मला निश्चयपूर्वक सांग-) " अशा प्रकारानें दोहोंपैकीं कोणत्या तरी एकाबद्दलच कां ह्मणून प्रश्न करील ? ( आतां " कर्मापेक्षां कर्मत्यागपूर्वक ज्ञानाचें महत्त्व जास्त असल्यामुळें तें अधिक श्रेयस्कर आहे आणि ह्मणूनच त्याच्या संबंधानें प्रश्न करणें योग्य आहे " असें ह्मणावें तर तेंही जुळत नाहीं ) कारण, पित्तशमन

---

१ " पित्तस्य सर्पिषः पानं स्वादुशीतैर्विरेचनम् । स्वादुतिक्तकषायाणि भोजनान्यौषधानि च ॥ सुगन्धशीतहृद्यानां गन्धानामुपसेवनम् । कण्ठे गुणानां हाराणां मणीनामुरसा धृतिः ॥ कर्पूरचन्दनोशीरैरनुलेपः क्षणे क्षणे । प्रदोषश्चन्द्रमाः सौधं हारि गीतं हिमोनिलः ॥ अयन्त्रणसुखं मित्रं पुत्रः संदिग्धमुग्धवाक् । छन्दानुवर्तिनो दारा : प्रियाः शीलविभूषिताः ॥ शीताम्बुधारागर्भाणि गृहाण्युद्यानदीर्घिकाः । सुतीर्थविपुलस्वच्छसलिलाशयसैकते ॥ साम्भोजजलतीरान्ते कायमाने द्रुमाकुले । सौम्या भावाः पयः सर्पिर्विरेकश्च विशेषतः ॥ " ह्याप्रमाणें पित्ताचा उपक्रम दोषोपक्रमणीय अध्यायांत सांगितलेला आहे. त्याचें पर्यालोचन केलें असतां पित्तशमनाला शीत व मधुर पदार्थांची अवश्यकता असल्याचें सिद्ध होतें आणि ह्मणूनच आचार्यांनीं तसा निर्देश केलेला आहे. साधारण लोकांकरितां वेदांत-विषयाची वाटाघाट चालली असतांना हें उदाहरण सहज आलेलें आहे ह्यावरून वैद्यशास्त्रांतील मुख्य मुख्य गोष्टी सामान्य जनांस पूर्वी अवगत असाव्यात असें अनुमान होतें व वृद्ध वृद्ध स्त्रीपुरुषांना साधारण रोगावरील औषधें माहित असल्याचें आपल्या दृष्टोत्पत्तीसही येतें. सध्यां मात्र अत्यंत उपयोगी अशा वैद्यशास्त्रापैकीं यत्किंचितूही विद्यार्थ्यांस अवगत असण्याची जरूर अध्यापक वर्गास वाटत नसून अमेरिकेंतील नद्यांची वगैरे नांवनिशी प्रत्येक विद्यार्थ्यास गायत्री-तुल्य येण्याची अवश्यकता वाटूं लागली आहे !

तयोरन्यतरात्पित्तप्रशमनकारणं ब्रूहीति प्रश्नो भवति । अथार्जुनस्य भगवदुक्तवचनार्थविवेकानवधारणनिमित्तः प्रश्नः कल्प्येत तथापि भगवता प्रश्नानुरूपं प्रतिवचनं देयं मया बुद्धिकर्मणोः समुच्चय उक्तः किमर्थमित्थं भ्रान्तोसीति । न तु पुनः प्रतिवचनमननुरूपं पृष्टादन्यदेव द्वे निष्ठे मया पुरा प्रोक्ते इति वक्तुं युक्तम् ॥ नापि स्मार्तेनैव कर्मणा

---

होण्याची इच्छा असणाऱ्या रोग्याला " मधुर आणि थंड हे दोन्ही पदार्थ सेवन करीत जा " असें वैद्यानें सांगितलें असतांना " मधुर व थंड ह्यांपैकीं पित्त शमन करणारें कोणतें? " असा प्रश्न रोग्याकडून वैद्याला होत नसतो. ( तात्पर्य, मोक्षप्राप्तीला ज्ञान व कर्म हीं दोन्हीं जर भगवान् श्रीकृष्णांनीं अवश्यक सांगितलीं असतीं तर त्या दोहोंपैकीं एकालाच उद्देशून अर्जुनाकडून प्रश्न झाला नसता हें निर्विवाद आहे ). आतां, भगवानांनीं केलेल्या भाषणाचा अर्थबोध अर्जुनाला झाला नसल्यामुळें त्यानें गैरसमजानें भलता प्रश्न केला अशी जरी कल्पना केली तरी भगवानांना ( भ्रांति नसल्यानें पुढचें मागचें अनुसंधान राहण्याचा संभव असल्यामुळें ) " मी ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय सांगितला आहे; तेव्हां तूं कां असा भ्रांतिग्रस्त झाला आहेस ? " ह्मणून त्याच्या प्रश्नाला अनुरूप असेंच प्रतिवचन ( त्यांनीं ) देणें योग्य आहे. ( पण समुच्चय त्यांना अभिमत असून त्यांनीं अर्जुनालाही तोच सांगितला होता असें जर मानिलें तर त्याच्या प्रश्नाला अनुरूप असें वर दाखविल्याप्रमाणें त्यांनीं प्रत्युत्तर दिल्याचें दिसत नाहीं आणि ) " पूर्वीं मीं दोन निष्ठा सांगितल्या " ह्मणून जें त्यांनीं अर्जुनाच्या प्रश्नाला प्रत्युत्तर दिलें आहे तेंही विचारिलेल्याहून दुसरें भलतेंच दिलें असें ह्मणणें योग्य नाहीं. ( बरें, श्रौतकर्मांशीं ज्ञानाचा समुच्चय असणें इष्ट नसून ) स्मार्तकर्मांशीं ज्ञानाचा समुच्चय असणें अवश्यक आहे असें भगवानांना अभिमत

बुद्धिसमुच्चयेऽभिप्रेते विभागवचनादि सर्वमुपपन्नम् । किं च क्षत्रियस्य युद्धं स्मार्तं स्वधर्ममभिजानतस्तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसीत्युपालम्भोऽनुपपन्नः । तस्माद्गीताशास्त्र ईषन्मात्रेणापि श्रौतेन स्मार्तेन वा कर्मणात्मज्ञानस्य समुच्चयो न केनचिद्दर्शयितुं शक्यः । यस्य त्वज्ञानाद्रागादिदोषतो वा कर्मणि प्रवृत्तस्य यज्ञेन दानेन तपसा वा विशुद्धसत्त्वस्य ज्ञानमुत्पन्नं परमार्थतत्त्वविषयमेकमेवेदं सर्वं ब्रह्माकर्तृ चेति तस्य कर्मणि कर्मप्रयोजने च निवृत्तेऽपि लोकसंग्रहार्थं यत्न-पूर्वं यथा प्रवृत्तस्तथैव प्रवृत्तस्य कर्मणि यत्प्रवृत्तिरूपं दृश्यते न

---

असल्याचें धरून चाललें तरी देखील त्यांनीं निष्ठांविषयीं सांगितलेला विभाग वगैरे सर्व जुळत नाहीं. दुसरें असें कीं, क्षत्रियाला युद्ध हें स्मृतिविहित असल्यामुळें तो स्वधर्म आहे असें जाणणाऱ्या अर्जुनाकडून “ तर ह्या युद्धरूप घोरकर्मामध्यें मला कां प्रवृत्त करीत आहेस ? ” अशा प्रकारचा प्रश्न होणें संभवत नाहीं. तस्मात्, अंशतः देखील श्रुतिविहित अथवा स्मृतिविहित कर्माशीं आत्मज्ञानाचा समुच्चय गीताशा-स्त्रामध्यें सांगितला असल्याचें कोणालाही दाखवितां येणें शक्य नाहीं. रागादि दोषांनीं व्याप्त झाल्यामुळें अज्ञानानें कर्मामध्यें जो प्रवृत्त झाला असेल त्याचे ठिकाणीं त्या अवस्थेंत ज्ञानाचा अभाव असल्यामुळें कर्म व ज्ञान ह्यांचा समुच्चय संभवतच नाहीं हें उघड आहे. आतां यज्ञ, दान आणि तप ह्यांच्या योगानें अंतःकरणशुद्धि होऊन “ हें सर्व कर्तृत्वादिधर्मांनीं अलिप्त असें एक ब्रह्मच आहे ” अशा प्रकारचें परमार्थतत्त्वविषयक ज्ञान ज्याला उत्पन्न झालें असेल आणि ह्मणूनच कर्म व कर्माचें प्रयोजन हीं दोन्हीं निवृत्त झालीं असतांही लोकसंग्रहाक-रितां यत्नपूर्वक पूर्वीप्रमाणेंच ज्याची कर्ममार्गाकडे प्रवृत्ति असल्यासारिखें दिसत असेल त्याचें तें मुळीं कर्मच नव्हे आणि ह्मणूनच फक्त बाह्यव्या-

**तत्कर्म येन बुद्धेः समुच्चयः स्याद्यथा भगवतो वासुदेवस्य क्षात्रधर्मे चेष्टितं न ज्ञानेन समुच्चीयते पुरुषार्थसिद्धये तद्वत्फलाभिसन्ध्यहंकाराभावस्य तुल्यत्वाद्विदुषस्तत्त्वविन्नु नाहं करोमीति मन्यते न च तत्फलमभिसंधत्ते यथा च स्वर्गादिकामार्थिनोऽग्निहोत्रादिकामसाधनानुष्ठानायाहिताग्नेः काम्य एवाग्निहोत्रादौ प्रवृत्तस्य सामिकृते विनष्टेऽपि कामे तदेवाग्निहोत्राद्यनुतिष्ठ-**

पाररूप असलेल्या त्या कर्माभासाचा ज्ञानाशीं समुच्चयही मोक्षप्राप्त्यर्थ संभवत नाहीं. भगवान् वासुदेवांचें क्षात्रधर्मविषयक चेष्टित ज्याप्रमाणें पुरुषार्थप्राप्तीकरितां ज्ञानाशीं समुच्चित होण्याचा संभव नाहीं ( ह्मणजे ज्ञानी अशा भगवान् वासुदेवांनीं मोक्षसिद्धीकरितां क्षात्रधर्मविषयक युद्ध कर्म वगैरे केलें असल्याचें ज्याप्रमाणें संभवत नाहीं ) त्याचप्रमाणें फलेच्छा व अहंकार ह्या दोहोंचा अभाव भगवानांप्रमाणें ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं सारखाच असल्यामुळें त्यानें लोकसंग्रहार्थ केलेला बाह्यव्यापाररूप कर्माभास मोक्षप्राप्त्यर्थ केला असें होत नाहीं. कारण, तत्ववेत्ता पुरुष " मी करितों " असें मानीतही नाहीं व त्या कर्मफलाची इच्छाही करीत नाहीं. आतां ( " ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वीं पुरुषाची जी पहिली अज्ञानावस्था होती व त्या अवस्थेमध्यें त्याची ज्याप्रमाणें कर्माकडे एकसारखी प्रवृत्ति होती त्याचप्रमाणें ज्ञान उत्पन्न झाल्यानंतरच्याही अवस्थेमध्यें कर्माचे ठिकाणीं त्याची प्रवृत्ति दिसत असल्यामुळें तत्त्ववेत्त्या पुरुषाच्या प्रवृत्तीचें आभासत्व कसें ? " ह्मणून जर कोणी शंका करील तर तीही बरोबर नाहीं. कारण, ) स्वर्गप्राप्त्यादि कामना सिद्धीस जाण्याच्या उद्देशानें एकादा पुरुष प्रथम त्या कामना सिद्धीस जाण्यास उपयोगीं पडणाऱ्या अग्निहोत्रादि साधनांचें अनुष्ठान करण्याकरितां आधान घेतो आणि काम्य अशाच अग्निहोत्रादि कर्मांचे ठिकाणीं प्रवृत्त झालेला असतो. परंतु, तें काम्य कर्म अर्धवट झालें असतांनाच कांहीं कारणामुळें

तोपि न तत्काम्यमग्निहोत्रादि भवति तथा दर्शयति च भगवा-न्कुर्वन्नपि न करोति न लिप्यत इति तत्र तत्र । यच्च पूर्वैः पूर्वतरं कृतं कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादय इति तत्र तत्र प्रविभज्य विज्ञेयं तत्कथं यदि तावत्पूर्वे जनकादय-स्तत्त्वविदोपि प्रवृत्तकर्माणः स्युस्ते लोकसंग्रहार्थं गुणा

---

त्याची कामना नष्ट होते आणि ह्मणून त्याच अग्निहोत्रादि कर्माचें अनुष्ठान त्यानें पुढें चालू ठेविलें असतांनाही तें त्याचें अग्निहोत्रादि कर्म काम्य होत नाहीं. ( त्याचप्रमाणें तत्त्ववेत्त्याला विधीनें कर्माचा अधिकार संभवत नसल्यामुळें लोकसंग्रहार्थ त्याच्या वागादि इंद्रियांची जी कर्माकडे प्रवृत्ति असल्यासारखें दिसतें तें कर्म नसून कर्माभास होय. विद्वान लोकांच्या कर्माकडे असलेल्या प्रवृत्ति कर्माभासरूप अस-ल्याबद्दल भगवानांनाही अभिमत आहे. कारण ) " कुर्वन्नपि न करोति न लिप्यते ( ह्मणजे कर्म करीत असतांनाही करीत नाहीं व लिप्त होत नाहीं ) " असें ठिकठिकाणीं भगवान् दर्शवीत आहेत. ( आतां " तत्त्व-वेत्त्या पुरुषाच्या व्यापाराविषयींही कर्मशब्दाचा प्रयोग असल्याचें दृष्टीं पडतें; तेव्हां त्याची ती हालचाल कर्माभास ठरत नाहीं आणि ह्मणूनच मोक्षप्राप्तीला ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय अवश्य असल्याचें सिद्ध आहे " अशी शंका कोणी केल्यास तीही अयोग्य ठरते. कारण, ) " पूर्वैः पूर्वतरं कृतम् ( ह्मणजे जनकप्रभृति पूर्वींच्या लोकांनीं त्यांच्याही पूर्वींपासून चालत आलेलें कर्म केलें आहे ) " " कर्मणैव हि संसिद्धिमा-स्थिता जनकादयः ( ह्मणजे कर्माच्याच योगानें जनकादिकांना संसिद्धि प्राप्त झाली ) " इत्यादि ठिकाणीं कर्मशब्दाचा प्रयोग आढळतो खरा; परंतु, त्याची व्यवस्था ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा ह्या विभागानें समजावी. तें कसें ह्मणून विचाराल तर ऐका.—पूर्वींचे जनकादिक तत्त्व-ज्ञानी असूनही कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त झाले होते—असें ह्मणत असाल

**गुणेषु वर्तन्त इति ज्ञानेनैव संसिद्धिमास्थिताः कर्मसंन्यासे प्राप्तेपि कर्मणा सहैव संसिद्धिमास्थिता न कर्मसंन्यासं कृतवन्त इत्यर्थः । अथ न ते तत्त्वविद ईश्वरे समर्पितेन कर्मणा साधनभूतेन संसिद्धिं सत्त्वशुद्धिं ज्ञानोत्पत्तिलक्षणां वा संसिद्धिमास्थिता जनकादय इति व्याख्येयमेतमेवार्थं वक्ष्यति भगवान्सत्त्वशुद्धये कर्म कुर्वन्तीति स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानव इत्युक्त्वा सिद्धिं प्राप्तस्य पुनर्ज्ञाननिष्ठां वक्ष्यति**

---

तर लोकसंग्रहार्थ कर्मामध्यें प्रवृत्त झालेले ते जनकादिक " गुणा गुणेषु वर्तन्ते ( ह्मणजे इंद्रियरूप गुणच विषयरूप गुणांचे ठिकाणीं प्रवृत्त होतात; आत्मा प्रवृत्त होत नाहीं ) " ह्या ज्ञानाच्याच योगानें सिद्ध झाले. सारांश , " कर्मत्यागाचा अधिकार प्राप्त झाला असूनही लोकसंग्रहाकरितां ते कर्मासहवर्तमानच मोक्षमार्गाला लागले; त्यांनीं कर्मांचा त्याग केला नाहीं " असा अर्थ (—कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः—ह्या वाक्याचा ) होतो. बरें, ते तत्त्ववेत्ते नव्हते असें ह्मणाल तर ईश्वरार्पण केलेल्या साधनरूप कर्मांच्या योगानें त्यांना संसिद्धि ह्मणजे अंतःकरणशुद्धि अगर ज्ञानोत्पत्तिरूप संसिद्धि प्राप्त झाली असा वरील वाक्याचा अर्थ करावा. हाच अर्थ " अंतःकरणशुद्धीकरितां कर्म करितात " असें(—योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये—ह्या वाक्यानें ) भगवान् पुढें दर्शवितील. ( आतां " स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः " ह्या वाक्यावरून कर्म हें प्रत्यक्ष मोक्षाला कारणीभूत होत असल्याचें दिसतें असें कोणी ह्मणेल तर तें बरोबर नाहीं. स्वकर्मानुष्ठानाच्या द्वारानें ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होते व ज्ञाननिष्ठेच्या योगानें मुक्ति होते असा सिद्धांत आहे. कारण ) " स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ( ह्मणजे स्वकर्मांच्या योगानें त्याचें आराधन करून मानवाला सिद्धि प्राप्त होते ) " असें सांगितल्यानंतर

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्मेत्यादिना ॥ तस्माद्गीतासु केवलादेव तत्त्वज्ञानान्मोक्षप्राप्तिर्न कर्मसमुच्चितादिति निश्चितोऽर्थः । यथा चायमर्थस्तथा प्रकरणशो विभज्य तत्र तत्र प्रदर्शयिष्यामः॥**

---

सिद्धि प्राप्त झालेल्या पुरुषाला ज्ञाननिष्ठा प्राप्त होत असल्याचें भगवानांनीं " सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म " इत्यादि श्लोकांनीं पुढें सांगितलें आहे. तस्मात् , केवल तत्त्वज्ञानानेंच मोक्षप्राप्ति होते; कर्मासहवर्तमान तत्त्वज्ञानानें होत नाहीं हाच अर्थ सर्व गीतेमध्यें निश्चित केला आहे. तो कसा निश्चित आहे तें आह्मी प्रकरणशः विभाग करून ठिकठिकाणीं दाखवूं.

बृहदारण्यकोपनिषदावरील भाष्यांत एके ठिकाणीं भगवान् आचार्यांनीं कर्मांनीं चित्तशुद्धि होते व ज्ञानानेंच मोक्षप्राप्ति होते ह्या सिद्धांताचें उत्तमरीतीनें स्पष्टीकरण केलें असल्यामुळें व गीताशास्त्रांतील प्रमेय समजण्यास त्याचा उपयोग फारच होणारा असल्यामुळें त्याठिकाणची श्रुति व त्या श्रुतीवरील हीं विस्तृतभाष्य मराठीतात्पर्यासह पुढें दिलीं आहेत.

**तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति**

---

किंज्योतिरयं पुरुष इत्येवमादिषष्ठप्रपाठकविहितायामेतस्यां ब्रह्मविद्यायामेवंफलायां काम्यैकदेशवर्जितं कृत्स्नं कर्मकाण्डं तादर्थ्येन विनियुज्यते । तत्कथमित्युच्यते तमेतमेवंभूतमौपनिषदं पुरुषं वेदानुवचनेन मन्त्रब्राह्मणाध्ययनेन नित्यस्वाध्यायलक्षणेन विविदिषन्ति वेदितुमिच्छन्ति । के । ब्राह्मणाः। ब्राह्मणग्रहणमुपलक्षणार्थम् । अविशिष्टो ह्यधिकारस्त्रयाणां वर्णानाम् । अथवा कर्मकाण्डेन मन्त्रब्राह्मणेन वेदानुवचनेन विविदिषन्ति । कथं विविदिषन्तीत्युच्यते यज्ञेनेत्यादि । ये पुनर्मन्त्रब्राह्मणलक्षणेन वेदानुवचनेन प्रकाश्यमानं विविदि-

---

" किंज्योतिरयं पुरुषः " अशाप्रकारच्या आरंभापासून सहाव्या अध्यायांत—वर दर्शविल्याप्रमाणें फलानें युक्त--अशी जी ही ब्रह्मविद्या विहित आहे तिच्यामध्यें काम्य भाग वर्ज करून सर्व कर्मकांडाचा विनियोग परंपरेनें ज्ञानोत्पत्तिशेष ह्मणून होतो. तें कसें हें पुढें सांगितलें आहे. उपनिषदांनीं प्रतिपाद्य असलेल्या त्या ह्या परमात्म्याला ब्राह्मणादि तीन वर्ण नित्यस्वाध्यायरूप मंत्रब्राह्मणाध्ययनानें जाणण्याची इच्छा करितात. वेदाध्ययनाचा अधिकार तिन्ही वर्णांना सारखाच असल्यामुळें ह्या श्रुतींतील ब्राह्मण हा शब्द उपलक्षण समजून त्याचा अर्थ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असा घ्यावा. वेदानुवचन ह्याचा अर्थ वर दर्शविल्याप्रमाणें करावा अथवा कर्मकांडात्मक मंत्रब्राह्मणरूप वेद असा करावा. वेदानुवचनानें कसें जाणण्याची इच्छा करितात असें ह्मणाल तर यज्ञादिकांनीं ह्मणून पुढें सांगितलें आहे. " वेदानुवचनेन विविदिषन्ति " ह्याचा अर्थ—मंत्रब्राह्मणरूप वेदानें प्रकाशित होणारा आत्मा जाणण्याची इच्छा करितात—असा जे समजतात त्यांच्या मतानें वेदानुवचनशब्दाचा

षन्तीति व्याचक्षते तेषामारण्यकमात्रमेव वेदानुवचनं स्यात्। न हि कर्मकाण्डेन पर आत्मा प्रकाश्यते तं त्वौपनिषदमिति विशेषश्रुतेः । वेदानुवचनेनेति चाविशेषितत्वात्समस्तग्राहीदं वचनम् । न च तदेकदेशोत्सर्गो युक्तः । ननु त्वत्पक्षेप्युपनिषद्वर्जमित्येकदेशत्वं स्यात् । नाद्यव्याख्यानेविरोधादस्मत्पक्षे नैष दोषो भवति । यदा वेदानुवचनशब्देन नित्यः स्वाध्यायो विधीयते तदोपनिषदपि गृहीतैवेति वेदानुवचनशब्दार्थैक-

---

अर्थ आरण्यकभाग येवढाच होतो. कारण, " तं त्वौपनिषदं " अशी विशेष श्रुति असल्यामुळें कर्मकांड परमात्म्याला प्रकाशित करीत नाहीं हें सिद्ध आहे. ( आतां वेदानुवचनशब्दाचा अर्थ फक्त उपनिषद्भाग असा केला तरी काय हरकत आहे? ह्मणून जर तें व्याख्यानकार ह्मणूं लागतील तर तसा अर्थ होत नाहीं. कारण " वेदोनूच्यते गुरूच्चारणानन्तरं पठ्यते " अशी व्युत्पत्ति असल्यामुळें त्या शब्दानें सर्व वेदाचें ग्रहण होण्याचा संभव असतांना त्यांतील कर्मकांडरूप भागाचा त्याग करणें योग्य नाहीं. सारांश, वेदानुवचनेन ह्या विशेष्याला औपनिषदेन वगैरे विशेषण नसल्यामुळे संपूर्ण वेदानें असा त्याचा अर्थ होतो. वेदांतील एका भागाचा त्याग होणें योग्य नाहीं. आतां "– कर्मकाण्डेन मन्त्रब्राह्मणेन वेदानुवचनेन–असें जें दुसरें व्याख्यान तुह्मी केलें आहे त्यावरही उपनिषद्वर्ज असा एकदेशत्वदोष येतच आहे " ह्मणून भर्तृप्रपंचमताभिमानी जर कोणी ह्मणेल तर त्याचें तें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण " वेदानुवचनेन मन्त्रब्राह्मणाध्ययनेन नित्यस्वाध्यायलक्षणेन " असें जें पहिलें व्याख्यान केलें आहे त्याला विरोध येत नसल्यामुळें आमच्या व्याख्यानाला हा एकदेशत्वदोष येत नाहीं. कारण " वेदानुवचनेन " ह्या शब्दानें नित्य स्वाध्यायाचें जेव्हा विधान केलें जातें तेव्हां उपनिषद्भागाचाही समावेश होतच असल्यामुळें

देशो न परित्यक्तो भवति । यज्ञादिसहपाठाच्च । यज्ञादीनि कर्माण्येवानुक्रमिष्यन्वेदानुवचनशब्दं प्रयुङ्क्ते । तस्मात्कर्मैव वेदानुवचनशब्देनोच्यत इति गम्यते । कर्म हि नित्यः स्वाध्यायः । कथं पुनर्नित्यस्वाध्यायादिभिः कर्मभिरात्मानं विविदिषन्ति नैव हि तान्यात्मानं प्रकाशयन्ति यथोपनिषदः । नैष दोषः । कर्मणां विशुद्धिहेतुत्वात् । कर्मभिः संस्कृता हि विशुद्धात्मानः शक्नुवन्त्यात्मानमुपनिषत्प्रकाशितमप्रतिबन्धेन वेदितुम् । तथा ह्याथर्वणे विशुद्धसत्त्वस्त-

---

वेदानुवचन ह्या शब्दाच्या अर्थापैकीं एका भागाचा परित्याग होत नाहीं. (—तर मग "कर्मकाण्डेन मन्त्रब्राह्मणेन" असें जें दुसरें व्याख्यान केलें आहे त्याची अवश्यकता नाहीं—अशी जर कोणी शंका करूं लागेल तर तीही बरोबर नाहीं. कारण,) यज्ञादिकांबरोबर वेदानुवचनेन असें पठित आहे. ह्मणजे यज्ञादिकर्मांचा निर्देश पुढें करण्याचा उद्देश धरूनच श्रुतीनें वेदानुवचनशब्द प्रथम योजिला आहे. तस्मात्, वेदानुवचनशब्दानें कर्माचाच निर्देश होतो असें ह्यावरून दिसतें. नित्य स्वाध्याय हें कर्मच असल्यामुळें पहिल्या व्याख्यानामध्यें वाक्यशेषाची उपपत्ति कशी करावी ही शंकाही रहात नाहीं. आतां—उपनिषदांप्रमाणें आत्म्याला कर्में प्रकाशित करीत नाहींत; तेव्हां नित्यस्वाध्यायादि कर्मांच्या योगानें ब्राह्मणादि तीन वर्ण आत्म्याला जाणण्याची इच्छा कशी करितात ?—ह्मणून जर कोणी ह्मणूं लागेल तर हा दोष ह्या ठिकाणीं येत नाहीं. कारण, कर्में अंतःकरणशुद्धीला कारणीभूत आहेत. कर्मांच्या योगानें स्वतः संस्कृत होऊन ज्यांची अंतःकरणशुद्धि झालेली असते ते पुरुष उपनिषद्भागानें प्रकाशित होणाऱ्या आत्म्याला—कांहींएक प्रतिबंध न येतां—जाणण्यास समर्थ होतात. कारण, " विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ( ह्मणजे नित्य

यज्ञेन दानेन तपसानाशकेनैतमेव विदित्वा

---

तस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमान इति । स्मृतिश्च ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मण इत्यादिः ।कथं पुनर्नित्यानि कर्माणि संस्कारार्थानीत्यवगम्यते स ह वा आत्मयाजी यो वेदेदं मेनेनाङ्गं संस्क्रियत इदं मेनेनाङ्गमुपधीयत इत्यादिश्रुतेः । सर्वेषु च स्मृतिशास्त्रेषु कर्माणि संस्कारार्थान्येवाचक्षतेऽष्टाचत्वारिंशत्संस्कारा इत्यादिषु । गीतासु च यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषा इति ॥ यज्ञेनेति । द्रव्ययज्ञा ज्ञानयज्ञाश्च संस्कारार्थाः संस्कृतस्य च विशुद्धसत्त्वस्य ज्ञानोत्पत्तिरप्रतिबन्धेन भविष्यत्यतो यज्ञेन विविदिषन्ति । दानेन दान-

---

कर्माच्या वगैरे अनुष्ठानानें अंतःकरण शुद्ध झाल्यावर अधिकारी पुरुष सर्वदा चिंतन करूं लागला असतां उपनिषदांच्या योगानें त्या परमात्म्याला अवलोकन करितों " असें आथर्वण श्रुतीमध्यें सांगितलें आहे आणि " ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः ( ह्मणजे पापकर्माचा क्षय झाल्यावर पुरुषाचें ठिकाणीं ज्ञान उत्पन्न होतें ) " असें स्मृतींतही ह्मटलें आहे. नित्य कर्मे सस्कारार्थ आहेत असें कशावरून ह्मणाल तर " स ह वा आत्मयाजी यो वेदेदं मेनेनाङ्गं संस्क्रियत इदं मेनेनाङ्गमुपधीयते " अशी श्रुति आहे व त्याचप्रमाणें " अष्टाचत्वारिंशत्संस्काराः " इत्यादि सर्व स्मृतिशास्त्रांमध्यें आणि " यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः" ह्या गीतावचनामध्येंही कर्मे हीं संस्कारार्थच असल्याचें सांगितलें आहे. द्रव्ययज्ञ व ज्ञानयज्ञ हे संस्काराकरितांच आहेत. ह्या यज्ञांनीं संस्कृत होऊन ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें असेल त्याचे ठिकाणीं दुसरा कांहीं प्रतिबंध न येतां ज्ञान उत्पन्न होतें ह्मणून " यज्ञेन विविदिषन्ति " असें

मपि पापक्षयहेतुत्वाद्धर्मवृद्धिहेतुत्वाच्च । तपसा तप इत्यविशेषेण कृच्छ्रचान्द्रायणादिप्राप्तौ विशेषणमनाशकेनेति । कामानशनमनाशकं न तु भोजननिवृत्तिः । भोजननिवृत्तौ म्रियत एव नात्मवेदनम् । वेदानुवचनयज्ञदानतपःशब्देन सर्वमेव नित्यं कर्मोपलक्ष्यते । एवं काम्यवर्जितं नित्यं कर्मजातं सर्वमात्मज्ञानोत्पत्तिद्वारेण मोक्षसाधनत्वं प्रतिपद्यते । एवं कर्मकाण्डेनास्यैकवाक्यतावगतिः । एवं

---

ह्मटलें आहे. दानानें सुद्धां पापाचा क्षय व पुण्याची वृद्धि होत असल्यामुळें आत्मज्ञानाची इच्छा उत्पन्न होण्यास तें कारणीभूत होतें. ह्मणून “ दानेन विविदिषन्ति ” असें ह्मटलें आहे. नुसत्या तपःशब्दानें कच्छ्र, चांद्रायण वगैरे असा अर्थ होऊं लागेल ह्मणून “ अनाशकेन ” हें विशेषण “ तपसा ” ह्या विशेष्याला योजिलें आहे. अनाशक ह्मणजे रागद्वेषरहित अशा इंद्रियांनीं विषयांचें सेवन—यदृच्छालाभसंतुष्टत्व. भोजननिवृति असा अनाशकशब्दाचा अर्थ नव्हे. कारण, भोजननिवृति झाली असतां मरणच येईल आत्मज्ञान होणार नाहीं. असो. “ तपसानाशकेन विविदिषन्ति ” ह्या शब्दांचा आशय यदृच्छेनें लब्ध होईल त्यावर संतुष्ट राहणें हें एक ज्ञानोत्पत्ति होण्याचें साधन होय—असा आहे. वेदानुवचन यज्ञ, दान व तप या शब्दांनीं सर्वच नित्य कर्म उपलक्षित होतें. याप्रमाणें काम्य कर्म खेरीज करून सर्व नित्य कर्मे आत्मज्ञानोत्पत्तिद्वारानें मोक्षप्राप्तीला कारणीभूत होतात व ह्याप्रकारें कर्म हें परंपरेनें मुक्तीला साधनीभूत होत असल्यामुळें कर्मकांड आणि ज्ञानकांड या दोहोंची एकवाक्यता सिद्ध होते. सारांश, पूर्वी सांगितलेल्या न्यायानें—

---

१ देशे काले च पात्रे च दानं श्रद्धादिपूर्वकम् । शुद्धिकृत्स्याद्धियः पुंसो बहिर्वेद्यपि शाश्वतः ॥ असें मंडनमिश्रांनीं ह्मटलें आहे. त्यावरून येथील दानशब्दाचा अर्थ पुण्य स्थलीं व पर्वकालीं श्रद्धेनें व भक्तीनें सत्पात्र पाहून केलेलें दान असा होतो.

यथोक्तेन न्यायेनैतमेवात्मानं विदित्वा यथाप्रकाशितं मुनिर्भवति नान्यम् । नन्वन्यवेदनेपि मुनित्वं स्यात्कथमवधार्यत एतमेवेति । बाढमन्यवेदनेपि मुनिर्भवेत् । किंत्वन्यवेदने न मुनिरेव स्यात्किं तर्हि कर्म्यपि भवेत्सः । एतं त्वौपनिषदं पुरुषं विदित्वामुनिरेव स्यान्न तु कर्मी । अतोसाधारणं

---

ह्मणजे यज्ञादिकांच्या अनुष्ठानानें अंतःकरणशुद्धि होऊन आत्मजिज्ञासा उत्पन्न झाल्यावर गुरुचरणासमीप जाऊन श्रवणमननादिकांचा अवलंब करणें---ह्या क्रमानें मोक्षप्रकरणांतर्गत मंत्र आणि ब्राह्मण यांनीं व्यक्त केलेल्या ह्या आत्म्यालाच जाणून पुरुष योगी होतो असा "एतमेव विदित्वा मुनिर्भवति" ह्या श्रुतीचा अर्थ होय. ह्यालाच जाणिलें असतां पुरुष योगी होतो. हिरण्यगर्भदेवतादिविषयक इतर ज्ञानानें होत नाहीं. हा सदहू श्रुतींत असलेल्या एवशब्दाचा आशय होय. आतां आत्मज्ञानाशिवाय देवतादिविषय इतर ज्ञानानेंही पुरुष योगी होण्याचा संभव आहे तेव्हां ह्या आत्म्याचेंच ज्ञान झाल्यानें असा निर्धार कशाला करावयास पाहिजे?" ह्मणून जर कोणी शंका केली तर ती कांहींअंशीं बरोबरही आहे. कारण, आत्मज्ञानाशिवाय देवतादिविषयक इतर ज्ञानानेंही कदाचित् योगिदशा प्राप्त होण्याचा संभव आहे. परंतु, त्याचप्रमाणें त्या इतर ज्ञानानें पुरुषाला योगिदशाच प्राप्त होईल असा नियम नाहीं. कदाचित्, कर्मदशाही प्राप्त होण्याचा संभव आहे. आतां "आत्मज्ञान झाल्यावरही कदाचित् कर्मावस्था पुरुषाला प्राप्त होईल" अशी शंका कोणी करूं लागल्यास ती योग्य होणार नाहीं. कारण, उपनिषद्भागानें ज्ञात होणाऱ्या ह्या आत्म्याचें ज्ञान झालें असतां पुरुष योगीच होतो; कर्मी होत नाहीं. तस्मात्, ह्या आत्मज्ञानी पुरुषाला असाधारण योगिदशा प्राप्त होते हें दर्शविण्याकरितां "एतमेव" असा निर्धार श्रुतीमध्यें केलेला आहे. ह्या आत्म्याला

मुनिर्भवत्येतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः

मुनित्वं विवक्षितमस्येत्यवधारयत्येतमेवेति।एतस्मिन्हि विदिते केन कं पश्येदित्येवं क्रियासंभवान्मननमेव स्यात् । किंचैत- मेवात्मानं स्वं लोकमिच्छन्तः प्रार्थयन्तः प्रव्राजिनः प्रव्र- जनशीलाः प्रव्रजन्ति प्रकर्षेण व्रजन्ति सर्वाणि कर्माणि संन्यस्यन्तीत्यर्थः ॥ एतमेव लोकमिच्छन्त इत्यवधारणान्न बाह्यलोकत्रयेप्सूनां पारिव्राज्येऽधिकार इति गम्यते । न हि गंगाद्वारं प्रतिपित्सुः काशीदेशनिवासी पूर्वाभिमुखः प्रैति तस्माद्बाह्यलोकत्रयार्थिनां पुत्रकर्मापरब्रह्मविद्याः साधनं पुत्रेणायं लोको जय्यो नान्येन कर्मणेत्यादिश्रुतेः । अत- स्तदार्थिभिः पुत्रादिसाधनं प्रत्याख्याय न पारिव्राज्यं प्रतिपत्तुं

जाणिलें असतां “ केन कं पश्येत् ” इत्यादि श्रुतीप्रमाणें क्रिया होण्याचा संभवच नसल्यामुळें आत्मचिंतनच शिलक राहील. शिवाय ह्याच आत्मलोकाची ह्मणजे स्वस्वरूप लोकाची प्राप्ति होण्याची इच्छा करणारे पुरुष सर्व कर्मांचा त्याग करितात. “ एतमेव लोकमि- च्छन्तः ” असा निर्धार श्रुतीनें केला असल्यामुळें मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक ह्या आत्मबाह्य तीन लोकांची इच्छा असणाऱ्या पुरुषांना संन्यासाचा अधिकार नाहीं असें अर्थात् सिद्ध होतें. कारण, काशी- क्षेत्राकडील प्रदेशांत राहणाऱ्या पुरुषाला हरिद्वारीं जावयाचें अस- ल्यास तो पूर्वाभिमुख होऊन जात नाहीं. तस्मात्, बाह्य जे तीन लोक त्यांची इच्छा करणाऱ्या पुरुषांना पुत्र, कर्म व उपासना हीं साधनें उक्त आहेत. कारण “ पुत्रेणायं लोको जय्यो नान्येन कर्मणा इत्यादि प्रकारची श्रुति आहे. ह्या करितां, त्या तीन आत्मबाह्य लोकांची इच्छा करणाऱ्या पुरुषांनीं पुत्रादिसाधनांचा त्याग करून संन्यासाश्रमाचा स्वीकार करणें योग्य नव्हे. कारण, संन्यासाश्रम हें त्या बाह्य लोकांच्या

युक्तम्। अतत्साधनत्वात्पारिव्राज्यस्य । तस्मादेतमेव लोकमिच्छन्तः प्रव्रजन्तीति युक्तमवधारणम् ।आत्मलोकप्राप्तिर्ह्यविद्यानिवृत्तौ स्वात्मन्यवस्थानमेव । तस्मादात्मानं चेल्लोकमिच्छति यस्तस्य सर्वक्रियोपरम एवात्मलोकसाधनं मुख्यमन्तरङ्गं यथा पुत्रादिरेव बाह्यलोकत्रयस्य पुत्रादिकर्मण आत्मलोकं प्रत्यसाधनत्वात् । असंभवेन च विरुद्धत्वमवोचाम । तस्मादात्मानं लोकमिच्छन्तः प्रव्रजन्त्येव सर्वक्रियाभ्यो निवर्तेरन्नेव-

---

प्राप्तीचें साधन नव्हे. तस्मात्, " एतमेव लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति " असा निर्धार केला आहे तो युक्तच आहे. अविद्यानिवृत्ति झाल्यानंतर स्वस्वरूपीं लय लागून रहाणें हीच आत्मलोकप्राप्ति होय. तस्मात्, सुदैवानें आत्मरूप लोक प्राप्त होण्याची इच्छा झालेल्या पुरुषाला त्या लोकप्राप्तीचें मुख्य अंतरंग साधन ह्मटलें ह्मणजे कायिक, वाचिक व मानसिक अशा सर्व कर्मांपासून निवृत्तहोणें हेंच होय. ज्याप्रमाणें मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक हे आत्मबाह्य तीन लोक प्राप्त होण्याचें मुख्य अंतरंग साधन पुत्रवगैरे आहे त्याचप्रमाणें आत्मलोकप्राप्तीचें संन्यास हें मुख्य अंतरंग साधन होय. मनुष्यलोकादिकांची प्राप्ति करून देण्याकडे विनियोग झाला असल्यामुळें पुत्रोत्पादनादिकर्म आत्मलोकप्राप्तीचें साधन होण्याचा संभव नाहीं. आतां जरी केवळ पुत्रोत्पादनादिकर्म आत्मलोकप्राप्तीचें मुख्य अंतरंग साधन होत नसलें तरी संन्यास व तें कर्म हीं दोन्ही मिळून साधन होण्याचा संभव आहे असें ह्मणावें तर योग्य नाहीं. कारण,परिव्राजकाचे ठिकाणीं पुत्रोत्पादनादि कर्मांचा संभव नाहीं व पुत्रोत्पादनादि कर्म करीत असलेल्याला पारिव्राज्य असण्याचा संभव नाहीं. शिवाय समुच्चयाचें निवारण करतेवेळीं कर्मादिकाला ज्ञान विरुद्ध असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां आत्मलोकप्राप्तीविषयीं पुत्रोत्पादनादिकर्मांचा ज्ञानाशीं समुच्चय होणार कोठून ? तस्मात् ,आत्मरूप लोक प्राप्त होण्याची

प्रव्रजन्त्येतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वाꣳसः प्रजां न

---

त्यर्थः॥ यथा च बाह्यलोकत्रयार्थिनः प्रतिनियतानि पुत्रादीनि साधनानि विहितान्येवमात्मलोकार्थिनः सर्वैषणानिवृत्तिः पारिव्राज्यं ब्रह्मविदो विधीयत एव । कुतः पुनस्त आत्मलोकार्थिनः प्रव्रजन्त्येवेत्युच्यते । तत्रार्थवादवाक्यरूपेण हेतुं दर्शयति । एतद्ध स्म वै तत् । तदेतत्पारिव्राज्ये कारणमुच्यते । ह स्म वै किल पूर्वेऽतिक्रान्तकालीना विद्वांस आत्मज्ञाः

---

इच्छा करणाऱ्यांनीं सर्व कर्मांपासून निवृत्त व्हावेंच हें " एतमेव लोकमिच्छतः प्रव्रजन्ति " ह्या श्रुतीचें तात्पर्य होय. प्रव्रजन्ति हें रूप वर्तमानकालबोधक असल्यामुळें वरील श्रुतींत कर्मनिवृत्तिविषयक विधि सांगितलेला नाहीं अशी शंका योग्य होणार नाहीं. कारण, आत्मबाह्य असलेल्या मनुष्यलोकप्रभृति तीन लोकांची इच्छा करणाऱ्याला ज्याप्रमाणें पुत्रादि ठरीव साधनें विहित आहेत त्याचप्रमाणें आत्मलोकप्राप्तीची इच्छा करणाऱ्या ब्रह्मवेत्त्याला सर्वैषणानिवृत्तिरूप पारिव्राज्य विहितच आहे. आतां, आत्मलोकप्राप्तीची इच्छा करणाऱ्यांनीं सर्व कर्मांपासून निवृत्त व्हावेंच असें कशावरून ह्मणाल तर आत्मलोकार्थी पुरुषानें परिव्राज्य स्वीकारिलेंच पाहिजे ह्या विषयीं एतद्ध स्म वै तत्० ह्या अर्थवादवाक्यरूपानें श्रुतिच हेतु दर्शवीत आहे. तें हें परिव्राज्याविषयीं कारण होय असा " एतत् " व " तत् " ह्या श्रुत्यंतर्गत दोन पदांचा अर्थ होय. "स्म" ह्या पदाचा अन्वय " कामयन्ते " ह्या क्रियापदाशीं करावा. " ह वै" ह्या दोन अव्ययांचा अर्थ " असें ह्मणतात कीं " असा आहे. पूर्वे

---

१ " ह स्म वै " ह्या अव्ययांचा अर्थ आनंदगिरींच्या मताप्रमाणें वर दिलेला आहे. परंतु, मंडनमिश्रांनीं " ऐतिह्यार्थे च ह स्मेति वैशब्दः स्मरणाय च " असें लिहून " ह स्म वै किल " ह्या भाष्याचें स्पष्टीकरण केलें आहे. तेव्हां त्यांच्या मतानें " ह स्म वै " ह्या तीन अव्ययांचा मिळून अर्थ " अरे हो, असें सांगतात कीं " असा होतो.

प्रजां कर्मापरब्रह्मविद्यां च । प्रजोपलक्षितं हि त्रयमेतद्बाह्य-लोकत्रयसाधनं निर्दिश्यते प्रजामिति । प्रजां किं न कामयन्ते पुत्रादिलोकत्रयसाधनं नानुतिष्ठन्तीत्यर्थः । नन्वपरब्रह्मदर्शनमनुतिष्ठन्त्येव । तद्बलाद्धि व्युत्थानम् । नापवादात् । ब्रह्म तं परादाद्योन्यत्रात्मनो ब्रह्म वेद सर्वं तं परादादित्यपरब्रह्मदर्शनमप्यपवदत्येव । अपरब्रह्मणोपि सर्वमध्यान्तर्भावात् । यत्र नान्यत्पश्यतीति च । पूर्वापरबाह्यान्तरदर्शनप्रतिषेधाच्चापूर्व-

---

ह्मणजे गतकालीन. विद्वांसः=ह्मणजे आत्मवेत्ते. प्रजाम्=ह्मणजे प्रजोत्पादन, कर्म आणि देवलोकादिविषयक ज्ञान. प्रजाशब्दानें सूचित होणारीं जीं आत्मबाह्य तीन लोक प्राप्त होण्याचीं साधनें त्यांचा निर्देश " प्रजा " ह्या शब्दानें केला आहे असें समजावें. आत्मबाह्य असे तीन लोक प्राप्त होण्याचीं जीं पुत्रादि साधनें त्यांचा अवलंब गतकालीन आत्मवेत्ते लोक करीत नसत हा " पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते " ह्या श्रुतीचा अर्थ होय. आतां " देवतादिविषयक ज्ञानाच्याच बलानें व्युत्थान ह्मणजे एषणात्याग होत असल्यामुळें आत्मलोक प्राप्त होण्याची इच्छा करणारे पुरुष देवतादिज्ञानाचें अवलंबन करीत असतातच " अशी शंका योग्य नाहीं. कारण, " ब्रह्म तं परादाद्योन्यत्रात्मनो ब्रह्म वेद सर्वं तं परादात् " ह्या श्रुतीनें देवतादिविषयकइतरज्ञानाचा निषेध केला आहे. कारण, सर्वांमध्यें त्याचाही अंतर्भाव आहेच. ज्या ब्रह्माचे ठिकाणीं लय लागून राहिलें असतां चक्षुरादिक इंद्रियांच्या योगानें दुसरें कांहीं दिसत नाहीं इत्यादि सांगून दर्शनादिव्यवहाराचा निषेध केला असल्यामुळें आत्मवेत्त्या पुरुषाला ब्रह्माहून इतर ज्ञान होणें संभवनीयच नाहीं असें " यत्र नान्यत्पश्यति " ह्या श्रुतीवरूनही होत आहे. ब्रह्मज्ञान झालें असतां पुढें, मागें, आंत व बाहेर दुसरें कांहीं दिसत नसल्यामुळें " अपूर्वमनपरमनन्तरमबाह्यम् " असें ब्रह्माला उद्देशून ह्मटलेलें आहे.

मनपरमनन्तरमबाह्यमिति। तत्केन कं पश्येद्विजानीयादिति च। तस्मान्नात्मदर्शनव्यतिरेकेणान्यद्व्युत्थानकारणमपेक्षते कः पुनस्तेषामभिप्राय इत्युच्यते किं प्रयोजनं फलं साध्यं करिष्यामः प्रजया साधनेन। प्रजा हि बाह्यलोकसाधनं निर्ज्ञाता। स च बाह्यलोको नास्त्यस्माकमात्मव्यतिरिक्तः। सर्वं ह्यस्माकमात्मभूतमेव सर्वस्य च वयमात्मभूताः। आत्मा च नात्मत्वादेव न केनचित्साधनेनोत्पाद्य आप्यो विकार्यः संस्कार्यो वा। यद्यप्यात्मयाजिनः संस्कारार्थं कर्मेति तदपि कार्य-

---

" तत्केन कं पश्येत्तत्केन कं विजानीयात् " ह्या श्रुतीवरूनही आत्मवेत्त्याला ब्रह्मातिरिक्त ज्ञान नाहीं असें होतें. तस्मात्, व्युत्थान होण्याला आत्मज्ञानावांचून इतर कारणाची अपेक्षा नाहीं. आतां पुत्रोत्पादनादि साधनांचें अवलंबन न करणाऱ्या गतकालीन आत्मज्ञानी पुरुषांचा तसें करण्यामध्यें आशय काय होता तो " किं प्रजया करिष्यामो येषां नोयमात्मायं लोक इति " ह्या श्रुतीनें दर्शविला आहे. प्रजारूप साधनानें कोणतें फल आह्मांला प्राप्त करून घेणें आहे? कारण, प्रजा हें आत्मबाह्य जो मनुष्य लोक त्याच्या प्राप्तीचें साधन ह्मणून ठरलेलें आहे आणि तो बाह्य लोक आह्मांला आत्मव्यतिरिक्त नाहीं. कारण, सर्व आह्मांला आत्मरूप असून आह्मीही सर्वांचें आत्मरूपच आहोंत. पुत्रादिविषयक एषणांचें फल जें मनुष्यलोकादिक त्याला उत्पत्ति, वृद्धि, संस्कार व विकार ह्या अवस्था प्राप्त होणाऱ्या आहेत. परंतु, आमचा आत्मा त्रिकालाबाधित असल्यामुळें कोणत्याही साधनानें त्याची उत्पत्ति, वृद्धि, विकार अथवा संस्कार होण्याचा संभव नाहीं. आत्मयाजी पुरुषाला कर्म हें संस्कारार्थकच आहे असें मानिलें असल्यामुळें आत्म्याचा संस्कार होणें संभवनीय आहे अशी शंका कोणी करील खरी; परंतु, आत्मयाजी पुरुषाला जें संस्कारार्थक कर्म आहे तें तरी चित्तशुद्धिवि-

कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोयमा-

---

करणात्मदर्शनाविषयमेव । इदं मेनेनाङ्गं संस्क्रियत इत्य-ङ्गाङ्गित्वादिश्रवणात् । न हि विज्ञानघनैकरसनैरन्तर्यदर्शि-नोङ्गाङ्गिसंस्कारोपधानदर्शनं संभवति । तस्मान्न किंचि-त्प्रजादिसाधनैः करिष्यामः । अविदुषां हि तत्प्रजादिसाधनैः कर्तव्यं फलम् । न हि मृगतृष्णिकायामुदकपानाय तदुदक-दर्शी प्रवृत्त इति तत्रोषरमात्रमुदकाभावं पश्यतोपि प्रवृत्ति-र्युक्ता । एवमस्माकमपि परमार्थात्मलोकदर्शिनां प्रजादि-साधनसाध्ये मृगतृष्णिकादिसमेविद्वद्दर्शनाविषये न प्रवृत्ति-

---

षयकच आहे. कारण, " इदं मेनेनाङ्गं संस्क्रियते " असा अंगांगिभाव वगैरे तद्विषयक श्रुतीमध्यें पठित आहे आणि केवल विज्ञानमय अशा आत्म्याचे ठिकाणीं लय लागलेल्या पुरुषाला अंगांगिभावाचें वगैरे ज्ञान असण्याचा संभव नाहीं. तस्मात्, " प्रजादिसाधनांशीं आह्मांला कांहीं-एक कर्तव्य नाहीं " हा आत्मवेत्त्या लोकांचा अभिप्राय होय. कारण, प्रजादिसाधनांनीं अज्ञानी लोकांना फल साध्य करून घ्यावयाचें असतें. ज्ञानी लोकांना नसतें. उदक आहे अशा समजुतीवर मृगजलाचे ठिकाणीं एकादा अज्ञानी पुरुष तृषाशमनार्थ धांवूं लागला ह्मणून तेथें केवळ उखीर जमीन आहे हें माहित असणाऱ्यानेंही जलपान करण्यास त्याच्या बरोबर धांवूं लागणें योग्य नाहीं. सारांश, मृगजलादिकांसारखें आणि ह्मणूनच ह्या अज्ञानी पुरुषाच्या दृष्टीला विषयीभूत असें जें प्रजादिसाधनांनीं साध्य होणारें मनुष्यलोकप्राप्त्यादि फल त्याविषयीं आह्मां वास्तविक आत्मवेत्त्या पुरुषांची प्रवृत्ति योग्य नव्हे असा " किं प्रजया करिष्यामः " ह्या श्रुतीचा अभिप्राय होय व हाच अभि-प्राय " येषां नोयमात्मायं लोकः " ह्या श्रुतीनें स्पष्ट केला आहे. तात्पर्य, प्रजादि साधनांशीं आह्मांला कांहीं एक कर्तव्य नाहीं. कारण,

**युक्तेत्यभिप्रायः । तदेतदुच्यते येषामस्माकं परमार्थदर्शिनां नोयमात्माशनायादिविनिर्मुक्तः साध्वसाधुभ्यामविकार्योयं लोकः फलमभिप्रेतम् । न चास्यात्मनः साध्यसाधनादि सर्वसंसारधर्मविनिर्मुक्तस्य साधनं किंचिदेषितव्यम् । साध्यस्य हि साधनान्वेषणा क्रियते । असाध्यस्य साधनान्वेषणायां हि जलबुद्ध्या स्थल इव तरणं कृतः स्यात् । खे वा शाकुनपदान्वेषणम् । तस्मादेतमात्मानं विदित्वा प्रव्रजेयुरेव ब्राह्मणा न कर्मारिभेरन्नित्यर्थः । यस्मात्पूर्वे ब्राह्मणा एवं विद्वांसः प्रजा-**

---

आह्मीं परमार्थतः आत्मज्ञानी असल्यामुळें—क्षुधा, तृषा वगैरे पासून मुक्त आणि पुण्यपापांनीं विकार न पावणारा असा जो हा आत्मा ह्मणजे --हा आत्मलोक हेंच आह्मांला इष्ट फल आहे; आत्मबाह्य असें कोणतेंही फल आह्मांला प्राप्त करून घेणें नाहीं. कारण, आत्मबाह्य असें कांहीं नाहींच. बरें ह्या आत्म्याच्या प्राप्तीला कांहीं साधनाची अपेक्षा असेल ह्मणून ह्मणाल तर साध्यसाधनप्रभृति जे सर्व प्रकारचे संसारविषयक धर्म त्यांपासून हा आत्मा मुक्त असल्यामुळें ह्याच्या प्राप्तीला कोणतेंही साधन हुडकण्याची अवश्यकता नाहीं. तर मग साधनाची अवश्यकता कोठें असते ह्मणून ह्मणाल तर बाबांनों, जें साध्य असेल त्याच्या करितां साधनाचा शोध करणें अवश्यक असतें. जें मुळीं असाध्यच आहे त्याकरितां जर साधनाची अपेक्षा धरिली तर स्थलाचेच ठिकाणीं हें जल आहे असें समजून त्यांतून तरून जाण्याकरितां नौका तयार करण्यासारखें निष्फल होणार आहे; किंवा आकाशामध्यें पक्ष्यांचीं पावलें कोठें उमटलीं आहेत हें पाहण्यासारखें व्यर्थ होणार आहे. ज्ञान झाल्यावर ब्राह्मणांनीं संन्यास करावाच; कर्मारंभ करूंच नये हा “ येषां नोयमात्मायं लोकः ” असें ह्मणण्याचा आशय होय. असें कां ह्मणून विचाराल तर ह्याप्रमाणें आत्मज्ञान झालेल्या गतकालीन ब्राह्मणांनीं प्रजादि साध-

त्मायं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तै-
षणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं
चरन्ति या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या
वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः

मकामयमानाः । त एवं साध्यसाधनसंव्यवहारं निन्दन्तोऽवि-
द्वद्विषयोऽयमिति कृत्वा किं कृतवन्त इत्युच्यते । ते ह स्म किल
पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ
भिक्षाचर्यं चरन्तीत्यादि व्याख्यातम् । तस्मादात्मानं लोक-
मिच्छन्तः प्रव्रजन्ति प्रव्रजेयुरित्येष विधिरर्थवादेन संगच्छते ।
न हि सार्थवादस्यास्य लोकस्तुत्याभिमुख्यमुपपद्यते । प्रव्र-
जन्तीत्यस्यार्थवादरूपो ह्येतद्ध स्मेत्यादिरुत्तरो ग्रन्थः । अर्थ-

नांची अपेक्षा धरिली नव्हती. असो. ह्याप्रमाणें साध्यसाधनव्यवहार
अज्ञानपुरुषविषयक आहे असें समजून त्याची निंदा करणाऱ्या गत-
कालीन ब्राह्मणांनीं काय केलें तें पुढें सांगितलें आहे. ते ब्राह्मण पुत्रै-
षणा, वित्तैषणा व लोकैषणा ह्यांचा त्याग करून भिक्षा मागूं लागले.
" पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च ० उभे ह्येते एषणे एव भवतः " ह्या श्रुतीचें
व्याख्यान मागल्या अध्यायांत झालेंच आहे. सारांश, " आत्मरूप
लोकाची इच्छा करणाऱ्या पुरुषांनीं संन्यास करावाच " ह्या विधीची
" एतद्ध स्म वै तत्पूर्वे वि० एषणे एव भवतः" ह्या अर्थवादाशीं एकवा-
क्यता होते. —अर्थवादासहित असलेल्या ह्या ग्रंथाचें तात्पर्य आत्मलोक-
स्तुतीकडे असून " एतमेवात्मानं लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति " हाही अर्थ-
वादच आहे—हें ह्मणणें जुळत नाहीं. कारण, " प्रव्रजन्ति " ह्याचा अर्थवाद

१ कहोल ब्राह्मणांत ही श्रुति आली असल्यामुळें आचार्यांनीं येथील व्याख्यानाक-
रितां तिथल्या व्याख्यानावर हवाला दिला आहे. परंतु, ह्या श्रुतीवरीलच व्याख्यान
विशेष महत्त्वाचें आहे आणि ह्मणूनच ह्या शारीरब्राह्मणांतर्गत कंडिकेचें भाष्य संपूर्ण
झाल्यावर पुढें कहोल ब्राह्मणाची सभाष्य कंडिका तात्पर्यासह दिली आहे.

वादश्चेन्नार्थवादान्तरमपेक्षेत । अपेक्षते त्वेतद्ध स्मेत्याद्यर्थवादं प्रव्रजन्तीत्येतत्। यस्मात्पूर्वे विद्वांसः प्रजादिकर्मभ्यो निवृत्ताः प्रव्रजितवन्त एव तस्मादधुनातना अपि प्रव्रजन्ति प्रव्रजेयुरित्येवं संबध्यमानं न लोकस्तुत्यभिमुखं भवितुमर्हति। विज्ञानसमानकर्तृकत्वोपदेशादित्यादिनावोचाम । वेदानुवचनादिसहपाठाच्च । यथात्मवेदनसाधनत्वेन विहितानां वेदानुवचनादीनां यथार्थत्वमेव नार्थवादत्वं तथा तैरेव सह पठितस्य पारिव्राज्यस्यात्मलोकप्राप्तिसाधनत्वेनार्थवादत्वमयुक्तम् ।

---

" एतद्ध स्म०" हा पुढील ग्रंथ आहे. तस्मात्, " एतद्ध स्म० भवतः " हा पुढला ग्रंथ जर अर्थवादरूप आहे तर त्याला दुसऱ्या अर्थवादाची अपेक्षा नसणारच. " प्रव्रजन्ति " ह्याला " एतद्ध स्म०" इत्यादि अर्थवादाची अपेक्षा आहेच आहे. सारांश, ज्याअर्थी गतकालीन आत्मज्ञानी पुरुषांनीं प्रजोत्पादनादि कर्मांपासून निवृत्त होऊन संन्यासच केला त्याअर्थी सांप्रतच्या आत्मज्ञानी लोकांनींही कर्मसंन्यासच केला पाहिजे अशा प्रकारें अर्थवादाशीं संबद्ध होणारा " एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति " हा ग्रंथ आत्मलोकस्तुत्यर्थ ह्मणून अर्थवाद होण्यास योग्य नाहीं. ह्याचा खुलासा मागल्या अध्यायांतील कहोल ब्राह्मणाच्या व्याख्यानामध्यें " विज्ञानसमानकर्तृकत्वोपदेशात् " इत्यादि ग्रंथानें केलेलाच आहे. शिवाय, वेदानुवचनादिकांबरोबरच " एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति " हें पारिव्राज्यविषयक वाक्य पठित असल्यामुळेंही तें अर्थवाद होणार नाहीं. आत्मज्ञानाचें साधन ह्मणून विहित असलेल्या वेदानुवचनादिकांना ज्याप्रमाणें अर्थवादत्व नसून यथार्थत्व आहे त्याचप्रमाणें त्या वेदानुवचनादिकांबरोबरच आत्मलोकाच्या प्राप्तीचें साधन ह्मणून पठित असलेल्या पारिव्राज्यविषयक वाक्याला अर्थवादत्व योग्य नाहीं. शिवाय, फलविभाग सांगितला

**फलविभागोपदेशाच्च । एतमेवात्मानं लोकं विदित्वेत्यन्यस्माद्बाह्याल्लोकादात्मानं फलान्तरत्वेन प्रविभजति यथा पुत्रेणैवायं लोको जय्यो नान्येन कर्मणा कर्मणा पितृलोक इति । न च प्रव्रजन्तीत्येतत्प्राप्तवल्लोकस्तुतिपरम् । प्रधानवच्चार्थवादापेक्षम् । सकृच्छ्रुतं स्यात् । तस्माद्भ्रान्तिरेवैषा लोकस्तु-**

---

असल्यामुळेंही पारिव्राज्यविषयक वाक्य अर्थवाद होण्याचा संभव नाहीं. कारण, " पुत्राच्या योगानेंच ह्या मनुष्य लोकाची प्राप्ति होते दुसऱ्या कर्मानें होत नाहीं; कर्मानें पितृलोक प्राप्ति होते " अशा अर्थाच्या श्रुतीमध्यें ज्याप्रमाणें पुत्रादिकांचें वेगळें वेगळें फल सांगितलें आहे त्याचप्रमाणें " एतमेवात्मानं लोकं विदित्वा " असें ह्मणून अन्य बाह्य-लोकाहून आत्मलोकप्राप्ति हें वेगळें फल स्पष्टपणें सांगितलें आहे. शिवाय " वायुर्वै क्षेपिष्ठा देवता " इत्यादि यथार्थ अर्थवाद ज्याप्रमाणें " वायव्यꣳ श्वेतमालभेत " ह्या श्रुतीनें विहित असलेल्या कर्माच्या प्रशंसेकरितां आहे त्याप्रमाणें " प्रव्रजन्ति " हें आत्मलोकस्तुतिपर आहे असें ह्मणतां येत नाहीं. परंतु, दर्शपूर्णमासादि प्रधानकर्माला ज्याप्रमाणें " सुवर्गाय हि लोकाय दर्शपूर्णमासाविज्येते " इत्यादि अर्थवादाची अपेक्षा आहे त्याचप्रमाणें ह्या पारिव्राज्याला " एतद्ध स्म वै " इत्यादि अर्थवादाची अपेक्षा असल्याचें स्पष्ट दिसतें. ह्यामुळें दर्शपूर्णमासादि प्रधान कर्माप्रमाणें हें पारिव्राज्य विहित असल्याचें सिद्ध आहे. त्यांतूनही केवळ ह्या प्रकृतवाक्यामध्येंच काय तें पारिव्राज्य एकदां श्रुत असतें तर विधि विवक्षित नसून हें अन्यस्तुतिपर आहे असें कदाचित् ह्मणतां आलें असतें; परंतु, " प्रव्राजिनः प्रव्रजन्ति ", " प्रजां न कामयन्ते ", " व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति ", " विदित्वा मुनिर्भवति " इत्यादि अनेक ठिकाणीं हें पारिव्राज्य फिरून फिरून सांगितलें आहे. तस्मात् " एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति " हें आत्मलोक-

**तिपरमिति । न चानुष्ठेयेन पारिव्राज्येन स्तुतिरुपपद्यते यदि पारिव्राज्यमनुष्ठेयमपि सदन्यस्तुत्यर्थं स्याद्दर्शपूर्णमासादीनामप्यनुष्ठेयानां स्तुत्यर्थता स्यात् । न चान्यत्र कर्तव्यतैतस्माद्विषयान्निर्ज्ञाता यत इह स्तुत्यर्थो भवेत् । यदि पुनः कचिद्विधिः परिकल्प्येत पारिव्राज्यस्य स इहैव मुख्यो नान्यत्र संभवति । यदप्यनधिकृतविषये पारिव्राज्यं परिकल्प्यते तत्र**

---

स्तुतिपर ह्मणणें हें केवळ अज्ञान आहे. आतां " हें पारिव्राज्य जरी अनुष्ठेय असलें तरी त्याच्या योगानें आत्मलोकाची अथवा आत्मज्ञानाची स्तुति केली आहे असें मानण्यास काय चिंता आहे ? " ह्मणून ह्मणावें तर अनुष्ठेयरूप असलेल्या ह्या पारिव्राज्यानें आत्मलोकाची अथवा आत्मज्ञानाची स्तुति संभवत नाहीं. कारण, पारिव्राज्य अनुष्ठेयरूप असूनही स्तुत्यर्थ आहे असें जर मानिलें तर अनुष्ठेयरूप दर्शपूर्णमासादि कर्मेंही स्तुत्यर्थच आहेत असें मानण्याचा प्रसंग येईल. यज्ञादिकांप्रमाणें इतर ठिकाणीं पारिव्राज्य विहित असल्याचें समजून ह्या ठिकाणीं तें आत्मलोकस्तुत्यर्थच आहे असें ह्मणाल तर आत्मज्ञानाधिकाररूप विषयाहून इतर ठिकाणीं पारिव्राज्यविधि उपलब्ध नाहीं. तेव्हां ह्या ठिकाणीं स्तुत्यर्थ मानताच येत नाहीं. जर कोठें पारिव्राज्याचा विधि मानावयाचा असेल तर तो ह्या ठिकाणींच मुख्य असण्याचा संभव आहे. दुसऱ्या ठिकाणीं संभवच नाहीं. " तत्रैवं शक्यते वक्तुं येन्धपङ्ग्वादयो नराः । गृहस्थत्वं न शक्ष्यान्ति कर्तुं तेषामयं विधिः ॥ नैष्ठिकब्रह्मचर्यं वा परिव्राजकतापि वा । तैरवश्यं ग्रहीतव्या तेनादावेतदुच्यते " असें जाबालश्रुतीचें तात्पर्य काढून कर्माविषयीं अनधिकृत असलेल्या अंधादिकांकरितां हा पारिव्राज्यविधि ह्मणजे संन्यासविधि आहे असें कोणी मानीत असतात. परंतु, तें योग्य नाहीं. कारण, कर्तव्य ह्मणून अभिमत नसलेला संन्यासविधि जर कर्मानधिकारी पुरुषांविषयीं मानावयाचा असेल तर कर्तव्य ह्मणून

स एष नेति नेत्यात्मागृह्यो न हि गृह्यतेशीर्यो न
हि शीर्यतेसङ्गो न हि सज्यतेसितो न व्यथते न

---

वृक्षाद्यारोहणाद्यपि पारिव्राज्यवत्कल्प्येत । कर्तव्यत्वेनानिर्ज्ञातत्वाविशेषात् । तस्मात्स्तुतित्वगन्धोप्यत्र न शक्यः कल्पयितुम् । यद्ययमात्मा लोक इष्यते किमर्थं तत्प्राप्तिसाधनत्वेन कर्माण्येव नारभेरन्किं पारिव्राज्येनेति । अत्रोच्यते । अस्यात्मलोकस्य कर्मभिरसंबन्धात् । यमात्मानमिच्छन्तः प्रव्रजेयुः स आत्मा साधनत्वेन फलत्वेन चोत्पाद्यत्वादिप्रकाराणामन्यतमत्वेनापि कर्मभिर्न संबध्यते । तस्मात्स एष नेति नेत्यात्मागृह्योन हि गृह्यत इत्यादिलक्षणः । यस्मादेवंलक्षण आत्मा कर्मफलसाधनासंबन्धी सर्वसंसारधर्मवि-

---

अभिमत नसलेलें वृक्षारोहण वगैरेही कर्मानधिकारी पुरुषाला विहित आहे असें मानण्याला काय चिंता आहे. तस्मात् " प्रव्रजन्ति " ह्या ठिकाणीं स्तुतित्वाचा गंधही असल्याची कल्पना होणें शक्य नाहीं. आतां " हा आत्मरूप लोक जर इष्ट आहे तर त्याच्या प्राप्तीचें साधन ह्मणून लोकांनीं एकसारखी शास्त्रानुसार कर्मेंच कां करूं नयेत ? ह्या आत्मलोक प्राप्तीला संन्यासाशींच काय कर्तव्य आहे " ह्मणून ह्मणाल तर सांगतों. ह्या आत्मलोकाचा कर्मांशीं बिलकूल संबंध नाहीं आणि ह्मणूनच तो प्राप्त करून घेण्याची इच्छा करणारे लोक कर्में आरंभीत नाहींत. ज्या आत्म्याची इच्छा करणाऱ्यांनीं कर्मसंन्यास करणें योग्य आहे तो आत्मा कशाचेंही साधन अथवा फल नसल्यामुळें उत्पाद्यत्व, आप्यत्व, संस्कार्यत्व अथवा विकार्यत्व ह्यांपैकीं कोणत्याच प्रकारानें त्याचा कर्मांशीं संबंध नाहीं. तस्मात् , आत्मा हा " स एष नेतिनेति० न रिष्यति " ह्या श्रुतींत सांगितल्याप्रमाणें आहे आणि ज्याअर्थीं हा अशा प्रकारचा आत्मा कर्मफलाशीं अथवा कर्मसाधनाशीं असंबद्ध,

लक्षणोशनायाद्यतीतोस्थूलादिधर्मवानजोजरोमरोमृतोभयः सैन्धवघनवद्विज्ञानैकरसस्वभावः स्वयंज्योतिरेक एवाद्वयो-पूर्वोनपरोनन्तरोबाह्य इत्येतदागमतस्तर्कतश्च स्थापितं विशे-षतश्चेह जनकयाज्ञवल्क्यसंवादेस्मिंस्तस्मादेवंलक्षण आत्मनि विदित आत्मत्वेन नैव कर्मारम्भ उपपद्यते । तस्मादात्मा निर्विशेषः । न हि चक्षुष्मान्पथि प्रवृत्तोहनि कूपे कण्टके वा पतति कृत्स्नस्य च कर्मफलस्य विद्याफलेन्तर्भावात् । न चायत्नप्राप्ये वस्तुनि विद्वान्यत्नमातिष्ठति अर्के चेन्मधु

---

सर्व प्रकारच्या संसारधर्मांहून विलक्षण, क्षुधादिकांनीं असंस्पृष्ट, स्थूल-त्वादि धर्मांनीं रहित, जन्म, जरा, मरण, विनाश, भय इत्यादिकांनीं विरहित, मिठाचा खडा ज्याप्रमाणें अंतर्बाह्य क्षाररसानें भरलेला असतो त्याप्रमाणें केवळ ज्ञानरसानें परिपूर्ण असलेला, स्वयंप्रकाश, एकटा, अद्वितीय आणि पूर्व, अपर, अंतर व बाह्य एतद्विरहित आहे ह्मणून ज्याअर्थीं प्रमाण व उपपत्ति ह्यांनीं स्थापित केलेलें आहे आणि त्यांतूनही ह्या बृहदारण्यकांतर्गत जनकयाज्ञवल्क्यसंवादविषयक प्रकरणामध्यें विशेषेंकरून सिद्ध केलें आहे त्याअर्थीं ह्या आत्म्याचें आपाततः ज्ञान झालें असतां कर्मारंभ होणें संभवत नाहीं. सारांश, आत्मा हा निर्विशेष आहे. ह्यास्तव, भरदिवसां मार्गानें जात असलेला डोळस पुरुष ज्याप्रमाणें कूपांत अगर कांट्यांत पडत नाहीं त्याचप्रमाणें आपाततः आत्म-ज्ञान झालेला पुरुष कर्मानुष्ठानांत पडत नाहीं आणि ब्रह्मज्ञानफलामध्यें संपूर्ण कर्मफलाचा अंतर्भाव असल्यामुळें मुमुक्षूला कर्माची जरूरही नाहीं. आतां " कर्में विचित्र फलें देणारीं असतात; ह्मणून विवेकीही त्यांचें अनुष्ठान करील " असें ह्मणणें योग्य नाहीं. कारण, अनायासानें साध्य होणाऱ्या वस्तूकरितां समंजस पुरुष आयासांत पडत नाहीं. समीपच जर मध मिळत असेल तर त्याकरितां पर्वतावर विनाकारण

रिष्यत्येतमु हैवैते न तरत इत्यतः पापमकरव-

विन्देत किमर्थं पर्वतं व्रजेत् । इष्टस्यार्थस्य संप्राप्तौ को विद्वान्यत्नमाचरेत् ॥ सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यत इति गीतासु । इहापि चैतस्यैव परमानन्दस्य ब्रह्मवित्प्राप्यस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्तीत्युक्तम् । अतो ब्रह्मविदां न कर्मारम्भः । यस्मात्सर्वैषणाविनिवृत्तः स एष नेति नेत्यात्मात्मत्वेनोपगम्य तद्रूपेणैव वर्तते तस्मादेतमेवं विदं नेति नेत्यात्मभूतमु हैवैते वक्ष्यमाणे न तरतो न प्राप्नुत इति युक्तमेवेति वाक्यशेषः । के ते इत्युच्यते। अतोस्मान्निमित्ताच्छरीरधारणादिहेतोः पापमपुण्यं कर्माकरवं कृतवानस्मि

कोण जाईल ? तात्पर्य, इष्ट वस्तूची प्राप्ति अनायासें होत असतांना त्याकरितां कोण समंजस पुरुष यत्न करील ? " सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते " ह्या गीतावचनांतही ज्ञानफलामध्यें कर्मफलाचा अंतर्भाव होत असल्याचें सांगितलें आहे आणि ह्या बृहदारण्यकांतही ब्रह्मवेत्त्याला प्राप्त होणाऱ्या ह्या परमानंदाचाच अंश ब्रह्मादिकापासून तों मनुष्यापर्यंत सर्व प्राण्यांना प्राप्त होत असतो असें ह्मटलें आहे. तस्मात्, कर्महेतूचा बाध झाला असल्यामुळें ब्रह्मज्ञान झालेल्या पुरुषांचे ठिकाणीं काया, वाचा व मन ह्यांनीं साध्य असलेल्या कोणत्याही कर्माचा आरंभ होणें संभवत नाहीं. ज्याअर्थीं सर्व प्रकारच्या एषणांपासून परावृत्त झालेला पुरुष " नेति नेति " इत्यादि श्रुतीनें वर्णिलेला आत्मा आपणच आहोंत असें समजून आत्मरूपानें स्थित असतो त्याअर्थीं त्या सदर्हू श्रुतीप्रमाणें आत्मस्वरूप बनलेल्या पुरुषाला हे पुढें सांगितलेले हर्षशोक प्राप्त होत नाहींत हें युक्त आहे. ते हर्षशोक कोणचे ते पुढें सांगितले आहेत. अतः ह्मणजे " ह्या शरीरपोषणादिकारणाकरितां मीं पापकर्म केलें असल्यामुळें माझें मोठें वाईट झालें आहे.

मित्यतः कल्याणमकरवमित्युभे उ हैवैष एते तरति नैनं कृताकृते तपतः॥

कष्टं खलु मम वृत्तमनेन पापेन कर्मणाहं नरकं प्रतिपत्स्य इति योयं पश्चात्पापं कर्म कृतवतः परितापः स एनं नेति नेत्यात्मभूतं तरति । तथातः कल्याणं फलविषयकामाभिनिमित्ताद्यज्ञदानादिलक्षणं पुण्यं शोभनं कर्म कृतवानस्म्यतोहमस्य फलं सुखमुपभोक्ष्ये देहान्तर इत्येषोपि हर्षस्तं न तरति । उभे उ हैवैष ब्रह्मविदेते कर्मणी तरति पुण्यपापलक्षणे । एवं ब्रह्मविदः संन्यासिन उभे अपि कर्मणी क्षीयेते पूर्वजन्मनि कृते ये ते इह जन्मनि कृते ये ते चापूर्वे च नारभ्येते । किं च नैनं कृताकृते कृतं नित्यानुष्ठानमकृतं तस्यैवाक्रिया ते अपि कृताकृते एनं न तपतः । अनात्मज्ञं हि कृतं फलदानेनाकृतं प्रत्यवायोत्पादनेन तपतः । अयं तु

कारण, आतां ह्या पापकर्मामुळें मी नरकांत पडेन " अशा प्रकारचा जो हा पापकर्म करणाऱ्या पुरुषाचा पश्चात्ताप तो " नेति नेति " इत्यादि श्रुतींत वर्णिल्याप्रमाणें आत्मस्वरूप बनून गेलेल्या पुरुषाला प्राप्त होत नाहीं व त्याचप्रमाणें अतः ह्मणजे " फलाची इच्छा धरून मीं जें यज्ञदानादिरूप पुण्यकर्म केलें आहे त्या पुण्यकर्माचें फल ह्मणून जन्मांतरीं मला आतां सुख भोगावयास सांपडेल " अशा प्रकारचा हर्षही त्याला होत नाहीं. सारांश, पुण्य व पाप ह्या दोन्ही प्रकारच्या कर्मांचें ब्रह्मवेत्ता अतिक्रमण करितो. ह्याप्रमाणें ब्रह्मवेत्ता जो संन्यासी त्यानें पूर्वजन्मीं केलेलीं व इहजन्मीं त्याचे हातून झालेलीं अशीं दोन्हीप्रकारचीं कर्में लयास जातात व नवीन कर्में आरंभिलीं जात नाहींत. शिवाय, नित्यानुष्ठान आणि नित्यानुष्ठानाभाव ह्या दोहोंपासूनही त्याला ताप होत नाहीं. जो आत्मवेत्ता नसेल त्याला नित्यकर्मानुष्ठानाचें फल प्राप्त

ब्रह्मविदात्मविद्याग्निना सर्वाणि कर्माणि भस्मीकरोति यथैधांसि समिद्धोग्निरित्यादिस्मृतेः । शरीरारम्भकयोस्तूपभोगेनैव क्षयः । अतो ब्रह्मविदकर्मसंबन्धी ॥

---

होत असल्यामुळें आणि नित्यकर्मानुष्ठान न केल्यानें पाप लागत असल्यामुळें ताप होतो. "यथैधांसि समिद्धोग्निः" इत्यादि स्मृति असल्यामुळें हा ब्रह्मवेत्ता तर आत्मज्ञानरूप अग्नीच्या योगानें सर्व कर्मांचें भस्म करून टाकितो आणि ज्या बऱ्या वाईट कर्मांच्या योगानें विद्यमान देहाची उत्पत्ति झालेली असते त्या कर्मांचा तर उपभोगानें क्षय होतच असतो. तस्मात्, ब्रह्मवेत्त्याला कर्मांचा संबंध नाहीं.

( ह्यापुढें मराठीतात्पर्यासह कहोलब्राह्मण सभाष्य दिलें आहे. )

**अथ हैनं कहोलः कौषीतकेयः पप्रच्छ याज्ञ-वल्क्येति होवाच यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरस्तं मे व्याचक्ष्वेत्येष त आत्मा**

---

बन्धनं सप्रयोजकमुक्तं यश्च बद्धस्तस्याप्यस्तित्वमधिगतं व्यतिरिक्तत्वं च। तस्येदानीं बन्धमोक्षसाधनं ससंन्यासमात्मज्ञानं वक्तव्यमिति कहोलप्रश्न आरभ्यते। अथ हैनं कहोलो नामतः कुषीतकस्यापत्यं कौषीतकेयः पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाचेति पूर्ववत्। यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरस्तं मे व्याचक्ष्वेति। यं विदित्वा बन्धनात्प्रमुच्यते। याज्ञवल्क्य आह। एष ते तवात्मा किमुषस्तकहोलाभ्यामेक आत्मा

---

पूर्वींच्या तीन ब्राह्मणांत मिळून संसाररूप बंधनाचें कारणांसहवर्तमान निरूपण केलें. त्याचप्रमाणें बद्ध जो मुमुक्षु त्याचें देह, इंद्रिय, मन, बुद्धि व दुःखादिरूप बुद्धिवृत्ति ह्यांहून भिनत्व व अस्तित्व चवथ्या उषस्तब्राह्मणांत प्रतिपादनपूर्वक निश्चित केलें. आतां संन्यासासहवर्तमान आत्मज्ञान हेंच संसाररूपबंधापासून त्या मुमुक्षूची मुक्तता होण्याचें साधन होय असें सांगण्याच्या उद्देशानें ह्या पांचव्या ब्राह्मणांत कहोलप्रश्नाचा उपक्रम केलेला आहे. कहोलनामक कुषीतक वंशजानें "हे याज्ञवल्क्य मुने, व्यवधान व गौणत्व ह्यांनीं विरहित असें ब्रह्मस्वरूप असलेला व सर्वांच्या अंतर्यामीं असून ज्ञात झाला असतां बंधनापासून मुमुक्षूची मुक्तता करण्यास कारणीभूत होत असलेला जो आत्मा तो मला सांगा" ह्मणून याज्ञवल्क्यमुनींना प्रश्न केला. "याज्ञवल्क्य" हें संबोधन स्वतःकडे सदर्हू मुनींचें लक्ष्य ओढून घेण्याच्या उद्देशानें घातलेलें आहे. आतां "यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरस्तं मे व्याचक्ष्वेत्येष त आत्मा सर्वान्तरः कतमो याज्ञवल्क्य सर्वान्तरः" हा मजकूर मागल्या उषस्तब्राह्मणांत व ह्या कहोलब्राह्मणांत सारखाच आहे. तेव्हां

**पृष्टः किं वा भिन्नावात्मानौ तुल्यलक्षणाविति । भिन्नाविति युक्तं प्रश्नयोरपुनरुक्तत्वोपपत्तेः। यदि ह्येक आत्मोषस्तकहोल-प्रश्नयोर्विवक्षितस्तत्रैकेनैव प्रश्नेनाधिगतत्वात्तद्विषयो द्वितीयः प्रश्नोनर्थकः स्यात् । न चार्थवादरूपत्वं वाक्यस्य । तस्मा-द्भिन्नावेतावात्मानौ क्षेत्रज्ञपरमात्माख्याविति केचिद्व्या-चक्षते । तन्न । त इति प्रतिज्ञानात् । एष त आत्मेति हि प्रति-वचने प्रतिज्ञातम् । न चैकस्य कार्यकरणसंघातस्य द्वावा-**

---

"उषस्त व कहोल ह्यांनीं एकाच आत्म्याबद्दल याज्ञवल्क्यमुनींना प्रश्न केला किंवा सारख्याच लक्षणांनीं युक्त अशा भिन्न भिन्न दोन आत्म्यां-विषयीं प्रश्न केला" असा संशय ह्या ठिकाणीं उत्पन्न होतो आणि ह्मणून ह्याचा निर्णय कोणी असा करितातः--"भिन्न भिन्न आत्म्यांविषयीं उषस्त व कहोल ह्यांनीं प्रश्न केला असें मानणें योग्य आहे. कारण, असें मानिलें असतां ह्या उभयतांच्या प्रश्नावर पुनरुक्तिदोष येत नाहीं. उषस्त व कहोल ह्या उभयतांच्या प्रश्नांमध्यें एकच आत्मा जर विवक्षित असतां तर एकाच प्रश्नानें कार्यभाग उरकत असल्यामुळें तद्विषयक दुसरा प्रश्न व्यर्थ होईल. आतां—उषस्तब्राह्मण वस्तुस्वरूपप्रतिपादनपर असून कहोलब्राह्मण त्या वस्तुस्वरूपाच्याच प्रशंसेकरितां आहे—असें ह्मणावें तर जुळत नाहीं. कारण, ह्या कहोलब्राह्मणांतील मजकूर अर्थवादरूप नाहीं. तस्मात्, जीव आणि परमात्मा अशा दोन भिन्न भिन्न आत्म्यां-विषयीं दोन प्रश्न केलेले आहेत". परंतु, हें व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, "तुझा" असें निश्चित केलेलें आहे; ह्मणजे "हा तुझा आत्मा" अशी प्रतिज्ञा प्रत्युत्तरामध्यें केलेली आहे. सारांश, "यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरस्तं मे व्याचक्ष्व" हा प्रश्न आणि "एष त आत्मा सर्वान्तरः" हें प्रतिवचन हीं दोन्हीं जर दोन्हीं ब्राह्मणांमध्यें अक्षरशः सारखींच आहेत तर अर्थदृष्टच्या ती भिन्न कशीं असतील? शिवाय, एकाच प्रका-

त्मानावुपपद्येते । एको हि कार्यकरणसंघात एकेनात्मनात्मवान् । न चोषस्तस्यान्यः कहोलस्यान्यो जातितो भिन्न आत्मा भवति । द्वयोरगौणत्वात्मत्वसर्वान्तरत्वानुपपत्तेः । यद्येकमगौणं ब्रह्म द्वयोरितरेणावश्यं गौणेन भवितव्यं तथात्मत्वं सर्वान्तरत्वं च । विरुद्धत्वात्पदार्थानाम् । यद्येकं सर्वान्तरं ब्रह्मात्मा मुख्य इतरेणासर्वान्तरेणानात्मनामुख्येनावश्यं भवितव्यम् । तस्मादेकस्यैव द्विःश्रवणं विशेषविवक्षया। यत्तु पूर्वोक्तेन समानं द्वितीये प्रश्नान्तर उक्तं तावन्मात्रं पूर्वस्यैवानुवादस्तस्यैवानुक्तः कश्चिद्विशेषो वक्तव्य इति । कः पुनरसौ विशेष इति । उच्यते । पूर्वस्मिन्प्रश्नेऽस्ति व्यतिरिक्त

---

रच्या शरीराचे ठिकाणीं दोन आत्मे असणें संभवत नाहीं. देह व इंद्रियें यांचा एक समुदाय एका आत्म्याच्या योगानें आत्मवान् आहे (व शरीर या नात्यानें भेद नसल्यामुळें सर्व देह एकाच आत्म्यानें युक्त आहेत). ह्यामुळें उषस्ताचा आत्मा वेगळा आणि कहोलाचा आत्मा वेगळा असा स्वभावतः आत्मभेद होण्याचा संभव नाहीं. कारण, दोहोंचे ठिकाणीं अगौणत्व, आत्मत्व व सर्वान्तरत्व हीं असणें शक्य नाहीं. दोहोंपैकीं एक ब्रह्म जर मुख्य असेल तर दुसरें गौण अवश्य असलेंच पाहिजे. आत्मत्व व सर्वान्तरत्व ह्यांचीही गोष्ट अशीच आहे. तात्पर्य, एक सर्वांतर ब्रह्म जर मुख्य आत्मा असेल तर दुसरें असर्वांतर, अनात्मा व अमुख्य असें अवश्य असलेंच पाहिजे. तस्मात्, एकाच मुख्य ब्रह्मासंबंधानें कांहीं विशेष सांगण्याकरितां दोनवेळ प्रश्न श्रुतीमध्यें पठित आहे. आतां उषस्तब्राह्मणांतीलच मजकूर कहोलब्राह्मणामध्यें आला आहे हें खरें; परंतु, ह्या कहोलब्राह्मणांत जेथपर्यंत पूर्वीच्या ब्राह्मणांतील मजकूर आहे तेथपर्यंत पूर्वीचाच अनुवाद आहे आणि पुढें त्याच आत्म्याविषयीं कांहीं विशेष सांगावयाचें आहे. तें

आत्मा यस्यायं सप्रयोजको बन्ध उक्त इति । द्वितीये तु तस्यैवात्मनोशनायादिसंसारधर्मातीतत्वं विशेष उच्यते । यद्विशेषपरिज्ञानात्संन्याससहितात्पूर्वोक्ताद्बन्धनाद्विमुच्यते । तस्मात्प्रश्नप्रतिवचनयोरेष त आत्मेत्येवमन्तयोस्तुल्यार्थतैव । ननु कथमेकस्यैवात्मनोशनायाद्यतीतत्वं तद्वत्त्वं चेति विरुद्धधर्मसमवायित्वमिति ।न। परिहृतत्वात् ।नामरूपविकारकार्यकरणलक्षणसंघातोपाधिभेदसंपर्कजनितभ्रान्तिमात्रं हि संसारित्वमित्यसकृदवोचाम । विरुद्धश्रुतिव्याख्यानप्रस-

---

विशेष तरी काय सांगावयाचें आहे? ह्मणून प्रश्न कराल तर सांगतों. ज्याचें हें संसाररूप बंधन कारणांसहवर्तमान सांगितलें तो आत्मा देहादिकांहून भिन्न आहे असें पूर्वींच्या प्रश्नामध्यें सांगितलें. आतां ह्या दुसऱ्या प्रश्नामध्यें " क्षुधाप्रभृति संसारधर्मांचा संपर्क नाहीं " ह्मणून त्याच आत्म्यासंबंधानें विशेष सांगितलें आहे. ह्या विशेष गोष्टींचें ज्ञान संन्यासपूर्वक झालें असतां मुमुक्षु पुरुष पूर्वीं सांगितलेल्या संसाररूप बंधनापासून मुक्त होतो. तस्मात् , " एष त आत्मा सर्वान्तरः " येथपर्यंत दोन्ही ठिकाणच्या प्रश्नप्रतिवचनांतील अर्थ एकसारखाच आहे आणि विशेष ह्मणून जें कांहीं सांगावयाचें आहे तें " योशनायापिपासे " येथपासून पुढें सांगितलें आहे. आतां " जीव व परमात्मा ह्यांविषयीं अनुक्रमें दोन प्रश्न जर न मानिले तर क्षुधादि संसारधर्मांचा संपर्क नसणें व असणें ह्या दोन परस्परविरुद्ध गोष्टी एकाच आत्म्याचे ठिकाणीं संभवनीय नाहींत " ह्मणून जर कोणी शंका करील तर त्या शंकेचा परिहार पूर्वींच होऊन गेलेला आहे. कारण, नामरूपांचा विकार ह्मणून जो देहेंद्रियसमुदायरूप उपाधिभेद त्या ठिकाणीं " हा मी व हें माझें " अशा प्रकारच्या अध्यासामुळें मी कर्ता, मी भोक्ता अशी जी उत्पन्न झालेली भ्रांति ह्या पलीकडे संसार ह्मणून कांहीं एक नाहीं

ङ्गेन च । यथा रज्जुशुक्तिकागगनादयः सर्परजतमलिना भवन्ति पराध्यारोपितधर्मविशिष्टाः स्वतः केवला एव रज्जुशुक्तिकागगनादयः । न चैवं विरुद्धधर्मसमवायित्वे पदार्थानां कश्चन विरोधः।नामरूपोपाध्यस्तित्व एकमेवाद्वितीयं नेह नानास्ति किंचनेति श्रुतयो विरुध्येरन्निति चेन्न । सलिलफेनदृष्टान्तेन परिहृतत्वान्मृदादिदृष्टान्तैश्च । यदा तु परमार्थदृष्ट्या परमात्मतत्त्वाच्छ्रुत्यनुसारिभिरन्यत्वेन निरूप्यमाणे

---

असें अनेक वेळां पूर्वी सांगितलेलें आहे आणि सामान्य व विशेष असा श्रुतिविभाग सांगत असतांना प्रसंगोपात्त मधुब्राह्मणाचे शेवटीं आत्म्याचें संसारित्व मिथ्या असल्याचें विशेषेंकरून दर्शविलें आहे. आतां " वस्तुतः संसारित्व व असंसारित्व असा विरुद्ध प्रकार जर आत्म्याचे ठिकाणीं नाहीं तर तो असल्यासारखें कां वाटतें " अशी शंका कोणी घेतल्यास ती टिकणार नाहीं. कारण, ज्याप्रमाणें रज्जु, शुक्ति, गगन इत्यादिक दुसऱ्या पुरुषाच्या अज्ञानामुळेंच अनुक्रमें सर्प, रौप्य व मालिन्ययुक्त होत असून वस्तुतः केवळ रज्जु, शुक्ति, गगन इत्यादिकच असतात त्याचप्रमाणें मुक्त अशा आत्म्याचे ठिकाणीं बद्धत्वादि धर्म भ्रांतिमूलक कल्पिलेले असतात. तात्पर्य, अशाप्रकारच्या भ्रांतीमुळें पदार्थांचे ठिकाणीं जर परस्परविरुद्ध धर्म दिसूं लागले तर तो वास्तविक विरोध नव्हे. नाम व रूप ही उपाधि जर आहे तर " एकमेवाद्वितीयम् ", " नेह नानास्ति किंचन " इत्यादि श्रुतींना विरोध येऊं लागेल ह्मणून ह्मणाल तर तें योग्य होणार नाहीं. कारण, फेंस वगैरे उदकाहून भिन्न नाहीं व त्याचप्रमाणें घटादिविकारही मृत्तिकेहून भिन्न नाहींत इत्यादि दृष्टांतांनीं त्याचा परिहार केला आहे. सारांश, " एकमेवाद्वितीयम् ", " नेह नानास्ति किंचन " इत्यादि श्रुतींना अनुसरून चालणारे लोक जेव्हां वस्तुतः खऱ्या खऱ्या दृष्टीनें पाहूं लागले असतां परमार्थ तत्त्वाहून

**नामरूपे मृदादिविकारवद्वस्त्वन्तरे तत्त्वतो न स्तः सलिलफेनघटादिविकारवदेव तदा तदपेक्ष्यैकमेवाद्वितीयं नेह नानास्ति किंचनेत्यादिपरमार्थदर्शनगोचरत्वं प्रतिपद्यते । यदा तु स्वाभाविक्याविद्यया ब्रह्मस्वरूपं रज्जुशुक्तिकागगनस्वरूपवदेव स्वेन रूपेण वर्तमानं केनचिदस्पृष्टस्वभावमपि सन्नामरूपकृतकार्यकरणोपाधिभ्यो विवेकेनावधार्यते नामरूपोपाधिदृष्टिरेव च भवति स्वाभाविकी तदा सर्वोयं वस्त्वन्तरास्तित्वव्यवहारः । अस्ति चायं भेदकृतो मिथ्याव्यवहारो**

---

भिन्न ह्मणून नामरूपांचें निरूपण करूं लागतात आणि ह्मणूनच जेव्हां जल, मृत्तिका इत्यादिकांच्या विकारांप्रमाणें ह्मणजे फेंस, घट इत्यादि विकारांप्रमाणें नामरूपें हीं वेगळ्या वस्तु असूं शकत नाहींत तेव्हां त्या परमात्मतत्त्वाला अनुलक्षून असलेल्या “ एकमेवाद्वितीयम् ” , “ नेह नानास्ति किंचन ” इत्यादिश्रुति खऱ्या खऱ्या अर्थाला विषयीभूत होतात. रज्जु, शुक्तिका व गगन हीं स्वस्वरूपानेंच विद्यमान असतांना ज्याप्रमाणें भ्रांतीमुळें अनुक्रमें सर्प, रजत व मालिन्ययुक्त भासूं लागतात त्याचप्रमाणें वस्तुतः कशाचाही संपर्क नसतांना स्वाभाविक अविद्येच्या योगानें ब्रह्मस्वरूप जेव्हां नामरूपनिमित्तक कार्यकरणरूप उपाधींहून भिन्न असल्याचें विवेकानें निश्चित होत नाहीं ह्मणजे नामरूपनिमित्तक उपाधिदृष्टिच जेव्हां स्वाभाविक असते तेव्हां ब्रह्मव्यतिरिक्तवस्तूविषयीं असलेला हा सर्व अस्तित्वव्यवहार विद्यमान असतो. ( आतां “ स्वाभाविक अविद्येच्या योगानें ब्रह्म जेव्हां उपाधींपासून वेगळेपणानें निश्चित होत नाहीं तेव्हांच लौकिक व्यवहार असतो असें जर असेल तर विवेकी पुरुषांचें ठिकाणीं हा लौकिक व्यवहार नसलाच पाहिजे ” अशी एक शंका ह्या ठिकाणीं येतें ; परंतु, तिचें समाधानही थोडक्यांतच होत असतें. कारण, ) ज्यांच्या मतानें ब्रह्मतत्त्वाहून अन्य वस्तु आहे

**येषां ब्रह्मतत्त्वादन्यत्वेन वस्तु विद्यते येषां च नास्ति । परमार्थवादिभिस्तु श्रुत्यनुसारेण निरूप्यमाणे वस्तुनि किं तत्त्वतोस्ति वस्तु किं वा नास्तीति ब्रह्मैकमेवाद्वितीयं सर्वसंव्यवहारशून्यमिति निर्धार्यते तेन न कश्चिद्विरोधः । न हि परमार्थावधारणनिष्ठायां वस्त्वन्तरास्तित्वं प्रतिपद्यामहे । एकमेवाद्वितीयमनन्तरमबाह्यमिति श्रुतेः । न च नामरूपव्य-**

---

त्या अविवेक्यांचे ठिकाणीं आणि ज्यांच्या मतानें ब्रह्मतत्त्वाहून अन्य वस्तु नाहीं त्या विवेकी पुरुषांचे ठिकाणींही हा भेदाभासनिमित्तक मिथ्या व्यवहार सारखाच असतो. विवेकी पुरुषांचे ठिकाणीं ब्रह्माहून इतर वस्तूच्या अस्तित्वाविषयीं अभिनिवेश नसतो हा मात्र ह्या दोहोंमध्यें फरक आहे. ( ज्याप्रमाणें भास होतो त्याप्रमाणें खरोखरच ब्रह्माहून इतर वस्तु कां नसेल ? अशी शंका उपयोगी नाहीं व त्या शंकेमुळें अद्वैतविषयक श्रुतींशीं वस्तुतः विरोध येण्याचा संभवही नाहीं. कारण, ) श्रुतीच्या अनुरोधानें परमार्थदृष्ट्या वस्तूविषयीं वाटाघाट करणारे लोक खरोखर दुसरी वस्तु आहे किंवा नाहीं असा जेव्हां विचार करूं लागतात तेव्हां सर्वव्यवहारशून्य असें एक अद्वितीय ब्रह्मच असल्याचें निश्चित होतें व त्यामुळें कसलाही विरोध रहात नाहीं. (कारण, व्यावहारिक दृष्टीचें अवलंबन केलें असतां भेदनिमित्तक मिथ्या व्यवहार सिद्ध होत असून परमार्थदृष्टीचें अवलंबन केलें असतां भेदाभावविषयक शास्त्रीय व्यवहार सिद्ध होतो आणि म्हणून कसलाही विरोध शिलक रहात नाहीं ). आम्ही परमार्थदृष्ट्या निश्चय करूं लागलों असतां ब्रह्मातिरिक्त वस्तूचें अस्तित्व आमच्या आढळण्यांत येत नाहीं. कारण, “ एकमेवाद्वितीयम् ” , “ अनन्तरमबाह्यम् ” अशी श्रुति आहे. ( तात्पर्य, विद्यावस्थेमध्यें शास्त्रीय असा अभेदव्यवहार वास्तविक असून भेदव्यवहार केवळ भासमात्र असतो. )

सर्वान्तरः कतमो याज्ञवल्क्य सर्वान्तरो योश-

---

वहारकाले त्वविवेकिनां क्रियाकारकफलादिसंव्यवहारो नास्तीति प्रतिषिध्यते । तस्माज्ज्ञानाज्ञाने अपेक्ष्य सर्वः संव्यवहारः शास्त्रीयो लौकिकश्च । अतो न काचन विरोधशङ्का। सर्ववादिनामप्यपरिहार्यः परमार्थसंव्यवहारकृतो व्यवहारः। तत्र परमार्थात्मस्वरूपमपेक्ष्य प्रश्नः पुनः कतमो याज्ञवल्क्य सर्वान्तर इति । प्रत्याहेतरो योशनायापिपासे । अशितुमिच्छाशनाया । पातुमिच्छा पिपासा । ते अशनायापिपासे योत्येतीति वक्ष्यमाणेन संबन्धः । अविवेकिभिस्तलमलवदिव

---

नामरूपांचा व्यवहार जेव्हां असतों तेव्हां अविवेकी पुरुषांचे ठिकाणीं क्रिया, कारक, फल इत्यादिविषयक व्यवहार नसतो असा निषेधही केलेला नाहीं. तस्मात्, ज्ञानाची अपेक्षा धरून सर्वप्रकारचा शास्त्रीय व्यवहार आत्म्याचे ठिकाणीं होत असतो आणि अज्ञानाची अपेक्षा धरून सर्वप्रकारचा लौकिक व्यवहारही त्याचे ठिकाणीं होत असतो ह्यामुळें कसलीही विरोधाबद्दल शंका रहात नाहीं. ज्ञान व अज्ञान ह्यांवर अनुक्रमें शास्त्रीय व लौकिक व्यवहार अवलंबून असतो हें केवळ आह्मी ह्मणतों इतकेंच नव्हें; परंतु, परमार्थदृष्टच्या ठरणारी ही गोष्ट सर्व परीक्षकांना संमत आहेच आहे. असो. कल्पित व वास्तविक अशीं जीं आत्मरूपें त्यांपैकीं वास्तविक आत्मस्वरूपाला उद्देशून " कतमो याज्ञवल्क्य सर्वान्तरः " हा प्रश्न आहे व ह्या प्रश्नाला " योशनायापिपासे " इत्यादि याज्ञवल्क्यमुनींनीं उत्तर दिलें आहे. अशनाया ह्मणजे खाण्याची इच्छा व पिपासा ह्मणजे पिण्याची इच्छा. " योशनायापिपासे " ह्या पदांचा संबंध पुढें येणाऱ्या " अत्येति " ह्या क्रियापदाशीं आहे. तल व मल ह्यांचा आकाशाशीं वास्तविक कांहीं एक संबंध नसतो. ह्यामुळें ज्याप्रमाणें विवेकशून्य पुरुष

नायापिपासे शोकं मोहं जरां मृत्युमत्येत्यतं वै

गगनं गम्यमानमेव तलमलं अत्येति परमार्थतस्ताभ्यामसंसृष्टस्वभावत्वात् । तथा मूढैरशनायापिपासादिमद्ब्रह्म गम्यमानमपि क्षुधितोहं पिपासितोहमिति ते अत्येत्येव परमार्थतस्ताभ्यामसंसृष्टस्वभावत्वात् । न लिप्यते लोकदुःखेन बाह्य इति श्रुतेः । अविद्वल्लोकाध्यारोपितदुःखेनेत्यर्थः । प्राणैकधर्मत्वात्समासकरणमशनायापिपासयोः । शोकं मोहं शोक इति काम इष्टं वस्तूद्दिश्य चिन्तयतो यदरमणं तत्तृष्णाभिभूतस्य कामबीजं तेन हि कामो दीप्यते । मोहस्तु विपरीतप्रत्ययप्र-

---

आकाशाला तलमलांनीं युक्त मानूं लागले असतांही तें त्यांपासून अलिप्तच असतें त्याचप्रमाणें क्षुधा व तृषा ह्यांच्याशीं ब्रह्माचा कांहीं एक संबंध नसल्यामुळें " मी क्षुधित आहें, मी तृषाक्रांत झालों आहें " अशा-प्रकारें मूढ जन ब्रह्माला क्षुधा व तृषा ह्यांनीं युक्त समजत असूनही तें वास्तविक त्यांपासून अलिप्त असतें. कारण, " हा असंग आत्मा लोक-दुःखानें लिप्त होत नाहीं " अशी श्रुति आहे. " अज्ञानी लोकांनीं आरोपित केलेल्या दुःखानें " हा " लोकदुःखेन " ह्या पदाचा अर्थ होय. अशनाया व पिपासा हे दोन्ही एका प्राणाच्याच आश्रयाला राहणारे धर्म असल्या-मुळें " अशनायापिपासे " असा समास वरील श्रुतींत केलेला आहे. " शोकं मोहं " ह्या पदांचाही संबंध " अत्येति " ह्या क्रियापदाशीं आहे. शोक ह्मणजे काम. इष्ट वस्तूला उद्देशून चिंतन चाललें असतां चित्ताचें जें अस्वास्थ्य तेंच वासनाक्रांत मनुष्याच्या इच्छेचें बीज होय. कारण, अस्वास्थ्याच्या योगानें काम वृद्धिंगत होतो. अनित्य, अशुचि, दुःखमय आणि अनात्मरूप अशा शरीरादिकांविषयीं नित्य, शुचि, सुखमय व आत्मरूप अशी विपरीत समजूत होऊन तिच्या योगानें कर्तव्याकर्तव्यांविषयीं जो मनामध्यें अविवेक ह्मणजे भ्रम उत्पन्न

भवोविवेको भ्रमः । स चाविद्या सर्वस्यानर्थस्य प्रसवबीजम् । भिन्नकार्यत्वात्तयोः शोकमोहयोरसमासकरणम् । तौ मनोधिकरणौ । तथा शरीराधिकरणौ जरां मृत्युं चात्येति। जरेति कार्यकरणसंघातविपरिणामो वलीपलितादिलिङ्गः। मृत्युरिति तद्विच्छेदो विपरिणामावसानः । तौ जरामृत्यू शरीराधिकरणावत्येति । येऽशनादयः प्राणमनःशरीराधिकरणाः प्राणिष्वनवरतं वर्तमाना अहोरात्रादिवत्समुद्रोर्मिवच्च प्राणिषु संसार इत्युच्यते । योऽसौ दृष्टेर्द्रष्टेत्यादिलक्षणः साक्षादव्यवहितोपरोक्षादगौणः सर्वान्तर आत्मा ब्रह्मादिस्तम्बप-

---

होतो तो शोक होय. तो भ्रमसंज्ञक शोक हीच सर्व अनर्थांच्या उत्पत्तीचें बीज असलेली अविद्या होय. शोक व मोह ह्यांचीं कार्यें भिन्न असल्यामुळें त्या शब्दांचा समास श्रुतीमध्यें केलेला नाहीं. शोक व मोह हे मनाच्या आश्रयाला असलेले धर्म आहेत, आत्मा प्राणाच्या आश्रयाला असलेल्या क्षुधातृषांप्रमाणें ह्या शोकमोहांनींही अलिप्त असतो आणि त्याचप्रमाणें जरा व मृत्यु हे जे शरीराश्रित धर्म त्यांपासूनही तो मुक्त असतो. अंगाला सुरकुत्या पडून केंस वगैरेंच्या ठिकाणीं पांढुरकेपणा येणें इत्यादिप्रकारचा जो शरीरामध्यें होणारा फेरफार त्याला जरा असें ह्मणतात. कार्य व करण ह्यांचा जो विच्छेद ह्मणजे स्थूल शरील व लिंगशरीर ह्यांचा जो वियोग त्याला मृत्यु असें ह्मणतात. शरीराच्या आश्रयाला असलेले जे हे जरामृत्युसंज्ञक धर्म ह्यांपासून आत्मा अलिप्त असतो. अशनाया व पिपासा, शोक व मोह आणि जरा व मृत्यु हे जे अनुक्रमें प्राण, मन व देह ह्यांचे धर्म अहोरात्रादिकांप्रमाणें आणि समुद्राच्या लाटाप्रमाणें प्राणिमात्रांचे ठिकाणीं एकसारखे विद्यमान असतात त्याला त्या त्या प्राण्यांचे ठिकाणीं संसार असें ह्मणतात. असो. दृष्टेर्द्रष्टा इत्यादि पूर्वोक्त लक्षणांनीं युक्त, साक्षात् ह्मणजे

तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तै-

र्यन्तानां भूतानामशनायापिपासादिभिः संसारधर्मैः सदा न स्पृश्यत आकाश इव घनादिमलैः । तमेतं वा आत्मानं स्वं तत्त्वं विदित्वा ज्ञात्वायमहमस्मि परं ब्रह्म सदा सर्वसंसार-विनिर्मुक्तं नित्यतृप्तमिति ब्राह्मणाः । ब्राह्मणानामेवाधिकारो व्युत्थानेतो ब्राह्मणग्रहणम् । व्युत्थाय वैपरीत्येनोत्थानं कृत्वा । कुत इत्याह । पुत्रैषणायाः पुत्रार्थैषणा पुत्रैषणा । पुत्रेणेमं लोकं जयेयमिति लोकजयसाधनं पुत्रं प्रतीच्छैषणा दारसं-

व्यवधान रहित, अपरोक्षात् ह्मणजे अगौण व ब्रह्मादिकापासून तों स्तंबाप-र्यंत असलेला असा जो प्राणिमात्रांच्या आंत असलेला आत्मा तो आकाश ज्याप्रमाणें मेघादिकांच्या मलांनीं लिप्त होत नाहीं त्याप्रमाणें अश-नाया, पिपासा इत्यादि संसारधर्मांच्या योगानें कधींहीं लिप्त होत नाहीं. तो हा आत्मा ह्मणजे स्वतत्व जाणिल्यानंतर ह्मणजे “ सर्वदा सर्वप्रकारच्या संसारधर्मांपासून मुक्त व नित्यतृप्त असें जें परब्रह्म तें हा मीच आहें ” अशाप्रकारचें ज्ञान झाल्यानंतर ब्राह्मणांनीं तिन्ही एषणांचा त्याग करून परमहंसाश्रमाचें अवलंबन करावें. परमहंससंन्यासाविषयीं ब्राह्मणाचाच अधिकार असल्यामुळें श्रुतीमध्यें “ ब्राह्मणाः ” असें ह्मटलें आहे. —हें आपल्या उद्देशाला विरुद्ध आहे असें समजून त्यापासून परावृत्त झाल्यावर—हा “ व्युत्थाय ” ह्या शब्दाचा अर्थ होय. परावृत्त कशापा-सून तें “ पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च ” ह्या पदांनीं सांगितलें आहे. “ सोयं मनुष्यलोकः पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा ” ह्या श्रुतीच्या अनुरोधानें “ पुत्राच्या योगानें मी हा मनुष्य लोक साध्य करून घेईन ” अशी—इहलोकप्राप्तीचें साधन असलेल्या—पुत्रा-विषयीं जी एषणा ह्मणजे अर्थात् स्त्रीपरिग्रह ती पुत्रैषणा होय. “ पुत्रै-षणायाश्च ” ह्या पदांचा अन्वय “ व्युत्थाय ” ह्या पदाशीं आहे.

षणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं

ग्रहः । दारसंग्रहमकृत्वेत्यर्थः । वित्तैषणायाश्च कर्मसाधनस्य गवादेरुपादानमनेन कर्म कृत्वा पितृलोकं जेष्यामीति विद्यासंयुक्तेन वा देवलोकं केवलया वा हिरण्यगर्भविद्यया दैवेन वित्तेन देवलोकम् । दैवाद्वित्ताद्व्युत्थानमेव नास्तीति केचित् । यस्मात्तद्बलेन हि किल व्युत्थानमिति तदसत् । एतावान्वै काम इति पठितत्वादेषणामध्ये दैवस्य वित्तस्य ।

" पुत्रैषणायाश्च व्युत्थाय " ह्या तिन्ही पदांचा अर्थ—स्त्रीपरिग्रह करण्यापासून परावृत्त झाल्यावर—असा आहे. " वित्तैषणायाश्च " ह्याचाही अन्वय " व्युत्थाय " ह्या पदाकडे आहे. वित्त दोन प्रकारचें आहे ; मानुष आणि दैव. कर्माला साधनीभूत असलेल्या धेनूचा वगैरे संग्रह तें मानुष वित्त होय. ह्या मानुषवित्तानें कर्म करून मी पितृलोक प्राप्त करून घेईन अशी जी इच्छा ती वित्तैषणा होय. हिरण्यगर्भादिदेवताविषयक विद्या ह्मणजे ज्ञान हें दैव वित्त होय. तेव्हां ह्या विद्यारूप दैव वित्तानें युक्त जें कर्म त्याच्या योगानें अथवा केवल दैव वित्ताच्याच योगानें मी देवलोक प्राप्त करून घेईन अशी जी इच्छा तीही वित्तैषणा होय. " ह्या व्याख्यानानें लोकैषणात्यागही सांगितल्याचें समजावें " ह्मणून भाष्यटीकाकार आनंदगिरि ह्मणतात. " ज्याअर्थी दैव वित्ताच्या बलानें व्युत्थान होणारें असतें त्याअर्थी दैव वित्तापासून व्युत्थानच नाहीं " असें कांहीं ह्मणतात ; परंतु, तें अयोग्य आहे. कारण,—जाया, पुत्र, वित्त व कर्म हाच कामनाविषय होय—अशा अर्थाची " एतावान्वै कामः " अशी श्रुति असल्यामुळें दैव वित्ताचें परिगणन एषणांमध्यें केल्याचें अर्थात् सिद्ध होत आहे. ( आतां " विद्या हें दैववित्त ह्मणून ठरलेलें आहे, दैववित्तापासून व्युत्थान अवश्यक असल्याचें " एतावान्वै कामः " ह्या श्रुतिवरून होत आहे आणि ब्रह्मविद्याही विद्याच अस-

**हिरण्यगर्भादिदेवताविषयैव विद्या वित्तमित्युच्यते देवलोकहेतुत्वात् । न हि निरुपाधिकप्रज्ञानघनविषया ब्रह्मविद्या देवलोकप्राप्तिहेतुः । तस्मात्तत्सर्वमभवदात्मा ह्येषां स भवतीति श्रुतेः । तद्बलेन हि व्युत्थानम् । एतं वै तमात्मानं विदित्वेति विशेषवचनात् । तस्मात्त्रिभ्योऽप्येतेभ्योनात्मलोकप्राप्तिसाधनेभ्य एषणाविषयेभ्यो व्युत्थाय । एषणा कामः । एतावान्वै**

---

त्याकारणानें तिचा दैव वितामध्यें अंतर्भाव होत असल्यामुळें तिच्यापासूनही व्युत्थान अवश्य आहे असें होणार आणि असें झालें ह्मणजे मूले कुठारः अशी मुमुक्षूची स्थिति होणार " ह्मणून जर कोणी शंका करील तर ती योग्य होणार नाहीं. कारण, ) हिरण्यगर्भादिदेवताविषयकच जी विद्या ह्मणजे उपासनाज्ञान त्याला दैव वित्त असें ह्मणतात. कारण, तेंच देवलोकप्राप्तीला कारणीभूत आहे. ( हिरण्यगर्भविद्येप्रमाणें ब्रह्मविद्याही देवलोकप्राप्तीचें कारण आहे ह्मणून ह्मणाल तर तें ह्मणणें योग्य नाहीं. कारण ) उपाधिरहित आणि केवळ ज्ञानमय असा जो आत्मा तद्विषयक जी ब्रह्मविद्या ती देवलोकप्राप्तीचें कारण होणार नाहीं. " तस्मात्तत्सर्वमभवत् ", " आत्मा ह्येषां स भवति " असें ब्रह्मविद्येचें फल श्रुतीमध्यें वेगळें सांगितलें आहे, तीन एषणांपासून त्या ब्रह्मविद्येच्याच बलानें व्युथान होणारें आहे आणि ह्या आमच्या ह्मणण्याला " एतं वै तमात्मानं विदित्वा " ही विशेष श्रुति प्रमाण आहे. तस्मात्, आत्मज्ञान झाल्यानंतर आत्मबाह्य लोकांच्या प्राप्तीला साधनीभूत असलेल्या ह्या तिन्हीही एषणाविषयांपासून परावृत्त होऊन ब्राह्मणांनीं भिक्षाचरणाचें ह्मणजे परमहंसाश्रमाचें अवलंबन करावें " असा " एतं वै० भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीचा अर्थ होय. " ( आत्मैवेदमग्र आसीदेक एव सोकामयत जाया मे स्या दथ प्रजायेयाथ वित्तं मे स्यादथ कर्म कुर्वीयेति ) एतावान्वै कामः " अशी श्रुति असल्यामुळें एषणाशब्दाचा

चरन्ति या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवत-

काम इति श्रुतेः । एतस्मिंस्त्रिविधेनात्मलोकप्राप्तिसाधने तृष्णामकृत्वेत्यर्थः । सर्वा हि साधनेच्छा फलेच्छैव । अतो व्याचष्टे श्रुतिरेकैवैषणेति । कथम् । या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा । दृष्टफलसाधनत्वतुल्यत्वात् । या वित्तैषणा सा लोकैषणा । फलार्थैव सा । सर्वः फलार्थप्रयुक्त एव हि सर्वे

अर्थ ह्याठिकाणीं " काम " असा होतो. " अनात्म ह्मणजे आत्मबाह्य लोकांच्या प्राप्तीचें जें हें तिन्हीप्रकारचें साधन त्याची इच्छा न करितां " हा " पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थाय " एवढ्याचा अर्थ होय. ( साधनाची इच्छा असून त्या साधनानें प्राप्त होणाऱ्या फलाची इच्छा नसणें संभवनीय नसल्यामुळें ) कोणत्याही साधनेच्छेचा अंतर्भाव फलेच्छेमध्येंच असणार हें उघड आहे आणि ह्मणूनच ह्या तिन्ही एषणा मिळून एकच एषणा असें व्याख्यान श्रुतीनें केलें आहे. व्याख्यान कसें केलें आहे ह्मणून ह्मणाल तर पहा. धन आणि अनुष्ठान ह्यांवांचून पुरुषार्थप्राप्ति होत नाहीं आणि स्त्रीपरिग्रह केल्यावांचून अनुष्ठान होण्याचा संभव नाहीं. तेव्हां पुरुषार्थप्राप्तीची वित्त आणि स्त्रीपरिग्रह हीं सारखींच साधनें आहेत. सारांश, वित्तैषणा ह्मणजे धनप्राप्तीची इच्छा स्त्रीपरिग्रह केलेल्या पुरुषाचीच परिपूर्ण होण्याचा संभव आहे. तेव्हां पुत्रैषणा व वित्तैषणा ह्या उभयतांमध्यें परस्पर कार्यकारणभाव असल्यामुळें आणि हीं दोन्हीं लोकैषणेचीं सारखींच साधनें असल्यामुळें वस्तुतः भिन्न नाहींतच. त्याचप्रमाणें जी वित्तैषणा ती लोकैषणाच आहे. कारण, मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक हें जें फल त्या फलाच्या प्राप्तीचें वित्त हें साधन आहे. तेव्हां फलेच्छेमध्यें साधनेच्छेचा अंतर्भाव असल्यामुळें वित्तैषणा ही लोकैषणेहून भिन्न नाहीं. ती फलाकरितांच

साधनमुपादत्ते । अत एकैवैषणा या लोकैषणा सा साधनमन्तरेण संपादयितुं न शक्यत इति । साध्यसाधनभेदेनोभे हि यस्मादेते एषणे एव भवतः । तस्माद्ब्रह्मविदो नास्ति कर्म कर्मसाधनं वा । अतो येतिक्रान्ता ब्राह्मणाः सर्वं कर्म कर्मसाधनं च सर्वं देवपितृमानुषनिमित्तं यज्ञोपवीतादि । तेन हि दैवं पित्र्यं मानुषं च कर्म क्रियते निवीतं मनुष्याणामित्यादिश्रुतेः । तस्मात्पूर्वे ब्राह्मणा ब्रह्मविदो व्युत्थाय कर्मभ्यः

---

आहे. कोणीही झाला तरी फलप्राप्तीचा उद्देश मनांत बाळगूनच कोणत्याही साधनाचा अंगीकार करीत असतो ( तेव्हां फलेच्छेमध्यें साधनेच्छेचा अंतर्भाव होतोच हें उघड आहे ). ह्यास्तव, वास्तविक पाहूं गेलें असतां लोकैषणा हीच काय ती एक एषणा होय. ही एषणा साधनावांचून शेवटास जाणें शक्य नसल्यामुळें पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा ह्मणून ह्या एका लोकैषणेचाच तीन प्रकारांनीं निर्देश केलेला आहे. साध्य व साधन ह्या भेदानें वित्तैषणा आणि लोकैषणा ह्या भिन्न आहेत आणि ह्या दोहोंची ब्रह्मवेत्त्याला अवश्यकता नाहीं. तस्मात्, कर्माची अथवा कर्मसाधनांची ब्रह्मवेत्त्याला गरज नाहीं आणि ह्मणूनच " किं प्रजया करिष्यामः " इत्यादि श्रुतीनें दर्शविलेले जे गतकालीन ब्राह्मण त्यांना कोणत्याही कर्माची न दैवपितृमानुषनिमित्तक यज्ञोपवीतादि कर्मसाधनांची जरूर नव्हती. यज्ञोपवीतादि कर्मसाधनांच्या योगानें दैव, पित्र्य व मानुष हीं कर्में केलीं जातात. कारण, " निवीतं मनुष्याणां प्राचीनावीतं पितृणामुपवीतं देवानाम् " अशी श्रुति आहे. ह्यास्तव, पूर्वींच्या ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांप्रमाणें सांप्रतच्या ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांनींहीं कर्में व यज्ञोपवीतप्रभृति कर्मसाधनें ह्यांपासून परावृत्त होऊन आणि मोक्षप्राप्तीचा उद्देश मनामध्यें न धरितां केवळ चतुर्थाश्रमाचा मात्र अवलंब करणाऱ्यांना उपजीविकेचें साधन होत

कर्मसाधनेभ्यश्च यज्ञोपवीतादिभ्यः परमहंसपारिव्राज्यं प्रतिपद्य भिक्षाचर्यं चरन्ति भिक्षार्थं चरणं भिक्षाचर्यं चरन्ति त्यक्त्वा स्मार्तं लिङ्गं केवलमाश्रममात्रशरणानां जीवनसाधनं पारिव्राज्यव्यञ्जकम् । विद्वाल्लिँङ्गवर्जितः । तस्मादलिङ्गो धर्मज्ञोऽव्यक्तलिङ्गोऽव्यक्ताचार इत्यादिस्मृतिभ्यः । अथ परिव्राड्विवर्णवासा मुण्डोपरिग्रह इत्यादिश्रुतेः सशिखान्केशान्निकृत्य विसृज्य यज्ञोपवीतमिति च । ननु व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्तीति वर्तमानापदेशादर्थवादोऽयं न विधायकः प्रत्ययः कश्चिच्छ्रूयते लिङ्लोट्तव्यानामन्यतमोऽपि । तस्मादर्थवादमात्रेण श्रुतिस्मृतिविहितानां यज्ञोपवीतादीनां साधनानां न

असलेलें जें चतुर्थाश्रमप्रदर्शक त्रिदंडित्वादि स्मृत्युक्त चिन्ह त्याची अपेक्षा न करितां परमहंससंन्यासाची दीक्षा घेऊन शरीरधारणार्थ भिक्षाचर्याचें अवलंबन करावें. “ विद्वाल्लिँङ्गवर्जितः । तस्मादलिङ्गो धर्मज्ञोऽव्यक्तलिङ्गोऽव्यक्ताचारः ” इत्यादि स्मृति असल्यामुळें आणि “ अथ परिव्राड्विवर्णवासा मुण्डोपरिग्रहः ” व “ सशिखान्केशान्निकृत्य विसृज्य यज्ञोपवीतम् ” अशी श्रुति असल्यामुळें “ भिक्षाचर्यं चरन्ति ” ह्या पदांनीं सामन्य चतुर्थाश्रम न मानितां परमहंससंन्यासच विहित असल्याचें मानणें योग्य आहे. अहो,—“ व्युथायाथ भिक्षाचर्यं चरन्ति” ह्या श्रुतीमध्यें चरन्ति हा प्रयोग वर्तमानकालबोधक असल्यामुळें ही श्रुति अर्थवादरूप आहे. लिङ्, लोट व तव्य ह्यांपैकीं एकही विधिबोधक प्रत्यय ह्या श्रुतींत नाहीं. ह्यास्तव, केवळ अर्थवादाच्याच जोरावर श्रुतिस्मृतींनीं

१ आश्रमबोधक उपवीतादि चिन्हें ज्यांचे ठिकाणीं स्पष्ट नाहींत ते अव्यक्तलिंग व आश्रमविरुद्ध ज्यांचा आचार आहे ते अव्यक्ताचार असे जाबालोपनिषदावरील नारायणी दीपिकेंत लिहिलें आहे व अव्यक्तलिंग ह्मणजे ज्यांच्या कपाळीं पंचमुद्रादि चिन्हें स्पष्ट नसतात ते आणि अव्यक्ताचार ह्मणजे ज्यांचें शील व बरेंवाईट कर्म हीं समजून घेण्यासारखीं स्पष्ट नसतात ते असें शंकरानंद लिहितात.

शक्यते परित्यागः कारयितुम्। यज्ञोपवीत्येवाधीयीत याजयेद्यजेत वा । पारिव्राज्ये तावदध्ययनं विहितं वेदसंन्यसनाच्छूद्रस्तस्माद्वेदं न संन्यसेदिति । स्वाध्याय एवोत्सृज्यमानो वाचमिति चापस्तम्बः । ब्रह्मोज्झं वेदनिन्दा च कौटसाक्ष्यं सुहृद्वधः । गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षडिति वेदपरित्यागे दोषश्रवणात् । उपासने गुरूणां वृद्धानामतिथीनां होमे जप्यकर्मणि भोजन आचमने स्वाध्याये च यज्ञोपवीती स्यादिति परिव्राजकधर्मेषु च गुरूपासनस्वाध्यायभोजनाचमनादीनां कर्मणां श्रुतिस्मृतिषु कर्तव्यतया चोदितत्वाद्गुर्वाद्युपासनाङ्गत्वेन यज्ञोपवीतस्य विहितत्वात्तत्परि-

---

विहित असलेल्या यज्ञोपवीतादि कर्मसाधनांचा परित्याग करविणें शक्य नाहीं. यज्ञोपवीत असतांनाच अध्ययन, याजन अथवा यजन करावें अशा अर्थाची " यज्ञोपवीत्येवाधीयीत याजयेद्यजेत वा " ही श्रुति आहे आणि " वेदत्यागानें शूद्रत्व येतें; तस्मात्, वेदत्याग करूं नये " अशा अर्थाची " वेदसंन्यसनाच्छूद्रस्तस्माद्वेदं न संन्यसेत् " ही स्मृति आहे. वेदाध्ययनाकरितांच मात्र मौनाचा त्याग करावा असें सूत्रकार आपस्तंबमुनींनींही " स्वाध्याय एवोत्सृज्यमानो वाचम् " ह्या सूत्रांत सांगितलें आहे. " ब्रह्मोज्झं वेदनिन्दा च कौटसाक्ष्यं सुहृद्वधः । गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षट् " ह्या स्मृतिवचनांत वेदाचा परित्याग करण्याला दोष सांगितला आहे. " उपासने गुरूणां वृद्धानामतिथीनां होमे जप्यकर्मणि भोजन आचमने स्वाध्याये च यज्ञोपवीती स्यात् " ह्या वचनानें गुरुप्रभृतींची उपासना, होम, जप, भोजन, आचमन व वेदाध्ययन ह्यांचें अंग ह्मणून यज्ञोपवीताचें विधान असल्यामुळें आणि संन्यासिधर्मांमध्यें गुरूपासना, वेदाध्ययन, भोजन, आचमन इत्यादि कर्मांचें कर्तव्य ह्मणून परिगणन केलें असल्यामुळें यज्ञोपवीताचा परि-

त्यागो नैवावगन्तुं शक्यते । यद्यप्येषणाभ्यो व्युत्थानं विधीयत एव तथापि पुत्राद्येषणाभ्यस्तिसृभ्य एव व्युत्थानं न तु सर्वस्मात्कर्मणः कर्मसाधनाच्च व्युत्थानम् । सर्वपरित्यागे चाश्रुतं कृतं स्याच्छ्रुतं च यज्ञोपवीतादि हापितं स्यात् । तथा च महानपराधो विहिताकरणप्रतिषिद्धाचरणनिमित्तः कृतः स्यात् । तस्माद्यज्ञोपवीतादिलिङ्गपरित्यागोऽन्धपरंपरैव । न । यज्ञोपवीतं वेदांश्च सर्वं तद्वर्जयेद्यतिरिति श्रुतेः । अपि चात्मज्ञानपरत्वात्सर्वस्या उपनिषदः । आत्मा द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्य

---

त्याग करावा असें समजतां येणार नाहीं. शिवाय, एषणांपासून परावृत्त होण्याचा विधिच आहे असें जरी मानिलें तरी पुत्रादिविषयक तीन एषणांपासूनच परावृत्त होण्याचा विधि आहे असें मानिलें पाहिजे. सर्व कर्मांपासून आणि कर्मसाधनांपासून परावृत्त होण्याबद्दल विधि मानतां येणार नाहीं. ( आतां " एषणांपासून जर परावर्तन विहित असल्याचें कबूल आहे तर कर्म व कर्मसाधन ह्यांचा एषणांत अंतर्भाव होतच असल्यामुळें ह्यांपासून परावर्तन विहित असल्याचें अर्थात् सिद्धच आहे " ह्मणून ह्मणाल तर यज्ञोपवीतादि साधनांचा एषणांत अंतर्भाव करितां येणार नाहीं. कारण, ) सर्व कर्मांचा व कर्मसाधनांचा परित्याग केला असतां जें उक्त नाहीं त्याचा स्वीकार व जें यज्ञोपवीतादि साधन उक्त आहे त्याचा त्याग केल्यासारखें होणार आहे आणि असें झाल्यास विहिताकरण व प्रतिषिद्धसेवन एतन्निमित्तक जबरदस्त दोष केल्याचें माथीं येणार आहे. तस्मात् , यज्ञोपवीतादि आश्रमव्यंजक चिन्हांचा परित्याग करण्यांत येतो ही केवळ अंधपरंपराच आहे— अशी शंका कदाचित् कोणी ह्याठिकाणीं करतील; परंतु, ती अयोग्य आहे. कारण, " यज्ञोपवीतं वेदांश्च सर्वं तद्वर्जयेद्यतिः " अशी श्रुति आहे. शिवाय, दुसरें असें कीं हें सर्व बृहदारण्यकोपनिषद् आत्मज्ञानविषयक आहे. आत्मा दर्शनीय,

इति हि प्रस्तुतं स चात्मैव साक्षादपरोक्षात्सर्वान्तरोश-नायादिसंसारधर्मवर्जित इत्येवं विज्ञेय इति तावत्प्रसिद्धम् । सर्वा हीयमुपनिषदेवं परेति विध्यन्तरशेषत्वं तावन्नास्त्यतो नार्थवादः । आत्मज्ञानस्य कर्तव्यत्वात् । आत्मा चाशनाया-दिधर्मवान्न भवतीति साधनफलविलक्षणो ज्ञातव्यः । अतो-व्यतिरेकेणात्मनो ज्ञानमविद्या । अन्योसावन्योहमस्मीति न स वेद मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यत्येकधैवानुद्रष्टव्य-मेकमेवाद्वितीयं तत्त्वमसीत्यादिश्रुतिभ्यः । क्रियाफलं साधनं चाशनायादिसंसारधर्मातीतादात्मनोन्यदविद्याविषयं यत्र हि द्वैतमिव भवत्यन्योसावन्योहमस्मीति न स वेदाथ येन्यथातो

---

श्रवणीय व चिन्त्य आहे असा उपक्रम असून तो आत्माच व्यवधान-रहित, अगौण, सर्वांतर व क्षुधादिसंसारधर्मविरहित अशाप्रकारचा समजावा हें विशेषतः सिद्ध झालें आहे. ( सारांश, सर्व कर्मांचा व कर्मसाधनांचा त्याग करण्याविषयीं विधि आहे व त्या विधीच्याच बलानें संन्यास सिद्ध होत आहे ) तात्पर्य, हें सर्व उपनिषद् वर सांगितल्याप्रमाणें आत्मज्ञानविषयक असल्यामुळें ह्या श्रुतीला दुसऱ्या विधीचें शेषत्व तर नाहींच व ह्मणूनच " भिक्षाचर्यं चरन्ति " हा अर्थवादही नाहीं. कारण, आत्मज्ञानसंपादन कर्तव्यच आहे आणि आत्मा तर क्षुधादि-संसारविषयक धर्मांनीं युक्त नसल्यामुळें यज्ञोपवीतादि साधनांनीं प्राप्त होणाऱ्या फलाहून भिन्न समजणें अवश्यक आहे व ह्याहून दुसऱ्या प्रकारचा समज आत्म्याविषयीं असणें ही अविद्या आहे असें " अन्यो-सावन्योहमस्मीति० तत्त्वमसि " इत्यादि श्रुतींवरून सिद्ध होत आहे. त्याचप्रमाणें कर्मफल आणि कर्मसाधन हीं दोन्हीं अशनायादिधर्मांनीं अलिप्त असलेल्या आत्म्याहून भिन्न ह्मणजे अज्ञानविषयक असल्याचें " यत्र हि० ति । अन्यो० वेद । अथ० विदुः " इत्यादि शेंकडों श्रुति-

विदुरित्यादिवाक्यशतेभ्यः । न च विद्याविद्ये एकस्य पुरुषस्य सह भवतो विरोधात्तमःप्रकाशाविव । तस्मादात्मविदोविद्याविषयोधिकारो न द्रष्टव्यः क्रियाकारकफलभेदरूपः । मृत्योः स मृत्युमाप्नोतीत्यादिनिन्दितत्वात् । सर्वक्रियासाधनफलानां चाविद्याविषयाणां तद्विपरीतात्मविद्यया हातव्यत्वेनेष्टत्वात् । यज्ञोपवीतादिसाधनानां च तद्विषयत्वात् । तस्मादसाधनफलस्वभावादात्मनोन्यविषया विलक्षणैषणा । उभे ह्येते साधनफले एषणे एव भवतः । यज्ञोपवीतादेस्तत्साध्यकर्मणां च साधनत्वात् । उभे ह्येते एषणे एवेति हेतुवचने-

---

वचनांवरून सिद्ध होत आहे. ( आतां " कर्मफल व कर्मसाधन हीं जरी अज्ञानविषयक असलीं तरी ब्रह्मज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं तीं असण्याला काय चिंता आहे " ह्मणून शंका करावी तर ती टिकत नाहीं. कारण, ) ज्ञान व अज्ञान—ह्यांचा प्रकाश व अंधकार ह्यांप्रमाणें परस्परांशीं विरोध असल्यामुळें—हीं एकाच पुरुषाचे ठिकाणीं एकदम असण्याचा संभव नाहीं. तस्मात्, अज्ञानविषयक कर्माधिकार आत्मज्ञानी पुरुषाला आहे असें समजू नयें. कारण, "मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति " ह्या श्रुतीनें तें निंद्य मानिलें आहे. कोणतेंही कर्म, कर्मसाधन आणि कर्मफल अज्ञानविषयकच असल्यामुळें अज्ञानाशीं विरुद्ध जें आत्मज्ञान त्याच्या योगानें त्या अज्ञानविषयक कर्माचा वगैरे त्याग करणेंच इष्ट आहे आणि यज्ञोपवीतादि साधनें अज्ञानविषयकच आहेत. तात्पर्य, कर्मसाधन व कर्मफल ह्यांहून विलक्षण असलेल्या आत्म्याशीं पुरुषार्थप्राप्तीला विरुद्ध असलेल्या एषणेचा काहींएक संबंध नाहीं. कारण, कर्मसाधन व कर्मफल हीं दोन्हीं एषणाच आहेत. यज्ञोपवीतादिक साधनें व त्यांनीं सिद्ध होणारीं कर्मैं ह्या उभयतांचा साधनांमध्येंच अंतर्भाव होत असल्यामुळें आणि " उभे ह्येते एषणे एव भवतः" ह्या हेतुगर्भ श्रुतिवचनानें

नावधारणात् । यज्ञोपवीतादिसाधनात्तत्साध्येभ्यश्च कर्म-भ्योविद्याविषयत्वादेषणारूपत्वाच्च जिहासितव्यरूपत्वाच्च व्यु-त्थानं विधित्सितमेव। ननूपनिषद आत्मज्ञानपरत्वाद्व्युत्थानश्रु-तिस्तत्स्तुत्यर्था न विधिः । न। विधित्सितविज्ञानेन समानकर्तृ-कत्वश्रवणात्।न ह्यकर्तव्येन कर्तव्यस्य समानकर्तृकत्वेन वेदे कदाचिदपि श्रवणं संभवति।कर्तव्यानामेव ह्यभिषवहोमभक्षाणां यथा श्रवणमभिषुत्य हुत्वा भक्षयन्तीति तद्वदात्मज्ञानैषणाव्यु-त्थानभिक्षाचर्याणां कर्तव्यानामेव समानकर्तृकत्वश्रवणं भवेत्।

---

कर्मसाधन व कर्मफल हीं दोन्हीं एषणाच असल्याचें निश्चित केलें असल्या-मुळें यज्ञोपवीतादि कर्मसाधनें व त्या साधनांनीं सिद्ध होणारीं कर्में हीं सर्व अज्ञानविषयक, एषणारूप आणि ह्मणूनच त्याज्यस्वरूप असल्यामुळें त्यांपासून परावृत्त होण्याचा विधि ह्या ठिकाणीं इष्ट आहेच आहे. "अहो, हें सर्व उपनिषद् जर आत्मज्ञानविषयप्रतिपादनपर आहे तर व्युत्थानबोधक श्रुति त्या आत्मज्ञानाच्या प्रशंसेकरितां आहे; विधि नाहीं. " असें ह्मणाल तर तें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, विहित ह्मणून अभिमत असलेलें जें आत्मज्ञान त्याच्याशीं व्युत्थानाचें समानकर्तृकत्व श्रुत आहे. ह्मणजे आत्मज्ञानी आणि एषणांपासून व्युत्थान करणारा एकच ह्मणून श्रुती-मध्यें पठित आहे. ( ह्याकरितां, आत्मज्ञानाप्रमाणें व्युत्थानही विहित असल्याचें निर्विवाद आहे. ) कारण, कर्तव्य नसलेल्या गोष्टीशीं कर्तव्य असलेल्या गोष्टीचें समानकर्तृकत्व वेदामध्यें कोठेंही श्रुत असण्याचा संभव नाहीं. " हविर्धाने चर्मन्नधिग्रावभिरभिषुत्याहवनीये हुत्वा प्रत्यञ्चः परेत्य सदसि भक्षयन्ति " ह्या श्रुतीमध्यें जसें अभिषव, होम आणि भक्ष ह्या कर्तव्य गोष्टींचेंच समानकर्तृकत्व श्रुत आहे तसेंच आत्मज्ञान, एषणाव्युत्थान आणि भिक्षाचर्य ह्या कर्तव्य गोष्टींचेंच समान-कर्तृकत्व वरील बृहदारण्यक श्रुतीमध्यें पठित असणार हें उघड आहे.

**अविद्याविषयत्वादेषणात्वाच्चार्थप्राप्त आत्मज्ञानविधेरेव यज्ञोपवीतादिपरित्यागो न तु विधातव्य इति चेन्न । सुतरामात्मज्ञानविधिनैव विहितस्य समानकर्तृकत्वश्रवणेन दार्ढ्योपपत्तिस्तथा भिक्षाचर्यस्य च । यत्पुनरुक्तं वर्तमानापदेशादर्थवादमात्रमिति ।न। औदुम्बरयूपादिविधिसमानत्वाददोषः।**

---

" यज्ञोपवीतादि साधनांचा त्याग विहित आहे असें मानण्याचें प्रयोजनच नाहीं. कारण, यज्ञोपवीतादि साधनांचा अंतर्भाव एषणेंत होत असल्यामुळें व तीं साधनें अज्ञानविषयक असल्यामुळें आत्मज्ञानविधीच्या सिद्ध्यर्थ त्यांचा परित्याग अर्थातच प्राप्त आहे " अशीही शंका योग्य होणार नाहीं. यज्ञोपवीतादिकांचा परित्याग विहित आहे असें मानणेंच इष्ट आहे. कारण, विधि मानिला ह्मणजे आत्मज्ञानविधिबलानें प्राप्त झालेला जो यज्ञोपवीतादि साधनांचा त्याग आणि कर्तव्य असें आत्मज्ञान ह्या दोहोंचा कर्ता एकच असल्याचें श्रुत असल्यामुळें यज्ञोपवीतादिसाधनांचा त्याग करण्याची अवश्यकता अतिशयच सिद्ध होते आणि त्याचप्रमाणें भिक्षाचर्यही आत्मज्ञानी पुरुषानेंच कर्तव्य असल्यामुळें त्याचीही तशीच अवश्यकता सिद्ध होते. आतां " भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या ठिकाणीं " चरन्ति " हा प्रयोग वर्तमानकालबोधक असल्यामुळें ह्या व्युत्थान श्रुतीचें तात्पर्य अर्थवादाकडे आहे " अशी जी शंका आली होती तीही बरोबर नाहीं. कारण, " औदुम्बरो यूपो भवति " ह्या ठिकाणीं " भवति " हा प्रयोग वर्तमानकालबोधक असूनही ज्याप्रमाणें त्या श्रुतीचें तात्पर्य विधीकडे असल्याचें सिद्ध आहे त्याचप्रमाणें " भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीचें तात्पर्य विधीकडे असल्याचें सिद्ध आहे. ह्या करितां, वर्तमानकालबोधकत्व या नात्यानें " भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीचें " औदुम्बरो यूपो भवति " ह्या श्रुतीशीं साम्य असल्यामुळें " चरन्ति " ह्या

व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्तीत्यनेन पारिव्राज्यं विधीयते। पारिव्राज्याश्रमे च यज्ञोपवीतादिसाधनानि विहितानि लिङ्गं च श्रुतिभिः स्मृतिभिश्च । अतस्तद्वर्जयित्वान्यस्माद्व्युत्थानमेषणात्वेपीति चेन्न । विज्ञानसमानकर्तृकात्पारिव्राज्यादेषणाव्युत्थानलक्षणात्पारिव्राज्यान्तरोपपत्तेः । यद्धि तदेषणाभ्यो व्युत्थानलक्षणं पारिव्राज्यं तदात्मज्ञानाङ्गम् । आत्मज्ञानविरोध्येषणापरित्यागरूपत्वात् । अविद्याविषयत्वाच्चैषणायाः । तद्व्यतिरेकेण चास्त्याश्रमरूपं पारिव्राज्यं ब्रह्म-

---

वर्तमानकालबोधक प्रयोगानें विधि सिद्ध होण्यास दोष येत नाहीं. —" व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीनें पारिव्राज्य विहित असल्याचें कबूल आहे. परंतु, पारिव्राज्य ह्या आश्रमामध्यें यज्ञोपवीतादि साधनें आणि त्रिदण्डित्वादि आश्रमदर्शक चिन्हें श्रुतिस्मृतींनीं विहित आहेत. तस्मात्, यज्ञोपवीतादिसाधनांचा अंतर्भाव जरी एषणांत होत असला तरी पारिव्राज्याश्रमाला " पुराणे यज्ञोपवीते विसृज्य नवमुपादायाश्रमं प्रविशेत् । त्रिदण्डी कमण्डलुमान् " इत्यादि श्रुतिस्मृतींनीं विहित असलेलीं यज्ञोपवीतादि साधनें आणि त्रिदण्डित्वादि चिन्हें हीं वर्ज करून इतर गोष्टींचा त्याग करावा—अशीही एक शंका ह्या ठिकाणीं संभवते. परंतु, ती टिकत नाहीं. कारण, आत्मज्ञान झालेल्या पुरुषानेंच कर्तव्य असें जें एषणात्यागरूप पारिव्राज्य त्या शिवाय दुसरें पारिव्राज्य असल्याचें सिद्ध आहे व त्या दुसऱ्या पारिव्राज्याला यज्ञोपवीतादि साधनांची आणि त्रिदण्डित्वादि चिन्हांची अवश्यकता आहे. एषणांपासून व्युत्थान हें जें पारिव्राज्य तें आत्मज्ञानाचें अंग आहे. कारण, आत्मज्ञानाला विरोधी ज्या एषणा त्यांचा परित्याग हेंच एषणांपासून व्युत्थान होय. एषणा अविद्याविषयक ह्मणजे अज्ञानविषयक असल्यामुळें त्या आत्मज्ञानाला विरोधी असणार हें उघड आहे. सारांश, ह्या

लोकादिफलप्राप्तिसाधनं यद्विषयं यज्ञोपवीतादिसाधनविधानं लिङ्गविधानं च । न चैषणारूपसाधनोपादानस्याश्रमधर्ममात्रेण पारिव्राज्यान्तरे विषये संभवति सति सर्वोपनिषद्विहितस्यात्मज्ञानस्य बाधनं युक्तम् । यज्ञोपवीताद्यविद्याविषयैषणारूपसाधनोपादित्सायां चावश्यमसाधनफलरूपस्याशनायादिसंसारधर्मवर्जितस्याहं ब्रह्मास्मीति विज्ञानं बाध्यते । न च तद्बाधनं युक्तम् । सर्वोपनिषदां तदर्थपरत्वात् ।

---

आत्मज्ञानांगरूप पारिव्राज्याशिवाय ब्रह्मलोकादिफलप्राप्तीचें साधन ह्मणून आश्रमरूप पारिवाज्य वेगळें आहे आणि त्या पारिव्राज्याला उद्देशून यज्ञोपवीतादि साधनांचें व त्रिदण्डित्वादि चिन्हांचें श्रुतिस्मृतींमध्यें विधान आहे. ( आतां " एतं वै तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीनें सांगितलेलें जें परमहंसाश्रमरूप मुख्य पारिव्राज्य त्याला उद्देशूनच यज्ञोपवीतादि साधनांचें व त्रिदण्डित्वादि चिन्हांचें विधान आहे अशी कोणी शंका करील तर ती बरोबर होणार नाहीं. कारण, ) केवळ आश्रमधर्म ह्मणून उक्त असलेल्या एषणारूप यज्ञोपवीतादि साधनांच्या स्वीकाराला वर सांगितल्याप्रमाणें संन्यासाभासरूप पारिव्राज्य हा विषय संभवत असतांना त्याकडे दुर्लक्ष्य करून आणि ह्मणूनच यज्ञोपवीतादिसाधनविधायक व त्रिदण्डित्वादिलिङ्गविधायक श्रुतिस्मृति अनवकाश होतात अशी निवळ कल्पना करून सदहू श्रुतिस्मृतींना चारितार्थ्य देण्याकरितां सर्व उपनिषदांमध्यें विहित जें एषणात्यागसमानकर्तृक आत्मज्ञान त्याचा बाध करणें योग्य नव्हे. अविद्याविषयक ह्मणजे अज्ञानविषयक ज्या एषणा तद्रूप जीं यज्ञोपवीतादि साधनें त्यांची अपेक्षा धरिली असतां साधनें व फल एतद्विरहित आणि क्षुधादिसंसारधर्मरहित जें " अहं ब्रह्मास्मि " असें आत्मज्ञान त्याचा बाध

**भिक्षाचर्यं चरन्तीत्येषणां ग्राहयन्ती श्रुतिः स्वयमेव बाधत इति चेत्। अथाप्येषणाभ्यो व्युत्थानं विधाय पुनरेषणैक-देशं भिक्षाचर्यं ग्राहयन्ती तत्संबद्धमन्यदपि ग्राहयतीति चेन्न। भिक्षाचर्यस्याप्रयोजकत्वाद्धुत्वोत्तरकालभक्षणवत् । शेष-**

---

अवश्य होणारच हें उघड आहे. परंतु, सर्व उपनिषदांचें तात्पर्य आत्मज्ञानाकडे असल्यामुळें त्याचा बाध करणें योग्य नाहीं. आतां, भिक्षाचर्याचाही एषणेंत अंतर्भाव होत असल्यामुळें आत्मज्ञानी पुरुषा-कडून भिक्षाचर्यरूप एषणेचा स्वीकार करविणारी " भिक्षाचर्यं चरन्ति " ही श्रुति स्वतःच बाधित होत आहे अशी शंका कराल तर—ह्मणजे " एतं वै तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति " ही श्रुति एषणांपासून व्युत्थान करावें असें सांगून भिक्षाचर्याचें अवलंबन करावें असें सांग-ण्यानें पुनरपि आत्मज्ञानी पुरुषाला अंशतः एषणेचाच स्वीकार कर-ण्यास सांगत असल्यामुळें भिक्षाचर्यरूप विहित कर्माच्या अनुष्ठानाला अवश्यक जीं यज्ञोपवीतादि साधनें त्यांचा स्वीकार करण्याविषयीं आत्म-ज्ञानी पुरुषाला अर्थातच सांगत आहे आणि ह्यामुळें यज्ञोपवीतादि साधनांशीं विरोधि जें आत्मज्ञान तें श्रुतीनेंच स्वतः बाधित केलें आहे ह्मणून ह्मणाल तर—योग्य नाहीं. कारण, हवनानंतरच्या भक्षणाप्रमाणें भिक्षाचर्य हें अप्रयोजक आहे. तें असें:— " हविर्धाने चर्मन्नाधिग्रावभिर-भिषुत्याहवनीये हुत्वा प्रत्यञ्चः परेत्य सदसि भक्षयन्ति " ह्या श्रुतीमध्यें हवन करून अवशिष्ट राहिलेल्या द्रव्याचें भक्षण विहित आहे. परंतु, जरी भक्षण विहित आहे तरी अवशिष्ट द्रव्यानेंच तें सिद्ध होणार असल्यामुळें द्रव्याचें प्रयोजक होत नाहीं ह्मणजे इतर द्रव्याची त्याला अपेक्षा रहात नाहीं; त्याचप्रमाणें सर्वस्वत्याग विहित असल्यामुळें भिक्षाचर्य हेंच काय तें साधन शरीरधारणाला अवशिष्ट राहिलें आहे. तेव्हां

**प्रतिपत्तिकर्मत्वादप्रयोजकं हि तत् । असंस्कारकत्वाच्च । भक्षणं पुरुषसंस्कारकमपि स्यान्न तु भिक्षाचर्यम् । नियमादृष्टस्यापि ब्रह्मविदोनिष्टत्वात् । नियमादृष्टस्यानिष्टत्वे किं भिक्षाचर्येणेति चेन्न । अन्यसाधनाद्व्युत्थानस्य विहितत्वात् ।**

---

अवशिष्ट ह्मणून विहित असलेल्या त्या भिक्षाचरणाला स्वतःच्या सिद्धी-करितां यज्ञोपवीतादि इतर साधनांची अपेक्षा नाहीं. सारांश, शेषप्रतिपत्तिकर्म ह्मणजे अवशिष्ट राहिलेल्या द्रव्याचा विनियोग ह्मणून ज्याप्रमाणें सोमद्रव्याचें भक्षण विहित आहे आणि ह्मणूनच तें भक्षण अन्यद्रव्यपरिग्रहाचें प्रयोजक नाहीं ह्मणजे अन्यद्रव्याच्या परिग्रहास कारणीभूत होत नाहीं त्याचप्रमाणें सर्वस्वत्याग विहित असल्यामुळें शरीरपातापर्यंतचा जो अवशिष्ट काल त्याचा विनियोग करण्याकरितां ह्मणूनच शरीरधारणार्थ विहित असलेल्या भिक्षाचरणाला यज्ञोपवीतादि साधनांची अपेक्षा नाहीं. दुसरें असें कीं भिक्षाचर्य हें संस्कारकही नाहीं. सोमभक्षण पुरुषसंस्कारक तरी होणें संभवेल; परंतु, भिक्षाचर्य हें पुरुषसंस्कारक होणार नाहीं. आतां “ एककालं चरेद्भैक्षम् ” इत्यादि नियमामुळें सिद्ध होणारें जें अदृष्ट फल त्याला यज्ञोपवीतादि साधनांची अपेक्षा अर्थात आहे ह्मणून शंका घ्यावी तर तीही बरोबर नाहीं. कारण, नियमानें प्राप्त होणारें अदृष्ट फलही ब्रह्मवेत्त्याला इष्ट नाहीं. आतां ( कसें तरी अन्न मिळालें ह्मणजे शरीरधारण होण्याचा संभव असल्यामुळें व ) नियमानें प्राप्त होणारें अदृष्ट फल ब्रह्मवेत्त्याला इष्ट नसल्यामुळें “ भिक्षाचर्यं चरन्ति ” ह्या वाक्यानें भिक्षाचर्याचें विधान पाहिजे कशाला ? ह्मणून शंका घ्यावी तर तीही बरोबर नाहीं. कारण, शरीरधारणाकरितां जर अन्नाची अपेक्षा आहे तर तें अन्न प्रतिग्रहानें वगैरे मिळण्याचा संभव आहे. ह्मणून भिक्षाचरणाशिवाय इतर कोणत्याही साधनाचा त्याग करणें विहित असल्यामुळें “ भिक्षाचर्यं चरन्ति ”

**तथापि किं तेनेति चेत् । यदि स्याद्बाढमभ्युपगम्यते हि तत् । यानि पारिव्राज्येभिहितानि वचनानि यज्ञोपवीत्येवाधीयीते-त्यादीनि तान्यविद्वत्पारिव्राज्यमात्रविषयाणीति परिहृतानि । इतरथा ह्यात्मज्ञानबाधः स्यादिति ह्युक्तम् । निराशिषमनारम्भं निर्नमस्कारमस्तुतिम् । अक्षीणं क्षीणकर्माणं तं देवा**

---

ही श्रुति व्यर्थ होत नाहीं. आतां—अन्यसाधनापासून निवृत्तीचा उपदेश ह्या दृष्टीनें " भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतिवाक्याला जरी सार्थकता येत असली तरी भिक्षाचर्याचें अवलंबन करावें हें सागण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण, कूटस्थ जो आत्मा त्याच्या ज्ञानानेंच सर्वकर्मांपासून निवृत्ति सिद्ध आहे—अशी शंका जर कोणीं केली तर ती आमच्याही मताला विरुद्ध होत नाहीं. कारण, कर्मरहित जो आत्मा त्याच्या ज्ञानानें सर्वकर्मांपासून जर निवृत्ति झाली तर ती आह्मांलाही इष्टच आहे आणि ह्मणूनच वरील शंकाही आह्मांला मान्य आहे. परंतु, क्षुधा, तृषा, इत्यादि संसारदोषांचें प्राबल्य झाल्यामुळें कदाचित् आत्मज्ञानी पुरुष आत्मा कर्मरहित आहे हें कांहींवेळपर्यंत विसरून जाऊन प्रतिग्रहानें वगैरे अन्नोदक मिळविण्याचा जर यत्न करूं लागला तर त्यावेळेस निवृत्तीच्या उपदेशाचीही सार्थकता होईल. " यज्ञोपवीत्येवाधीयीत " इत्यादि पारिव्राज्यामध्यें ह्मणून उक्त असलेलीं श्रुतिवचनें अज्ञानी पुरुषाला योग्य जें पारिव्राज्य तद्विषयक असल्यामुळें परमहंसाश्रमरूपपारिव्राज्यविषयक नाहींत. कारण, तीं परमहंसाश्रमरूप पारिव्राज्यविषयक मानिलीं असतां आत्मज्ञानाला बाध येतो " असें पूर्वींच सांगितलें आहे. असो. कर्मनिवृत्तीचा उपदेश अवश्यक आहे ह्मणून जें वर ह्मटलें आहे त्याला अन्य प्रमाणही आहे. कारण, " निराशिषमनारम्भं निर्नमस्कारमस्तुतिम् । अक्षीणं क्षीण-कर्माणं तं देवा ब्राह्मणं विदुः " ही स्मृति विद्वान पुरुषाला कोणतेंच

स्तस्माद्ब्राह्मणः पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठा-

ब्राह्मणं विदुरिति सर्वकर्माभावं दर्शयति स्मृतिर्विदुषः । विद्वाल्लिँङ्गवर्जितस्तस्मादलिङ्गो धर्मज्ञ इति च । तस्मात्परमहंसपारिव्राज्यमेव व्युत्थानलक्षणं प्रतिपद्येतात्मवित्सर्वकर्मसाधनपरित्यागरूपमिति । यस्मात्पूर्वे ब्राह्मणा एतमात्मानमसाधनफलस्वभावं विदित्वा सर्वस्मात्साधनफलस्वरूपादेषणालक्षणाद्व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति स्म दृष्टादृष्टार्थं कर्म तत्साधनं च हित्वा तस्मादद्यत्वेपि ब्राह्मणो ब्रह्मवित्पाण्डित्यं पण्डितभावमेतदात्मविज्ञानं पाण्डित्यं निर्विद्य निःशेषं विदि-

कर्म नसल्याचें दर्शवीत आहे. " विद्वाल्लिँङ्गवर्जितस्तस्मादलिङ्गो धर्मज्ञः " असें श्रुतिप्रमाणही आणखी आहेच. तात्पर्य, " एतं वै तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीमध्यें सर्व कर्में व कर्मसाधनें एतत्परित्यागरूप व्युत्थान ह्मणून जें आत्मज्ञानी पुरुषाला सांगितलें आहे तें परमहंसपारिव्राज्यरूपच व्युत्थान होय व त्याचाच आत्मज्ञानी पुरुषानें अवलंब करावा. असो. येथपर्यंत " एतं वै ० भिक्षाचर्यं चरन्ति " ह्या श्रुतीचें व्याख्यान झालें. ज्याअर्थी साधन व फल ह्यांहून विलक्षण असलेल्या ह्या आत्म्याचें ज्ञान झालेल्या पूर्वकालीन ब्राह्मणांनीं साधनफलस्वरूप असलेल्या एषणांचा परित्याग करून ह्मणजे दृष्टफलक आणि अदृष्टफलक असें कोणत्याही प्रकारचें कर्म व कर्मसाधन ह्यांचा त्याग करून भिक्षाचर्याचें अवलंबन केलें त्याअर्थी आजकालच्या ब्राह्मणानेंही पूर्णपणें आत्मज्ञान झाल्यावर एषणांपासून व्युत्थान करून आत्मज्ञानबलानेंच राहण्याची इच्छा धरावी हा " तस्माद्ब्राह्मणः पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत् " ह्या श्रुतीचा आशय होय. ह्या श्रुतींतील ब्राह्मण ह्या शब्दाचा अर्थ ब्रह्मवेत्ता असा असून पाण्डित्य ह्या शब्दाचा अर्थ आत्मज्ञान असा

त्वात्मविज्ञानं निरवशेषं कृत्वेत्यर्थः। आचार्यत आगमतश्चै- षणाभ्यो व्युत्थाय। एषणाव्युत्थानावसानमेव हि तत्पाण्डि- त्यम्। एषणातिरस्कारोद्भवत्वादेषणाविरुद्धत्वात्। एषणाम- तिरस्कृत्य न ह्यात्मविषयस्य पाण्डित्यस्योद्भव इत्यात्मज्ञाने- नैव विहितमेषणाव्युत्थानमात्मज्ञानसमानकर्तृकक्त्वाप्रत्य- योपादानलिङ्गश्रुत्या दृढीकृतम्। तस्मादेषणाभ्यो व्युत्थाय ज्ञानबलभावेन बाल्येन तिष्ठासेत्स्थातुमिच्छेत्। साधनफ- लाश्रयणं हि बलमितरेषामनात्मविदाम्। तद्बलं हित्वा विद्वा- नसाधनफलस्वरूपात्मविज्ञानमेव बलं तद्भावमेव केवलमा- श्रयेत्। तदाश्रयणे हि करणान्येषणाविषय एनं हृत्वा स्थाप-

---

आहे. “ विवेक आणि वैराग्य ह्यांच्या योगानें एषणांचा त्याग करून व गुरूपदेश आणि प्रत्यक्ष श्रुति ह्यांच्या योगानें आत्मज्ञान संपूर्णपणें प्राप्त करून घेऊन ज्ञानबलरूपानें राहण्याची इच्छा धरावी ” हा “ पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत् ” ह्याचा अर्थ होय. एषणां- पासून व्युत्थान होणें हेंच आत्मज्ञानाचें पर्यवसान होय. कारण, आत्म- ज्ञान हें एषणातिरस्कारानें उत्पन्न होणारें असून एषणांच्या विरुद्ध आहे. एषणेचा तिरस्कार केल्यावांचून आत्मविषयक ज्ञानाचा उद्भव होत नाहीं. ह्याकरितां, विहित असलेल्याच एषणाव्युत्थानाचें “ विदित्वा ” ह्या पूर्वकालवाचक धातुसाधित अव्ययाशीं समानकर्तृकत्व असलेल्या “ व्युत्थान ” ह्या श्रुतीनें दृढीकरण केलें आहे. तस्मात्, एषणांचा त्याग करून बाल्यानें ह्मणजे ज्ञानबलभावानें राहण्याची इच्छा करावी. आत्मवेत्त्यांहून इतर जे अनात्मवेत्ते त्यांचें बल कर्मसाधन व कर्मफल ह्यांवर अवलंबून असतें. त्या बलाचा त्याग करून विवेकी पुरुषानें बाल्या- चेंच ह्मणजें आत्मज्ञानविषयक वृत्तीचेंच केवल अवलंबन करावें. कारण, त्याचा अवलंब करून राहिलें असतां इंद्रियें त्याला तेथून ओढून

सेद्बाल्यं च पाण्डित्यं च निर्विद्याथ मुनिरमौनं
च मौनं च निर्विद्याथ ब्राह्मणः स ब्राह्मणः

---

यितुं नोत्सहन्ते । ज्ञानबलहीनं हि मूढं दृष्टादृष्टविषयायामेषणायामेवैनं करणानि नियोजयन्ति । बलं नामात्मविद्याशेषविषयदृष्टितिरस्करणम् । अतस्तद्भावेन बाल्येन तिष्ठासेत् । तथा चात्मना विन्दते वीर्यमिति श्रुत्यन्तरान्नायमात्मा बलहीनेन लभ्य इति च । बाल्यं च पाण्डित्यं च निर्विद्य निःशेषं कृत्वाथ मननान्मुनिर्योगी भवति । एतावद्धि ब्राह्मणेन कर्तव्यं यदुत सर्वानात्मप्रत्ययतिरस्करणमेतत्कृत्वा कृतकृत्यो योगी भवति । अमौनं चात्मज्ञानानात्मप्रत्ययातिर-

---

आणून एषणेला आधारभूत असलेल्या विषयांमध्यें प्रवृत्त करण्यास समर्थ होत नाहींत. ज्ञानरूप बल ज्याला नाहीं अशा मूढाला इंद्रियें दृष्टादृष्टफलविषयक एषणेमध्येंच आसक्त करितात. बल ह्मणजे आत्मज्ञानाच्या योगानें संपूर्ण विषयांपासून दृष्टि परावृत्त करणें. तस्मात्, तद्रूप जें बाल्य त्याचा आश्रय करून विवेकी पुरुषानें रहाण्याची इच्छा करावी. ज्ञानबलाच्या योगानें ज्याप्रमाणें विषयाभिमुख असलेली दृष्टि परावृत्त करितां येते त्याचप्रमाणें आत्मज्ञान पूर्णपणें झालें असतां विषयांपासून दृष्टि परावृत्त करण्याचें सामर्थ्य प्राप्त होतें. कारण, " आत्मना विन्दते वीर्यम् " अशी श्रुति आहे. शिवाय, " विषयदृष्टि तिरस्कृत करण्याचें सामर्थ्य नसलेल्या पुरुषाला आत्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं " असेंही " नायमात्मा बलहीनेन लभ्यः " ह्या श्रुतींत सांगितलें आहे. बाल्य व पाण्डित्य हीं संपूर्णपणें प्राप्त झाल्यावर पुरुष मुनि ह्मणजे योगी होतो. आत्मविरहित जें जें ज्ञान त्याचा तिरस्कार करणें हेंच ब्राह्मणाचें कर्तव्य आहे व तें केलें असतां तो कृतकृत्य आणि ह्मणूनच योगी होतो. " पांडित्य ह्मणजे

केन स्याद्येन स्यात्तेनेदृश एवातोऽन्यदार्तं ततोह

स्कारौ पाण्डित्यबाल्यसंज्ञकौ निःशेषं कृत्वा मौनं नामानात्मप्रत्ययतिरस्करणस्य पर्यवसानं फलं तच्च निर्विद्याथ ब्राह्मणः कृतकृत्यो भवति । ब्रह्मैव सर्वमिति प्रत्यय उपजायते । स ब्राह्मणः कृतकृत्योऽतो ब्राह्मणः । निरुपचरितं हि तदा तस्य ब्राह्मण्यं प्राप्तमत आह । स ब्राह्मणः केन स्यात्केन चरणेन भवेद्येन स्याद्येन चरणेन भवेत्तेनेदृश एवायम् । येन केनाचिच्चरणेन स्यात्तेनेदृश एवोक्तलक्षण एव ब्राह्मणो भवति । येन केनचिच्चरणेनेति स्तुत्यर्थं येयं ब्राह्मण्यावस्था सेयं स्तूयते न तु चर-

आत्मज्ञान आणि बाल्य ह्मणजे आत्मविरहित ज्ञानाचा तिरस्कार हीं पूर्ण झाल्यानंतर " हा " अमौनं निर्विद्य " ह्याचा अर्थ होय. मौन ह्मणजे आत्मविरहितज्ञानतिरस्काराचें पर्यवसानरूप फल तें पूर्णपणें प्राप्त झाल्यावर ब्राह्मण कृतकृत्य होतो ह्मणजे सर्व ब्रह्म आहे अशी त्याची खात्री होऊन जाते. गुरुशुश्रूषापूर्वक वेदांततात्पर्यज्ञान तें पांडित्य होय; आत्मबाह्य विषयांपासून दृष्टि परावृत्त करणें हें बाल्य होय; मीच परब्रह्म परमात्मा असून माझ्याविरहित दुसरें कांहीं एक नाहीं असें जें अंतःकरणामध्यें एकसारखें चिंतन तें मौन होय आणि " तत्त्वमसि " ह्या महावाक्याचें अर्थज्ञान खरें खरें होणें हें ब्राह्मण्य होय. " कृतकृत्य आणि ह्मणूनच ब्राह्मण्य प्राप्त झालेला जो पुरुष त्याचें आचरण कसें असतें " ह्मणून विचाराल तर आचरण कसेंही जरी असलें तरी पांडित्य, बाल्य, मौन व ब्राह्मण्य ह्या वर सांगितलेल्या लक्षणांनीं जो युक्त असेल तो ब्राह्मण ह्मणजे परमहंस आत्मज्ञानी होय. " आचरण कसेंही असलें तरी " ह्या ह्मणण्याचें तात्पर्य प्रशंसेकडे आहे; ह्मणजे ही जो वर सांगितलेली ब्राह्मण्यावस्था तिची प्रशंसा त्या शब्दांनीं केलेली आहे; आचाराकडे ब्रह्मवेत्त्याचें दुर्लक्ष्य असतें हें सांगण्याकडे तात्पर्य नाहीं.

कहोलः कौषीतकेय उपरराम ॥

---

णेनादरः । अत एतस्माद्ब्राह्मण्यावस्थानादशनायाद्यतीतात्मस्वरूपान्नित्यतृप्तादन्यदविद्याविषयमेषणालक्षणं वस्त्वन्तरमार्तं विनाश्यार्तिपरिगृहीतं स्वप्नमायामरीच्युदकसममसारमात्मैवैकः केवलो नित्यमुक्त इति । ततो ह कहोलः कौषीतकेय उपरराम ॥

---

ह्यास्तव, ह्या ब्राह्मण्यावस्थेहून ह्मणजे क्षुधा, तृषा इत्यादि संसारधर्मांनीं अलिप्त असलेल्या नित्यतृप्त आत्मस्वरूपाहून जी जी अज्ञानविषयक व वासनारूप अन्य वस्तु ती ती आर्त ह्मणजे विनाशी, नाशग्रस्त, अथवा स्वप्न, माया आणि मृगजल ह्यांप्रमाणें व्यर्थ होय. कारण, केवळ एक आत्माच नित्यमुक्त आहे. असो. इतकें झाल्यानंतर कहोलनामक कुषीतकवंशज स्तब्ध राहिला. ह्या ठिकाणीं कहोलब्राह्मणही समाप्त झालें.

श्रीभगवानुवाच ॥

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥

---

तत्र धर्मसंमूढचेतसो मिथ्याज्ञानवतो महति शोकसागरे निमग्नस्यार्जुनस्यान्यत्रात्मज्ञानादुद्धरणमपश्यन्भगवान्वासुदेवस्तं ततः कृपयार्जुनमुद्दिधारयिषुरात्मज्ञानायावतरन्नाह अशोच्यानन्व० पण्डिताः॥ ११ ॥ न शोच्या अशोच्या भीष्मद्रोणादयः सद्वृत्तत्वात्परमार्थरूपेण च नित्यत्वात्तानशोच्यानन्वशोचोनुशोचितवानसि ते म्रियन्ते मन्निमित्तमहं तैर्विनाभूतः किं करिष्यामि राज्यसुखादिनेति । त्वं प्रज्ञावतां बुद्धिमतां वादांश्च

---

श्रीभगवान् भाषण करितातः—शोक करण्यास अयोग्य असलेल्या भीष्मद्रोणादिकांकरितां तूं शोक केलास आणि इतकें असूनही बुद्धिमान लोकांची बोलणीं बोलत आहेस. अरे, पंडित लोक मृत अथवा जीवंत देहांबद्दल शोक करीत बसत नाहींत ११.

ह्याप्रमाणें गीताशास्त्राचें प्रमेय निश्चित आहे. धर्मसंबंधीं कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें ह्याची निवड न होण्याइतकें ) अंतःकरण गोंधळून गेल्यामुळें आणि ह्मणूनच व्यर्थ अशा अज्ञानानें ग्रस्त झाल्यामुळें दुस्तर शोकसागरांत मग्न झालेल्या त्या अर्जुनाचा उद्धार आत्मज्ञानावांचून इतरानें होण्याचा संभव नाहीं असें समजून भगवान् वासुदेव त्या अर्जुनाला त्या शोकसागरांतून बाहेर काढण्याच्या उद्देशानें त्याची आत्मज्ञानाकडे प्रवृत्ति करण्याकारितां ह्मणालेः—सदाचरणी असल्यामुळें आणि परमार्थस्वरूपानें नित्य असल्यामुळें शोचनीय होण्यास अयोग्य असे जे भीष्मद्रोणादिक त्यांच्याबद्दल “ ते मजकरितां मरत आहेत, त्यांचा वियोग झाल्यावर राज्यसुखाचा वगैरे मला काय उपयोग आहे? ” अशाप्रकारें तूं शोक केला आहेस आणि

**वचनानि च भाषसे । तदेतन्मौढ्यं पाण्डित्यविरुद्धमात्मनि दर्शयस्युन्मत्त इवेत्यभिप्रायः। यस्माद्गतासून्गतप्राणान्मृतानगतासूनगतप्राणाञ्जीवतश्च नानुशोचन्ति पण्डिता आत्मज्ञाः पण्डात्मविषया बुद्धिर्येषां ते हि पण्डिताः पाण्डित्यं निर्विद्येति श्रुतेः । परमार्थतस्तु नित्यानशोच्याननुशोचस्यतो मूढोसीत्यभिप्रायः ॥ ११ ॥**

---

ज्ञानवान् लोकांचीं बोलणींही बोलत आहेस. सारांश, आपले ठिकाणीं उन्मत्त पुरुषाप्रमाणें मूढपणा आणि पांडित्य असा परस्परविरुद्ध प्रकार दाखवीत आहेस हा ( वरील ११ व्या श्लोकाच्या पहिल्या अर्धाचा ) अभिप्राय होय. "कशावरून मूढ आहें" ह्मणून विचारशील तर हे अर्जुना, आत्मज्ञानी पुरुष गतप्राण झालेल्या आणि त्याचप्रमाणें प्राण न गेलेल्या ह्मणजे सजीव असलेल्या देहांकरितां शोक करीत नाहींत. परंतु, नित्य असल्यामुळें शोचनीय नसलेल्या भीष्मादिकांकरितां तूं शोक करीत आहेस व ह्मणूनच मूढ आहेस. ह्या श्लोकांतील "पंडित" शब्दाचा अर्थ आत्मज्ञानी असा आहे. पंडा ह्मणजे आत्मविषयक बुद्धि ज्यांची आहे ते पंडित अशी त्या शब्दाची व्युत्पत्ति आहे. कारण "पांडित्यं निर्विद्य (ह्मणजे आत्मज्ञान पूर्णपणें प्राप्त करून घेतल्यावर)" अशी श्रुती आहे. ११

( परस्परविरुद्ध प्रकार करणें हें उन्मत्त पुरुषाचें लक्षण होय. देहाचे ठिकाणीं आत्मबुद्धि धरून अर्जुनानें भीष्मादिकांच्या मृत्यूबद्दल शोक केला आणि देहाहून आत्मा भिन्न असल्याचें अर्जुनाला समजत नव्हतें ह्मणावें तर "ह्या कुलघातकी पुरुषांचे पितर—पुत्रादिकांचा अभाव झाल्यानें पितृप्रीत्यर्थ होणारीं पिंडदानादि कर्मे लुप्त झाल्यामुळें—नरकांत पडतात" असें ह्मणून आत्मा देहाहून भिन्न असल्याचें माहित असल्याबद्दल त्यानेंच दर्शविलें आहे. ह्मणून "उन्मत्त इव" असे शब्द अर्जुनाला उद्देशून भाष्यामध्यें घातले आहेत. "अरेरे, हे

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

कुतस्ते शोच्या यतो नित्याः कथं न त्वेवाहं० वयमतः परम् ॥ १२ ॥ न त्वेव जातु कदाचिदहं नासं किं त्वासमेवातीतेषु देहोत्पत्तिविनाशेषु नित्य एवाहमासमित्यभिप्रायः । तथा न त्वं नासीः किं त्वासीरेव तथा नेमे जनाधिपा नासन्किं त्वासन्नेव । तथा न चैव न भविष्यामः किं तु भविष्याम एव।

मृत झाले व हे मरणार अशा प्रकारची चिंता आत्मज्ञानी पुरुष करीत नाहींत. " हा " नानुशोचन्ति पण्डिताः " ह्या श्लोकपादाचा अर्थ होय. " प्रज्ञावादांश्च " ह्याचा अर्थ " प्रज्ञानामवादान्प्राज्ञैर्वक्तुमनुचितान्शब्दांश्च ( ज्ञानी जनांनीं बोलण्यास अयोग्य असलेले शब्द ) " असा मधुसूदनी टीकेंत केला आहे. परंतु, आचार्यांच्या भाष्याशीं विरुद्ध असलेलें हें व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, ह्या व्याख्यानावर दोन दोष येतात. योग्यता ह्या अर्थीं घञ् होत नाहीं हा एक दोष व " प्रज्ञावादान् " हें विशेषण केल्यानें " शब्दान् " हें विशेष्य पदरचें अध्याहृत घ्यावें लागतें हा दुसरा दोष ) " ११.

" हे अर्जुना, तूं, मी व हे राजे असे कधीं नव्हतों असें नाहीं व त्याचप्रमाणें ह्या देहानंतर आपण सर्व असणार नाहीं असेंही नाहीं १२.

अर्जुना, ते भीष्मद्रोणादिक शोचनीय कोठून असणार ? कारण, ते नित्य आहेत. नित्य कसे ह्मणशील तर पहा. मी कधीं नव्हतों असें नाहीं ; परंतु, होतोंच. देहसंबंधीं जन्ममरणपरंपरा जरी किति होऊन गेल्या तरी मी नित्य आहेंच असा " न त्वेवाहं जातु नासम् " ह्या श्लोकपादाचा आशय आहे. तसाच तूं कधीं नव्हतास असें नाहीं; तर होतासच; तसेच हे राजे कधीं नव्हते असें नाहीं; तर ते होतेच आणि त्याचप्रमाणें आपण पुढें असणार नाहीं असेंही नाहीं; तर असणारच.

**सर्वे वयमतोऽस्माद्देहविनाशात्परमुत्तरकालेऽपि त्रिष्वपि कालेषु नित्या आत्मस्वरूपेणेत्यर्थः । देहभेदानुवृत्त्या बहुवचनं नात्म-भेदाभिप्रायेण ॥ १२ ॥**

---

तात्पर्य, ह्या देहाचा नाश झाल्यानंतरही आपण सर्व असणारच. सारांश, भूत, वर्तमान आणि भविष्य ह्या तिन्ही कालांमध्यें आपण सर्व आत्मस्वरू-पानें नित्य आहोंतच. ह्या श्लोकांतील बहुवचन देहभेदामुळें आहे. आत्मे वेगळे वेगळे आहेत हें दर्शविण्याच्या अभिप्रायानें तें घातलेलें नाहीं॥ १२॥

( ह्या श्लोकांत व त्यावरील भाष्यांत उत्पत्ति व विनाश हीं जीवाला नसून देहाला आहेत हा सिद्धांत दर्शविला आहे. ह्या सिद्धांताचें प्रतिपादन उत्तरमीमांसेंतील दुसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादामध्यें दहाव्या व अकराव्या अधिकरणांत मिळून चांगल्या रीतीनें केलेलें आहे. सबब, ह्या दोन्ही अधिकरणांचीं सूत्रें व त्या सूत्रांवरील आचा-र्यांचें शारीर भाष्य पुढें दिलें आहे. )

**चराचरव्यपाश्रयस्तु स्यात्तद्व्यपदेशो भाक्तस्तद्भावभावित्वात्॥ १६॥ १०॥**

---

स्तो जीवस्याप्युत्पत्तिप्रलयौ जातो देवदत्तो मृतो देवदत्त इत्येवंजातीयकाल्लौकिकव्यपदेशाज्जातकर्मादिसंस्कारविधानाच्चेति स्यात्कस्यचिद्भ्रान्तिस्तामपनुदामः । न जीवस्योत्पत्तिप्रलयौ स्तः शास्त्रफलसंबन्धोपपत्तेः । शरीरानुविनाशिनि हि जीवे शरीरगतेष्टानिष्टप्राप्तिपरिहारार्थौ विधिप्रतिषेधावनर्थकौ स्याताम् । श्रूयते च जीवापेतं वाव किलेदं म्रियते न जीवो म्रियत इति । ननु लौकिको जन्म-

---

" जीवाला उत्पत्ति व विनाश हीं आहेत. कारण, देवदत्त जन्मला, देवदत्त मृत झाला अशाप्रकारची भाषा लोक बोलत असतात आणि ही भाषा देहालाच उद्देशून असेल असें ह्मणावें तर देहांतील चैतन्याला उद्देशून जातकर्मादि संस्कार विहित असल्याचें दिसतें. तेव्हां देवदत्त जन्मला व देवदत्त मृत झाला हें लोकांचें ह्मणणें केवळ देहालाच उद्देशून असतें असें ह्मणतां येत नाहीं. " अशा प्रकारची कदाचित् एकाद्याला भ्रांति होईल ह्मणून तिचें आह्मी निरसन करितों. जन्मांतरीं प्राप्त होणाऱ्या शास्त्रसिद्ध फलाचा संबंध विद्यमान देहामध्यें असलेल्या जीवाशींच असल्यामुळें जीवाला जन्ममरण नाहीं. शरीराबरोबर जीव मृत होत असेल तर " अमुक एक विहित कर्माचें अनुष्ठान केलें असतां जन्मांतरीं अमुक अमुक चांगलें फल प्राप्त होतें व अमुक अमुक निषिद्ध कर्माचें आचरण केलें असतां जन्मांतरीं त्याचें अनिष्ट फल भोगावें लागतें ह्मणून दर्शविणारे विधिनिषेध व्यर्थ होतील. " हें शरीर जीवानें टाकिल्यावर मरतें; जीव मरतच नाहीं " असें " जीवापेतं वाव किलेदं म्रियते न जीवो म्रियते " ह्या छांदोग्यश्रुतींतही सांगितलें

**मरणव्यपदेशो जीवस्य दर्शितः सत्यं दर्शितो भाक्तस्त्वेष जीवस्य जन्ममरणव्यपदेशः किमाश्रयः पुनरयं मुख्यो यदपेक्षया भाक्त इति । उच्यते । चराचरव्यपाश्रयः । स्थावरजङ्गमशरीरविषयौ जन्ममरणशब्दौ । स्थावरजङ्गमानि हि**

---

आहे. ( सुषुप्तिकालीं जीवाचा नाश होतो ह्मणावा तर एकादा पुरुष अर्धवट काम करून निद्रिस्थ होतो आणि जागा झाल्यावर माझें हें काम अर्धवट झालें अशाप्रकारचें त्याला स्मरण होऊन तो तें काम शेवटास नेत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. ह्यावरून सुषुप्तिकालीं जीवाचा नाश होत नसल्याचें सिद्ध आहे. आतां मरणकालीं जीव मृत होतो ह्मणावें तर जुळत नाहीं. कारण, प्राण्यांचे ठिकाणीं उपजतांक्षणीं स्तनपान करण्याची इच्छा, भीति इत्यादि प्रकार दृष्टोत्पत्तीस येत असल्यामुळें पूर्वजन्मीं केलेल्या स्तनपानाचा, वाटलेल्या भीतीचा वगैरे अनुभव त्यांना स्मरत असल्याचें अनुमान होतें. शिवाय, जन्मांतरीं फल देणारीं अग्निहोत्रादि वैदिक कर्में व्यर्थ नसल्याचें सिद्ध आहे. तात्पर्य, " हें शरीर जीवानें टाकिल्यावर मरतें, जीव मरतच नाहीं " असें जें वरील छांदोग्यश्रुतींत सांगितलें आहे तें निर्विवाद आहे. ) " अहो, पण जन्ममरणसंज्ञा लोक जीवाला उद्देशून लावीत असल्याचें वर दर्शविलें आहे " असें ह्मणाल तर तें खरें आहे. लोक सदहू संज्ञा जीवाला उद्देशून लावीत असल्याचें वर दर्शविलें. परंतु, जीवाला ती संज्ञा मुख्यार्थी न लागतां गौणार्थी लागत असल्याचें वर दर्शविलें आहे. आतां " जीवाला जर गौणार्थानें जन्ममरणसंज्ञा आहे तर ही संज्ञा मुख्यार्थानें कोणाला आहे " ह्मणून विचाराल तर सांगतों. ही जन्ममरणसंज्ञा मुख्यार्थी चराचरांना उद्देशून आहे; ह्मणजे स्थावर व जंगम अथवा चल आणि अचल अशीं जीं शरीरें त्यांना अनुलक्षून जन्म व मरण हे शब्द मुख्यत्वेंकरून आहेत. कारण, पंचमहाभूतांच्या योगानें

भूतानि जायन्ते च म्रियन्ते चातस्तद्विषयौ जन्ममरणशब्दौ मुख्यौ सन्तौ तत्स्थे जीवात्मन्युपचर्येते। तद्भावभावित्वात्। शरीरप्रादुर्भावतिरोभावयोर्हि सतोर्जन्ममरणशब्दौ भवतो नासतोः। न हि शरीरसंबन्धादन्यत्र जीवो जातो मृतो वा केनचिल्लक्ष्यते। स वा अयं पुरुषो जायमानः शरीरमभिसंपद्यमानः स उत्क्रामन्म्रियमाण इति च शरीरसंयोगवियोगनिमित्तावेव जन्ममरणशब्दौ दर्शयति। जातकर्मादिविधानमपि देहप्रादुर्भावापेक्षमेव द्रष्टव्यम्। अभावाज्जीवप्रादुर्भावस्य। जीवस्य

---

बनलेलीं जीं हीं चराचर शरीरें तीं उत्पन्न होत असतात आणि मरत असतात. ह्मणून त्या चराचरशरीरांना जन्म व मरण हे शब्द मुख्यतः लागत असतात व त्या शरीरांमध्यें जीवात्मा असतो ह्मणून त्याचे ठिकाणीं त्या शब्दांचा लाक्षणिक प्रयोग केला जातो. कारण, शरीराच्या उत्पत्तीला वगैरे जीवाची अवश्यकता असते. ( देहसंयोगावांचून केवळ जीवाला उद्देशूनच जन्ममरणसंज्ञा कां नसाव्यात ? हें ह्मणणें चालणार नाहीं. कारण, ) शरीराचा प्रादुर्भाव आणि तिरोभाव ह्मणजे दृश्यता आणि अदृश्यता असतांनाच अनुक्रमें जन्म व मरण ह्या शब्दांचा प्रयोग होत असतो; नसतांना होत नाहीं. शरीराशीं संयोग व वियोग ह्यांवांचून वेगळ्या प्रकारानें जीव उत्पन्न झाल्याचें किंवा मृत झाल्याचें कोणाच्याही दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. " जीव शरीराशीं संयुक्त होऊं लागला ह्मणजे जीव उत्पन्न होऊं लागला असें ह्मणतात व शरीरांतून जाऊं लागला ह्मणजे जीव मरूं लागला असें ह्मणतात " अशा अर्थाच्या " स वा अयं पुरुषो जायमानः शरीरमभिसंपद्यमानः स उत्क्रामन्म्रियमाणः " ह्या बृहदारण्यक श्रुतींतही जीवाचा शरीराशीं संयोग व वियोग झाल्यामुळेंच त्याला अनुक्रमें जन्म व मरण हे शब्द लागत असल्याचें दर्शविलें आहे. जातकर्मादिविधि देखील देहाच्या प्रादुर्भावामुळेंच आहेत

## नात्माश्रुतेर्नित्यत्वाच्च ताभ्यः ॥ १७ ॥ ११ ॥

परस्मादात्मन उत्पत्तिर्वियदादीनामिवास्ति नास्ति वेत्येतदुत्तरेण सूत्रेण वक्ष्यति देहाश्रयौ तावज्जीवस्य स्थूलावुत्पत्तिप्रलयौ न स्त इत्येतदनेन सूत्रेणावोचत् ॥ १६ ॥ १० ॥

अस्त्यात्मा जीवाख्यः शरीरेन्द्रियपञ्जराध्यक्षः कर्मफलसंबन्धी । स किं व्योमादिवदुत्पद्यते ब्रह्मण आहोस्विद्ब्रह्मवदेव नोत्पद्यत इति श्रुतिविप्रतिपत्तेर्विशयः । कासुचिच्छ्रुतिष्वग्निविस्फुलिङ्गादिनिदर्शनैर्जीवात्मनः परस्माद्ब्रह्मण उत्पत्तिराम्नायते कासुचित्त्वविकृतस्यैव परस्य ब्रह्मणः कार्यप्रवेशेन जीवभावो विज्ञायते न चोत्पत्तिराम्नायत इति । तत्र

---

असें समजावें. कारण, जीवाचा प्रादुर्भाव होण्याचा संभव नाहीं. परमात्म्यापासून आकाशादिकांप्रमाणें जीवाची उत्पत्ति आहे किंवा नाहीं ह्याचा निर्णय पुढल्या सूत्रामध्यें केला असून ह्या सूत्रांत देहाशीं संबद्ध असलेलें जन्ममरण जीवाला नसल्याचें सिद्ध केलें आहे ॥ १६ ॥ १० ॥

बऱ्या वाईट कर्मांचीं फळें भोगणारा असा एक शरीरेंद्रियरूपपंजराधिपति ह्मणून जीवसंज्ञक आत्मा आहे. त्याविषयीं दोन्हीप्रकारच्या श्रुति परस्परविरुद्ध दृष्टीं पडत असल्यामुळें तो आकाशादिकांप्रमाणें उत्पन्न होतो किंवा ब्रह्माप्रमाणेंच उत्पन्न होत नाहीं असा संशय आहे. कारण, कांहीं श्रुतींमध्यें ठिणग्या वगैरेंचे दृष्टांत देऊन जीवात्म्याची परब्रह्मापासून उत्पत्ति सांगितल्याचें दिसतें आणि काहीं श्रुतींत तर निर्विकार अशाच परब्रह्माला कार्यामध्यें प्रवेश होत असल्यानें जीवरूप प्राप्त होत असल्याचें सांगितलें असून जीवात्म्याची उत्पत्ति वेगळी सांगितल्याचें दिसत नाहीं. तेव्हां ह्या दोहोंपैकीं खरें कोणतें समजावें? सकृद्दर्शनीं तर जीव उत्पन्न होतो हेंच ह्मणणें बरें दिसतें. " कशा-

प्राप्तं तावदुत्पद्यते जीव इति । कुतः । प्रतिज्ञानुपरोधादेव । एकस्मिन्विदिते सर्वमिदं विदितमितीयं प्रतिज्ञा सर्वस्य वस्तुजातस्य ब्रह्मप्रभवत्वे सति नोपरुध्येत तत्त्वान्तरत्वे तु जीवस्य प्रतिज्ञेयमुपरुध्येत । न चाविकृतः परमात्मैव जीव इति शक्यते विज्ञातुं लक्षणभेदात् । अपहतपाप्मत्वादिधर्मको हि परमात्मा तद्विपरीतो हि जीवः । विभागाच्चास्य विकारित्वसिद्धिः । यावान्ह्याकाशादिः प्रविभक्तः स सर्वो विकारस्तस्य चाकाशादेरुत्पत्तिः समधिगता । जीवात्मापि पुण्यापुण्यकर्मा सुखदुःखयुक्प्रतिशरीरं प्रविभक्त इति तस्यापि प्रपञ्चोत्पत्त्यवसर उत्पत्तिर्भवितुमर्हति । अपि च यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिङ्गा

---

वरून ? " ह्मणून विचाराल तर ऐका. जीवाची उत्पत्ति मानिली असतां प्रतिज्ञेला विरोध येत नाहीं. कारण, " एकस्मिन्विदिते सर्वमिदं विदितम् ( ह्मणजे एकाचें ज्ञान झालें असतां हें सर्व कांहीं समजतें ) " ही जी श्रुतीमध्यें प्रतिज्ञा केली आहे ती सर्व वस्तु ब्रह्मापासून उत्पन्न झाल्या असतील तरच अबाधित होणार आहे. जीव हें वेगळें तत्त्व आहे असें मानिल्यानें त्या प्रतिज्ञेला बाध येऊं लागेल. निर्विकार परमात्माच जीव असें समजणें शक्य नाहीं. कारण, जीव आणि परमात्मा ह्यांचीं लक्षणें वेगळीं वेगळीं आहेत. अपहतपाप्मत्वादि लक्षणांनीं आत्मा युक्त असून जीव विरुद्ध लक्षणांनीं युक्त आहे. शिवाय, विभक्तपणा असल्यामुळें ह्या जीवाला विकारित्व असल्याचें सिद्ध आहे. जेवढ्या ह्मणून आकाशादि विभक्त वस्तु आहेत तो सर्व विकार असून त्या आकाशादिकांची उत्पत्ति अभिमत आहे. बऱ्यावाईट कर्मांनीं आणि ह्मणूनच सुखदुःखांनीं युक्त असलेला जीवात्माही प्रत्येक शरीराचे ठिकाणीं विभक्त असल्यामुळें त्याचीही जगदुत्पत्तिसमयीं उत्पत्ति होणें योग्य आहे. शिवाय " यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिङ्गा व्युच्चरन्त्येवमेवास्मा-

व्युच्चरन्त्येवमेवास्मादात्मनः सर्वे प्राणा इति प्राणादेर्भोग्यजातस्य सृष्टिं शिष्ट्वा सर्व एत आत्मानो व्युच्चरन्तीति भोक्तॄणामात्मनां पृथक्सृष्टिं शास्ति । यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः । तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्तीति च जीवात्मनामुत्पत्तिप्रलयावुच्येते । सरूपवचनात् । जीवात्मानो हि परमात्मना सरूपा भवन्ति चैतन्ययोगात् । न च क्वचिदश्रवणमन्यत्र श्रुतं वारयति । श्रुत्यन्तरगतस्याप्यविरुद्धस्याधिकस्यार्थस्य सर्वत्रोपसंहर्तव्य-

---

दात्मनः सर्वे प्राणाः ( अग्नीपासून ज्याप्रमाणें लहान लहान ठिणग्या निघतात त्याचप्रमाणें ह्या आत्म्यापासून सर्व प्राण वगैरे निघतात )" ह्या श्रुतीमध्यें प्राणादि भोग्य पदार्थांची उत्पत्ति सांगून " सर्व एत आत्मानो व्युच्चरन्ति " अशी भोक्त्या आत्म्यांची ह्मणजे जीवांची उत्पत्ति वेगळी सांगितली आहे. तसेंच " चांगल्या प्रज्वलित अग्नीपासून ज्याप्रमाणें अग्नीसारख्या हजारों ठिणग्या निघतात त्याचप्रमाणें, हे सोम्या, परमात्म्यापासून नानाप्रकारचे प्राणी निघतात व तेथेंच लय पावतात " अशा अर्थाच्या " यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः । तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति " ह्या मुंडकोपनिषदांतील श्रुतींतही जीवात्म्याची उत्पत्ति व प्रलय हीं सांगितलीं असल्याचें दिसत आहे व "सरूपाः" ह्या शब्दावरून तर हें अगदीं स्पष्ट होत आहे. कारण, चैतन्य असल्यामुळें जीवात्मे परमात्म्याशीं सरूप ह्मणजे समानरूप होतात. आतां भूतांच्या उत्पत्तीचें प्रकरण श्रुतीमध्यें चाललें असतांना त्यांत जीवांची उत्पत्ति सांगितल्याचें दिसत नाहीं असें ह्मणाल तर ) कांहीं ठिकाणीं जीवांची उत्पत्ति श्रुत नाहीं ह्मणून दुसऱ्या ठिकाणीं श्रुत असलेल्या उत्पत्तीचा बाध होत नाहीं. कारण, एकेठिकाणीं अधिक सांगितलेला अविरुद्ध मजकूर

त्वात्। प्रवेशश्रुतिरप्येवं सति विकारभावापत्त्यैव व्याख्यातव्या तदात्मानꣳ स्वयमकुरुतेत्यादिवत्। तस्मादुत्पद्यते जीव इति। एवं प्राप्ते ब्रूमः। नात्मा जीव उत्पद्यत इति । कस्मात्। अश्रुतेः। न ह्यस्योत्पत्तिप्रकरणे श्रवणमस्ति भूयःसु प्रदेशेषु। ननु क्वचिदश्रवणमन्यत्र श्रुतं न वारयतीत्युक्तम् । सत्यमुक्तम्। उत्पत्तिरेव त्वस्य न संभवतीति वदामः। कस्मात्। नित्यत्वाच्च ताभ्यः । चशब्दादजत्वादिभ्यश्च । नित्यत्वं

---

गुणोपसंहारन्यायानें चोहोंकडे घ्यावा लागत असतो आणि ह्मणून ( मृत्तिका वगैरे ज्याप्रमाणें स्वविकाररूप घटादिकांचे ठिकाणीं चूर्णादिरूप दुसऱ्या विकारानें प्रविष्ट होते त्याचप्रमाणें ब्रह्म शरीर उत्पन्न करून जीवसंज्ञक विकारानें त्यांत प्रविष्ट होतें " असा—"तत्सृष्ट्वा। तदेवानु प्राविशत्॥" ह्या श्रुतीचा "तदात्मानꣳ स्वयमकुरुत।" ह्या श्रुतीच्या अर्थपद्धतीप्रमाणें—अर्थ करावा. असो. एकंदरींत जीव उत्पन्न होतो ही गोष्ट सिद्ध झाली. ह्याप्रमाणें पूर्वपक्षानें जीवोत्पत्ति सिद्ध झाली असतां आह्मी त्याला उत्तर देतों. आत्मा ह्मणजे जीव उत्पन्न होत नाहीं. "कशावरून?" कारण, तसें असल्याबद्दल कोठें श्रुति आढळत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं उत्पत्तिप्रकरणामध्यें ह्याबद्दल कोठेंही उल्लेख नाहीं. " अहो, पण एकाद्या ठिकाणीं सांगिलेलें नसलें तरी गुणोपसंहारन्यायानें इतर ठिकाणीं सांगितल्याचा बाध होत नाहीं ह्मणून वर ह्मटलें आहे." होय. ह्मणलें आहे खरें. परंतु, ह्या जीवाची उत्पत्तिच संभवत नाहीं असें आह्मी ह्मणतों. " कशावरून? " ह्मणाल तर त्या श्रुतींवरून जीवात्मा नित्य असल्याचें दिसत असल्यावरून. " नात्माश्रुतेर्नित्यत्वाच्च ताभ्यः " ह्या सूत्रांतील चकारानें अजत्व, अविकारित्व इत्यादिकांचा संग्रह करावा. ह्मणजे "नित्यत्वाच्च ताभ्यः " एवढयाचा अर्थ " जीवात्मा हा नित्य, उत्पत्तिरहित, विकाररहित वगैरे असल्याचें दिसत असल्यावरून " इतका समजावा.

ह्यस्य श्रुतिभ्योवगम्यते तथाजत्वमविकारित्वमविकृतस्यैव ब्रह्मणो जीवात्मनावस्थानं ब्रह्मात्मना चेति। न चैवंरूपस्योत्पत्तिरुपपद्यते। ताः काः श्रुतयः। न जीवो म्रियते ॥ स वा एष महानज आत्माजरोमरोमृतोभयो ब्रह्म॥ न जायते म्रियते वा विपश्चित् ॥ अजो नित्यः शाश्वतोयं पुराणः॥ तत्सृष्ट्वा। तदेवानुप्राविशत् ॥ अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि ॥ स एष इह प्रविष्ट आ नखाग्रेभ्यः ॥ तत्त्वमसि ॥ अहं ब्रह्मास्मि ॥ अयमात्मा ब्रह्म सर्वानुभूरित्येवमाद्या नित्यत्ववादिन्यः सत्यो जीवस्योत्पत्तिं प्रतिबध्नन्ति। ननु प्रविभक्तत्वाद्विकारो विकारत्वाच्चोत्पद्यत इत्युक्तम्। अत्रोच्यते। नास्य प्रविभागः स्वतोस्ति। एको देवः सर्व-

---

श्रुतींवरून हा जीवात्मा नित्य, उत्पत्तिरहित व विकारशून्य असल्याचें सिद्ध होतें. आणि त्याचप्रमाणें श्रुतींवरून विकाररहित ब्रह्मच जीवस्वरूपानें व ब्रह्मस्वरूपानें असल्याचें सिद्ध होतें. शिवाय, नित्य, अज, निर्विकार असा जो जीवात्मा त्याला उत्पत्ति असण्याचें शक्यच नाहीं. जीवात्मा नित्य, अज व निर्विकार आहे असें दर्शविणाऱ्या श्रुति कोणत्या ह्मणून विचाराल तर ऐका. न जीवो म्रियते ॥ स वा एष महानज आत्माजरोमरोमृतोभयो ब्रह्म ॥ न जायते म्रियते वा विपश्चित् ॥ अजो नित्यः शाश्वतोयं पुराणः ॥ तत्सृष्ट्वा। तदेवानुप्राविशत् ॥ अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि ॥ स एष इह प्रविष्ट आ नखाग्रेभ्यः ॥ तत्त्वमसि ॥ अहं ब्रह्मास्मि ॥ अयमात्मा ब्रह्म सर्वानुभूः ॥ इत्यादि श्रुति जीवाचें नित्यत्व दर्शवीत असल्यामुळें अर्थातच जीवाच्या उत्पत्तीचा निषेध करीत आहेत. "अहो, विभक्तपणा असल्यामुळें जीव हा विकार असून विकार असल्यामुळें तो उत्पन्न होतो असें ह्मटलें आहे" असें ह्मणाल तर सांगतों. ह्या

**भूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मेति श्रुतेः । बुद्ध्याद्युपाधिनिमित्तं त्वस्य प्रविभागप्रतिभानमाकाशस्येव घटादिसंबन्धनिमित्तम् । तथाच शास्त्रं स वा अयमात्मा ब्रह्म विज्ञानमयो मनोमयः प्राणमयश्चक्षुर्मयः श्रोत्रमय इत्येवमादि ब्रह्मण एवाविकृतस्य सतोऽस्यैकस्यानेकबुद्ध्यादिमयत्वं दर्शयति । तन्मयत्वं चास्य विविक्तस्वरूपानभिव्यक्त्या तदुपरक्तस्वरूपत्वं स्त्रीमयो जाल्म इत्यादिवद्द्रष्टव्यम् । यदपि क्वचि-**

---

जीवात्म्याला स्वाभाविक विभक्तपणा नाहीं. कारण, " सर्वव्यापी व सर्वप्राणिस्वरूप असा अद्वितीय व स्वयंप्रकाश परमात्माच सर्व भूतांचे ठिकाणीं आच्छादित होऊन राहिला आहे " अशा आशयाची " एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा " ही श्वेताश्वतरोपनिषदांतील श्रुति आहे. घटादिकांच्या संबंधामुळें ज्याप्रमाणें आकाशाचा विभक्तपणा भासतो त्याचप्रमाणें बुद्धिप्रभृति उपाधींमुळें ह्याच्या विभक्तपणाचा भास होत असतो. कारण, तोच हा ब्रह्मस्वरूप जीवात्मा बुद्धिमय, मनोमय, प्राणमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय इत्यादि प्रकारचें " स वा अयमात्मा ब्रह्म विज्ञानमयो मनोमयः प्राणमयश्चक्षुर्मयः श्रोत्रमयः " हें श्रुतिशास्त्र विकाररहित अशा अद्वितीय सद्रूप ब्रह्माचेंच अनेकबुद्ध्यादिमयत्व दर्शवीत आहे. स्त्रीचे तंत्रानें वागणाऱ्या एकाद्या मूढ पुरुषाला उद्देशून ज्याप्रमाणें " स्त्रीमयो जाल्मः " असें ह्मणतात त्याचप्रमाणें वेगळें स्वरूप दृग्गोचर न होतां बुद्धिप्रभृति उपाधींनीं ब्रह्मस्वरूप परिच्छिन्न भासत असल्यामुळें विज्ञानमय, मनोमय इत्यादिप्रकारांनीं ब्रह्माचा निर्देश केलेला आहे. ह्याकरितां, " विज्ञानमय, मनोमय " इत्यादिकांचा अर्थ जीवरूप ब्रह्म बुद्धिप्रभृति उपाधींच्या अधीन आहे असा होय. करितां, " यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिङ्गा व्युच्चरन्त्येवमेवास्मादात्मनः सर्वे प्राणाः " इत्यादि बृहदारण्यकोपनिषदांतील व " यथा

दस्योत्पत्तिप्रलयश्रवणं तदप्यत एवोपाधिसंबंधान्नेतव्यम् । उपाध्युत्पत्त्यास्योत्पत्तिस्तत्प्रलयेन च प्रलय इति । तथा च दर्शयति प्रज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानु विनश्यति न प्रेत्य संज्ञास्तीति। तथोपाधिप्रलय एवायं नात्मविलय इत्येतदप्यत्रैव मा भगवान्मोहान्तमापीपन्न वा अहमिहं विजानामि न प्रेत्य संज्ञास्तीति प्रश्नपूर्वकं प्रतिपादयति । न वा अरेहं मोहं ब्रवीम्यविनाशी वा अरेयमात्मानुच्छित्तिधर्मा मात्रासंसर्गस्त्वस्य भवतीति । प्रतिज्ञानुपरोधोप्यविकृतस्यैव ब्रह्मणो जीवभावाभ्युपगमात् । लक्षणभेदोप्यनयोरुपाधिनिमित्त एव । अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति

---

सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः । तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति " ह्या मुण्डकोपनिषदांतील श्रुतींचें व्याख्यान उपाधिसंबंध लक्ष्यांत आणूनच केलें पाहिजे; ह्मणजे उपाधींच्या उत्पत्तीमुळें ह्या जीवात्म्याची उत्पत्ति भासमान होते व उपाधींच्या नाशामुळें ह्याचा नाश होत आहेसा भासतो अशा आशयाचें केलें पाहिजे. कारण, " प्रज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानु विनश्यति न प्रेत्य संज्ञास्तीति " ही बृहदारण्यकोपनिषदांतर्गत मैत्रेयिब्राह्मणांतील श्रुतिही तसा अर्थ करण्यास प्रमाण आहे. जीवात्म्याचा नाश न होतां उपाधींचाच नाश होत असतो ह्याचेंही प्रश्नपूर्वक प्रतिपादन केलें आहे. " अत्रैव० संज्ञास्ति " हा प्रश्न असून " न वा० भवति " हें प्रतिपादन होय. शिवाय " एकस्मिन्विदिते सर्वमिदं विदितम् । " ह्या प्रतिज्ञेला बाधही अविकृत ब्रह्मच जीवस्वरूप बनतें असें मानिल्यानेंच येत नाहीं. परमात्मा अपहतपाप्मत्वादि धर्मांनीं युक्त असून जीव तद्विपरीत धर्मांनीं युक्त आहे हा जो जीवपरमात्म्यांतील लक्षणभेद तोही उपाधींमुळेंच

च प्रकृतस्यैव विज्ञानमयस्यात्मनः सर्वसंसारधर्मप्रत्याख्यानेन परमात्मभावप्रतिपादनात् । तस्मान्नैवात्मोत्पद्यते प्रविलीयते चेति ॥ १७ ॥ ११ ॥

---

आहे. कारण, " अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहि " ह्मणून बुद्धिप्रभृति उपाधींचे अधीन असलेला जीवात्माच सर्वसंसारधर्मरहित असून परमात्मस्वरूप असल्याचें प्रतिपादन केलें आहे. तस्मात्, जीवात्मा कदापि उत्पन्न होत नाहीं व त्याचा नाशही कधीं होत नाहीं ॥ १७॥११॥

देहिनोस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

---

तत्र कथमिव नित्य आत्मेति दृष्टान्तमाह देहिनोस्मि० न मुह्यति ॥ १३ ॥ देहोस्यास्तीति देही तस्य देहिनो देहवदात्मनोस्मिन्वर्तमाने देहे यथा येन प्रकारेण कौमारं कुमारभावो बाल्यावस्था यौवनं यूनो भावो मध्यावस्था जरा वयोहानिर्जीर्णावस्थेत्येतास्तिस्रोवस्था अन्योन्यविलक्षणास्तासां प्रथमावस्थानाशे न नाशो द्वितीयावस्थोपजनने नोपजननमात्मनः किं तर्ह्यविक्रियस्यैव द्वितीयतृतीयावस्थाप्राप्तिरात्मनो दृष्टा यथा तद्वदेव देहादन्यो देहान्तरं तस्य प्राप्तिर्दे-

---

देहयुक्त आत्म्याला ह्या देहामध्यें ज्याप्रमाणें बाल्य, यौवन आणि जरा ह्या अवस्था प्राप्त होतात त्याचप्रमाणें त्या आत्म्यालाच दुसरा देह प्राप्त होतो आणि असें असल्यामुळें आत्मा नित्य असल्याचें जाणीत असलेल्या पुरुषाला जन्ममरणांविषयीं मोह प्राप्त होत नाहीं॥ १३॥

आतां आत्मा नित्य कसा ह्याविषयीं " देहिनोस्मि० मुह्यति " ह्या श्लोकानें दृष्टांत सांगतात. देह ज्याला असतो तो देही. त्या देह्याला ह्मणजे देहवान् आत्म्याला ह्या विद्यमान देहामध्यें ज्या रीतीनें कौमार =कुमारपण=बाल्यावस्था, यौवन=तरुणपण=मध्यावस्था आणि जरा=वयाचा उतारपणा=जीर्णावस्था ह्या तीन परस्परविरुद्ध अवस्था प्राप्त होतात आणि त्या तीन अवस्थांपैकीं पहिल्या अवस्थेचा नाश झाल्यानें जसा आत्म्याचा नाश होत नाहीं व दुसरी अवस्था उत्पन्न झाल्यानें जशी आत्म्याची उत्पत्ति होत नाहीं परंतु आत्मा विकाररहित असतांनाच त्याला दुसरी यौवनावस्था व तिसरी वार्धक्यावस्था प्राप्त होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें—त्याच रीतीनें दुसऱ्या देहाची प्राप्तिही विकाररहित असतांनाच आत्म्याला होत असते. ह्यामुळें

मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

---

हान्तरप्राप्तिरविक्रियस्यैवात्मन इत्यर्थः । धीरो धीमांस्तत्रैवं सति न मुह्यति न मोहमापद्यते ॥ १३ ॥

यद्यप्यात्मविनाशनिमित्तो मोहो न संभवति नित्य आत्मेति विजानतस्तथापि शीतोष्णसुखदुःखप्राप्तिनिमित्तो मोहो लौकिको दृश्यते सुखवियोगनिमित्तो दुःखसंयोगनिमित्तश्च शोक इत्येतदर्जुनस्य वचनमाशङ्क्याह मात्रास्पर्शास्तु० भारत ॥ १४ ॥ मात्रा आभिर्मीयन्ते शब्दादय इति श्रोत्रादीनीन्द्रियाणि । मात्राणां स्पर्शाः शब्दादिभिः संयोगास्ते शीतोष्णसुखदुःखदाः शीतमुष्णं सुखं दुःखं च प्रय-

---

देहाची उत्पत्ति व नाश ह्यांविषयीं आत्मा नित्य असल्याचें जाणीत असलेल्या पुरुषाला मोह प्राप्त होत नाहीं. " देहादन्यो देहान्तरं तस्य प्राप्तिर्देहान्तरप्राप्तिः " असा ह्या श्लोकांतील " देहान्तरप्राप्तिः " ह्या समासाचा विग्रह समजावा ॥१३॥

( कारण, ) हे भरतवंशजा कुंतीपुत्रा, इंद्रियांशीं होणारे विषयांचे संयोग शीत, उष्ण, सुख व दुख ह्यांना कारणीभूत होणारे असून उत्पत्ति व विनाश ह्यांनीं युक्त असल्यामुळें अनित्य आहेत. तस्मात् , त्यांकडे तूं लक्ष्य देऊं नकोस ॥१४॥

आत्मा नित्य आहे असें जाणणाऱ्या पुरुषाला जरी आत्म्याचा नाश झाला ह्मणून मोह होण्याचा संभव नाहीं तरी शीत, उष्ण, सुख व दुःख ह्यांच्या प्राप्तीमुळें लोकांना मोह होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें व त्याचप्रमाणें सुखाचा वियोग आणि दुःखाचा संयोग झाल्यामुळें शोक होत असल्याचेंही दिसतें असें अर्जुन ह्मणेल अशी शंका घेऊन श्रीकृष्ण ह्मणतातः— श्रवणादि ज्ञानेंद्रियांचे जे शब्दादि

च्छन्तीति । अथवा स्पृश्यन्त इति स्पर्शा विषयाः शब्दादयो मात्राश्च स्पर्शाश्च शीतोष्णसुखदुःखदाः शीतं कदाचित्सुखं कदाचिद्दुःखं तथोष्णमप्यनियतरूपं सुखदुःखे पुनर्नियतरूपे यतो न व्यभिचरतोतस्ताभ्यां पृथक्शीतोष्णयोर्ग्रहणम् । यस्मात्ते मात्रास्पर्शाद्य आगमापायिन आगमापायशीलास्तस्माद-नित्या अतस्ताञ्शीतोष्णादींस्तितिक्षस्व प्रसहस्व तेषु हर्षं विषादं च मा कार्षीरित्यर्थः ॥ १४ ॥

---

विषयांशीं संयोग ते शीत, उष्ण, सुख व दुःख देतात आणि ज्याअर्थीं ते विषयेंद्रियसंयोगादिक उत्पत्ति व विनाश ह्यांनीं युक्त आहेत त्याअर्थीं ते अनित्य आहेत. करितां, तूं शीतोष्णादिक सहन कर ह्मणजे त्यांविषयीं हर्ष आणि विषाद मानूं नकोस. ज्याच्या योगानें शब्दादिविषय अजमावले जातात ह्मणजे अनुभविले जातात त्या मात्रा अशी मात्रा शब्दाची व्युत्पत्ति असल्यामुळें त्याचा अर्थ श्रवणादि ज्ञानेंद्रियें असा होतो. कारण, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ह्या विषयांचा अनुभव अनुक्रमें श्रवणेंद्रिय, त्वगिन्द्रिय, चक्षुरिन्द्रिय, रसनेन्द्रिय व घ्राणेंद्रिय ह्या ज्ञानेंद्रियांच्या योगानेंच येत असतो. "मात्राणां स्पर्शाः" असा "मात्रास्पर्शाः" ह्या समासाचा विग्रह होय. मात्रा ह्मणजे इंद्रियें व स्पर्श ह्मणजे संयोग असे दोन्ही शब्दांचे अर्थ असल्यामुळें "मात्रा-स्पर्शाः" ह्या सामासिक पदाचा अर्थ ज्ञानेंद्रियांशीं विषयांचा संयोग= विषयानुभव असा होतो. "शीतमुष्णं सुखं दुःखं च प्रयच्छन्तीति" असा शीतोष्णसुखदुःखदाः ह्या समासाचा विग्रह समजावा. "मात्रास्पर्शाः" हा समास षष्ठीतत्पुरुष समजावा अथवा "मात्राश्च स्पर्शाश्च मात्रास्पर्शाः" असा द्वन्द्व समजावा. ह्या प्रमाणें द्वन्द्व समास मानिला असतां –इंद्रियें आणि शब्दादि विषय शीत, उष्ण, सुख व दुःख ह्यांना कारणीभूत होतात--असा श्लोकाच्या पूर्वार्धाचा अर्थ होतो. कालभेदादिकार-

णांमुळें शैत्य कधीं कधीं सुखाला व कधीं कधीं दुःखाला कारणीभूत होतें आणि उष्णालाही हीच गोष्ट लागू आहे. परंतु, शैत्य व उष्ण ह्यांचा स्वभाव जरी ह्याप्रमाणें अस्थिर असला तरी सुख व दुःख ह्यांच्या स्वरूपांत भेद कधींही होत नाहीं. ह्याकरितां "सुखदुःखदाः" असें नुसतें न ह्मणतां "शीतोष्णसुखदुःखदाः" असें ह्मणून शीत व उष्ण ह्यांचें परिगणन वेगळें केलें आहे ॥ १४ ॥

("तांस्तितिक्षस्व भारत" ह्या श्लोकपादांतील "तान्" ह्या सर्वनामाचें स्पष्टीकरण "मात्रास्पर्शान्" असें करणें योग्य दिसतें; तथापि, ह्या मात्रास्पर्शांचा जो कांहीं पुरुषाचे अंतःकरणावर परिणाम व्हावयाचा तो शीत, उष्ण, इत्यादिकांचा अनुभव आल्यावांचून होत नाहीं ह्मणून भाष्यकारांनीं "तान्शीतोष्णादींस्तितिक्षस्व" असें ह्मटलें आहे. "शीतोष्णसुखदुःखदाः" ह्या पदाचें व्याख्यान शीतोष्णादिद्वारा सुखदुःखदाः ( शीतोष्णादिकांच्या द्वारानें सुखदुःख देणारे )" असें मधुसूदनांनीं केलें आहे. परंतु, तें बरोबर नाहीं. कारण, प्रत्येक प्रकारच्या विषयानुभवापासून होणारें सुख अथवा दुःख शीतोष्णांच्या द्वारानेंच होत असतें असें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. शिवाय, "शीतोष्णग्रहणमाध्यात्मिकाधिभौतिकाधिदैविकसुखदुःखोपलक्षणार्थं शीतमुष्णं च कदाचित्सुखं कदाचिद्दुःखं सुखदुःखे तु न कदापि विपर्ययेते इति पृथङ्निर्देशः( आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशीं जीं तीन प्रकारचीं सुखदुःखें त्यांचा समावेश करण्याकारितां "शीतोष्ण" असें म्हटलें आहे. शीत व उष्ण हीं कधीं कधीं सुखावह असतात आणि कधीं कधीं दुखावहही होतात; परंतु, सुख व दुःख ह्यांच्या स्वरूपांत कधींही फेर पडत नाहीं. ह्याकारितां, शीत व उष्ण ह्यांचा निर्देश वेगळा केला आहे)" असें जें मधुसूदनांनीं स्वतः म्हटलें आहे त्याला विरोध येतो. "शब्दादयः प्रतिकूलमनुकूलं वा शीतमुष्णं वाप्यध्यात्ममुत्पाद्य तद्द्वारा साक्षाद्वा सुखं दुःखं च ददतीति शीतोष्णसुखदुःखदाः ( शब्दादि विषय–प्रतिकूल अथवा

अनुकूल असें शैत्य किंवा उष्ण उत्पन्न करून त्यांच्या द्वारानें अथवा प्रत्यक्ष—सुख व दुःख देतात ह्मणून " शीतोष्णसुखदुःखदाः "असें विशेषण " मात्रास्पर्शाः " ह्या विशेष्याला दिलें आहे ) " असें शंकरानंदांनीं म्हटलें आहे तें बरोबर आहे. परंतु, भाष्यांतूनही हा अर्थ निघतच आहे. तस्मात् " शीतमुष्णं सुखं दुःखं च प्रयच्छन्ति असें जें भाष्यकारांनीं व्याख्यान केलें आहे तेंच सरळ दिसतें. " आगमापायिनः " हे षष्ठ्यन्तपद समजून त्याचें व्याख्यान मधुसूदनांनीं " उत्पत्तिविनाशवतोन्तःकरणस्य " असें केलें आहे; परंतु, तें बरोबर नाहीं. कारण, तसें व्याख्यान केल्यानें जरी वाक्यार्थ विरुद्ध होत नाहीं तरी " अन्तःकरणस्य " ह्या विशेष्याचा अध्याहार विनाकारण करावा लागणें हें ह्या व्याख्यानावर दूषण येतें. " कौन्तेय भारतेति संबोधनद्वयेनोभयकुलविशुद्धस्य तवाज्ञानमनुचितमिति सूचयति ( ज्याचें मातृकुल व पितृकुल हीं दोन्हीं शुद्ध आहेत त्या तुला आत्म्याविषयीं अज्ञान असणें योग्य नव्हे हें " कौन्तेय " आणि " भारत "ह्या दोन संबोधनांनीं अर्जुनाला श्रीकृष्ण सुचवीत आहेत)" असें मधुसूदनांनीं "कौन्तेय" व"भारत "ह्या संबोधनांचें तात्पर्य काढिलें आहे ; परंतु, पुरुषाचीं दोन्हीं कुलें चांगलीं असलीं कीं तो आपला ब्रह्मनिष्ठ असावयाचाच असा नियम असल्याचें सिद्ध असेल तरच तें तात्पर्य बरोबर होईल."स्त्रियांप्रमाणें ज्याचा स्वभाव असतो त्याला सुख, दुःख, वगैरे देणारे जे हे मात्रास्पर्श ते भरतासारख्यापुरुषांप्रमाणें सुस्वभावाचें अवलंबन करून सहन करण्यास तूं योग्य आहेस " असें सदर्हू संबोधनांचें तात्पर्य धनपतींनीं काढिलें आहे. संबोधनांचा अभिप्राय काढणें विशेषसें कठीण नसल्यामुळें भाष्यामध्यें प्रायः तो कोठेंच काढलेला दिसत नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजही संबोधनांचें तात्पर्य काढण्याच्या भरीस विशेष पडले नाहींत असें दिसतें. ह्या श्लोकाचें स्पष्टीकरण ज्ञानेश्वर महाराजांनीं फारच चांगल्यारीतीनें केलें असल्यामुळें व तें समजणें अवश्यक वाटत असल्यामुळें जसेंच्या तसेंच खालीं दिलें आहे:—

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

---

**शीतोष्णादीन्सहतः किं स्यादिति शृणु यं हि न० कल्पते ॥ १५ ॥ यं हि पुरुषं समदुःखसुखं समे दुःखसुखे यस्य तं समदुःखसुखं सुखदुःखप्राप्तौ हर्षविषादरहितं धीरं**

---

एथ नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधीनपण । तिहीं आकळिजे अंतःकरण । ह्मणऊनि भ्रमे ॥ इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्षशोक उपजती । ते अंतर आप्लविती । संगें येणें ॥ जयां विषयांचा ठायीं । एकनिष्ठता कांहीं नाहीं । तेथें दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥ देखें शब्दाची व्याप्ति । निंदा आणि स्तुति । तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥ मृदु आणि कठिण । हे स्पर्शाचे दोनी गुण । जे वपूचेनि संगें कारण । संतोषखेदां ॥ भ्यासुर आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख । जें उपजवी सुखदुःख । नेत्रद्वारें ॥ सुगंध आणि दुर्गंध । हा परिमळाचा भेद । जो घ्राणसंगें विषाद । तोष देता ॥ तैसाचि द्विविध रस । उपजवी प्रीति त्राम । ह्मणूनि हा अपभ्रंश । विषयसंग ॥ देखें इंद्रियां आधीन होइजे । तैं शीतोष्णातें पाविजे । आणि सुखदुःखीं आकळिजे । आपण पैं ॥ या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावचि पाही । इंद्रियांचा ॥ हे विषय तरी कैसे । रोहिणीचें जळ जैसें । का स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ॥ देखें अनित्य ते यापरी । ह्मणऊनि तूं अव्हेरी । हा सर्वथा संग न धरी । धनुर्धरा ॥ १४ ॥ )

हे पुरुषश्रेष्ठा, सुख व दुःख हीं ज्याला सारखीं आहेत अशा ज्या धीर पुरुषाला हे मात्रास्पर्श उपद्रव देत नाहींत तो पुरुष मोक्षाला योग्य होतो॥ १५॥

शैत्य, उष्ण इत्यादि सहन करणाऱ्याला काय फल प्राप्त होतें ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, ऐक. सुखप्राप्ति झाली असतां हर्ष आणि दुःखप्राप्ति झाली असतां विषाद न मानणाऱ्या ज्या नित्यात्म-

**धीमन्तं न व्यथयन्ति न चालयन्ति नित्यात्मदर्शनादेते यथोक्ताः शीतोष्णादयः स नित्यात्मदर्शननिष्ठो द्वन्द्वसहिष्णुरमृतत्वायामृतभावाय मोक्षाय कल्पते समर्थो भवति ॥ १५ ॥**

---

ज्ञानवान् पुरुषाला ह्या शीतोष्णादिकांची व्यथा होत नाहीं ह्मणजे नित्यात्मज्ञानामुळें ज्याच्या मनोवृत्तींत भेद करण्यास शीतोष्णादिक समर्थ होत नाहींत तो नित्यात्मदर्शननिष्ठ व द्वन्द्वसहिष्णु पुरुष मोक्षप्राप्ति होण्यास समर्थ होतो. " समदुःखसुखे यस्य तं " असा " समदुःखसुखं " ह्या बहुव्रीहि समासाचा विग्रह होय १५.

(''धीर'' ह्या शब्दाचा अर्थ ''धीमान्'' असा भाष्यकारांनीं केला असून ''धीमान्'' ह्या शब्दाचें स्पष्टीकरण धनपतिनामक टीकाकारानें " नित्यात्मज्ञानवान् " असें केलें आहे. भाष्यांतील " नित्यात्मदर्शनात् " ह्या समस्तपदांतर्गत दर्शनशब्दाचा अर्थ " ज्ञान " असा आहे. तेव्हां नित्यात्मज्ञान हा नित्यात्मदर्शन ह्या पदाचा अर्थ होय. भाष्यांतील नित्यात्मदर्शननिष्ठ ह्या पदाचा अर्थ नित्यात्मज्ञानाविषयीं तत्पर असा आहे. " समदुःखसुखं धीरं " हीं दोन पदें उपलक्षणार्थ समजून त्या दोहोंचा मिळून अर्थ धनपति पंडितांनीं आपल्या भाष्योत्कर्षदीपिका ह्या नांवाच्या स्वतंत्र टीकेंत व आनंदगिरींनीं भाष्यावरील टीकेंत " साधनचतुष्टयसंपन्न " असा केला आहे. साधनचतुष्टयसंबंधीं माहिती ९०, ९१ व ९२ ह्या पृष्ठांवर सप्रमाण दिलीच आहे. द्वंद्व ह्मणजे परस्परविरुद्ध गुणांचें अथवा अवस्थांचें युग्म. तेव्हां भाष्यांतील " द्वंद्वसहिष्णु " ह्या शब्दाचा अर्थ सुखदुःख, शीतोष्ण इत्यादि सहन करणारा ह्मणजे सुख अथवा दुःख किंवा शैत्य अथवा उष्ण प्राप्त झालें असतां ज्याला हर्ष अथवा विषाद प्राप्त होत नाहीं असा. अमृतत्व ह्मणजे जन्ममरणराहित्य ह्मणजे अर्थात मोक्ष. ह्मणूनच " अमृतत्वाय कल्पते " ह्या श्लोकपादाचा अर्थ भाष्यकारांनीं मोक्षाला समर्थ होतो असा केला आहे ) १५.

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

---

इतश्च शोकमोहावकृत्वा शीतोष्णादिसहनं युक्तं यस्मान्नासतो विद्यते० स्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥ नासतोऽविद्यमानस्य शीतोष्णादेः सकारणस्य न विद्यते नास्ति भावो भवनमस्तिता । न हि शीतोष्णादि सकारणं प्रमाणैर्निरूप्यमाणं वस्तु सद्भवति । विकारो हि सः । विकारश्च व्यभिचरति यथा घटादिसंस्थानं चक्षुषा निरूप्यमाणं मृद्व्यतिरेकेणानुपलब्धेरसत्तथा सर्वो विकारः कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसन् । जन्मप्रध्वंसाभ्यां प्रागूर्ध्वं चानुपलब्धेः । मृदादिका-

---

अविद्यमान वस्तूचें आस्तित्व व विद्यमान वस्तूचा अभाव हीं कधीं नसतात आणि त्याचप्रमाणें आत्मा व अनात्मा ह्या ज्या उभयतां अनुक्रमें विद्यमान व अविद्यमान असलेल्या दोन गोष्टी त्यांचा निर्णय ब्रह्मवेत्त्यांनीं केलेला आहे ॥ १६ ॥

ह्यास्तव शोक न करितां व मोहांतही न पडतां शीतोष्णादि सहन करणें योग्य आहे. कारण, असत् ह्मणजे विद्यमान नसलेलें जें शीतोष्णादि त्याचें कारणासहवर्तमान वास्तविक अस्तित्व नाहीं. प्रत्यक्षादि प्रमाणांनीं प्रतीत होत असलेलीं शीतोष्णादिक व त्यांचीं कारणें हीं कांहीं खऱ्या वस्तु असण्याचा संभव नाहीं. कारण, शीत, उष्ण वगैरे हा विकार आहे आणि विकार तर नष्ट होतो. घट, परळ वगैरे आकृति डोळ्यांनीं प्रतीत होत असल्या तरी मृत्तिकेहून वस्तुतः त्या भिन्न असल्याचें ज्याप्रमाणें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं आणि ह्मणूनच वास्तविक त्या सत्य नाहींत त्याचप्रमाणें कोणताही विकार स्वतःच्या कारणाहून भिन्न नसल्यामुळें सत्य नाहीं. कारण, उत्पत्तीचे पूर्वीं आणि नाशानंतर त्याची उपलब्धि होत नाहीं. घट, पट इत्यादि विकारांचें जें मृत्तिका वगैरे

रणस्य च तत्कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसत्त्वम् । तदसत्त्वे च सर्वाभावप्रसङ्ग इति चेन्न सर्वत्र बुद्धिद्वयोपलब्धेः सद्बुद्धिरसद्बुद्धिरिति। यद्विषया बुद्धिर्न व्यभिचरति तत्सद्यद्विषया बुद्धिर्व्यभिचरति तदसदिति सदसद्विभागे बुद्धितन्त्रे स्थिते सर्वत्र द्वे बुद्धी सर्वैरुपलभ्येते समानाधिकरणे । न नीलोत्पलवत्सन्घटः सन्पटः सन्हस्तीति । एवं सर्वत्र । तयोर्बुद्ध्योर्घटादिबुद्धिर्व्यभिचरति तथा च दर्शितम् । न तु सद्बुद्धिः। तस्माद्घटादिबुद्धिविषयोसन्व्यभिचारान्नतु सद्बु-

---

कारण तेंही स्वतःच्या कारणाहून वस्तुतः भिन्न असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नसल्यामुळें असत्यच आहे. आतां " घट वगैरे असत्य मानून त्याचें कारण, जी मृत्तिका वगैरे तीही असत्य मानिल्यानें कार्यकारणपरंपराच तुह्मीं असत्य मानिलीत. तेव्हां ह्याप्रमाणें कार्यकारणपरंपरा असत्य मानाल तर सर्वच असत्य मानण्याचा प्रसंग येईल " ही शंका बरोबर नाहीं. कारण, व्यवहारामध्यें सर्व ठिकाणीं सद्बुद्धि आणि असद्बुद्धि अशा दोन बुद्धि दृष्टोत्पत्तीस येत असतात. ज्याविषयींची बुद्धि नाहींशी होत नाहीं ह्मणजे कायम असते तें सत् आणि ज्याविषयींची बुद्धि नाहींशी होते तें असत्. ह्याप्रमाणें सत् व असत् हा विभाग बुद्धींच्या अधीन असल्यामुळें व्यवहाराला अडचण पडत नाहीं. व्यवहारामध्यें सर्व ठिकाणीं ह्या दोन बुद्धि सर्वांच्या अनुभवास येत असतात व त्या समानाधिकरण ह्मणजे एकाच वस्तूच्या आश्रयाला असलेल्या अशा अनुभवाला येत असतात. नील कमल हें सामानाधिकरण्य गौण आहे. त्याप्रमाणें " विद्यमान घट, विद्यमान पट, विद्यमान हत्ती " हें सामानाधिकरण्य गौण नाहीं; तर तें एका वस्तूच्या आश्रयाला असल्यामुळें मुख्य आहे. सर्व ठिकाणीं असाच प्रकार असतो. असो. त्या दोन बुद्धींपैकीं घटादिविषयक बुद्धि नाहींशी होते व त्याप्रमाणें पूर्वीं दर्शविलेंही आहे.

द्धिविषयोऽव्यभिचारात् । घटे विनष्टे घटबुद्धौ व्यभिचरन्त्यां सद्बुद्धिरपि व्यभिचरतीति चेत् । न पटादावपि सद्बुद्धिदर्शनात् । विशेषणविषयैव सा सद्बुद्धिः । सद्बुद्धिवद्घटबुद्धिरपि घटान्तरे दृश्यत इति चेन्न पटादावदर्शनात् । सद्बुद्धिरपि नष्टे घटे न दृश्यत इति चेन्न विशेष्याभावात् । सद्बुद्धिर्विशेषणविषया सती विशेष्याभावे विशेषणानुपपत्तौ किंविषया स्यान्न तु पुनः सद्बुद्धेर्विषयाभावात् । एकाधिकरणत्वं घटादिविशेष्याभावे न युक्तमिति चेन्न । इदमुदकमिति मरीच्यादावन्यतराभावेऽपि सामानाधिकरण्यदर्शनात् ।

---

सद्बुद्धि नाहींशीं होत नाहीं. तस्मात्, घटादिबुद्धिविषय कायम रहात नसल्यामुळें असत्य आहे आणि सद्बुद्धिविषय नाहींसा होत नसल्यामुळें सत्य आहे. घट नष्ट झाल्यावर घटबुद्धि नाहींशीं होत असतां तिच्या बरोबर सद्बुद्धिही नाहींशीं होते ही शंका बरोबर नाहीं. कारण, पट वगैरेंचे ठिकाणीं सद्बुद्धि दृष्टोत्पत्तीस येते. ती सद्बुद्धि विशेषणविषयकच आहे. सद्बुद्धीप्रमाणें घटबुद्धिही दुसऱ्या घटाचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते अशी शंका योग्य नाहीं. कारण, घटबुद्धि पट वगैरेंचे ठिकाणीं दृष्टीं पडत नाहीं. आतां “ सद्बुद्धि देखील घट नष्ट झाल्यावर दिसत नाहीं ” असें ह्मणाल तर तें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, विशेष्याचा अभाव असल्यामुळें ती दिसत नाहीं. सद्बुद्धि जर विशेषणविषयक आहे आणि विशेष्याचा अभाव असतांना जर विशेषणाची उपपत्ति होत नाहीं तर ती विशेषणविषयक सद्बुद्धि राहणार कोठें? तात्पर्य, सद्बुद्धि स्वरूपतः नष्ट झाल्यामुळें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं असें नाहीं. “ घटादिविशेष्याचा वास्तविक अभाव असतांना सामानाधिकरण्य असणें योग्य नाहीं ” अशी शंकाही अयोग्यच आहे. कारण, मृगजळ वगैरेंचे ठिकाणीं दोहोंपैकीं एकाचा ( ह्मणजे उदकाचा ) अभाव

तस्माद्देहादेर्द्वन्द्वस्य च सकारणस्यासतो न विद्यते भाव इति तथा सतश्चात्मनोभावोविद्यमानता न विद्यते सर्वत्राव्यभिचारादित्यवोचाम। एवमात्मानात्मनोः सदसतोरुभयोरपि दृष्ट उपलब्धोन्तो निर्णयः सत्सदेवासदसदेवेति त्वनयोर्यथोक्तयोस्तत्त्वदर्शिभिः । तदिति सर्वनाम सर्वं च ब्रह्म तस्य नाम तदिति तद्भावस्तत्त्वं ब्रह्मणो याथात्म्यं तद्द्रष्टुं शीलं येषां ते तत्त्वदर्शिनस्तैस्तत्त्वदर्शिभिः। त्वमपि तत्त्वदर्शिनां दृष्टिमाश्रित्य शोकं मोहं च हित्वा शीतोष्णादींस्तितिक्षस्वेत्यभिप्रायः ॥ १६ ॥

---

असूनहीं "हें उदक" अशाप्रकारचें सामानाधिकरण्य दृष्टोत्पत्तीस येतें. तस्मात्, वास्तविक असत्य असा देह वगैरेआणि शीतोष्णादि द्वंद्वें ह्यांना व ह्यांच्या कारणांना खरें खरें अस्तित्व नाहीं. त्याचप्रमाणें सद्रूप जो आत्मा त्याला अविद्यमानता नाहीं. ह्याचें कारण "तो कोठेंही नसतो असें नाहीं" ह्मणून सांगितलेंच आहे. ह्याप्रमाणें अनुक्रमें सद्रूप व असद्रूप अशा उभयतां आत्मानात्म्यांविषयीं ह्मणजे आत्मा व आत्मव्यतिरिक्त ह्यांविषयीं देशतः, कालतः व वस्तुतः परिच्छिन्न नसलेलें सत्च व देशकालवस्तूंनीं परिच्छिन्न असलेलें असत्च असा निर्णय तत्त्ववेत्त्यांनीं ह्मणजे ब्रह्मवेत्त्यांनीं केलेला आहे. "तत्" हें सर्वनाम आहे आणि ब्रह्मच सर्व आहे. तेव्हां "तत्" ह्मणजे ब्रह्म. ह्या ब्रह्माचा जो भाव ह्मणजे यथार्थ स्वरूप तें तत्त्व होय. तेव्हां यथार्थ ब्रह्मस्वरूप अवलोकन करण्याचा ज्यांचा स्वभावच बनून गेलेला आहे ते ब्रह्मवेत्ते असा "तत्त्वदर्शिनः" ह्या पदाचा अर्थ होय. सारांश, "हे अर्जुना, तूंही ब्रह्मवेत्त्यांच्या दृष्टीचें अवलंबन करून शोक व मोह यांचा त्याग कर आणि ( वास्तविक विचार केला असतां कधींही विद्यमान नसलेलें ) शीतोष्णादिक सहन कर" ह्मणून श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सुचविलें हा ह्या श्लोकाचा अभिप्राय होय ॥१६॥

(*शीत, उष्ण वगैरेंचा अनुभव जरी येत असतो तरी तीं बाधित असल्यामुळें मिथ्या आहेत ह्मणून आणि आत्मा बाधित होत नसल्यामुळें सत्य आहे ह्मणून शोक न करितां व मोहांतही न पडतां शीतोष्णादि सहन करणें योग्य आहे हा " इतश्च शोकमोहावकृत्वा शीतोष्णादिसहनं युक्तम् " ह्या भाष्याचा आशय होय. असतः ह्मणजे विचारानें बाधित होत असल्यामुळें पूर्वी देखील कारणासह विद्यमान नसलेलें जें शीतादिक तें जरी प्रत्यक्षादि प्रमाणांनीं अनुभवाला येत असलें तरी वास्तविक अस्तित्वांत नसतें हें " नासतोविद्यमानस्य शीतोष्णादेः सकारणस्य न विद्यते नास्ति भावो भवनमस्तिता।" ह्या भाष्याचें तात्पर्य होय. " न हि शीतोष्णादि सकारणं प्रमाणैर्निरूप्यमाणं वस्तु सद्भवति विकारो हि सः । विकारश्च व्यभिचरति । " ह्या भाष्याचें तात्पर्य असें:—विमत जें शीत वगैरे हें वस्तुतः खरें नाहीं ( वादग्रस्त विषयाला विमत ह्मणत असतात). कारण, शुक्तीचे ठिकाणीं भासमान होत असलेलें रौप्य ज्याप्रमाणें पाहूं गेलें असतां खरें नसतें त्याचप्रमाणें हें शीत वगैरे विचार करून पाहूं गेलें असतां खरें ठरत नाहीं. आतां " प्रत्यक्ष त्वगिंद्रियाला प्रतीत होणारें शीत वगैरे मिथ्या कसें होणार? " ह्मणून ह्मणाल तर तें मिथ्याच आहे. कारण, प्रत्यक्षादि प्रमाणांनीं प्रतीत होत असलेल्या गोष्टी वास्तविक नसल्याचें अगर जशा दिसतात तशा नसल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. कारण, शुक्तीकडे ह्मणजे शिंपेकडे प्रत्यक्ष पाहिलें असतां ती शुक्ति नसून रुपें आहे असें दिसतें. परंतु, वास्तविक त्या ठिकाणीं रुपें नसतेंच. त्याचप्रमाणें चंद्र अगदीं प्रादेशमात्र दिसत असतो; परंतु, वास्तविक तो तसा नसतो. तात्पर्य, प्रत्यक्षादि प्रमाणांनीं प्रतीत होत असलेल्या गोष्टी तशाच वास्तविक असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां प्रत्यक्षादिप्रमाणविषयक ह्मणजे इंद्रियादिकांना गोचर होणारें जें शीतादि ह्मणजे शीत, उष्ण, सुख, दुःख वगैरे तें वस्तुतः असल्याचें

* हें भाष्याचें स्पष्टीकरण भाष्योत्कर्षदीपिकेच्या आधारानें केलें आहे.

सिद्ध होत नसतांनाच आणि ह्मणून वास्तविक तें नसतांनाच भ्रांति-ग्रस्त लोकांना प्रत्यक्षादि प्रमाणांनीं त्याचा अनुभव येत असतो. तस्मात्, त्याला वास्तविक अस्तित्व नाहीं. आतां " पुष्कळ ठिकाणीं प्रत्यक्षादि प्रमाणांवरूनच खऱ्या वस्तुस्थितीचा बोध होत असतो. तेव्हां, प्रत्यक्षादि प्रमाणांनीं प्रतीत होत असलेलें जें शीतोष्णादि द्वंद्व तें सिद्ध होणें दुर्घट असल्यामुळें मिथ्या आहे असें ह्मणणें योग्य नाहीं. वेदाचा कांहीं भाग कर्मानुष्ठानार्थ आहे ह्मणून वेदांतील ब्रह्मबोधक उपनिषद्भागही कर्मार्थच आहे असें ज्याप्रमाणें ह्मणतां येणार नाहीं अथवा श्रवणादि इंद्रियांनीं आकृति प्रत्ययाला येत नाहीं ह्मणून चक्षुरिंद्रियानेंही आकृति उपलब्ध होत नाहीं असें ज्याप्रमाणें ह्मणतां येणार नाहीं त्याचप्रमाणें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं शुक्तीचें ठिकाणीं रजताचा मिथ्याभास होतो ह्मणून जें जें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं उपलब्ध होईल तें तें मिथ्या असें ह्मणतां येणार नाहीं. " अशी शंका कोणी करील तर ती बरोबर होणार नाहीं. कारण, शीतादि द्वंद्व हा विकार असून आगमापायी असल्यामुळें मिथ्या असल्याबद्दल " मात्रास्पर्शास्तु ० भारत । " ह्या श्लोकांत पूर्वीच निश्चित झालें आहे. ह्मणून शीत, उष्ण, सुख व दुःख हीं वस्तुतः आहेत किंवा नाहींत असा जो वाद होता त्याचा पुढील अनुमानानें निकाल होतो. रज्जूचे ठिकाणीं भ्रांतीनें सर्पाची उत्पत्ति होत असून रज्जूच्या स्वरूपाचें ज्ञान झालें असतां पूर्वी भासलेला सर्प नाहींसा होतो. तात्पर्य, रज्जुसर्प हा आगमापायी असल्यामुळें ह्मणजे उत्पन्न होणें व नष्ट होणें हा त्याचा स्वभावच असल्यामुळें तो जसा वस्तुतः मिथ्या आहे तसेंच शीतादि द्वैत आगमापायी असल्यामुळें वस्तुतः मिथ्या आहे. त्याचप्रमाणें " वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् " इत्यादि श्रुतीनें विकार मिथ्या असल्याचें सांगितलें आहे. " आहे ह्मणून केवळ वाचेनेंच मात्र ज्यांचा निर्देश केला जातो असे जे मृत्तिकेचे विकार ह्मणजे घडा, परळ, रांजण

इत्यादिक ते केवळ नाममात्र आहेत. वस्तुतः विकार ह्मणून कांहीं वेगळी वस्तु नाहीं; मृत्तिका हीच मात्र खरी वस्तु होय " हें सदहू श्रुतीचें तात्पर्य आहे. " यथा घटादिसंस्थानं चक्षुषा निरूप्यमाणं मृद्व्यतिरेकेणानुपलब्धेरसत्तथा सर्वो विकारः कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसन् । जन्मप्रध्वंसाभ्यां प्रागूर्ध्वं चानुपलब्धेः । मृदादिकारणस्य च तत्कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसत्त्वम् " ह्या भाष्याचें तात्पर्य येणेंप्रमाणेंः— डोळ्यांनीं दिसत असलेले घडा, परळ, रांजण इत्यादि आकार वस्तुतः पाहूं गेलें असतां मृत्तिकेहून वेगळे आहेत असे दृष्टोत्पत्तीस येत नाहींत आणि ह्मणूनच ते मिथ्या आहेत. त्याचप्रमाणें कुंडलें, कडीं, तोडे इत्यादि आकृति डोळ्यांनीं वेगळ्या वेगळ्या दिसत असतांनाही वास्तविक पाहूं गेलें असतां त्या सुवर्णाहून वेगळ्या असल्याचें दिसत नाहीं आणि ह्मणूनच त्या मिथ्या आहेत. तात्पर्य, कार्य हें कारणाहून भिन्न नसतें हें सिद्ध आहे व पुढील अनुमानानेंही ही गोष्ट सिद्ध होत आहे. कुंडलादि आकृति ज्याप्रमाणें वस्तुतः सुवर्णाहून ह्मणजे कारणाहून भिन्न नाहींत त्याचप्रमाणें कोणतेंही कार्य कारणाहून भिन्न नाहीं. उत्पत्तीचे पूर्वीं आणि नाशानंतर कार्य दृष्टोत्पत्तीस येत नसल्यामुळें " आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेपि तत्तथा ( आधीं आणि नंतर जें नसतें तें वर्तमान कालींही त्याप्रमाणें नसतेंच ) " ह्या न्यायानें तें वस्तुतः कारणाहून भिन्न असें नाहींच. सारांश, कोणताही शीतादि विकार कारणाहून भिन्न नसल्यामुळें मिथ्या आहे. कारण, कुंडलादिकांप्रमाणें तोही कारणाहून वस्तुतः वेगळा नसतो. त्याचप्रमाणें मृत्तिका वगैरे हें कारणही स्वतःच्या कारणाहून भिन्न नसल्यामुळें वस्तुतः मिथ्याच होय. तेव्हां कोणतेंही कारण स्वतःच्या कारणाहून वस्तुतः भिन्न असल्याचें उपलब्ध होत नसल्यामुळें तें—कार्यकारणपरंपरारूप भ्रमाचें अधिष्ठान जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं—कल्पित असल्याचें सिद्ध होतें. " तदसत्त्वे च सर्वाभावप्रसङ्ग इतिचेन्न सर्वत्र बुद्धिद्वयोपलब्धेः सद्बुद्धिरसद्बुद्धिरिति " ह्या भाष्याचें तात्पर्यः—

"कार्यकारणविभागरहित वस्तूचा अभाव असल्यामुळें कार्यकारणपरंपरा जर मिथ्या मानिली तर सर्वांचाच अभाव मानण्याचा प्रसंग येईल ह्मणजे ब्रह्माचाही अभाव आहे असें ह्मणावें लागेल " अशी शंका कोणी केल्यास ती बरोबर होणार नाहीं. कारण, सर्व ठिकाणीं अनुवृत्त होणारी सद्बुद्धि व व्यावृत्त होणारी असद्बुद्धि अशा दोन बुद्धि दृष्टोत्पत्तीस येत असल्यानें अनुवृत्ताचे ठिकाणीं व्यावृत्त कल्पित ठरत असल्यामुळें सर्वभेदांचें व सर्व विकल्पांचें अधिष्ठान कार्यकारणविभागरहित आणि अकल्पित असें ब्रह्म असल्याचें सिद्ध होतें. अनुवृत्त ह्मणजे एकसारखें कायम राहणारें आणि व्यावृत्त ह्मणजे नष्ट होणारें. बुद्धि ह्मणजे ज्ञान. सद्बुद्धि ह्मणजे सत्तारूप, अस्तित्वरूप अथवा भावरूप ज्ञान आणि असद्बुद्धि ह्मणजे अभावरूप ज्ञान. " आहे " हा शब्द भावाचा अगर अस्तित्वाचा दर्शक आहे आणि " नाहीं " हा शब्द अभावाचा दर्शक आहे. तेव्हां घट आहे, पट आहे, अश्व आहे इत्यादि ठिकाणांपैकीं प्रत्येक ठिकाणीं सद्बुद्धि अनुवृत्त आहे ह्मणजे कायम आहे; ह्मणजे " आहे " हा शब्द तिन्हीठिकाणीं आपणांस कायम राहिलेला दिसत आहे. परंतु, घट, पट, अश्व ह्यांपैकीं कोणताही शब्द दुसऱ्या ठिकाणीं कायम राहिलेला दिसत नाहीं; ह्मणजे " पट आहे, अश्व आहे " ह्या ठिकाणीं घटशब्द दृष्टोत्पत्तीस येत नाहीं ; " अश्व आहे, घट आहे " ह्या ठिकाणीं पटशब्द दृष्टोत्पत्तीस येत नाहीं आणि " घट आहे, पट आहे " ह्या ठिकाणीं अश्वशब्द दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. तात्पर्य, " आहे " ह्या शब्दानें दर्शविलेली व सर्व ठिकाणीं कायम असलेली जी सद्बुद्धि तिचे ठिकाणीं घटपटादि पदार्थ कायम रहात नसल्यामुळें ते कल्पित आहेत. करितां, कार्यकारणविभागरहित आणि सर्व भेदांना व कल्पनांना आश्रयभूत असें जें (" आहे " ह्या शब्दानें दर्शविलेल्या) भावरूपानें सर्व ठिकाणीं कायम असलेलें ब्रह्म तें सिद्ध आहे. शुक्तीचे ठिकाणीं रजताचा भास होतो तेव्हां " हें रजत आहे " अशी कल्पना होण्यास शुक्ति हें अधिष्ठान

अथवा आश्रय असून ती स्वतः अकल्पित ह्मणजे वास्तविक असल्याचें व्यवहारदृष्टया सिद्ध असतें. त्याचप्रमाणें सर्वकल्पनांचें अधिष्ठान व स्वतः अकल्पित असें ब्रह्म असल्याचें सिद्ध आहे. “ यद्विषया बुद्धिर्न व्यभिचरति तत्सद्यद्विषया बुद्धिर्व्यभिचरति तदसदिति सदसद्विभागे बुद्धितन्त्रे स्थिते” ह्या भाष्याचें तात्पर्य असें:—ज्याविषयींची बुद्धि नाहींशी होत नाहीं तें सत् आणि ज्याविषयींची बुद्धि नाहींशीं होतें तें असत्. ह्मणजे घट, पट वगैरे नाहींसे झाले असतांही जें कायम रहातें तें सत् व जें ह्याप्रमाणें कायम रहात नाहीं तें असत्. वास्तविक शुक्ति असतांना “ हें रजत”अशी तिच्या स्वरूपाविषयीं कल्पना होतें ह्मणजे कल्पित रजत त्या ठिकाणीं उत्पन्न होतें; परंतु, शुक्तीच्या स्वरूपाचें ज्ञान झाल्यानंतर “ हें रजत नव्हे; ही शुक्ति आहे” अशी प्रेक्षकाची खात्री होऊन अर्थात् भ्रमावस्थेमध्यें उत्पन्न झालेलें काल्पनिक रजत नाहींसें होतें. तथापि पूर्वींच्या भ्रमावस्थेंतील “हें रजत ” अशी जी समजूत आणि ज्ञानावस्थेंतील “ ही शुक्ति ” अशी जी समजूत ह्या दोहों-मध्यें “ हें ” हें दर्शक सर्वनाम कायमच रहातें ह्मणून तें सत् होय. सारांश, इतरांची व्यावृत्ति अथवा नाश झाल्यानंतरही जें कायम रहातें तें सत्. तेव्हां कार्यकारणपरंपरा मिथ्या मानिली असतां ब्रह्माचाही अभाव आहे असें मानण्याचा प्रसंग येईल ह्मणून पूर्वीं शंका आल्यानें ब्रह्म आहे किंवा नाहीं असा जो संशय उत्पन्न झाला होता तो पुढील अनुमानानें नाहींसा होतो. तें अनुमान असें:–शुक्ति वगैरे पदार्थांपासून “ हें ” हें दर्शक सर्वनाम नाहींसें होत नसल्यामुळें ज्याप्रमाणें सद्रूप आहे त्याचप्रमाणें कोठूनही “ आहे ” ह्या रूपानें नाहींसें होत नसल्यामुळें ब्रह्म सद्रूप आहे. तसेंच जें व्यावृत्त होतें तें असत् ही गोष्टही पुढील अनुमानानें सिद्ध होते. तें अनुमान असें:–हें रजत व ही शुक्ति अशी समजूत अनुक्रमें भ्रांतावस्थेंत व ज्ञानावस्थेंत होत असतें; परंतु, दोन्ही अवस्थांमध्यें हें रजत व ही शुक्ति ह्या दोन्ही समजुतींत “ हें ”

हा अंश कायम असून दुसऱ्या अवस्थेमध्यें रजत नाहींसें होतें. तेव्हां रजतादिविषयक ज्ञानपरंपरा व्यावृत्त होत असल्यामुळें ह्मणजे कायम रहात नसल्यामुळें ज्याप्रमाणें असद्रूप आहे ह्मणजे वास्तविक सत्य नाहीं त्याचप्रमाणें ब्रह्माहून व्यतिरिक्त जें शीतोष्णादिक तें व्यावृत्त होत असल्यामुळें असत् आहे ह्मणजे वस्तुतः सत्य नाहीं. सारांश, ह्या दोन अनुमानांनीं सद्रूप वस्तूचें अकल्पितत्व आणि असद्रूप वस्तूचें कल्पितत्व सिद्ध झालें. आतां " –द्वैत सर्वत्र मिथ्या–असें तुमचें मत असल्यामुळें अनुमानाला अवश्यक ज्या वेगळ्या वेगळ्या पांच गोष्टी त्या तुमच्यामतें नाहींतच. तेव्हां अनुमानादि व्यवहार सिद्ध होत नसल्यामुळें तुह्मीं दर्शविलेलीं दोन अनुमानेंच प्रथम सिद्ध होत नाहींत." अशी शंका कोणी करील; परंतु, ती बरोबर नाहीं. कारण, सत् व असत् हा विभाग बुद्धीच्या अधीन आहे आणि ह्याप्रमाणें सदसद्विभाग दोन बुद्धींवर अवलंबून असल्यामुळें अनुमानादि व्यवहार सिद्ध होण्यास अडचण पडत नाहीं. " सर्वत्र द्वे बुद्धी सर्वैरुपलभ्यते समानाधिकरणे " ह्या भाष्याचें तात्पर्य येणेंप्रमाणें:—तुह्मा अद्वैतवाद्यांच्या मतानें दोन बुद्धि असण्याचा संभवच नाहीं. तेव्हां दोनबुद्धींवर अवलंबून असलेला सदसद्विभाग सिद्ध होणार कसा? ह्मणून जर कोणी शंका करील तर तीही बरोबर होणार नाहीं. कारण, सर्वप्रकारच्या व्यवहारामध्यें–कल्पित जो सदसद्विभाग त्याला हेतुभूत असलेल्या दोन बुद्धि सर्वांच्या प्रत्ययाला येत असतात. " तर मग दोन बुद्धींवर अवलंबून असलेला सदसद्विभाग जर सिद्ध ह्मणत असाल तर तो सिद्ध होण्यास ब्रह्माला सत् ह्या सामान्य रूपाची व असत् ह्या विशेष रूपाची अवश्यकता असल्याचें उघड आहे आणि ह्मणूनच सामान्यरूप व विशेषरूप अशा दोन वस्तु असल्याचें सिद्ध आहे. तेव्हां अर्थातच अद्वैत सिद्ध होत नाहीं " अशी शंका कोणी करील तर तीही बरोबर नाहीं. कारण, " तो हा देवदत्त " ह्या ठिकाणीं " तो " आणि " हा " हे दोन्ही

सर्वनामांचे प्रयोग ज्याप्रमाणें " देवदत्त " ह्या एकाच व्यक्तीच्या आश्र-यानें असतात त्याचप्रमाणें सत् व असत् ह्या दोन बुद्धिही समानाधि-करणच ह्मणजे एका वस्तूच्याच आश्रयानें असतात. सामानाधिकरण्य हें एकाच वस्तूवर अवलंबून असतें. " तो " ह्या शब्दानें परामृष्ट झालेली वस्तु आणि " हा " ह्या शब्दानें दाखविली जाणारी वस्तु ह्या जर वेगळ्या असतील तर " तो हा " असें सामानाधिकरण्य होणारच नाहीं. आपल्या मनामध्यें घट आहे; तेव्हां तो घट दर्शविण्याच्या उद्दे-शानें " तो " असें सर्वनाम प्रथम घालून नंतर " हा " असें ह्मणून जर पटाकडे बोट दाखविलें तर " तो हा " ह्या शब्दांचा प्रयोग व्यर्थच होईल. तात्पर्य, तो हा देवदत्त इत्यादि सामानाधिकरण्याप्रमाणें " सन् घटः " इत्यादि ठिकाणचें सामानाधिकरण्य एकावस्तूच्याच आश्रयानें होत असतें. " न नीलोत्पलवत्सन्घटः सन्पटः सन्हस्तीत्येवं सर्वत्र। " ह्या भाष्याचें तात्पर्य येणेंप्रमाणें:— सामानाधिकरण्य एकावस्तूवरच अवलंबून असतें हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण " नील कमल " ह्याप्रमाणें सामानाधिकरण्याला धर्म व धर्मी अशा दोन वस्तूंची अपेक्षा असते. नीलत्व, शुक्लत्व, कृष्णत्व इत्यादि धर्म होत व हे धर्म ज्या पदा-र्थावर असतात तो पदार्थ धर्मी होय. असो. अशाप्रकारची शंका कोणी केल्यास ती बरोबर होणार नाहीं. कारण, " नील कमल " असें जें धर्मधर्मिविषयक सामानाधिकरण्य तें गौण सामानाधिकरण्य आहे. कारण, त्या ठिकाणीं नीलगुणविशिष्ट अशी लक्षणा करून अर्थ करावा लागतो. तेव्हां ह्या धर्मधर्मिविषयक सामानाधिकरण्यापेक्षां अनुवृत्ताच्या ठिकाणीं व्यावृत्त कल्पित अशा प्रकारचें एकावस्तूवरच अवलंबून असलेलें जें सामानाधिकरण्य तें मुख्य होय. ह्याप्रमाणें सामानाधिकरण्य हें एकाच वस्तूवर अवलंबून असल्यामुळें विद्यमान घट, विद्यमान पट, विद्यमान गज, विद्यमान अश्व, विद्यमान वृषभ इत्यादि सर्वत्र ठिकाणीं विद्यमान-शब्दानें दर्शविली जाणारी सद्बुद्धि व विनाशी अशा घटपटादिकांवर

अवलंबून असलेली असद्बुद्धि अशा दोन बुद्धि दृष्टोत्पत्तीस येत असतात. " तयोर्बुद्ध्योर्घटादिबुद्धिर्व्यभिचरति तथा च दर्शितम्। न तु सद्बुद्धिः।" ह्या भाष्याचें तात्पर्य असें:—त्या दोन बुद्धींपैकीं घटादिविषयक बुद्धि कायम रहात नाहीं. घटादि विकार कायम नसतात हें पूर्वीं" विकारो हि सः"इत्यादि ठिकाणीं दर्शविलेंच आहे. घटादिविषयक असद्बुद्धीप्रमाणें सद्बुद्धि नाहींशी होत नाहीं. कारण,घट नष्ट झाला तरी पटादिकांच्या ठिकाणीं सद्बुद्धि कायम असल्याचें दिसतें. " तस्माद्घटादिबुद्धिविषयोसन्व्यभिचारान्न तु सद्बुद्धिविषयोव्यभिचारात् । घटे विनष्टे घटबुद्धौ व्यभिचरन्त्यां सद्बुद्धिरपि व्यभिचरतीतिचेत् । न पटादावपि सद्बुद्धिदर्शनात् ।" ह्या भाष्याचें विवरण करण्याची अवश्यकता दिसत नाहीं; प्रथम केलेल्या अर्थानेंच हें भाष्य समजेल. सद्बुद्धि ही विशेषणाच्याच आश्रयाला असल्यामुळें ती नाहींशी होण्याचा संभवच नाहीं. " उत्कृष्ट देवदत्त "ह्या ठिकाणीं उत्कृष्ट हें विशेषण असून देवदत्त हें विशेष्य आहे; परंतु, मरण वगैरे कारणांमुळें देवदत्त हें विशेष्य नाहींसें झालें तरीं उत्कृष्ट हें विशेषण देवदत्तासारख्या इतर सद्गुणी पुरुषांचे ठिकाणीं कायम रहात असल्यामुळें नाहींसें होण्याचा संभवच नसतो. त्याचप्रमाणें सद्बुद्धि विशेषणाच्या आश्रयाला असल्यामुळें ती नाहींशीं होण्याचा संभव नाहीं. " सद्बुद्धिवद्घटबुद्धिरपि घटान्तरे दृश्यत इति चेन्न पटादावदर्शनात् ।" हें भाष्य प्रथमच्या भाषांतरावरून समजण्यासारखें आहे. " सद्बुद्धिरपि नष्टे घटे न दृश्यत इति चेन्न विशेष्याभावात् । सद्बुद्धिर्विशेषणविषया सती विशेष्याभावे विशेषणानुपपत्तौ किंविषया स्यात् । न तु पुनः सद्बुद्धेर्विषयाभावात् ।" ह्या भाष्याचें विवरण येणेंप्रमाणें:— " घट नष्ट झाल्यावर सद्बुद्धि देखील दिसत नाहीं " असें ह्मणाल तर विशेष्याचा अभाव झाल्यामुळें ती दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. कारण, सद्बुद्धि ही विशेषणरूप आहे आणि विशेष्यावांचून विशेषणाचा उपयोग दिसण्यांत येत नाहीं. तेव्हां ती विशेषणरूप सद्बुद्धि विशेष्याचा अभाव झाला अस-

तांना कोणाच्या आश्रयानें दृष्टोत्पत्तीस येणार ? एकाद्या प्रदेशावर असलेली गाय नष्ट झाली ह्मणजे गोत्व अथवा गाय ही जात नष्ट झाली असें होत नाहीं. गाय ही जाति कायम आहेच. परंतु, त्या जातीची अभिव्यंजक ह्मणजे दर्शक जी व्यक्ति तिचा अभाव झाल्यामुळें गोजाति दृष्टोत्पत्तीस येत नाहीं इतकेंच काय तें. जातीचा अभाव झाल्यामुळें दृष्टीं पडत नाहीं असें नव्हे. त्याचप्रमाणें ह्या ठिकाणीं विशेषणरूप सद्बुद्धीचा व्यंजक अथवा दर्शक जो घट त्याचा नाश झाल्यामुळें सद्बुद्धिही दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. सद्बुद्धि स्वरूपतः नष्ट झाल्यामुळें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं अशांतला प्रकार नव्हे. " एकाधिकरणत्वं घटादिविशेष्याभावे न युक्तमितिचेन्न। इदमुदकमिति मरीच्यादावन्यतराभावेपि सामानाधिकरण्यदर्शनात् " ह्या भाष्याचें स्पष्टीकरण येणेंप्रमाणें:—" नील कमल " ह्या ठिकाणीं " नील " हें विशेषण असून " कमल " हें विशेष्य आहे आणि " नील वर्ण " हा पदार्थ वेगळा असून " कमल " हा पदार्थ वेगळा आहे. सारांश, विशेषणविशेष्यभाव हा दोन विद्यमान वस्तूंमध्येंच असल्याचें दिसतें. त्याचप्रमाणें सद्बुद्धि आणि घटबुद्धि ह्यांमध्यें विशेषणविशेष्यभाव असल्याचें जर कबूल आहे तर त्याला दोन वस्तु विद्यमान असण्याची अवश्यकता आहेच आहे; ह्मणजे विशेषणरूप सद्बुद्धि आणि विशेष्यरूप घट ह्या दोन्ही वस्तु विद्यमान असल्या पाहिजेत हें उघड आहे. तेव्हां घटादिक कल्पित आहेत अशाविषयीं जें अनुमान पूर्वीं केलेलें आहे त्याला—सद्बुद्धि आणि घटबुद्धि ह्या दोन्ही बुद्धींचें सामानाधिकरण्य आहे—असें मानिल्यानें बाध येतो. कारण, "तो हा देवदत्त" ह्या वाक्यांतील देवदत्त जर काढून टाकिला तर सामानाधिकरण्याला आधारभूत जो पदार्थ तो नाहींसा झाल्यामुळें त्याठिकाणीं सामानाधिकरण्य संभवणारच नाहीं. ह्याकरितां, घटादिक काल्पित आहेत, वास्तविक विद्यमान नाहींत असें जर मानावयाचें असेल तर " सन्घटः सन्पटः सन्हस्ती " इत्यादि ठिकाणीं घट, पट, हत्ती वगैरे वस्तूंचा

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥**

---

अभाव असतांना सामानाधिकरण्य संभवणारच नाहीं—अशी जर कोणीं शंका करील तर ती बरोबर होणार नाहीं. कारण, सामानाधिकरण्याला दोन पदार्थ विद्यमान असण्याची अवश्यकता नसते; फक्त दोन पदार्थांचा भास मात्र हवा असतो. उदाहरणार्थ; मृगजलाचे ठिकाणीं उदक मुळींच नसतांना "हें उदक" ह्मणून सामानाधिकरण्यबुद्धि होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. "तस्माद्देहादेर्द्वन्द्वस्य च सकारणस्यासतो न विद्यते भाव इति । तथा सतश्चात्मनोभावोविद्यमानता न विद्यते सर्वत्राव्यभिचारादित्यवोचाम" ह्या भाष्याचें तात्पर्य असें:—ह्मणून शीतोष्णादिक द्वंद्वें आणि देहादिक हीं जीं वस्तुतः आहेत ह्मणून कल्पिलीं आहेत त्यांचें वास्तविक अस्तित्व नाहीं. कारण, उत्पत्तीचे पूर्वीं आणि नाशानंतर, इतर वस्तूचे ठिकाणीं आणि इतर प्रदेशामध्यें तीं उपलब्ध होत नाहींत. सारांश, तीं देशतः, वस्तुतः व कालतः परिच्छिन्न आहेत आणि ह्मणूनच असत्य आहेत. त्याचप्रमाणें अज्ञानी लोकांना अज्ञात असल्यामुळें नसल्यासारखा झालेला परंतु, वास्तविक विचार केला असतां अविनाशी आणि बाधरहित असा जो आत्मा त्याचा अभाव ह्मणजे अविद्यमानता अथवा परमार्थदृष्ट्या नास्तित्व संभवत नाहीं. कारण, त्याला कोठेंही व्यभिचार नाहीं ह्मणजे तो कोठेंही कायम नसतो असें नाहीं ह्मणून पूर्वीच सांगितलें आहे. सारांश, आत्मा देशतः, कालतः व वस्तुतः परिच्छिन्न नाहीं आणि ह्मणूनच त्याचा अभाव कधींही व कोठेंही होण्याचा संभव नाहीं. असो. पुढलें भाष्य विशेष कठीण नसल्यामुळें त्याचें स्पष्टीकरण प्रथमतः भाषांतर केलें आहे त्यापेक्षां जास्त करण्याची अवश्यकता दिसत नाहीं ) १७.

ज्यानें हें जगत् व्याप्त करून टाकिलें आहे तें ब्रह्म सत् होय. हें

किं पुनस्तत्सद्यत्सदेव सर्वदैवास्तीति । उच्यते । अविनाशि० मर्हति ॥ १७ ॥ अविनाशि न विनष्टुं शीलमस्येति। तुशब्दोऽसतो विशेषणार्थः । तद्विद्धि विजानीहि । किं येन सर्वमिदं जगत्ततं व्याप्तं सदाख्येन ब्रह्मणा साकाशमाकाशेनेव घटादयः । विनाशमदर्शनमभावमव्ययस्य न व्येति नोपचयापचयौ यातीत्यव्ययं तस्याव्ययस्य । नैतत्सदाख्यं ब्रह्म स्वेन रूपेण व्येति व्यभिचरति निरवयवत्वाद्देहादिवत्। नाप्यात्मीयेनात्मीयाभावाद्यथा देवदत्तो धनहान्या व्येति न त्वेवं ब्रह्म व्येत्यतोऽव्ययस्यास्य ब्रह्मणो विनाशं न कश्चित्कर्तुमर्हति न कश्चिदात्मानं विनाशयितुं शक्नोतीश्वरोऽपि।

---

स्वतः अविनाशी असून इतरही कोणी ह्या व्ययरहित ब्रह्माचा नाश करण्यास समर्थ नाहीं ॥ १७॥

" जें सर्वदा सद्रूपच असतें असें तें सत् ह्मणजे आहे तरी काय ?" ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, सांगतों. तें तर अविनाशी आहे असें तूं समज. " तें काय " ह्मणून विचारशील तर घटादिकांना व्याप्त करणाऱ्या आकाशाप्रमाणें ज्या सत्संज्ञक ब्रह्मानें हें सर्व जगत् आकाशासहवर्तमान व्याप्त केलें आहे तें ब्रह्मच सद्रूप असें तूं समज. हें ब्रह्म अव्यय आहे ह्मणजे ह्याची वृद्धि अथवा ऱ्हास कधीं होत नाहीं. हें सत्संज्ञक ब्रह्म अवयवरहित असल्यामुळें देहादिकांप्रमाणें ह्याचा व्यय होत नाहीं ह्मणजे वृद्धीमुळें अथवा ऱ्हासामुळें ह्याच्या स्वरूपांत अपो आप भेद होत नाहीं. बरें, ह्या ब्रह्माचें स्वतःचें कांहीं असून त्यामुळें ह्याचे ठिकाणीं कमजास्तपणा होईल ह्मणावें तर स्वस्वरूपाहून दुसरें कांहीं स्वतःचें ह्मणून ह्या ब्रह्माला नाहींच. तेव्हां धननाश झाला असतां देवदत्ताचे ठिकाणीं कमजास्तपणा होतो तसा ब्रह्माचें ठिकाणीं कमजास्तपणा होत नाहीं. तस्मात्, अशाप्रकारें अव्यय असलेल्या ह्या

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
अनाशिनोप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

---

आत्मा हि ब्रह्म स्वात्मनि च क्रियाविरोधात् ॥ १७ ॥

किं पुनस्तदसद्यत्स्वात्मसत्तां व्यभिचरतीति । उच्यते । अन्तवन्त इ० भारत ॥ १८ ॥ अन्तवन्तोन्तो विनाशो विद्यते येषां तेन्तवन्तो यथा मृगतृष्णिकोदकादौ सद्बुद्धिरनुवृत्ता

---

ब्रह्माचा, नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं. कारण, सामर्थ्यवान् जरी झाला तरी आत्म्याचा नाश करण्यास कोणाचेंही सामर्थ्य नसतें. ब्रह्म हाच आत्मा आहे आणि आत्म्याचे ठिकाणीं कोणतीही क्रिया संभवनीय नाहीं. नाहींसें न होणें हा ज्याचा स्वभावच आहे तें असा अविनाशि ह्या शब्दाचा अर्थ होय. ह्या श्लोकांत तुशब्द असताहून सताचा भेद दर्शविण्याकरितां घातलेला आहे. " नश् अदर्शने " ह्या धातूपासून विनाशशब्द झाला असल्यामुळें त्याचा अर्थ अदर्शन=अभाव असा आहे १७.

हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, नित्य, अविनाशी आणि अगम्य असा जो शरीरवान् आत्मा त्याचे हे देह विनाशी ह्मणून ह्मटलेले आहेत. तस्मात्, तूं युद्ध करण्याचें सोडूं नकोस ॥ १८ ॥

( ज्याच्या स्वरूपांत फेरबदल होत नाहीं तें " सत् " ह्मणून पूर्वीं निश्चित केलें आहें ) आतां स्वस्वरूपापासून च्युत होणारें असें जें " असत् " तें कोणतें ह्मणून विचारशील तर सांगतों. नित्य, अविनाशी आणि अप्रमेय असा जो शरीर युक्त आत्मा त्याचें हे देह नश्वर ह्मणून विवेकी पुरुषांनीं सांगितले आहेत. तस्मात्, ज्याअर्थीं ह्याप्रमाणें आत्मा नित्य आणि विकाररहित आहे त्याअर्थीं तूं युद्ध सुरू ठेव. ज्यांना अंत ह्मणजे विनाश आहे ते अन्तवन्त असा " अन्तवन्तः " ह्या शब्दाचा अर्थ होय. ज्याप्रमाणें मृगजलादिकांचे ठिकाणीं भ्रांतीनें असलेली अस्तित्वबुद्धि प्रमाणांनीं पाहूं गेलें असतां विच्छिन्न होते

प्रमाणनिरूपणान्ते विच्छिद्यते स तस्या अन्तस्तथेमे देहाः स्वप्नमायादेहादिवच्चान्तवन्तो नित्यस्य शरीरिणः शरीरवतो-नाशिनोप्रमेयस्यात्मनोन्तवन्त इत्युक्ता विवेकिभिरित्यर्थः । नित्यस्यानाशिन इति न पुनरुक्तं नित्यत्वस्य द्विविधत्वाल्लोके नाशस्य च । यथा देहो भस्मीभूतोदर्शनं गतो नष्ट उच्यते विद्यमानोऽप्यन्यथा परिणतो व्याध्यादियुक्तो जातो नष्ट उच्यते तत्रानाशिनो नित्यस्येति द्विविधेनापि नाशेनासंब-न्धोस्येत्यर्थः । अन्यथा पृथिव्यादिवदपि नित्यत्वं स्यादात्मन-

---

आणि ह्मणूनच तो तिचा अन्त होय. त्याचप्रमाणें हे ( स्थूल, सूक्ष्म व कारण ) देह स्वप्नविषयक आणि मायाविषयक देहादिकांप्रमाणें अन्त-वन्त ह्मणजे नाशवन्त आहेत. " ज्याला शरीरें आहेत तो " हा " श-रीरी " ह्या शब्दाचा अर्थ होय. " उक्ताः " ह्या ठिकाणीं " विवेकिभिः " हें पद अध्याहृत समजावें आणि " विवेकी पुरुषांनीं विनाशी ठरविलेले" असा " अन्तवन्त उक्ताः " ह्या पदांचा अर्थ समजावा. (" नित्यस्य " आणि " अनाशिनः " ह्या दोन्ही शब्दांचा अर्थ एकच असल्यामुळें ह्या ठिकाणीं पुनरुक्तिदोष येतो असें जर कोणी ह्मणेल तर तें ह्मणणें बराबर नाहीं. कारण ) " नित्यस्यानाशिनः " या दोन शब्दांनीं नित्यत्वाची पुनरुक्ति केलेली नाहीं. लोकामध्यें नित्यत्व व नाश हीं दोन दोन प्रकारचीं आहेत. उदाहरणार्थः—देहाची रक्षा होऊन तो दिसेनासा झाला ह्मणजे देहाचा नाश झाला असें ह्मणतात आणि देह विद्यमान असतांनाही व्याधि वगैरेंनीं ग्रस्त झाल्यामुळें आकृतींत कांहीं भलताच फेरफार झाला तरीही देहाचा नाश झाला असें ह्मणतात. ह्यास्तव, " अनाशिनः " आणि " नित्यस्य " ह्या दोन विशेषणांनीं आत्म्याचा दोन्ही प्रकारच्या नाशाशीं संबंध नाहीं हें सुचविलें (तात्पर्य, दोन्हीं प्रकारें आत्मा अविनाशी हा " नित्यस्यानाशिनः " ह्या पदांचा

स्तन्मा भूदिति नित्यस्यानाशिन इत्याह । अप्रमेयस्य न प्रमेयस्य प्रत्यक्षादिप्रमाणैरपरिच्छेद्यस्येत्यर्थः । नन्वागमेनात्मा परिच्छिद्यते प्रत्यक्षादिना च । पूर्वं नात्मनः स्वतः सिद्धत्वात् । सिद्धे ह्यात्मनि प्रमातरि प्रमित्सोः प्रमाणान्वेषणा भवति । न हि पूर्वमहमित्थमित्यात्मानमप्रमाय पश्चात्प्रमेयपरिच्छेदाय प्रवर्तते । न ह्यात्मा नाम कस्य चिदप्रसिद्धो भवति । शास्त्रं त्वन्त्यं प्रमाणमतद्धर्माध्यारोपणमात्रनिवर्तकत्वेन प्रमाणत्वमात्मनि प्रतिपद्यते न त्वज्ञातार्थज्ञाप-

---

अर्थ होय ). या दोन विशेषणांपैकीं एक विशेषण जर नसतें तर आत्मा पृथिव्यादिकांप्रमाणें परिणामदृष्टचा नित्य असून वास्तविक अनित्य आहे अशी शंका आली असती. परंतु, ती शंका येऊं नये एतदर्थ " नित्यस्य " आणि " अनाशिनः " हीं दोन्हीं विशेषणें आत्म्याला उद्देशून योजिलीं आहेत. अप्रमेय ह्मणजे प्रमेय होण्यास अशक्य; अर्थात् " प्रत्यक्षादि प्रमाणांनीं ज्याचें स्वरूप निश्चित होत नाहीं तो " हा अप्रमेयशब्दाचा अर्थ होय. आतां " शास्त्रानें आत्म्याचें रूप निश्चित होत असून प्रत्यक्षादि प्रमाणांनींही होतें " अशी शंका कोणीं केल्यास ती बरोबर होणार नाहीं. कारण, पूर्वींच आत्मा स्वतःसिद्ध असल्यामुळें शास्त्रानें त्याचें स्वरूप आणखी सिद्ध होण्याचा संभव नाहीं व त्याचप्रमाणें आत्मा सिद्ध असतांनाच जिज्ञासु पुरुष प्रमाणें हुडकीत असल्यामुळें आत्मस्वरूप ( पूर्वीं सिद्ध नसून ) प्रत्याक्षादिप्रमाणांनीं सिद्ध होते असें ह्मणतां येत नाहीं. " मी ह्याप्रमाणें आहें " असें आत्म्याला जाणिल्यानंतरच जिज्ञासु आपल्या जिज्ञासेला विषयीभूत असलेल्या वस्तूचें स्वरूप निश्चित करण्यास प्रवृत्त होतो; आत्मा ह्मणून कोणाला ठाऊक नाहीं असें नाहीं. शास्त्र हें शेवटलें प्रमाण असून तें पूर्वीं अज्ञात असलेल्या गोष्टीचें ज्ञान करून देणें या नात्यानें प्रमाण ह्मणून आत्मस्वरूप

कत्वेन । तथा च श्रुतिर्यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मेति । यस्मादेवं नित्योविक्रियश्चात्मा तस्माद्युध्यस्व युद्धादुपरमं मा कार्षीरित्यर्थः । न ह्यत्र युद्धकर्तव्यता विधीयते युद्धे प्रवृत्त एव ह्यसौ शोकमोहप्रतिबद्धस्तूष्णीमास्ते तस्य कर्तव्यप्रतिबन्धापनयनमात्रं भगवता क्रियते तस्माद्युध्यस्वेत्यनुवादमात्रं न विधिः ॥ १८ ॥

---

निश्चित करण्याला उपयोगी पडत नाहीं. परंतु, आत्म्याचे ठिकाणीं भ्रमादिकांमुळें आरोपित असलेल्या आत्मबाह्यवस्तुविषयक धर्मांची फक्त निवृत्ति करणें या नात्यानें शास्त्राचें प्रामाण्य उपयोगीं पडतें. ह्या आमच्या ह्मणण्याला " यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा " ही श्रुति प्रमाण आहे. तेव्हां " ज्याअर्थीं ह्याप्रमाणें आत्मा सर्वप्रकारें नित्य व विकाररहित आहे त्याअर्थीं, हे अर्जुना, तूं युद्ध कर; ह्मणजे युद्ध करण्याचें बंद करूं नकोस. " हा " तस्माद्युध्यस्व " ह्या पदांचा अर्थ होय. ह्या श्लोकांतील " युध्यस्व " ह्या पदानें युद्धकर्माचें विधान केलेलें नाहीं. कारण, युद्ध करण्यास अर्जुन पूर्वींच प्रवृत्त झाला असून शोक व मोह यांनीं घेरून टाकिल्यामुळें तो स्वस्थ बसलेला आहे. ह्मणून त्यानें हातीं घेतलेलें जें कर्तव्य त्याला आलेला प्रतिबंध मात्र भगवान् दूर करीत आहेत. तस्मात् " युध्यस्व " (ह्मणजे युद्ध कर ) हा केवळ पूर्वीं सुरूं झालेल्या गोष्टीचा अनुवाद मात्र आहे; विधि नाहीं. ( कारण, युद्ध ह्या ठिकाणीं अप्राप्त नसून पूर्वींच सुरूं झालेलें आहे ) १८.

(" इमे देहाः स्वप्नमायादेहादिवच्चान्तवन्तः " ह्या भाष्याचें स्पष्टीकरण येणेंप्रमाणेः—स्वप्नामध्यें देवादिकांचीं शरीरें प्राप्त होत असून त्या शरीरांना उचित असे भोगही भोगावयास सांपडतात; परंतु, मनुष्य जागा झाल्यावर " मी मनुष्य " आहें असें त्याला वाटूं लागतें आणि स्वप्नांत त्यानें अनुभविलेलीं देवादिकांचीं शरीरें नाश पावतात;

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ १९ ॥**

---

**शोकमोहादिसंसारकारणनिवृत्त्यर्थं गीताशास्त्रं न प्रवर्त-**

---

त्याचप्रमाणें एकादा मायावी सिंहादिकांचीं शरीरें धारण करितों आणि मायेचा त्याग करून त्यानें स्वतःच्या देहाचा आश्रय केला ह्मणजे तीं शरीरें नाहींशीं होतात. तात्पर्य, ह्या स्वप्नविषयक व मायाविषयक देहांप्रमाणें आत्म्याचे हे स्थूल, सूक्ष्म व कारण देह विनाशी आहेत. नित्यत्वाचे प्रकार दोन आहेत; एक कूटस्थ व एक परिणामी. ज्याच्या स्वरूपांत कसल्याही प्रकारचा कधींही फेरफार होत नाहीं त्याला कूटस्थ नित्य ह्मणतात व ज्याच्या स्वरूपांत बदल होतो त्याला परिणामी नित्य ह्मणतात. घट बनला असतां मृत्तिकेचें मूळचें स्वरूप नाहींसें होऊन तिला घटाचें स्वरूप येतें ह्मणून मृत्तिका ही कूटस्थ नित्य नसून परिणामी नित्य आहे व आत्म्याच्या स्वरूपांत कसल्याही प्रकारचा कधींही फेरबदल होत नाहीं ह्मणून तो कूटस्थ नित्य आहे. हा विचार लक्ष्यांत घेतला ह्मणजे " अन्यथा पृथिव्यादिवदपि नित्यत्वं स्यादात्मनस्तन्मा भूत् " हें भाष्य समजण्यास सुलभ पडेल. नित्यत्वाचे आणखीही दोन प्रकार आहेत; एक व्यावहारिक नित्यत्व आणि दुसरें परमार्थनित्यत्व. देश, काल आणि वस्तु ह्यांनीं वास्तविक परिच्छिन्न असून आणि ह्मणूनच वस्तुतः अनित्य असून व्यवहारदृष्टच्या जें नित्य समजलें जातें त्याला व्यावहारिक नित्य असें ह्मणतात व ज्याला देश, काल आणि वस्तु ह्यांनीं बाध येत नाहीं त्याला परमार्थ नित्य असें ह्मणतात. पृथिव्यादिकांना व्यावहारिक नित्यत्व असून आत्म्याला परमार्थनित्यत्व आहे १८ )

ह्या आत्म्याला जो घातक समजतो आणि त्याचप्रमाणें जो याला वध्य मानितो ते उभयतांही अज्ञानीच होत. कारण, हा कोणाला मारीत नाहीं व कोणाकडून मारलाही जात नाहीं ॥ १९ ॥

कमित्येतस्यार्थस्य साक्षीभूते ऋचावानिनाय भगवान् । यन्मन्यसे युद्धे भीष्मादयो मया हन्यन्तेहमेव तेषां हन्तेत्येषा बुद्धिर्मृषैव ते कथं य एनं वेत्ति हन्तारं०न हन्यते ॥१९॥ य एनं देहिनं प्रकृतं वेत्ति विजानाति हन्तारं हननक्रियायाः कर्तारं यश्चैनमन्यो मन्यते हतं देहहननेन हतोहमिति हननक्रियायाः कर्मभूतं तावुभौ न विजानीतो न ज्ञातवन्तौ विवेकेनात्मानं हन्ताहं हतोहमिति देहहननेनात्मानमहंप्रत्ययविषयं यौ जानीतस्तावात्मस्वरूपानभिज्ञावित्यर्थः । यस्मान्नायमात्मा हन्ति हननक्रियायाः कर्ता न हन्यते न च कर्म भवतीत्यर्थः । अविक्रियत्वात् ॥ १९ ॥

---

शोक मोह वगैरें जीं संसाराचीं कारणें त्यांची निवृत्ति करण्याकरितां गीताशास्त्र आहे; कर्मामध्यें लोकांची प्रवृत्ति करण्याकरितां नाहीं. ह्या विधानाला प्रमाणभूत अशा दोन ऋचा भगवानांनीं ह्या ठिकाणीं घेतल्या आहेत. भगवान् ह्मणतातः—हे अर्जुना, “ युद्धामध्यें माझ्या हातून भीष्मादिकांचा वध होत आहे व मीच त्यांचा वध करणारा आहे ” अशी जी तुझी समज ती मिथ्याच आहे. कां ह्मणशील तर सांगतों. ह्या देहयुक्त आत्म्याला जो घातक समजतो ह्मणजे मारणें ह्या क्रियेचा कर्ता जो ह्याला समजतो आणि त्याचप्रमाणें जो देहघातामुळें माझा घात झाला असें मानितो ह्मणजे आत्मा हा मारणें ह्या क्रियेला कर्मभूत आहे असें जो मानितो त्या उभयतांनाही विवेकानें आत्म्याचें ज्ञान होत नाहीं. सारांश, —मी मारणारा व मी वध पावणारा असें जे समजतात ह्मणजे मी या प्रत्ययाला विषयभूत असलेल्या आत्म्याचा देहघातामुळें घात होतो असें जे मानितात ते उभयतांही आत्मस्वरूपाविषयीं अज्ञानी आहेत —असा ह्या श्लोकांतील तीन पादांचा अर्थ होय. कारण, हा आत्मा विकाररहित असल्यामुळें कोणाला मारीत नाहीं ह्मणजे मारणें या क्रियेचा

कर्ता होत नाहीं आणि त्याचप्रमाणें हा कोणाकडून मारलाही जात नाहीं ह्मणजे मारणें या क्रियेचें कर्मही " होत नाहीं १९.

( " नन्वेवमशोच्यानन्वशोचस्त्वमित्यादिना भीष्मादिबन्धुविच्छेद-निबन्धने शोकेपनीतेपि तद्वधकर्तृत्वनिबन्धनस्य पापस्य नास्ति प्रतीकारो न हि यत्र शोको नास्ति तत्र पापं नास्तीति नियमो द्वेष्यब्राह्मण-वधे शोकाविषये पापाभावप्रसङ्गादतोहं कर्ता त्वं प्रेरक इति द्वयोरपि हिंसानिमित्तपातकापत्तेरयुक्तमिदं वचनं तस्माद्युध्यस्व भारतेत्याशङ्क्य काठकपठितयर्चा परिहरति भगवान् " असें अवतरण " य एनं वेत्ति० हन्यते " ह्या श्लोकाला मधुसूदनांनीं दिलें आहे. ह्या अवतरणाचा आशय येणेंप्रमाणें:—"अहो, अशोच्यानन्वशोचस्त्वं इत्यादि श्लोकांनीं भीष्मादिबांधवांच्या वियोगापासून होणाऱ्या शोकाची जरी निवृत्ति केली आहे तरी त्यांचा वध केल्यामुळें लागणाऱ्या पातकाचा परिहार येथ पर्यंतच्या ग्रंथांत कोठें केलेला नाहीं आणि जेथें शोक उत्पन्न होण्याचा संभव नाहीं तेथें पातक लागण्याचा संभव नाहीं असा नियम मानूं ह्मणाल तरतों मानणें बरोबर नाहीं. कारण, तसा नियम जर मानिला तर ज्याच्याशीं आपला द्वेष आहे अशा ब्राह्मणाचा वध केला असतां शोक होण्याचा संभव नाहीं ह्मणून ब्रह्महत्येचेंही पातक लागण्याचा संभव नाहीं असें मानण्याचा प्रसंग येईल. ह्याकारितां, भीष्मादिकांचा वध करणारा मी व तो वध करण्यास मला उत्तेजन देणारा तूं अशा दोघांनाहीं हिंसानिमित्तक पातक लागणार. ह्यास्तव, " तस्माद्युध्यस्व भारत " हें ह्मणणें योग्य नाहीं—अशी कदाचित् अर्जुनाला शंका येईल ह्मणून काठकामध्यें पठित असलेल्या एका ऋचेचा उल्लेख करून भगवान् त्या शंकेचा परिहार कारितात. " परंतु, आचार्यांच्या भाष्याशीं जुळून नसलेलें हें अवतरण योग्य असेलच असें वाटत नाहीं. कारण, मारणाऱ्याला व मारविणाऱ्याला पातक लागतें अशी अर्जुनाची शंका समजून तिचा परिहार करण्याकारितां भगवानांनीं

ऋचेचा उल्लेख केला असें अवतरणांत ह्मटलें आहे. परंतु, " य एनं वेत्ति ० न हन्यते " ही जी पूर्वार्धामध्यें पाठभेद करून गीतेंत पठित असलेली ऋचा त्या ऋचेमध्यें--मारणाऱ्याला व मारविणाऱ्याला पातक लागत नाहीं —असें सांगून पापाचा परिहार केल्याचें दिसत नाहीं. शिवाय पूर्वींच्या ग्रंथामध्यें आत्म्याचें नित्यत्व प्रतिपादन करून आत्म्याचा नाश होत नसल्याचें सिद्ध केलें असल्यामुळें वधनिमित्तक बंधुवियोगाचें जर निवारण झालें आहे तर वधनिमित्तक पापाचाही परिहार होत असल्याचें अर्थात सिद्ध आहे. तेव्हां अर्जुनाची ह्मणून जी शंका गृहीत धरलेली आहे ती येण्याचा संभवच नाहीं. बरें, घटकाभर ही गोष्ट बाजूला ठेविली तरी देखील मधुसूदनांचें अवतरण योग्य ठरत नाहीं. कारण, " अन्तवन्त इमे० युध्यस्व भारत " ह्या पूर्वींच्या श्लोकाचे स्पष्टीकरणामध्यें मधुसूदनांनींच "यस्मादेवं प्रागुक्तन्यायेन नित्यो विभुरसंसारी सर्वदैकरूपश्चात्मा तस्मात्तन्नाशशङ्कया स्वधर्मे युद्धे प्राक्प्रवृत्तस्य तव तस्मादुपरतिर्न युक्ता" असा मजकूर लिहून जो " ह्याप्रकारें पूर्वोक्त न्यायानें ज्याअर्थीं आत्मा नित्य, विभु, संसारधर्मरहित आणि सर्वदा एकरूप असल्याचें सिद्ध आहे त्याअर्थीं त्याचा नाश होईल अशी भलतीच शंका मनामध्यें आणून पूर्वी स्वधर्मरूप युद्धाला प्रवृत्त झालेल्या तुला त्यापासून निवृत्त होणें योग्य नाहीं " असा अभिप्राय " तस्माद्युध्यस्व " ह्या पदांचा दर्शविला आहे त्याला विरोध येतो. शिवाय, युद्धामध्यें वध करणाऱ्याला पातक लागत नाहीं असें सांगण्याकरितां वरील काठकोक्त ऋचेचा उल्लेख केला आहे असें ह्मणावें तर " युद्धामध्यें केलेला वध दोषावह होत नाहीं " असें जें ह्याच अध्यायाच्या एकतिसाव्या श्लोकापासून असलेल्या क्षात्रधर्मबोधक ग्रंथानें दर्शविलें आहे तें दर्शविण्याचें कारण नव्हतें. आणखी असें कीं ह्याच अध्यायांतील " न त्वेवाहं जातु० मतःपरम् " ह्या श्लोकावरील टीकेच्या आरंभीं " न त्वेवाद्येकोनविंशतिश्लोकैरशोच्यानन्वशोचस्त्वमित्यस्य विवरणं क्रियते स्वधर्ममपि चावेक्ष्ये—

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे २०**

त्याद्यष्टभिः श्लोकैः प्रज्ञावादांश्च भाषस इत्यस्य मोहद्वयस्य पृथक्प्रयत्ननिराकर्तव्यत्वात् " असें अवतरण देऊन—बाराव्या श्लोकापासून १९ श्लोकांनीं "अशोच्यानन्वशोचस्त्वं" येवढ्याचें विवरण केलें आहे—ह्मणून जो त्यांनीं एकोणीस श्लोकांचा उद्देश दर्शविला आहे त्याला विरोध येतो *१९. )

आत्मा कधींही उत्पन्न होत नाहीं आणि त्याला कधीं मृत्युही येत नाहीं. त्याचप्रमाणें हा पूर्वीं नसून नंतर असतो असें कधींही होत नाहीं व पूर्वीं असून नंतर नाहीं असेंही कधीं होत नाहीं आणि ह्यामुळें तो अज व नित्य आहे आणि त्याचप्रमाणें हा कधीं ऱ्हास पावत नाहीं, कधीं वृद्धिंगत होत नाहीं व शरीरांत फेरबदल होऊं लागला असतांही त्याच्या स्वरूपांत कधींही फेरबदल होत नाहीं ॥ २० ॥

* मधुसूदनसरस्वतींनीं " भगवत्पादभाष्यार्थमालोच्यातिप्रयत्नतः " असें प्रथमारंभीं लिहून व पुढेंही प्रसंगवशात् " इहेतरेषां कुमतं समस्तं श्रुतिस्मृतिन्यायबलान्निरस्तम् । पुनः पुनर्भाष्यकृतातियत्नादतो न तत्कर्तुमहं प्रवृत्तः ॥ भाष्यकारमतसारदर्शिना ग्रन्थमात्रमिह योज्यते मया ।आशयो भगवतः प्रकाश्यते केवलं स्ववचसो विशुद्धये ॥ " असे श्लोक लिहून आचार्यांशीं विनय दाखविला आहे. परंतु, कित्येक ठिकाणीं त्यांनीं हा विनय बाजूला ठेवून भाष्याचे विरुद्धही मजकूर लिहिलेला आहे आणि मधुसूदनी टीका पांडित्यानें भरलेली असल्यामुळें ती कित्येकांस भाष्याप्रमाणें मान्य असल्याचें आढळून येत आहे. ह्याकरितां, भाष्याच्या योग्यतेबद्दल कांहीं लोकांचीं मनें विनाकारण साशंक होण्यास कारणीभूत होणाऱ्या ह्या टीकेचा विचार प्रसंगवशात् करणें मी आपलें कर्तव्यच समजत आहे. ह्या टीकेबरोबर नीलकंठी टीकेचाही विचार पुढें करण्यांत येईल. असो. मधुसूदनीप्रभृति टीकांतील जे दोष दाखविले आहेत आणि जे पुढें दाखविण्यांत येतील त्यांबद्दल जें काय बरेंवाईट ह्मणणें असेल तें मला न ह्मणतां धनपतिप्रभृति टीकाकारांना वाचकांनीं ह्मणावें. कारण, मासिक पुस्तकांत माझ्या पदरचें प्रायः कांहींएक नसून मी केवळ संस्कृतभाषेंतील आशय मराठींत यथामति आणणारा हमाल आहे हें सर्वांनीं लक्ष्यांत ठेवावें.

**कथमविक्रिय आत्मेति द्वितीयो मन्त्रः । न जायते० शरीरे ॥ २० ॥ न जायते नोत्पद्यते जनिलक्षणा वस्तुविक्रिया नात्मनो विद्यत इत्यर्थः । तथा न म्रियते वा वाशब्दश्चार्थे न म्रियते चेत्यन्त्या विनाशलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते कदाचिच्छब्दः सर्वविक्रियाप्रतिषेधैः संबध्यते न कदाचिज्जायते न कदाचिन्म्रियत इत्येवं यस्मादयमात्मा भूत्वा भवनक्रियामनुभूय पश्चादभविताभावं गन्ता न भूयः पुनस्तस्मान्न म्रियते । यो हि भूत्वा न भवति स म्रियत**

---

आत्मा विकाररहित कसा हें दर्शविण्याकरितां हा दुसरा मंत्र आहे. ( उत्पत्ति, अस्तित्व, वृद्धि, रूपांतर, ऱ्हास व नाश हे जे सहा विकार ते आत्म्याला मुळींच नाहींत हें ह्या मंत्रांत दर्शविलें आहे. पैकीं " न जायते कदाचित् " ह्या पदांनीं आत्म्याला पहिला विकार नाहीं हें सांगितलें. ) न जायते=नोत्पद्यते=उत्पन्न होत नाहीं. सारांश, उत्पत्तिरूप वस्तुविकार आत्म्याचे ठिकाणीं नाहीं हा " न जायते " ह्या पदांचा अर्थ होय. न " म्रियते वा " ह्या ठिकाणचा वाशब्द चकारार्थी आहे ( ह्मणजे ह्याचा अर्थ नेहमींप्रमाणें " अथवा " असा नसून "आणि" असा आहे ). ह्मणून " न म्रियते वा " ह्या पदांचा अर्थ " आणि त्याला मरणही येत नाहीं " असा आहे. अर्थात् " न म्रियते वा " ह्या पदांनीं विनाशरूप जो सहांपैकीं शेवटला वस्तुविकार त्याचा आत्म्याचे ठिकाणीं निषेध केला आहे ( ह्मणजे तो आत्म्याला नाहीं असें दर्शविलें आहे ). ह्या मंत्रांत असलेल्या " कदाचित् " ह्या शब्दाचा अन्वय "न कदाचिज्जायते न कदाचिन्म्रियते" ह्मणजे कधींही आत्मा उत्पन्न होत नाहीं, कधींही मृत्यु पावत नाहीं असा प्रत्येक विकारप्रतिषेधक शब्दाशीं करावा. ज्याअर्थी हा असून ह्मणजे असणें या क्रियेचा अनुभव घेऊन नंतर पुनरपि नाहींसा होत नाहीं ह्मणजे अभाव पावत नाहीं त्याअर्थी ह्याला

इत्युच्यते लोके वाशब्दान्नशब्दाच्चायमात्मा भूत्वा भविता वा देहवन्न भूयः पुनस्तस्मान्न जायते यो ह्यभूत्वा भविता स जायत इत्युच्यते नैवमात्मातो न जायते । यस्मादेवं तस्मादजो यस्मान्न म्रियते तस्मान्नित्यश्च । यद्यप्याद्यन्तयोर्विक्रिययोः प्रतिषेधे सर्वा विक्रियाः प्रतिषिद्धा भवन्ति तथापि मध्यमभाविनीनां विक्रियाणां स्वशब्दैरेव तदर्थैः प्रतिषेधः कर्तव्य इत्यनुक्तानामपि यौवनादिसमस्तविक्रियाणां प्रतिषेधो यथा स्यादित्याह शाश्वत इत्यादि । शाश्वत इत्यपक्षयलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते शश्वद्भवः शाश्वतो नापक्षीयते

---

मरण नाहीं. कारण, पूर्वी असून नंतर जो नाहींसा होतो तो मरतो असें लोकामध्यें ह्मणत असतात. देहाप्रमाणें हा आत्मा पूर्वी नसून नंतर होतो असेंही नाहीं. तस्मात्, हा उत्पन्न होत नाहीं हें सिद्ध आहे. हा अर्थ दुसऱ्या चरणांतील " वा " आणि " न " ह्या शब्दांपासून निघतो. असो. जो पूर्वी अविद्यमान असून नंतर अस्तित्वांत येतो तो जन्मास येतो असें लोक ह्मणत असतात. परंतु, आत्मा असा नाहीं आणि ह्मणूनच त्याला जन्म नाहीं. ज्याअर्थी असा प्रकार आहे त्याअर्थी आत्मा अज आहे आणि ज्याअर्थी तो मरत नाहीं त्याअर्थी तो नित्य आहे. जन्म आणि नाश हे दोन अनुक्रमें आद्य व अंत्य विकार आत्म्याला नाहींत येवढें सांगितल्यानें मधले चार विकार नाहींत ह्मणून सांगितल्याचें जरी अर्थात् सिद्ध होत आहे तरी सहांमध्यें समाविष्ट होत नसलेल्या यौवनावस्थाप्रभृति इतर सर्व विकारांचा उपलक्षणदृष्ट्या समावेश व्हावा एतदर्थ मधल्या चार विकारांपैकीं कांहीं विकारांचा निषेध शाश्वतः इत्यादि मध्यवर्तिविकारनिषेधवाचक शब्दांनीं ह्या मंत्रांत केलेला आहे. " शाश्वतः " ह्या शब्दानें अपक्षयरूप ( ह्मणजे ऱ्हासरूप पांचवा ) विकार आत्म्याला नाहीं असें दर्शविलें आहे.

**स्वरूपेण निरवयवत्वान्निर्गुणत्वाच्च नापि गुणक्षयेणापक्षयः। अपक्षयविपरीतापि वृद्धिलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते पुराण इति। यो ह्यवयवागमेनोपचीयते स वर्धतेऽभिनव इत्युच्यते। अयं त्वात्मा निरवयवत्वात्पुरापि नव एवेति न वर्धत इत्यर्थः। तथा न हन्यते न विपरिणमते हन्यमाने विपरिणम्यमानेऽपि शरीरे। हन्तिरत्र विपरिणामार्थो द्रष्टव्योऽपुनरुक्ततायै न विपरिणमत इत्यर्थः। अस्मिन्मन्त्रे षड्भावविकारा लौकिकवस्तुविक्रिया आत्मनि प्रतिषिध्यन्ते सर्वप्रकारविक्रियारहित आत्मेति वाक्यार्थः। यस्मादेवं तस्मा-**

---

"शश्वद्भवः=सर्वकाळ असणारा=कधींही ऱ्हास न पावणारा" ही "शाश्वतः" ह्या शब्दाची व्युत्पत्ति होय. आत्मा अवयवरहित असल्यामुळें स्वरूपानें त्याचा ऱ्हास होत नाहीं व तो निर्गुण असल्यामुळें गुणांच्या ऱ्हासानेंही त्याचा ऱ्हास होण्याचा संभव नाहीं. ऱ्हासविकाराच्या उलट जो वृद्धिविकार तो आत्म्याला नाहीं असें " पुराणः " ह्या विशेषणानें दर्शविलें आले. अवयवांच्या प्राप्तीनें जो जुळत जातो तो वृद्धिंगत होतो आणि त्यालाच नवीन असें ह्मणतात. हा आत्मा तर अवयवरहित असल्यामुळें पूर्वींही नवीनच होता ह्मणजे अनादि कालापासून हा वृद्धिंगत होतच नाहीं हा " पुराणः " ह्या शब्दाचा अर्थ होय. त्याचप्रमाणें शरीराचें रूपांतर होत असतांनाही ह्या आत्म्याच्या स्वरूपांत फेरबदल होत नाहीं. " न हन्यते हन्यमाने शरीरे " ह्या चरणांतील " हन् " ह्या धातूचा अर्थ पुनरुक्ति होऊं नये ह्मणून रूपांतर होणें असा समजावा आणि या चरणानें आत्म्याला रूपांतर हा विकार नाहीं ह्मणून दर्शविल्याचें समजावें. ह्या मंत्रामध्यें लौकिक वस्तूंचे ठिकाणीं असलेले सहा विकार आत्म्याला नाहींत असें दर्शविलें असून आत्मा सर्व प्रकारच्या विकारांनीं रहित आहे हा या मंत्राचा वाक्यार्थ आहे

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥

---

दुभौ तौ न विजानीत इति पूर्वेण मन्त्रेणास्य संबन्धः ॥२०॥
य एनं वेत्ति हन्तारमित्यनेन मन्त्रेण हननक्रियायाः कर्ता कर्म च न भवतीति प्रतिज्ञाय न जायत इत्यनेनाविक्रियत्वे हेतुमुक्त्वा प्रतिज्ञातार्थमुपसंहरति वेदाविनाशिनं० हन्ति कम् ॥ २१ ॥
वेद विजानात्यविनाशिनमन्त्यभावविकाररहितं नित्यं विपरिणामरहितं यो वेदेति संबन्धः । एनं पूर्वेण मन्त्रेणोक्तलक्षणमजं

---

आणि ज्याअर्थी असा प्रकार आहे त्याअर्थी त्या उभयतांना (ह्मणजे आत्मा मारणारा आहे असें जाणणाऱ्याला व मारणक्रिया आत्म्यावर घडत आहे असें जाणणाऱ्याला ) आत्म्याविषयीं विवेकानें ज्ञान झालेलें नाहीं हें सिद्ध होत असून पूर्वींच्या मंत्राशीं (ह्मणजे " य एनं वेत्ति हन्तारं" ह्या मंत्राशीं) ह्या मंत्राचा संबंध असल्याचें अर्थात् सिद्ध होत आहे २०.

जो पुरुष हा आत्मा अविनाशी, नित्य, जन्मरहित आणि ऱ्हास न पावणारा आहे असें जाणितो तो पुरुष, हे कुंतीपुत्रा अर्जुना, कोणाला मारणार तरी कसा ! आणि एकाद्याला वध करण्यास प्रवृत्त तरी करणार कसा ! ॥ २१ ॥

" य एनं वेत्ति हन्तारं " ह्या मंत्रानें आत्मा मारणक्रियेचा कर्ता अथवा कर्म होत नाहीं असें विधान करून व " न जायते " ह्या मंत्रानें आत्म्याच्या विकाररहित्याचें कारण सांगून आतां " वेदाविनाशिनं " ह्या श्लोकानें श्रीकृष्ण पूर्वीं विधान केलेल्या गोष्टीचा उपसंहार करितात. " अविनाशिनं नित्यमजमव्ययं यो वेद " असा पूर्वार्धाचा अन्वय होय. वेद=जाणितो; अविनाशी=ज्याला शेवटला भावविकार ह्मणजे नाश नाहीं असा; नित्य=विपरिणामरहित=ज्याच्या स्वरूपांत कधींही फेरबदल होत नाहीं असा; एनं= " न जायते म्रियते वा " ह्या पूर्वींच्या

जन्मरहितमव्ययमपक्षयरहितं कथं केन प्रकारेण स विद्वा-न्पुरुषोधिकृतो हन्ति हननक्रियां करोति कथं वा घातयति हन्तारं प्रयोजयति न कथंचित्कंचिद्धन्ति न कथंचित्कंचि-द्घातयतीत्युभयत्राक्षेप एवार्थः प्रश्नार्थासंभवात् । हेत्वर्थस्य तुल्यत्वाद्विदुषः सर्वकर्मप्रतिषेध एव प्रकरणार्थोभिप्रेतो भग-वतः। हन्तेस्त्वाक्षेप उदाहरणार्थत्वेन । विदुषः कं कर्मासंभवे

---

मंत्रांत सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त; अजं=जन्मरहित; अव्ययं=उपक्षयर-हित=ज्याचा ऱ्हास होत नाहीं असा; कथं=कोणत्या प्रकारानें; स पुरुषः= आत्म्याला जन्म, मरण, रूपांतर व ऱ्हास हीं नाहींत असें जाणणारा ज्ञानी व अधिकारी पुरुष; हन्ति=मारणक्रिया करितो; घातयति=ती क्रिया दुसऱ्याकडून करवितो. " कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् " ह्या चरणांतील " कथं " आणि " कं " हे शब्द आक्षेपार्थी आहेत; ते प्रश्नार्थी असण्याचें संभवत नाहीं. ( कारण ते प्रश्नार्थक मानिले तर अर्जुनानें पुढें उत्तर दिल्याचें दिसत नाहीं; शिवाय अर्जुन जर शिष्य ह्मणून उपदेशाकरितां श्रीकृष्णांना शरण आलेला आहे तर त्याला श्रीकृ-ष्णांकडून माहितीकरितां प्रश्न होण्याचा संभव नाहीं ) तेव्हां तो विद्वान् पुरुष कोणत्याही प्रकारानें कोणालाही मारीत नाहीं आणि कोणत्याही प्रकारानें कोणालाही मारण्याला प्रवृत्त करीत नाहीं असे दोन्ही ठिकाणीं " कथं " आणि " कं " हे शब्द आक्षेपार्थीच आहेत. असो. निर्विकारत्व असा जो हेतु दिला आहे तो विद्वानाच्या सर्वकर्मनिषेधाविषयीं सारखाच लागू पडत असल्यामुळें सर्वकर्मनिषेध हेंच ह्या प्रकरणाचें तात्पर्य भगवान् श्रीकृष्णांना विवक्षित आहे. ( आतां सर्व कर्मांचा निषेध जर भगवानांना करणें आहे तर त्यांनीं फक्त मारणक्रियेविषयींच कां आक्षेप घेतला ? अशी शंका या ठिकाणीं येते; परंतु, ती टिकत नाहीं. कारण ) उदाह-रणार्थ ह्मणून या ठिकाणीं मारणक्रियेवर आक्षेप घेतलेला आहे. बरें

हेतुविशेषं पश्यन्कर्माण्याक्षिपति भगवान्कथं स पुरुष इति । ननूक्त एवात्मनोविक्रियत्वं सर्वकर्मासंभवकारणविशेषः । सत्यमुक्तो न तु स कारणविशेषोन्यत्वाद्विदुषोविक्रियत्वादात्मन इति । न ह्यविक्रियं स्थाणुं विदितवतः कर्म न संभवतीति चेन्न विदुष आत्मत्वान्न देहादिसंघातस्य विद्वत्ता । अतः पारिशेष्याद-संहत आत्मा विद्वानविक्रिय इति तस्य विदुषः कर्मासंभवा-दाक्षेपो युक्तः कथं स पुरुष इति । यथा बुद्ध्याद्याहृतस्य शब्दाद्यर्थस्याविक्रिय एव सन्बुद्धिवृत्त्यविवेकविज्ञानेनाविद्य-योपलब्धात्मा कल्प्यत एवमेवात्मानात्मविवेकज्ञानेन बुद्धि-वृत्त्या विद्ययासत्यरूपयैव परमार्थतोविक्रिय एवात्मा विद्वानु-

---

पण, विद्वानाला कर्मांचा असंभव असण्याविषयीं कोणता हेतु मनांत आणून भगवानांनीं " कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कं " ह्या श्लोकार्धानें कर्मांवर आक्षेप घेतला आहे ? अरे, आत्म्याचें विकाररा-हित्य हें विद्वानाला सर्वकर्मांचा असंभव असण्याविषयीं विशेष कारण सांगितलेंच आहे. होय, सांगितलें आहे खरें; पण तें विशेष कारण संभवत नाहीं. कारण, अविक्रिय आत्म्याहून विद्वान् भिन्न आहे. विका-ररहित अशा स्तंभाला जाणणाऱ्या पुरुषाचे ठिकाणीं कर्म संभवत अस-तेंच असें ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण, विद्वान् हा आत्मस्व-रूपच आहे आणि देहेंद्रियादिसमुदायाला विद्वत्ता नाहीं. तस्मात् , देहेंद्रियादिसंघातरहित आत्माच विद्वान व विकाररहित असल्यामुळें आत्मरूप जो विद्वान् त्याचे ठिकाणीं कर्मांचा असंभव असल्याकारणानें " कथं स पुरुषः पार्थ " इत्यादि प्रकारचा आक्षेप योग्यच आहे. ज्याप्रमाणें आत्मा विकाररहित असतांनाही बुद्धिवृत्तीचें भेदज्ञान न झाल्यामुळें अज्ञानाच्या योगानें तो(आत्मा)च बुद्धिप्रभृतींनीं ग्रहण केलेल्या शब्दादिविषयांचा ज्ञाता कल्पिला जातो त्याचप्रमाणें आत्मानात्मविवेक-

च्यते। विदुषः कर्मासंभववचनाद्यानि कर्माणि शास्त्रेण विधीयन्ते तान्यविदुषो विहितानीति भगवतो निश्चयोवगम्यते। ननु विद्याप्यविदुष एव विधीयते विदितविद्यस्य पिष्टपेषणवद्विद्याविधानानर्थक्यात्। तत्राविदुषः कर्माणि विधीयन्ते न विदुष इति विशेषो नोपपद्यते। अनुष्ठेयस्य भावाभावविशेषोपपत्तेः। अग्निहोत्रादिविध्यर्थज्ञानोत्तरकालमग्निहोत्रादिकर्मानेकसाधनोपसंहारपूर्वकमनुष्ठेयं कर्ताहं मम कर्तव्यमित्येवंप्रकारविज्ञानवतो विदुषो यथानुष्ठेयं भवति न तु तथा न जायत इत्याद्यात्मस्वरूपविध्यर्थज्ञानोत्तरकालभावि किंचिदनुष्ठेयं भवति। किं तु नाहं कर्ता न भोक्तेत्याद्यात्मैकत्वाक-

---

ज्ञानानें परमार्थतः असत्य अशी जी बुद्धिवृत्ति विद्या तिच्या योगानें विकाररहित आत्म्यालाच विद्वान ह्मणत असतात. विद्वानाला कर्मांचा असंभव असण्याविषयीं वचन आहे. करितां जीं कर्में शास्त्रानें विहित आहेत तीं अविद्वानाला विहित आहेत असा भगवानांचा निश्चय दिसतो. अहो, पण विद्या सुद्धां अविद्वानालाच विहित असली पाहिजे. कारण, ज्याला विद्या प्राप्त झाली आहे त्यालाच उद्देशून पुनरपि तिचें विधान असणें हें पिष्टपेषणाप्रमाणें व्यर्थ आहे. तेव्हां अविद्वानाला कर्में विहित असून विद्वानाला नाहींत अशी विशेष व्यवस्था जुळत नाहीं. छे ! छे ! ! अनुष्ठेय जें कर्म त्याचा भाव आणि अभाव अशी विशेष व्यवस्था संभवतच आहे. अग्निहोत्रादिविधींचें अर्थज्ञान झाल्यानंतर अनेक साधनें जुळवून अग्निहोत्रादि कर्में, मी कर्ता, माझें हें कर्तव्य अशा प्रकारच्या ज्ञानवान् विद्वानानें ज्याप्रमाणें करावयाचीं असतात त्याचप्रमाणें "न जायते म्रियते वा कदाचित्" इत्यादि आत्मस्वरूप विधींचें अर्थज्ञान झाल्यानंतर कोणतेंही अनुष्ठेय ह्मणून शिलक रहात नसतें. तर मी कर्ता नव्हे मी भोक्ता नव्हें इत्यादिप्रकारचें ज्ञान

र्तृत्वादिविषयज्ञानादन्यज्ज्ञानोत्पद्यत इत्येष विशेष उपपद्यते। यः पुनः कर्ताहमिति वेत्त्यात्मानं तस्य ममेदं कर्तव्यमित्यवश्यंभाविनी बुद्धिः स्यात्तदपेक्षया सोधिक्रियत इति तं प्रति कर्माणि संभवन्ति स चाविद्वान्। उभौ तौ न विजानीत इति वचनात्। विशेषितस्य च विदुषः कर्माक्षेपवचनात्कथं स पुरुष इति । तस्माद्विशेषितस्य विदुषो मुमुक्षोश्च सर्वकर्मसंन्यास एवाधिकारः । अत एव भगवान्नारायणः साङ्ख्यान्विदुषोविदुषश्च कर्मिणः प्रविभज्य द्वे निष्ठे ग्राहयति ज्ञानयोगेन साङ्ख्यानां कर्मयोगेन योगिनामिति। तथा च पुत्रायाह भगवान्व्यासो द्वावि-

---

शिलक रहातें. तात्पर्य, आत्मा एक आहे, त्याचे ठिकाणीं कर्तृत्व नाहीं इत्यादिविषयक ज्ञानाहून वेगळें ज्ञान उत्पन्न होत नाहीं. तस्मात्, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अविद्वानाला कर्मानुष्ठान आणि विद्वानाला कर्मानुष्ठानाभाव ही विशेष व्यवस्था उपपन्न होतेच. आतां मीं कर्ता आहें ह्मणून जो आत्म्याला जाणितो त्याचे ठिकाणीं माझें हें कर्तव्यकर्म आहे अशी बुद्धि अवश्य होणारच. तेव्हां त्या बुद्धीला अनुलक्षून तो कर्माधिकारी आहे. ह्मणून त्याला कर्में विहित आहेत. परंतु "उभौ तौ न विजानीतः" ह्या वचनावरून तो पुरुष वस्तुतः अविद्वान् असल्याचें सिद्ध आहे. आत्मा अविनाशी, नित्य, जन्मरहित आणि अव्यय आहे असें जाणणाऱ्या विद्वानाच्या कर्माविषयीं " कथं स पुरुषः " ह्या वचनानें भगवानांनीं आक्षेप घेतलेला आहे. तस्मात्, विशेषित असा अविक्रियात्मदर्शी विद्वान् आणि मुमुक्षु ह्या उभयतांचाही सर्वकर्मसंन्यास करण्याविषयींच अधिकार आहे आणि ह्मणूनच भगवान् नारायण—विद्वान् सांख्य आणि अविद्वान् कर्मी-असा विभाग करून " ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् " ह्या वचनानें दोन मार्ग दोघांकडून ग्रहण करवीत आहेत. भगवान् व्यास मुनींनींही आपल्या पुत्राला " द्वाविमावथ पन्थानौ " वगैरे

मावथ पन्थानावित्यादि । तथा च क्रियापथश्चैव पुरस्तात्पश्चात्संन्यासश्चेति। एतमेव विभागं पुनः पुनर्दर्शयिष्यति भगवान्। अतत्त्वविदहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते तत्त्ववित्तु नाहं करोमीति तथा च सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्त इत्यादि॥ तत्र केचित्पण्डितंमन्या वदन्ति । जन्मादिषड्भावविक्रियारहितोविक्रियोकर्तैकोहमात्मेति न कस्यचिज्ज्ञानमुत्पद्यते यस्मिन्सति सर्वकर्मसंन्यास उपादिश्यते। न न जायते म्रियत इत्यादिशास्त्रोपदेशानर्थक्यप्रसङ्गात्। यथा च शास्त्रोपदेशसामर्थ्याद्धर्माधर्मास्तित्वविज्ञानं कर्तुश्च देहान्तरसंबन्धि विज्ञानमुत्पद्यते तथा च शास्त्रात्तस्यैवात्मनोविक्रियत्वाकर्तृत्वैकत्वादिविज्ञानं

---

उपदेश केलेला आहे. तेव्हां पूर्वी कर्ममार्ग आणि नंतर संन्यास. अहंकारविमूढात्मा ह्मणजे तत्त्वज्ञान नसलेला पुरुष मी कर्ता असें मानितो; तत्त्ववेत्ता तर मी कर्ता नाहीं असें समजतो आणि विरक्त पुरुष मनानेंही कर्मांचा त्याग करून असतो असा हाच विभाग फिरून फिरून भगवानांनीं पुढें दर्शविला आहे. परंतु, असें असतांना कांहीं पंडितंमन्य ह्मणतातः—“ जन्मादि सहा विकार नसलेला, अविक्रिय व अकर्ता असा आत्मा मी आहें असें ज्ञान झालें असतां सर्वकर्मसंन्यास करण्याविषयीं गीताशास्त्रामध्यें उपदेश केला आहे खरा; परंतु, तशाप्रकारचें ज्ञानच मुळीं आधीं कोणालाही उत्पन्न होत नाहीं. ” पण हें ह्या पंडितंमन्यांचें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, तसें असेल तर “ न जायते ” इत्यादि शास्त्रोपदेशच व्यर्थ होण्याचा प्रसंग येईल. शिवाय, शास्त्रोपदेशाच्या सामर्थ्यानें धर्माधर्मास्तित्वज्ञान आणि देहांतरसंबंधीं ज्ञान ज्याप्रमाणें कर्त्याचे ठिकाणीं उत्पन्न होतें त्याचप्रमाणें शास्त्रावरून तोच आत्मा अविक्रिय, अकर्ता, अद्वितीय वगैरे असल्याबद्दलचें ज्ञान कां बरें उत्पन्न होणार नाहीं ? असा त्या पंडितंमन्यांना एक प्रश्नही

कस्मान्नोत्पद्यत इति प्रष्टव्यास्ते । करणागोचरत्वादिति चेन्न मनसैवानुद्रष्टव्यमिति श्रुतेः । शास्त्राचार्योपदेशशमदमादिसंस्कृतं मन आत्मदर्शने करणं तथा च तदधिगमायानुमान आगमे च सति ज्ञानं नोत्पद्यत इतिसाहसमेतत् । ज्ञानं चोत्पद्यमानं तद्विपरीतमज्ञानमवश्यं बाधत इत्यभ्युपगन्तव्यम् । तच्चाज्ञानं दर्शितं हन्ताहं हतोऽस्मीत्युभौ तौ न विजानीत इति । अत्र चात्मनो हननक्रियायाः कर्तृत्वं कर्मत्वं हेतुकर्तृत्वं चाज्ञानकृतं दर्शितम् । तच्च सर्वक्रियास्वपि समानं कर्तृत्वादेरविद्याकृतत्वमविक्रियत्वादात्मनः । विक्रियावान्हि कर्तात्मनः कर्मभूतमन्यं

---

करून पहावा. आत्मा मनाला अगोचर असल्यामुळें त्याच्याविषयीं ज्ञान उत्पन्न होत नाहीं अशी शंका बरोबर नाहीं. कारण, " मनसैवानुद्रष्टव्यम् । " अशी श्रुति आहे. सशास्त्र गुरूपदेश आणि शमदमादिषट्क ह्यांनीं संस्कृत झालेलें मन आत्मज्ञान होण्याला साधन आहे. शिवाय अविक्रिय अशा आत्म्याच्या ज्ञानाविषयीं जर श्रुति व स्मृति प्रमाण आहेत तर ज्ञान उत्पन्न होत नाहीं असें ह्मणणे ह्मणजें केवळ साहस आहे. उत्पन्न होणारें ज्ञान आपल्या विरुद्ध असलेल्या अज्ञानाचा बाध करितें असें मानणें अवश्यच आहें. तें अज्ञान—मी मारणारा आहें, मारण्याची क्रिया माझ्यावर घडत आहे असें समजणाऱ्या उभयतांनाही आत्मज्ञान नाहीं—ह्मणून पूर्वीं दर्शविलें आहें. येथें आत्म्याचे ठिकाणीं हननक्रियेचें कर्तृत्व, कर्मत्व आणि प्रयोजकत्व हें सर्व अज्ञानमूलक ह्मणून दर्शविलें आहे व तें विहित आणि निषिद्ध अशा सर्व प्रकारच्या कर्मांविषयीं सारखेंच आहे. कारण, आत्मा अविक्रिय असल्यामुळें त्याचे ठिकाणीं ( भासमान होणारें ) कर्तृत्व वगैरें अज्ञानमूलक आहे. कर्ता हा विकारयुक्त असून तो स्वतःला कर्मभूत असलेल्या दुसऱ्याला अमुक अमुक कृत्य कर " ह्मणून तें करण्यास प्रवृत्त करीत असतो. सारांश,

**प्रयोजयति कुर्विति । तदेतदविशेषेण विदुषः सर्वक्रियासु कर्तृत्वं हेतुकर्तृत्वं च प्रतिषेधति भगवान्विदुषः कर्माधिकाराभावप्रदर्शनार्थं वेदाविनाशिनं कथं स पुरुष इत्यादिना। क्व पुनर्विदुषोधिकार इत्येतदुक्तं पूर्वमेव ज्ञानयोगेन साङ्ख्यानामिति। तथा च सर्वकर्मसंन्यासं वक्ष्यति सर्वकर्माणि मनसेत्यादिना। ननु मनसेति वचनान्न वाचिकानां कायिकानां च संन्यास इति चेन्न सर्वकर्माणीति विशेषितत्वात्। मानसानामेव सर्वकर्मणामिति चेन्न मनोव्यापारपूर्वकत्वाद्वाक्काय-व्यापाराणां मनोव्यापाराभावे तदनुपपत्तेः। शास्त्रीयाणां वाक्का-**

विद्वानाला कर्मांचा अधिकार नाहीं हें दर्शविण्याकरतां " वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् । कथं स पुरुषः " इत्यादि श्लोकानें भगवान् सर्व कर्मांविषयीं कांहींएक विशेष व्यवस्था न करतां विद्वानाच्या कर्तृत्वाचा व प्रयोजकत्वाचा निषेध करीत आहेत. तर मग विद्वानाचा अधिकार तरी आहे कोठें ? ह्मणून प्रश्न होईल तर " ज्ञानयोगेन सांख्यानां " ह्मणून पूर्वी सांगितलेंच आहे. शिवाय, " सर्वकर्माणि मनसा " इत्यादि वचनानें भगवान् पुढें सर्व कर्मांचा संन्यास सांगणारच आहेत. सदहू वचनामध्यें " मनसा " असें ह्मटल्यामुळें वाचिक आणि कायिक कर्मांचा संन्यास नाहीं ह्मणून कोणी शंका घेतल्यास ती अयोग्य होईल. कारण " सर्वकर्माणि " असें विशेष सांगितलें आहे. आतां " सर्वकर्माणि " या शब्दावरून मानसिकच सर्व कर्मांचा संन्यास सांगितला अशीही शंका बरोबर होणार नाहीं. कारण, वाचिक आणि कायिक व्यापार होण्याचे पूर्वी मानसिक व्यापार होणें अवश्य आहे. तेव्हां मानसिक व्यापारांचाच जर अभाव झाला तर वाचिक आणि कायिक कर्में होण्याचा संभवच नाहीं. आतां शास्त्रीय जीं वाचिक आणि कायिक कर्में त्यांना कारण

यकर्मणां कारणानि मानसानि वर्जयित्वान्यानि सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्त इति चेन्न नैव कुर्वन्न कारयन्निति विशेषणात्। सर्वकर्मसंन्यासोयं भगवतोक्तो मरिष्यतो न जीवत इति चेन्न। नवद्वारे पुरे देह्यास्त इति विशेषणानुपपत्तेः। न हि सर्वकर्मसंन्यासेन मृतस्य तद्देह आसनं संभवति। अकुर्वतो-कारयतश्च देहे संन्यस्येति संबन्धो न देह आस्त इति चेन्न सर्वत्रात्मनोविक्रियत्वावधारणात्। आसनक्रियायाश्चाधि-करणापेक्षत्वात्तदनपेक्षत्वाच्च संन्यासस्य। संपूर्वस्तु न्यासश-ब्दोत्र त्यागार्थो न निक्षेपार्थः। तस्माद्गीताशास्त्र आत्मज्ञान-

---

असलेल्या मानसिक कर्मांचा संन्यास करून असतो असेंहीं ह्मणणें बरोबर नाही. कारण, "कांहींएक न करणारा व न करविणारा" असें विशेषण असल्यामुळें तसा विभाग मानितां येत नाहीं. तर मग भगवानांनीं सांगितलेला हा सर्वकर्मसंन्यास आसन्नमरण झालेल्या पुरुषाला सांगितला असून जीवमान पुरुषाला सांगितला नाहीं असें ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण, इंद्रियरूप नव द्वारांनीं युक्त अशा पुरामध्यें असलेला देही असें जें विशेषण आहे तें जुळत नाहीं. कारण, सर्वकर्मांचा संन्यास करून मृताचें त्या देहांमध्यें असणें संभवत नाहीं. आतां कांहींएक न करणारा असा जो मुमूर्षु त्याच्या देहाचे ठिकाणीं सर्वकर्मांचा संन्यास करून असा अर्थ करावा ह्मणजे "संन्यस्य" ह्याचा "देहे" ह्या पदाकडे अन्वय लावावा; "आस्ते" या क्रियापदाचा संबंध "देहे" या शब्दाकडे घेऊंनये असें ह्मणणेंही अयोग्य आहे. कारण, सर्व ठिकाणीं आत्मा अविक्रिय ह्मणून निश्चित केलेलें आहे आणि आसनक्रियेला आश्रयाची अपेक्षा असून संन्या-साला त्याची अपेक्षा नाहीं. कारण, समुपसर्गपूर्वक न्यासशब्द त्याग करणें ह्या अर्थी आहे; ठेवणें ह्या अर्थी नाहीं. तस्मात् गीताशास्त्रामध्यें

**वतः संन्यास एवाधिकारो न कर्मणीति तत्र तत्रोपरिष्टादात्मज्ञानप्रकरणे दर्शयिष्यामः ॥ २१ ॥**

---

आत्मज्ञान झालेल्या पुरुषाला संन्यासाविषयींच अधिकार आहे; कर्माविषयीं नाहीं असें सिद्ध केलें असून ठिकठिकाणीं आह्मीही पुढें आत्मज्ञानप्रकरणीं तसें असल्याचें दर्शवूं २१.

(" न जायते म्रियते वा कदाचिन्नायं० शरीरे " ह्या पूर्वीच्या श्लोकांत निर्दिष्ट केल्यासारखेंच तात्पर्य ह्या श्लोकांत भासत असल्यामुळें येथें पुनरुक्ति दोषाची कोणाला शंका येईल ती न यावी ह्मणून ह्या श्लोकाचें व्याख्यान करण्यापूर्वी भाष्यकारांनीं पूर्वीच्या दोन मंत्रांतील अर्थाचा अनुवाद केला आहे. विद्वान हा आत्माच आहे. तेव्हां आत्म्याला विकार नसल्यामुळें ज्याप्रमाणें कर्मांचा संबंध नाहीं त्याचप्रमाणें विद्वान् वस्तुतः विकाररहित असल्यामुळें त्यालाही कर्मांचा संबंध नाहीं. सारांशः—निर्विकारत्व हें जें कर्माचा अभाव असण्याविषयींचें कारण तें आत्म्याचे ठिकाणीं आणि विद्वान हा आत्माच असल्यामुळें त्याचे ठिकाणींही सारखेंच लागूं पडत आहे. हें " हेत्वर्थस्य तुल्यत्वाद्विदुषः " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. " विदुषः कं कर्मासंभवे हेतुविशेषं पश्यन्कर्माण्याक्षिपति भगवान्कथं स पुरुष इति " हें भाष्य पूर्वपक्षादाखल आहे आणि " ननूक्त एवात्मनोविक्रियत्वं कर्मासंभवकारणविशेषः " हें भाष्य पूर्वीच्या पूर्वपक्षाला सिद्धांतीचें उत्तर ह्मणून आहे. होय, आत्म्याचें अविक्रियत्व हें विद्वानांना कर्मांचा असंभव असण्याविषयीं कारण सांगितलें आहे; परंतु, तें कारण बरोबर नाहीं. कारण, वेत्ता विद्वान् आणि वेद्य ब्रह्म ह्या उभयतांच्या धर्मांमध्यें अग्नि आणि उदक यांप्रमाणें भेदभाव असल्यामुळें विद्वान आणि अविक्रिय आत्मा हें परस्पर भिन्न असल्याचें सिद्ध आहे. " हें सत्यमुक्तो न तु स कारणविशेषोन्यत्वाद्विदुषोविक्रियत्वादात्मन इति " ह्या भाष्याचें तात्पर्य

होय. कूटस्थ ह्मणजे अविक्रिय जें ब्रह्म तद्रूप होणाऱ्या विद्वानाचे ठिकाणीं विकार संभवेल कसा? विकार जर संभवेल तर विद्वानाला ब्रह्मरूपप्राप्ति होणेंच अशक्य आहे. असें समाधान सिद्धांतीकडून होईल असें गृहीत धरून शंकाकार ह्मणतोः—हें समाधान बरोबर नाहीं. कारण, स्तंभ हा निर्विकार आहे अतएव त्याचे ठिकाणीं कोणत्याही कर्माचा संभव नाहीं हें खरें; परंतु, हा स्तंभ निर्विकार आहे असें जाणणाऱ्या पुरुषाचे ठिकाणीं कर्म संभवत नाहीं असें नाहीं. तस्मात् , आत्मा निर्विकार आहे ह्मणून त्याचे ठिकाणीं कर्म जरी संभवत नसलें तरी आत्म्याला जाणणाऱ्या विद्वानाचे ठिकाणींही कर्मांचा अभाव आहे हें ह्मणणें बरोबर नाहीं असें "न ह्यविक्रियं स्थाणुं विदितवतः कर्म न संभवतीतिचेत्" ह्या भाष्याचें तात्पर्य होय. वरील पूर्वपक्षकाराला सिद्धांती उत्तर देतात कीं "अरे बाबा, तूं जो स्तंभाचा दृष्टांत दिलास तो योग्य नाहीं. "अयमात्मा ब्रह्म" ह्मणजे "हा आत्माच ब्रह्म आहे" अशी श्रुति आहे. तस्मात् , विद्वान हा आत्माच असल्याकारणानें विकारराहित्यामुळें ज्याप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं कर्म संभवत नाहीं त्याचप्रमाणें आत्मरूप जो विद्वान त्याचे ठिकाणींही कर्म संभवत नाहीं. तात्पर्य, स्तंभ आणि त्याला जाणणारा हे एकच नसून परस्परांहून भिन्न आहेत. सबब स्तंभाचा दृष्टांत आधारभूत घेऊन असलेली शंकाही योग्य नाहीं हें "न विदुष आत्मत्वात्" ह्या भाष्याचें तात्पर्य होय. पूर्वपक्षकाराला सिद्धांती ह्मणतातः—अरे, विद्वत्ता जी आहे ती कां विशेषणानें विशिष्ट असलेल्या आत्म्याला आहे असें तूं समजतोस? किंवा केवळ आत्म्याला आहे असें तूं ह्मणतोस? पैकीं प्रश्नांत दर्शविलेलें पाहिलें जर तुझें मत असेल तर तें बरोबर नाहीं. कारण, विशिष्टाला विद्वत्ता आहे असें जर मानिलें तर विशेषणालाही ती अवश्य आहे असें मानिलें पाहिजे. उदाहरणार्थः— "सुवर्णाचा अलंकार मूल्यवान् आहे" ह्या वाक्यांत "सुवर्णाचा" हें विशेषण

असून अलंकार हें विशेष्य आहे ह्मणजे सुवर्णाचा ह्या विशेषणानें अलंकार हा विशिष्ट आहे. तेव्हां मूल्यवत्त्व जर विशिष्टाचे ठिकाणीं ह्मणजे अलंकाराचे ठिकाणीं आहे तर तें विशेषणाचे ठिकाणीं ह्मणजे सुवर्णाचे ठिकाणीं असणें अवश्यच आहे. कारण, अलंकार मूल्यवान् झाला हा सुवर्णामुळें झालेला आहे. तात्पर्य विशिष्टाचे ठिकाणीं गुण असल्यास विशेषणाचे ठिकाणीं तो असावाच लागतो. त्याचप्रमाणें विशिष्ट आत्म्याला जर विद्वत्ता आहे असें ह्मणावें तर ती विशेषणाचे ठिकाणींही असणें अवश्य आहे. परंतु, ह्या ठिकाणीं अचेतन अशा देह, इंद्रियें वगैरेंचा समुदाय हा विशेषणीभूत आहे आणि तो अचेतन आहे ह्मणूनच त्याचे ठिकाणीं विद्वत्ता संभवनीय नाहीं. तस्मात्, विशिष्ट आत्म्याचे ठिकाणीं विद्वत्ता नाहीं. आतां प्रश्नांत दर्शविलेलें दुसरें मत तुला ग्राह्य असेल तर ह्मणजे केवळ आत्म्याचे ठिकाणीं विद्वत्ता आहे असें तुला अभिमत असेल तर जीव आणि ब्रह्म हे परस्पर भिन्न असल्याचें जें तूं समजत आहेस तें सिद्ध होत नाहीं. तेव्हां उरलें काय तर देहेंद्रियादिसंघातरहित आत्माच विद्वान् व अविक्रिय आहे हें. तेव्हां आत्मस्वरूप आणि ह्मणूनच अविक्रिय असा जो विद्वान् त्याचे ठिकाणीं कर्माचा असंभव सिद्ध असल्यामुळें "कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम्" असा जो विद्वानाच्या कर्ममात्राविषयीं आक्षेप भगवानांनीं घेतला आहे तो योग्यच आहे हें "न देहादिसंघातस्य विद्वत्ता । अतः पारिशेष्यादसंहत आत्मा विद्वानविक्रय इति । तस्य विदुषः कर्मासंभवादाक्षेपो युक्तः कथं स पुरुष इति ।" ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां "ब्रह्म जर विकाररहित असल्याचें सिद्ध आहे आणि विद्वान् हा ब्रह्मस्वरूपच असल्यामुळें जर ब्रह्माप्रमाणें त्याचे ठिकाणीं कोणतेंही कर्म संभवत नाहीं तर त्याचे ठिकाणीं विद्वत्ता तरी कशी संभवेल ? कारण, ब्रह्म जर वस्तुतः अविक्रिय आहे तर त्याचे ठिकाणीं विद्यारूप विकारसुद्धां असणें योग्य नाहीं. अर्थात् विद्वान् हा ब्रह्मस्वरूप

असल्याकारणानें, विकाररहित असल्यामुळें त्याचे ठिकाणींही विद्यारूप विक्रिया असणें योग्य नाहीं. तात्पर्य , विद्वानाचे ठिकाणीं विद्वत्ता हा विकार संभवत नाहीं, अशी पूर्वपक्षाच्या बाजूनें शंका संभवेल असें समजून त्या शंकेच्या निरसनार्थ " बुद्ध्याद्याहृतस्य शब्दाद्यर्थेस्याविक्रिय एव सन्बुद्धिवृत्त्याविवेकाविज्ञानेनाविद्ययोपलब्धात्मा कल्प्यत एवमेवात्मानात्मविवेकविज्ञानेन बुद्धिवृत्त्या विद्ययासत्यरूपयैव परमार्थतोविक्रिय एवात्मा विद्वानुच्यते " हें भाष्य आहे. प्रारब्ध, इंद्रियें इत्यादिकांसहवर्तमान असलेलें अन्तःकरण विषयाकार झालें असतां त्याला बुद्धिवृत्ति असें ह्मणतात आणि त्या बुद्धिवृत्तीचे ठिकाणीं प्रतिबिंबित जें चैतन्य त्यालाच विषयज्ञान ह्मणण्याचा व्यवहार आहे. परंतु, विषयाचें ज्ञान करून देणारी बुद्धिवृत्ति ही तिचे ठिकाणीं प्रतिबिंबित असलेल्या चैतन्यरूप आत्म्याहून भिन्न आहे असा विचार न झाल्यामुळें प्रतिबिंबित चैतन्यालाच विषयज्ञान ह्मणण्याचा व्यवहार पडला आहे आणि ह्मणूनच तो मिथ्या आहे. असो. असा व्यवहार पडून गेल्यामुळें विषयाचा ज्ञाता आत्माच कल्पिला जातो. परंतु, अज्ञानामुळें आत्म्याचा बुद्धिवृत्तीशीं हा नुसता संबंध कल्पून जरी आत्मा विषयज्ञाता समजला जातो तरी वास्तविक पाहूं गेलें असतां त्याच्या विकाररहित्याला बाध येत नाहीं. " अहं ब्रह्मास्मि " ही बुद्धिवृत्ति मोक्षावस्थेमध्येंही असल्यामुळें आत्मा केवल नाहीं अशी शंका येईल ती येऊं नये ह्मणून ती बुद्धिवृत्ति देहादिरूप उपाधि जोंपर्यंत असते तोंपर्यंतच कायम असते हें दर्शविण्याच्या उद्देशानें " असत्यरूपयैव परमार्थतः" असें ह्मटलें आहे. आत्मा निर्विकार असून त्याचे ठिकाणीं भासमान होणारें विद्यावत्त्व मिथ्या आहे. ह्यामुळें कर्माविषयीं त्याचा अधिकार नाहीं आणि ह्मणूनच आत्मस्वरूप असलेल्या विद्वानाचाही नाहीं. तेव्हां कर्में तरी कोणाला उद्देशून श्रुतीमध्यें विहित आहेत? अशी शंका ह्या ठिकाणीं संभवते; तिच्या निरसनार्थ " विदुषः कर्मासंभववचनाद्यानि

कर्माणि शास्त्रेण विधीयन्ते तान्यविदुषो विहितानीति भगवतो निश्चयोऽवगम्यते " हें भाष्य आहे. ह्या भाष्यावर पूर्वपक्षाकडून जी शंका येण्याचा संभव आहे तीच " ननु विद्याप्यविदुष एव विधीयते विदितविद्यस्य पिष्टपेषणवद्विद्याविधानानर्थक्यात्तत्राविदुषः कर्माणि विधीयन्ते न विदुष इति विशेषो नोपपद्यते " ह्या भाष्यानें दर्शविलेली आहे. ज्याप्रमाणें कर्में अविद्वानाला विहित आहेत त्याप्रमाणें विद्या ह्मणजे ज्ञानही अविद्वानालाच विहित असलें पाहिजे. कारण, विद्वानाला ह्मणजे ज्ञान झालेल्याला पुनरपि ज्ञानविधि आहे असें मानणें पिष्टपेषणाप्रमाणें निरर्थक आहे. तात्पर्य, एकदा पीठ झाल्यावर तेंच पीठ वारंवार दळून काढणें ज्याप्रमाणें व्यर्थ होणार आहे त्याचप्रमाणें ज्याला ज्ञान होऊन चुकलें आहे त्याला पुनरपि ज्ञानाचा विधि असें मानणें निरर्थक आहे. तस्मात्, अविद्वानाला कर्में विहित आहेत आणि विद्वानाला नाहींत अशी विशेष व्यवस्था जुळत नाहीं हा सदर्हू भाष्याचा आशय होय. धर्मज्ञान झाल्यानंतर कर्मविधि आणि ब्रह्मज्ञान झाल्यानंतर कर्मविधीचा अभाव. तात्पर्य ब्रह्मज्ञानहीन असलेल्याला कर्में विहित आहेत अशी व्यवस्था जुळते. सबब, वर दर्शविलेली शंका बरोबर नाहीं हें " नानुष्ठेयस्य भावाभावविशेषोपपत्तेः " ह्या भाष्याचें तात्पर्य होय.—आत्मा देहादिकांहून भिन्न आहे असें ज्ञान कर्मांमध्यें प्रवृत्त झालेल्या पुरुषांचे ठिकाणीं असणें अवश्य आहे कारण, "ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत" ह्या श्रुतीमध्यें स्वर्गेच्छु पुरुषानें सोमयाग करावा असें सांगितलें आहे. परंतु, स्वर्गतर याग करणाऱ्याला ह्या देहानंतर प्राप्त होणारा असतो. तस्मात्, परलोकसंपादक जीं अग्निहोत्रादि कर्में त्यांचे ठिकाणीं पुरुषाची प्रवृत्ति होण्यास आत्मा देहादिकांहून भिन्न आहे असें ज्ञान अवश्य असावेंच लागतें. तेव्हां एतावता ज्ञानवानानेंच अग्निहोत्रादि कर्में करावीं त ही गोष्ट सिद्ध होत आहे—अशी शंका जरी ह्या ठिकाणीं एकाद्यानें केली तरी ती बरोबर होणार नाहीं. कारण, मी ह्या कर्माचा कर्ता आहे

व ह्याचें फल मला परलोकीं मिळणार आहे अशाप्रकारचें ज्ञान जरी कर्मी पुरुषाचे ठिकाणीं असतें तरी ब्रह्मज्ञान नसतें. तस्मात्, धर्मज्ञान झाल्यानंतर परंतु, ब्रह्मज्ञानाचा अभाव असतांना कर्मविधि आणि ब्रह्मज्ञान झाल्यावर कर्मविधीचा अभाव ही जी पूर्वी व्यवस्था दर्शविली आहे तिला बाध येत नाहीं हें "कर्ताहं मम कर्तव्यमित्येवंप्रकारज्ञा० नुष्ठेयं भवति" ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां आत्मा देहादिकांहून भिन्न आहें हें ज्ञान ज्याप्रमाणें कर्मामध्यें प्रवृत्ति होण्यास उपयोगीं पडतें त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञानही पुरुषाची कर्मांचे ठिकाणीं प्रवृत्ति होण्यास उपयोगीं पडेल अशी शंका करणें बरोबर नाहीं. कारण, आत्मा विकाररहित आहे असें खरें खरें ज्ञान झाल्यानंतर कर्तृत्वादिविकारबुद्धिपूर्वक कर्मानुष्ठान होण्याचा संभवच नाहीं आणि जर असेल तर आत्मज्ञान झालें नाहीं ह्मणजे कर्मत्यागावस्था प्राप्त झाली नाहीं असें समजावें हें "न तु तथा न जायत इत्यादावात्मस्वरूपविष्यर्थज्ञानोत्तरकालभावि किंचिदनुष्ठेयं भवति" ह्या भाष्याचें तात्पर्य होय. स्वस्वरूपाहून ब्रह्म भिन्न नाहीं असें ज्ञान झाल्यानंतरही "मी कर्ता, मी भोक्ता" इत्यादिप्रकारचें ज्ञान जर उत्पन्न झालें तर त्या अवस्थेमध्यें कर्मानुष्ठान प्राप्त होईल अशी शंका बरोबर नाहीं. कारण आत्मज्ञान एकदां खरें झालें ह्मणजे "मी कर्ता नाहीं, मी भोक्ता नाहीं" इत्यादिप्रकारचें कर्मविरोधि ज्ञानच पुरुषाचे ठिकाणीं कायम रहातें. तात्पर्य, एकदां आत्मज्ञान झाल्यावर आत्मा अद्वितीय आहे, अकर्ता आहे इत्यादिविषयक ज्ञानाहून अन्य ह्मणजे आत्मा कर्ता आहे, भोक्ता आहे इत्यादिप्रकारचें मिथ्या ज्ञान उत्पन्न होण्याचें कारणच उरत नसल्यामुळें तें उत्पन्न होतच नाहीं. तस्मात्, धर्मज्ञान झाल्यानंतर ब्रह्मज्ञानाचा अभाव असें पर्यंत कर्मविधि व ब्रह्मज्ञान झाल्यानंतर कर्मविधीचा अभाव अशी ही विशेष व्यवस्था सिद्ध आहे हा "किं तु नाहं कर्ता न भोक्तेत्यादिज्ञानमात्मैकत्वाकर्तृत्वादिविषयज्ञानादन्यन्नोत्पद्यत इत्येष विशेष उपपद्यते"

ह्या भाष्याचा आशय होय. आतां आत्मज्ञानी पुरुषाला जर कोणतेंही कर्म संभवत नाहीं तर " विद्वान्यजेत " ह्या श्रुतीनें त्या आत्म्यवेत्त्याला कर्में कशीं विहित आहेत ? तस्मात् अविद्वानाला कर्में विहित असून विद्वानाला नाहींत अशी विशेष व्यवस्था टिकत नाहीं अशी शंका कोणीं केल्यास ती बरोबर होणार नाहीं. कारण, " विद्वान्यजेत " ह्या श्रुतींतील " विद्वान् " ह्या शब्दाचा अर्थ–मी ह्या कर्माचा कर्ता आहें व माझें हें कर्तव्य आहे अशाप्रकारचें ज्ञान असणारा–असा आहे; मी कर्तृत्वादिविकाररहित आहें अशाप्रकारचें ज्ञान असणारा–असा त्या श्रुतींतील " विद्वान् " ह्या शब्दाचा अर्थ नाहीं. तेव्हां तें ज्ञान विवक्षित आहे व तशाप्रकारच्या ज्ञानवान् पुरुषाला उद्देशून श्रुतीमध्यें कर्माचें विधान केलेलें आहे. परंतु, तो ज्ञानवान् पुरुष वास्तविक पाहूं गेलें असतां अज्ञानी असल्याचें " य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् । उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते " ह्या वचनावरून निश्चित झालेलें आहे. मी ह्या कर्माचा कर्ता आहें, ह्याचें फल मला मिळणार आहे, कर्माचें फल देणारा माझ्याहून वेगळा आहे इत्यादिप्रकारचें ज्ञान कर्मामध्यें प्रवृत्ति होण्यास पुरुषाचे ठिकाणीं असणें अवश्य आहे आणि विद्वानाचे ठिकाणीं तर त्याचे विरुद्ध ज्ञान–ह्मणजे मी कर्ता नाहीं, मी भोक्ता नाहीं, परंतु, निर्विकार आहें अशाप्रकारचें ज्ञान–असणार हें सिद्ध झालें आहे. तेव्हां कर्तृत्वादिज्ञानद्वारा अकर्तृत्वादिज्ञानवान् पुरुषाची कर्मामध्यें प्रवृत्ति होण्याचा संभवच नाहीं. हें " यः पुनः कर्ताहमिति वेत्त्यात्मानं तस्य ममेदं कर्तव्यमित्यवश्यंभाविनी बुद्धिः स्यात्तदपेक्षया सोधिकृत इति तं प्रति कर्माणि संभवन्ति स चाविद्वानुभौ तौ न विजानीत इति वचनात् " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. " विशेषितस्य च विदुषः कर्माक्षेपवचनात्कथं स पुरुष इति " ह्या भाष्यांतील " विशेषितस्य च विदुषः " ह्या पदांचा अर्थ–" वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् " ह्या श्लोकार्धांत सांगितल्याप्रमाणें

आत्म्याविषयीं ज्ञान असलेल्या विद्वानाच्या—असा आहे. विशेषित ह्या पदाचा अक्षरार्थ विशेषणानें युक्त असा आहे व " वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् " हें श्लोकार्ध विशेषणीभूत आहे. " कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कं " हें कर्माक्षेपवचन होय. संन्यास दोन प्रकारचा आहे. एक विद्वत्संन्यास आणि दुसरा विविदिषासंन्यास. आत्मज्ञानी पुरुषानें कर्तव्य जो संन्यास तो विद्वत्संन्यास होय आणि आत्मजिज्ञासु पुरुषानें कर्तव्य जो संन्यास तो विविदिषासंन्यास होय. पैकीं विद्वानानें ह्मणजे विद्वत्संन्यास करण्याला योग्य झालेल्या पुरुषानें सर्वकर्मांचा संन्यास करावा हें सिद्ध झालें आहे. परंतु. ब्रह्मजिज्ञासूनें ह्मणजे विविदिषासंन्यासास योग्य झालेल्या पुरुषानें सर्व कर्मे करावीत, अशी शंका येईल ह्मणून तिचेंही निरसन करण्याकरितां " तस्माद्विशेषितस्य विदुषो मुमुक्षोश्च सर्वकर्मसंन्यास एवाधिकारः " ह्या भाष्यांत "मुमुक्षोश्च " असें ह्मटलें आहे. मुमुक्षु=मुक्तीची इच्छा करणारा=विविदिषासंन्यासास योग्य झालेला. ब्रह्मज्ञानी पुरुषाला कर्माधिकार आहे ह्मणावें तर ब्रह्मज्ञानाशीं विरोध येतो आणि मुमुक्षूला कर्माधिकार आहे ह्मणावें तर त्याला इष्ट जो मोक्ष त्याच्या प्राप्तीला कर्मे विरुद्ध आहेत. कारण, अग्निहोत्रादि कर्मांचें फल जें स्वर्गसुख तें अनुभविण्याकरितां त्याला योग्य असा देह प्राप्त होण्याची अवश्यकता आहे आणि अशी देहप्राप्ति होणें अर्थातच मोक्षाला विरुद्ध आहे. सबब विद्वान् आणि मुमुक्षु ह्या उभयतांचा सर्वकर्मसंन्यासाविषयींच अधिकार आहे. हें सदहू भाष्याचें तात्पर्य होय. मुमुक्षूला ह्मणजे विविदिषासंन्यास घेण्याला योग्य झालेल्या पुरुषाला जरी आश्रमकर्मांची अपेक्षा आहे तरी ज्ञान आणि ज्ञानफल ह्यांना जीं केलीं असतां विरोध न येईल त्यांचीच अपेक्षा आहे असें मानिलें पाहिजे. नाहींतर विविदिषासंन्यासाच्या विधीलाच विरोध येईल. हें लक्ष्यात आणून भाष्यकारांनीं ह्या आपल्या ह्मणण्याला भगवानांचेंही वचन प्रमाण आहे असें दर्शविण्याच्या उद्देशानें " अत एव

भगवान्नारायणः सांख्यान्विदुषो विदुषश्च कर्मिणः प्रविभज्य द्वे निष्ठे ग्राहयति ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनामिति " असें भाष्य लिहिलें आहे.—ब्रह्मज्ञान झालेल्याला आणि विविदिषूला संन्यासाचा अधिकार आहे व अविद्वानाला कर्माधिकार आहे अशी व्यवस्था इष्ट असल्यामुळें—हें सदहू भाष्यांतील " अतः " ह्या शब्दाचें तात्पर्य होय. विद्वान् आणि मुमुक्षु ह्या दोहोंचा सांख्यशब्दानें समावेश होतो असें समजावें. ज्याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं अधिकारिभेदानें कर्ममार्ग व ज्ञानमार्ग असे दोन मार्ग गीतेमध्यें सांगितले त्याचप्रमाणें भगवान् व्यासमुनींनींही अधिकारिभेदानें दोन मार्ग आपल्या पुत्राला सांगितले आहेत हा " तथा च पुत्रायाह भगवान्व्यासो द्वाविमावथ पन्थानाविति " हें भाष्य लिहिण्याचा आशय होय. " स्वाध्यायोध्येतव्यः " ह्या अध्ययनविधीनें वेदाध्ययन करण्याविषयीं द्विजाची प्रवृत्ति झाल्यानंतर अधिकारिभेदानें कर्ममार्ग व ज्ञानमार्ग असें दोन मार्ग उक्त आहेत हा " द्वाविमावथ पन्थानौ " ह्या स्मृतीचा अर्थ होय. कर्ममार्ग व ज्ञानमार्ग ह्या दोहोंची योग्यता सारखीच आहे अशी शंका येऊं नये ह्मणून " क्रियापथश्चैव पुरस्तात्पश्चात्संन्यासश्चेति " असा मजकूर भाष्यकारांनीं लिहिला आहे. विहित कर्मांच्या अनुष्ठानानें अंतःकरणशुद्धि होऊन तिच्या द्वारें कर्म व कर्मफल ह्यांविषयीं विरक्तता उत्पन्न होईपर्यंत कर्ममार्ग विहित आहे आणि ह्याप्रमाणें अंतःकरणशुद्धिद्वारा वैराग्य उत्पन्न झाल्यानंतर संन्यासपूर्वक ज्ञानमार्गाचें अवलंबन करण्यास सांगितलें आहे व तो ज्ञानमार्ग कर्ममार्गाहून अतिशय श्रेष्ठ असल्याचें श्रुत आहे हें सदहू मजकुराचें तात्पर्य होय. " एतमेव विभागं पुनःपुनर्दर्शयिष्यति भगवानतत्त्वविदहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते तत्त्ववित्तु नाहं करोमीति तथा च सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्त इत्यादि " ह्या भाष्यांतील "दर्शयिष्यति" ह्या क्रियापदाचा अन्वय शेवटल्या "इत्यादि" ह्या शब्दाकडे करावा. " तत्त्ववित्तु नाहं करोमीति " ह्या भाष्यांतील शेवटल्या

इतिशब्दाचा अन्वय " कर्ताहमिति मन्यते" ह्या ठिकाणच्या "मन्यते" ह्या क्रियापदाशीं करावा. कर्ममार्ग व ज्ञानमार्ग असा जो विभाग सांगितला त्याला भगवान् श्रीकृष्णांचीं वचनें प्रमाण आहेत हें दर्शविण्याकरितां " एतमेव विभागं० इत्यादि " हें भाष्य लिहिलें असून त्यांत " प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः। अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥ तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः । गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥२८॥ अ०॥३॥ सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी । नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥१३॥ अ०॥५॥"ह्या गीतावचनांचा उपन्यास संक्षेपतः व तात्पर्यरूपानें केलेला आहे. " अहंकारविमूढात्मा " ह्या पदाचें स्पष्टीकरण " अतत्त्ववित् " ह्या शब्दानें भाष्यकारांनीं करून दाखविलें आहे. " तत्त्ववित्तु नाहं करोमीति " हें " तत्त्ववित्तु० न सज्जते " ह्या वचनाचें तात्पर्य ह्मणून भाष्यकारांनीं घेतलें आहे. प्रकृतेः क्रियमाणानि० मन्यते ॥ ह्या वचनाचा उल्लेख " स्वाध्यायोध्येतव्यः " ह्या विधीनें वेदाध्ययनामध्यें प्रवृत्ति होऊन अग्निहोत्रादि कर्में करीत असलेल्या पुरुषाला उद्देशून केलेला आहे. " तत्त्ववित्तु० न सज्जते " ह्या वचनाचा उल्लेख आत्मज्ञानझालेल्या पुरुषाला उद्देशून केलेला आहे आणि " सर्वकर्माणि० न्न कारयन् " ह्या वचनाचा उल्लेख अंतःकरणशुद्धिद्वारा वैराग्य उत्पन्न झालेल्या पुरुषाला उद्देशून केलेला आहे. तात्पर्य, कर्ममार्ग व ज्ञानमार्ग ही व्यवस्था दर्शविण्याकरितां तीन वचनांचा संग्रह भाष्यकारांनीं येथें केला आहे.पैकीं पहिल्या वचनानें कर्ममार्ग सूचित केला असून पुढल्या दोन वचनांनीं ज्ञानमार्ग दर्शविला आहे व त्या दोन वचनांतही पहिल्यांत विद्वत्संन्यास आणि दुसऱ्यांत विविदिषासंन्यास अशी व्यवस्था आहे. विद्वत्संन्यास व विविदिषासंन्यास ह्या दोहोंचा समावेश ज्ञानमार्गांत होतो. असो. " आत्मा निर्विकार आहे असें ज्ञान संन्यासाला कारणीभूत होतें असें सांगितलें आहे; परंतु, आत्मा हा ज्ञानक्रियारूप शक्तीचा

आधार असल्यामुळें निर्विकार असणें संभवत नाहीं. तेव्हां अर्थातच आत्मा निर्विकार आहे असें ज्ञान उत्पन्न होण्याचा वास्तविक संभवच नाहीं " असा हेतु मनांत आणून " जन्मादिषड्भावविकाररहितोविक्रियो-कर्तैकोहमात्मेति न कस्यचिज्ज्ञानमुत्पद्यते यस्मिन्सति सर्वकर्मसंन्यास उपदिश्यते " हें मीमांसकमत भाष्यांत दर्शविलें आहे. ह्या मीमांसक पूर्वपक्षकाराला सिद्धांती ह्मणतातः—अरे, जन्मादि सहा विकारांनीं रहित, अविक्रिय, अकर्ता, अद्वितीय असा आत्मा मी आहें असें ज्ञान कोणालाही उत्पन्न होत नाहीं ह्मणून तूं ह्मणालास खरा; परंतु, तशाप्रकारचें ज्ञान उत्पन्न न होण्याला तुझ्यामतानें कारण तरी काय आहे ? विषयाचा अभाव आणि प्रमाणाचा अभाव ह्यां-पैकींच कोणतें तरी एक कारण तशाप्रकारचें ज्ञान उत्पन्न न होण्यास असलें पाहिजे. पैकीं आत्मज्ञान विषयाचा अभाव असल्यामुळें उत्पन्न होत नाहीं असें ह्मणतां येणार नाहीं. कारण ज्ञानाला विषयभूत जो अविक्रिय आत्मा त्याचा अभाव नाहीं. कां ह्मणून विचारशील तर " न जायते म्रियते वा " इत्यादि शास्त्रविधान आप्तवाक्य असल्या-कारणानें प्रमाणभूत असल्यामुळें कारणावांचून त्याला वैयर्थ्य येणें योग्य नाहीं. आतां प्रमाण नसल्यामुळें आत्मज्ञान उत्पन्न होतें असें मानतां येणार नाहीं ह्मणून ह्मणत असशील तर तेंही बरोबर नाहीं. कसें तें पहाः धर्म, अधर्म, परलोकप्राप्ति वगैरे गोष्टी प्रत्यक्ष दिसत नाहींत; परंतु, अज्ञात अशा ह्या धर्मादिकांसंबंधीं कर्मकांडाच्या योगानें ज्ञान उत्पन्न होतें ही गोष्ट तुला मान्य आहे. तेव्हां कर्मकांडविषयक शास्त्राच्या योगानें ज्याप्रमाणें अज्ञात अशा धर्मादिकांचें ज्ञान उत्पन्न होतें त्याच-प्रमाणें ज्ञानकांडविषयक शास्त्राच्या योगानें अज्ञात अशा ब्रह्मात्म्या-विषयीं ज्ञान उत्पन्न होण्यास ह्मणजे आत्मा अविक्रिय, अकर्ता, अद्वि-तीय वगैरे असल्याबद्दलचें ज्ञान उत्पन्न होण्यास काय हरकत आहे ? प्रमाण या नात्यानें कर्मकांडाची योग्यता ज्याप्रमाणें आहे त्याचप्रमाणें

ज्ञानकांडाचाही आहे हें " न जायते म्रियत इत्यादिशास्त्रोपदेशानर्थक्यप्रसंगात् । यथा च शास्त्रोपदेशसामर्थ्याद्धर्माधर्मास्तित्वविज्ञानं कर्तुश्च देहान्तरसंबन्धि विज्ञानमुत्पद्यते तथा च शास्त्रात्तस्यैवात्मनोविक्रियत्वाकर्तृत्वादिविज्ञानं कस्मान्नोत्पद्यत इति प्रष्टव्यास्ते " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां " ज्ञान हें मनःसंयोगजन्य असल्यामुळें आणि— यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह—ह्या श्रुतीमध्यें ब्रह्म मनाला अगोचर असल्याचें सांगितलें असल्यामुळें ज्ञानकांड हें आत्मज्ञानाविषयीं साधन आहे असें ह्मणतां येत नाहीं " ही शंकाही बरोबर नाहीं. कारण, " तत्त्वमसि " इत्यादि वाक्यांपासून उत्पन्न झालेल्या मनोवृत्तीच्याच योगानें शास्त्र आणि गुरु ह्यांच्या उपदेशाला अनुसरून तत्त्व अवलोकन करावें असें " मनसैवानुद्रष्टव्यं " ह्या श्रुतींत सांगितलें आहे. सारांश, ब्रह्मात्मा जरी स्वतः स्वयंप्रकाश आहे तरी " तत्त्वमसि " इत्यादि वाक्यांच्या योगानें उत्पन्न झालेली जी बुद्धिवृत्ति तिच्यामुळें तो अभिव्यक्त होत असून सविकल्पक व्यवहाराला विषयीभूत होतो आणि ह्मणूनच तो मनाला विषयीभूत होत असल्याचेंही व्यवहारदृष्ट्या ह्मणत असतात. तस्मात्, ब्रह्म मनाला अगोचर आहे हें ह्मणणें सिद्ध होत नाहीं हा " करणागोचरत्वादिति चेन्न मनसैवानुद्रष्टव्यमिति श्रुतेः " ह्या भाष्याचा आशय होय. *

( मधुसूदनसरस्वतींनीं " अर्जुनो हि स्वस्मिन्कर्तृत्वं भगवति च कारयितृत्वमध्यस्य हिंसानिमित्तं दोषमुभयत्राप्याशशङ्के भगवानपि विदिताभिप्रायो हन्ति घातयतीति तदुभयमाचिक्षेप । आत्मनि कर्तृत्वं मयि च कारयितृत्वमारोप्य प्रत्यवायशङ्कां मा कार्षीरित्यभिप्रायः " असें लिहून ह्या श्लोकाचा आशय " आपले ठिकाणीं हिंसेचें कर्तृत्व व भगवानाचे ठिकाणीं प्रयोजकत्व येत असल्याचें समजून हिंसा करणें व करविणें हीं दोन्हीं दोषावह आहेत अशी शंका अर्जुनाला आली आणि अर्जुनाचा

* ह्यापुढील भाष्य पूर्वीच्या भाषांतरानेंच समजण्यासारखें आहे.

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही २२

प्रकृतं तु वक्ष्यामः। तत्रात्मनो विनाशित्वं प्रतिज्ञातं तत्किमिवेत्युच्यते वासांसि० देही॥२२॥वासांसि वस्त्राणि जीर्णानि दुर्बलतां गतानि यथा लोके विहाय परित्यज्य नवान्यभिनवानि गृह्णात्युपादत्ते नरः पुरुषोऽपराण्यन्यानि तथा तद्वदेव शरी-

अभिप्राय जाणून भगवानांनींही—तो मारणार कसा आणि मारविणार तरी कसा—असें ह्मणून त्याच्या दोन्हीप्रकारच्या शंकांवर आक्षेप घेतला आणि—आपल्या ठिकाणीं कर्तृत्वाचा व माझ्या ठिकाणीं प्रयोजकत्वाचा आरोप करून तूं प्रत्यवायाबद्दल उगीच शंका घेऊं नकोस—असें त्याला सुचविलें '' असा काढिला आहे. परंतु, तो भाष्योत्कर्षदीपिकाकारांच्या मतानें बरोबर नाहीं. ते ह्मणतातः—आत्मज्ञान ज्या पुरुषाला नाहीं त्या पुरुषाला हिंसेसंबंधानें पापाचें भय असतें. करितां, स्वधर्मरूप युद्धापासून निवृत्त झालेल्या अर्जुनाला—आत्मस्वरूप व आत्मस्वरूपज्ञानाचे उपाय एतद्विषयक धर्माचा ज्यामध्यें मुख्यतः बोध केला आहे अशा संपूर्ण गीताशास्त्रानें—भगवान् बोध करीत असल्याचें स्पष्ट होत असतांना " अर्जुनाला शंका आली आणि भगवानांनीं शंका घेऊं नकोस '' ह्मणून त्याला सांगितलें अशा प्रकारचा आशय काढणें व्यर्थ आहे २१ ).

ज्याप्रमाणें पुरुष जीर्ण वस्त्रें टाकून देऊन दुसरीं नवीं घेतो त्याचप्रमाणें आत्मा जीर्ण शरीरें टाकून देऊन दुसरीं नवीं घेतो ॥ २२ ॥

आतां प्रकृत प्रकरणाकडे वळतों. आत्मा अविनाशी आहे हें प्रतिज्ञापूर्वक पूर्वीं सांगितलें; तेव्हां तें अविनाशित्व कसें हें " वासांसि० देही '' ह्या श्लोकांत कथन केलें आहे. लोकांमध्यें ज्याप्रमाणें जीर्ण झालेलीं ह्मणजे ज्यांत कांहीं जीव राहिला नाहीं अशीं झालेलीं वस्त्रें पुरुष टाकून

**राणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति संगच्छति नवानि देह्यात्मा पुरुषवदविक्रिय एवेत्यर्थः ॥ २२ ॥**

---

देऊन नव्या वस्त्रांचा स्वीकार करीत असतो त्याचप्रमाणें आत्मा जीर्ण शरीरांचा त्याग करून दुसऱ्या नवीन शरीरांशीं संगत होतो. तात्पर्य, जसा पुरुष स्वतः विकाररहित असतांनाच जीर्ण झालेलीं वस्त्रें टाकून देऊन दुसरीं नवीं स्वीकारितो तसा आत्मा विकाररहित असतांनाच जीर्ण शरीरांचा त्याग करून नूतनांचा स्वीकार करीत असतो २२.

( " नन्वेवमात्मनो विनाशित्वाभावेपि देहानां विनाशित्वाद्युद्धस्य च तन्नाशकत्वात्कथं भीष्मादिदेहानामनेकसुकृतसाधनानां मया युद्धेन विनाशः कार्य इत्याशङ्कया उत्तरं जीर्णानि विहाय वस्त्राणि नवानि गृह्णाति विक्रियाशून्य एव नरो यथेत्येतावतैव निर्वाहे पराणीति विशेषण-मुत्कर्षातिशयख्यापनार्थं तेन यथा निकृष्टानि वस्त्राणि विहायोत्कृष्टानि जनो गृह्णातीत्यौचित्यायातं तथा जीर्णानि वयसा तपसा च कृशानि भीष्मादिशरीराणि विहायान्यानि देवादिशरीराणि सर्वोत्कृष्टानि चिरो-पार्जितधर्मफलभोगाय संयाति सम्यग्गर्भवासादिक्लेशव्यतिरेकेण प्राप्नोति देही प्रकृष्टधर्मानुष्ठातृदेहवान्भीष्मादिरित्यर्थः । ...एतदुक्तं भवति भीष्मादयो हि यावज्जीवं हि धर्मानुष्ठानक्लेशेनैव जर्जरशरीरा वर्तमान-शरीरपातमन्तरेण तत्फलभोगायासमर्था यदि धर्मयुद्धेन स्वर्गप्रतिबन्ध-कानि जर्जरशरीराणि पातयित्वा दिव्यदेहसंपादनेन स्वर्गभोगयोग्याः क्रियन्ते त्वया तदात्यन्तमुपकृता एव ते । दुर्योधनादीनामपि स्वर्गभोग्यदेह-संपादनान्महानुपकार एव । तथा चात्यन्तमुपकारके युद्धेपकारकत्वभ्रमं मा कार्षीरिति " असा मजकूर लिहून मधुसूदनसरस्वतींनीं " वासांसि जीर्णानि० देही " ह्या श्लोकाचा आशय " —अहो ह्याप्रमाणें आत्म्याला जरी विनाशित्व नाहीं तरी देहांना विनाशित्व आहे आणि युद्ध हें देहांचा नाश करणारें आहे. तेव्हां नानाप्रकारचें पुण्य संपादन करण्यास

साधनीभूत असलेल्या भीष्मादिकांच्या देहांचा युद्धाच्या योगानें मीं नाश कसा करावा? —अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून भगवानांनीं त्या शंकेचें उत्तर " वासांसि ० देही " ह्या श्लोकानें दिलें आहे. " ज्याप्रमाणें पुरुष विकारशून्य असतांनाच जीर्ण वस्त्रें टाकून देऊन नवीं घेतो " येवढ्यानेंच भागत असतांना " अपराणि " हें विशेषण अतिशय उत्कृष्टपणा दाखविण्याकरितां घातलेलें आहे. करितां, पुरुष ज्याप्रमाणें निकृष्ट वस्त्रांचा त्याग करून उत्कृष्ट वस्त्रांचा स्वीकार करितो हें उचित आहे त्याचप्रमाणें देही ह्मणजे उत्कृष्ट प्रकारचे धर्मानुष्ठान होण्यास साधनीभूत असलेल्या देहानें युक्त असलेले भीष्मादिक वय आणि तपश्चर्या ह्यांच्या योगानें जीर्ण ह्मणजे कृश झालेलीं शरीरें टाकून देऊन दुसऱ्या देवादिकांच्या सर्वोत्कृष्ट शरीरांशीं अनादि कालापासून संपादन केलेल्या धर्माच्या फलाचा उपभोग घेण्याकरितां चांगल्या प्रकारानें ह्मणजे गर्भवासादिक्लेशावांचून संगत होतात... तात्पर्य, भीष्मादिकांचीं शरीरें जन्मभर धर्मानुष्ठानाच्या क्लेशामुळें जर्जर झालेलीं आहेत व ह्या शरीराचा नाश झाल्यावांचून त्यांना ह्या धर्मानुष्ठानाच्या फलाचा उपभोग घेतां येणार नाहीं. तेव्हां धर्मयुद्धाच्या योगानें स्वर्गप्रतिबंधक अशा जर्जर शरीरांचा त्याग करवून व दिव्य देह संपादन करवून तूं जर त्यांना स्वर्गसुखोपभोग घेण्यास योग्य केलेंस तर तूं त्यांच्यावर अतिशय उपकार केल्यासारखें होणार आहे, व त्याचप्रमाणें स्वर्गसुखाचा उपभोग घेण्यास योग्य असा देह मिळणार असल्यामुळें दुर्योधनादिकांवरही, हे अर्जुना, तुझा मोठा उपकार होणार आहे. तस्मात्, युद्ध हें अत्यंत उपकार करणारें असतांना तें अपकार करणारें आहे अशी भ्रांतिमूलक कल्पना हे अर्जुना, तूं मनामध्यें, आणूं नकोस—" असा काढिला आहे. परंतु, भाष्याशीं विरुद्ध असलेला हा त्यांचा आशय बरोबर नाहीं. कारण, आत्मा विक्रियारहित आहे हें प्रकरण पूर्वीपासून चालत आलें आहे त्याला विरोध येतो हा ह्या

व्याख्यानावर पहिला दोष; देही ह्या शब्दाचा अर्थ "आत्मा" असा सरळ होत असतांना व "देही नित्यमवध्योयं० मर्हसि" ह्या श्लोकामध्यें मधुसूदनसरस्वतींनींही तसाच केला असतांना ह्या ठिकाणीं "देही" हें विशेषण समजून "भीष्मादिः" हें विशेष्य विनाकारण अध्याहृत घेणें हा दुसरा दोष; "जीर्णानि" ह्या विशेषणाचा प्रसिद्ध अर्थ न करितां दुसरा करणें हा तिसरा दोष; कोणत्याही शरीराचा नाश होण्यास कारणीभूत होत असलेलें युद्ध अत्यंत उपकार करणारें आहे ही गोष्ट मुळावरून सिद्ध होत नाहीं तेव्हां ती ह्या ठिकाणीं सांगितल्याचें गृहीत धरणें हा चवथा दोष व भाष्यकारांच्या पद्धतीनें "अपराणि" ह्या विशेषणाला सार्थकत्व असतांना त्या विशेषणाची अपेक्षा नाहीं अशी कल्पना करून "अपराणीति विशेषणमुत्कर्षातिशयख्यापनार्थं" ह्याप्रकारें त्या विशेषणाची कांहीं तरी वाट लावीत बसणें हा पांचवा दोष. आत्मा विकाररहित कसा ह्याचें प्रतिपादन ह्या दृष्टांतानें केलेलें आहे अशा प्रकारचा मजकूर भाष्याला अनुसरून आनंदगिरिप्रभृति प्राचीन टीकाकारांनीं लिहिला आहे ह्मणून मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाच्याच टीकेमध्यें "अनेन दृष्टान्तेनाविक्रुतत्वप्रतिपादनमात्मनः क्रियत इति तु प्राचां व्याख्यानमतिस्पष्टम्" (ह्मणजे ह्या दृष्टांतानें आत्म्याचें विकारराहित्य प्रतिपादन केलें आहे असें प्राचीन टीकाकारांचें व्याख्यान तर अतिच उथळ आहे.) असें लिहून त्या टीकाकारांवर कटाक्ष दर्शविला आहे तोही व्यर्थ आहे. कारण पूर्वींचें व पुढलें प्रकरण पाहिलें असतां आत्म्याच्या अविक्रियत्वाचेंच प्रतिपादन त्यामध्यें केलेलें आहे असें मुळावरूनही स्पष्ट दिसत आहे. शिवाय, ह्या श्लोकांत "देही" असें पद असून त्याचाच परामर्श पुढल्या ह्मणजे "नैनं छिन्दन्ति शस्त्राणि० मारुतः" ह्या श्लोकांतील "एनं" ह्या सर्वनामानें होत आहे व त्याचप्रमाणें त्या "एनं" पदाचें व्याख्यान "एनं प्रकृतं देहिनं" असें भाष्यकारांनीं केलें आहे; इतकेंच नव्हे परंतु,

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥

---

कस्माद‍विक्रिय एवेत्याह नैनं छिन्दन्ति० मारुतः ॥२३॥ नैनं प्रकृतं देहिनं छिन्दन्ति शस्त्राणि निरवयवत्वान्नावयवविभागं कुर्वन्ति शस्त्राण्यस्यादीनि तथा नैनं दहति पावकोऽग्निरपि न भस्मीकरोति तथा नैनं क्लेदयन्त्यापः। अपां हि सावयवस्य वस्तुन आर्द्रीभावकरणेनावयवविश्लेषापादने सामर्थ्यं न

---

मधुसूदनसरस्वतींनींही "वासांसि ०देही" ह्या श्लोकाचें व्याख्यान आपल्या पूर्वींच्या व्याख्यानाला अनुसरून "एनं प्रकृष्टधर्मानुष्ठातृदेहवन्तं भीष्मादि" असें न करितां " एनं प्रकृतमात्मानं " असेंच केलें आहे. सारांश, " वासांसि० देही " ह्या श्लोकाचा मधसूदनसरस्वतींनीं जो भाष्यविरुद्ध आशय काढिला आहे तो बहुदोषांनीं ग्रस्त असल्यामुळें सर्वथा अग्राह्य असून श्रीभाष्यकारांनींच केलेलें व्याख्यान सर्वोत्कृष्ट व निर्दोष असल्यामुळें सर्वस्वीं ग्राह्य आहे २२ ).

ह्या आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत, अग्नि दग्ध करीत नाहीं, उदक भिजवीत नाहीं आणि वायुही शुष्क करीत नाहीं ॥ २३ ॥

आत्मा अविक्रियच कसा ह्मणून शंका येईल तर " नैनं छिन्दन्ति० मारुतः " ह्या श्लोकानें तिचें निराकरण करितात. ह्याला ह्मणजे ज्याच्याविषयीं प्रकरण चाललें आहे त्या देहधारी आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत; ह्मणजे आत्मा अवयवरहित असल्यामुळें खड्गप्रभृति शस्त्रें त्याच्या अवयवांचे वेगळे वेगळे तुकडे पाडण्यास समर्थ होत नाहींत. त्याचप्रमाणें पावकही त्याला दग्ध करीत नाहीं ह्मणजे अग्निसुद्धां ह्याचें भस्म करीत नाहीं. तसेंच उदक ह्याला ( भिजवून ) शिथिल करीत नाहीं. कारण, ज्या वस्तूला अवयव असतात ती वस्तु भिजवून तिचे अवयव वेगळे करण्याविषयीं उदकाचें सामर्थ्य असतें. तेव्हां तें उदकाचें सामर्थ्य

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥

---

तन्निरवयव आत्मनि संभवति । तथा स्नेहवद्द्रव्यं स्नेहशोषणेन नाशयति वायुरेनं त्वात्मानं न शोषयति मारुतोपि ॥ २३ ॥

यत एवं तस्मादच्छेद्योऽयं० सनातनः ॥ २४ ॥ यस्माद-

---

अवयवरहित अशा आत्माचे ठिकाणीं चालण्याचा संभव नाहीं. असो. त्याचप्रमाणें ज्या पदार्थांत स्निग्धता असेल त्या पदार्थाचा, त्यांतील स्निग्धतेचें शोषण करण्यानें वायूला, नाश करितां येतो. परंतु, ह्या आत्म्याला वायु देखील शोषून टाकण्यास समर्थ होत नाहीं २३.

(पृथ्वी, अप्, तेज आणि वायु हीं चारीं महाभूतें आत्म्याचे ठिकाणीं विकार उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहींत हें ह्या श्लोकांत दर्शविलें आहे. शस्त्रें ह्याला छेदन करण्यास समर्थ होत नाहींत असें ह्मणण्याचा आशय—पंच महाभूतांपैकीं पृथ्वी ह्या आत्म्याला विकार करण्यास समर्थ होत नाहीं—असा आहे. अप्, तेज व वायु ह्या भूतांचा उल्लेख "पावकः" "आपः" आणि "मारुतः" ह्या पदांनीं स्पष्ट केले-लाच आहे. पृथ्वी, अप्, तेज आणि वायु ह्या चारच महाभूतांची नाश करण्याबद्दल प्रसिद्धि असल्यामुळें त्यांचाच उल्लेख ह्या श्लोकांत केला आहे; आकाशाचा केला नाहीं. असो.—ज्याअर्थी पृथिव्यादि महाभूतें आत्म्याला आपल्या आटोक्यांत आणण्यास समर्थ होत नाहींत त्याअर्थी आकाशाप्रमाणें तो आत्मा विकाररहित असणें योग्यच आहे.—हा ह्या श्लोकाचा आशय होय २३ ).

ह्या आत्म्याचा छेद अथवा दाह होणें अशक्यच असून हा आर्द्र होऊन शिथिल होणें किंवा शुष्क होऊन जाणेंही अशक्यच आहे आणि ह्मणूनच हा नित्य, सर्वगत, स्तंभाप्रमाणें स्थिर, अचल व सनातन आहे॥२४॥

ज्याअर्थी शस्त्रादिक आत्म्याला छिन्न वगैरे करण्यास समर्थ होत

न्योन्यनाशहेतूनि भूतान्येनमात्मानं नाशयितुं नोत्सहन्ते तस्मान्नित्यो नित्यत्वात्सर्वगतः सर्वगतत्वात्स्थाणुः स्थाणुरिव स्थिर इत्येतत् । स्थिरत्वादचलोयमात्मातःसनातनश्चिरंतनो न कारणात्कुतश्चिन्निष्पन्नोभिनव इत्यर्थः । नैतेषां श्लोकानां पौनरुक्त्यं चोदनीयम् । यत एकेनैव श्लोकेनात्मनो नित्यत्वमविक्रियत्वं चोक्तं न जायते म्रियते वेत्यादिना तत्र यदेवात्मविषयं किंचिदुच्यते तदेतस्माच्छ्लोकार्थान्नातिरिच्यते किंचिच्छब्दतःपुनरुक्तं किंचिदर्थत इति दुर्बोधत्वादात्मवस्तुनः

---

नाहींत त्याअर्थी हा आत्मा अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य आणि अशोष्य आहे व ज्याअर्थी एकमेकांच्या नाशास कारणीभूत होणारीं भूतें ह्याप्रमाणें आत्म्याचा नाश करण्यास समर्थ होत नाहींत (ह्मणजे पृथिवीविकाररूप तलवारीनें वगैरे ह्याचा छेद व अग्नीनें दाह होणें शक्य नसून उदाकानें आर्द्रता येऊन हा शिथिल होणें अथवा वायूनें शुष्क होऊन जाणें शक्य नाहीं ) त्याअर्थी हा नित्य आहे; नित्य असल्यामुळें सर्वगत आहे, सर्गगत ( ह्मणजे सर्व ठिकाणीं परिपूर्ण ) असल्यामुळें स्थाणूप्रमाणें स्थिर आहे; स्थिर असल्यामुळें हा आत्मा अचल आहे आणि अचल असल्यामुळें सनातन ह्मणजे अनादि आहे. कोणत्याही कारणापासून नवीन निष्पन्न न झालेला असा “ सनातन ” ह्या विशेषणाचा अर्थ होय. आतां “ न जायते म्रियते वा ” ह्या एकाच श्लोकानें आत्म्याचें नित्यत्व व अविक्रियत्व प्रतिपादित केलें असून “ वेदाविनाशिनं० कम् ” वगैरे श्लोकांमध्यें जें कांहीं आत्म्यासंबंधानें सांगितलें आहे तें “ न जायते ” ह्या श्लोकाच्या अर्थापेक्षां अधिक कांहीं सांगितलें नाहीं. त्याचीच पुनरुक्ति कोठें शब्ददृष्ट्या व कोठें अर्थदृष्ट्या वेदाविनाशिनं० कम् ” वगैरे श्लोकांमध्यें केलेली आढळते. ह्मणून ह्या श्लोकांवर पुनरुक्ति दोष येतो ” असें समजूं नये.

**पुनः पुनः प्रसङ्गमापाद्यापाद्य शब्दान्तरेण तदेव वस्तु निरूपयति भगवान्वासुदेवः कथं नु नाम संसारिणां बुद्धिगोचरमापन्नं सदव्यक्ततत्त्वं संसारनिवृत्तये स्यादिति ॥ २४ ॥**

---

कारण, आत्मज्ञान होणें दुर्घट असल्यामुळें "अव्यक्त असलेलें आत्मतत्त्व संसारी पुरुषांच्या बुद्धीला गोचर होऊन त्यांच्या संसारनिवृत्तीला कसें बरें कारणीभूत होईल ?" हा आशय मनांत धरून भगवान् वासुदेव पुनः[1] पुनः ( कसा तरी ) प्रसंग आणआणून तें आत्मनिरूपणच ( "वेदाविनाशिनं० कम्" वगैरे श्लोकांनीं ) करीत आहेत २४.

( अवयवरहित असल्यामुळें शस्त्रादिकांना आत्म्याचा छेद वगैरे करितां येत नाहीं असें आचार्यांनीं भाष्यांत लिहिलें असून मधुसूदनसरस्वतींनीं अंतर्यामिब्राह्मणांतील वगैरे श्रुति देऊन " यो हि शस्त्रादौ न तिष्ठति तं शस्त्रादयश्छिदन्ति । अयं तु शस्त्रादीनां सत्तास्फूर्तिप्रदत्वेन तत्प्रेरकस्तदन्तर्यामी । अतः कथमेनं शस्त्रादीनि स्वव्यापारविषयीकुर्युरित्यभिप्रायः " असा " अच्छेद्योय० सनातनः " ह्या श्लोकाचा आशय काढिला आहे; परंतु, तो बरोबर नाहीं. कारण, " शस्त्रादिकांचे ठिकाणीं जो रहात नाहीं त्याला शस्त्रादिक छिन्न वगैरे करण्यास समर्थ होतात. हा आत्मा शस्त्रादिकांचा प्रेरक व त्यांचा अंतर्यामी असल्यामुळें शस्त्रादिकांना आपआपले व्यापर ह्याच्यावर कसे चालवितां येणार ? " हा जो हेतु त्यांनीं दिलेला आहे तो खरा नाहीं. कारण, शस्त्रादिकांचे ठिकाणीं लोखंड असूनही त्यांच्या योगानें तें लोखंड छिन्न होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. तस्मात्, शस्त्रादिकांचे ठिकाणीं जो नसतो त्यालाच शस्त्रादिक छिन्न वगैरे करितात हें ह्मणणें अयोग्यच ठरतें. दुसरें असें कीं " अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च

---

[1] पुनः पुनः तेंच तेंच निरूपण करण्याविषयीं उत्तर मीमांसेंतील अधिकरण प्रमाण दिलें आहे तें पुढें पहावें.

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

---

किं चाव्यक्तोऽय० मर्हसि ॥ २५ ॥ अव्यक्तः सर्वकरणाविषयत्वान्न व्यज्यत इत्यव्यक्तोऽयमात्मा । अत एवाचिन्त्योऽयं

---

भाषसे । गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः " असा उपक्रम असून " अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः । अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥..वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि । तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही " असे श्लोक मध्यें आहेत व " देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत । तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि " असा उपसंहार आहे. तेव्हां ह्यावरून हें त्वंपदाचें ( ह्मणजे जीवात्म्याचें ) निरूपण चाललें असल्याचें स्पष्ट होत असतांना ह्या प्रकरणांतील ह्या श्लोकाचा आशय अंतर्यामिप्रतिपादक श्रुतींवरून काढणें अयोग्य आहे. शिवाय, गीताशास्त्रांतील पहिलें षट्क त्वंपदार्थनिरूपणपर आहे असें सर्व टीकाकारांनीं सांगितलें आहे इतकेंच नव्हें परंतु, प्रत्यक्ष मधुसूदनसरस्वतींनींही " कर्मोपास्तिस्तथा ज्ञानमिति काण्डत्रयं क्रमात् । तद्रूपाष्टादशाध्यायैर्गीता काण्डत्रयात्मिका ॥ एकमेकेन षट्केन काण्डमत्रोपलक्षयेत्... तत्र तु प्रथमे काण्डे कर्मतत्त्यागवर्त्मना । त्वंपदार्थो विशुद्धात्मा सोपपत्तिर्निरूप्यते ॥ " असें प्रारंभीं लिहिलें आहे. तस्मात्, श्रीभाष्यकारांनीं, आत्म्याचा शस्त्रांनीं छेद न होण्यास अवयवराहित्य, हें जें कारण दिलें आहे तेंच योग्य असून त्यांनीं केलेलेंच व्याख्यान उत्कृष्ट आहे २४ )

हा आत्मा अव्यक्त, अचिंत्य व अविकार्य असल्याचें ह्मटलें आहे. तस्मात्, ह्याप्रमाणें ह्याला जाणिल्यावर शोक करणें तुला योग्य नाहीं ॥ २५॥

कोणत्याच इंद्रियाला हा आत्मा गोचर होत नसल्यामुळें तो दृष्टोत्पत्तीस येत नाहीं ह्मणून त्याला अव्यक्त असें ह्मटलें आहे आणि

**यद्धीन्द्रियगोचरं वस्तु तच्चिन्ताविषयमापद्यतेयं त्वात्मानिन्द्रियगोचरत्वादचिन्त्यः । अविकार्योयं यथा क्षीरं दध्यातञ्चनादिना विकारि न तथायमात्मा । निरवयवत्वाच्चाविक्रियो न हि निरवयवं किंचिद्विक्रियात्मकं दृष्टम् । अविक्रियत्वादविकार्योयमात्मोच्यते । तस्मादेवं यथोक्तप्रकारेणैनमात्मानं विदित्वा त्वं नानुशोचितुमर्हसि हन्ताहमेतेषां मयेमे हन्यन्त इति ॥२५॥**

---

ह्मणूनच ह्याला अचिंत्य ह्मणत असतात. कारण, जी वस्तु इंद्रियांना गोचर असते तिचें चिंतन होण्याचा संभव असतो. हा आत्मा तर इंद्रियांना गोचर होत नसल्यामुळें अचिंत्य आहे. " अविकार्योयं " ह्याचा अर्थ असा:—ज्याप्रमाणें विरजणानें वगैरे दुधाचा दही हा विकार होतो त्याचप्रमाणें आत्मा अवयवरहित असल्यामुळें तो अविकार्य आहे ह्मणजे त्याचे ठिकाणीं कसलीही विक्रिया होत नाहीं. कारण ( ज्याला अवयव नाहींत त्याचे ठिकाणीं कसलीही विक्रिया ह्मणजे स्वरूपभेद होत असल्याचें दृष्ट नाहीं. सारांश, ) विक्रियात्मक असून निरवयव अशी कोणतीही वस्तु दृष्ट नाहीं. तस्मात्, अविक्रिय असल्यामुळें ह्या आत्म्याला अविकार्य असें ह्मणतात. ह्यास्तव, वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारानें आत्मा अविक्रिय असल्याचें जाणिल्यानंतर " मी ह्याचा वध करणारा व माझ्या हातून ह्याचा वध होत आहे " ह्मणून शोक करणें तुला योग्य नाहीं २५.

( आत्मज्ञान होणें दुर्घट असल्यामुळें फिरून फिरून प्रसंग आणआणून भगवानांनीं अर्जुनाला त्याचें निरूपण केलें आहे असें ह्मणून आचार्यांनीं पुनरुक्तिदोष येत नाहीं असें सिद्ध केलें आहे. तें उगीच कांहीं तरी लिहून सिद्ध केलेलें नाहीं. तें लिहिणें सप्रमाण कसें हें समजण्यास उत्तरमीमांसेंतील एक अधिकरण समजणें अवश्य असल्यामुळें सदहू अधिकरणांतील सूत्रें पुढें दिलीं असून त्या सूत्रांवरील आचार्यांचें भाष्यही मराठी तात्पर्यासह त्यांबरोबरच पुढें दिलें आहे. )

# आवृत्तिरसकृदुपदेशात् ॥ १ ॥

तृतीयेऽध्याये परापरासु विद्यासु साधनाश्रयो विचारः प्रायेणात्यगात्। अथेह चतुर्थे फलाश्रय आगमिष्यति। प्रसङ्गागतं चान्यदपि किंचिच्चिन्तयिष्यते। प्रथमं तावत्कतिभिश्चिदधिकरणैः साधनाश्रयविचारशेषमेवानुसरामः। आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः। तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत। सोन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्य इति चैवमादिश्रवणेषु संशयः किं सकृत्प्रत्ययः कर्तव्य आहोस्विदावृत्त्येति। किं तावत्प्राप्तं सकृत्प्रत्ययः स्यात्प्रयाजादिवत्। तावता शास्त्रस्य कृतार्थत्वात्। अश्रूयमाणायां ह्यावृत्तौ क्रियमाणायामशास्त्रार्थः कृतो भवेत्। नन्वसकृदुपदेशा

---

तिसऱ्या अध्यायामध्यें परापरसंज्ञक विद्यांविषयीं (ह्मणजे ज्ञान व कर्मे ह्यांविषयीं) साधनसंबंधीं विचार प्रायः होऊन गेला. त्यानंतर आतां ह्या चवथ्या अध्यायामध्यें फलसंबंधीं विचार येईल आणि प्रसंगोपात्त कांहीं दुसऱ्या प्रकरणाचाही विचार करण्यांत येईल. पैकीं प्रथमतः तर कांहीं अधिकरणांमध्यें अवशिष्ट राहिलेल्या विद्यासाधनाविषयींच विचार आह्मांला कर्तव्य आहे. "आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः"। "तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत"। "सोन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः'। इत्यादि श्रुतिपठित वाक्यांविषयीं श्रवण वगैरे एकदांच करावें—किंवा वारंवार करावें—असा संशय येतो. तेव्हां सकृद्दर्शनीं तर प्रयाजादिकांप्रमाणें श्रवण वगैरे एकदांच करावें असें सिद्ध होतें. कारण, तेवढ्यानेंच त्या श्रवणादिविधायक शास्त्राचें सार्थक्य होतें. नाहीं तर श्रवण वगैरे वारंवार करावें असें शास्त्रांत सांगितलें नसतांनाच तें करूं लागल्यास शास्त्रांत न

उदाहृताः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य इत्येवमादयः । एवमपि यावच्छब्दमावर्तयेत्सकृच्छ्रवणं सकृन्मननं सकृन्निदिध्यासनं चेति नातिरिक्तम् । सकृदुपदेशेषु तु वेदोपासीतेत्येवमादिष्वनावृत्तिरिति ॥ एवं प्राप्ते ब्रूमः । प्रत्ययावृत्तिः कर्तव्या । कुतः । असकृदुपदेशात् । श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य इत्येवंजातीयको ह्यसकृदुपदेशः प्रत्ययावृत्तिं सूचयति । ननूक्तं यावच्छब्दमेवावर्तयेन्नाधिकमिति । न । दर्शनपर्यवसानत्वादेषाम् । दर्शनपर्यवसानानि हि श्रवणादीन्यावर्त्यमानानि दृष्टार्थानि भवन्ति । यथावघातादीनि तण्डु-

---

सांगितलेली गोष्ट केल्यासारखें होईल. अहो, पण " श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः " इत्यादि प्रकारें अनेक वेळां श्रुतीमध्यें सांगितलें आहे. हो, सांगितलें असलें ह्मणून काय झालें ? परंतु, जेवढें सांगितलें असेल तेवढेंच करावें; ह्मणजे " श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः " ह्या श्रुतीचा अर्थ—एकदां श्रवण, एकदां मनन व एकदां निदिध्यास असा आहे. अनेक वेळां श्रवण वगैरे करावें असा अर्थ नव्हे वेद, उपासीत इत्यादि प्रकारें एकेकदांच ज्या ठिकाणीं उल्लेख केलेला आहे त्या ठिकाणीं तर उपासनेची वगैरे आवृत्ति नाहींच. ह्याप्रमाणें पूर्वपक्षानें प्राप्त झालें असतां आह्मी आतां ह्या पूर्वपक्षाला उत्तर देतों. श्रवण, मनन वगैरे पुनः पुनः करावें. कां ? ह्मणशील तर श्रवण वगैरे करण्याविषयीं " श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः " इत्यादि प्रकारें जें अनेक वेळां श्रुतीमध्यें सांगितलेलें आहे तें श्रवण वगैरे वारंवार करावें असें सुचवितें. आतां " जेवढ्याची आवृत्ति करावयास सांगितली असेल तेवढ्याचीच करावी अशी—श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः—इत्यादि प्रकारच्या उक्तींची वाट लागली आहे " ह्मणून ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण, हीं श्रवण, मनन वगैरे कृत्यें

**लादिनिष्पत्तिपर्यवसानानि हि तद्वत् । अपि चोपासनं निदिध्यासनं चेत्यन्तर्णीतावृत्तिगुणैव क्रियाभिधीयते । तथा हि लोके गुरुमुपास्ते राजानमुपास्त इति च यस्तात्पर्येण गुर्वादीननुवर्तते स एवमुच्यते । तथा ध्यायति प्रोषितनाथा पतिमिति या निरन्तरस्मरणा पतिं प्रति सोत्कण्ठा सैवमभि-**

---

फलप्राप्तीपर्यंत फिरून फिरून केलीं पाहिजेत; ह्मणजे फलप्राप्ति हें श्रवणादिकांचें पर्यवसान होय. कारण, ज्याप्रमाणें कंडणप्रभृति कर्में तांदूळ वगैरे होईपर्यंत केलीं असतां सफल होतात त्याचप्रमाणें श्रवणादिक कर्में सुद्धां फलप्राप्तीपर्यंत केलीं तरच सार्थक होतात. (नाहीं तर तीं निरर्थक आहेत. सारांश,) कंडणप्रभृति कर्मांचें पर्यवसान ज्याप्रमाणें तांदूळ वगैरे होणें हें होय त्याचप्रमाणें श्रवणमननादिकांचें पर्यवसान आत्मसाक्षात्कार होणें हें होय. शिवाय, उपासना आणि निदिध्यास हे शब्द एकेक वेळच क्रिया घडत असल्यास लागत नाहींत. परंतु, ह्या शब्दांच्या प्रयोगांना मनामध्यें एकसारखी ती क्रिया फिरून फिरून घडणें अवश्य असतें. व्यवहारामध्येंही गुरु, राजा, इत्यादिकांच्या उपासनेमध्यें ( ह्मणजे सेवेमध्यें ) च जो अगदीं गढून गेलेला असतो त्यालाच " हा गुरूची उपासना करितो, हा राजाची उपासना करितो " असें ह्मणत असतात. ( ज्यानें फक्त एकदांच राजाची अथवा गुरूची आज्ञा मान्य करून सेवा केली असेल त्याला गुरूपासक अथवा राजसेवक ह्मणण्याचा प्रघात नाहीं ). त्याचप्रमाणें पति गांवास गेलेली स्त्री पतीचा निदिध्यास घेऊन बसली आहे असें जें व्यवहारामध्यें ह्मणत असतात तें तरी पतीला पहाण्याविषयीं अगदीं उत्सुक होऊन ज्या स्त्रीला पतीचें स्मरण निरंतर होत असतें त्या स्त्रीविषयींच ह्मणत असतात. ( जिला फक्त एकदांच पतीचें स्मरण झालें असेल तिच्याविषयीं " हिला पतीचा निदिध्यास लागला आहे " असें

धीयते । विद्युपास्त्योश्च वेदान्तेष्वव्यतिरेकेण प्रयोगो दृश्यते। क्वचिद्विदिनोपक्रम्योपासिनोपसंहरति यथा यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इत्यत्र नु म एतां भगवो देवतां शाधि यां देवतामुपास्स इति । क्वचिच्चोपासिनोपक्रम्य विदिनोपसंहरति यथा मनो ब्रह्मेत्युपासीतेत्यत्र भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेदेति । तस्मात्सकृदुपदेशेष्वप्या-

---

ह्मणण्याचा प्रघात नाहीं. ) आतां वेद, उपासीत इत्यादि ठिकाणीं तर पुनरावृत्ति नाहींच नाहीं असें जें पूर्वीं तूं ह्मणालास तेंही बरोबर नाहीं. कारण, वेदांतामध्यें विद् आणि उपोपसर्गपूर्वक आस् ह्या धातूंचा प्रयोग कांहीं भेद न करितां ( हवा तसा ) केलेला आढळण्यांत येतो. कांहीं ठिकणीं वेदांतामध्यें उपक्रमाला विद् ह्या धातूचा प्रयोग केलेला असून उपसंहाराला उपास् ह्या धातूचा प्रयोग केलेला असतो. उदाहरणार्थः—( छांदोग्योपनिषदामध्यें ) “ यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्तः ” ह्या ठिकाणीं उपक्रमप्रसंगीं विद् ह्या धातूचा प्रयोग केलेला आहे व “ नु म एतां भगवो देवतां शाधि यां देवतामुपास्से ” ह्या ठिकाणीं उपसंहारसमयीं उपास् ह्या धातूचा प्रयोग केलेला आहे. त्याचप्रमाणें कांहीं ठिकाणीं उपोपसर्गपूर्वक आस् ह्या धातूचा प्रयोग उपक्रमस्थानीं असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत असून विद् ह्या धातूचा प्रयोग उपसंहारस्थानीं असल्याचें आढळण्यांत येतें. उदाहरणार्थः—( छांदोग्योपनिषदामध्येंच ) “ मनोब्रह्मेत्युपासीत ” ह्या ठिकाणीं उपक्रमप्रसंगीं उपोपसर्गपूर्वक आस् ह्या धातूचा प्रयोग असून “ भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ” ह्या ठिकाणीं उपसंहारसमयीं विद् ह्या धातूचा प्रयोग आढळण्यांत येतो. तस्मात् वेद, उपासीत इत्यादि प्रकारें एकेकदांच ज्या ठिकाणीं उल्लेख केलेला आहे त्या ठिकाणीं सुद्धां क्रियेची पुनः पुनः आवृत्ति अवश्य असल्याचें सिद्ध

# लिङ्गाच्च ॥ २ ॥

वृत्तिसिद्धिः । असकृदुपदेशस्त्वावृत्तेः सूचकः ॥ १ ॥

लिङ्गमपि प्रत्ययावृत्तिं प्रत्याययति । तथा ह्युद्गीथविज्ञानं प्रस्तुत्यादित्य उद्गीथ इत्येतदेकपुत्रतादोषेणापोह्य रश्मींस्त्वं पर्यावर्तयादिति रश्मिबहुत्वविज्ञानं बहुपुत्रतायै विदधत्सिद्धव-त्प्रत्ययावृत्तिं दर्शयति । तत्सामान्यात्सर्वप्रत्ययेष्वावृत्तिसिद्धिः ।

आहे आणि "श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः" असा अनेकवेळां श्रुतीमध्यें असलेला उल्लेख तर श्रवणादि क्रियांच्या पुनरावृत्तीचा सूचक आहेच आहे ॥ १ ॥

लिंगावरूनही श्रवणमननादिकांची पुनः पुनः आवृत्ति करावी असें होत आहे. तें कसें तें पहा. उद्गीथविज्ञानाचा उपक्रम करून "आदित्य उद्गीथः" ह्याचें अवलंबन केलें असतां एकच पुत्र होतो; तेव्हां ह्या दोषाकरितां एकट्या आदित्याचेंच अवलंबन उद्गीथामध्यें न करितां रश्मिबहुत्वविज्ञान स्वीकारिलें तर पुष्कळ पुत्र होण्याला तें कारणी-भूत होतें असें सांगून प्रत्ययावृत्ति सिद्धवतच श्रुतीमध्यें दर्शविली आहे. ( सारांश, हे पुत्रा, सूर्य आणि सूर्यकिरणें ह्यांची तूं भिन्नत्वानें उपासना कर. कारण, एका सूर्याचेच ठिकाणीं उद्गीथदृष्टि करून मी उद्गीथोपा-सना केल्यामुळें मला तूं एकच पुत्र झाला आहेस. करितां, तूं रश्मीचें अवलंबन करून उद्गीथोपासना कर; ह्मणजे तुला पुष्कळ पुत्र होतील." अशा आशयाची श्रुति असल्यामुळें ह्मणजे आदित्यरूप उद्गीथ आहे असें न समजतां आदित्याचीं जीं असंख्य किरणें तद्रूप उद्गीथ आहे असें मनामध्यें घोळत असावें असें सांगितलें असल्यामुळें प्रत्ययावृत्ति ठरीव असल्याप्रमाणेंच दर्शविल्याचें सिद्ध होत आहे. कारण, पर्यावर्तयात् असें प्रत्यक्ष पदच श्रुतीमध्यें आहे. पर्यावर्तयात्=पर्यावर्तयतात्=पर्यावर्तनं कुरु. ( असंख्य किरणेंच उद्गीथरूप आहेत असें फिरून फिरून मनामध्यें

अत्राह । भवतु नाम साध्यफलेषु प्रत्ययेष्वावृत्तिः । तेष्वावृत्तिसाध्यस्यातिशयस्य संभवात् । यस्तु परब्रह्मविषयः प्रत्ययो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावमेवात्मभूतं परं ब्रह्म समर्पयति तत्र किमर्थावृत्तिरिति । सकृच्छ्रुतौ च ब्रह्मात्मत्वप्रतीत्यनुपपत्तेरावृत्त्यभ्युपगम इति चेन्न । आवृत्तावपि तदनुपपत्तेः । यदि हि तत्त्वमसीत्येवंजातीयकं वाक्यं सकृ-

---

आणणें ही प्रत्ययावृत्ति होय. ) तस्मात्, उद्गीथप्रत्ययाचेंच साक्षात्कारफल या नात्यानें अथवा ध्यान ह्या नात्यानें सर्वांचे ठिकाणीं साहृश्य असल्यामुळें श्रवणादि सर्व प्रत्ययांविषयीं आवृत्ति उक्त असल्याचें सिद्ध आहे. ह्यावर पूर्वपक्षीच्या बाजूनें अशी शंका येते:—सविशेषब्रह्मसाक्षात्कार हें अहंग्रहोपासनांचें फल आहे आणि निर्विशेषब्रह्मसाक्षात्कार हें श्रवणादिकांचें फल आहे. तेव्हां ज्यांचें फल साध्य करून घ्यावयाचें आहे अशा अहंग्रहोपासनादिप्रत्ययांचे ठिकाणीं आवृत्ति असणें हें ठीक आहे. कारण, प्रत्ययांच्या पुनरावृत्तीनेंच त्या ठिकाणीं उत्कृष्ट फलप्राप्तीचा संभव असतो. परंतु, ( परब्रह्मविषयक जो प्रत्यय ह्मणजे ) परब्रह्मविषयक जें ज्ञान नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त असें परब्रह्म आपणच आहोंत असा साक्षात्कार करून देतें त्या ज्ञानाविषयीं आवृत्ति कशाकारितां ? कारण, निर्गुण ब्रह्माचा अपरोक्ष साक्षात्कार कांहीं नवीन साध्य होणारा नसतो. तें नित्यच अपरोक्ष आहे. ह्मणून नित्य असलेलाच जो अपरोक्षानुभव त्याविषयीं श्रवणमननादिकांची पुनः पुनः आवृत्ति निरर्थक आहे. आतां " ब्रह्म जरी नित्य अपरोक्ष असलें तरी तेवढ्यानें अविद्येचा नाश होत नसल्यामुळें मी ब्रह्म आहें अशी ब्रह्मात्मत्वप्रतीति एकदम होत नाहीं; ह्मणून त्याकरितां श्रवणमननादिकांची आवृत्ति स्वीकारिली पाहिजे " असें ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण, आवृत्ति करून तरी ब्रह्मात्मत्वप्रतीति होण्याचा संभव नाहींच. अहो " तत्त्वमसि " अशा

च्छ्रूयमाणं ब्रह्मात्मत्वप्रतीतिं नोत्पादयेत्ततस्तदेवावर्त्यमान-मुत्पादयिष्यतीति का प्रत्याशा स्यात् । अथोच्यते न केवलं वाक्यं कंचिदर्थं साक्षात्कर्तुं शक्नोत्यतो युक्त्यपेक्षं वाक्यम-नुभावयिष्यति ब्रह्मात्मत्वमिति तथाप्यावृत्त्यानर्थक्यमेव । सापि हि युक्तिः सकृत्प्रवृत्तैव स्वमर्थमनुभावयिष्यति । अथापि स्याद्युक्त्या वाक्येन च सामान्यविषयमेव विज्ञानं क्रियते न विशेषविषयं यथास्ति मे हृदये शूलमित्यतो वाक्या-द्गात्रकम्पादिलिङ्गाच्च शूलसद्भावसामान्यमेव परः प्रतिपद्यते न विशेषमनुभवति यथा स एव शूली विशेषानुभवश्चावि-

---

प्रकारचें वाक्य एकदां श्रुत होऊं लागलें असतां तें जर ब्रह्मात्मत्वप्रतीति करण्यास ह्मणजे आपणच ब्रह्म आहोंत असा प्रत्यक्ष साक्षात्कार उत्पन्न करण्यास समर्थ होत नसेल तर त्याच वाक्याची पुनः पुनः आवृत्ति होऊं लागली असतां ब्रह्मात्मत्वप्रतीति उत्पन्न करण्यास तें समर्थ होतें ह्या आशेला काय ह्मणावें ? आतां " केवल ' तत्त्वमसि ' वगैरे वाक्यानें कोणताच साक्षात्कार होणें शक्य नाहीं; करितां, ब्रह्मा-त्मत्वाचा साक्षात्कार करून देण्यास ' तत्त्वमसि ' वगैरे वाक्याला युक्तीची अपेक्षा आहे. तस्मात्, युक्तिसहित तत्त्वमसिप्रभृति वाक्य ब्रह्मात्मत्व-साक्षात्कार उत्पन्न करील " असें ह्मणाल तरी सुद्धां पुनरावृत्तीला व्यर्थत्व आहेच आहे. कारण, ज्या युक्तीची वाक्याला अपेक्षा अस-णार ती युक्ति तरी एकदां योजिल्यानेंच आपल्या अर्थाचा साक्षात्कार करून देईल. आतां " माझ्या हृदयांत शूळ उठला आहे " असें एकाद्यानें सांगितलें असतां त्याच्या त्या सांगण्यावरून आणि शरीर-कंपप्रभृति शूलसूचक चिन्हांवरून " ह्याच्या हृदयांत शूळ आहे " इतकें सामान्यच ज्ञान दुसऱ्याला होतें; त्या प्रत्यक्ष शूळवाल्याला जसा विशेष अनुभव येत असतो तसा अनुभव तिऱ्हाइताला येत नाहीं.

द्याया निवर्तकस्तदर्थावृत्तिरिति चेन्न । असकृदपि तावन्मात्रे क्रियमाणे विशेषविज्ञानोत्पत्त्यसंभवात् । न हि सकृत्प्रयुक्ताभ्यां शास्त्रयुक्तिभ्यामनवगतो विशेषः शतकृत्वोऽपि प्रयुज्यमानाभ्यामवगन्तुं शक्यते । तस्माद्यदि शास्त्रयुक्तिभ्यां विशेषः प्रतिपाद्यते यदि वा सामान्यमेवोभयथापि सकृत्प्रवृत्ते एव ते स्वकार्यं कुरुत इत्यावृत्त्यनुपयोगः । न च सकृत्प्रयुक्ते शास्त्रयुक्ती कस्यचिदप्यनुभवं नोत्पादयत इति शक्यते नियन्तुं विचित्रप्रज्ञत्वात्प्रतिपत्तॄणाम् । अपि चानेकांशोपेते

---

करितां, युक्तीनें आणि वाक्यानें सामान्यविषयकच ज्ञान होतें; विशेषविषयक ज्ञान होत नाहीं आणि विशेषानुभव हा अविद्येचा निवर्तक आहे. तस्मात्, त्याकरितां श्रवणमननादिकांची पुनः पुनः आवृत्ति अवश्य आहे '' असें ह्मणाल तर तेंही योग्य नाहीं. कारण, जें एकदां केलें असतां विशेष ज्ञान उत्पन्न होत नाहीं तें तेवढेंच अनेक वेळां केल्यानेंही विशेष ज्ञान उत्पन्न होण्याचा संभव नाहींच. सारांश, शास्त्र आणि युक्ति ह्यांची योजना एकदां झाली असतां जी गोष्ट विशेषतः समजली नाहीं ती शेंकडों वेळां शास्त्र व युक्ति ह्यांचा उपयोग केल्यानेंही समजणें शक्य नाहींच. तस्मात्, शास्त्र आणि युक्ति ह्यांच्या योगानें विशेष ज्ञान होत असो किंवा सामान्य ज्ञान होत असो जें होत असेल तें शास्त्र व युक्ति हीं एकदांच योजिल्यानें होणार हें उघड आहे आणि ह्मणूनच त्याकरितां पुनः पुनः आवृत्ति करणें निरुपयोगी आहे. शिवाय, शास्त्र आणि युक्ति ह्यांचा एकदांच उपयोग केला असतां कोणत्याही पुरुषाचे ठिकाणीं ब्रह्मात्मानुभव उत्पन्न करण्यास तीं समर्थ होत नाहींत असा नियम मानितां येणार नाहीं. कारण, समजून घेणाऱ्या पुरुषांच्या बुद्धिवैचित्र्यामुळें कदाचित् कोणाला सकृद्दर्शनीच शास्त्र आणि युक्ति ह्यांच्या योगानें ब्रह्मात्मानुभव होणें संभवनीय आहे.

लौकिके पदार्थे सामान्यविशेषवत्येकेनावधानेनैकमंशमव-धारयत्यपरेणापरमिति स्यादप्यभ्यासोपयोगो यथा दीर्घप्र-पाठकग्रहणादिषु । न तु निर्विशेषे ब्रह्मणि सामन्यविशेषरहिते चैतन्यमात्रात्मके प्रमोत्पत्तावभ्यासापेक्षा युक्तेति । अत्रोच्यते भवेदावृत्त्यानर्थक्यं तं प्रति यस्तत्त्वमसीति सुकृदुक्तमेव ब्रह्मा-त्मत्वमनुभवितुं शक्नुयात् । यस्तु न शक्नोति तं प्रत्युपयुज्यत एवावृत्तिः । तथा हि च्छान्दोग्ये तत्त्वमसि श्वेतकेतो इत्यु-

---

शिवाय, सामान्य आणि विशेष असें भाग ज्यांमध्यें आहेत व अनेक अंशानीं जो युक्त आहे अशा एकाद्या लौकिक पदार्थासंबंधानें ज्ञान करून घेणें असल्यास एका अवधानानें एक अंश समजत असून दुसऱ्या अवधानानें दुसरा अंश समजला जातो. तेव्हां अशा ठिकाणीं क्रियेच्या पुनरावृत्तीचा उपयोग आहे. उदाहरणार्थः— मोठा प्रपाठक वगैरे पाठ करावयाचा असल्यास पठणाच्या आवृत्तीचा उपयोग होतो ( कारण, प्रपाठकामध्यें अथवा अध्यायामध्यें अनुवाक, वर्ग, खंडें, ऋचा, दशक, पंनासा इत्यादि अनेक अंश असतात. तेव्हां एकदां अवधानपूर्वक पठण केल्यानें ह्यांतील एक अंश लक्ष्यांत राहत असून पुनरपि अवधानपूर्वक पठण केलें असतां दुसरा अंश लक्ष्यांत ठेवितां येतो. ) परंतु, सामान्य व विशेष हा भेद ज्या ठिकाणीं मुळींच नाहीं अशा केवळ चैतन्यमय असलेल्या निर्विशेष ब्रह्माविषयीं ज्ञान उत्पन्न कर-ण्यास श्रवणमननादिकांच्या आवृत्तीची अपेक्षा असणें योग्य नाहीं. ह्या पूर्वपक्षाला आतां उत्तर देतों. आवृत्ति निरर्थक होईल. परंतु, ती कोणाला ? " तत्त्वमसि " येवढा एकदां उच्चार झाल्याबरोबर ज्याला ब्रह्मात्मत्वाचा ( ह्मणजे मी ब्रह्म आहें असा ) अनुभव येणें शक्य असेल त्याच्या संबंधानें श्रवणमननादिकांची आवृत्ति निरर्थक होईल. परंतु, एकदांच उच्चारिल्यावर ज्याला ब्रह्मात्मत्वानुभव होणें शक्य

पदिश्य भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति पुनः पुनः परि-
चोद्यमानस्तत्तदाशङ्काकरणं निराकृत्य तत्त्वमसीत्येवासकृदु-
पदिशति । तथा च श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य इत्यादि
दर्शितम् । ननूक्तं सकृच्छ्रुतं चेत्तत्त्वमसिवाक्यं स्वमर्थमनु-
भावयितुं न शक्नोति । तत आवर्त्यमानमपि नैव शक्ष्यतीति ।
नैष दोषः । न हि दृष्टेनुपपन्नं नाम । दृश्यन्ते हि सकृच्छ्रु-
ताद्वाक्यान्मदप्रतीतं वाक्यार्थमावर्तयन्तस्तत्तदाभासव्युदासेन
सम्यक्प्रतिपद्यमानाः । अपि च तत्त्वमसीत्येतद्वाक्यं त्वंपदा-
र्थस्य तत्पदार्थभावमाचष्टे तत्पदेन च प्रकृतं मद्ब्रह्मेक्षितृ जगतो

---

नाहीं त्याकरितां आवृत्तीचा उपयोग आहेच आहे. उदाहरणार्थः—छांदो-
ग्योपनिषदामध्यें "तत्त्वमसि श्वेतकेतो" (ह्मणजे हे श्वेतकेतो, तें
ब्रह्म तूं आहेस) असें सांगितल्यावर "भूय एव मा भगवान्विज्ञाप-
यतु" (ह्मणजे फिरून मला भगवानांनीं तेंच समजून सांगावें) ह्मणून
वारंवार श्वेतकेतु प्रार्थना करूं लागला असतां त्याच्या शंकांच्या कार-
णांचें निराकरण करून "तत्त्वमसि" असाच उपदेश अनेकवेळां
केलेला आहे. त्याचप्रमाणें "श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः"
वगैरें दर्शविलें आहे. अहो, पण "तत्त्वमसि" हें वाक्य एकदां श्रवण
झाल्यानें जर आपल्या अर्थाचा अनुभव श्रोत्याला करून देण्यास तें समर्थ
होत नसेल तर कितीही आवृत्ति केल्या तरी तें समर्थ होणार नाहीं हें
पूर्वीं सांगितलेंच आहे. होय, सांगितलें आहे. परंतु, हा कांहीं दोष नव्हे.
कारण, ज्या गोष्टीचा अनुभव येतो ती संभवनीय नाहीं असें होणार कसें ?
एकदां वाक्य श्रवण केल्यानें सरासरी वाक्यार्थ समजतो आणि त्याच
वाक्याचें पुनःपुनः मनन होऊं लागलें असतां त्याच्या शंकांचा निरास होतां
होतां तोच वाक्यार्थ चांगल्या प्रकारानें लोकांना समजत असल्याचें दृष्टो-
त्पत्तीस येतें. शिवाय, "तत्त्वमसि" हें वाक्य त्वंपदार्थाचें तत्पदार्थत्व

जन्मादिकारणमभिधीयते सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । विज्ञानमानन्दं ब्रह्म । अदृष्टं द्रष्टृ । अविज्ञातं विज्ञातृ । अजमजरममरम् । अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घमित्यादिशास्त्रप्रसिद्धम् । तत्राजादिशब्दैर्जन्मादयो भावविकारा निवर्तिताः । अस्थूलादिशब्दैश्च स्थौल्यादयो द्रव्यधर्माः । विज्ञानादिशब्दैश्च चैतन्यप्रकाशात्मकत्वमुक्तम् । एष व्यावृत्तसर्वसंसारधर्मकोनुभवात्मको ब्रह्मसंज्ञकस्तत्पदार्थो वेदान्ताभियुक्तानां प्रसिद्धः । तथा त्वंपदार्थोपि प्रत्यगात्मा श्रोता देहादारभ्य प्रत्यगात्मतया संभाव्यमानश्चैतन्यपर्यन्तत्वेनावधारितः । तत्र येषामेतौ पदार्थावज्ञानसंशयविपर्ययप्रतिबद्धौ तेषां तत्त्वम-

---

कथन करितें. जगताच्या उत्पत्तीचें वगैरे कारण असें जें सत्यस्वरूप प्रकृत ब्रह्म तें " तत् " ह्या पदानें दर्शविलें जातें. " सत्यं ज्ञानमनन्त ब्रह्म । विज्ञानमानन्दं ब्रह्म । अदृष्टं द्रष्टृ । अविज्ञातं विज्ञातृ । अजमजरममरम् । अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम् । " इत्यादि श्रुतींमध्यें तेंच ब्रह्म प्रसिद्ध आहे. ह्या श्रुतींपैकीं " अजमजरममरम् " ह्या नृसिंहोत्तरतापिनी उपनिषदांतील शब्दांनीं ब्रह्माला जन्मादिविकार नाहींत असें सांगितलें; " अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम् । " ह्या बृहदारण्यकोपनिषदांतर्गत शब्दांनीं स्थौल्यप्रभृति द्रव्यधर्म ब्रह्माला नसल्याचें दर्शविलें आणि " विज्ञानमानन्दं ब्रह्म । सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " ह्या बृहदारण्यकप्रभृति उपनिषदांतील शब्दांनीं ब्रह्म केवळ चिद्रूप आणि प्रकाशमय असल्याचें कथन केलें. सर्व संसारधर्मांपासून निर्मुक्त आणि अनुभवस्वरूप असा हा ब्रह्मसंज्ञक तत्पदार्थ वेदांतनिपुण पुरुषांमध्यें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें प्रत्यगात्मा ह्या नात्यानें देहापासून चैतन्यापर्यंत संभाव्यमान असलेला प्रत्यगात्मा व श्रोता असा त्वंपदार्थ ही ( योयं विज्ञानमयः प्राणेषु यः प्राणेन प्राणिति ) इत्यादिश्रुतीनें निश्चित केलेला आहे.

सीत्येतद्वाक्यं स्वार्थे प्रमां नोत्पादयितुं शक्नोति पदार्थपूर्वकत्वाद्वाक्यार्थस्येत्यतस्तान्प्रत्येष्टव्यः पदार्थविवेकप्रयोजनः शास्त्रयुक्त्यभ्यासः । यद्यपि च प्रतिपत्तव्य आत्मा निरंशस्तथाप्यध्यारोपितं तस्मिन्बह्वंशत्वं देहेन्द्रियमनोबुद्धिविषयवेदनादिलक्षणं तत्रैकेनावधानेनैकमंशमपोहत्यपरेणापरमिति युज्यते तत्र क्रमवती प्रतिपत्तिः । तत्तु पूर्वरूपमेवात्मप्रतिपत्तेः। येषां पुनर्निपुणमतीनां नाज्ञानसंशयविपर्ययलक्षणः पदार्थ-

---

वाक्यार्थज्ञानाला प्रथमतः पदार्थज्ञानाची अपेक्षा असते. तेव्हां अज्ञानमूलक संशय आणि विपरीत ज्ञान ह्यांच्या योगानें ज्यांना हे तत्त्वंपदार्थ ( ह्मणजे " तत्त्वमसि " ह्या वाक्यांतील " तत् " आणि " त्वं " ह्या दोन पदांचे अर्थ ) अवगत होण्यास प्रतिबंध झालेला असेल त्यांचे ठिकाणीं " तत्त्वमसि " हें वाक्य आपल्या अर्थाचें ज्ञान उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं. त्यांना " तत् " आणि " त्वं " ह्या पदांचे अर्थ खरे खरे समजण्याकरितां शास्त्र आणि युक्ति ह्यांच्या आवृत्तीची अपेक्षा आहे. ज्याचें ज्ञान करून घ्यावयाचें तो आत्मा जरी वस्तुतः अंशरहित आहे तरी ( अज्ञानामुळें ) त्याचे ठिकाणीं देह, इंद्रियें, मन, बुद्धि, विषयवेदन इत्यादि प्रकारचे अंश असल्याचा आरोप केलेला आहे. तेव्हां, देह, इंद्रियें इत्यादि आरोपित अंशांपैकीं एका अवधानानें एका अंशाचें निराकरण पुरुषाला करितां येत असून दुसऱ्या अवधानानें दुसऱ्या अंशाचें निराकरण त्याला करितां येतें. ह्मणून त्या आत्म्याविषयीं क्रमाक्रमानें ज्ञान होणें योग्यच आहे. हें जें क्रमाक्रमानें ज्ञान होतें ह्मणजे देह हा आत्मा नव्हे असें अंतःकरणामध्यें ठसल्यावर इंद्रियें हा आत्मा नव्हे ह्मणून ठसणें अशा क्रमानें जें ज्ञान होत जातें तें आत्मसाक्षात्काराचें पूर्वरूपच होय. आतां " तत् " आणि "त्वं" ह्या पदांचें अर्थ समजण्यास अज्ञानमूलक संशय आणि अज्ञानमूलक

**विषयः प्रतिबन्धोऽस्ति ते शक्नुवन्ति सकृदुक्तमेव तत्त्वमसि-वाक्यार्थमनुभवितुमिति तान्प्रत्यावृत्त्यानर्थक्यमिष्टमेव । सकृदुत्पन्नैव ह्यात्मप्रतिपत्तिरविद्यां निवर्तयतीति नात्र कश्चि-दपि क्रमोऽभ्युपगम्यते । सत्यमेवं युज्येत यदि कस्यचिदेवं प्रतिप-त्तिर्भवेत् । अतो न दुःखित्वाद्यभावं कश्चित्प्रतिपद्यत इति चेन्न । देहाद्यभिमानवद्दुःखित्वाद्यभिमानस्य मिथ्याभिमानत्वोपपत्तेः । प्रत्यक्षं हि देहे छिद्यमाने दह्यमाने वाहं छिद्ये दह्य इति च**

---

विपर्यय ह्मणजे विपरीत ज्ञान ह्यांचा मुळींच प्रतिबंध न होण्याइतकी ज्यांची बुद्धि उत्कृष्ट असेल ते “ तत्त्वमसि ” असें वाक्य एक-दांच उच्चारिलें असतांना त्याच्या अर्थाचा अनुभव घेण्यास ह्मणजे “ मीच ब्रह्मस्वरूप आहें. ” असें अपरोक्षानुभवानें जाणण्यास समर्थ होतात; ह्मणून त्यांचे संबंधानें श्रवणमननादिकांची आवृत्ति जर व्यर्थ झाली तर ती व्यर्थ होणें इष्टच आहे आणि ( मीच ब्रह्मस्वरूप आहें असें ) आत्मज्ञान एकदां उत्पन्न झाल्याबरोबर जर सर्व अविद्या निवृत्त होऊं लागली तर अशा ठिकाणीं कोणत्याही क्रमाची अपेक्षा नाहीं. आतां “ असें होणें संभवनीय आहे खरें. परंतु, कोणाला अशा प्रकारें आत्मसाक्षात्कार होईल तेव्हांनां ह्या सगळ्या गोष्टी ! मी दुःखी आहें, माझी मोठी हानि झाली आहे वगैरे प्रकारचा समज जो अंतः-करणावर दृढ होऊन गेलेला असतो तो नाहींसा होणें दुरापास्त आहे. तस्मात्, दुःखीपणाचा वगैरे अभाव असल्याबद्दल कोणाच्याही अनु-भवला येत नाहीं ( आणि ह्मणूनच ब्रह्मात्मस्वप्रतीतिही कोणालाच होण्याचा संभव नाहीं ) ” असेंही ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, देहा-दिकांचे ठिकाणीं आत्मा ह्या नात्यानें असलेला अभिमान ज्याप्रमाणें मिथ्या असल्याचें सिद्ध आहे त्याचप्रमाणें मी दुःखी आहें वगैरे जें वाटतें तेंही मिथ्या असल्याचें सिद्ध होतें. देहाचा छेद अथवा दाह

मिथ्याभिमानो दृष्टः । तथा बाह्यतरेष्वपि पुत्रमित्रादिषु संतप्यमानेष्वहमेव संतप्य इत्यध्यारोपो दृष्टः । तथा दुःखित्वाद्यभिमानोपि स्यात् । देहादिवदेव चैतन्याद्बहिरुपलभ्यमानत्वाद्दुःखित्वादीनां सुषुप्तादिषु चाननुवृत्तेः । चैतन्यस्य तु सुषुप्तेप्यनुवृत्तिमामनन्ति यद्वै तन्न पश्यति पश्यन्वै तन्न पश्य-

---

होऊं लागला असतां मी छिन्न होत आहें, मी भाजत आहें अशाप्रकारची समजूत मिथ्या असल्याचें प्रत्यक्ष दृष्ट आहे ( कारण, हात अथवा पाय तुटला असतां किंवा भाजला असतां आत्मा कायम असल्याचा प्रत्यक्ष अनुभवच येत असतो ). ज्याप्रमाणें आत्म्यापासून कांहीं दूर असलेल्या देहाचा दाह वगैरे होऊं लागल्यास आत्म्याचा दाह वगैरे होत आहे अशी समजूत मिथ्या असल्याचें प्रत्यक्ष दिसतें. त्याचप्रमाणें देहाहून कांहीं अधिक दूर असलेले पुत्र, मित्र वगैरे संतप्त होऊं लागले असतां " मला संताप होत आहे " अशी चुकीची समज होत असल्याचें प्रत्यक्ष दृष्ट आहे. सारांश, ज्याप्रमाणें देहादिकांचा आत्म्याशीं कांहीं संबंध नसतांना त्यांचा दाह वगैरे होऊं लागल्यास आपला दाह होत असल्याची भ्रांति होत असते त्याचप्रमाणें दुःखादिकांचा आत्म्याशीं कांहीं एक संबंध नसतांना मी दुःखी आहें वगैरे समजूत मिथ्या असली पाहिजे हें उघड आहे. कारण, सुषुप्तिकालीं वगैरे दुःखित्वादि धर्म कायम रहात नसल्यामुळें देहादिकांप्रमाणें तेही चैतन्याहून बाह्य असल्याचें सिद्ध होतें. ह्मणजे देहादिक ज्याप्रमाणें आत्म्याचें स्वरूप नव्हे त्याचप्रमाणें दुःखित्वादिधर्मही आत्मधर्म नव्हेत हें सिद्ध होतें. आतां " तर मग चैतन्यही आत्मस्वरूप नव्हें. कारण, सुषुप्तिकालीं वगैरे हालचाल होत नसल्यामुळें तेंही कायम असल्याचें दिसत नाहीं " ही मात्र शंका बरोबर नाहीं. कारण ) सुषुप्तावस्थेंतही चैतन्य कायम असतें ह्मणून " यद्वै तन्न पश्यति पश्यन्वै तन्न पश्यति "

तीत्यादिना । तस्मात्सर्वदुःखविनिर्मुक्तैकचैतन्यात्मकोऽहमित्येष आत्मानुभवः । न चैवमात्मानमनुभवतः किंचिदन्यत्कृत्यमवशिष्यते । तथा च श्रुतिः किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोक इत्यात्मविदः कर्तव्याभावं दर्शयति। स्मृतिरपि यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः । आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यत इति । यस्य तु नैषोऽनुभवो द्रागिव जायते तं प्रत्यनुभवार्थ एवावृत्त्यभ्युपगमः । तत्रापि न तत्त्वमसिवाक्यार्थात्प्रच्याव्यावृत्तौ प्रवर्तयेत् । न हि वरघाताय कन्यामुद्वाहयन्ति । नियुक्तस्य चास्मिन्नधि-

---

इत्यादि बृहदारण्यक श्रुतीमध्यें सांगितलेलें आहे. तस्मात् , सर्व प्रकारच्या दुःखांपासून मुक्त आणि केवल चैतन्यस्वरूप मी आहें अशा प्रकारचा आत्मसाक्षात्कार होण्याचा संभव आहे. अशा प्रकारें आत्म्याचा अपरोक्षानभव घेणाऱ्याला दुसरें कोणतेंही कृत्य कर्तव्य ह्मणून अवशिष्ट र । । नाहीं. कारण, " किं प्रजया करिष्यामो येषां नोयमात्मायं लोकः " ही बृहदारण्यक श्रुति आत्मवेत्त्याला कर्तव्य नसल्याचें दर्शवीत असून " यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः । आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते " ही स्मृतिही तसेंच दर्शवीत आहे. असो. ज्याला एकदम हा आत्मसाक्षात्कार होत नाहीं त्याला तो साक्षात्कार होण्याकरितांच श्रवणमननादिकांची आवृत्ति अपेक्षित आहे. परंतु, जरी ती अपेक्षित आहे तरी " तत्त्वमसि " ह्या वाक्याच्या अर्थाकडे त्याचें दुर्लक्ष्य होऊं न देतां ह्मणजे " मी ब्रह्म आहें " असा प्रत्यय त्याच्या अंतःकरणांतून ढळूं न देतां श्रवण मननादिकांच्या अभ्यासाकडे त्याची प्रवृत्ति करावी. कारण, वराचा घात करण्याकरितां आपल्या कन्येचा कधीं कोणी विवाह करीत नसतात. ( सारांश, आत्मसाक्षात्कार होण्याचें साधन ह्मणून श्रवणादिकांकडे

क्तोऽहं कर्ता मयेदं कर्तव्यमित्यवश्यं ब्रह्मप्रत्ययाद्विपरीतप्रत्यय उत्पद्यते । यस्तु स्वयमेव मन्दमतिरप्रतिभानात्तं वाक्यार्थं जिहासेत्तस्यैतस्मिन्नेव वाक्यार्थे स्थिरीकार आवृत्त्यादि-वाचोयुक्त्याभ्युपेयते । तस्मात्परब्रह्मविषयेऽपि प्रत्यये तदुपा-यापदेशेष्वावृत्तिसिद्धिः ॥ २ ॥

---

त्याची प्रवृत्ति करावी. श्रवण वगैरे कर्तव्य कर्म आहे ह्या नात्यानें त्याची प्रवृत्ति करूं नये. कारण, कर्तव्य कर्म ह्मणून श्रवणादिकांविषयीं नियुक्त केलेल्या पुरुषाचे ठिकाणीं "मला ह्या कर्माचा अधिकार आहे, मी ह्याचा कर्ता आहें, माझें हें कर्तव्य आहे" अशा प्रकारचें ब्रह्मज्ञानाला विरुद्ध असलेलें ज्ञान उत्पन्न होतें. स्वतः मंदमति अस-लेला जो पुरुष साक्षात्कार होत नाहीं ह्मणून त्या वाक्यार्थाकडे दुर्लक्ष्य करूं लागेल त्याची ह्याच वाक्यार्थाविषयीं ( असंभावनादिकांचा निरास करून ) वेद, उपासीत इत्यादि शब्दांनीं समजूत दृढ करावी. तस्मात्, परब्रह्मविषयकही ज्ञानाकरितां त्याला उपायभूत असलेल्या श्रवणा-दिकांविषयीं आवृत्ति कर्तव्य असल्याचें सिद्ध आहे ॥ २ ॥ ( १ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥
जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

---

आत्मनोऽनित्यत्वमभ्युपगम्येदमुच्यते अथ चैनं० मर्हसि॥२६॥ अथ चेत्यभ्युपगमार्थः। एनं प्रकृतमात्मानं नित्यजातं लौकिकप्रसिद्ध्या प्रत्यनेकशरीरोत्पत्तिं जातो जात इति मन्यसे तथा प्रतितनुं प्रतिविनाशं नित्यं वा मन्यसे मृतं मृतो मृत इति तथापि तथाभाविन्यप्यात्मनि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि जन्मवतो जन्म नाशवतो नाशश्चेत्यवश्यंभाविनाविति ॥ २६ ॥

---

हे महाबाहो अर्जुना, हा आत्मा प्रत्येक देहोत्पत्तीचे वेळीं उत्पन्न होत असून प्रत्येक देहनाशप्रसंगीं हा मृत होतो असें धरून जरी तूं चालत असलास तरी ह्याप्रमाणें शोक करीत बसणें तुला योग्य नाहीं ॥ २६॥

आत्म्याचें अनित्यत्त्व गृहीत धरून " अथ चैनं० नैवं शोचितुमर्हसि " असें भगवानांनीं अर्जुनाला सांगितलें आहे. " असेंही धरून चालत असलास तरी " हा " अथ च " ह्या अव्ययांचा अर्थ होय. लोकदृष्ट्या हा आत्मा अनेक शरीरें उत्पन्न होतात त्यांजबरोबर नेहमीं फिरून फिरून उत्पन्न होतो आणि त्याचप्रमाणें प्रत्येक शरीराचा नाश होऊं लागला असतां आत्म्यालाही नेहमीं मृत्यु येत असतो असें जरी गृहीत धरून तूं चालत असलास तथापि—ह्मणजे आत्मा जरी देहाबरोबर नेहमीं जन्ममरणांनीं युक्त होत असला तथापि—ह्याप्रमाणें शोक करीत बसणें तुला उचित नाहीं. कारण, जन्मवानाचा जन्म आणि नाशवानाचा नाश हे अवश्य होणारच २६.

( शोकत्याग करून तूं आपल्या बाहूंच्या मोठेपणाचें सार्थक कर हा ह्या श्लोकांतील " महाबाहो " ह्या संबोधनाचा आशय आहे २६. )

**तथाच सति जातस्य हि० न त्वं शोचितुमर्हसि ॥२७॥**
**जातस्य हि लब्धजन्मनो ध्रुवोऽव्यभिचारी मृत्युर्मरणं ध्रुवं जन्म मृतस्य च तस्मादपरिहार्योऽयं जन्ममरणलक्षणोऽर्थस्तस्मिन्नप- रिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

---

अरे जो उत्पन्न झाला त्याला मृत्यु हा निःसंशय येणार असून मृत झाल्याची उत्पत्तिही अवश्य ठरलेलीच आहे. तस्मात्, कधींही न टळणाऱ्या अशा ह्या जन्ममरणरूप ) प्रकाराविषयीं शोक करीत बसणें तुला अनुचित आहे ॥ २७ ॥

' जातस्य हि ध्रुवो मृत्युः ' ह्मणजे उत्पन्न झालेल्या प्राण्याला मरण कधींही चुकणारें नाहीं आणि त्याचप्रमाणें 'ध्रुवं जन्म मृतस्य च' ह्मणजे मृत झालेल्या प्राण्याला जन्मही कधीं टळलेला नाहीं. ह्मणून जन्ममरण ही गोष्ट अपरिहार्य आहे. करितां, त्या अपरिहार्य गोष्टीविषयीं शोक करीत बसणें तुला योग्य नाहीं २७.

("यदि हि त्वया युद्धेनाहन्यमाना एते जीवेयुरेव तदा युद्धाय शोक- स्तवोचितः स्यात् । एते तु कर्मक्षयात्स्वयमेव म्रियन्त इति तत्परिहारास- मर्थस्य तव दृष्टदुःखनिमित्तः शोको नोचित इति भावः । एवमदृष्टदुः- खनिमित्तेऽपि शोके तस्मादपरिहार्येऽर्थ इत्येवोत्तरम् । युद्धाख्यं हि कर्म क्षत्रियस्य नियतमग्निहोत्रादिवत्...तथा च युद्धलक्षणेऽर्थेऽग्निहोत्रादिवद्वि- हितत्वादपरिहार्ये परिहर्तुमशक्ये....त्वमदृष्टदुःखभयेन शोचितुं नार्हसीति पूर्ववत् ॥ " असें लिहून मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाचा आशय— " युद्धामध्यें तूं ह्यांचा वध न केल्यानें जर हे अक्षय जिवंत राहणार असतील तर युद्धाकारितां तुला वाईट वाटणें योग्य होईल. परंतु कर्म- क्षय झाला असतां हे आपोआप मरणारच आहेत. तेव्हां त्याचा परिहार करण्याला जर तूं असमर्थ आहेस तर दृष्टदुःखनिमित्तक शोक करणें तुला उचित नाहीं असा ह्या श्लोकाचा भावार्थ होय. त्याचप्र-

माणें अदृष्टदुःखनिमित्तक जो शोक त्याच्या ( अयोग्यते ) विषयीं तस्मादपरिहार्येर्थे हेंच उत्तर होय. कारण, क्षत्रियाला अग्निहोत्रादिकांप्रमाणें युद्ध हें अवश्य कर्तव्य कर्मच आहे. तस्मात्, अग्निहोत्रादिकांप्रमाणें विहित असल्यामुळें अपरिहार्य असलेल्या ह्मणजे टाळण्यास अशक्य असलेल्या ह्या युद्धाविषयीं अदृष्ट दुःखाच्या भीतीनें शोक करीत बसणें तुला उचित नाहीं "—असा भाष्यविरुद्ध काढिला आहे. परंतु तो बरोबर नाहीं. जन्ममरण ही गोष्ट प्राण्याला लागलेली आहे असें श्लोकाच्या पूर्वार्धांतच जर सांगितलें आहे तर उत्तरार्धांतील अपरिहार्येर्थे ह्याचा अर्थ " जन्ममरणरूप अपरिहार्य गोष्टीविषयीं " अशाच प्रकारचा करणें भाग आहे. सारांश, " अपरिहार्येर्थे " ह्या शब्दांचा अर्थ " अपरिहार्य युद्धाविषयीं " असा केल्यास प्रकरणविरोध हा दोष येतो. तस्मात् , भाष्यकारांच्याविरुद्ध असलेला हा मधुसूदनांचा आशय प्रकरणविरोधरूप दोषानें ग्रस्त आहे आणि ह्मणूनच अग्राह्य आहे. त्याचप्रमाणें " अथवा आत्मनित्यत्वपक्ष एव श्लोकद्वयम् । अर्जुनस्य परमास्तिकस्य वेदबाह्यमताभ्युपगमासंभवात् । अक्षरयोजना तु नित्यश्चासौ देहेन्द्रियादिसंबन्धवशाज्जातश्चेति नित्यजातस्तमेनमात्मानं नित्यमपि सन्तं जातं चेन्मन्यसे तथा नित्यमपि सन्तं मृतं चेन्मन्यसे तथापि त्वं नानुशोचितुमर्हसीति प्रतिज्ञाय हेतुमाह जातस्य हीत्यादिना । नित्यस्य जातत्वं मृतत्वं च प्राग्व्याख्यातं स्पष्टमन्यत् । भाष्यमप्यस्मिन्पक्षे योजनीयम् " असा मजकूर ह्या श्लोकाच्या व्याख्यानाचे शेवटीं लिहून " अथ चैनं नित्यजातं० मर्हसि ॥ जातस्य हि० मर्हसि ॥ " ह्या दोन श्लोकांचा मिळून आशय पूर्वीं काढिलेल्या आशयाहून उत्कृष्ट ह्मणून जो त्यांनीं काढिला आहे त्याचें तात्पर्य असें:—अथवा " अथ चैनं" नित्यजातं आणि "जातस्य हि ध्रुवो मृत्युः " ह्या दोन्ही श्लोकांचें तात्पर्य आत्मनित्यत्वपक्षाकडेच आहे असें समजावें. कारण, अर्जुन पराकाष्ठेचा आस्तिक असल्यामुळें " आत्मा अनित्य आहे " अशा प्रकारचें वेदबाह्य मत

त्याचें अमरण्याचा संभव नाहीं. ‘ नित्यजातं ’ ह्या समासाचा विग्रह “ नित्यश्चासौ देहेन्द्रियसंबन्धवशाज्जातश्चेति नित्यजातस्तम् ” असा करून “ वस्तुतः नित्य असतांनाही देहेंद्रियसंबंधामुळें आत्मा उत्पन्न होतो असें जरी तूं समजत असशील आणि त्याचप्रमाणें नित्य असूनही आत्मा देहेंद्रियादिवियोगामुळें मृत होतो असें जरी तूं मानीत असशील तरी शोक करणें तुला योग्य नाहीं असें “ अथ चैनं नित्यजातं ” ह्या श्लोकामध्यें प्रतिज्ञापूर्वक सांगून “ जातस्य हि ध्रुवो मृत्युः ” ह्या श्लोकांत त्या सांगण्याला हेतु दर्शविला...भाष्यही ह्या आत्मनित्यत्वपक्षाकडेच लावावें. ” असें मधुसूदनसरस्वती ह्मणतात तेंही बरोबर नाहीं. कारण, कांहीं प्रयोजन नसतांना क्लिष्ट कल्पना काढून श्लोकांतील शब्दांची ओढाताण करणें नीट नव्हे. त्याचप्रमाणें “ नित्यजातम् ” हा समास असतांना त्यांतील एकदेशाचाच अन्वय क्रियेकडे करणें अयोग्य आहे. “ भाष्यही आत्मनित्यत्वपक्षाकडेच लावावें ” असें त्यांचें ह्मणणेंही बरोबर नाहीं. कारण, “ आत्म्याचें अनित्यत्व गृहीत धरून हें सांगितलें आहे” अशा आशयाचा भाष्यांत प्रथमच असलेला “ आत्मनोनित्यत्वमभ्युपगम्येदमुच्यते ” हा मजकूर आत्मनित्यत्वपक्षाकडे लागणें अशक्य आहे. “ आत्मनोनित्यत्वम् ” ह्या भाष्यांतील पदें “ आत्मनः अनित्यत्वम् ” अशीं न पाडितां “ आत्मनः नित्यत्वम् ” अशीं पाडून भाष्य आत्मनित्यत्वपक्षपर लावण्यास हरकत येणार नाहीं असें समजून मधुसूदनसरस्वतींनीं “ भाष्यमप्यस्मिन्पक्षे योजनीयम् ” असें ह्मटलें हें उघड आहे. परंतु, “ नित्यत्वम् ” असें पद काढणें अयोग्यच ठरतें. कारण, तसें पद काढिलें असतां “ अभ्युपगम्य ( ह्मणजे गृहीत धरून ) हे ह्मणणें जुळतच नाहीं. कारण, आत्मा नित्य आहे असेंच प्रकरण मागून चालत आलें आहे आणि भाष्यकारांचा स्वतःचा सिद्धांतही आत्मा नित्य आहे असाच आहे. तेव्हां जो स्वतःचा सिद्धांत तो गृहीत धरण्याचें ( ह्मणजे अभ्युपेत्यवादानें सांगण्याचें ) कारण नाहीं. बरें, ही गोष्ट जरी घटकाभर बाजूस ठेविली तरी “ अथ

चैनं० मर्हसि " ह्या श्लोकावरील भाष्याच्या शब्दरचनेकडे लक्ष्य दिलें असतां त्यांतील नित्यशब्दाचा अन्वय " जात " आणि " मृत " ह्या शब्दांकडे असल्याचें स्पष्ट होत असल्यामुळें कांहीं तरी ओढाताण करून आत्मनित्यत्वपक्षपर भाष्य लावणें योग्य होणारच नाहीं. "अर्जुन पराकाष्ठेचा आस्तिक होता; तेव्हां त्याचें मत वेदबाह्य असण्याचा संभव नाहीं. " हें जें कारण आत्मनित्यत्वपक्षपर सदहू श्लोकांचें व्याख्यान करण्यास दिलें आहे त्यांत तर कांहींच अर्थ नाहीं. अज्ञानामुळें जर अर्जुनाला शंका आली असल्याचें सिद्ध होत आहे तर वेदबाह्य शंका आस्तिक अर्जुनाला येईल कशी ह्या ह्मणण्यांत अर्थ काय ? " मातृदेवो भव " अशी श्रुति आहे खरी; परंतु, अर्जुन अज्ञानपरिपूर्ण अशा बाल्यावस्थेंत होता त्यावेळीं कुंती त्याला दूध वगैरे पाजीत असतांना जर त्यानें तिच्या अंगावर पाय झाडले असले तर " मातृदेवो भव—अशी प्रत्यक्ष श्रुति असतांना अर्जुन त्या श्रुतीची परवा न करितां मातेला पादस्पर्श करील कसा ? हें ह्मणणें व्यर्थ आहे. श्रुतिबाह्य मत जर अर्जुनाचें असणें संभवनीय नाहीं तर मग भगवानांना गीता सांगण्याचेंच प्रयोजन नव्हतें. कारण, गीतेंत तरी श्रुतिसिद्धांतांचेंच प्रतिपादन केलेलें आहे. सारांश, " कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः । यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम् " असें अर्जुनानें प्रथम सांगितलें असून शेवटीं भगवान् श्रीकृष्णांनीं " कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा । कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनञ्जय " असा प्रश्न केल्यावरही "नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत । स्थितोस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव " असेंच उत्तर अर्जुनानें दिलें आहे. तेव्हां उपक्रम आणि उपसंहार ह्यांकडे लक्ष्य दिलें असतां अर्जुनाला अज्ञानमूलक मोह झाला होता असें जर सिद्ध होत आहे तर मोहमय अवस्थेमध्यें वेदबाह्य मताचा स्वीकार होणार नाहीं हें ह्मणणें योग्य कसें ठरणार ?

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥**

---

" कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसमूढचेताः। यच्छ्रे ०न्नम्" ह्या श्लोकावरील ज्ञानेश्वरमहाराजांनीं केलेलें व्याख्यान अवलोकन केलें ह्मणजे मोहामुळें अर्जुनाचा कल वेदबाह्य मताकडे होईल किंवा नाहीं ह्याचा निर्णय होतो. ज्ञानेश्वर महाराज ह्मणतात:—" आह्मां काय उचित । तें पाहतां न स्फुरे येथ। जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें॥ तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे । मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥ देवा तैसें मज जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥ तरी उचित काय आह्मां। जें व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांग आतां ॥". अर्जुन ज्याप्रमाणें पराकाष्ठेचा आस्तिक होता त्याचप्रमाणें श्रीरामचंद्रही पराकाष्ठेचे आस्तिक होते. तथापि, भगवान् वसिष्ठांनीं आत्मा अनित्य आहे असें गृहीत धरूनही त्यांना " त्वं चेद्बभूविथ पुरा तथेदानीं भविष्यसि । अथ चेह स्थितोसीति ज्ञातवानसि निश्चयम् ॥ तदानन्तरगानन्यान्प्राणादीन्निकटस्थितान्। बन्धूनतीतान्सुबहून्कस्मात्त्वं नानुशोचसि ॥ पूर्वमन्यस्तथेदानीं बभूविथ भविष्यसि । यदि राम तथापि त्वं सद्रूपः किं विमुह्यसि ३ पुरा भूत्वाथ भूत्वा च भूयश्चेन्न भविष्यसि। तथापि क्षीणसंसारः किमर्थमनुशोचसि ४ तस्मान्न दुःखिना युक्ता प्राकृते जाग्रते भ्रमे । तथैव मुदिता युक्ता युक्तं कार्यानुवर्तनम् ५ " असा उपदेश केला आहे. असो. मधुसूदनसरस्वतींनीं संस्कृत भाषेमध्यें भाष्यविरुद्ध काढिलेल्या अनेकदोषग्रस्त क्लिष्ट आशयांपेक्षां " नित्य मरे जन्मे तो जीव असें मानिसी जरी थोक । हे विजय महाबाहो न करीं चित्तीं तथापि तूं शोक " हें भाष्यानुसारी निर्दोष व सरळ प्राकृतच व्याख्यान काय बरें वाईट ? २७ )

हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, प्राणी प्रथमतः अनुपलब्ध असतात;

कार्यकरणसंघातात्मकान्यपि भूतान्युद्दिश्य शोको न युक्तः कर्तुं यतः अव्यक्तादीनि० परिदेवना ॥ २८ ॥ अव्यक्तादीन्यव्यक्तमदर्शनमनुपलब्धिरादिर्येषां पुत्रमित्रादिकार्यकरणसंघातात्मकानां तान्यव्यक्तादीनि भूतानि प्रागुत्पत्तेरुत्पन्नानि च प्राङ्मरणाद्व्यक्तमध्यान्यव्यक्तनिधनान्येव पुनरव्यक्तमदर्शनं निधनं मरणं येषां तान्यव्यक्तनिधनानि । मरणादूर्ध्वमप्यव्यक्ततामेव प्रतिपद्यन्त इत्यर्थः । तथा चोक्तमदर्शनादापतितः पुनश्चादर्शनं गतः । नासौ तव न तस्य त्वं वृथा किं परिदेवनेति ॥ तत्र का परिदेवना को वा प्रलापोऽदृष्टदृष्टप्रनष्टभ्रान्तिभूतेषु भूतेष्वित्यर्थः ॥ २८ ॥

---

मध्यें मात्र उपलब्ध होतात आणि मरणानंतरही पुनः अदृश्य होतात. तेव्हां, त्यांच्याविषयीं रे शोक कसला ? ॥ २८ ॥

देह व इंद्रियें एतत्संयोगरूप जे पुत्रमित्रप्रभृति प्राणी त्यांचें स्वरूप जन्माचे पूर्वीं अदृश्यत्व हेंच असतें; जन्मानंतर आणि मरणापूर्वीं ह्या मध्यकालांत मात्र ते दृष्टोत्पत्तीस येत असतात आणि पुनरपि त्यांचें मरणही अदृश्यच असतें; ह्मणजे मरणानंतरही ते फिरून अदृश्यच होत असतात. "अदृश्यस्थितीपासून आलेला आणि पुनरपि अदृश्य झालेला असा हा तुझा कोणी नव्हे व तूंही त्याचा कोणी नव्हेस. तेव्हां तो गेल्याबद्दल व्यर्थ शोक कशा करितां करीत आहेस ?" ह्मणून पुराणांतही सांगितलें आहे. 'परिदेवना' ह्या शब्दाचा अर्थ विलाप असा आहे.—प्रथम अदृष्ट, नंतर दृष्ट व पुनरपि नष्ट आणि ह्मणूनच भ्रांतिमय असलेले जे पुत्रामित्रादि प्राणी त्यांच्याविषयीं—हा तत्र ह्या पदाचा अर्थ होय २८.

( मधुसूदनसरस्वतींनीं विकल्पानें ह्या श्लोकांतील " भूतानि " ह्या शब्दाचा अर्थ आकाशादि पंच महाभूतें असा केला आहे. परंतु, 'देही नित्यमवध्योयं देहे सर्वस्य भारत । तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचि-

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् २९**

**दुर्विज्ञेयोयं प्रकृत आत्मा किं त्वामेवैकमुपालभे साधारणे भ्रान्तिनिमित्ते कथं दुर्विज्ञेय आत्मेत्यत आह आश्चर्यवत्पश्य० वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥ आश्चर्यवदाश्चर्यमदृष्टमद्भुतमकस्मादृश्यमानं तेन तुल्यमाश्चर्यमिवैनमात्मानं पश्यति कश्चिदा-**

तुमर्हसि "ह्या उपसंहारविषयक श्लोकांतील भूतशब्दाच्या अर्थाशीं पंचमहाभूतें ह्या वाक्याचें ऐक्य नसल्यामुळें भाष्यविरूद्ध असलेला हा मधुसूदनांचा अर्थ अग्राह्य आहे. " अदर्शनादापतितः पु० ना " हें जे पुराणवचन मधसूदनांनींही ह्या श्लोकाच्या टीकेमध्यें दिलें आहे त्याच्या अर्थाशींही " भूतानि " ह्या शब्दाचा अर्थ " महाभूतानि " असा केल्यास विरोध येतो हें दुसरेंही एक कारण मधुसूदनाचा अर्थ ग्राह्य न करण्याविषयीं आहे ).

ह्या आत्म्याकडे लक्ष्य असलेला पुरुष कोठें एकादाच आश्चर्यवत् दृष्टीस पडतो ; आत्म्याविषयीं निरूपण करणारा पुरुष अपूर्व गोष्टीप्रमाणें एकादाच आढळतो, आत्मविषयक श्रवण करणारा क्वचित् एकादाच दृष्टोत्पत्तीस येतो आणि आत्म्याकडे लक्ष्य देऊन आत्मविषयक श्रवण करून व आत्मविषयक चर्चा करूनही एकाद्याला ह्या आत्म्याचें ज्ञान होत नाहीं तें नाहींच ॥ २९ ॥

हा प्रकृत आत्मा दुर्बोध आहे. तेव्हां त्याच्या अज्ञानाविषयीं भ्रांति हे जर सर्वसाधारणच कारण आहे तर मी तुझा एकट्याचाच आत्मविषयक अज्ञानाबद्दल उपहास कशाला करूं ? असें मनांत आणून आत्म्याचें ज्ञान होणें दुर्घट कसें तें " आश्चर्यव० कश्चित् " ह्या श्लोकानें दर्शवितात. आश्चर्य ह्मणजे पूर्वीं अदृष्ट अशी अकस्मात् दृष्टोत्पत्तीस येणारी अद्भुत गोष्ट. तेव्हां " अशा अद्भुत गोष्टीप्रमाणें " हा

**श्चर्यवदेव वदति तथैव चान्य आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वा दृष्ट्वोक्त्वाप्येनं वेद न चैव कश्चित्। अथवा योयमात्मानं पश्यति स आश्चर्यतुल्यो यो वदति यश्च शृणोति सोनेकसहस्रेषु कश्चिदेव भवत्यतो दुर्बोध आत्मेत्यभिप्रायः॥ २९॥**

---

आश्चर्यवत् ह्या शब्दाचा अर्थ होय. आश्चर्याप्रमाणें एकादाच ह्या आत्म्याला अवलोकन करितो; त्याचप्रमाणें आश्चर्यवतच एकादा ह्याचें प्रतिपादन करितो; दुसरा एकादा त्याचें श्रवण करणारा अद्भुत गोष्टीप्रमाणेंच आढळतो आणि श्रवण, प्रतिपादन व दर्शन झालें असतांही ( प्रतिबंधवशात् ) एकाद्याला ह्याचें ज्ञान होत नाहीं तें नाहींच. अथवा ( ह्या श्लोकाचा असा अर्थ करावा ) जो कोणी आत्म्याला अवलोकन करितो तो आश्चर्यतुल्य आणि जो त्याचें प्रतिपादन करितो व जो श्रवण करितो तो तरी हजारों लोकांमध्यें एकादाच होत असतो. तस्मात्, आत्मा दुर्बोध आहे हा ह्या श्लोकाचा अभिप्राय होय २९.

( ह्या श्लोकांतील पहिल्या पादानें आत्म्याकडे लक्ष्य लागणें दुर्लभ आहे असें सांगून आत्मविषयक द्रष्टा दुर्लभ आहे असें सांगितलें; दुसऱ्या पादानें आत्मविषयक भाषण दुर्लभ आहे असें सांगून आत्मविषयक वक्ता दुर्लभ आहे असें कथन केलें; तिसऱ्या पादानें आत्मविषयक श्रवण दुर्लभ आहे असें सांगून आत्मविषयक श्रोता दुर्लभ आहे हें सुचविलें आणि यदाकदाचित् आत्मविषयक श्रवण, दर्शन व चर्चा हीं जरी संभवनीय असलीं तरी आत्मविषयक साक्षात्कार तर अत्यंत दुर्लभ आहे असें चवथ्या पादानें प्रतिपादन केलें. भाष्यकारांनीं पहिल्या व्याख्यानामध्यें आत्मविषयक दर्शन, चर्चा, श्रवण व साक्षात्कार दुर्लभ आहे असें सांगून त्या द्वारानें आत्म्याचें दुर्बोधत्व सिद्ध केलें आहे; दुसऱ्या व्याख्यानामध्यें आत्मविषयक द्रष्टा, वक्ता, श्रोता व साक्षात्कार झालेला पुरुष दुर्लभ आहे असें सांगून आत्म्याचें दुर्बोधत्व कथन केलें आहे आणि " अतो

दुर्बोध आत्मेत्यभिप्रायः " ह्मणून ( कोणतेंही व्याख्यान केलें तरी आत्मा दुर्बोध आहे असा ) ह्या श्लोकाचा अभिप्राय काढिला आहे. आत्मविषयाकडे लक्ष्य जाणारा वगैरे पुरुष आश्चर्यतुल्य होतो. ह्मणजे हजारों लोकांमध्यें आत्मविषयाकडें लक्ष्य देणारा, आत्मविषयक चर्चा करणारा अथवा आत्मविषयक श्रवण करणारा एकादाच आढळण्यांत येत असून आत्मविषयक साक्षात्कार असलेला तर त्यापेक्षांही दुर्लभ असतो हा भाष्यांतील दुसऱ्या व्याख्यानाचा आशय होय.

कठोपनिषदामध्यें एक श्रुति आहे तिच्याशीं ह्या श्लोकाचें अर्थदृष्ट्या साम्य असून आचार्यांनींही ती श्रुति लक्ष्यांत आणूनच ह्या श्लोकावरील भाष्य लिहिलें असल्याचें दिसत आहे. करितां, गीतेंतील ह्या श्लोकाचा अर्थ स्पष्ट व्हावा ह्मणून कठोपनिषदांतील सदर्हू श्रुति पुढें दिली असून त्या श्रुतीवरील आचार्यांचें भाष्यही मराठीतात्पर्यासह पुढें दिलें आहे.

**श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः । आश्चर्यो वक्ता कुशलोस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥**

---

प्रायेण ह्येवंविध एव लोकः । यस्तु श्रेयार्थी सहस्रेषु कश्चिदेवात्मविद्भवति त्वद्विधो यस्माच्छ्रवणायापि श्रवणार्थं श्रोतुमपि यो न लभ्य आत्मा बहुभिरनेकैः शृण्वन्तोपि बहवोनेकेन्ये यमात्मानं न विद्युर्न विन्द्युरभागिनो संस्कृतात्मानो न विजानीयुः। किं चास्य वक्ताप्याश्चर्योद्भुतवदेवानेकेषु कश्चिदेव भवति तथा श्रुत्वाप्यस्यात्मनः कुशलो निपुण एवानेकेषु लब्धा कश्चिदेव भवति यस्मादाश्चर्यो ज्ञाता कश्चिदेव कुशलानुशिष्टः कुशलेन निपुणेनाचार्येणानुशिष्टः सन् ॥

---

लोक प्रायः अशा प्रकारचेच ( ह्मणजे विषयादिकांचे ठिकाणीं आसक्तच ) असल्याचें प्रसिद्ध आहे. तुज नचिकेताप्रमाणें मुमुक्षु असा हजारोंमध्यें एकादाच असतो. कारण, अनेक लोकांना आत्मविषयक श्रवणच दुर्लभ असतें आणि दुसऱ्या पुष्कळांना आत्मविषयक श्रवणाचा लाभ होत असूनही ते—अभागी असल्यामुळें ह्मणजे नित्यनैमित्तक कर्मांनीं त्यांचें अंतःकरण संस्कृत झालें नसल्यामुळें—त्यांना आत्म्याचें ज्ञान होत नाहीं. आत्मविषयक श्रोता दुर्लभ आहे इतकेंच नव्हे. परंतु, अनेक लोकांमध्यें वक्ताही अद्भुतगोष्टीप्रमाणें एकादाच असतो. त्याचप्रमाणें यदाकदाचित् श्रोत्यांचा जरी संभव असला तरी तो आत्मविषय ग्रहण करणारा असा अनेक श्रोत्यांमध्यें एकादाच निपुण पुरुष कोठें तरी आढळतो. कारण, निपुण—ह्मणजे ब्रह्मतत्त्वाचा साक्षात्कार झालेल्या-आचार्यापासून वेदांतशास्त्राचें शिक्षण मिळालेला असा आत्मज्ञानी पुरुष

अद्भुत प्रकाराप्रमाणें कचित् एकादाच असतो. तेव्हां श्रोत्यांमध्यें ग्रहण करणारा एकादाच असणार हें उघड आहे.

वरील श्रुतींतील " श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः " ह्या अंशाचें अर्थदृष्ट्या " आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति " ह्या श्लोकपादाशीं साम्य असून " शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः " ह्या अंशाचा " श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् " ह्या चरणाशीं अर्थानें सारखेपणा आहे. तसाच " आश्चर्यो वक्ता " हा अंश " आश्चर्यवद्वदति तथैव चान्यः " ह्या चरणाशीं अर्थदृष्ट्या सारखा असून " कुशलोस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः " ह्या अंश " आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् " ह्या भागाशीं समानार्थक आहे.

आत्मविषयाकडे लक्ष्य असून श्रवण वगैरे केलें तरी सुद्धां एकाद्याला आत्मज्ञान होत नाहीं असा भाष्यकारांनीं " श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् " ह्या चतुर्थपादाचा आशय काढिला आहे. त्यावरून श्रवणादि घडलें असूनही आत्मज्ञान न होण्याचें कारण काय अशी शंका येण्याचा संभव आहे. तेव्हां तिचें निरसन होऊन " आश्चर्यवत्पश्यति० न कश्चित् " ह्या गीतेंतील श्लोकाचें रहस्य नीट कळण्या करितां उत्तरमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायांतील उपांत्य अधिकरण समजणें अवश्य आहे. ह्यास्तव, सदरहू अधिकरणाचें सूत्र व त्या सूत्रावरील आचार्यांचें भाष्य मराठीतात्पर्यासह पुढें दिलें आहे.

## ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्।

सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववदित्यत आरभ्योच्चावचं विद्या-साधनमवधारितं तत्फलं विद्या सिध्यन्ती किमिहैव जन्मनि सिध्यत्युत कदाचिदमुत्रापीति चिन्त्यते । किं तावत्प्राप्तम् । इहैवेति । किं कारणम् । श्रवणादिपूर्विका हि विद्या । न च कश्चिदमुत्र मे विद्या जायतामित्यभिसंधाय श्रवणादिषु प्रवर्तते । समान एव तु जन्मनि विद्याजन्माभिसंधायैतेषु प्रवर्तमानो दृश्यते । यज्ञादीन्यपि श्रवणादिद्वारेणैव विद्यां जनयन्ति

सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत् । ह्या ( तिसऱ्या अध्यायांतील चतुर्थपादाच्या सहाव्या अधिकरणा ) पासून उत्तम व गौण असे दोन्ही प्रकारचें ज्ञानसाधन निश्चित केलें. त्याचें फल जें साध्य होणारें ज्ञान तें कां ह्या जन्मामध्येंच साध्य होतें किंवा जन्मांतरीं सुद्धां होतें ह्याचा विचार ह्या ठिकाणीं कर्तव्य आहे. तेव्हां प्रथम आधीं ( पूर्वपक्षदृष्ट्या ) काय ठरतें तें पाहूं. ह्याच जन्मामध्यें ज्ञानप्राप्ति होतें हें ठरतें. ह्याच जन्मामध्यें होण्याचें काय कारण ? ( कारण इतकेंच कीं ) ज्ञान हें श्रवणादिपूर्वक आहे ह्मणजे ज्ञानोत्पत्ति होण्याला प्रथमतः श्रवणमननादिकांची अपेक्षा आहे. ) सारांश, चक्षुरिंद्रियाप्रमाणें श्रवण वगैरेही ज्ञानसाधन आहे. तेव्हां कालांतरानें विवक्षित पदार्थ दृष्टीस पडावा ह्मणून आतां ज्याप्रमाणें कोणी डोळे उघडून बसणार नाहीं त्याचप्रमाणें जन्मांतरीं ज्ञान होण्याकरितां इहजन्मींच श्रवणादिकांकडे लोक प्रवृत्त होणार नाहींत. तेव्हां अवर्षण पडलें असतां तत्काल फलप्राप्तीच्या इच्छेनें ज्याप्रमाणें पर्जन्येष्टि करीत असतात त्याचप्रमाणें अनुभवाला येत असलेल्याच संसार-दुःखापासून इहजन्मींच मुक्त होण्याकरितां श्रवणादिकांचे ठिकाणीं लोकांची प्रवृत्ति असणार. ह्या जन्मीं केलेलीं श्रवणादिक जन्मांतरीं ज्ञान उत्पन्न

प्रमाणजन्यत्वाद्विद्यायाः । तस्मादैहिकमेव विद्याजन्मेति । एवं प्राप्ते वदामः । ऐहिकं विद्याजन्म भवत्यसति प्रस्तुतप्रतिबन्ध इति । एतदुक्तं भवति यदा प्रक्रान्तस्य विद्यासाधनस्य कश्चित्प्रतिबन्धो न क्रियत उपस्थितविपाकेन कर्मान्तरेण तदेहैव विद्योत्पद्यते यदा तु खलु तत्प्रतिबन्धः क्रियते तदामुत्रेति ।

---

होण्याला कारणीभूत होत असेल ह्मणावें तर ) ह्याच जन्मामध्यें ज्ञान उत्पन्न होईल असें मनांत आणून लोक ह्या श्रवणादिकांचे ठिकाणीं प्रवृत्त होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. ( आतां, यज्ञ, दान वगैरेंचे फल जन्मांतरीं येणारें असल्यामुळें व यज्ञदानादिक ज्ञानोत्पत्तीला कारणीभूत होतात असें " तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसानाशकेन " ह्या बृहदारण्यक श्रुतीवरून होत असल्यामुळें जन्मांतरीं ज्ञान उत्पन्न होतें असें ह्मणाल तर ) ज्ञान प्रमाणजन्य असल्यामुळें यज्ञादिकही श्रवणद्वारानेंच ज्ञान उत्पन्न करीत असतात. ( सारांश, अंतःकरणशुद्धिद्वारा यज्ञादि कर्में पुरुषाला श्रवणादिकांमध्यें प्रवृत्त करीत असतात आणि श्रवण, मनन वगैरे सिद्ध झालें असतां ज्ञान अवश्य उत्पन्न झालेंच पाहिजे ). तस्मात्, इहजन्मींच ( ह्मणजे ज्या जन्मामध्यें श्रवणादिक घडतात त्या जन्मांतच ) ज्ञान उत्पन्न होतें ही गोष्ट सिद्ध आहे. ह्याप्रमाणें ( इहजन्मींच ज्ञानोत्पत्ति होत असल्याचें पूर्वपक्षरीतीनें ) प्राप्त झालें असतां आह्मी ( सिद्धांत ) सांगतों. प्रस्तुत प्रतिबंध जर नसेल तर इहजन्मीं ज्ञान उत्पन्न होतें ( प्रस्तुत ह्मणजे ज्याचें फल ज्ञानोत्पत्तीला विरुद्ध आहे असें फलोन्मुख झालेलें कर्म ). तेव्हां ( ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे ) ह्याचा अर्थ असाः—ज्ञानोत्पत्तीला साधनीभूत असलेलीं श्रवणादिक झालीं असतां फलोन्मुख झालेल्या दुसऱ्या कर्मानें त्या साधनांना जर प्रतिबंध झाला नाहीं तर इहजन्मींच ज्ञान उत्पन्न होतें आणि तशा प्रकारच्या दुसऱ्या कर्माचा जेव्हां प्रतिबंध

उपस्थितविपाकत्वं च कर्मणो देशकालनिमित्तोपनिपाताद्भवति। यानि चैकस्य कर्मणो विपाचकानि देशकालनिमित्तानि तान्येवान्यस्यापीति न नियन्तुं शक्यते। यतो विरुद्धफलान्यपि कर्माणि भवन्ति। शास्त्रमप्यस्य कर्मण इदं फलमित्येतावति पर्यवसितं न देशकालनिमित्तविशेषमपि संकीर्तयति। साधनवीर्यविशेषात्त्वतीन्द्रिया कस्यचिच्छक्तिराविर्भवति तत्प्रतिबद्धा परस्य तिष्ठति। न चाविशेषेण विद्यायामभिसन्धिर्नोत्पद्यत इहामुत्र वा मे विद्या जायतामित्यभिसन्धे-

---

होतो तेव्हां ज्ञान उत्पन्न होण्याचें जन्मांतरावर जातें. कारण, देश, काल व निमित्त ह्यांच्या संयोगानें कर्मांचा विपाक होत असतो. ("तर मग देशादिकांच्या योगानें ज्ञानोत्पादक श्रवणादि कर्मांचाच परिपाक आधीं कां होऊं नये ?" ही शंका बरोबर नाहीं. कारण, ) एक कर्म परिपक्क दशेस आणण्याला ज्या देशकालनिमित्तांचा उपयोग होतो तींच दुसऱ्या कर्मांचा परिपाक करितात असा नियम असणें शक्य नाहीं. कारण, परस्परविरुद्ध फलांनीं युक्त अशींही कर्मे असतात. ( आतां "श्रवणादिकांना जर प्रतिबंध होतो तर त्यांच्यापासून ज्ञानोत्पत्ति होते असें सांगणाऱ्या शास्त्राला बाधच आला ह्मणावयाचा " अशी शंकाही योग्य नाहीं. कारण, ) शास्त्राचें पर्यवसान तरी—ह्या कर्माचें फल हें—इतकें सांगण्यामध्येंच आहे. अमुक अमुक कर्मांचा परिपाक होण्यास अमक्या अमक्या देशकालनिमित्तांची अपेक्षा असते हेंही आणखी शास्त्र सांगत बसत नाहीं. (" बरें, असें जर आहे तर इतर कर्मच श्रवणादिकांना प्रतिबंध करीत असून श्रवणादिक त्या कर्माच्या फलाला प्रतिबंध करीत नाहींत असें कां असावें ?" ह्मणून विचारशील तर) साधनांचें सामर्थ्य भिन्न भिन्न असल्यामुळें एकाद्याची अतींद्रिय शक्ति प्रकट होते व त्यामुळें दुसऱ्याची प्रतिबद्ध होऊन रहाते. शिवाय, इहजन्मीं अथवा जन्मांतरीं

निरङ्कुशत्वात् । श्रवणादिद्वारेणापि विद्योत्पद्यमाना प्रतिब-न्धक्षयापेक्षयैवोत्पद्यते । तथा च श्रुतिर्दुर्बोधत्वमात्मनो दर्शयति श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः । आश्चर्यो वक्ता कुशलोस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्ट इति । गर्भस्थ एव च वामदेवः प्रतिपेदे ब्रह्म-भावमिति वदन्ती जन्मातरसंचितात्साधनाज्जन्मातरे विद्यो-त्पत्तिं दर्शयति । न हि गर्भस्थस्यैवैहिकं किंचित्साधनं संभा-व्यते । स्मृतावप्यप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छती-त्यर्जुनेन पृष्टो भगवान्वासुदेवो न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छतीत्युक्त्वा पुनस्तस्य पुण्यलोकप्राप्तिं साधुकुले

---

ज्ञान उत्पन्न व्हावें अशी सामान्य इच्छा उत्पन्न होत नाहीं असेंही ह्मणतां येणार नाहीं. कारण. इच्छेला कांहीं आडकाठी नसल्यामुळें इहजन्मीं अथवा जन्मान्तरीं मला ज्ञान उत्पन्न व्हावें अशाप्रकारें ती उत्पन्न होणें संभवनीय आहे. त्याचप्रमाणें श्रवणादिकांच्या द्वारानेंही उत्पन्न होणारें ज्ञान प्रतिबंधनाशावर अवलंबून असतें आणि असेंच " श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः । आश्चर्यो वक्ता कुशलोस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥ " ह्या श्रुतींत दर्शविलें आहे. त्याचप्रमाणें गर्भामध्यें असतांनाच वामदेवाला ब्रह्मा-त्मत्व प्राप्त झालें असें सांगणारी श्रुति जन्मांतरीं करून ठेविलेल्या साध-नामुळें दुसऱ्या जन्मांत ज्ञानोत्पत्ति होत असल्याचें दर्शवीत आहे. कारण, गर्भामध्यें असतांना ज्ञानोत्पत्ति होण्याचें कांहीं श्रवणादिक ऐहिक साधन होणें संभवनीयच नाहीं. ( भगवद्गीतारूप ) स्मृतीमध्येंही " योग्य फल जें उत्तम ज्ञान तें प्राप्त न होतां मरणाऱ्या पुरुषाला, हे कृष्णा, कोणती गति प्राप्त होते ? " ह्मणून अर्जुनानें प्रश्न केला असतां " बा अर्जुना, कोणाही शुभकृत्य करणाऱ्याला दुर्गति प्राप्त होत नसते " असें

**संभूतिं चाभिधायानन्तरं तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकमित्यादिनानेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिमित्यन्तेनैतदेव दर्शयति । तस्मादैहिकमामुष्मिकं वा विद्याजन्म प्रतिबन्धक्षयापेक्षयेति स्थितम् ॥**

---

सांगून व त्या योगभ्रष्ट पुरुषाला पुण्यवान् लोकांना मिळणारे लोक प्राप्त होत असल्याचें व साधुकुलांत तो जन्मास येत असल्याचें कथन करून नंतर "त्या योग्यांच्या कुलामध्यें त्याला ती पूर्व देहामध्यें असलेली बुद्धि प्राप्त होते" इत्यादि ग्रंथापासून तों "अनेक जन्मामध्यें संपादन करून ठेविलेल्या संस्कारांमुळें तत्त्वसाक्षात्कार प्राप्त झाला असतां तो मुक्तीस जातो" येथपर्यंतच्या ग्रंथानें भगवान् वासुदेवांनीं हेंच दर्शविलें आहे. तस्मात्, ज्ञान हें प्रतिबंधनाशावर अवलंबून असल्यामुळें इहजन्मीं अथवा जन्मांतरीं तें प्राप्त होत असल्याचें सिद्ध आहे.

( मधुसूदनसरस्वतींनीं " एतत्त्रयमप्याश्चर्यमात्मा तज्ज्ञानं ज्ञाता चेति एवमग्रेपि कर्मणि क्रियायां कर्तरि चाश्चर्यवदिति योज्यम् " असें लिहून आत्मा, आत्मज्ञान आणि आत्मज्ञानी ही तिन्ही दुर्लभ आहेत असें दर्शविलें आहे. परंतु, श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः । आश्चर्योस्य वक्ता कुशलोस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः " ह्या मूलभूत कठश्रुतीकडे लक्ष्य दिलें असतां " कर्ता आणि क्रिया ह्मणजे आत्मज्ञानी व आत्मज्ञान होणें हीं दोन अद्भुत गोष्टीप्रमाणें दुर्लभ आहेत आणि ह्मणून आत्मा दुर्ज्ञेय आहे असें जें तात्पर्य भाष्यकारांनीं काढिलें आहे तेंच बरोबर आहे. कारण, सदर्हू श्रुतीमध्यें " आश्चर्यः " ह्या पदाचा संबंध आत्मवाचक पदाकडे नसून ज्ञाता, वक्ता ह्या शब्दांकडेच आहे. तात्पर्य, भाष्यकारांच्या विरुद्ध असलेलें मधुसूदनांचें लिहिणें मूलभूत श्रुतीशीं जुळत नसल्यामुळें ग्राह्य नाहीं. त्याचप्रमाणें " श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् " ह्या चतुर्थ चरणाचें व्याख्यान मधुसूदनसरस्वतींनीं भाष्यविरुद्ध करून आचार्यांचें भाष्य चुकलें आहे असें आपल्या गूढार्थदीपिकेंत उघड उघड सूचित केलें आहे. करितां, ह्यांच्या दीपिकेचा प्रकाश शांकरभाष्यरूप सूर्यापुढें कितपतसा पडत आहे तो पाहूं. हे ह्मणतातः—" श्रुत्वाप्येनं वेदेति...श्रुत्वा चैनं मनननिदिध्यासनपरिपाकाद्वेदापि साक्षात्करोत्यपि आश्चर्यवत् । तथा चाश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमित्यत्र व्याख्यातम् ।... ननु यः श्रवणमननादिकं करोति स आत्मानं वेदेति किमाश्चर्यमत आह न चैव कश्चिदिति । चकारः क्रियाकर्मपदयोरनुषङ्गार्थः । कश्चिदेनं नैव वेद श्रवणादिकं कुर्वन्नपि तदकुर्वंस्तु न वेदेति किमु वक्तव्यम् ।... यदि तु श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चिदित्येव व्याख्यायेत तदा आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्ट इति श्रुत्यैकवाक्यता न स्यात् । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वत इति भगवद्वचनविरोधश्चेति विद्वद्भिरविनयः क्षन्तव्यः ॥ " ह्या मधुसूदनांच्या ह्मणण्याचें तात्पर्यः— " मुमुक्षु

पुरुष श्रवण केल्यावर मनन आणि निदिध्यास ह्यांच्या परिपाकानें अपरोक्षत्वानें ह्या आत्म्याला आश्चर्यवत् जाणतोही. आश्चर्यवत् कसें जाणतो ह्याचें स्पष्टीकरण " आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् " ह्या ठिकाणीं केलें आहे. " अहो, जो श्रवणमननादिक करितो तो आत्म्याला जाणितो ह्यांत आश्चर्य तें काय ? " ह्मणून शंका येईल ह्याकरितां " न चैव कश्चित् " असें ह्मटलें आहे, " न चैव " ह्या ठिकाणचा चकार, " वेद " हें क्रियापद आणि " एनं " हें कर्म अनुवृत्त होत आहे, येवढें दर्शविण्याकारितां आहे. तेव्हां श्रवणादिक करीत असतां-नाही जर एकाद्याला ह्या आत्म्याचा साक्षात्कार होतच नाहीं तर तें न करणाऱ्याला होत नाहीं हें काय सांगावें ? " श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ' ह्या श्लोकपादाची व्याख्या " श्रुत्वाप्येनं वेद " आणि " न चैव कश्चित् " अशीं दोन वाक्यें न करितां यथाश्रुत एकच वाक्य समजून जर केली तर " आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः " ह्या श्रुतीशीं एकवाक्यता होत नसून " यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः " ह्या भगवदुक्तीशींही विरोध येतो. ह्यास्तव, हे दोष टाळण्याकरितां आह्मांला जें भाष्यादिकांविरुद्ध व्याख्यान करणें भाग पडलें त्याबद्दल आमच्या अविनयाची विद्वानांनीं क्षमा करावी. " ह्याप्रमाणें मधुसूदन-सरस्वती भाष्य बरोबर नाहीं असें उघड उघड आपल्या दीपिकेंत ह्मणत आहेत. परंतु, हें त्यांचें ह्मणणें योग्य नाहीं. कारण, " श्रुत्वा-प्येनं वेद न चैव कश्चित् " ह्या श्लोकपादाचें व्याख्यान भाष्यकारांनीं " श्रुत्वा दृष्टोक्त्वाप्येनं वेद न चैव कश्चित् " असें केलें असून त्या व्याख्यानांत " अपि " ह्या पदाचा अन्वय " कश्चित् " ह्या पदाकडे न करितां " श्रुत्वा " वगैरे पदांकडे केलेला आहे. " कश्चिदपि न वेद " असा अन्वय जर केला असतां तर मधुसूदनसरस्वतींचें ह्मणणें कदाचित् बरोबर ठरलें असतें. " आत्मविषयक श्रवण, चर्चा आणि परोक्षज्ञान झालें असूनही नित्यनैमित्तिक कर्मांच्या योगानें ज्याची अंतःकरणशुद्धि

झाली नसेल त्या भाग्यहीन पुरुषाला आत्म्याचा अपरोक्ष साक्षात्कार होत नाहीं तो नाहींच " हा आचार्यांच्या भाष्याचा आशय असून " शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः " ह्या श्रुतीशीं " श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् " ह्या श्लोकपादाची एकवाक्यता आहे आणि "आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः " ह्या श्रुतीशीं " आश्चर्यवत्पश्यति काश्चिदेनम् " ह्या चरणाची एकवाक्यता असल्याचें पूर्वीं दर्शविलेंच आहे. " यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः " ह्या भगवदुक्तीचीही " आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् " ह्या श्लोकपादाशीं एकवाक्यता आहेच आहे. शिवाय " य आत्मानं पश्यति स आश्चर्यतुल्यो यो वदति यश्च शृणोति सोनेकसहस्रेषु कश्चिदेव भवति " ह्या भाष्यांतील पंक्तीकडे लक्ष्य दिलें असतां " यततामपि० तः " ह्या स्मृतीशीं विरोध येण्यास जागाच रहात नाहीं. बरें इतकें असूनही मधुसूदनसरस्वतींचें व्याख्यान निर्दोष असेल ह्मणावें तर त्याचाही अभावच. " आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् " ह्या चरणाच्या व्याख्यानांत " समाधिपरिपाकेन साक्षात्करोति...कश्चिदेव न तु सर्वः । तथा यः कश्चिदेनं पश्यति स आश्चर्यवत् " असें ह्मटलें असून शेवटल्या चरणांतील " श्रुत्वाप्येनं वेद " ह्या भागाच्या व्याख्यानांत " श्रुत्वा चैनं मननिदिध्यासनपरिपाकाद्वेदापि साक्षात्करोत्यपि आश्चर्यवत् " असें ह्मटलें आहे. तेव्हां वस्तुतः पाहूं गेलें असतां " साक्षात्करोति " हा मुख्य भाग पहिल्या व चवथ्या चरणांतील व्याख्यानांत जर सारखाच आहे तर " श्रुत्वाप्येनं वेद " एवढेंच वाक्य समजून व्याख्यान करणें व्यर्थच आहे. सारांश, मधुसूदनसरस्वतींनीं " आश्चर्यवत्पश्यति० न चैव कश्चित् " ह्या श्लोकांत चोहोंच्या ऐवजीं जे पांच प्रकार दर्शविले आहेत त्यांतील चवथा प्रकार पहिल्या प्रकाराशीं वस्तुतः भिन्न नसल्यामुळें त्यांच्या व्याख्यानावर पुनरुक्ति दोष येतो. " आश्चर्यवद्वदति तथैव चान्यः " ह्या चरणाचें व्याख्यान मधुसूदनसरस्वतींनीं सरळ न करितां क्लिष्ट

कल्पना काढून भाष्यविरुद्ध " यथा जानाति तथैव वदति । एनमित्य-नुकर्षणार्थश्चकारः स चान्यः सर्वजनविलक्षणः । न तु यः पश्यति ततोन्य इति । " असें केलें आहे तेंही चिंत्यच आहे. " अथवा न चैव कश्चिदित्यस्य सर्वत्र संबन्धः " ( किं वा " न चैव कश्चित् " ह्या पदांचा अन्वय सर्वत्र करावा ) असें शेवटीं लिहून मधुसूदनसरस्व-तींनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान वेगळें करण्याची दिशा दाखविली आहे. परंतु, तीही बरोबर नाहीं. कारण, " आश्चर्यवत्पश्यति कश्चिदे० कश्चित् " ह्या श्लोकांतील शब्दरचनेवरून " पुष्कळांना आत्मसाक्षात्कार होत नसून क्वचित् एकाद्यालाच होतो " असा अर्थ असल्याचें स्पष्ट दिसत आहे. " न चैव कश्चिदेनं पश्यति " ह्याचा अर्थ एकाद्यालाच आत्मसाक्षात्कार होत नाहीं ह्मणजे अर्थात् पुष्कळांना होतो असा होणार असल्यामुळें तो जगताच्या अनुभवाशीं विरुद्ध आहे इतकेंच नव्हे परंतु, " श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः " ह्या मूलभूत श्रुतीलाही विरुद्ध आहे आणि ह्मणूनच त्याज्य आहे. असो. भाष्यरूप सूर्याचा प्रकाश चांगला उज्ज्वल पडला असल्यामुळें अंधकाराची कल्पना करून मधुसूदनासारिख्यांना आपली दीपिका वगैरे पुढें करण्याचें कारणच नाहीं आणि ह्मणूनच विद्वज्जनांनीं असल्या अविनयाबद्दल " ह्मणजे उद्धटपणाबद्दल त्यांची क्षमा करण्याचेंही कारण नाहीं. महाभारतटीकाकार नीलकंठपंडित ह्यांनीं—" कश्चि-ज्ज्ञातात्मतत्त्व एनमतीतानन्तरश्लोकोक्तं भूतग्राममाश्चर्यवदाश्चर्यम-द्भुतं स्वप्नमायेन्द्रजालादिकं तेन तुल्यमाश्चर्यवत्तथाभूतं पश्यति । तथा कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति । ... तदिदं सर्वव्यवहारास्पदस्यापि प्रपञ्चस्य मिथ्यात्वोपपादनमत्याश्चर्यमित्यर्थः । तथैनं प्रपञ्चमन्य आश्चर्यवच्छृ-णोति ... तथा कश्चिदेनं प्रपञ्चं प्रत्यगनन्यत्वेन श्रुत्वापिशाब्दा-दुक्त्वा स्वप्नादिदृष्टान्तैरुपपाद्य ध्यानेन च साक्षात्कृत्वापि तत्त्वतो न वेद न जानाति " ह्याप्रमाणें ह्या श्लोकाचें व्याख्यान भाष्यविरुद्ध केलें आहे तेंही

अनेक दोषांनीं भरलेलें असल्यामुळें त्याज्यच आहे. हवीं तितकीं पदें मागल्या अथवा पुढल्या श्लोकांतही नसलेलीं अध्याहृत घ्यावीं लागतात हा पहिला दोष. "अव्यक्तादीनि भूतानि ० तत्र का परिदेवना" ह्या मागल्या श्लोकांतील व "देही नित्यमवध्योयं ० भूतानि न त्वं शोचितुमर्हसि" ह्या पुढल्या श्लोकांतील भूतशब्दाचा अर्थ देहेन्द्रियसंघातरूप प्राणी असाच असल्याचें सिद्ध झालें असल्यामुळें "एनम्" ह्या सर्वनामानें "पंचमहाभूतांचा समुदाय" असा अर्थ घेतां येत नसतांना तो घेणें हा दुसरा दोष. "प्रपंच हा शब्द चालू प्रकरणांत मुळींच नसल्यामुळें त्या नसत्या प्रपंचशब्दाबद्दल "एनम्" हें सर्वनाम मानणें हा तिसरा दोष. "अयम्", "एनम्" ह्या पदांनीं आतांपर्यंत आत्म्याचाच परामर्श होत असल्याचें सिद्ध असतांना ह्याच श्लोकांमध्यें "एनम्" ह्या पदानें आत्म्याचा परामर्श होतो असें न समजल्यास प्रकरणविरोध येतो हा चवथा दोष आणि "श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृ ० नुशिष्टः" ह्या मूलभूत श्रुतीशीं विरोध येतो हा पांचवा दोष. नीलकंठांनीं आपलें हें व्याख्यान बरोबर नाहीं असें समजूनच कीं काय न कळें "यद्वा" असें ह्मणून दुसऱ्या तऱ्हेनें व्याख्यान केलें आहे. परंतु, फक्त शब्दरचनेंत थोडासा फेरफार करून तें बहुतेक मधुसूदनी टीकेंतीलच उतरून घेतलें असल्यामुळें त्याचें वेगळें खंडन करण्याचें प्रयोजन नाहीं. ज्ञानेश्वर महाराजांनीं "आणि बाप पुढा जाये । ते घेत पाउलाची सोये । बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ॥ तैसा व्यासाचा मागोवा घेत । भाष्यकारातें वाट पुसत । अयोग्यही मी न पवत । कें जाइन ॥" असें लिहिलें असूनही ह्या श्लोकाचें व्याख्यान "भाष्यकारांना वाट न पुसतां" भाष्यविरुद्ध केलें आहे. ते ह्मणतातः—"एक अंतरीं निश्चल । जे निहाळिता केवळ । निसरले सकळ । संसारजात ॥ एका गुणानुवाद करितां । उपरती होऊनि चित्ता । निरवधि तल्लीनता । निरंतर ॥ एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले ।

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥
स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥

---

अथेदानीं प्रकरणार्थ उपसंह्रियते देही नित्य० शोचितुमर्हसि ॥ ३० ॥ सर्वस्य प्राणिजातस्य देहे वध्यमानेऽप्ययं देही न वध्यो यस्मात्तस्माद्भीष्मादीनि सर्वाणि भूतान्युद्दिश्य न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

---

एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥ जैसे सरिताओघ समस्त । समुद्रामाजीं मिळत । परी मावीते न समात । परतले नाहीं ॥ तैसिया योगीश्वरांचिया मती । मिळणीं सवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ती । भजतीचि ना ॥ " हें ज्ञानेश्वर महाराजांचें व्याख्यान त्यांच्याच ह्मणण्याप्रमाणें ज्ञानेश्वरीला आधारभूत असलेल्या भाष्याचे विरुद्ध असल्यामुळें योग्य आहेच असें ह्मणतां येत नाहीं हें उघड आहे. ह्या व्याख्यानावर काय आक्षेप येतात ते कांहीं प्रसिद्ध कारणांस्तव आणि विस्तरभयास्तव येथें दर्शविले नाहींत २९).

हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, प्राणिमात्रांच्या देहामध्यें असलेला हा आत्मा सर्वदां अवध्यच आहे. तस्मात्, कोणत्याच प्राण्यांकरितां तुला शोक करणें योग्य नाहीं ॥ ३० ॥

ह्याप्रमाणें आत्म्याचें दुर्बोधत्व दर्शविल्यानंतर भगवान् श्रीकृष्णांनीं " देही नित्य ० तुमर्हसि " ह्या श्लोकानें आत्मनित्यत्वाविषयीं चाललेल्या प्रकरणाचा उपसंहार केला आहे. ज्याअर्थी सर्व प्राणिसमुदायाच्या देहाचा घात होऊं लागला असतांही त्यांत असलेल्या ह्या आत्म्याचा घात होणें अशक्य आहे त्याअर्थीं भीष्मप्रभृति सर्वही प्राण्यांना उद्देशून तुला शोक करणें योग्य नाहीं ३०.

**इह परमार्थतत्त्वापेक्षायां शोको वा मोहो वा न संभवती-त्युक्तं न केवलं परमार्थतत्त्वापेक्षायामेव स्वधर्ममपि चावेक्ष्य० न विद्यते ॥ ३१ ॥ स्वधर्ममपि स्वो धर्मः स्वधर्मः क्षत्रियस्य युद्धं तमप्यवेक्ष्य त्वं न विकम्पितुं प्रचलितुं नार्हसि । स्वाभाविका-द्धर्मादात्मस्वाभाव्यादित्यभिप्रायः । तच्च युद्धं पृथिवीजयद्वारेण धर्मार्थं प्रजारक्षणार्थं चेति धर्मादनपेतं परं धर्म्यं तस्माद्धर्म्या-द्युद्धाच्छ्रेयोन्यत्क्षत्रियस्य न विद्यते हि यस्मात् ॥ ३१ ॥**

---

अरे, स्वधर्माकडे लक्ष्य देऊन पाहिलेस तरी सुद्धां तुला ह्या युद्धा-पासून निवृत्त होणें अयोग्य आहे. कारण, धर्माला धरून असलेल्या युद्धावांचून क्षत्रियाला दुसरी श्रेयस्कर गोष्ट कोणतीही नाहीं ॥ ३१ ॥

ह्या ठिकाणीं ( ह्मणजे " देही नित्यमवध्योयं० मर्हसि " ह्या श्लोका-मध्यें ) वस्तुतः आत्मतत्त्वाचा विचार केला असतां शोक अथवा मोह संभवत नाहीं असें सांगितलें. आतां वस्तुतः केवळ आत्मतत्त्वाचा विचार केला असतां शोक अथवा मोह संभवत नाहीं इतकेंच नव्हें परंतु, स्वधर्माकडे लक्ष्य दिलें असतांही शोक अथवा मोह होणें संभवनीय नाहीं; असें " स्वधर्ममपि० न विद्यते " ह्या श्लोकांत दर्शविलें आहे. स्वतःचा जो धर्म तो स्वधर्म. युद्ध हा क्षत्रियाचा स्वधर्म होय. तेव्हां त्या युद्धरूप स्वधर्माकडे पाहिलें असतांही ह्मणजे धर्मशास्त्रदृष्ट्या स्वध-र्माचा विचार केला असतांही ( शोक व मोह ह्यांनीं व्याप्त होऊन ) स्वाभाविक धर्मापासून ह्मणजे स्ववर्णाश्रमाला उचित अशा युद्धकर्मापासून निवृत्त होणें तुला योग्य नाहीं. कारण, ज्याअर्थीं युद्ध हें पृथिवीजय-द्वारा यज्ञादिधर्मकार्यार्थ आणि प्रजारक्षणार्थ कर्तव्य असल्यामुळें उत्कृष्टप्रकारचें धर्म्य आहे ह्मणजे धर्माला सोडून नाहीं. त्याअर्थीं त्या धर्म्य युद्धाहून क्षत्रियाला दुसरें श्रेयःसाधन कोणतेंही नाहीं. ( सारांश, मोक्षरूप श्रेयाची इच्छा करणाऱ्याही तुज अर्जुनाला स्वधर्मरूप

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥**
**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं सङ्ग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥**

---

कुतश्च युद्धं कर्तव्यमित्युच्यते यदृच्छया० मीदृशम् ॥ ३२ ॥ यदृच्छया चाप्रार्थितमागतमुपपन्नं स्वर्गद्वारमपावृतमुद्घाटितं य ईदृशं युद्धं लभन्ते क्षत्रिया हे पार्थ किं न सुखिनस्ते ॥ ३२ ॥

एवं कर्तव्यताप्राप्तमपि अथ चेत्त्व० मवाप्स्यसि ॥ ३३ ॥ अथ चेत्त्वमिमं धर्म्यं धर्मादनपेतं सङ्ग्रामं युद्धं न करिष्यसि

---

युद्धानें जय प्राप्त करून घेऊन यज्ञादिकांचें अनुष्ठान, प्रजापालन वगैरे करणें ह्यावांचून दुसरें मोक्षप्राप्तीचें साधन नाहीं ) ३१.

हे पार्था, युद्ध ह्मणजे केवळ उघडून आपोआप प्राप्त झालेलें स्वर्गाचें द्वारच होय. तस्मात्, अशा प्रकारचें युद्ध ज्यांना प्राप्त होतें ते क्षत्रिय सुखी नव्हेत कां रे ? ॥ ३२ ॥

युद्ध कां करावें ? अशी शंका अर्जुनाकडून येईल ह्मणून भगवान् श्रीकृष्ण “ यदृच्छया० युद्धमीदृशम् ” ह्या श्लोकानें तिचें निराकरण करितात. मागितल्यावांचून चालत आलेलें हा “ यदृच्छयोपपन्नम् ” ह्या शब्दाचा अर्थ होय. ‘ अपावृतं ’ ह्मणजे उघडलेलें. हे कुंतीपुत्रा अर्जुना, न मागतां उघडून आपोआप प्राप्त झालेलें स्वर्गद्वार कीं काय अशा प्रकारचें युद्ध ज्यांना प्राप्त होतें ते क्षत्रिय खरोखर सुखी नव्हेत काय ? ( हा ह्या श्लोकांतील आशय होय ) ३२.

तस्मात्, धर्माला सोडून नसलेला हा संग्राम जर तूं न करशील तर स्वधर्म आणि कीर्ति ह्यांना मुकून तूं पापी मात्र होशील ॥ ३३ ॥

—अथ ह्मणजे कर्तव्यता ह्या नात्यानें प्राप्त झालेलें असें हें—धर्माला सोडून नसलेलें युद्ध जर तूं न करिशील तर स्वधर्म आणि महादेवप्र-

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥
भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यासि लाघवम् ॥ ३५ ॥

---

चेत्ततस्तदकरणात्स्वधर्मं कीर्तिं च महादेवादिसमागमनिमित्तां हित्वा केवलं पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥

न केवलं स्वधर्मपरित्यागः । अकीर्तिं चापि भूतानि० दतिरिच्यते ॥ ३४ ॥ अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति ते तवाव्ययां दीर्घकालाम् । धर्मात्मा शूरश्चेत्येवमादिभिर्गुणैः संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते । संभावितस्य चाकीर्तेर्वरं मरणमित्यर्थः ॥ ३४ ॥

किं च भयाद्रणा० लाघवम् ॥ ३५ ॥ भयात्कर्णादिभ्यो

---

भूतींशीं समागम झाल्यामुळें संपादन केलेली कीर्ति घालवून केवळ पापाचा मात्र वांटेकरी होऊन बसशील ३३.

इतकेंच नव्हे; परंतु, कल्पांतपर्यंत लोक तुझ्या अपकीर्तीचाही डांगोरा पिटीत राहतील. अरे, संभावित पुरुषाला तर अपकीर्ति मरणापेक्षांही वाईट आहे ॥ ३४ ॥

केवळ स्वधर्म आणि कीर्ति ह्यांचा त्याग होईल इतकेंच नव्हे परंतु, लोक दीर्घकालपर्यंत तुझ्या अपकीर्तीची काहणी सांगत बसतील. अरे, धर्मात्मा, शूर इत्यादिप्रकारच्या गुणांनीं जो लोकांना मान्य झालेला आहे त्याची अपकीर्ति मरणापेक्षांही अधिक आहे. सारांश, अपकीर्ति होण्यापेक्षां संभाविताला मरण येणें बरें ३४.

शिवाय, हा भीतीनें युद्धापासून निवृत्त झाला असें तुला महारथी समजतील आणि ह्याप्रमाणें तूं प्रथम बहुगुणी ह्मणून मान्य होऊन पुनरपि त्या महारथ्यांपाशीं तुझी किंमत कमी होईल ॥ ३५ ॥

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः ।
निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

---

रणाद्युद्धादुपरतं निवृत्तं मंस्यन्ते चिन्तयिष्यन्ति न कृपयेति त्वां महारथा दुर्योधनप्रभृतयः । येषां च त्वं दुर्योधनादीनां बहुमतो बहुभिर्गुणैर्युक्त इत्येवं मतो बहुमतो भूत्वा पुनस्त्वं यास्यसि लाघवं लघुभावम् ॥ ३५ ॥

किंच अवाच्यवादांश्च० ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥ अवाच्यवादानवक्तव्यान्वादांश्च बहूननेकप्रकारान्वदिष्यन्ति तवाहिताः शत्रवो निन्दन्तः कुत्सयन्तस्तव त्वदीयं सामर्थ्यं निवातकवचादियुद्धनिमित्तं तस्मात्ततो निन्दाप्राप्तेर्दुःखाद्दुःखतरं नु किम् । ततः कष्टतरं दुःखं नास्तीत्यर्थः ॥ ३६ ॥

---

आणखी असें कीं कर्णादिकांच्या भीतीनें युद्धापासून हा उपरम पावला असें तुझ्याविषयीं दुर्योधनप्रभृति महारथी मनामध्यें आणितील; दयेमुळें हा युद्धापासून निवृत्त झाला असं समजणार नाहींत. तेव्हां, ज्या दुर्योधनप्रभृति महारथ्यांना तूं ( आजमित्तीपर्यंत ) बहुगुणांनीं युक्त ह्मणून मान्य आहेस त्यांचे ठिकाणीं तुला लघुत्व प्राप्त होईल. (सारांश) जे दुर्योधनप्रभृति महारथी आज तुला बहुगुणांनीं संपन्न ह्मणून समजत आहेत तेच तुला आपल्यापेक्षां कमी समजूं लागतील ) ३५.

तुझ्या सामर्थ्याची निंदा करण्याकरितां तुझे शत्रु तोंडाबाहेर काढण्यासही अयोग्य असे अनेक प्रकारचे बोल तुला लावितील. तस्मात्, त्यापेक्षां अधिक दुःखदायक असें काय बरें आहे ? ॥ ३६ ॥

निवातकवचादिकांबरोबर युद्ध केल्यामुळें प्रसिद्धीस आलेल्या तुझ्या सामर्थ्याची निंदा करूं इच्छिणारे तुझे शत्रु उच्चारण्यासही अयोग्य असे अनेक प्रकारचे अपवाद तुला लावितील. तस्मात्, त्यांच्यापासून निंदा प्राप्त होणें ह्या दुःखापेक्षां अधिक दुःखदायक तें काय आहे बरें ?

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥
सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

---

युद्धे पुनः क्रियमाणे कर्णादिभिः । हतो वा प्राप्स्यसि० कृतनिश्चयः ॥ ३७॥ हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं हतः सन्स्वर्गं प्राप्स्यसि जित्वा वा कर्णादीञ्शूरान्भोक्ष्यसे महीम् । उभयथापि ते लाभ एवेत्यभिप्रायः । यत एवं तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः । जेष्यामि शत्रून्मरिष्यामि वेति निश्चयं कृत्वेत्यर्थः ॥ ३७ ॥

तत्र स्वधर्म इत्येवं युध्यमानस्योपदेशमिमं शृणु सुखदुःखे०

---

त्यापेक्षां अधिक क्लेशकारक असें कोणतेंही दुःख नाहीं. हा " ततो दुःखतरं नु किम् " ह्या चरणाचा अर्थ होय ३६.

हे कुंतीपुत्रा, ( युद्धामध्यें ) तूं वध पावलास तर तुला स्वर्ग प्राप्त होईल आणि विजयी झालास तर तूं पृथ्वीचा उपभोग घेशील. तस्मात्, तूं निश्चय करून युद्धाला उभा रहा ॥ ३७ ॥

युद्ध चालूं झालें असतांना कर्णादिकांनीं तुझा वध केला तर तुला स्वर्गप्राप्ति होईल; बरें कर्णप्रभृति शूरांना तूं जिंकिलेंस तर तूं पृथ्वीचा उपभोग घेशील. सारांश, दोहोंपैकीं कांहीं झालें तरी तुझा आपला लाभच आहे. करितां, असें जर आहे तर, हे कुंतीपुत्रा अर्जुना, शत्रूंना जिंकीन किंवा मरून जाईन असा निश्चय करून तूं युद्धाला उभा रहा. " शत्रूंना जिंकीन किंवा मरून जाईन असा निश्चय करून " हा ह्या ठिकाणीं " कृतनिश्चयः " ह्या पदाचा अर्थ होय ३७.

सुखदुःखें, लाभालाभ आणि जयपराजय हीं सारखीं समजून तूं युद्धाला उद्युक्त हो; ह्मणजे असें केल्यानें तुला पाप लागणार नाहीं ॥ ३८ ॥

**पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥ सुखदुःखे समे तुल्ये कृत्वा रागद्वेषावकृत्वेत्येतत् । तथा लाभालाभौ जयाजयौ च समौ कृत्वा ततो युद्धाय युज्यस्व घटस्व नैवं युद्धं कुर्वन्पापफलमवाप्स्यसि । एष तवोपदेशः प्रासङ्गिकः शोकमोहापनयनाय लौकिको न्यायः स्वधर्ममपि चावेक्ष्येत्याद्यैः श्लोकैरुक्तो न तु तात्पर्येण । परमार्थदर्शनं त्विह प्रकृतं तच्चोक्तमुपसंहरत्येषा तेभिहितेति शास्त्रविषयविभागप्रदर्शनाय ॥ ३८ ॥**

---

स्वधर्म ह्या नात्यानें युद्ध हें कर्तव्यकर्म आहे ह्मणून स्वधर्म ह्या बुद्धीनें युद्ध करणाऱ्याला उपयुक्त असलेला हा उपदेश श्रवण कर. सुख व दुःख हीं दोन्हीं सम ह्मणजे तुल्य मानून आणि त्याचप्रमाणें लाभालाभ व जयपराजय हीं तुल्य समजून तूं युद्धाला सिद्ध हो. ह्मणजे ह्याप्रमाणें युद्ध करणाऱ्या तुला पाप लागणार नाहीं. ( सारांश, सुख, त्याचें साधन लाभ व त्याचेंही साधन जय ह्यांविषयीं प्रेम अथवा दुःख, त्याचें कारण लाभशून्यत्व व त्याचेंही कारण पराजय ह्यांविषयीं तूं द्वेषही न करितां युद्धाला तयार हो; ह्मणजे तुला पाप लागणार नाहीं). हा जो तुला उपदेश केला आहे तो " स्वधर्ममपि चावेक्ष्य " इत्यादि आठ श्लोकांनीं तुझा शोक व मोह दूर होण्याकरितां एक लोकप्रसिद्ध न्याय तुला कथन केला आहे. हें करण्यामध्येंच पुरुषार्थ आहे अशा आशयानें हा न्याय कथन केलेला नाहीं. ह्या ठिकाणीं परमार्थज्ञानाचें प्रकरण चालूं आहे आणि त्या परमार्थज्ञानविषयक प्रतिपादित प्रकरणाचा उपसंहार, शास्त्रांतील विषयविभाग दर्शविण्याकरितां, " एषा तेभिहिता " ह्या श्लोकानें केलेला आहे ३८.

( कांहीं स्वधर्मवेत्ते लोक ज्याप्रमाणें शोकांत व मोहांत न पडतां स्वधर्माचें आचरण करितात त्याचप्रमाणें स्वधर्माकडे लक्ष्य दिलें असतां शोक व मोह ह्यांनीं ग्रस्त होऊन युद्धरूप स्वधर्मापासून भ्रष्ट होणें तुला

एषा तेऽभिहिता साङ्ख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

इह हि दर्शित पुनः शास्त्रविषयविभाग उपरिष्टाज्ज्ञान योगेन साङ्ख्यानां कर्मयोगेन योगिनामिति निष्ठाद्वयविषयं शास्त्रं सुखं प्रवर्तिष्यते श्रोतारश्च विषयविभागेन सुखं ग्रही-

योग्य नाहीं हें दर्शविण्याकरितां " स्वधर्ममपि चावेक्ष्य " इत्यादि आठ श्लोकांनीं तुला जो उपदेश केला आहे तो " अथ चैनं नित्यजातं " वगैरे-प्रमाणें प्रासंगिक ह्मणून एक लौकिक न्याय कथन केला आहे व तो तूं ऐकून शोक व मोह ह्यांचा त्याग करावास ह्मणून कथन केला आहे. ह्यांत सांगितल्याप्रमाणें वागण्यांतच पुरुषार्थ आहे. अशा बुद्धीनें ह्या आठ श्लोकांनीं तुला उपदेश केलेला नाहीं. " न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः। न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् । " येथपासून आत्मज्ञानप्रकरण सुरू झालें आहे, " न जायते म्रियते वा कदाचिन्नायं० शरीरे " वगैरे श्लोकांनीं त्याचें प्रतिपादन केलेलें आहे आणि ह्या प्रतिपादित प्रकरणाचा उपसंहार " एषा तेऽभिहिता० बन्धं प्रहास्यसि " ह्या पुढल्या श्लोकानें केलेला आहे व तो गीताशास्त्रांतील विषयविभाग दर्शविण्याकरितां केलेला आहे हें " एष तवोपदेशः प्रास० विषयविभागप्रदर्शनाय " ह्या भाष्याचें तात्पर्य होय ३८ ).

हें आत्मविषयक ज्ञान तुला कथन केलें. आतां हें कर्मविषयक ज्ञान तूं श्रवण कर. कारण, हे पार्था, तें ज्ञान प्राप्त झालें असतां तूं कर्मबंधापासून मुक्त होशील ॥ ३९ ॥

ह्या ठिकाणीं एकदां शास्त्रांतील विषयविभाग सुचवून ठेविला ह्मणजे पुढें " ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् " येथून निष्ठाद्वय-विषयक शास्त्र अनायासें सरळ रीतीनें प्रवृत्त होईल व विषयविभागाच्या योगानें तें श्रोत्यांनाही समजण्यास सुलभ जाईल ह्मणून " एषा ते-

ष्यन्तीत्यत आह एषा तेभिहिता० कर्मबन्धं प्रहास्यसि ॥ ३९ ॥
एषा ते तुभ्यमभिहितोक्ता साङ्ख्ये परमार्थवस्तुविवेकाविषये बुद्धिर्ज्ञानं साक्षाच्छोकमोहादिसंसारहेतुदोषनिवृत्तिकारणम् । योगे तु तत्प्राप्त्युपाये निःसङ्गतया द्वन्द्वप्रहाणपूर्वकमीश्वराराधनार्थे कर्मयोगे कर्मानुष्ठाने समाधियोगे चेमामनन्तरमेवोच्यमानां बुद्धिं शृणु तां बुद्धिं स्तौति प्ररोचनार्थम् । बुद्ध्या यया योगविषयया युक्तो हे पार्थ कर्मबन्धं कर्मैव धर्माधर्माख्यं बन्धः कर्मबन्धस्तं प्रहास्यसीश्वरप्रसादनिमित्तज्ञानप्राप्त्येत्यभिप्रायः ॥ ३९ ॥

---

भिहिता० प्रहास्यसि ॥ " असें भगवानांनीं अर्जुनाला सांगितलें आहे. सांख्यसंबंधीं ह्मणजे परमार्थवस्तुविवेकाविषयीं हीं बुद्धि ह्मणजे हें ज्ञान तुला सांगितलें. हें ज्ञान संसाराला हेतुभूत असलेल्या शोकमोहादि दोषरूप अज्ञानाच्या निवृत्तीचें प्रत्यक्ष कारण आहे. आतां त्याच्या प्राप्तीचा उपाय जो योग—ह्मणजे फलेच्छात्यागपूर्वक सुखदुःख, लाभालाभ इत्यादि द्वंद्वें ह्यांची परवा न करितां ईश्वराराधनार्थ कर्तव्य जो कर्मयोग ह्मणजे कर्मानुष्ठान—त्याविषयीं आणि समाधियोगाविषयीं ही बुद्धि ह्मणजे, आतांच सांगणार असलेलें हें ज्ञान तूं श्रवण कर. लोकांना अभिरुचि लागून त्यांची प्रवृत्ति होण्याकरितां ( बुद्ध्या युक्तो यया० स्यसि " ह्या श्लोकार्धानें ) कर्मयोगविषयक ज्ञानाची प्रशंसा केलेली आहे व "हे पार्था, त्या कर्मयोगविषयक ज्ञानानें तूं युक्त झालास ह्मणजे ईश्वरप्रसादामुळें प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञानाच्या योगानें तूं धर्माधर्मसंज्ञक कर्मरूप बंधाचा त्याग करशील " हा त्या श्लोकाचा आशय आहे. " कर्मैव बन्धः कर्मबन्धस्तम् " हा " कर्मबन्धः " ह्या समासाचा विग्रह होय ३९.

( " लोकेस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ । ज्ञानयोगेन

सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् । असा पुढें तिसऱ्या अध्यायांत शास्त्रां-तील विषयांचा विभाग सांगितला असतांना ह्या ठिकाणीं प्रथमतः तो सूचित करण्याचें कारण काय ? करितां, ह्या ठिकाणीं विषयविभाग दाखविला तो व्यर्थ आहे" असें ह्मणतां येणार नाहीं. कारण, प्रथमतः सुचवून ठिविलें असतां शास्त्राची सुरवात करण्याला पुढें उपोद्घाताची वगैरे विशेष खटपट न पडून श्रोत्यांनाही तें शास्त्र अगदीं अश्रुत विषया-प्रमाणें समजण्यास जड जाणार नाहीं एतदर्थ प्रथमतःच विषयविभाग सुचवून ठेविला आहे. हें " इह हि दर्शिते पुनः शास्त्रविषयविभागे०सुखं ग्रहीष्यन्ति " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. अज्ञानाची निवृत्ति करण्यास ज्ञानाला दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचें साहाय्य लागत नाहीं. इतर हजार गोष्टी असून ज्ञानाचा अभाव असेल तर अज्ञानाची निवृत्ति होणार नाहीं आणि दुसरें कांहीं एक नसूनही केवळ ज्ञान असेल तर अज्ञानाची निवृत्ति होते हें दर्शविण्याकरितां " साक्षाच्छोकमोहादिसंसारहेतुदोष-निवृत्तिकारणम् " असें आचार्यांनीं भाष्यांत लिहिलें आहे. मुक्तीला उपयोगीं पडणारें ज्ञान उत्पन्न होण्याला उपायभूत हा " तत्प्राप्त्यु-पाये " ह्या भाष्यांतील पदाचा अर्थ होय. निःसंगता ह्मणजे फलेच्छा-राहित्य. तत्त्वज्ञान झाल्यावांचून कर्मबंधांतून सुटका होणें शक्य नाहीं. तेव्हां, कर्मानुष्ठानविषयक ज्ञानाच्या योगानें कर्मबंधाची निवृत्ति कशी होणार ? अशी कोणाला शंका आल्यास ती बरोबर आहे. तथापि, कर्मानुष्ठानानें ईश्वराची कृपा होऊन त्या कृपेमुळें जें तत्त्वज्ञान उत्पन्न होतें त्याच्या द्वारानें ह्मणजे अर्थात् परंपरासंबंधानें तरी कर्मा-नुष्ठानविषयक ज्ञान कर्मबंधाची निवृत्ति होण्यास कारणीभूत होतें हें दर्शवि-ण्याकरितां " ईश्वरप्रसादनिमित्तज्ञानप्राप्त्येत्यभिप्रायः " असें आचार्यांनीं भाष्यांत ह्मटलें आहे. " पृथाया अपत्यं पुमान्पार्थः " ही पार्थशब्दाची व्युत्पत्ति होय. अर्जुनाची माता जी कुंतिभोजराजाची कन्या तिचें पृथा हें नांव असल्यामुळें अर्जुनाला पार्थ अशी संज्ञा आहे. वस्तुतः

पार्थ ही संज्ञा सर्व कुंतीपुत्रांना असणें योग्य आहे व त्याप्रमाणें ती आहेही; परंतु, युधिष्ठिर आणि भीमसेन ह्यांपेक्षां अर्जुनालाच विशेषतः ही संज्ञा दिलेली आढळते. ह्या श्लोकांतील "पार्थ" ह्या संबोधनानें हें कर्मविषयक ज्ञान प्राप्त झालें असतां पुनः पुनः मातेच्या गर्भामध्यें जाण्याची पाळी येत नाहीं असें सुचविलें आहे )

( मधुसूदनसरस्वतींनीं "कर्मनिमित्तं बन्धमाशयाशुद्धिलक्षणं ज्ञानप्रतिबन्धं प्रकर्षेण पुनः प्रतिबन्धानुत्पत्तिरूपेण हास्यसि त्यक्ष्यसि" असें लिहून "कर्मबन्धं प्रहास्यसि" ह्या चरणांतील "कर्मबन्धं" ह्या शब्दाची विनाकारण ओढाताण केलेली आहे. "चित्ताशुद्धिरूप जो कर्मनिमित्तक ज्ञानप्रतिबंध तो कर्मबंध होय. त्याचा पुनरपि ज्ञानाला प्रतिबंध होणार नाहीं अशा रीतीनें तूं त्याग करशील," हा मधुसूदनांच्या वरील पंक्तीचा आशय होय. परंतु, स्वर्गनरकादिसाधन पुण्य व पाप ह्या दोहोंचा समावेश कर्मशब्दानें होत असतांना कर्मपदाचा अर्थदृष्ट्या संकोच करणें योग्य नाहीं व बंधशब्दाचा अर्थ प्रतिबंध असा करण्यासही कांहीं कारण दिसत नाहीं. "ह्या कर्मविषयक ज्ञानाच्या योगानें धर्माधर्मसंज्ञक बंध नाहींसा होण्याचा संभव नाहीं हेंच कर्मपदाचा अर्थदृष्ट्या संकोच करण्यास आणि बंधशब्दाचा अर्थ प्रतिबंध असा करण्यास कारण आहे,' ह्मणून ह्मणावें तर ईश्वरप्रसादनिमित्तक ज्ञानप्राप्तीच्या द्वारानें धर्माधर्मसंज्ञक कर्मबंध नाहींसा होण्याचा संभव असल्याचें आचार्यांनीं येथील आपल्या भाष्यांत सांगून ठेविलेंच आहे. इतकेंच नव्हें परंतु, ज्ञानप्राप्तिद्वारा कर्मबंधाचा त्याग करितां येतो ही गोष्ट प्रत्यक्ष मधुसूदनांनींही दुसऱ्या ठिकाणीं कबूल केली आहे. उदाहरणार्थः—"बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते। तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्" ह्या श्लोकावरील व्याख्यानांत मधुसूदनांनींच "समत्वबुद्ध्या युक्तो जहाति परित्यजति उभे सुकृतदुष्कृते पुण्यपापे सत्त्वशुद्धिज्ञानप्राप्तिद्वारेण" असें ह्मटलें आहे. तेव्हां "ज्ञानप्राप्तिद्वारेण"

नेहाभिक्रमनाशोस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

---

किंचान्यत् । नेहाभिक्रम० त्रायते महतो भयात् ॥४०॥ नेह मोक्षमार्गे कर्मयोगेभिक्रमनाशोस्ति । अभिक्रमणमभिक्रमः प्रारम्भस्तस्य नाशो नास्ति यथा कृष्यादेः । योगविषये प्रारम्भस्य नानैकान्तिकफलत्वमित्यर्थः । किं च नापि चिकित्सावत्प्रत्यवायो विद्यते । किं तु भवति स्वल्पमप्यस्य योगधर्मस्यानुष्ठितं त्रायते रक्षति महतः संसारभयाज्जन्मजरामरणादिलक्षणात् ॥ ४० ॥

---

हें पुढल्या श्लोकांत जर मान्य आहे तर ह्या श्लोकांत तें मान्य न करण्याला कारण काय ? सारांश, " कर्मैव धर्माधर्माख्यं बन्धस्तं प्रहास्यसीश्वरप्रसादनिमित्तज्ञानप्राप्त्या " असें भाष्यकारांनीं लिहिलेलेंच योग्य असून मधुसूदनांनीं जी भाष्यविरुद्ध ओढाताण केली आहे तिचें प्रयोजन नाहीं ३९ )

ह्या निष्काम कर्मानुष्ठानाला आरंभ केला असतां तो निष्फल होत नसून त्यांत कांहीं वैगुण्य झाल्यास पातकही लागत नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, ह्याचें अनुष्ठान थोडें जरी झालें तरी तें मोठ्या भयापासून पुरुषाचें संरक्षण करितें ॥ ४० ॥

शिवाय, दुसरें असें कीं ह्या मोक्षमार्गरूप कर्मयोगाला केलेला आरंभ कृष्यादिकांप्रमाणें निष्फल होत नाहीं. सारांश, कर्मयोगविषयक आरंभाला अनियतफलत्व नाहीं आणि चिकित्सेप्रमाणें ह्याला प्रत्यवायही नाहीं. शिवाय, उलट असें होतें कीं ह्या योगधर्माचें अनुष्ठान थोडें जरी झालें असलें तरी तें जन्म, जरा, मरण इत्यादिप्रकारच्या मोठ्या संसारभयापासून पुरुषाला तारितें ४०.

(—आतां कर्मानुष्ठानाचें फल प्राप्त होईलच असा नियम नसल्यानें आणि अनेकप्रकारच्या अनर्थांनीं कर्मानुष्ठानापासून दोषही

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन ।
बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

---

लागण्याचा संभव असल्यामुळें कर्मानुष्ठानाच्या योगानें ज्ञानप्राप्तिद्वारा बंधनांतून पुरुष मुक्त होईल ह्या ह्मणण्यावर विश्वास ठेवावा कसा ? " ह्मणून अर्जुन कदाचित् शंका करील असें समजून भगवान् ह्मणतातः— कर्मानुष्ठानाच्या अवश्यकतेविषयीं आणखीही एक कारण आहे—— हा " अन्यच्च " ह्या भाष्याचा आशय टीकाकारांनीं काढिला असून भाष्यांतील " अन्यच्च " ह्या पदांचें स्पष्टीकरण त्यांनीं " अन्यच्च किंचिदुच्यते कर्मानुष्ठानस्यावश्यकत्वे कारणम् " असें केलें आहे. अनेक विघ्नें मध्यें येण्याचा संभव असल्यामुळें कर्मानुष्ठान सिद्धीस जाणें शक्य नाहीं व त्याचप्रमाणें कर्मानुष्ठानाचें फल जो आत्मसाक्षात्कार तो दीर्घकाल अभ्यासानें साध्य होणारा असल्याकारणानें एकाच जन्मामध्यं होण्याचा संभव असल्यामुळें कर्मी पुरुष स्वार्थाला मुकून अनर्थांत पडेल " अशी शंका अर्जुनाला येऊं नये ह्मणून " नेहाभिक्रमनाशोस्ति " असें भगवानांनीं ह्मटलें आहे. हा " नेह मोक्षमार्गे कर्मयोगेभिक्रमनाशोस्ति । अभिक्रमणमभिक्रम आरम्भस्तस्य नाशो नास्ति " ह्या भाष्याचा तात्पर्यार्थ आहे. पर्जन्यवृष्टि चांगली झाल्यास लाभ होण्याचा संभव आहे ह्या आशेनें आरंभिलेलें कृषिकर्म पर्जन्याचा वगैरे नियम नसल्यामुळें ज्याप्रमाणें सफल होतेंच असा नियम नाहीं त्याप्रमाणें ह्या निष्काम वैदिक कर्माची गोष्ट नाहीं. हा " यथा कृष्यादेः " ह्या भाष्याचा आशय होय ४० ).

हे कुरुनंदना, ह्या विषयीं निश्चित असें ज्ञान एकच आहे. जे अविवेकी पुरुष त्यांना मात्र अनेक भेदांनीं युक्त अशा अनंत बुद्धि असतात ॥ ४१ ॥

( आत्मतत्त्वविषयक आणि कर्मयोगविषयक ह्या दोन बुद्धींवांचून ह्मणजे ज्ञानावांचून काणादादिकांच्या शास्त्रामध्यें इतरही बुद्धि प्रसिद्ध

**येयं साङ्ख्ये बुद्धिरुक्ता योगे च वक्ष्यमाणलक्षणा सा व्यवसाया० योऽव्यवसायिनाम् ॥४१॥ व्यवसायात्मिका निश्चयस्वभावैकैव बुद्धिरितरविपरीतबुद्धिशाखाभेदस्य बाधिका सम्यक्प्रमाणजनितत्वादिह श्रेयोमार्गे हे कुरुनन्दन । याः पुनरितरा बुद्धयो यासां शाखाभेदप्रचारवशादनन्तोपारोनुपरतः संसारो नित्यप्रततो विस्तीर्णो भवति प्रमाणजनित-**

---

आहेत. तेव्हां आपण दोनच बुद्धि कशा सांगितल्या ह्मणून कदाचित् अर्जुन प्रश्न करील असें समजून भगवान् ह्मणतात ) ह्या मोक्षमार्गासंबंधानें आत्मज्ञानविषयक जी बुद्धि मीं कथन केली आणि कर्मविषयक जी बुद्धि मी पुढें सांगणार आहें ( त्या साध्य व साधन एतद्रूप असून त्यांचें फल प्रत्यक्ष आणि परंपरेनें एकच असल्यामुळें वस्तुतः भिन्न नसून ) ती, हे कुरुनंदना, एकच निश्चयात्मक बुद्धि आहे आणि निर्दोष अशा वेदवाक्यापासून ती उत्पन्न होणारी असल्यामुळें अप्रामाणिक अशा ज्या दुसऱ्या स्वकपोलकल्पित विपरीत बुद्धि व त्यांच्याचप्रमाणें त्यांच्या ज्या संसाराला हेतुभूत असलेल्या भिन्नभिन्न शाखा ह्यांचा बाध करणारी आहे. ( सारांश, अनुक्रमें उपेय आणि उपाय एतद्रूप असलेल्या अशा ज्या तत्त्वज्ञानविषयक व कर्मानुष्ठानविषयक दोन बुद्धि त्या अनुक्रमें साक्षात् आणि परंपरेनें संसारहेतूचा नाश करणाऱ्या आहेत.) ह्या प्रकृत बुद्धीहून विलक्षण ह्मणजे अप्रामाणिक अशा ज्या इतर बुद्धि ह्मणजे समजुती आहेत त्यांना अनेक फांटे फुटत असल्यामुळें हा अनंत व अपार संसार कधींही उपरम पावत नाहीं. ह्मणजे हा नित्य फांद्या फुटून अधिकाधिक विस्तीर्णच होत असतो आणि प्रमाणजनित जी विवेकबुद्धि ह्मणजे निर्दोष अशा वेदवाक्यापासून उत्पन्न झालेलें जें विवेकज्ञान त्याच्यामुळें अनंत भेदांनीं युक्त असलेल्या त्या विपरीत बुद्धि नाहींशा झाल्या असतां ( आधार नाहींसा

**विवेकबुद्धिनिमित्तवशाच्चोपरतास्वनन्तभेदबुद्धिषु संसारो-प्युपरमते ता बुद्धयो बहुशाखा बह्व्यः शाखा यासां ता बहुशाखा बहुभेदा इत्येतत् । प्रतिशाखाभेदेन ह्यनन्ताश्च बुद्धयः । केषाम् । अव्यवसायिनाम् । प्रमाणजनितविवेकबु-द्धिरहितानामित्यर्थः ॥ ४१ ॥**

---

झाल्या कारणानें ) संसारही ( कायम राहण्यास अशक्य होऊन ) नाहींसा होतो. त्या बुद्धि बहुशाखा आहेत ह्मणजे त्यांचेही आणखी बहुत भेद आहेत आणि प्रत्येक भेदाचे आणखी अवांतर भेद अस-ल्यामुळें त्या अप्रामाणिक बुद्धि अनंतच आहेत. परंतु, ह्या ( स्वकपो-लकल्पित आणि ह्मणूनच अप्रामाणिक अशा ) अनंत बुद्धि कोणाच्या ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, अव्यवसायी—ह्मणजे वेदवाक्यरूप प्रमाणानें उत्पन्न होणाऱ्या सदसद्विवेक बुद्धीचा ज्यांचे ठिकाणीं अभाव आहे असे—पुरुष ह्या विपरीत बुद्धींनीं युक्त असतात ४१.

( तूं उत्तमवंशांत जन्मला आहेस. ह्यास्तव तुला तर निश्चयात्मक बुद्धिच योग्य आहे. हें " कुरुनंदना " ह्या संबोधनानें सुचविलें )

( " नन्वेवं सांख्ययोगयोर्महाभयात्त्राणहेतुत्वं तुल्यं चेत्कोनयोर्वि-शेष इत्याशंक्य सांख्यानां पातशंका नास्ति योगिनां तु यावद्विदेहकै-वल्यं पातशंकास्तीत्याह व्यवसायात्मिकेति " असें अवतरण नीलकं-ठपंडितांनीं ह्या श्लोकाला दिलें आहे. ह्या अवतरणाचें तात्पर्य येणें-प्रमाणें:—" अहो, ज्ञानयोग आणि कर्मयोग हे दोन्ही जर संसार-रूप महाभयापासून रक्षण होण्यास सारखेच कारणीभूत होणारे आहेत तर ह्यांच्यांत वेगळेपणा तो काय उरला? अशी शंका येण्याचा संभव धरून ज्ञानयोगाचें अवलंबन करणाऱ्यांना संसारामध्यें पडण्याचें भय नसतें व कर्मयोगाचें अवलंबन करणाऱ्यांना विदेहमुक्ति प्राप्त होईपर्यंत संसारांत पडण्याचें भय असतें हा भेद " व्यवसायात्मिका०

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥**
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**
**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

---

**येषां व्यवसायात्मिका बुद्धिर्नास्ति ते यामिमां पुष्पितां० वादिनः ॥ ४२ ॥ यामिमां वक्ष्यमाणां पुष्पितवृक्ष इव**

---

योऽव्यवसायिनाम् " ह्या श्लोकांत दर्शविला आहे. " परंतु, नील-कंठांनीं काढिलेला हा आशय बरोबर नाहीं. कारण, कर्मयोगस्तुतिपर जें प्रकरण आहे त्यांत कर्मयोगाची निंदा केली आहे अशी शंका घेणेंच योग्य नाहीं आणि " कामात्मानः स्वर्गपराः " वगैरे ग्रंथानें सकाम पुरुषांचीच निंदा केली असल्याचें स्पष्ट दिसत आहे ४१ )

हे पार्था, भोग आणि ऐश्वर्य ह्यांच्या प्राप्तीकरितांच जिच्यामध्यें पुष्कळ विशेष कर्में कर्तव्य ह्मणून पठित आहेत व ह्मणूनच जन्मरूपच कर्मफल देणारी असून जी प्रफुल्लित पलाशवृक्षाप्रमाणें नुसती दिसण्यांतच मनोहर आहे अशा वाणीचा—अर्थवादविषयक वेदवाक्यामध्यें गढून गेलेले अविवेकी, विषयोपभोगाविषयीं तत्पर व स्वर्गसुखाच्या मागें लागलेले असे—जे पुरुष ध्यास घेऊन बसतात आणि ( स्वर्गादि-सुखप्राप्तीला साधनीभूत असलेल्या कर्मांहून ) दुसरें कांहीं एक नाहीं असें जे ह्मणत असतात त्यांच्या अंतःकरणामध्यें आत्मतत्त्वविषयक अथवा कर्मयोगविषयक बुद्धि उद्भवत नाहीं. कारण, विषय आणि ऐश्वर्य ह्यांचे ठिकाणींच आसक्त असलेल्या त्या पुरुषांची विवेकबुद्धि त्या (मोहक) वाणीच्या योगानें आच्छादित झालेली असते॥४२॥४३॥४४॥

ज्यांचे ठिकाणीं वर निर्दिष्ट केलेल्या निश्चयात्मक बुद्धीचा अभाव

**शोभमानां श्रूयमाणरमणीयां वाचं वाक्यलक्षणां प्रवदन्ति । के। अविपश्चितोऽमेधसोऽविवेकिन इत्यर्थः । वेदवादरता बह्वर्थवाद-फलसाधनप्रकाशकेषु वेदवाक्येषु रताः पार्थ नान्यत्स्वर्गपश्वा-दिफलसाधनेभ्यः कर्मभ्योऽस्तीत्येवं वादिनो वदनशीलाः॥४२॥**

---

असतो ते अशी ही पुढें सांगितलेली पुष्पित वृक्षाप्रमाणें शोभणारी ह्मणजे नुसती श्रवण होऊं लागलें असतां रमणीय वाटणारी वाक्याभा-सरूप वाणीच घेऊन बसतात. ते कोण ? ( ह्मणून विचारशील तर हे अर्जुना, ) ते बुद्धिरहित ह्मणजे अविवेकी पुरुष होत. हे पार्था, ते पुरुष वेदवादरत ह्मणजे अनेक अर्थवादांचें आणि त्यांतील फलांना साधनीभूत असलेल्या विधींचें प्रकाशन करणाऱ्या वेदवाक्यांवरच श्रद्धा ठेवीत असून स्वर्ग, पशु इत्यादि फलें प्राप्त होण्याला साधनीभूत असलेल्या कर्मा-वांचून दुसरें कांहींएक नाहीं असें ह्मणण्याचें त्यांचें शीलच आहे. अविपश्चित्=मेधारहित=अविवेकी ४२.

( सांख्यविषयक आणि योगविषयक ह्मणजे ज्ञानयोगविषयक आणि कर्मयोगविषयक अशाप्रकारची प्रमाणभूत बुद्धि जर एकच आहे तर सर्वांच्या अंतःकरणामध्यें तीच कां बरें स्थिर होत नाहीं ह्मणून विचा-रशील तर हे अर्जुना, स्वर्गादि फल दर्शविणारी कर्मकांडविषयक वेदवाणीच जे घेऊन बसतात त्या कामी पुरुषांचे ठिकाणीं कामाधीनतेमुळें निश्चयात्मक बुद्धि स्थिर होण्याचा प्रायः संभव नसतो. हा " येषां व्यवसा-यात्मिका बुद्धिर्नास्ति ते यामिमां वक्ष्यमाणां वाचं प्रवदन्ति " ह्या भाष्याचा आशय होय. " इमाम् " हा दर्शकसर्वनामाचा प्रयोग प्रसिद्धिद्योतक असून ह्या ठिकाणीं " स्वाध्यायोऽध्येतव्यः " ह्या अध्ययनविधीनें परि-गृहीत असलेली कर्मकांडरूप वेदवाणी विवक्षित आहे. " जन्मकर्मफ-लप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति " ह्याप्रमाणें जिचें पुढें वर्णन केलेलें आहे ती हा " वक्ष्यमाणाम् " ह्या भाष्यस्थ पदाचा

आशय होय. पळसाचा वृक्ष नुसतां प्रफुल्लित झाला ह्मणजे मोठा मनोहर दिसतो; परंतु, दुसऱ्यांना उपभोग घेण्यास योग्य अशीं फलें त्याचे ठिकाणीं मुळींच येत नाहींत त्याचप्रमाणें "अपाम सोमममृता अभूम" ह्मणजे सोमपान करून आह्मी अमर झालों "अक्षय्यऽ ह वै चातुर्मास्ययाजिनः सुकृतं भवति" ह्मणजे पर्वचतुष्टयात्मक चातुर्मास्य याग करणाऱ्याला अक्षय्य पुण्य प्राप्त होतें अशाप्रकारची ही कर्मकांडरूप वाणी श्रवण करूं लागलें असतां मात्र ती कानाला मोठी गोड लागते; परंतु, वास्तविक ह्या वाणीप्रमाणें वागलें असतां सर्वोत्कृष्ट फल प्राप्त होतच नाहीं. कारण, कर्मानुष्ठानाचें फल कसेंही असलें तरी अनित्यच असतें हा "पुष्पितां पुष्पितवृक्ष इव शोभमानां श्रूयमाणरमणीयां" ह्या भाष्याचा तात्पर्यार्थ होय.—खऱ्या खऱ्या अर्थानें युक्त असल्याचें भान होत असल्यामुळें अर्थवादविषयक ग्रंथ वाक्याप्रमाणें भासणारे मात्र असतात. वस्तुतः ते वाक्यरूप नसतात—हें दर्शविण्याकरितां भाष्यकारांनीं "वाक्यलक्षणां" असें ह्मटलें आहे. "अपाम सोमममृता अभूम", "अक्षय्यऽह वै सुकृतं चातुर्मास्ययाजिनः" इत्यादि प्रकारच्या वाणीचा ध्यास घेऊन बसणाऱ्यांना वेदवाक्यांचें तात्पर्य समजलेलें नसतें हें "अविपश्चितः" ह्या पदानें मुळांतच सुचविलें आहे. वर दर्शविल्याप्रमाणें अनेक अर्थवाद व त्या अर्थवादांत निर्दिष्ट केलेलीं फलें प्राप्त होण्याचीं साधनें जे अनेक विधि त्यांचें प्रकाशन करणाऱ्या वेदवाक्यांवरच भिस्त ठेवून असलेले हा "वेदवादरताः" ह्या पदाचा अर्थ होय. "वेदवादरता बह्वर्थवादफलसाधनप्रकाशकेषु वेदवाक्येषु रताः" ह्या भाष्याला आनंदगिरींनीं "वेदवादा वेदवाक्यानि तानि च बहूनामर्थवादानां फलानां च साधनानां विधिविशेषाणां प्रकाशकानि तेषु रतिरासक्तिस्तन्निष्ठत्वं तद्दृत्त्वमपि तेषां विशेषणमित्याह वेदवादेति" असें अवतरण दिलेलें आहे.—स्वर्ग, पशु इत्यादि फलें प्राप्त होण्याला साधन असलेलीं जीं चातुर्मास्ययागप्रभृति कर्में त्यांहून ईश्वर अथवा मोक्ष ह्मणून दुसरें कांहीं एक नाहीं;

**ते च कामात्मानः स्वर्गपरा जन्म० योगैश्वर्यगतिं प्रति॥४३॥**
**कामात्मानः कामस्वभावाः कामपरा इत्यर्थः। स्वर्गपराः स्वर्गः परः पुरुषार्थो येषां ते स्वर्गपराः स्वर्गप्रधाना जन्मकर्मफलप्रदां कर्मणः फलं कर्मफलं जन्मैव कर्मफलं जन्मकर्मफलं तत्प्रददातीति जन्मकर्मफलप्रदा तां वाचं प्रवदन्तीत्यनुषज्यते। क्रियाविशेषबहुलां क्रियाणां विशेषाः क्रियाविशेषास्ते बहुला यस्यां वाचि तां स्वर्गपशुपुत्राद्यर्था यया वाचा बाहुल्येन प्रकाश्यन्ते भोगैश्वर्यगतिं प्रति भोगश्चैश्वर्यं च भोगैश्वर्ये तयोर्गतिः प्राप्तिर्भोगैश्वर्यगतिस्तां प्रति साध-**

---

काय जें आहे तें ह्या कर्मांतच आहे असें सर्वदां ह्मणत असलेले— हा " नान्यत्स्वर्गपश्वादिफलसाधनेभ्यः कर्मभ्योस्तीत्येवं वदनशीलाः " ह्या भाष्याचा आशय होय. " काय आहे तें कर्मांतच आहे व कर्मफल जो स्वर्ग त्याहून दुसरें मोक्षादिक कांहींएक नाहीं " असें ह्मणणाऱ्या अविवेक्यांच्या मताचा स्वीकार न करितां, बा अर्जुना, तूं आपला माझें मतच ग्रहण कर बरें " असें " पार्थ " ह्या संबोधनानें भगवानांनीं अर्जुनाला सुचविलें आहे ४२ ).

( वर सांगितलेल्या अविवेकी पुरुषांचे ठिकाणीं निश्चयात्मक बुद्धि न उद्भवण्याचें आणखी एक कारण असें आहे कीं ) ते पुरुष विषयांच्या मागेंच सर्वदां लागलेले असून स्वर्ग हाच उत्कृष्टप्रकारचा पुरुषार्थ आहे असें समजत असतात आणि म्हणूनच जन्मकर्मफलप्रद अशी ती वाणी घेऊन बसतात. ह्या ठिकाणीं मागल्या श्लोकांतून "प्रवदन्ति" ह्या क्रियापदाची अनुवृत्ति येत आहे असें समजावें. भोग आणि ऐश्वर्य ह्यांच्या प्राप्तीला साधनभूत असलेल्या अग्निहोत्रादि कर्मांनीं ती वाणी भरलेली आहे; ह्मणजे स्वर्ग, पशु, पुत्र इत्यादि फलें त्या वाणीमध्यें विशेषतः कथन केलेलीं आहेत. तेव्हां अशाप्रकारची वाणीच सर्वस्व ह्मणून

**नभूतास्ते क्रियाविशेषास्तद्बहुलां तां वाचं प्रवदन्तो मूढाः संसारे परिवर्तन्त इत्यभिप्रायः ॥ ४३ ॥**

---

घोकीत बसणारे मूढ लोक संसारामध्यें फेऱ्या घालीत असतात हा ह्या श्लोकाचा अभिप्राय होय. स्वर्गपर=स्वर्गप्रधान. " कर्मणः फलं कर्मफलं जन्मैव कर्मफलं जन्मकर्मफलं तत्प्रददातीति जन्मकर्मप्रदा ताम् " असा " जन्मकर्मफलप्रदाम् " ह्या समासाचा विग्रह असून जन्मरूप कर्मफल देणारी हा त्या समस्त पदाचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें " क्रियाणां विशेषाः क्रियाविशेषास्ते बहुला यस्यां वाचि ताम् " असा " क्रियाविशेषबहुलाम् " ह्या समासाचा विग्रह असून " अनेक प्रकारचीं कर्मेंच जिच्यामध्यें पुष्कळ आहेत ह्मणजे स्वर्ग, पशु, पुत्र इत्यादि फलेंच मुख्यत्वें करून जिच्यामध्यें दर्शविलीं आहेत " असा त्या समस्त पदाचा अर्थ होय. " भोगश्चैश्वर्यं च भोगैश्वर्ये तयोर्गतिः प्राप्तिर्भोगैश्वर्यगतिस्ताम् " असा " भोगैश्वर्यगतिम् " ह्या समासाचा विग्रह असून " भोग व ऐश्वर्य प्राप्त होण्यास साधनभूत असलेलीं तीं भिन्न भिन्न प्रकारचीं कर्मेंच जिच्यामध्यें पुष्कळ आहेत ती " असा क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्य-गतिं प्रति " ह्या पदांचा एकंदर अर्थ होय ४३.

( " अपाम सोमममृता अभूमागन्म ज्योतिरविदाम देवान् ", " अक्षय्य ँ ह वै चातुर्मास्ययाजिनः सुकृतं भवति " ॥ " उच्चा दिवि दक्षिणावंतो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण । हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते वासोदाः सोम प्रतिरन्त आयुः " ॥ " यथा खलु वै धेनुं तीर्थे तर्पयति । एवमग्निहोत्री यजमानं तर्पयति । तृप्यति प्रजया पशुभिः । प्र सुवर्गं लोकं जानाति । पश्यति पुत्रम् । पश्यति पौत्रम् । प्र प्रजया पशुभि-र्मिथुनैर्जायते । यस्यैवं विदुषोऽग्निहोत्रं जुह्वति " ॥ इत्यादि श्रुतिवाक्यें पुरुषाची कर्मानुष्ठानामध्यें प्रवृत्ति होण्यास मात्र कारणीभूत होत असून कर्माच्या योगानेंच पुरुषाला जन्म प्राप्त होत असतो. पुरुषाला जन्मप्राप्ति

**तेषां च भोगैश्वर्यप्रसक्तानां० बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥ भोगैश्वर्यप्रसक्तानां भोगः कर्तव्य ऐश्वर्यं चेति भोगैश्वर्ययोरेव प्रणयवतां तदात्मभूतानां तया क्रियाविशेषबहुलया वाचापहृतचेतसामाच्छादितविवेकप्रज्ञानां व्यवसायात्मिका साङ्ख्ये योगे वा बुद्धिः समाधौ समाधीयतेऽस्मिन्पुरुषोपभोगाय सर्वमिति समाधिरन्तःकरणं बुद्धिस्तस्मिन्समाधौ न विधीयते न भवतीत्यर्थः ॥ ४४ ॥**

---

करून देण्यास वेदवाक्यें स्वतंत्र रीतीनें कधींही समर्थ होत नाहींत. करितां, ‘ कर्मणः फलं कर्मफलं ’ जन्मैव कर्मफलं जन्मकर्मफलं तत्प्रददातीति जन्मकर्मफलप्रदा ताम् ” असा जो भाष्यांत “ जन्मकर्मफलप्रदाम् ” ह्या समासाचा विग्रह केला आहे तोच बरोबर आहे आणि “ जन्म चापूर्वशरीरेन्द्रियादिसंबन्धलक्षणं तदधीनं च कर्म तत्तद्वर्णाश्रमाभिमाननिमित्तं तदधीनं च फलं पुत्रपशुस्वर्गादिलक्षणं विनश्वरं तानि प्रकर्षेण घटीयन्त्रवदविच्छेदेन ददातीति तथा ताम् ” असें जें मधुसूदनसरस्वतींनीं भाष्यविरुद्ध सदर्हू समस्त पदाचें स्पष्टीकरण केलें आहे तें चिंत्य आहे ४३)

( कर्मकांडाविषयीं निष्ठा बाळगून कर्मानुष्ठान करीत असलेल्या पुरुषाच्या अंतःकरणामध्यें बुद्धिशुद्धिद्वारा साध्य व साधन अशा सांख्यविषयक व योगविषयक बुद्धि उत्पन्न होण्याचा संभव असल्यामुळें त्यांना मुक्ति प्राप्त होण्यास काय अडचण आहे ? ह्मणून ” शंका घ्यावी तर ती बरोबर नाहीं. कारण, ) ते भोग आणि ऐश्वर्य ह्यांचे ठिकाणीं आसक्त असल्याकारणानें त्या अनेकप्रकारच्या कर्मांनीं भरलेल्या वाणीनें त्यांची सदसद्विवेकबुद्धि अगदीं आच्छादित होत असल्यामुळें त्यांच्या अंतःकरणामध्यें सांख्यविषयक अथवा कर्मविषयक अशी ती निश्चयात्मक बुद्धि उद्भवत नाहीं. विषयोपभोग आणि ऐश्वर्याचा अनुभव हेंच आपलें कर्तव्य आहे अशा समजुतीनें भोग व ऐश्वर्य ह्यांकडेच

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

---

य एवं विवेकबुद्धिरहितास्तेषां कामात्मनां त्रैगुण्यविषया० आत्मवान् ॥ ४५ ॥ त्रैगुण्यविषयास्त्रैगुण्यं संसारो विषयः प्रकाशयितव्यो येषां ते वेदास्त्रैगुण्यविषयास्त्वं तु निस्त्रैगुण्यो भवार्जुन निष्कामो भवेत्यर्थः । सुखदुःखहेतू सप्रतिपक्षौ

---

ज्यांच्या मनाचा कल झालेला असतो ह्मणजे जे तन्मय बनून गेलेले असतात ते हा " भोगैश्वर्यप्रसक्तानाम् " ह्या पदाचा अर्थ होय. पुरुषाला " उपभोग घेण्याकरितां वासनारूपानें सर्व जगत् ज्यामध्यें ठेविलें जातें तीं समाधि ह्मणजे अंतःकरण " ही समाधिशब्दाची व्युत्पत्ति होय ४४.

हे अर्जुना, संसार हा कर्मकांडाचा प्रतिपाद्य विषय होय. ह्यास्तव, तूं निष्काम हो आणि शीतोष्णादि द्वंद्वांची परवा न करितां नेहमीं सत्त्वगुणाचें अवलंबन कर व त्याचप्रमाणें योगक्षेमरहित होऊन आपलें अंतःकरण विषयाधीन होऊं देऊं नकोस ॥ ४५ ॥

ह्याप्रमाणें विवेकबुद्धीचा ज्यांचे ठिकाणीं अभाव आहे त्या काममय बनून गेलेल्या पुरुषांना कोणतें फल प्राप्त होतें. ह्मणून विचारशील तर. हे अर्जुना, संसार हेंच फल त्यांना प्राप्त होतें कारण, कर्मकांडांतर्गत श्रुति संसाराचेंच प्रतिपादन करणाऱ्या आहेत. ह्मणजे सत्त्व, रज व तम ह्या गुणांचें कार्य जो संसार तोच कर्मकांडांतर्गत श्रुतींचा प्रतिपाद्य विषय होय. ( ह्यास्तव, कर्मकांडांतर्गत श्रुतींनीं सांगितलेल्या कर्मांचें अनुष्ठान, भोग आणि ऐश्वर्य ह्यांची प्राप्ति व्हावी ह्या इच्छेनेंच, जे पुरुष करीत असतात त्या कामी पुरुषांच्या अंतःकरणांत संसार हा एकसारिखा खिळून राहिला असल्यामुळें विवेकबुद्धीला तेथें अवकाशच सांपडत नाहीं. आतां " संसारवर्जनार्थ विवेकबुद्धि उत्पन्न होण्यास काय करावें " ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, तूं निस्त्रैगुण्य हो. ह्मणजे

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

---

**पदार्थौ द्वन्द्वशब्दवाच्यौ ततो निर्गतो निर्द्वन्द्वो भव नित्यसत्त्वस्थः सदा सत्त्वगुणाश्रितो भव तथा निर्योगक्षेमः । अनुपात्तस्योपादानं योगः । उपात्तस्य च रक्षणं क्षेमः । योगक्षेमप्रधानस्य श्रेयसि प्रवृत्तिर्दुष्करेत्यतो निर्योगक्षेमो भव । आत्मवानप्रमत्तश्च भव । एष तवोपदेशः स्वधर्ममनुतिष्ठतः ॥ ४५ ॥**

---

निष्काम हो; ( निष्काम होण्याला उपाय काय ह्मणून प्रश्न करशील तर निर्द्वंद्व होणें हा उपाय आहे. करितां तूं ) निर्द्वंद्व हो आणि ( निर्द्वंद्व होण्यास सत्त्वगुणाचें अवलंबन करण्याची अवश्यकता आहे. ह्यास्तव, तूं ) नेहमीं सत्त्वगुणाचा आश्रय करीत जा. आतां योगक्षेम ज्याला मुख्य आहेत अशा पुरुषाची मोक्षाकडे प्रवृत्ति होणें दुर्घट आहे. करितां, तूं योगक्षेमरहित होऊन आत्मवान् ह्मणजे अप्रमत्त हो. स्वधर्मानुष्ठान करणारा ह्या नात्यानें तुला हा उपदेश आहे. सुख व दुःख ह्यांना कारणीभूत असलेले जे परस्परविरुद्ध पदार्थ त्यांना द्वंद्व असें ह्मणतात. अप्राप्त गोष्ट प्राप्त करून घेणें ह्याला योग ह्मणतात आणि प्राप्त झालेल्याचें रक्षण करणें ह्याला क्षेम असें ह्मणतात ४५.

(—आपलें मन विषयाधीन होऊं देऊं नकोस—असा आनंदगिरींच्या मतानें " अप्रमत्तो भव " ह्याचा अर्थ होतो ४५ ).

परिमित जलानें युक्त असलेल्या कूपादि अनेक जलाशयांचे ठिकाणीं मिळून उरकणारीं स्नानपानादि कृत्यें ज्याप्रमाणें सर्वबाजूंनीं उदकानें भरून गेलेल्या अशा सरोवरासारिख्या एकाच मोठ्या जलाशयामध्यें उरकतात त्याचप्रमाणें सर्व वेदोक्त कर्मानुष्ठानांपासून मिळून जें फल प्राप्त होत असतें त्या सर्वांचाही अंतर्भाव तत्त्ववेत्त्या ब्राह्मणाला प्राप्त होणाऱ्या ज्ञानाच्या फलामध्यें होत असतो ॥ ४६ ॥

सर्वेषु वेदोक्तेषु कर्मसु यान्युक्तान्यनन्तानि फलानि तानि नापेक्ष्यन्ते चेत्किमर्थं तानीश्वरायेत्यनुष्ठीयन्त इत्युच्यते शृणु यावानर्थ उदपाने० ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥ यथा लोके कूपतडागाद्यनेकस्मिन्नुदपाने परिच्छिन्नोदके यावान्यावत्परिमाणः स्नानपानादिरर्थः फलं प्रयोजनं स सर्वोर्थः सर्वतः संप्लुतोदके योर्थस्तावानेव संपद्यते तत्रान्तर्भवतीत्यर्थः । एवं तावांस्तावत्परिमाण एव संपद्यते सर्वेषु वेदेषु वेदोक्तेषु कर्मसु योर्थो यत्कर्मफलं सोर्थो ब्राह्मणस्य संन्यासिनः परमार्थतत्त्वं विजानतो योर्थो यद्विज्ञानफलं सर्वतः संप्लुतोदकस्थानीयं तस्मिंस्तावानेव संपद्यते तत्रैवान्तर्भवतीत्यर्थः । यथा कृताय विजितायाधरेयाः संयन्त्येवमेनं सर्वं

---

सर्व वेदोक्त कर्मांमध्यें जीं अनंत फलें सांगितलीं आहेत त्यांची अपेक्षा जर नसेल तर तीं ईश्वरार्पणबुद्धीनें करण्याचें तरी काय प्रयोजन आहे? ह्मणून शंका करशील तर, हे अर्जुना,त्या शंकेचें उत्तर सांगतों तें ऐक. ज्याप्रमाणें लोकामध्यें कूप, तडाग इत्यादि परिमित जलानें युक्त अशा अनेक जलाशयांचे ठिकाणीं मिळून होणाऱ्या स्नानपानादि गोष्टी सर्व बाजूंनीं उदकानें वाहवत चाललेल्या एकाच मोठ्या जलाशयाचे ठिकाणीं होणाऱ्या गोष्टींचे बरोबर असतात ह्मणजे अनेक लहान जलाशयांचे ठिकाणीं मिळून होणाऱ्या स्नानपानादि सर्व कृत्यांचा ज्याप्रमाणें मोठ्या एकाच जलाशयाचे ठिकाणीं अंतर्भाव होतो त्याचप्रमाणें सर्व वेदांमध्यें ह्मणजे कर्मकांडपठित सर्वही कर्मांमध्यें मिळून जीं फलें प्राप्त होणारीं असतात तीं महाजलाशयाचे ठिकाणीं असलेल्या ब्राह्मणाचें ह्मणजे परमार्थतत्त्व जाणणाऱ्या संन्याशाचें जें ज्ञानफल असतें तितकींच असतात; ह्मणजे कर्मकांडपठित सर्वही कर्मांच्या फलाचा अंतर्भाव ज्ञानफलामध्येंच होत असतो. या गोष्टीला श्रुतिस्मृतिही प्रमाण आहेत.

तदभिसमेति यत्किंचित्प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेदेति श्रुतेः। सर्वं कर्माखिलमिति वक्ष्यति च। तस्मात्प्राग्ज्ञाननिष्ठाधिकारप्राप्तेः कर्मण्यधिकृतेन कूपतडागाद्यर्थस्थानीयमपि कर्म कर्तव्यम् ॥ ४६ ॥

---

ज्याप्रमाणें द्यूताचा खेळ चालला असतां चार बिंदूंनीं युक्त असलेला कृतसंज्ञक फांसा जिंकिला ह्मणजे त्या जिंकण्यामध्यें त्रेत, द्वापर व कलि हे अनुक्रमें तीन बिंदूंनीं दोन बिंदूंनीं व एक बिंदूनें युक्त असलेले फांसे जिंकिल्यासारिखें होतें ह्मणजे चार बिंदूंनीं युक्त असलेल्या कृतसंज्ञक फाशांमध्यें तीन, दोन व एक हे बिंदु असल्यामुळें त्रेत, द्वापर व कलि ह्या संज्ञांनीं प्रसिद्ध असलेल्या फांशांचा कृतसंज्ञक फांशामध्यें अंतर्भाव होतो त्याचप्रमाणें जगतांतील सर्व लोक जीं कांहीं वर्णाश्रमधर्मसंबंधीं कर्मे करितात त्या सर्वांचें फल रैक्काप्रमाणें तें आत्मतत्त्व जाणणाऱ्या पुरुषाला प्राप्त होतें असें छांदोग्योपनिषदंतर्गत संवर्गविद्येमध्यें सांगितलें आहे आणि "सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते" असें भगवानांनीं गीतेमध्येंही पुढें ह्मटलें आहे. तस्मात्, ज्ञानमार्गाचा अधिकार प्राप्त होण्यापूर्वीं कर्ममार्गाधिकारी असलेल्या पुरुषानें कूपतडागप्रभृति परिमित जलाशयाप्रमाणें अल्पस्वल्प फल प्राप्त होण्यास कारणीभूत होत असलेलीं कर्में अवश्य केलीं पाहिजेत ४६.

( ज्या ठिकाणीं चांगलें उदक थोडें असतें त्या ठिकाणीं स्नानादि कृत्यांकारितां इतर उदक खर्च करून पिण्यापुरताच चांगल्या उदकाचा उपयोग करीत असतात. ह्मणजे मचूळ अथवा खाऱ्या पाण्याच्या विहिरींची वगैरे सुद्धां लोकांना गरज लागते. परंतु, ह्याच लोकांना कांहीं प्रयत्नानें भरपूर गोडेंपाणीच जर मिळूं लागलें तर पाय धुण्याकरितां अमक्या ठिकाणचें पाणी खर्चावयाचें, स्नानाकरितां अमुक अमुक पाण्याचा उपयोग करावयाचा आणि गोड्यापाण्याची जी एकादीच

विहीर वगैरे असेल तिचा उपयोग फक्त पिण्यापुरतांच करावयाचा अशी व्यवस्था करण्याचें त्यांना कारण रहात नसून एका गोड्यापाण्यानेंच त्यांची स्नानपानादि सर्व कृत्यें उरकूं लागतात. सारांश, परिमित उदकानें युक्त असलेल्या कूपाची वगैरे त्यांना गरज नाहींशी होते. परंतु, जोंपर्यंत भरपूर उदक एकेठिकाणीं मिळण्याची सोय झालेली नसते तोंपर्यंत अनेकप्रकारचीं जलस्थानें त्यांना सोडितां येत नाहींत. त्याचप्रमाणें सुखाचें परम निधान जो ज्ञानमार्ग त्याची प्राप्ति जोंपर्यंत झालेली नाहीं तोंपर्यंत अल्पस्वल्पसुखप्राप्तीला कारणीभूत होत असणारीं अनेकप्रकारचीं वेदोक्त कर्में पुरुषांनीं अवश्य केलींच पाहिजेत हें उघड आहे. हें ह्या श्लोकाचें तात्पर्य होय ४६ )

सूतसंहितांतर्गत मुक्तिखंडामध्यें हाच श्लोक असून पुढें आणखी दोन श्लोक आहेत ते श्लोक गीतेंतील सदर्हू श्लोकाचें व त्या श्लोकावरील भाष्याचें रहस्य समजण्यास उपयोगीं असल्यामुळें विद्यारण्यांच्या तात्पर्यदीपिकेसह पुढें दिले असून तात्पर्यदीपिकेचा सारांशही मराठींत दिला आहे.

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ७१ ॥
दुर्लभं प्राप्य मानुष्यं तत्रापि ब्रह्मविग्रहम् ।
ब्राह्मण्यं च तथा विष्णो वेदान्तश्रवणादिना ॥ ७२ ॥
अतिवर्णाश्रमं रूपं सच्चिदानन्दमद्वयम् ।
यो न जानाति सोऽविद्वान्कदा मुक्तो भविष्यति ॥ ७३ ॥

---

यावानर्थ इति ॥ सर्वस्मिन्भूमण्डले जलप्लुते सति पिपासोरुदपाने कूपे यथा न किंचित्प्रयोजनमेवं तत्वविदां वेदैस्तत्प्रतिपादितकर्मभिर्वा न किंचित्प्रयोजनमित्यर्थः ॥ ७१ ॥

विद्यैव श्रेयसी चेत्किमर्थं वेदैः कर्माणि प्रपञ्चेन प्रतिपादितानि तेषामप्यर्थवत्त्वे वा कथं वैफल्यवचनमित्याशङ्क्य तिलतैलमेव मिष्टं येन न दृष्टं घृतं क्वापीति न्यायेन विद्यानधिकृतानां सांसारिकसुखाय तात्कालिकदुःखपरिहाराय च

---

सर्व भूमंडळावर जिकडे तिकडे पाणीचपाणी होऊन गेलें असतां तृषार्त पुरुषाला ज्याप्रमाणें कूपाचें प्रयोजन रहात नाहीं त्याचप्रमाणें तत्त्वज्ञानी पुरुषांचें वेदांशीं अथवा वेदोक्त कर्माशीं कांहींएक प्रयोजन उरत नाहीं ॥ ७१ ॥

ज्ञानमार्गच जर श्रेष्ठ असेल तर वेदांनीं कर्माचें सविस्तर प्रतिपादन कां केलें? अथवा कर्माचेंही जर प्रयोजन असेल तर " यावानर्थ उद० विजानतः " ह्या श्लोकामध्यें त्यांची व्यर्थता कां सांगितली ? अशी कोणाला शंका येईल ह्मणून तिच्या निरसनार्थ "दुर्लभं प्राप्य०" वगैरे ग्रंथ असून त्याचा आशय —घृत ज्यानें कोठेंच पाहिलेलें नाहीं त्याला तिळाचें तेलच गोड लागत असतें ह्या न्यायानें ज्ञानमार्गाचा अधिकार प्राप्त न झालेल्या पुरुषांना सांसारिक सुखाकरितां आणि तात्कालिक दुःखपरिहाराकरितां कर्में सांगितलीं असून ज्ञानमार्गाधिकारी पुरुषाला

**कर्माणि कथितानि। अधिकृतस्य तु परमपुरुषार्थसाधनतया विद्यैव श्रेयसीत्याह दुर्लभं प्राप्येति ॥ भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठा नरेषु ब्राह्मणादय इत्युक्तदृशा मनुष्यत्वमेव तावद्दुर्लभं तत्रापि ब्रह्मविग्रहमिति। ब्रह्म वेदस्तदर्हो विग्रहं त्रैवर्णिकत्वं प्राप्येत्यर्थः। वेदान्तश्रवणादिना ब्राह्मण्यं ब्रह्मनिष्ठताम् । मौनं चामौनं च निर्विद्याथ ब्राह्मण इति ब्रह्मनिष्ठता ब्राह्मण्यपदार्थत्वेन श्रुता ॥ ७२ ॥ ७३॥**

---

सर्वोत्कृष्ट पुरुषार्थाचें साधन ह्या नात्यानें ज्ञानच श्रेष्ठ सांगितलें—असा आहे. " एकंदरभूतांमध्यें प्राणी श्रेष्ठ, प्राण्यांमध्यें बुद्धिमान् प्राणी श्रेष्ठ, बुद्धिमानांमध्यें मनुष्य श्रेष्ठ आणि मनुष्यांमध्येंही ब्राह्मणप्रभृति श्रेष्ठ " ह्या मनुस्मृतींत सांगितल्याप्रमाणें प्रथम आधीं मनुष्यत्वच दुर्लभ असून मनुष्यांमध्येंही ब्रह्मविग्रह दुर्लभ आहे. ब्रह्म ह्मणजे वेद; तेव्हां त्याला योग्य जें शरीर तें ब्रह्मविग्रह होय. करितां " ब्रह्मविग्रहं प्राप्य " ह्याचा अर्थ "ब्राह्मणादि तीन वर्णामध्यें जन्म प्राप्त होऊन " असा होतो. " वेदांताचें श्रवण वगैरे केल्यानें ब्रह्मनिष्ठता प्राप्त करून घेऊन " हा " ब्राह्मण्यं प्राप्य " ह्या पदांचा अर्थ होय. " मौनं चामौनं च निर्विद्याथ ब्राह्मणः" ह्या बृहदारण्यकश्रुतीमध्यें " ब्राह्मण्यं " ह्या पदाचा अर्थ ब्रह्मनिष्ठता असा असल्याचें श्रुत आहे. ( हे विष्णो, दुर्लभ असा मनुष्यजन्म व त्यांतूनही त्रैवर्णिकत्व प्राप्त झालें असतांना वेदांतश्रवणादिकांच्या योगानें ब्रह्मनिष्ठता प्राप्त करून घेऊन जो वर्णाश्रमातीत व द्वैतरहित असें सच्चिदानंदात्मक आत्मस्वरूप जाणीत नाहीं तो मूढ कधीं बरें मुक्त होईल? हा ह्या दोन्हीं श्लोकांचा तात्पर्यार्थ आहे ) ॥ ७२ ॥ ७३॥

सूतसंहितांतर्गत शिवमाहात्म्यखंडाच्या बाराव्या अध्यायांत ज्ञानप्राप्तीपूर्वी कर्मे अवश्यक अशाविषयीं प्रतिपादन केलें असून यज्ञवैभवखंडाच्या एकविसाव्या अध्यायांत वर्णाश्रमविहित कर्मच मुक्तिसाधन

असल्याचें कथन केलें आहे. ह्यास्तव, " तस्मात्प्राग्ज्ञाननिष्ठाधिकार-प्राप्तेः कर्मण्यधिकृतेन कूपतडागाद्यर्थस्थानीयमपि कर्म कर्तव्यम् " असा जो आचार्यांनीं सिद्धांत ठरविला आहे तो अंतःकरणामध्यें विशेषतः ठसण्याकरितां विद्यारण्यांच्या तात्पर्यदीपिकेसह सदहू प्रकरणांतील श्लोक पुढें दिले असून तात्पर्यदीपिकेच्या आधारानें त्या श्लोकांचा मराठींत सारांशही पुढें दिला आहे.

स्वजात्युक्तं यथाशक्ति कुरुते कर्म यः पुमान् ।
मुक्तिस्तस्यैव संसारादिति वेदानुशासनम् ॥ ५० ॥
सर्वेषां जन्मना जातिर्नान्यथा कर्मकोटिभिः ।
पश्वादीनां यथा जातिर्जन्मनैव न चान्यथा ॥ ५१ ॥

---

जातिनिर्णयप्रयोजनमाह स्वजात्युक्तमिति । वेदानुशासनमिति । धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा...धर्मे सर्वं प्रतिष्ठितमिति हि वेदवाक्येनुशिष्यते । स्वजात्युक्त एव हि धर्मः॥५०॥

जन्मनिबन्धना एता जातयः सन्तु कर्मनिबन्धनास्तु कीदृश्य इत्याशङ्क्य ता न संभवन्त्येवेत्याह सर्वेषामिति । तत्र दृष्टान्तमाह पश्वादीनामिति ॥ ५१

---

जो पुरुष स्वजातीला विहित असलेलें यथाशक्ति कर्म करितो तो संसारातून मुक्त होतो असें वेदांत सांगितलें आहे. कारण, धर्म हाच सर्व जगताचा आधार असून धर्मांतच सर्व कांहीं आहे अशी श्रुति आहे. स्वजातीला जो विहित असेल तोच धर्म होय. पूर्वी जो जातिनिर्णय सांगितला त्याचें प्रयोजन ह्या श्लोकांत कथन केलें आहे ॥ ५० ॥

आतां " पूर्वी सांगितलेल्या ह्या जन्मनिमित्तक जाति असोत; त्या आह्मीं ऐकिल्या. परंतु, कर्मनिमित्तक जाति कशाप्रकारच्या असतात ? " असें विचाराल तर मनुष्यमात्रांची जाति जन्मावरूनच ठरलेली असून ती जन्मानें प्राप्त झालेली जाति कोट्यवधि कर्मांनींही बदलणें शक्य नाहीं. सारांश, पश्वादिकांची जाति जन्मावरून ठरलेली असून (कर्मामुळें) जशी ती भिन्न होण्याचा संभव नाहीं तशीच मनुष्यमात्राच्या जातीची गोष्ट होय. ( तात्पर्य, गर्दभ, खेचर इत्यादिकांनीं रथ ओढणें, मनुष्याला पाठीवर वाहून नेणें इत्यादि कितीही कृत्यें केलीं तरी ज्याप्रमाणें त्यांना अश्व होता येणें अशक्य आहे त्याचप्रमाणें हीनवर्णाच्या पुरुषाला उत्तमवर्णविहित कर्मांच्या योगानें उत्तमवर्णत्व येणें अशक्य आहे ) ॥५१॥

सापि स्थूलस्य देहस्य भौतिकस्य न चात्मनः ।
तथापि देहेहंमानादात्मा विप्रादिसंज्ञितः ॥ ५२ ॥
स्वस्वरूपापरिज्ञानाद्देहेहंमान आत्मनः ।
अपरिज्ञानमप्यस्य ब्राह्मणा वेदवित्तमाः ॥ ५३ ॥

---

यदि जन्मनिबन्धनैव जातिस्तर्हि जन्मरहितस्यात्मनः सा कथं भवेत्तदभावे वा तस्य कथं जातिप्रयुक्तधर्मेषु नियोग इत्यत आह सापिस्थूलस्येति । सूक्ष्मभूतकार्यस्य लिङ्गशरीरस्याप्यात्मवज्जात्यभावाभिप्रायेण स्थूलस्येत्युक्तम् । जातिमद्देहादितादात्म्याध्यासादजातेरप्यात्मनो विप्रत्वादिव्यवहार इत्यर्थः ॥५२॥

अध्यासोपादानमज्ञानमाह स्वस्वरूपेति । अज्ञानस्य तर्हि को हेतुः । अनादित्वे वा तस्यात्मवदन्तोपि न स्यादिति

---

" जन्मतःच जर जाति ठरलेली आहे तर जन्मरहित आत्म्याला ती कशी असणार ? आणि जर ती असण्याचा संभव नाहीं तर जातिनिमित्तक धर्मामध्यें तो आत्मा नियुक्त तरी कोठून असणार ? " ह्मणून कोणी शंका करितील असें मनांत आणून ईश्वर सांगतात:— ती जाति तरी भौतिक जो स्थूल देह त्यालाच असते आणि आत्मा जरी वास्तविक जातिरहित आहे तथापि जातियुक्त देहादिकांचे ठिकाणीं आत्मबुद्धि आरोपित असल्यामुळें आत्म्यालाही ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे ह्मणण्याचा परिपाठ आहे. सूक्ष्म भूतांचें कार्य जो लिंगदेह त्याचे ठिकाणींही आत्म्याप्रमाणेंच जातीचा अभाव आहे हें दर्शविण्याच्या उद्देशानें ह्या ठिकाणीं " स्थूलस्य " हें पद घातलें आहे ॥ ५२ ॥

देहाचे ठिकाणीं आत्म्याच्या अध्यासाचें कारण काय ? ह्मणून विचाराल तर, हे उत्कृष्ट वेदवेत्ते ब्राह्मणहो, स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळें देहाचे ठिकाणीं अहंबुद्धि उत्पन्न होते. आतां " अज्ञानाला कांहीं कारण असलेंच पाहिजे; अथवा तें अनादि असल्यास आत्म्याप्रमाणें त्याचा

आदिमन्न भवत्यन्तस्तस्य ज्ञानेन सुव्रताः ।
ज्ञानं वेदान्तविज्ञानमिति सद्गुरुनिर्णयः ॥ ५४ ॥
यस्यापरोक्षविज्ञानमस्ति वेदान्तवाक्यजम् ।
तस्य नास्ति नियोज्यत्वमिति वेदार्थनिर्णयः ॥ ५५ ॥

---

चेन्न । यथा प्रागभावस्यानादेर्भावेन निवृत्तिरेवमनादेरज्ञानस्य ज्ञानेन निवृत्तिरित्याह। अपरिज्ञानमिति। लोकायतादिशास्त्रोक्तप्रज्ञानादज्ञाननिवृत्तिं वारयितुमाह ज्ञानमिति। यथादर्शिनो यथादृष्टार्थवादिनश्च व्यासादयस्ते सद्गुरवः।लोकायतादयस्तु विप्रलम्भकत्वादज्ञत्वाच्च नैवंविधा इत्यर्थः ॥५३॥५४॥

ज्ञानिनस्तर्हि जात्यभावे कथं तस्य तत्प्रयुक्तौ विधिनिषेधाविति चेन्न स्त एव तस्य ताविद्याह यस्यापरोक्षेति ।

---

नाशही होत नसला पाहिजे ह्मणून ह्मणाल तर त्या आत्म्याचें अज्ञान अनादिच आहे आणि उत्पत्तीपूर्वी एकाद्या लौकिक वस्तूचा ज्याप्रमाणें अनादि अभाव असतो आणि त्या अनादि अभावाचाही ज्याप्रमाणें वस्तु अस्तित्वांत आल्यानें नाश होतो त्याचप्रमाणें, हे सदाचरणसंपन्न विप्रहो, अनादि असलेल्या आत्मविषयक अज्ञानाचा नाश त्या आत्म्याच्या ज्ञानानें होतो. लोकायतप्रभृतींच्या शास्त्रांतील ज्ञान झाल्यानें अज्ञानाचा नाश होतो कीं काय असें ह्मणाल तर, हे विप्रहो, वेदांतवाक्यापासून उत्पन्न झालेलें जें ज्ञान तेंच खरें ज्ञान असा सद्गुरूंचा ह्मणजे वस्तूचें यथार्थ स्वरूप अवलोकन करीत असून अवलोकन केल्याप्रमाणेंच सांगत असलेल्या महर्षींचा सिद्धांत आहे ॥५३॥५४॥

ज्ञानी पुरुषाला जाति नाहीं हें जर सिद्ध आहे तर त्याला जातिनिमित्तक विधिनिषेध कां असावेत ह्मणून विचाराल तर, हे विप्रहो, " मी ब्रह्म आहें " इत्यादि वेदांतवाक्यांवरून ज्याला अपरोक्ष ज्ञान ह्मणजे प्रत्यक्ष आत्मसाक्षात्कार झाला असेल तो मात्र वर्णाश्रमप्रयुक्त कर्मांपासून

वर्णिनामाश्रमाः प्रोक्ताः सर्वशास्त्रार्थवेदिभिः ।
तेषां वर्णाश्रमस्थानां वेदकिंकरता सदा ॥ ५६ ॥
अस्ति चेद्ब्रह्मविज्ञानं स्त्रिया वा पुरुषस्य वा ।
वर्णाश्रमसमाचारस्तयोर्नास्त्येव सर्वदा ॥ ५७ ॥

---

वेदार्थेति । स न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयानिति वाजसनेयश्रुतिः । एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य । न कर्मणा वर्धते नो कनीयानिति काठकश्रुतिः ॥ ५५ ॥

वर्णधर्मवदाश्रमधर्मोपि तत्त्वज्ञानविरहिणामेवेत्याह वर्णिनामिति । वेदकिंकरता वेदेन कर्मसु नियोज्यता ॥ ५६ ॥

स्त्रीत्वादीनामपि वर्णाश्रमवद्देहधर्मत्वेन देहाध्यासविरहे सति कर्मस्वनियोज्यत्वे न तत्कृतः कोपि विशेष इत्याह । अस्ति चेदिति ॥ ५७ ॥

---

सुटतो असा श्रुतिसिद्धांत आहे. कारण, "आत्म्याचें अपरोक्ष ज्ञान झालेला पुरुष पुण्य कर्म हातून घडल्यानें योग्यतेस चढतही नाहीं आणि पापकर्म हातून घडल्यानें त्याला कमीपणाही येत नाहीं" असें वाजसनेय श्रुतीमध्यें सांगितलें असून काठकश्रुतींतही तसेंच सांगितलें आहे ॥ ५५ ॥

ब्राह्मणादिवर्णांना सर्वशास्त्रार्थवेत्त्यांनीं आश्रमधर्म सांगितले आहेत. तेव्हां तत्त्वज्ञानरहित असलेले ते वर्णाश्रमी ब्राह्मणादिक सर्वदां वेदाच्या अधीन आहेत. ह्मणजे कर्मकांडानें सांगितल्याप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्में त्यांना नेहमीं केलींच पाहिजेत ॥ ५६ ॥

स्त्री असो अथवा पुरुष असो जर ब्रह्माचा अपरोक्ष साक्षात्कार ( होऊन देहाचे ठिकाणीं असलेला त्याच्या आत्मबुद्धीचा नाश ) झाला असेल ( ह्मणजे देहाचें छेदन वगैरे झाल्यास "मला दुःख झालें" असें ज्याला—आत्मा देहेंद्रियांहून भिन्न आहे—ह्या ज्ञानामुळें वाटेनासें झालें असेल ) त्याला वर्णाश्रमसंबंधीं कर्में कधींही विहित नाहींतच ॥५७॥

अविज्ञायात्मसद्भावं स्ववर्णाश्रममास्तिकाः ।
जहाति यः स मूढात्मा पतत्येव न संशयः ॥ ५८ ॥
तस्मात्सर्वप्रयत्नेन श्रद्धया सह सर्वदा ।
कर्तव्यो वर्णिभिर्धर्मः श्रौतः स्मार्तश्च मुक्तये* ॥५९॥
ईश्वर उवाच ॥ वक्ष्यामि परमं गुह्यं मुक्तिसाधनमादरात् ।
वर्णाश्रमसमाचारादेव मुक्तिर्न चान्यतः ॥ १४ ॥
स्वजातिविहितं धर्मं यः करोति प्रियेण तु ।
स जायते कुले मुख्ये विप्राणामीश्वराज्ञया ॥ १५ ॥

---

संश्चासौ भावश्च सद्भावः पारमार्थिकं रूपमात्मनस्तदसाक्षात्कृत्य कर्मपरित्यागे पानित्यमाह अविज्ञायेति ॥५८॥५९॥

स्वजातिविहितमिति। ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राणां मध्ये यस्य

---

परंतु, हे आस्तिकहो, ( वर सांगितल्याप्रमाणें ) आत्मसाक्षात्कार झाल्यावांचून जो आपल्या वर्णाश्रमधर्मांचा त्याग करितो तो मूढ पतितच होतो ह्यांत संशय नाहीं ॥ ५८ ॥

तस्मात् , कशीही अवस्था प्राप्त झाली तरी सर्व प्रयत्नानें श्रद्धापूर्वक ब्राह्मणादिवर्णांनीं ( संसारांतून ) मुक्त होण्याकरितां श्रुतिस्मृतिविहित धर्माचें अनुष्ठान केलेंच पाहिजे* ॥ ५९ ॥

ईश्वर सांगतातः—हे मुनिजनहो, मी आदरपूर्वक तुह्मांला अत्यंत गुह्य असें मुक्तिसाधन कथन करितों. बाबांनों, मुक्ति ही वर्णाश्रमधर्मांच्या अनुष्ठानानेंच ( परंपरेनें ) प्राप्त होते; दुसऱ्या कोणत्याही साधनानें होत नाहीं ॥ १४ ॥

स्वजातीला विहित असलेल्या धर्माचें अनुष्ठान जो आनंदानें करितो

---

* पनास पासून एकुणसाठ पर्यंतचे हे दहा श्लोक सूतसंहितांतर्गत शिवमाहात्म्यखंडाच्या बाराव्या अध्यायांतील आहेत व पुढले श्लोक यज्ञवैभवखंडाच्या एकविसाव्या अध्यायांतील आहेत.

स पुनर्जातकर्मादिसंस्कारैरपि संस्कृतः ।
उपनीतो गुरोर्वेदानधीत्य विधिवत्पुनः ॥ १६ ॥
दारानाहृत्य यज्ञं च दानं च विविधं तथा ।
तपश्च विविधं घोरं कृत्वा कामनया विना ॥ १७ ॥

---

यो धर्मो विहितः स स्वजातिविहितः । ब्राह्मणस्य यजनादिकं क्षत्रियस्य राज्यपरिपालनादिकं वैश्यस्य कृषिगोरक्षादिकं शूद्रस्य द्विजशुश्रूषेत्येते स्वजातिविहिता धर्माः ॥ १५ ॥

वेदानधीत्य विधिवदिति । अनेनैव ब्रह्मचारिणामनुष्ठानमुक्तम् ॥ १६ ॥

दारानाहृत्येत्यादिना गार्हस्थ्याश्रमधर्मप्रतिपादनम् । तपश्च विविधमिति वानप्रस्थाश्रमधर्माः । कामनया विनेति । फल-

---

तो ईश्वराच्या आज्ञेनें ब्राह्मणांच्या उत्तम कुलामध्यें जन्मास येतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्यांमध्यें ज्याला जो धर्म विहित असेल तो त्याचा स्वजातिविहित धर्म होय. यजनादिक, राज्यपरिपालनादिक, कृषिकर्म, गोरक्षण वगैरे आणि द्विजसेवा हे अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्यांचे स्वजातिविहित धर्म होत ॥ १५ ॥

नंतर जातकर्मादि संस्कारांनीं संस्कृत झाल्यावर उपनयनसंस्कार झाला असतां तो गुरूपासून यथाविधि वेदाध्ययन करून ब्रह्मचर्य धर्माचें अनुष्ठान करितो; तदनंतर दारपरिग्रह करून तो अनेक प्रकारचीं यज्ञदानादि कर्मैं निष्कामबुद्धीनें करितो; ह्याप्रमाणें गृहस्थाश्रमधर्माचें अनुष्ठान केल्यानंतर तो वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करून निष्काम-बुद्धीनेंच नानाप्रकारचें घोर तप करितो आणि ह्याप्रकारें ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य व वानप्रस्थ ह्या तिन्ही आश्रमांना विहित असलेल्या कर्मांचें अनुष्ठान झाल्यामुळें पापक्षालन होऊन चित्तशुद्धि झाली असतां संसा-रदोष लक्ष्यांत आल्याकारणानें ज्ञानप्राप्तीच्या इच्छेनें तो सर्व लौकिक

प्रनष्टपापः शुद्धान्तःकरणो ज्ञानवाञ्छया ।
विरक्तः सर्वलोकेभ्यो दोषाणां तु निरूपणात् ॥ १८ ॥
वर्णाश्रमसमाचारं विना कैवल्यमिच्छतः ।
नास्ति कैवल्यसंसिद्धिः सत्यं सत्यं न संशयः ॥ ३४ ॥

---

संधानविरहेण केवलमीश्वरार्पणबुद्धयैवानुष्ठिता वर्णाश्रमधर्मा अध्ययनादयः पापप्रणाशनेन चित्तशुद्धिद्वारा परंपरया मुक्तिसाधनत्वं प्रतिपद्यन्त इत्यर्थः । श्रूयते हि तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसानाशकेनेति ॥ १७ ॥

एवमाश्रमत्रयानुष्ठितैः कर्मभिश्चित्तशुद्धौ जातायां संसारदोषदर्शनात्ततो वैराग्यं जायत इत्याह विरक्त इति ॥ १८ ॥

---

व्यवहारांपासून विरक्त होतो. फलाची इच्छा न धरितां केवल ईश्वरार्पण बुद्धीनेंच अध्ययनादिक वर्णाश्रमधर्मांचें अनुष्ठान केलें असतां पापक्षालन होऊन चित्तशुद्धीच्या द्वारानें ते धर्म परंपरेनें मुक्तीचें साधन होत असतात असें सतराव्या श्लोकांतील " कामनया विना " ह्या पदांनीं सुचविलें आहे ॥ १६ ॥ १७ ॥ १८ ॥

सारांश, वर्णाश्रमधर्मांचें अनुष्ठान केल्यावांचून मुक्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषाचा संसारनाश होतच नाहीं हें अगदीं सत्य सत्य आहे ह्यांत संशय नाहीं ॥ ३४ ॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ॥**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

---

**तव च कर्मण्येवाधिकार०र्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७॥ कर्मण्येवाधिकारो न ज्ञाननिष्ठायां ते तव तत्र च कर्म कुर्वतो मा फलेष्वधिकारोऽस्तु कर्मफलतृष्णा मा भूत्कदाचन कस्यांचिदप्यवस्थायामित्यर्थः । यदा कर्मफले तृष्णा ते स्यात्तदा कर्मफलप्राप्तेर्हेतुः स्या एवं मा कर्मफले हेतुर्भूर्यदा हि कर्मफलतृष्णाप्रयुक्तः कर्मणि प्रवर्तते तदा कर्मफलस्यैव जन्मनो हेतुर्भवेत् । यदि कर्मफलं नेष्यते किं कर्मणा दुःख-**

---

कर्माचेच ठिकाणीं तुझा अधिकार आहे; कर्मफलांची इच्छा तुला कधींही होतां उपयोगी नाहीं; ह्मणजे कर्मफलाला हेतुभूत तुला कधींही होतां उपयोगी नाहीं आणि कर्म न करण्याकडे मनाचा कलही तुला होऊं देतां उपयोगी नाहीं ॥ ४७ ॥

तुझा ह्मणशील तर कर्माचेच ठिकाणीं अधिकार आहे; ज्ञानमार्गाविषयीं तुझा अधिकार नाहीं. (कारण , चित्तशुद्धि झाल्यावांचून पुरुष ज्ञानमार्गाधिकारी होत नाहीं. आतां "कर्माचेच ठिकाणीं जर माझा अधिकार आहे तर कर्मफलांच्या योगानें प्राप्त होणारें बंधन टळणें अशक्य आहे" ह्मणून ह्मणशील तर हे अर्जुना ) कर्मामध्येंच तुझा अधिकार असल्यामुळें कर्म करीत असतांना फलाविषयीं तुझा अधिकार कधींही नाहीं. ह्मणजे कशीही अवस्था प्राप्त झाली तरी कर्मफलांची इच्छा तुला होतां कामानये. कर्मफलाविषयीं जर तुला इच्छा झाली तर कर्माचें फल प्राप्त होण्याला तूं कारण होशील. करितां, ह्याप्रमाणें कर्मफलाची इच्छा धरून तूं तें फल प्राप्त होण्याला कारणीभूत होऊंच नकोस. सारांश, मनुष्य जेव्हां कर्मफल प्राप्त व्हावें ह्या इच्छेनें प्रेरित होऊन कर्म करण्यास प्रवृत्त होतो तेव्हां कर्मफलाच्याच उत्पत्तीला तो कारण होत

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनञ्जय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते॥४८॥

---

रूपेणेति मा ते तत्र सङ्गोस्त्वकर्मण्यकरणे प्रीतिर्माभूत् ॥४७॥

यदि कर्मफलप्रयुक्तेन न कर्तव्यं कर्म कथं तर्हि कर्तव्यमित्युच्यते योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा०समत्वं योग उच्यते ॥४८॥ योगस्थः सन्कुरु कर्माणि केवलमीश्वरार्थं तत्रापीश्वरो मे तुष्यत्विति सङ्गं त्यक्त्वा धनञ्जय फलतृष्णाशून्येन क्रियमाणे कर्मणि सत्त्वशुद्धिजा ज्ञानप्राप्तिलक्षणा सिद्धिस्तद्विपरीताऽसिद्धिस्तयोः सिद्ध्यसिद्ध्योरपि

---

असता. असा. आता " कर्मफलाची जर इच्छा करावयाची नाहीं तर हें दुःखरूप कर्म करून तरी उपयोग काय ? " असें मनांत आणून अकर्माकडे मात्र आपली आसक्ति होऊं देऊं नकोस; ह्मणजे कर्म न करण्यामध्येंच मनाला संतोष वाटूं देऊं नकोस ४७.

हे धनंजया, कसल्याच फलाचे ठिकाणीं आसक्ति न ठेवितां योगाचें अवलंबन करून ह्मणजे सिद्धि आणि असिद्धि ह्याविषयीं एकसारिखा भाव ठेवून तूं कर्म कर. सिद्धि व असिद्धि ह्यांविषयीं मनाची समता असणें ह्याला योग असें ह्मणतात ॥ ४८ ॥

आतां फलेच्छेनें प्रेरित होऊन जर कर्म कर्तव्य नाहीं तर तें करावें तरी कसें ? ह्मणून विचारशील तर, हे धनंजया, योगाचें अवलंबन करून केवळ ईश्वराकरितां तूं कर्म कर. परंतु, ईश्वराकरितां जरी कर्मानुष्ठान कर्तव्य आहे तरी ईश्वर मजवर संतुष्ट होवो अशी आसक्ति न ठेवितां तूं तीं करीत जा. कर्म होतां होतां अंतःकरणशुद्धि होऊन तद्द्वारा ज्ञान प्राप्त होणें ही सिद्धि होय व त्याच्या उलट जो प्रकार ती असिद्धि होय. तेव्हां त्या सिद्ध्यसिद्धीविषयीं तूं सारिखा होऊन ( ह्मणजे सिद्धि झाली असतां हर्ष अथवा असिद्धिच कायम राहिली असतां विषाद न मानून )कर्मे

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥**

---

**समस्तुल्यो भूत्वा कुरु कर्माणि कोऽसौ योगो यत्रस्थः कुर्वि-त्युक्तमिदमेव तत्सिद्ध्यसिद्ध्योः समत्वं योगउच्यते ॥ ४८ ॥**

---

करीत जा. आतां "ज्याचें अवलंबन करून कर्मानुष्ठान कर असें सांगितलें तो योग ह्मणजे आहे तरी काय?" ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, हें (आतां सांगितलेलें ) जें सिद्ध्यसिद्धींविषयीं समत्व तोच योग होय ४८.

" योगस्थः " ह्या पदाचें व्याख्यान श्रीधरस्वामींनीं " योगः परमेश्वरैकपरता तत्र स्थितः " ( ह्मणजे केवल परमेश्वराविषयीं तत्पर राहून ) असें केलें आहे. परंतु, " समत्वं योग उच्यते " असें मुळांतच सांगितलें असल्यामुळें भाष्यामध्यें त्याला अनुसरून " योगस्थः" ह्या पदाचें व्याख्यान दर्शविलें आहे तेंच बरोबर आहे. मूळ श्लोकांतील योगशब्दाच्या व्याख्यानाशीं ओढाताण केल्यावांचून एकवाक्यता होत नसल्यामुळें श्रीधरस्वामींचें व्याख्यान ग्राह्य नाहीं. " तत्रापीश्वरो मे तुष्यत्विति सङ्गं त्यक्त्वेत्येतद्भाष्यमुपलक्षणं कर्तृत्वाद्यभिनिवेशस्यापि " असें भाष्योत्कर्षदीपिकेमध्यें लिहिलें आहे तें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. " मी ह्या कर्माचा कर्ता आहें वगैरे प्रकारची बुद्धिही ठेवूं नये आणि इश्वर मजवर संतुष्ट होवो अशी भावनाही धरूं नये " इतका अर्थ उपलक्षण समजून " ईश्वरो मे तुष्यत्विति सङ्गं त्यक्त्वा " ह्या भाष्याचा करावा हें दीपिकेंतील सदर्हू पंक्तीचें तात्पर्य होय. दिग्विजय-प्रसंगीं भूपतींना जिंकून मिळविलेलें धन ज्याप्रमाणें तूं राजसूययागाकडे उपयोगाला लाविलेंस त्याचप्रमाणें सांप्रतही ह्या सर्वांना जिंकून यज्ञयागादिकांचें अनुष्ठान करणें तुला योग्य आहे असें ह्या श्लोकांतील "धनंजय " ह्या संबोधनानें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सुचविलें असें भाष्योत्कर्षदीपिकाकार ह्मणतात ४८ )

यत्पुनः समत्वबुद्धियुक्तमीश्वराराधनार्थं कर्मैतस्मात्कर्मणो दूरेण ह्यवरं कर्म० मन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥ दूरेणातिविप्रकर्षेणात्यन्तमेव ह्यवरं निकृष्टं कर्म फलार्थिना क्रियमाणं बुद्धियोगात्समत्वबुद्धियुक्तात्कर्मणो जन्ममरणादिहेतुत्वाद्धनञ्जय यत एवं योगविषयायां बुद्धौ तत्परिपाकजायां वा साङ्ख्यबुद्धौ शरणमाश्रयमभयप्राप्तिकारणमन्विच्छ प्रार्थयस्व परमार्थज्ञानशरणो भवेत्यर्थः। यतोऽवरं कर्म कुर्वाणाः कृपणा दीनाः फलहेतवः फलतृष्णाप्रयुक्ताः सन्तः। यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वास्माल्लोकात्प्रैति स कृपण इति श्रुतेः ॥४०॥

---

समत्वबुद्धि धरून केलेल्या कर्मापेक्षां फलकामनेनें केलेलें कर्म अत्यंत निकृष्ट होय. तस्मात्, हे धनंजया, तूं आपला त्या बुद्धीचाच आश्रय करून असत जा. कारण, फलेच्छेचा उद्देश मनांत धरून कर्म करणारे पुरुष खरोखर दीन आहेत ॥ ४९ ॥

समत्वबुद्धीनें युक्त असें नें ईश्वराराधनार्थ केलेलें कर्म त्या कर्मापेक्षां, हे धनंजया, फलेच्छु पुरुषाच्या हातून होत असलेलें कर्म जन्ममरणादिकांना कारणीभूत होत असल्यामुळें अतिशयच निकृष्ट आहे. तेव्हां, ज्याअर्थीं असा प्रकार आहे त्याअर्थीं तूं आपला योगविषयक बुद्धीचे ठिकाणीं अथवा त्या बुद्धीचा परिपाक झाल्यामुळें उत्पन्न होणारी जी सांख्यबुद्धि तिचे ठिकाणीं शरण ह्मणजे आश्रय पहा. ह्मणजे सांख्यविषयक अथवा कर्मयोगविषयक बुद्धिच—साक्षात् अथवा परंपरेनें अभयप्राप्तीचें कारण आहे ह्मणून—तूं स्वीकारण्याची इच्छा धर. सारांश, परमार्थज्ञानाचें अवलंबन करून तूं रहा. कारण, फलतृष्णेनें प्रेरित होऊन अतिनिकृष्ट असें काम्य कर्म करणारे पुरुष दीन आहेत व " हे गार्गि, स्थूलत्वादि धर्मांनीं रहित असलेल्या ह्या आत्म्याला न जाणितां फलोद्देशानें कर्म करून जो पुरुष इहलोकांतून जातो तो कृपण " असें श्रुतींत सांगितलें आहे ४९.

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

---

समत्वबुद्धियुक्तः सन्स्वधर्ममनुतिष्ठन्यत्फलं प्राप्नोति तच्छृणु बुद्धियुक्तो जहातीह० युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥ बुद्धियुक्तः समत्वविषयया बुद्ध्या युक्तो बुद्धियुक्तो जहाति

---

( " यद्वा बुद्धौ शरणं त्रातारमीश्वरमाश्रयेत्यर्थः " असें " बुद्धौ शरणमन्विच्छ " ह्या पदांचें श्रीधरस्वामींनीं एक वैकल्पिक व्याख्यान केलें आहे; परंतु, ईश्वराला शरण जाण्याविषयीं प्रकरण चाललेलें नसतांना तशी अप्रस्तुत कल्पना करणें आणि " ईश्वरम् " हें पद विनाकारण अध्याहृत घेणें हें दोन दोष त्या व्याख्यानावर येतात. करितां, भाष्यकारांप्रमाणें सरळ असें एकच व्याख्यान ह्या ठिकाणीं करणें योग्य आहे. दिग्विजय करून जें द्रव्य तूं आणिलेस तें खर्च करून युधिष्ठिरानें सार्वभौमफलाच्या इच्छेनें राजसूयाचें अनुष्ठान केलें. त्याचें फल तुह्मांला पूर्वीं भोगावें लागलें असून आतांही तें प्राप्त झालें आहे. तस्मात्, काम्य कर्म अतिच निकृष्ट आहे—हें " धनंजय " ह्या संबोधनानें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सुचविलें असा ह्या श्लोकांतील संबोधनाचा आशय भाष्योत्कर्षदीपिकाकारांनीं काढिला आहे ४९ ).

बुद्धियुक्त असलेला पुरुष इहलोकींच पुण्य व पाप ह्या दोहोंचा त्याग करितो. तस्मात् , त्या योगाकरितां तूं प्रयत्न कर. कारण, योग हें कर्मसंबंधीं चातुर्य आहे ॥ ५० ॥

समत्वबुद्धीनें युक्त होऊन स्वधर्माचरण करणाऱ्या पुरुषाला जें फल प्राप्त होतें तें श्रवण कर. समत्वविषयक बुद्धीनें युक्त असलेला पुरुष सत्त्वशुद्धिमूलक ज्ञानप्राप्तीच्या द्वारानें ह्या लोकामध्येंच पुण्य व पाप ह्या दोहोंचा त्याग करितो ( ह्मणजे त्याच्या हातून घडलेलें कर्म बरें असो अथवा वाईट असो त्याच्या बंधाला तें कारण होत नाहीं. ).

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ॥
जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥

---

परित्यजतीहास्मिँल्लोक उभे सुकृतदुष्कृते पुण्यपापे सत्त्वशुद्धिज्ञानप्राप्तिद्वारेण यतस्तस्मात्समत्वबुद्धियोगाय युज्यस्व घटस्व । योगो हि कर्मसु कौशलं स्वधर्माख्येषु कर्मसु प्रवर्तमानस्य या सिद्ध्यसिद्ध्योः समत्वबुद्धिरीश्वरार्पितचेतस्तया तत्कौशलं कुशलभावस्तद्धि कौशलं यद्बन्धस्वभावान्यपि कर्माणि समत्वबुद्ध्या स्वभावान्निवर्तन्ते तस्मात्समत्वबुद्धियुक्तो भव त्वम् ॥ ५० ॥

यस्मात्कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा० पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥ कर्मजं फलं त्यक्त्वेति व्यवहितेन संबन्धः । इष्टानिष्टदेहप्राप्तिः कर्मजं फलं कर्मभ्यो जातं

---

तस्मात् , समत्वबुद्धियुक्त अशा कर्मयोगाच्या अनुष्ठानाकरितां तूं प्रयत्न करीत जा. कारण, समत्वरूप योग हें एक कर्मांविषयीं चातुर्य आहे. ईश्वराकडे लक्ष्य देऊन स्वधर्मनामक कर्मांचे ठिकाणीं प्रवृत्त असलेल्या पुरुषाची जी—सिद्धि व असिद्धि ह्यांविषयीं—समत्वबुद्धि तें कर्मांविषयीं कौशल होय. कौशल=कुशलत्व=कुशलपणा. पुरुषाला बंधांत टाकणें हा कर्मांचा स्वभाव असूनही समत्वबुद्धीच्या योगानें तीं आपल्या स्वभावापासून निवृत्त होतात ह्मणून समत्वबुद्धिरूप योग हें कर्मांविषयीं चातुर्य होय ५०

इतकेंच नव्हें परंतु, बुद्धियुक्त पुरुष कर्मजन्य फलाचा त्याग केल्यावर ज्ञानी होऊन जन्मरूप बंधांतून मुक्त होतात आणि उपद्रवरहित अशा मोक्षपदाला जाऊन पोंचतात ॥ ५१ ॥

कारण, समत्वबुद्धीनें युक्त असलेले पुरुष ज्ञानी होतात आणि ज्ञानाच्या बलानें कर्मांपासून उत्पन्न होणाऱ्या इष्टानिष्टदेहप्राप्तिरूप

**बुद्धियुक्ताः समत्वबुद्धियुक्ता हि यस्मात्फलं त्यक्त्वा परित्यज्य मनीषिणो ज्ञानिनो भूत्वा जन्मबन्धविनिर्मुक्ता जन्मैव बन्धो जन्मबन्धस्तेन विनिर्मुक्ता जीवन्त एव जन्मबन्धाद्विनिर्मुक्ताः सन्तः पदं परमं विष्णोर्मोक्षाख्यं गच्छन्त्यनामयं सर्वोपद्रवरहितमित्यर्थः । अथ वा बुद्धियोगाद्धनंजयेत्यारभ्य परमार्थदर्शनलक्षणैव सर्वतःसंप्लुतोदकस्थानीया**

---

फलाचा त्याग करून जीवमान असतांनाच जन्मरूप बंधापासून मुक्त होणाऱ्या ह्मणजे जीवन्मुक्त होणाऱ्या त्यांना सर्वप्रकारच्या उपद्रवांनीं रहित असें विष्णूचें मोक्षसज्ञंक परमपद प्राप्त होतें. “ बुद्धियुक्ता हि ” हीं दोन पदें सोडून “ कर्मजं ” ह्या पदाचा “ फलं त्यक्त्वा ” ह्या पदांशीं संबंध आहे. कर्मांपासून उत्पन्न झालेलें हा “ कर्मजं ” ह्या पदाचा अर्थ होय. इष्टानिष्टदेहप्राप्ति हें कर्मजन्य फल होय. (आपणांपेक्षां उत्कृष्ट योनींतील देहाची प्राप्ति होणें ह्याला इष्टदेहप्राप्ति ह्मणतात आणि स्वतःपेक्षां हीनयोनींतील देह प्राप्त होणें ह्याला अनिष्टदेहप्राप्ति असें ह्मणतात) “ जन्मैव बन्धो जन्मबन्धस्तेन विनिर्मुक्ताः ” असा “ जन्मबन्धविनिर्मुक्ताः ” ह्या समस्तपदाचा विग्रह असून “ इहजन्मीं जिवंत असतांनाच जन्मरूपबंधापासून मुक्त ह्मणजे जीवन्मुक्त ” हा त्या समस्त पदाचा आशय होय. कोणत्याच प्रकारचा जेथें उपद्रव नाहीं असें हा “ अनामयम् ” ह्या पदाचा अर्थ होय. असो. ह्या तीन श्लोकांचा अर्थ असा करावा किंवा “ बुद्धियोगाद्धनंजय ” येथपासून सर्वतःसंप्लुतोदकस्थानीय ( ह्मणजे “ यावानर्थ उदपाने ” ह्या श्लोकामध्यें सर्वबाजूंनीं उदकानें वाहवत चाललेल्या मोठ्या जलाशयाच्या दृष्टांतानें निर्दिष्ट ) अशी जी परमार्थदर्शनरूप कर्मयोगमूलक चित्तशुद्धीपासून उत्पन्न झालेली बुद्धि तिचेंच प्रतिपादन केलें आहे असें समजावें. कारण, ( “ बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते । बुद्धियुक्ता हि जन्मबन्धविनिर्मुक्ताः ” ह्मणून ) प्रत्यक्ष

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

---

कर्मयोगजसत्त्वशुद्धिजनिता बुद्धिर्दर्शिता साक्षात्सुकृतदुष्कृतप्रहाणादिहेतुत्वश्रवणात् ॥ ५१ ॥

योगानुष्ठानजनिता सत्त्वशुद्धिजा बुद्धिः कदा प्राप्यत इत्युच्यते यदा ते मोहक० गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥ यदा यस्मिन्काले ते तव मोहकलिलं मोहात्मकमविवेकरूपं कालुष्यं येनात्मानात्मविवेकबोधं कलुषीकृत्य विषयं प्रत्यन्तःकरणं प्रवर्तते ते तव बुद्धिर्व्यतितरिष्यति व्यतिक्रमिष्यति शुद्धभावमापत्स्यत इत्यर्थः । तदा तस्मिन्काले गन्तासि प्राप्स्यसि निर्वेदं वैराग्यं श्रोतव्यस्य श्रुतस्य च तदा श्रोतव्यं श्रुतं च निष्फलं प्रतिपद्यत इत्यभिप्रायः ॥ ५२ ॥

---

पुण्यपापत्यागाला वगैरे बुद्धि कारणीभूत होत असल्याचें श्रुत आहे५१.

जेव्हां तुझी बुद्धि अविवेकरूप मालिन्याचें अतिक्रमण करील तेव्हां श्रुत झालेल्या आणि अवशिष्ट राहिलेल्या ह्या दोहोंविषयीं तू विरक्त होशील ॥ ५२ ॥

कर्मयोगाच्या अनुष्ठानानें होणाऱ्या चित्तशुद्धीपासून मला ती बुद्धि केव्हां प्राप्त होईल ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, आत्मानात्मविवेकज्ञान कलुषित करून विषयांकडे अंतःकरणाची प्रवृत्ति करणाऱ्या अविवेकरूप मालिन्याचें ज्यावेळीं तझी बुद्धि अतिक्रमण करील ह्मणजे ज्यावेळीं तुझ्या बुद्धीला शुद्धता प्राप्त होईल त्यावेळीं श्रोतव्य आणि श्रुत ह्यांविषयीं तुला वैराग्य उत्पन्न होईल. श्रवण करावयाचें आणि श्रवण केलेलें तेव्हां निष्फळ होईल हा उत्तरार्धांतील अभिप्राय होय. ( आत्मानात्मविवेक ह्मणजे आत्मवस्तु कोणती आणि आत्मव्यतिरिक्त कोणतें ह्याची निवड करण्याचें ज्ञान ) ५२.

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

---

मोहकलिलात्ययद्वारेण लब्धात्मविवेकजप्रज्ञः कदा कर्मयोगजं फलं परमार्थयोगमवाप्स्यामीति तच्छृणु श्रुतिविप्रति० मवाप्स्यसि ॥ ५३॥ श्रुतिविप्रतिपन्नानेकसाध्यसाधनसंबन्धप्रकाशनश्रुतिभिः श्रवणैर्विप्रतिपन्ना नानाप्रतिपन्ना श्रुतिविप्रतिपन्ना विक्षिप्ता सती ते तव बुद्धिर्यदा यस्मिन्काले स्थास्यति स्थिरीभूता भविष्यति निश्चला विक्षेपचलनवर्जिता सती समाधौ समाधीयतेऽस्मिन्निति समाधिरात्मा तस्मिन्नात्मनीत्येतदचला तत्रापि विकल्पवर्जितेत्येतद्बुद्धिरन्तःकरणं तदा योगमवाप्स्यसि योगं विवेकप्रज्ञां समाधिं प्राप्स्यसि ॥५३॥

---

( बुद्धि निर्मल झाली असतां श्रवण केलेला आणि श्रवण होण्याचा अवशिष्ट राहिलेला जो शास्त्रभाग त्याविषयीं तिचे ठिकाणीं वैराग्य उत्पन्न होईल. तात्पर्य, बुद्धि निर्मल होऊन आत्मानात्मविवेकज्ञान झालें असतां अनात्मविषयक अशीं सर्वही शास्त्रें निष्फल वाटूं लागतील ५२).

नानाप्रकारच्या श्रवणांनीं भरकटलेलें तुझें अंतःकरण संशयविपर्ययरहित होऊन जेव्हां आत्म्याचे ठिकाणीं स्थिर होईल तेव्हां तुला खरा खरा योग प्राप्त होईल ॥ ५३ ॥

अविवेकरूपमालिन्यनाशाच्या द्वारानें आत्मविवेकजन्य ज्ञान प्राप्त होऊन कर्मविषयक समत्वबुद्धिरूप योगाचें फल जो परमार्थयोग ह्मणजे सांख्यबुद्धि ती मला केव्हां प्राप्त होईल ह्मणून विचारशील तर ऐक. अनेक साध्यसाधनसंबंध प्रदर्शित करणाऱ्या श्रुतींच्या श्रवणांनीं अनेकमार्गांना लागलेलें ह्मणजे अनेकप्रकारच्या फलविषयक कल्पनांनीं भरकटलेलें तुझें अंतःकरण ज्यावेळीं निश्चल ह्मणजे विपर्ययरहित आणि अचल ह्मणजे संशयरहित होऊन आत्म्याचे ठिकाणीं ठरूं लागेल

**अर्जुन उवाच॥ स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव। स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥**

---

**प्रश्नबीजं प्रतिलभ्य लब्धसमाधिप्रज्ञस्य लक्षणबुभुत्सयार्जुन उवाच स्थितप्रज्ञस्य० व्रजेत किम् ॥ ५४ ॥ स्थितप्रज्ञस्य स्थिता प्रतिष्ठिताहमस्मि परं ब्रह्मेति प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञस्तस्य स्थितप्रज्ञस्य का भाषा भाषणं वचनं कथमसौ परैर्भाष्यते समाधिस्थितस्य समाधौ स्थितस्य केशव स्थितधीः स्थितप्रज्ञः स्वयं वा किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किं किमासनं व्रजनं वा किं कथं तस्येत्यर्थः। स्थितप्रज्ञस्य लक्षणमनेन श्लोकेन पृच्छ्यते ॥ ५४ ॥**

---

तेंव्हां तुला विवेकप्रज्ञा ह्मणजे विवेकद्वारा उत्पन्न होणारी पूर्वोक्त बुद्धि अर्थात् समाधियोग प्राप्त होईल. ज्याचे ठिकाणीं चित्ताचें लय लाविलें जातें तो अर्थात् आत्मा हा " समाधि " ह्या शब्दाचा अर्थ होय. "निश्चला" ह्मणजे विक्षेपरहित आणि "अचला" ह्मणजे संशयरहित ५३.

(—अमुक कर्म केलें असतां अमुक फल प्राप्त होतें अशाप्रकारें अनेकतऱ्हेचे साध्यसाधनसंबंध दर्शविणाऱ्या श्रुतींच्या श्रवणांनीं—हा भाष्यांतील " अनेकसाध्यसाधनसंबन्धप्रकाशनश्रुतिभिः श्रवणैः " ह्या शब्दांचा आशय होय ५३ )

हे केशवा, लोक कोणत्या लक्षणांवरून एकाद्याला आत्मनिष्ठ अर्थात् स्थितप्रज्ञ असें ह्मणतात व त्याचप्रमाणें स्वतः त्या स्थितप्रज्ञ पुरुषाचें बोलणें, चालणें व बसणें तरी कोणत्या प्रकारचें असतें ? ॥ ५४ ॥

प्रश्न करण्याला कारण सांपडल्यामुळें आत्मज्ञान झालेल्या पुरुषाचीं लक्षणें जाणण्याच्या इच्छेनें अर्जुन प्रश्न करितोः—हे केशवा, स्थितप्रज्ञ व ह्मणूनच आत्मनिष्ठ पुरुषाला लोक तो स्थितप्रज्ञ आहे असें कशावरून ह्मणतात ( ह्मणजे पुरुष कोणत्या लक्षणांनीं युक्त असला ह्मणजे लोक

त्याला स्थितप्रज्ञ असें ह्मणतात ) ? त्याचप्रमाणें तो स्थितप्रज्ञ स्वतः कसें बोलत असतो व तसेंच त्याचें आसन किंवा गमन तरी कोणत्याप्रकारचें असतें ? ( हा ह्या श्लोकाचा आशय होय. ह्या श्लोकानें स्थितप्रज्ञ पुरुषाचें लक्षण अर्जुनानें विचारिलें आहे, " मी परब्रह्म आहें अशा प्रकारची ज्याची समज दृढ झाली आहे, तो " हा " स्थितप्रज्ञः " ह्या शब्दाचा अर्थ होय ५४.

" स्थितप्रज्ञोवस्थाद्वयवान्समाधिस्थो व्युत्थितचित्तश्चेति । अतो विशिनष्टि समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य...तदेवं चत्वारः प्रश्नाः समाधिस्थे स्थितप्रज्ञ एको व्युस्थितस्थितप्रज्ञे त्रय इति " असा मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाचा आशय काढिला आहे. परंतु, हा भाष्यविरुद्ध असलेला आशय बरोबर नाहीं. " स्थितप्रज्ञाच्या दोन तऱ्हा आहेत. एक समाधिस्थ आणि दुसरा समाधीपासून चित्ताचें व्युत्थान झालेला. ह्याकरितां समाधिस्थस्य हें विशेषण दिलें आहे...तेव्हां ह्या श्लोकांत एकंदर चार प्रश्न अर्जुनानें केले आहेत, पैकीं समाधिस्थ स्थितप्रज्ञाविषयीं एक आणि समाधीपासून व्युत्थान पावलेल्या स्थितप्रज्ञाविषयीं तीन " हें मधुसूदनी टीकेंतील वरील मजकुराचें तात्पर्य होय. समाधिस्थ आणि समाधीपासून व्युत्थान पावलेला हे भेद योग्यांतील आहेत. परंतु, ह्याठिकाणीं योग्यांसंबंधाचें प्रकरण चाललेलें नाहीं. ज्ञानरूपसमाधीचेंच प्रकरण चाललेलें आहे. तेव्हां जें प्रकरण चाललेलें नाहीं तद्विषयक प्रश्न अर्जुनानें केला अशी कल्पना करणें अयोग्यच आहे. बरें व्युत्थानावस्थेंतील योगी आणि समाध्यवस्थेंतील योगी असा विभाग समजून ह्या दोहोंसंबंधानें मिळून चार प्रश्न केले आहेत असें मधुसूदनांचें ह्मणणें क्षणभर कबूल करूं ह्मणावें तर ह्या श्लोकांतील प्रश्नांचें पुढें जें भगवानांनीं उत्तर दिलें आहे त्यामध्यें जेव्हां प्राणनिरोध करितो तेव्हां स्थितप्रज्ञाला समाधिस्थ ह्मणावें अशा आशयाचें कांहीं सांगितलेलेंही दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. शिवाय, आत्मज्ञानी पुरुषाच्या समाधीला

प्राणनिरोधाची मुळींच अपेक्षा नसल्याचें योगवासिष्ठांतर्गत उपशमप्रकरणाच्या ६२ व्या सर्गांत स्पष्ट ह्मटलेंही आहे. " यो ज्ञो महात्मन्सततं तिष्ठन्व्यवहरंश्च वा । असमाहितचित्तोसौ कदा भवति कः किल ॥ ५॥ नित्यं प्रबुद्धचित्तास्तु कुर्वन्तोपि जगत्क्रियाः । आत्मैकतत्त्वसंनिष्ठाः सदैव सुसमाधयः ॥ ६ ॥ बद्धपद्मासनस्यापि कृतब्रह्माञ्जलेरपि । अविश्रान्तस्वभावस्य कः समाधिः कथं च वा ॥ ७ ॥ तत्त्वावबोधो भगवन्सर्वाशातृणपावकः । प्रोक्तः समाधिशब्देन न तु तूष्णीमवस्थितिः ॥ ८ ॥ समाहिता नित्यतृप्ता यथाभूतार्थदर्शिनी । साधो समाधिशब्देन परा प्रज्ञोच्यते बुधैः ॥ ९ ॥ अक्षुब्धा निरहंकारा द्वन्द्वेष्वननुपातिनी । प्रोक्ता समाधिशब्देन मेरोः स्थिरतराकृतिः ॥ १० ॥ निश्चिताधिगताभीष्टा हेयोपादेयवर्जिता । प्रोक्ता समाधिशब्देन परिपूर्णा मनोगतिः ॥ ११ ॥ यतःप्रभृति बोधेन युक्तमात्यन्तिकं मनः । तदारभ्य समाधानमव्युच्छिन्नं महात्मनः ॥ १२ ॥ न हि प्रबुद्धमनसो भूत्वा विच्छिद्यते पुनः । समाधिर्दूरमाकृष्टो बिसतन्तुः शिशोरिव ॥ १३ ॥ समग्रं दिनमालोकाद्विरमत्यक्षयो यथा । आजीवितान्तं नो प्रज्ञा तथा तत्त्वावलोकनात् ॥ १४ ॥ अजस्रमम्बु वहनाद्यथा नद्या न रुध्यते । तथा विज्ञानदृग्बोधात्क्षणमात्रं न रुध्यते ॥ १५ ॥ न विस्मरत्यविरतं यथा कालः कलागतिम् । न विस्मरत्यविरतं स्वात्मानं प्राज्ञधीस्तथा ॥ १६ ॥ न विस्मरति सर्वत्र यथा सततगो गतिम् । न विस्मरति नित्येयं चिन्मात्रं प्राज्ञधीस्तथा ॥१७॥ यथा सत्ताविहीनात्मा पदार्थो नोपलभ्यते । तथात्मज्ञानहीनात्मा कालो ज्ञस्य न लभ्यते ॥ १९ ॥ न संभवति संसारे गुणहीनो गुणी यथा । न संभवत्यात्मसंविद्वर्जितो ह्यात्मवांस्तथा ॥ २० ॥ सर्वदैवास्मि संबुद्धः सर्वदैवास्मि निर्मलः । सर्वदैवास्मि शान्तात्मा सर्वदास्मि समाहितः ॥२१॥ भेदः केन समाधेर्मे जन्यते कथमेव वा । आत्मनोव्यतिरेकेण नित्यमेव सदात्मता ॥ २२ ॥ " असा समाधिविषयक निश्चय योगवासिष्ठामध्यें केलेला आहे. ह्या श्लोकांचें तात्पर्य येणेंप्रमाणेंः—

सुरघु ह्मणतोः—हे महात्म्या परिघा, जो तत्त्वज्ञानी आहे तो जरी स्थित असला किंवा व्यवहारांत गढलेला असला तरी त्याच्या स्वरूपांत भेद तो काय होणार बरें ? त्याचें चित्त कधीं समाधीपासून ढळणार कां आहे ? ५. ज्याचें चित्त प्रबुद्ध झालें आहे त्या केवळ आत्मज्ञाननिष्ठ पुरुषाची सर्वदांच चांगली समाधि लागलेली असते ६. एकादा पद्मासन घालून बसलेला असला किंवा एकादा आणखी ब्रह्मांजलि करून बसलेला असला तरा त्याचें मनच जर बाह्यविषयांपासून उपरम पावलें नसेल तर त्याला समाधि काय होय आणि ती असणार तरी कशी ? ७. कारण, हे भगवन् , सर्ववासनारूप तृणाला दग्ध करणारा जो तत्त्वज्ञानरूप अग्नि तो समाधिशब्दानें उक्त आहे. हालचाल न करितां बसणें हा कांहीं समाधिशब्दाचा अर्थ नव्हे ८. हें साधो, वस्तूचें स्वरूप जसें असेल तसेंच अवलोकन करणारी, निश्चल आणि नित्यतृप्त अशी जी परा प्रज्ञा ह्मणजे अबाधित आत्मज्ञान त्याला ज्ञानी लोक समाधि असें ह्मणत असतात ९. क्षोभ व अहंकार ह्यांनीं रहित आणि जयापजय, मानापमान इत्यादि द्वंद्वांमध्यें न पडणारें असें जें मेरुपर्वतापेक्षांही स्थिर असलेलें मनाचें स्वरूप ती समाधि होय १०. निश्चित, आत्म्याचे ठिकाणीं सर्वस्वीं लय लागून राहिलेली, अभीष्ट आणि व्यवहारदृष्ट्या दुःखदायक वस्तूचा त्याग अथवा सुखदायक गोष्टीचा स्वीकार न करणारी अशी जी परिपूर्ण मनोवृत्ति ती समाधि होय ११. मन हें जेव्हांपासून तत्त्वज्ञानानें पूर्णपणें युक्त झालेलें असतें तेव्हां-पासून महात्म्याची समाधि कधीं विच्छिन्न होतच नाहीं १२. तात्पर्य, कमलाच्या देठांतील तंतु लांब ओढला असतां मुलाच्या हातून तो जसा विच्छिन्न होतो तशी प्रबुद्ध मनानें युक्त असलेल्या पुरुषाची समाधि कधीं विच्छिन्न होत नाहीं १३. सूर्य ज्याप्रमाणें संपूर्ण दिवसपर्यंत प्रकाशापासून उपरम पावल्याचें दिसत नाहीं त्याचप्रमाणें ब्रह्माकारवृत्ति देहपातापर्यंत तत्त्वावलोकनापासून च्युत होत नाहीं १४. महानदीचें

उदक ज्याप्रमाणें सतत वाहण्यापासून कधीं बंद केलें जात नाहीं तशींच विज्ञानदृष्टि तत्वज्ञानापासून क्षणमात्रही प्रतिबद्ध होत नाहीं १५. काळाला ज्याप्रमाणें कलेकलेनें गमन करण्याचा कधींही विसर पडत नाहीं त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या बुद्धीला आत्म्याचा कधींही विसर पडत नाहीं १६. ज्याप्रमाणें सतत जाणाऱ्याला कधींही गतीची विस्मृति नाहीं त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या बुद्धीला कधींही चिन्मय आत्म्याचें विस्मरण होत नाहीं १७. ज्याप्रमाणें पदार्थ अस्तित्वरहित स्वरूपानें युक्त असलेला उपलब्ध होत नाहीं त्याचप्रमाणें तत्त्वज्ञानी पुरुषाचा काल आत्मज्ञानरहित अशा स्वरूपानें युक्त असलेला उपलब्ध होत नाहीं १९. जगतामध्यें गुणी पुरुष जसा गुणहीन संभवत नाहीं तसाच तत्त्वज्ञानी पुरुष आत्मज्ञानरहित असणें संभवत नाहीं २०. सारांश, मी सर्वदांच प्रबुद्ध असून सर्वदां निर्मल आहें आणि त्याचप्रमाणें सर्वदांच माझें मन शांत असून सर्वदांच मी समाधीमध्यें आहें २१. कारण, समाधि ही आत्मस्वरूपाहून भिन्न नसल्यामुळें तिचें अस्तित्व सर्वदां सिद्धच आहे. तेव्हां माझ्या समाधीचा विच्छेद कशानें आणि कोणत्या प्रकारानें होणार ? २२ ).

( गीतेंतील पूर्वापर संदर्भाकडे लक्ष्य दिलें असतां तत्त्वज्ञानरूप समाधीचें प्रकरण चालल्याचें स्पष्ट दिसत आहे आणि ह्या योगवासिष्ठांतर्गत समाधिनिश्चयविषयक श्लोकांचा अर्थ अवलोकन केला असतां तत्त्वज्ञानरूप समाधीला प्राणनिरोधाची मुळींच जरूर लागत नसल्याचें व तत्त्वज्ञानी पुरुषाची ती समाधि कधींच विछिन्न होत नसल्याचें स्पष्ट होत आहे. तेव्हां " समाधिनिष्ठ स्थितप्रज्ञ आणि समाधीपासून व्युत्थान पावलेला स्थितप्रज्ञ " असे जे मधुसूदनांनीं दोन प्रकार केले आहेत ते बरोबर नसून जो स्थितप्रज्ञ तोच समाधिस्थ असें जें सर्वज्ञ भाष्यकारांनीं दर्शविलें आहे तेंच योग्य आहे. श्रीधरस्वामी व शंकरानंद ह्यांनीं मधुसूदनांप्रमाणें दोन प्रकार न करितां एकच प्रकार

**श्रीभगवानुवाच॥ प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान्।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

---

मानिला आहे. परमार्थप्रपानामक टीकेंत व नीलकंठी टीकेंत दोन प्रकार मानिले आहेत; परंतु, मधुसूदनांच्या लिहिण्याचा वर जो विचार केला आहे त्यापेक्षां ह्या दोन्ही टीकाकारांचें ह्मणणें अयोग्य कसें हें दर्शविण्यास वेगळा विचार करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. ह्या श्लोकावरील वामन पंडितांची यथार्थदीपिका पहाण्यासारखी असल्यामुळें पुढें दिली आहे. पंडित लिहितातः—

प्रज्ञा ह्मणजे बुद्धी। जिला समाधींत स्थिरत्वसिद्धी। ते ज्याची त्यास समृद्धी। स्थितप्रज्ञतेची॥ त्यास प्रपंच भगवद्रूप। अळंकारीं हेमस्वरूप। इंद्रियदृष्टीं थिजलें तूप। रसनेस तेथें न रसभंग॥ हा समाधी सविकल्प। विकल्पीं नुसतें निर्विकल्प। हें परोक्षरीती स्वल्प। अनुभव नसोनि समजला॥ ऐसा नित्य समाधिस्थ। जो बुद्धियुक्त नासी सुकृत दुष्कृत। देह धरूनि वर्तेही निश्चित। हेंही अर्जुनें आयकिलें॥ ह्मणूनि ह्मणतो केशवा। स्थितप्रज्ञ ऐसा माधवा। जो नित्य समाधिस्थ यादवा। बोलिलासी॥ आजि त्याचीं जीं लक्षणें। तीं सांगावीं कमलेक्षणें। तो काय बोले संभाषणें। तींही वदावीं॥ तो असतो काय करूनी। तो वर्तती काय ह्मणोनी। हें स्वमुखें निगमवचनीं। केशवा स्वामी वदावें॥

मधुसूदनांच्या ह्या श्लोकावरील संस्कृत परंतु अयथार्थ दीपिकेपेक्षां वामनपंडितांची प्राकृतच परंतु, यथार्थदीपिका योग्यतेनें ज्यास्त आहे इतकेच नव्हें तर " स्थितप्रज्ञ कसा सांग जो समाधिस्थ सर्वदा। केशवा काय तो बोले असे वर्ते जगीं कसा " ही पंडितांची भाष्याला धरून असलेली प्राकृत समश्लोकीही भाष्यविरुद्ध असलेल्या मधुसूदनप्रभृतींच्या ह्या श्लोकावरील संस्कृत टीकांपेक्षां श्रेष्ठ आहे ५४ )

श्रीभगवान् ह्मणतातः—हे पार्था, मनामध्यें असलेल्या सर्व वासनांचा

**यो ह्यादित एव संन्यस्य कर्माणि ज्ञानयोगनिष्ठायांप्रवृत्तो यश्च कर्मयोगेन तयोः स्थितप्रज्ञस्य प्रजहातीत्यारभ्याध्यायपरिसमाप्तेः स्थितप्रज्ञस्य लक्षणं साधनं चोपदिश्यते । सर्वत्रैव ह्यध्यात्मशास्त्रे कृतार्थलक्षणानि यानि तान्येव साधनान्युपदिश्यन्ते यत्नसाध्यत्वाद्यानि यत्नसाध्यानि साधनानि लक्षणानि च भवन्ति तानि श्रीभगवानुवाच प्रजहाति यदा कामा० स्तदोच्यते ॥ ५५ ॥ प्रजहाति प्रकर्षेण जहाति परि-**

---

त्याग करून पुरुष जेव्हां स्वतःच्याच योगानें स्वस्वरूपाचे ठिकाणीं संतुष्ट होऊन रहातो तेव्हां त्याला ' स्थितप्रज्ञ ' असें ह्मणतात ॥ ५५ ॥

जो अगदीं प्रथम ब्रह्मचर्याश्रमापासूनच कर्मांचा संन्यास न करून ज्ञानमार्गामध्यें प्रवृत्त झालेला असतो आणि जो कर्मांचा संन्यास न करितां शेवटपर्यंत कर्ममार्गामध्येंच प्रवृत्त झालेला असतो त्यांपैकीं पहिल्या स्थितप्रज्ञ पुरुषाचें लक्षण मागल्या श्लोकांत अर्जुनानें भगवानांना विचारिलें आहे. आतां " प्रजहाति " येथपासून तों अध्याय समाप्त होईपर्यंत स्थितप्रज्ञ पुरुषांचीं लक्षणें आणि साधनें भगवान् सांगत आहेत. अध्यात्मशास्त्रामध्यें सर्व ठिकाणीं ज्ञानी पुरुषांचीं जीं लक्षणें सांगितलेलीं असतात तींच जिज्ञासु पुरुषाचीं साधनें होतात. कारण, तीं जरी तत्त्वज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं स्वाभाविक दृष्टोत्पत्तीस येत असतात तरी तत्त्वजिज्ञासु पुरुषाला तीं प्रयत्नानें साध्य होत असतात. त्याचप्रमाणें तत्त्वजिज्ञासु पुरुषाला जीं साधनें यत्नानें संपादन करावीं लागतात तीं तत्त्वज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं यत्नावांचून स्वाभाविकच दृष्टीं पडत असल्यामुळें तीं त्याचीं लक्षणें होतात. ( तात्पर्य, लक्षणें स्वाभाविकच असून साधनें प्रयत्नसाध्य असतात. तेव्हां सिद्ध पुरुषाचीं जीं लक्षणें तींच साधकाचीं साधनें होत असल्याचें सिद्ध आहे ) आतां " स्थितप्रज्ञस्य का भाषा " ह्या प्रथम प्रश्नाचें

त्यजति यदा यस्मिन्काले कामानिच्छाभेदान्सर्वान्समस्तान्हे पार्थ मनोगतान्मनसि प्रविष्टान्हृत्सर्वकामपरित्यागे तुष्टिकारणाभावाच्छरीरधारणनिमित्तशेषे च सत्युन्मत्तप्रमत्तस्येव प्रवृत्तिः प्राप्तेत्यत उच्यत आत्मन्येव प्रत्यगात्मस्वरूप एवात्मना स्वेनैव बाह्यलाभनिरपेक्षस्तुष्टः परमार्थदर्शनामृतरसलाभेनान्यस्मादलंप्रत्ययवान्स्थितप्रज्ञः स्थिता प्रतिष्ठितात्मानात्मविवेकजा प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञो विद्वांस्तदोच्यते । त्यक्तपुत्रवित्तलोकैषणः संन्यास्यात्माराम आत्मक्रीडः स्थितप्रज्ञ इत्यर्थः ॥ ५५॥

---

श्रीभगवान् उत्तर देतातः—हे पार्था, ज्यावेळीं मनामध्यें प्रविष्ट झालेल्या सर्व प्रकारच्या वासनांचा पुरुष सर्वस्वीं त्याग करितो आणि बाह्य लाभाची अपेक्षा न धरितां स्वतःच्याच योगानें स्वस्वरूपाचेच ठिकाणीं जेव्हां तो संतुष्ट होऊन रहातो ह्मणजे परमार्थज्ञानामृतरस प्राप्त झाल्यामुळें बाह्य वस्तूची ज्याला मुळींच अपेक्षा रहात नाहीं त्या विद्वानाला ‘ स्थितप्रज्ञ ’ असें ह्मणतात. ह्मणजे तेव्हां त्याचें आत्मानात्मविवेकजन्य ज्ञान स्थिर झालें असें ह्मणतात. सारांश, पुत्रैषणा, वित्तैषणा आणि लोकैषणा ह्यांचा त्याग करून स्वस्वरूपाचेच ठिकाणीं रममाण होऊन क्रीडा करीत असलेला जो पुरुष तो स्थितप्रज्ञ होय. सर्व कामनांचा परित्याग केला असतां संतोषाचेंही कारण उरत नाहीं. तेव्हां शरीरधारणाचें कारण जें प्रारब्धकर्म तें अवशिष्ट असल्यामुळें स्थितप्रज्ञ पुरुषाचें वर्तन उन्मत्तासारिखें आणि प्रमत्त पुरुषासारिखें होणार अशी शंका येऊं नये ह्मणून “ आत्मन्येवात्मना तुष्टः ” असें ह्मटलें आहे. (ज्याचें अंतःकरण विवेकरहित असतें तो उन्मत्त होय आणि फार मद चढल्यामुळें पूर्वीं असलेल्याही विवेकाचा त्याग करून जो भ्रांतिग्रस्त पुरुषाप्रमाणें वागूं लागतो तो प्रमत्त होय ) ५५.

( मधुसूदनसरस्वतींनीं “ स्थितप्रज्ञस्य का भाषा० व्रजेत किम् ”

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥

किंच दुःखेष्वनु० धीर्मुनिरुच्यते ॥५६॥ दुःखेष्वाध्यात्मिकादिषु प्राप्तेषु नोद्विग्नं न प्रक्षुभितं दुःखप्राप्तौ मनो यस्य सोनुद्विग्नमनाः । तथा च सुखेषु विगतस्पृहो विगता स्पृहा तृष्णा यस्य नाग्निरिवेन्धनाद्याधाने सुखान्यनुविवर्धते स विग-

ह्या श्लोकांत अर्जुनानें समाधिस्थ स्थितप्रज्ञ आणि व्युत्थित स्थितप्रज्ञ अशा दोहोंसंबंधानें मिळून चार प्रश्न केले आहेत अशी कल्पना केली असल्यामुळें ती कशी तरी सिद्ध करण्याकरितां ह्या श्लोकांच्या व्याख्यानांत " स्थितप्रज्ञस्तदोच्यते " ह्या शब्दांपुढें " समाधिस्थ इतिशेषः " असें लिहून शेवटीं " तथा च समाधिस्थः स्थितप्रज्ञ एवंविधैर्लक्षणवाचिभिः शब्दैर्भाष्यत इतिप्रथमप्रश्नस्योत्तरम् " असें त्यांनीं लिहिलें आहे. परंतु, भाष्यकारांच्या पद्धतीनें व्याख्यान केलें असतां " समाधिस्थः " हें पद अध्याहृत घेणें व्यर्थ असल्याचें स्पष्ट होत असल्यामुळें आणि जो स्थितप्रज्ञ तोच समाधिस्थ असा एकच प्रकार समजल्यावांचून गत्यंतर नसल्याचें पूर्वींच सिद्ध झालें असल्यामुळें मधुसूदनसरस्वतींनीं स्वीकारिलेला अध्याहार व शेवटीं काढिलेला आशय ह्या दोहोंचेंही निराकरण आपोआपच होत आहे ५५ ).

त्याचप्रमाणें दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, सुखें प्राप्त झालीं असतांही ज्याला त्यांच्या उपभोगाची मुळींच इच्छा नसते आणि विषयप्रीति, भय व क्रोध ह्यांपासून जो अलिप्त असतो तो संन्यासी स्थितप्रज्ञ होय ॥ ५६ ॥

आध्यात्मिकादि दुःखें प्राप्त झालीं असतां जेव्हां मन उद्विग्न ह्मणजे क्षुब्ध होत नाहीं, त्याचप्रमाणें सुखें प्राप्त झालीं असतां जेव्हां त्यांचा उपभोग घेण्याची इच्छा मनांतून नाहींशी झालेली असते आणि विषयाभिलाष

**तस्पृहः । वीतरागभयक्रोधो रागश्च भयं च क्रोधश्च वीता विगता यस्मात्स वीतरागभयक्रोधः स्थितधीः स्थितप्रज्ञो मुनिः संन्यासी तदोच्यते ॥ ५६ ॥**

---

भय व क्रोध ह्यांचा जेव्हां पुरुषाचे ठिकाणीं अभाव होतो तेव्हां त्याला सर्वकर्मसंन्यास केलेला स्थितप्रज्ञ असें ह्मणतात. " दुःखेषु प्राप्तेषु नोद्विग्नं मनो यस्य सः " हें " दुःखेष्वनुद्विग्नमनाः " ह्या पदांचें व " सुखेषु प्राप्तेषु विगता स्पृहा यस्य सः " हें " सुखेषु विगतस्पृहः " ह्या पदांचें स्पष्टीकरण असून " रागश्च भयं च क्रोधश्च वीता विगता यस्मात्सः " हा " वीतरागभयक्रोधः " ह्या समासाचा विग्रह होय. इंधनें घातल्यानें अग्नि ज्याप्रमाणें वृद्धिंगत होतो त्याप्रमाणें सुखें प्राप्त झालीं असतां ज्याची वासना वृद्धिंगत होत नाहीं तो " हा " विगतस्पृहः " ह्या पदाचा आशय होय ५६.

( " दुःखेष्वाध्यात्मिकादिषु प्राप्तेषु " असें भाष्यांत आहे. आधिभौतिक आणि आधिदैविक ह्या दुःखांचा समावेश करण्यारितां भाष्यकारांनीं " आध्यात्मिकादिषु " ह्या ठिकाणीं आदिशब्द घातला आहे. दुःखें तीन प्रकारचीं असतात; आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक. अतिशय वावटळ, अतिवृष्टि, अनावृष्टि, इत्यादि आधिदैविक दुःखें होत; व्याघ्र, सर्प, चोर इत्यादिकांपासून होणारीं दुःखें आधिभौतिक होत आणि ज्वर, मस्तकशूल इत्यादि जीं शारीरिक दुःखें तीं आध्यात्मिक दुःखें होत. " इदानीं व्युत्थितचित्तस्य स्थितप्रज्ञस्य भाषणोपवेशनगमनानि मूढजनविलक्षणानि व्याख्येयानि तत्र किं प्रभाषेतेत्यस्योत्तरमाह " असें मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाला अवतरण दिलें आहे व—" प्रजहाति यदा कामान् " ह्या श्लोकानें प्रथम प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. आतां समाधीपासून व्युत्थान पावलेला जो स्थितप्रज्ञ त्याचें संभाषण, उपवेशन व गमन हीं मूढ जनांच्या संभाषणादिकांहून

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

---

**किं च यः सर्वत्रा० तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥ यो मुनिः सर्वत्र देहजीवितादिष्वप्यनभिस्नेहोऽभिस्नेहवर्जितस्तत्तत्प्राप्य शुभाशुभं तत्तच्छुभमशुभं वा लब्ध्वा नाभिनन्दति न द्वेष्टि शुभं प्राप्य न तुष्यति न हृष्यत्यशुभं च प्राप्य न द्वेष्टीत्यर्थः । तस्यैवं हर्षविषादवर्जितस्य विवेकजा प्रज्ञा प्रतिष्ठिता भवति ॥ ५७ ॥**

---

वेगळीं असतात हें सांगावयाचें आहे. पैकीं समाधीपासून व्युत्थान पावलेला स्थितप्रज्ञ कसें भाषण करितो ह्या श्लोकाचें उत्तर भगवान् देतात " हा त्यांच्या अवतरणाचा आशय होय. परंतु " स्थितधीर्मुनिरुच्यते " असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. त्यावरून स्थितप्रज्ञ पुरुषाचें लक्षणच ह्या श्लोकांत दर्शविल्याचें आणि अर्थात् प्रथम प्रश्नाचेंच उत्तर दिल्याचें सिद्ध होत असल्यामुळें मधुसूदनांचें अवतरण बरोबर नाहीं. श्रीधरस्वामी आणि वामनपंडित ह्या उभयतांनींही " प्रजहाति ० प्रज्ञस्तदोच्यते " ह्या—आणि " दुःखेष्व० धीर्मुनिरुच्यते— " अशा दोन श्लोकांनीं पहिल्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे असा आपला आशय दर्शविला आहे ५६)

ज्याची कोठेंही आसक्ति नसते व शुभ गोष्ट प्राप्त झाली असतां ज्याला हर्ष होत नाहीं आणि अशुभ गोष्ट प्राप्त झाली असतां जो विषाद मानीत नाहीं त्याची बुद्धि स्थिर आहे असें समजावें ॥ ५७ ॥

शिवाय, देहास्थिति वगैरेविषयीं सुद्धां ज्या मुनीला मुळींच आस्था नसते आणि शुभ अथवा अशुभ गोष्ट प्राप्त झाली असतां जो तिचें अभिनंदन अथवा द्वेष करीत नाहीं ह्मणजे शुभ प्राप्त झालें असतां ज्याला हर्ष होत नाहीं आणि अशुभ प्राप्त झालें असतां जो त्याचा तिरस्कार करीत नाहीं त्या पुरुषाची ह्मणजे ह्याप्रमाणें हर्षविषादरहित असलेल्या पुरुषाची विवेकजन्य बुद्धि स्थिर असते ५७.

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥
विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

---

किं च यदा संहरते चायं०प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥ यदा संहरते सम्यगुपसंहरते चायं ज्ञाननिष्ठायां प्रवृत्तो यतिः कूर्मोऽङ्गानीव यथा कूर्मो भयात्स्वान्यङ्गान्युपसंहरते सर्वशः सर्वत एवं ज्ञाननिष्ठ इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः सर्वविषयेभ्य उपसंहरते । तस्य प्रज्ञा प्रतिष्ठितेत्युक्तार्थं वाक्यम् ॥ ५८ ॥

तत्र विषयाननाहरत आतुरस्यापीन्द्रियाणि निवर्तन्ते कूर्मोऽङ्गानीव संह्रियन्ते न तु तद्विषयो रागः स कथं संह्रियत इति । उच्यते विषया विनिवर्तन्ते० परंदृष्ट्वा निवर्तते॥५९॥

---

कूर्म ज्याप्रमाणें सर्वबाजूंनीं आपले अवयव आंखडून घेतो त्याप्रमाणें सर्वविषयांपासून हा यति जेव्हां आपलीं इंद्रियें सहज आंवरून धरितो तेव्हां त्याची मोक्षविषयक बुद्धि स्थिर झाली असें समजावें ॥ ५८ ॥

भीतीमुळें कूर्म ज्याप्रमाणें आपले अवयव सर्वबाजूंनीं अनायासें आंत ओढून घेतो त्याप्रमाणें हा ज्ञानमार्गामध्यें प्रवृत्त झालेला यति जेव्हां सर्व विषयांपासून इंद्रियें सहज परावृत्त करून आपल्या अधीन ठेवितो तव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली असें समजावें. ५८

आहार न करणाऱ्या प्राण्याची इंद्रियें विषयांपासून निवृत्त होतात; परंत, अभिलाषावांचून तीं निवृत्त होतात आाण ब्रह्मसाक्षात्कार झाल्यामुळें ह्या यतीचा तर विषयाभिलाषही निवृत्त होतो ॥ ५९ ॥

कूर्म ज्याप्रमाणें आपले अवयव आंखडून घेतो त्याप्रमाणें विषयोपभोग घेण्यास असमर्थ झालेल्या रोगी पुरुषाचींही इंद्रियें विषयांपासून निवृत्त झालेलीं असतात. परंतु, तद्विषयक अभिलाषाची मनापासून

**यद्यपि विषयोपलक्षितानि विषयशब्दवाच्यानीन्द्रियाण्यथ वा विषया एव निराहारस्यानाह्रियमाणविषयस्य निराहारस्य देहिनः कष्टे तपसि स्थितस्य मूर्खस्यापि निवर्तन्ते देहिनो देहवतो रसवर्जं रसो रागो विषयेषु यस्तं वर्जयित्वा । रसशब्दो रागे प्रसिद्धः । स्वरसेन प्रवृत्तो रसिको रसज्ञ इत्यादिदर्शनात् । सोपि रसो रञ्जनरूपः सूक्ष्मोऽस्य यतेः परं परमार्थतत्त्वं ब्रह्म दृष्ट्वोपलभ्याहमेव तदिति वर्तमानस्य निवर्तते निर्बीजं विषयविज्ञानं संपद्यत इत्यर्थः । नासति सम्यग्दर्शने रसस्योच्छेदः । तस्मात्सम्यग्दर्शनात्मिकायाः प्रज्ञायाः स्थैर्यं कर्तव्यमित्यभिप्रायः ॥ ५९ ॥**

---

निवृत्ति होत नाहीं ( आणि विषयाभिलाष जर निवृत्त झाला नाहीं तर पुरुषाचे ठिकाणीं मोक्षविषयक बुद्धि स्थिर होण्याचा संभवच नाहीं ). तेव्हां तो विषयाभिलाष कोणत्या उपायानें निवृत्त होतो—ह्मणून विचारशील तर हे अर्जुना, ( अनशनापेक्षां श्रेष्ठ तप नाहीं अशी श्रुति आहे. तेव्हां, व्याधिग्रस्त झाल्यामुळें ) आहाररहित आणि ह्मणूनच कठीण तपश्चर्या करीत असलेल्या एकाद्या मूर्ख ह्मणजे ज्ञानहीन देहाभिमानी पुरुषाचींही इंद्रियें, व्याधीनें विषयोपभोगसामर्थ्य नाहींसें झाल्यामुळें, जरी विषयांपासून निवृत्त होत असतात तरी विषयाभिलाष वर्ज करून निवृत्त होत असतात. ( सारांश, विषयोपभोग होणेंच अशक्य असल्यामुळें देहाभिमानी पुरुषाचीं इंद्रियें जरी विषयापासून परावृत्त झालेलीं असतात तरी विषयप्राप्तीसंबंधाची इच्छा त्या देहाभिमानी व्याधिग्रस्त पुरुषाच्या मनांत कायम असतेच. ) परंतु, परमार्थतत्त्व जें ब्रह्म तें उपलब्ध झाल्यामुळें ह्मणजे मींच तें परब्रह्म असा अपरोक्ष अनुभव येत असल्यामुळें ह्या यतीचा चित्तक्षोभकारक विषयाभिलाष सूक्ष्म देखील निवृत्त होतो ह्मणजे त्याची विषयबुद्धि निर्मूल होऊन जाते. सारांश,

चांगलें ज्ञान झाल्यावांचून विषयाभिलाषाचा उच्छेद होत नाहीं. तस्मात्, ( विषयाभिलाषाच्या निवृत्तीकरितां ) यथार्थदर्शनरूप जी बुद्धि ती स्थिर करावी हा ह्या श्लोकाचा अभिप्राय होय. ह्या श्लोकांतील " विषयाः " ह्या पदाचा अर्थ लक्षणेनें इंद्रियें असा घ्यावा अथवा शब्दादिविषय हा प्रसिद्ध अर्थच करावा. विषयाचे ठिकाणीं असलेला जो अभिलाष तो वर्ज करून हा "रसवर्ज" ह्या पदाचा अर्थ होय.अभिलाष, इच्छा, वासना ह्या अर्थीं रसशब्दाची प्रसिद्धि आहे. कारण,स्वरसेन प्रवृत्तः ( स्वेच्छेनें प्रवृत्त झाला ), रसिकः ( इच्छाधीन असलेला) रसज्ञः ( विवक्षित गोष्ट जाणणारा) इत्यादि प्रयोग आढळण्यांत येतात५९.

( " चांगलें ज्ञान झाल्यावांचून विषयाभिलाष जर निवृत्त होत नसेल तर तो निवृत्त झाल्यावांचून पुरुषाला चांगलें ज्ञान उत्पन्न होण्याचाही संभव नाहीं. तेव्हां ह्या ठिकाणीं अन्योन्याश्रय दोष येतो अशी शंका कोणी केल्यास ती उपयोगी नाहीं. कारण, इंद्रियांचें विषयाधीनत्व विवेकाच्या योगानें नाहींसें झालें असतां उत्कट विषयाभिलाष नाहींसा होऊन नंतर चांगलें ज्ञान उत्पन्न झाल्यामुळें सूक्ष्मही अभिलाष सर्वस्वीं निवृत्त होतो. करितां अन्योन्याश्रय दोष ह्या ठिकाणीं येत नाहीं " असा आनंदगिरींनीं " नासति सम्यग्दर्शने रसस्योच्छेदः " ह्या भाष्याचा आशय काढिलेला आहे ) .

( यथार्थदीपिकेमध्यें वामनपंडितांनीं जो भाष्यकारांप्रमाणेंच ह्या श्लोकाचा आशय काढिला आहे तो लक्ष्यांत ठेवण्यासारिखा आहे. पंडित ह्मणतातः—ज्या इंद्रियांचा जो विषय। तो तदाहार हा निश्चय। निराहारशब्दें हे उभय । उपवासी लंघिती ज्वरितही ॥ निराहार याप्रकारीं। देहाभिमानी देहधारी । स्रक्चंदन आणि नारी । न लगती तयासी ॥ तेसमयीं तों विषय । परतले परंतु निश्चय । पुढें भोगावयाचा त्यांचा जय । झाला नाहीं ॥ वासनेस ह्मणती रस । मनीं त्या रसाचा असे वास । जरी केला उपवास । काय जालें ॥ परतला विषयाचा

यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ॥
इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥

---

सम्यग्दर्शनलक्षणं प्रज्ञास्थैर्यं चिकीर्षता दाविन्द्रियाणि स्ववशे स्थापयितव्यानि यस्मात्तदनवस्थापने दोषमाह यततो ह्यपि कौन्तेय० प्रसभं मनः ॥ ६० ॥ यततः प्रयत्नं कुर्वतो हि यस्मादपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितो मेधाविनोपीति व्यवहितेन संबन्धः । इन्द्रियाणि प्रमाथीनि प्रमथनशीलानि विषयाभिमुखं हि पुरुषं विक्षोभयन्त्याकुलीकुर्वन्त्याकुलीकृत्य च हरन्ति प्रसभं प्रसह्य प्रकाशमेव पश्यतो विवेकज्ञानयुक्तं मनो यतः ॥

---

विलास । परी परतला नाहीं वासनारस । स्थितप्रज्ञाचा तोही विरस । वासनारस असे ज्याला ॥ ह्मणती वासनारस । कीं जाला त्याचा विरस । तरी आत्मरस सुरस । सेविला याणें ॥ अमृत पिऊं लागे रसना । तरी कांजी कां विसर होईना । राग तो विराग झाला अर्जुना । देखतां परमात्मयातें ॥ स्वरूपगोडी लागतां मना । सकळ दूर होय कामना । भोगेच्छा सर्वथा असेना । स्थितप्रज्ञासी ॥ आत्मा बरा कळल्यावरी । विषयवासना कैची उरी । तो इच्छा धरील कां परी । ऐसें श्रुतिही बोलती ॥ एवं कूर्मांगाचे परी । अनायासें विषय आवरी । तो स्थितप्रज्ञ हेचि खरी । गोष्टी अगा अर्जुना ५९ )

हे कुंतीपुत्रा, बुद्धि स्थिर होण्याकारितां प्रयत्न करीत असलेल्या विवेकी पुरुषाचेंही मन चित्तक्षोभक इंद्रियें धडधडीत हरण करितात ॥ ६० ॥

यथार्थदर्शनरूपबुद्धिस्थैर्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें प्रथमतः आपलीं इंद्रियें स्वाधीन करून ठेवावीं. कारण, तीं स्वाधीन न ठेविल्यास " यततो ह्यपि० प्रसभं मनः " ह्या श्लोकांमध्यें भगवानांनीं दोष सांगितला आहे. हे कुंतीपुत्रा, ज्याअर्थीं प्रयत्न करणाऱ्याही विवेकी

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ॥
वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

---

तस्मात्तानि सर्वाणि०प्रज्ञा प्रतिष्ठिता॥६१॥ तानि सर्वाणि संयम्य संयमनं वशीकरणं कृत्वा युक्तः समाहितः सन्नासीत मत्परोऽहं वासुदेवः सर्वप्रत्यगात्मा परो यस्य स मत्परो नान्योऽहं तस्मादित्यासीतेत्यर्थः । एवमासीनस्य यतेर्वशे हि यस्येन्द्रियाणि वर्तन्तेऽभ्यासबलात्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६१॥

---

पुरुषाचें सुद्धां विवेकरूप ज्ञानानें युक्त असलेलें मन विषयाभिमुख पुरुषाला क्षुब्ध करून टाकणारीं इंद्रियें धडधडीत पहातां पहातां हरण करितात त्याअर्थीं—हा ह्या श्लोकाचा आशय होय. अपिशब्दाचा अन्वय " यततः " ह्या पदाकडे व मध्यें असलेलीं पदें सोडून "विपश्चितः" ह्या पदाकडे करावा. प्रमाथीनि ह्मणजे क्षोभ उत्पन्न करण्याचा ज्यांचा स्वभाव आहे अशीं. कारण, इंद्रियें विषयाभिमुख पुरुषाला क्षुब्ध करून त्याचें मन ओढून घेत असतात ६१.

ह्यास्तव, त्या सर्व इंद्रियांचें संयमन करून व स्वस्थांतःकरणपूर्वक " मीच परब्रह्म " अशी दृष्टि ठेवून पुरुषानें असावें. कारण, ह्याप्रमाणें असलेल्या ज्या पुरुषाचीं इंद्रियें स्वाधीन असतात त्याची बुद्धि निश्चल झाली असें समजावें ॥ ६१ ॥

ज्याअर्थीं असा प्रकार आहे त्याअर्थीं त्या सर्व इंद्रियांचें संयमन करून पुरुषानें स्वस्थांतःकरणपूर्वक मत्पर असावें. ह्मणजे सर्वांचा प्रत्यगात्मा जो मी वासुदेव तोच पर असें समजून असावें. सारांश, सर्वांचा प्रत्यगात्मा जो वासुदेव त्याहून मी वेगळा नाहीं अशी दृष्टि ठेवून असावें. कारण, ह्याप्रमाणें असणाऱ्या ज्या यतीचीं इंद्रियें स्वाधीन असतात त्याची बुद्धि अभ्यासबलानें स्थिर होते ६१.

("यततो ह्यपि कौन्तेय"ह्या श्लोकांतील " कौन्तेय" ह्या संबोधनाचा

आशय—" कौन्तेयेति संबोधयन्निन्द्रियापेक्षया पुरुषस्य दौर्बल्यं सूचयति" ह्मणजे " कौन्तेय " असें संबोधून भगवान् श्रीकृष्णांनीं पुरुषापेक्षां इंद्रियें प्रबल आहेत असें अर्जुनाला सुचविल—असा भाष्योत्कर्षदीपिकाकारांनीं काढिला आहे. परंतु, वामनपंडितांनीं ह्या संबोधनाचा आशय भलताच दाखविला आहे. पंडित लिहितात:—एवं सर्वज्ञ यत्नशील । मन तया-चेंही इंद्रियकूळ । हरणार ऐसीं प्रबळ । कुंतीसुता हीं इंद्रियें ॥ कुंती-सुता कौंतेया । ह्मणूनि ह्मणतां शब्द तया । सुचवी कीं अनादिमाया । तिच्या बळशक्ती इंद्रियें ॥ अगा इंद्रियांचीच वासना । स्त्रीसंग करवी सर्वां जना । इंद्रिया योगीचें अंगना । पुरुष इच्छी ॥ सृष्टीप्रवाह ऐसा । हा इंद्रियाचा वळसा । इंद्रियें नसतीं तरी कैसा । कुंतीस होतास तूं पुत्र॥

वामनपंडितांनीं काढिलेला हा संबोधनाचा आशय पांडित्याच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां कदाचित् अप्रयोजक नसेल; परंतु, " भगवद्गी-तेचें व्याख्यान करण्याबद्दल पुष्कळ दिवस मनांत घोळत होतें व शेवटीं गीतेचा अर्थ अंतःकरणांत उचंबळूं लागल्यामुळें मी टीकेला आरंभ केला " अशा प्रकारचा मजकूर वामनपंडितांनीं जो पहिल्या अध्यायाचे आरंभीं लिहून ठेविला आहे त्याचा विचार केला असतां असला ग्राम्य आशय काढण्यास पंडित महाराजांनीं प्रवृत्त व्हावें हें जरा चमत्कारिक दिसतें. पंडितांनीं काढिलेला आशय ग्राम्य ह्मणून त्याज्य आहे असें नसून तो वेदव्यासांनीं ग्रथित केलेल्या महाभारतांतील मूलभूत मजकुराशीं विरुद्ध आहे ह्मणून ग्राह्य नाहीं. विषयवासनेमुळेंच सर्व लोक स्त्रीसंग करण्यास प्रवृत्त होतात आणि स्त्रीला तरी विषयवासना तृप्त करण्याकरितांच पुरुषाची इच्छा होते हें वामनपंडितांचें ह्मणणें सामान्यतः जरी विरुद्ध नसलें तरी " सृष्टीप्रवाह ऐसा । हा इंद्रियाचा वळसा । इंद्रियें नसतीं तरी कैसा । कुंतीस होतास तूं पुत्र ॥ " अशीं शेवटीं ओवी लिहून कुंतीलाही तोच न्याय लागूं असल्याचें जें त्यांनीं सुचविलें आहे तें मात्र महाभारतांतील मूलभूत मजकुराशीं विरुद्ध

असल्यामुळें सर्वस्वीं त्याज्य आहे. कुंतीला विषयवासनेमुळें पुरुषाचा समागम होऊन अर्जुन वगैरे पुत्र झाले असें महाभारतांत कोठेंही नसून जें आहे तें अगदीं ह्याच्या उलट आहे )

( किंदमनामक मुनि मृगवेष धारण करून आपल्या स्त्रीशीं रममाण झाले असतांना पांडूनें बाण मारून त्यांचा वध केला. तेव्हां त्या मुनींनीं पांडूला—" मृगरूपधरं हत्वा मामेवं काममोहितम् । अस्य तु त्वं फलं मूढ प्राप्स्यसीदृशमेव हि ॥ प्रियया सह संवासं प्राप्य कामविमोहितः । त्वमप्यस्यामवस्थायां प्रेतलोकं गमिष्यसि ॥...वर्तमानः सुखे दुःखं यथाहं प्रापितस्त्वया ॥ तथा त्वां च सुखं प्राप्तं दुःखमभ्यागमिष्यति " [ ह्याप्रमाणें मृगरूप धारण करून कामवश झालेल्या माझा तू वध केलास. ह्याकरितां, हे मूढा, तुलाही ह्या कर्माचें असलेंच फल प्राप्त होईल. सारांश, तूं कामवश होऊन प्रियेशीं समागम केलास ह्मणजे ह्या अवस्थेमध्यें तुलाही यमलोकीं जावें लागेल...अरे, विषयसुखाचा अनुभव घेत असतांना ज्याप्रमाणें तूं मला मरणदुःख दिलेस त्याचप्रमाणें विषयसुखामध्यें तूं तल्लीन झालास ह्मणजे तुलाही मरणदुःख प्राप्त होईल ]—असा शाप दिला. त्यावेळीं कुंती अगदीं तरुण होती; इतकेंच नव्हें परंतु, " यं यं देवं त्वमेतेन मन्त्रेणावाहयिष्यसि । अकामो वा सकामो वा वशं ते समुपैष्यति " ह्मणजे " ज्या ज्या देवाचें तूं ह्या मंत्रानें आव्हान करशील तो तो निष्काम असो वा सकाम असो तुला वश होईल " असा वरही दुर्वासमुनींपासून तिला पूर्वींच प्राप्त झालेला होता. तथापि त्या साध्वीला कामवासना तृप्त करून घेण्याकरितां कोणत्याही देवाला आव्हान करण्याची इच्छा झाली नाहीं. यमधर्म, वायु आणि इंद्र ह्यांपासून तिला पुत्रप्राप्ति झाली. परंतु, कलियुगाप्रमाणें त्या कालामध्यें पुत्रप्राप्त्यर्थ नियोगविधि निषिद्ध नसतांनाही त्या देवांचें आव्हान तरी पांडूच्या अत्याग्रहामुळेंच तिला करावें लागलें ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेविली पाहिजे. इच्छेस येईल त्या देवाला वश करण्याचें

सामर्थ्य कुंतीला असतांनाही आजन्मांत कामवासनेमुळें कोण-त्याच देवाचें तिनें आव्हान केलेलें नाहीं आणि पांडूच्या अत्याग्रहास्तव जो देवसमागम तिला घडला तोही तिच्या इच्छेवर अवलंबून नसून पांडूनें ज्या देवाचें आव्हान करण्यास तिला आज्ञा केली त्याच देवाचें तिनें आव्हान केलें ह्या गोष्टींचा विचार केला ह्मणजे आणि " यां यां भवानप्सरसं मन्त्रेणावाहयिष्यति । साकामा वा सकामा वा भवतो वशमेष्यति " असा वर एकाद्या पुरुषाला प्राप्त झाल्यास अंगीं विषयोपभोगसामर्थ्य पूर्ण असतांना त्याला कितपत ब्रह्मचर्यव्रतानें राहतां येईल ह्याही गोष्टीचा प्रत्येकानें आपल्या मनाशीं खराखरा विचार करून पाहिला ह्मणजे वामनपंडितांनीं " कौन्तेय " ह्या संबोधनाचा जो आशय काढिला आहे तो कुंतीसंबंधानें अक्षरशः अयोग्य आहे असें कोणालाही कबूल करणें भाग पडेल. पंडितांनीं काढिलेला आशय महाभारताशीं विरुद्ध कसा आहे हें समजण्याकारितां आणि कुंतीची योग्यता किती होती हें कळण्याकारितां महाभारतांतर्गत आदिपर्वापैकीं १२०, १२१, १२२ आणि १२३ ह्या अध्यायांतील कांहीं श्लोक व त्यांचें मराठी तात्पर्य पुढें देतों.*

ऋषय ऊचुः ॥ अस्ति वै तव धर्मात्मन्विद्मो देवोपमं शुभम् । अपत्यमनघं राजन्वयं दिव्येन चक्षुषा २४ दैवोद्दिष्टं नरव्याघ्र कर्मणेहोपपादय । अक्लिष्टं फलमव्यग्रो विन्दते बुद्धिमान्नरः २५ तस्मिन्दृष्टे फले राजन्प्रयत्नं कर्तुमर्हसि । अपत्यं गुणसंपन्नं लब्ध्वा प्रीतिकरं ह्यसि २६ वैशम्पायन उवाच ॥ तच्छ्रुत्वा तापसवचः पाण्डुश्चिन्तापरो-

* भाष्यविरुद्ध मजकूर ज्या टीकांतून आहे त्यांचाच विचार करण्याचा प्रघात प्रथम पासून ठेविला आहे. तथापि, वामनपंडितांच्या यथार्थदीपिकेला कांहीं थोड्या असंस्कृत मंडळीकडून भाष्याच्या बरोबरीचा मान मिळत असल्याचें आढळण्यांत आल्यामुळें त्या टीकेची वास्तविक योग्यता काय आहे ती दाखविणें जरूर आहे आणि प्रसंगोपात्त कुंती पतिव्रता कशी ह्याही प्रश्नाचा एकदां निर्णय होणें इष्ट आहे. ह्मणून, सदहू मजकूर पुढें दिला आहे.

भवत् । आत्मनो मृगशापेन जानन्नुपहतां क्रियाम् २७ सोऽब्रवीद्विजने कुन्तीं धर्मपत्नीं यशस्विनीम् । अपत्योत्पादने यत्नमापादि त्वं समर्थय २८ अपत्यं नाम लोकेषु प्रतिष्ठा धर्मसंहिता । इति कुन्ति विदुर्धीराः शाश्वतं धर्मवादिनः २९ इष्टं दत्तं तपस्तप्तं नियमश्च स्वनुष्ठितः । सर्वमेवानपत्यस्य न पावनमिहोच्यते ३० सोऽहमेवं विदित्वैतत्प्रपश्यामि शुचिस्मिते । अनपत्यः शुभाँल्लोकान्न प्राप्स्यामीति चिन्तयन् ३१ मृगाभिशापान्नष्टं मे जननं ह्यकृतात्मनः । नृशंसकारिणो भीरु यथैवोपहतं पुरा ३२ तस्मात्प्रहेष्याम्यद्य त्वां हीनः प्रजननात्स्वयम् । सदृशाच्छ्रेयसो वा त्वं विद्ध्यपत्यं यशस्विनि ३८ शृणु कुन्ति कथामेतां शारदण्डायिनीं प्रति । सा वीरपत्नी गुरुणा नियुक्ता पुत्रजन्मनि ३९ पुष्पेण प्रयता स्नाता निशि कुन्ति चतुष्पथे । वरयित्वा द्विजं सिद्धं हुत्वा पुंसवनेऽनलम् ४० कर्मण्यवसिते तस्मिन्सा तेनैव सहावसत् । तत्र त्रीञ्जनयामास दुर्जयादीन्महारथान् ४१ तथा त्वमपि कल्याणि ब्राह्मणात्तपसाधिकात् । मन्नियोगाद्यत क्षिप्रमपत्योत्पादनं प्रति ४२ अध्यायः १२०

मराठी तात्पर्य, ऋषि ह्मणतातः—हे धर्मात्म्या, ( तुझ्या दैवामध्यें ) तुला देवासारिखी, पवित्र व निष्पाप संतति असल्याचें आह्मी दिव्य दृष्टीनें जाणत आहोंत २४. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठ राजा, दैवदत्त संतति तूं येथें प्रयत्नानें प्राप्त करून घे. कारण, काळजीपूर्वक वागत असलेल्या बुद्धिमान् पुरुषाला क्लेशरहित फल प्राप्त होतें २५. तस्मात्, हे राजा, त्या दृष्टफलाविषयीं तूं प्रयत्न कर. कारण, त्याच्या योगानें तुला गुणी आणि आनंददायक अशी संतति प्राप्त होईल २६. वैशंपायन सांगतातः—तें तापसांचें भाषण श्रवण करून मृगशापामुळें आपल्या ( प्रजोत्पादन ) कर्माला अडथळा आल्याचें जाणत असलेला पांडु चिंताक्रांत झाला २७ आणि आपल्या कुंतिनामक यशस्विनी धर्मपत्नीला एकांतामध्यें ह्मणाला "संतति उत्पन्न करण्याविषयीं तूं यत्न कर २८. कारण, लोकांमध्यें अपत्य हा एक धर्ममय आधार आहे.

असें, हे कुंति, धर्मवेत्ते विद्वज्जन सर्वदा मानीत आले आहेत २९.यज्ञ, दान, तप व उत्तमप्रकारें आचरिलेला निगम हे सर्व निपुत्रिकाला पावन करण्यास येथें असमर्थ आहेत असें हे धर्मवेत्ते ह्मणत असतात ३०. ह्याकरितां, हे सुहास्यवदने, मज निपुत्रिकाला उत्तम लोक प्राप्त होणार नाहींत ह्याबद्दल विचार करीत असतांना धर्मवेत्त्यांचें ह्याप्रमाणें असलेलें मत जाणून हें ( तुला सांगितलेलें ) मला सुचलें ३१.कारण, ज्याप्रमाणें पूर्वी माझ्यामुळें मृगाचें रतिसुख नाहींसें झालें त्याचप्रमाणें मी अजितेंद्रिय आणि पापाचरणी असल्यामुळें मृगशापाच्या योगानें माझें रतिसामर्थ्य अगदीं नाहींसें झालें आहे ३२. तस्मात्, मी स्वतः प्रजोत्पादनसामर्थ्यापासून च्युत झाल्यामुळें आज तुला अनुज्ञा देत आहें. तर, हे यशस्विनि, तूं सजातीय अगर श्रेष्ठजातीय पुरुषापासून अपत्य प्राप्त करून घे ३८. हे कुंति, शारदंडायनाच्या भार्येविषयीं ही कथा श्रवण कर. त्या वीरपत्नीला भर्त्यानें पुत्रोत्पादन करण्याविषयीं सांगितलें असतां ३९ रजोदर्शनापासून तीन दिवस व्रतस्थ राहून चवथ्या दिवशीं ऋतुस्नात झालेल्या त्या स्त्रीनें रात्रीं चौकामध्यें जाऊन त्याकरितां एका ब्राह्मणाला निमंत्रण केलें आणि पुत्रोत्पादनार्थ होम केला ४०. नंतर तें होमकर्म समाप्त झाल्यावर ती त्याच्याच सहवर्तमान राहिली असतां तिला दुर्जयप्रभृति तीन महारथी पुत्र झाले ४१. तात्पर्य, त्याचप्रमाणें, हे कल्याणि, तूंही माझ्या अनुज्ञेवरून तपानें श्रेष्ठ अशा ब्राह्मणापासून अपत्योत्पादनार्थ सत्वर यत्न कर ४२.

वैशंपायन उवाच ॥ एवमुक्ता महाराज कुन्ती पाण्डुमभाषत । कुरूणामृषभं वीरं तदा भूमिपतिं पतिम् १ न मामर्हसि धर्मज्ञ वक्तुमेवं कथंचन । धर्मपत्नीमभिरतां त्वयि राजीवलोचने २ त्वमेव तु महाबाहो मय्यपत्यानि भारत । वीर वीर्योपपन्नानि धर्मतो जनयिष्यसि ३ स्वर्गं मनुजशार्दूल गच्छेयं सहिता त्वया । अपत्याय च मां गच्छ त्वमेव कुरुनन्दन ४ न ह्यहं मनसाप्यन्यं गच्छेयं त्वदृते नरम् । त्वत्तः प्रतिवि-

शिष्टश्च कोन्योस्ति भुवि मानवः ५ इमां च तावद्धर्मात्मन्पौराणीं शृणु मे कथाम्। परिश्रुतां विशालाक्ष कीर्तयिष्यामि यामहम् ६ व्युषिताश्व इति ख्यातो बभूव किल पार्थिवः। पुरा परमधर्मिष्ठः पूरोर्वंशविवर्धनः ७ तस्मिन्प्रेते मनुष्येन्द्रे भार्यास्य भृशदुःखिता। अपुत्रा पुरुषव्याघ्र विल-लापेति नः श्रुतम् २० एवं बहुविधं तस्यां विलपन्त्यां पुनः पुनः। तं शवं संपरिष्वज्य वाक्किलान्तर्हिताब्रवीत् ३३ उत्तिष्ठ भद्रे गच्छ त्वं ददा-नीह वरं तव। जनयिष्याम्यपत्यानि त्वय्यहं चारुहासिनि ३४ आत्म-कीये वरारोहे शयनीये चतुर्दशीम्। अष्टमीं वा ऋतुस्नाता संविशेथा मया सह ३५ एवमुक्ता तु सा देवी तथा चक्रे पतिव्रता। यथोक्तमेव तद्वाक्यं भद्रा पुत्रार्थिनी तदा ३६ सा तेन सुषुवे देवी शवेन भरतर्षभ। त्रीञ्शा-ल्वांश्चतुरो मद्रान्सुतान्भरतसत्तम ३७ तथा त्वमपि मय्येवं मनसा भरतर्षभ। शक्तो जनयितुं पुत्रांस्तपोयोगबलान्वितः ३८ अध्या० १२१

वैशंपायन सांगतातः—हे महाराज, ह्याप्रमाणें कुंतीला सांगितलें असतां ती आपला पति जो कुरुश्रेष्ठ भूपति वीर पांडु त्याला ह्मणाली १ " हे धर्मज्ञा, तुज कमलनयनाचे ठिकाणीं सर्वस्वीं रत असलेल्या मज धर्मपत्नीला असें भाषण करणें तुला कधींही योग्य नाहीं २. हे वीरा, हे महापराक्रमी भारता, तूंच धर्माला अनुसरून माझे ठिकाणीं वीर्य-वान् पुत्र उत्पन्न कर ३. हे पुरुषश्रेष्ठा, तुजसहवर्तमान मी स्वर्गाप्रत गमन करीन. ह्यास्तव, हे कुरुनंदना, अपत्याकरितां तूंच माझ्याशीं समागम कर ४. तुजवांचून दुसऱ्या पुरुषाशीं समागम करण्याचे मी मनांतही आणणार नाहीं. कारण, तुझ्याहून श्रेष्ठ असा दुसरा कोण मानव पृथ्वीवर आहे ? ५. हे धर्मात्म्या, हे विशालनयना, पुराणांतील ही एक ऐकिलेली गोष्ट मी तुला सांगतें ती आधीं ऐकून घे ६. व्युषि-ताश्व ह्मणून प्रसिद्ध असलेला कोणी एक राजा पूर्वीं होऊन गेला. तो अत्यंत धार्मिष्ठ असून पूरूचा वंश वृद्धिंगत करणारा होता ७. तो राजा मृत झाला असतां त्याच्या भार्येला फारच दुःख झालें आणि,

हे पुरुषश्रेष्ठा, पराकाष्ठेचें दुःख झालेल्या त्या निपुत्रिक भद्रेनें फारच विलाप केला असें आमच्या ऐकण्यांत आहे २०. परंतु, ह्याप्रमाणें त्या शवाला कवटाळून नानाप्रकारांनीं फिरून फिरून ती स्त्री विलाप करीत बसली असतांना अशी आकाशवाणी झाली ३३ कीं, " हे भद्रे, ऊठ; तूं जा; मी तुला वर देतों. हे चारुहासिनि, मी तुझे ठिकाणीं अपत्यें उत्पन्न करीन ३४. हे सुंदरि, तूं ऋतुस्नात झाल्यानंतर आपल्या शय्येवर चतुर्दशीला अगर अष्टमीला माझ्या-सहवर्तमान शयन कर " ३५. ह्याप्रमाणें त्या भद्रानामक पतिव्रता राजपत्नीला ( त्या वाणीनें ) सांगितलें असतां त्या पुत्रेच्छु स्त्रीनें अगदीं सांगितल्याप्रमाणें वर्तन केलें ३६ व त्यामुळें, हे भरतश्रेष्ठा, हे भारतोत्तमा, त्या राजपत्नीला त्या शवापासून तीन शाल्व व चार मद्र असे पुत्र झाले ३७. त्याचप्रमाणें, हे भरतश्रेष्ठा, तपोबल व योगसामर्थ्य ह्यांच्या योगानें तूं मनानेंही माझे ठिकाणीं पुत्र उत्पन्न करण्यास समर्थ आहेस ३८.

पत्यानियुक्ता या चैव पत्नी पुत्रार्थमेव च । न करिष्यति तस्याश्च भविष्यति तदेव हि २० इति तेन पुरा भीरु मर्यादा स्थापिता बलात् । उद्दालकस्य पुत्रेण धर्म्या वै श्वेतकेतुना २१ सौदासेन च रम्भोरु नियुक्ता पुत्रजन्मनि । मदयन्ती जगामर्षिं वसिष्ठमिति नः श्रुतम् २२ तस्माल्लेभे च सा पुत्रमश्मकं नाम भाविनी । एवं कृतवती सापि भर्तुः प्रियचिकीर्षया २३ अस्माकमपि ते जन्म विदितं कमलेक्षणे । कृष्ण-द्वैपायनाद्भीरु कुरूणां वंशवृद्धये २४ अत एतानि सर्वाणि कारणानि समीक्ष्य वै । ममैतद्वचनं धर्म्यं कर्तुमर्हस्यनिन्दिते २५ ऋतावृतौ राज-पुत्रि स्त्रिया भर्ता पतिव्रते । नातिवर्तव्य इत्येवं धर्मं धर्मविदो विदुः २६ शेषेष्वन्येषु कालेषु स्वातन्त्र्यं स्त्री किलार्हति । धर्ममेवं जनाः सन्तः पुराणं परिचक्षते २७ भर्ता भार्यां राजपुत्रि धर्म्यं वाधर्म्यमेव वा । यद्ब्रूयात्तत्तथा कार्यमिति वेदविदो विदुः २८ विशेषतः पुत्रगृद्धी हीनः प्रजननात्स्व-

यम् । यथाहमनवद्याङ्गि पुत्रदर्शनलालसः २९ तथा रक्ताङ्गुलिनिभः पद्मपत्रनिभः शुभे । प्रसादार्थं मया तेयं शिरस्यभ्युद्यतोञ्जलिः ३० मन्नियोगात्सुकेशान्ते द्विजातेस्तपसाधिकात् । पुत्रान्गुणसमायुक्तानुत्पादयितुमर्हसि ॥ त्वत्कृतेहं पृथुश्रोणि गच्छेयं पुत्रिणां गतिम् ३१ वैशम्पायन उवाच ॥ एवमुक्ता ततः कुन्ती पाण्डुं परपुरञ्जयम् । प्रत्युवाच वरारोहा भर्तुः प्रियहिते रता ३२ पितृवेश्मन्यहं बाला नियुक्तातिथिपूजने । उग्रं पर्यचरं तत्र ब्राह्मणं संशितव्रतम् ३३ निगूढनिश्चयं धर्मे यं तं दुर्वाससं विदुः । तमहं संशितात्मानं सर्वयत्नैरतोषयम् ३४ स मेभिचारसंयुक्तमाचष्ट भगवान्वरम् । मन्त्रं त्विमं च मे प्रादादब्रवीच्चैव मामिदम् ३५ यं यं देवं त्वमेतेन मन्त्रेणावाहयिष्यसि । अकामो वा सकामो वा वशं ते समुपैष्यति ३६ तस्य तस्य प्रसादात्ते राज्ञि पुत्रो भविष्यति । इत्युक्ताहं तदा तेन पितृवेश्मनि भारत ३७ ब्राह्मणस्य वचस्तथ्यं तस्य कालोयमागतः । अनुज्ञाता त्वया देवानाह्वयेयमहं नृप ३८ तेन मन्त्रेण राजर्षे यथा स्यान्नौ प्रजा हिता । आवाहयामि कं देवं ब्रूहि सत्यवतां वर ३९ त्वत्तोनुज्ञाप्रतीक्षां मां विद्ध्यस्मिन्कर्मणि स्थिताम् ४० अध्या० १२२.

त्याचप्रमाणें फक्त पुत्रोत्पादनार्थच पतीनें आज्ञा केली असतां जी स्त्री त्याप्रमाणें वागणार नाहीं तिलाही तेंच पातक लागेल २० ह्मणून, हे भीरु त्या श्वेतकेतुनामक उद्दालकपुत्रानें धर्मसंबंधीं मर्यादा बळेनें स्थापित केली २१. त्या मर्यादेप्रमाणें, हे रंभोरु, सौदासानें पुत्रोत्पादनाकरितां मदयंतीला नियोगविधि करण्याची आज्ञा केली असतां तिनें वसिष्ठमुनींशीं समागम केल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे २२. त्या स्त्रीला त्या मुनींपासून अश्मकनामक पुत्र झाला. तात्पर्य, त्या मदयंतीनें सुद्धां भर्त्याला प्रिय असलेली गोष्ट करण्याकरितां असें केलें २३. ( फार कशाला ) हे कमलनयने, भीरु, कौरवांचा वंश कायम राहण्याकरितां कृष्णद्वैपायनमुनींपासून आमचा जन्म झाल्याचें तुला विदित आहेच २४. तस्मात्, हीं सर्व कारणें लक्ष्यांत आणून

हे अनिंदिते, हें माझें धर्माला अनुसरून असलेलें सांगणें तूं ऐक २५. हे राजपुत्रि, हे पतिव्रते, प्रत्येक ऋतुकालीं स्त्रीनें भर्त्याला टाळतां उपयोगी नाहीं ह्मणून धर्मवेत्ते जाणीत आहेत २६. ऋतुकालाहून इतर अवशिष्ट कालीं ( समागम करणें ) स्त्रीचे इच्छेवर अवलंबून आहे; ह्याप्रमाणें सज्जन सनातन धर्म सांगत असतात २७. शिवाय, हे राजपुत्रि, धर्माला अनसरून अथवा धर्मविरुद्ध जें कृत्य भर्ता स्त्रीला करावयास सांगेल तें तिनें केलें पाहिजे असें वेदवेत्ते समजतात २८. त्यांतून विशेषेंकरून पुत्रेच्छु आणि पुत्रोत्पादनसामर्थ्यापासून स्वतः च्युत झालेला असा माझ्यासारिखा पुत्र पाहण्यास उत्सुक झालेला पति, हे सुंदरि, जें सांगेल तें केलेंच पाहिजे २९. हे शुभे, आरक्तवर्ण अंगुलींनीं युक्त असल्यामुळें केवल कमलपत्रांचीच ज्याला उपमा योग्य आहे असा हा माझा करसंपुट तूं प्रसन्न होण्याकरितां मीं मस्तकीं उभारिला आहे ३०. तस्मात् , हे सुकेशि, माझ्या आज्ञेवरून तपोवृद्ध ब्राह्मणापासून गुणवान् पुत्र तूं उत्पन्न कर. ह्मणजे, हे सुंदरि, मला तुझ्यामुळें पुत्रवानांची गति प्राप्त होईल ३१. वैशंपायन सांगतातः—ह्याप्रमाणें कुंतीला सांगितल्यानंतर भर्त्याचें प्रिय आणि हित करण्याविषयीं तत्पर असलेली ती रूपवती स्त्री शत्रुसमूहाचा पराभव करणाऱ्या पांडुराजाला ह्मणाला ३२ " पितृगृहीं लहान होतें तेव्हां अतिथींचें आदरातिथ्य करण्याकडे माझी योजना झालेली असतांना धर्माविषयीं दृढ निश्चय ज्याचा आहे व ज्याला दुर्वास असें ह्मणतात त्या निर्मल तपश्चर्या करणाऱ्या ब्राह्मणाची मी सेवा करीत होतें व निर्मल अंतःकरणानें युक्त असलेल्या त्या ब्राह्मणाला मी सर्व यत्नांनीं संतुष्ट केलें ३३, ३४. तेव्हां देवताकर्षणशक्तीनें युक्त असलेला असा एक मंत्र मला त्या भगवान् ब्राह्मणानें सांगितला व हा मंत्र सांगून मला त्यानें असा वरही दिला कीं ३५ " ज्या ज्या देवाला तूं ह्या मंत्रानें आव्हान करशील तो निष्काम असो वा सकाम असो तुला वश

होईल ३६ आणि त्याच्या त्याच्या प्रसादानें, हे राजकन्ये, तुला पुत्र होईल." ह्याप्रमाणें हे भारता, त्या वेळीं पितृगृहीं मला त्यानें सांगितलें आहे ३७ व त्या ब्राह्मणाचें वचन खरें असून तसें करण्याची ही वेळही आतां आली आहे ३८.ह्याकरितां, हे राजर्षे, आपण अनुज्ञा दिल्यावर मी त्या मंत्रानें आपणांला हितकारक संतति ज्याच्या योगानें होईल त्या देवाचें आव्हान करीन ३९. तस्मात् , मी कोणत्या देवाचें आव्हान करूं तें सांगा. कारण, हे सत्यवानांमध्यें श्रेष्ठ, आपली अनुज्ञा झाल्यावांचून मी ह्या कर्माला प्रवृत्त होणार नाहीं असें आपण समजा ४० अध्यायः १२२.

पाण्डुस्तु पुनरेवैनां पुत्रलोभान्महायशाः । वक्तुमैच्छद्धर्मपत्नीं कुन्ती त्वेनमथाब्रवीत् ७७ नातश्चतुर्थं प्रसवमापत्स्वपि वदन्त्युत । अतःपरं स्वैरिणी स्याद्बन्धकी पञ्चमे भवेत् ७८ स त्वं विद्वन्धर्ममिममधिगम्य कथं नु माम् । अपत्यार्थं समुत्क्रम्य प्रमादादिव भाषसे ७९ अध्या० १२३

पुढें महायशस्वी पांडु पुत्रलोभामुळें पुनरपिही त्या धर्मपत्नीला कांहीं सांगण्याची इच्छा दर्शवूं लागला; परंतु, कुंती त्याला ह्मणाली ७७ "आपत्काळीं सुद्धां ह्यापेक्षां जास्त ह्मणजे चवथ्यानें ( नियोगविधीनें ) प्रजोत्पादन सांगितलेलें नाहीं. कारण, ह्यानतर ( चवथ्यानें नियोगविधि करणारी ) स्त्री जारिणी होत असून पांचवे वेळीं तर वेश्याच होते ७८. तस्मात्, हे विद्वन् , आपल्याला धर्म माहीत असूनही अपत्याकरितां त्याचें उल्लंघन करून मलाही आपण प्रामादिक असल्यासारखी काय आज्ञा करीत आहां ?७९

असो. हा महाभारतांतर्गत मूलभूत मजकूर अवलोकन केला असतां वामनपंडितांनीं काढिलेला "कौंतेय" ह्या संबोधनाचा आशय सर्वस्वीं त्याज्य आहे ह कोणीही कबूल करील. "कौन्तेय","पांडव" असें संबोधन असल्यास त्याचा संबंध कसा तरी पांडूकडे अथवा कुंतीकडे लाविलाच पाहिजे असें मला वाटत नाहीं. तथापि ज्याअर्थीं "कौन्तेय "हें संबोधन कुंतीची स्मृति उत्पन्न करणारें आहे त्याअर्थीं त्याचा संबंध कुंतीकडे असलाच पाहिजे असा कोणाचा आग्रह असल्यास तसाही आशय निघत आहे.

बाल्यावस्थेमध्येंच पित्याचा वियोग झाला असतां ज्या पुत्रांच्या पालनपोषणाची काळजी सर्वस्वीं मातेकडे जाते त्या मातेच्या नांवानें ते पुत्र प्रसिद्धीस येत असतात. ह्मणजे अमक्या अमक्याचे मुलगे ह्मणून लोक त्या मृतपितृकांना ओळखीत नसून कधीं कधीं अमक्या अमक्या बाईचे मुलगे ह्मणून बाल्यावस्थेंत पितृवियोग झालेल्या पुत्रांना लोकामध्यें विदित होण्याची पाळी येते आणि महाभारतामध्यें ठिकठिकाणीं "कौन्तेयाः" व "पार्थाः" ह्या शब्दांनीं पांडवांचा निर्देश केलेला असून "धार्तराष्ट्राः" ह्या शब्दानें कौरवांचा निर्देश केलेला आढळतो ह्याचें कारण तरी हेंच असावें. पित्यापेक्षां मातेचे ठिकाणीं गुणाधिक्य असल्यास पुष्कळ दिवसपर्यंत पिता विद्यमान असूनही पुत्र मातेच्या नांवानें प्रसिद्ध होत असतात असा एक प्रकार आहे आणि ह्या कारणांमुळें मातृविख्यात झालेल्या पुरुषांची गणना अधमांत केलेली आहे. परंतु, पांडव आत्मविख्यातच असल्यामुळें त्यांना हा प्रकार लागू नाहीं. तेव्हां "कौंतेय" ह्या संबोधनावरून कुंतीची स्मृति उत्पन्न करणारा आशय निघालाच पाहिजे असा कोणाचा आग्रह असल्यास "यततो ह्यपि० प्रसभं मनः" ह्या श्लोकाचा आशय असा निघतोः—हे अर्जुना, इंद्रियाधीन न होण्याबद्दल प्रयत्न करीत असलेल्या विचारी पुरुषाचेंही अंतःकरण चित्तक्षोभक इंद्रियें हरण करीत असतात हें तुला विदितच आहे. कारण, तुमचा पिता पांडु विषयांकडे मनाची प्रवृत्ति न व्हावी एतदर्थ सर्वसंगपरित्याग करून वनामध्यें वास्तव्य करूं लागला असतांही आणि तो विचारी असतांही चित्तक्षोभक इंद्रियांनीं त्याचें मन ग्रस्त करून माद्रीशीं रत होण्यास त्याला प्रवृत्त केलें आणि ह्यामुळेंच तुमचा पिता मृत होऊन "कौंतेय" ह्मणजे कुंतीचे पुत्र ह्मणून लोकांमध्यें विदित होण्याची तुह्मांला पाळी आली. असो. वामनपंडितांनीं यथार्थ ह्मणून केलेल्या आपल्या दीपिकेंत भगवान् भाष्यकारांचे विरुद्ध अयथार्थ पांडित्य ठिकठिकाणीं केलेलें आहे. परंतु, त्याची अयथार्थता

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।
सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोभिजायते ॥६२॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

---

अथेदानीं पराभविष्यतः सर्वानर्थमूलमिदमुच्यते ध्यायतो विषयान्पुंसः० धोभिजायते ॥६२॥ ध्यायतश्चिन्तयतो विषयाञ्छब्दादिविषयानालोचयतः पुंसः पुरुषस्य सङ्ग आसक्तिः प्रीतिस्तेषु विषयेषूपजायते । सङ्गात्प्रीतेः संजायते समुत्पद्यते

---

ठिकठिकाणीं दर्शवूं लागल्यास ग्रंथविस्तर फारच होईल व उपयोग तर विशेष होणारच नाहीं ह्मणून इतर द्वैतवाद्यांप्रमाणें ह्यांच्या ग्रंथाकडे लक्ष्य न देतां प्रायः अद्वैतपंथी टीकांतूनच असलेल्या भाष्यविरुद्ध मजकुराचा विचार करून भाष्याचें तात्पर्य यथामति दिलें जाईल. पांडितांच्या भाष्यविरुद्ध कुत्सित कल्पना किति किमतीच्या असतात ह्याचें दिग्दर्शन होण्याकरितां हा वाजवीपेक्षां फाजिल विस्तर करणें भाग पडलें त्याला इलाज नाहीं ६१ )

पुरुष विषयांचें चिंतन करूं लागला ह्मणजे त्या विषयांचे ठिकाणीं त्याचें प्रेम जडतें. प्रेमापासून वासना उत्पन्न होते; वासनेपासून क्रोध उत्पन्न होतो; क्रोधापासून मोहाचा उद्भव होतो; मोहापासून स्मृतिभ्रंश होतो; स्मृतिभ्रंशापासून बुद्धीचा नाश होतो आणि बुद्धिनाश झाला असतां पुरुषाचा नाश होतो ॥ ६२ ॥ ६३ ॥

पुरुषार्थप्राप्तीचे उपाय कथन केल्यानंतर सर्व अनर्थांचें जें मूळ तें आतां “ ध्यायतो विषयान्पुं० प्रणश्यति ” ह्या दोन श्लोकांमध्यें भगवानांनीं सांगितलें आहे. शब्दादि ( ह्मणजे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ह्या ) विषयांचें चिंतन करीत बसलेल्या पुरुषाची त्या विषयांचें ठिकाणीं प्रीति उत्पन्न होते; प्रीतीपासून त्या विषयांचे ठिकाणीं वासना

कामस्तृष्णा । तस्मात्कामात्कुतश्चित्प्रतिहतात्क्रोधोभिजायते॥ ६२ ॥ क्रोधाद्भवति ० प्रणश्यति ॥ ६३ ॥ क्रोधाद्भवति संमोहोविवेकः कार्याकार्यविषयविभ्रमः । क्रुद्धो हि संमूढः सन्गुरुमप्याक्रोशति । संमोहात्स्मृतिविभ्रमः शास्त्राचार्योपदेशाहितसंस्कारजनितायाः स्मृतेः स्याद्विभ्रमो भ्रंशः स्मृत्युत्पत्तिनिमित्तप्राप्तावनुत्पत्तिस्ततः स्मृतिभ्रंशाद्बुद्धेर्नाशः । कार्याकार्यविषयविवेकायोग्यतान्तःकरणस्य बुद्धिनाश उच्यते । बुद्धिनाशात्प्रणश्यति । तावदेव हि पुरुषो यावदन्तःकरणं तदीयं

---

उत्पन्न होते ; कोणत्याही कारणामुळें वासनेचा विघात झाला असतां क्रोध उत्पन्न होतो; क्रोधापासून अविवेक ह्मणजे कार्याकार्यविषयक विभ्रम उत्पन्न होतो; अर्थात् , कर्तव्य कोणतें आणि अकर्तव्य कोणतें ह्याचा क्रुद्ध पुरुषाला सुमार रहात नाहीं. कारण, निंदेला सर्वथा अयोग्य अशा अत्यंत पूज्य गुरूचीही क्रुद्ध पुरुष निंदा करूं लागतो; अविवेकापासून स्मृतिभ्रंश ह्मणजे शास्त्र आणि गुरु ह्यांच्या उपदेशानें होणारा जो संस्कार त्या संस्कारापासून उत्पन्न होणारी जी ( आत्मानुसंधानरूप ) स्मृति तिचा भ्रंश होतो. सारांश, ( शास्त्र व गुरु ह्यांचा उपदेश हें जें आत्मानुसंधानरूप ) स्मृति उत्पन्न होण्याचें कारण तें प्राप्त झालें असतांही ( क्रोधामुळें ) ती स्मृति उत्पन्न होत नाहीं. असो. स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश होतो. करण्याला योग्य कोणतें आणि करण्याला अयोग्य कोणतें ह्यासंबंधीं निवड करण्याची जी अंतःकरणाची अयोग्यता तिला बुद्धिनाश असें ह्मणतात. बुद्धिनाशामुळें पुरुषाचा नाश होतो. कारण, कार्य कोणतें आणि अकार्य कोणतें ह्यांविषयीं निवड करण्यास जोंपर्यंत पुरुषाचें अंतःकरण समर्थ असतें तोंपर्यंतच पुरुष विद्यमान असतो. त्याचें अंतःकरण कार्याकार्य गोष्टींचें विवेचन करण्यास अयोग्य झालें ह्मणजे तो पुरुष ( निरुपयोगी होत असल्यामुळें ) नष्ट ( झाल्यासारिखा )

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

---

कार्याकार्यविषयविवेकयोग्यं तदयोग्यत्वे नष्ट एव पुरुषो भवत्यतस्तस्यान्तःकरणस्य बुद्धेर्नाशात्प्रणश्यति पुरुषार्थायोग्यो भवतीत्यर्थः ॥ ६३ ॥

सर्वानर्थस्य मूलमुक्तं विषयाभिध्यानम् । अथेदानीं मोक्षकारणमिदमुच्यते । रागद्वेषवियुक्तैस्तु० प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥ रागद्वेषवियुक्तैः । रागश्च द्वेषश्च रागद्वेषौ । तत्पुरःसरा हीन्द्रियाणां प्रवृत्तिः स्वाभाविकी । तत्र यो मुमुक्षुर्भवति स ताभ्यां वियुक्तैः श्रोत्रादिभिरिन्द्रियैर्विषयानवर्जनीयांश्चरन्नुपलभमान आत्मवश्यैरात्मनो वश्यानि वशीकृतानि तैरात्मवश्यैर्विधेयात्मेच्छातो विधेय आत्मान्तःकरणं यस्य सोयं

---

च होतो. ह्याकारितां, त्या ( सदसद्विचारयोग्य ) अंतःकरणाचा ह्मणजे बुद्धीचा नाश झाला असतां पुरुष नष्ट होतो. अर्थात्, पुरुषार्थप्राप्तीला तो अयोग्य होतो ६२, ६३.

प्रीति आणि द्वेष ह्यांनीं रहित आणि मनाच्या अधीन अशा इंद्रियांच्या योगानें जो विषयांचा उपभोग घेत असतो आणि ज्याचें मन स्वाधीन असतें त्याला स्वास्थ्य प्राप्त होतें ॥ ६४ ॥

विषयचिंतन हें सर्व प्रकारच्या अनर्थाचें मूळ ह्मणून ( मागल्या दोन श्लोकांत ) सांगितलें. आतां ह्यानंतर " रागद्वेषवियुक्तैस्तु० मधिगच्छति " ह्या श्लोकामध्यें मुक्तीचा उपाय कथन केला आहे. राग ( ह्मणजे विषयासक्ति ) आणि द्वेष एतत्पूर्वक इंद्रियांची स्वाभाविक प्रवृत्ति होत असते. तेव्हां मोक्षाधिकारी पुरुषांमध्यें जो मुमुक्षु असतो तो राग आणि द्वेष ह्यांनीं रहित आणि मनाला वश ह्मणजे मनाच्या अधीन अशा श्रवणादि इंद्रियांच्या योगानें शास्त्रतः वर्ज्य नसलेल्या विषयांचा

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

---

प्रसादमधिगच्छति प्रसादः प्रसन्नता स्वास्थ्यम् ॥ ६४ ॥
प्रसादे सति किं स्यादित्युच्यते प्रसादे सर्वदुःखानां०पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥ प्रसादे सर्वदुःखानामाध्यात्मिकादीनां

---

उपभोग घेत असतो; इच्छेप्रमाणें त्याला आपलें अंतःकरण स्वाधीन ठेवितां येतें व त्या पुरुषाला प्रसाद ह्मणजे प्रसन्नता अर्थात् स्वास्थ्य प्राप्त होतें ६४.

( ज्यानें आपलें अंतःकरण स्वाधीन ठेविलें असतें त्याला विधेयात्मा असें ह्मणतात. प्रसाद ह्मणजे चित्ताची निर्मलता अर्थात् चित्तस्वास्थ्य. भाष्यामध्यें " तत्र " असें पद आहे. त्याचा अर्थ " मोक्षाला अधिकारी असलेल्या पुरुषांपैकीं " असा करावा. आत्मा ह्मणजे मन. तेव्हां, ' आत्मवश्य ' ह्मणजे मनाला वश झालेलीं. " अवर्जनीयान् " असें भाष्यांत पद आहे त्याचा अर्थ " शास्त्रतः निषिद्ध नसलेले " असा होतो. इंद्रियांची प्रवृत्ति—विषयासक्ति आणि विषयद्वेष—ह्या दोहोंमुळें होत असते. परंतु, मुमुक्षु पुरुष बाह्य सुखाला कारण असलेले विषय सेवन करण्याविषयीं लालसाही धरीत नाहीं आणि त्याचप्रमाणें बाह्य दुःखाला कारण असलेले विषय द्वेषानें वर्ज्यही करीत नाहीं. परंतु, देहस्थितीला अवश्य आणि शास्त्रानें निषिद्ध नसलेले असे अन्नपानादि विषय यदृच्छेनें प्राप्त झाले असतां त्यांचे ठिकाणीं आसक्ति अथवा द्वेष मुळींच न धरितां तो त्यांचें सेवन करितो आणि ह्मणूनच स्वाधीन असलेल्या त्याच्या अंतःकरणाला स्वास्थ्य प्राप्त होतें ६४ )

अंतःकरण स्वस्थ झालें असतां सर्व दुःखांचा नाश होतो आणि ज्याचें अंतःकरण स्वस्थ झालें त्याची बुद्धि सत्वर निश्चल होते ॥ ६५ ॥

अंतःकरणाला स्वास्थ्य प्राप्त झालें असतां काय होतें हे " प्रसादे० तिष्ठते " ह्या श्लोकांत सांगितलें आहे. अंतःकरणाला स्वास्थ्य आलें

नास्तिबुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

---

हानिर्विनाशोस्य यतेरुपजायते किं च प्रसन्नचेतसः स्वस्थान्तःकरणस्य हि यस्मादाशु शीघ्रं बुद्धिः पर्यवतिष्ठत आकाश इव परि समन्तादवतिष्ठत आत्मस्वरूप एव निश्चलीभवतीत्यर्थः । एवं प्रसन्नचेतसोवास्थितबुद्धेः कृतकृत्यता यतस्तस्माद्रागद्वेषवियुक्तैरिन्द्रियैः शास्त्राविरुद्धेष्ववर्जनीयेषु युक्तः समाचरेदिति वाक्यार्थः॥ ६५ ॥

सेयं प्रसन्नता स्तूयते नास्ति बुद्धिरयुक्तस्य० कुतः

---

असतां ह्या यतीच्या आध्यात्मिकप्रभृति सर्व दुःखांचा नाश होतो. शिवाय ज्याअर्थीं स्वस्थ अंतःकरणानें युक्त असलेल्या पुरुषाची बुद्धि आकाशाप्रमाणें सर्व बाजूंनीं सत्वर स्थिर होते ह्मणजे आत्मस्वरूपाचे ठिकाणींच निश्चल होऊन रहाते त्याअर्थीं अंतःकरणाला स्वास्थ्य उत्पन्न होण्याकरितां पुरुषानें प्रयत्न करीत असावें. तात्पर्य, ज्याअर्थीं ह्याप्रमाणें प्रसन्न अंतःकरणानें ह्मणजे स्थिर बुद्धीनें युक्त झालेल्या पुरुषाला कृतकृत्यता प्राप्त होते त्याअर्थीं आसक्ति आणि द्वेष हीं दोन्हीं ज्यांचे ठिकाणीं नाहींत अशा इंद्रियांनीं पुरुषानें विषयाधीन न होतां शास्त्रतः निषिद्ध नसलेल्या ह्मणजे वर्ज्य नसलेल्या ( देहस्थितिकारणीभूत अन्नपानादि ) विषयांचें अवलंबन करून असावें हा ह्या दोन श्लोकांतील वाक्यार्थ होय ६५.

अस्वस्थ अंतःकरणानें युक्त असलेल्या पुरुषाचे ठिकाणीं आत्मस्वरूपविषयक ज्ञान उत्पन्न होत नाहीं. त्याचप्रमाणें आत्मज्ञानाविषयीं त्याला इच्छाही उत्पन्न होत नाहीं. व आत्मज्ञानाची इच्छा नसलेल्याला शांति प्राप्त होत नाहीं. तेव्हां शांतिरहित पुरुषाला सुख कोठून होणार ? ॥ ६६ ॥

पूर्वीच्या श्लोकांमध्यें जी चित्ताची प्रसन्नता सांगितली तिची " नास्ति बुद्धिरयुक्तस्य " ह्या श्लोकांत प्रशंसा केली आहे. ज्याच्या अंतःकरणाला

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥

---

सुखम् ॥ ६६ ॥ नास्ति न विद्यते न भवतीत्यर्थः । बुद्धिरात्मस्वरूपविषयायुक्तस्यासमाहितस्य । न चास्त्ययुक्तस्य भावनात्मज्ञानाभिनिवेशः । तथा न चास्त्यभावयत आत्मज्ञानाभिनिवेशमकुर्वतः शान्तिरुपशमः । अशान्तस्य कुतः सुखम् । इन्द्रियाणां हि विषयसेवातृष्णातो निवृत्तिर्या तत्सुखं न विषयविषया तृष्णा दुःखमेव हि सा । न तृष्णायां सत्यां सुखस्य गन्धमात्रमप्युपपद्यत इत्यर्थः ॥ ६६ ॥

अयुक्तस्य कस्माद्बुद्धिर्नास्तीत्युच्यते । इन्द्रियाणां०नावि-

---

स्वास्थ्य प्राप्त झालें नाहीं त्याचे ठिकाणीं आत्मस्वरूपासंबंधानें ज्ञान उत्पन्न होत नाहीं आणि त्याचप्रमाणें चित्तस्वास्थ्यरहित पुरुषाला आत्मज्ञानाची इच्छाही होत नाहीं; आत्मज्ञानाविषयीं निरिच्छ असलेल्याला शांति ह्मणजे अनर्थनिवृत्ति प्राप्त होत नाहीं. तेव्हां अनर्थनिवृत्ति ज्याची झालेली नाहीं त्याला सुख कोठून होणार ? ( आतां, अशा पुरुषालाही विषयसेवेमुळें विषयसुख प्राप्त होण्याचा संभव आहे असें ह्मणावें तर ) विषयोपभोगसंबंधीं जी वासना त्या वासनेपासून जी इंद्रियांची निवृत्ति तें सुख होय; विषयसंबंधी वासना हें सुख नव्हें. विषयवासना ही दुःखस्वरूपच आहे. सारांश, जोंपर्यंत विषयोपभोगसंबंधी वासना पुरुषाचे ठिकाणीं विद्यमान आहे तोंपर्यंत सुखाचा गंधही त्याला प्राप्त होण्याचा संभव नाहीं ६६.

इंद्रियें विषयांचे ठिकाणीं संचार करूं लागलीं असतां जें मन त्यांच्या मागोमाग संचार करूं लागतें तें जलमार्गानें जाणाऱ्या नावेला भलतीकडें नेणाऱ्या वायूप्रमाणें ह्या यतीच्या बुद्धीला भलतीकडे नेतें ॥ ६७॥ ज्याचें अंतःकरण स्वस्थ नाहीं अशा पुरुषाला आत्मस्वरूपविषयक बुद्धि

**मिवाम्भसि ॥ ६७ ॥ इन्द्रियाणां हि यस्माच्चरतां स्वविषयेषु प्रवर्तमानानां यन्मनोनुविधीयतेनुप्रवर्तते तदिन्द्रियविषयविकल्पनेन प्रवृत्तं मनोस्य यतेर्हरति प्रज्ञामात्मानात्मविवेकजां वायुर्नावमिवाम्भस्युदके जिगमिषतां मार्गादुद्धृत्योन्मार्गे नावं यथा वायुः प्रवर्तयत्येवमात्मविषयां प्रज्ञां हृत्वा मनोविषयविषयां करोति ॥ ६७ ॥**

---

कां प्राप्त होत नाहीं ? तें " इंद्रियाणां० मिवाम्भसि " ह्या श्लोकांत सांगितलें आहे. जलमार्गानें जाणाऱ्या लोकांची नाव ज्याप्रमाणें वायु सरळ मार्गापासून काढून भलत्याच मार्गाला प्रवृत्त करितो त्याचप्रमाणें आपआपल्या शब्दादि विषयांचे ठिकाणीं श्रवणादि इंद्रियें प्रवृत्त होऊं लागलीं असतां त्यांच्या मागोमाग इंद्रियांच्या शब्दादि विषयांचा स्वीकार करण्याकरितां जें मन प्रवृत्त होत असतें तें ह्या यतीची आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झालेली आत्मविषयक बुद्धि आत्मविषयापासून हरण करून शब्दादि विषयांकडे लावितें ६७.

( " नास्ति बुद्धिरयुक्तस्य० कुतः सुखम् " ह्या श्लोकावरील व्याख्यानाचे शेंवटीं नीलकंठ पंडितांनीं " तस्माद्बुद्धेः पर्यवस्थानमावश्यकम् " असें लिहिलें असून ह्या श्लोकाला " तदभावे दोषमाह " असें अवतरण दिलें आहे. ह्या अवतरणाचा अर्थ " बुद्धिस्थैर्याच्या अभावाविषयीं—इंद्रियाणां० मिवाम्भसि—ह्या श्लोकामध्यें दोष सांगितला आहे " असा होतो. परंतु, नीलकंठ पंडितांचें हें भाष्यविरुद्ध अवतरण बरोबर नाहीं. कारण, " नास्ति बुद्धिरयुक्तस्य० कुतः सुखम् " ह्या पूर्वींच्या श्लोकांतही बुद्धिस्थैर्याच्या अभावाविषयींच दोष सांगितला आहे. मधुसूदनसरस्वतींनीं " इंद्रियाणां० मिवाम्भसि " ह्या श्लोकाचें व्याख्यान " इंद्रियाणां मध्ये यदेकमपीन्द्रियमनुलक्षीकृत्य मनोनुविधीयते प्रेर्यते प्रवर्तत इति यावत्...तदिन्द्रियमेकमपि मनसानुसृतमस्य

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८ ॥**

---

**यततो ह्यपीत्युपन्यस्तस्यार्थस्यानेकधोपपत्तिमुक्त्वा तं**

---

साधकस्य मनसो वा प्रज्ञामात्मविषयां शास्त्रीयां हरत्यपनयति मनसस्त-द्विषयाविष्टत्वात् । यदैकमपीन्द्रियं प्रज्ञां हरति तदा सर्वाणि हरन्तीति किमु वक्तव्यमित्यर्थः । " असें केलें आहे आणि त्याचें तात्पर्य— " श्रवणादि इंद्रियांपैकीं ज्या एका इंद्रियाला अनुलक्षून मन प्रवृत्त होतें तें इंद्रिय एकटें असतांनाही मनानें संयुक्त होऊन ह्या साधकाची अथवा मनाची आत्मविषयक शास्त्रीय बुद्धि हरण करितें. कारण, त्या एका इंद्रियाचा जो विषय तो मनानें ग्रहण केलेला असतो. सारांश, जर केवल एक इंद्रिय देखील बुद्धीला हरण करितें तर सर्व इंद्रियें बुद्धि हरण करितील हें कशाला सांगावयाला पाहिजे ? "—असें आहे. परंतु, मधुसूदनसरस्वतींचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, "नास्ति बुद्धिरयुक्तस्य" ह्या श्लोकाकडे लक्ष्य दिलें असतां इंद्रिययुक्त मनच बुद्धि हरण करितें असा अर्थ विवक्षित असल्याचें सिद्ध आहे. शिवाय, ह्या श्लोकामध्यें " मनः " हें पद श्रुत असतांना त्याचा त्याग करून " इंद्रि-यम् " हें पद नसतांनाही यत् व तत् ह्या सर्वनामांनीं त्याचा स्वीकार करणें अयोग्य आहे हा मधुसूदनांच्या व्याख्यानावर दोष येत आहे. त्याचप्रमाणें " मनाची आत्मविषयक बुद्धि " असा जो दुसरा एक पक्ष मधुसूदनांनीं दाखविला आहे तोही बरोबर नाहीं. कारण, प्रकरणाकडे लक्ष्य दिलें असतां साधकाची बुद्धि असेंच मानणें योग्य आहे. अर्थात्, मधुसूदनांच्या ह्या भाष्यविरुद्ध व्याख्यानावर प्रकरणविरोध हा दोष येत आहे ६७ )

तस्मात्, हे महाबाहो अर्जुना, शब्दादि विषयांपासून ज्याच्या सर्व इंद्रि-यांचा निग्रह झालेला असेल त्याचीच बुद्धि आत्मस्वरूपीं स्थिर होते ॥६८॥

" यततो ह्यपि॰ प्रसभं मनः " ह्या श्लोकांत ज्या अर्थाचा उप-

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥६९॥

---

चार्थमुपपाद्योपसंहरति तस्मादिति । इन्द्रियाणां प्रवृत्तौ दोष उपपादितो यस्मात्तस्माद्यस्य महाबाहो० स्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥ तस्माद्यस्य यतेर्हे महाबाहो निगृहीतानि सर्वश इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः शब्दादिभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८॥

योयं लौकिको वैदिकश्च व्यवहारः स उत्पन्नविवेकज्ञानस्य स्थितप्रज्ञस्याविद्याकार्यत्वादविद्यानिवृत्तौ निवर्तते ।

---

न्यास केला आहे त्या अर्थाची अनेक प्रकारांनीं उपपत्ति करून " तस्माद्यस्य ० प्रतिष्ठिता " ह्या श्लोकानें त्या अर्थाचा उपसंहार केला आहे. विषयांकडे इंद्रियांची प्रवृत्ति असण्याविषयीं ज्याअर्थीं " ध्यायतो विषयान्पुंसः "इत्यादि प्रकारानें दोष सांगितला आहे त्याअर्थीं, हे महाबाहो, इंद्रियार्थांपासून ह्मणजे शब्दादि विषयांपासून ज्याचीं सर्व इंद्रियें परावृत्त केलेलीं असतील त्याची बुद्धि आत्म्याचे ठिकाणीं स्थिर होते ६८.

( मोठमोठ्या बाहूंच्या योगानें शत्रूंना जिंकून शूर लोक ज्याप्रमाणें राज्याचें स्थैर्य संपादन करितात त्याप्रमाणें विवेकी पुरुष इंद्रियरूप शत्रूंना जिंकून बुद्धिस्थैर्य संपादन करितात. अर्थात्, कामक्रोधादि शत्रूंचा संहार करण्यास समर्थ असलेलाच पुरुष आत्मज्ञानाविषयीं अधिकारी होतो हें " महाबाहो " ह्या संबोधनानें सुचविलें ६८ )

सर्व प्राण्यांना जी रात्र असते तिचे ठिकाणीं ज्ञानी पुरुष जागत असतो आणि जिच्यामध्यें प्राणी जागृत असतात ती परमार्थतत्त्व अवलोकन करणाऱ्या मुनीची रात्र असते ॥ ६९ ॥

आत्मानात्मविवेकजन्य ज्ञान उत्पन्न होऊन ज्याची बुद्धि आत्म्याचे ठिकाणीं स्थिर झाली आहे त्याचे ठिकाणीं लौकिक आणि वैदिक असा जो हा व्यवहार तो राहात नाहीं. कारण, हा व्यवहार अज्ञानमूलक

अविद्यायाश्च विद्याविरोधान्निवृत्तिरित्येतमर्थं स्फुटीकुर्वन्नाह या निशा सर्वभूतानां० पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥ या निशा रात्रिः सर्वपदार्थानामविवेककरी तमःस्वभावत्वान्निशा सर्वेषां भूतानां सर्वभूतानाम् । किं तत्परमार्थतत्त्वं स्थितप्रज्ञस्य विषयः यथा नक्तंचराणामहरेव सदन्येषां निशा भवति तद्वन्नक्तंचरस्थानीयानामज्ञानां सर्वभूतानां निशेव निशा परमार्थतत्त्वमगोचरत्वादतद्बुद्धीनाम् । तस्यां परमा-

---

असल्यामुळें अज्ञानाची निवृत्ति झाली असतां निवृत्त होतो आणि अज्ञान हें ज्ञानाला विरोधी असल्यामुळें ज्ञानी पुरुषापासून निवृत्त होतें हा आशय स्पष्ट दर्शविण्याकरितां "या निशा० पश्यतो मुनेः" असें भगवानांनीं ह्मटलें आहे. तमोरूप असल्यामुळें सर्व पदार्थांविषयीं सर्व प्राण्यांना अविवेक उत्पन्न करणारी जी रात्रिच आहे. जी ह्मणजे कोणती ह्मणून विचाराल तर स्थितप्रज्ञ पुरुषाला गोचर असलेलें जें परमार्थ तत्त्व तें जी ह्या शब्दानें घ्यावयाचें. ( सारांश, स्थितप्रज्ञ पुरुषाला गोचर होणारें जें परमार्थतत्त्व तें इतर सर्व अज्ञानी जनांना रात्रीप्रमाणें असतें. ह्मणजे सर्व अंधारमय होत असल्यामुळें दृष्टीचें कांहीं एक चालेनासें होऊन रात्रीं ज्याप्रमाणें लोकांना पदार्थ वेगवेगळे ओळखितां येत नाहींत आणि ह्मणूनच मनुष्यादि प्राणी ज्याप्रमाणें रात्रीमध्यें व्यवहार करण्यास असमर्थ होतात त्याचप्रमाणें सर्व अज्ञानी जन परमार्थतत्त्वामध्यें मति चालत नसल्यामुळें निद्रिस्थ पुरुषाप्रमाणें त्याविषयीं चिंतन करण्यास असमर्थ होतात. तात्पर्य, उलूकप्रभृति ) निशाचरांना असलेला दिवसच ज्याप्रमाणें इतर दिनचर प्राण्यांना रात्र होतो त्याचप्रमाणें निशाचरांचे स्थानीं असलेले ( ह्मणजे निशाचर ज्याप्रमाणें रात्रीमध्यें व्यवहार करीत असतात त्याप्रमाणें अज्ञानमय अशा संसाररूप अंधकारामध्यें वावरत असलेले ) जे सर्व अज्ञानी प्राणी त्यांना परमार्थतत्त्व रात्रीप्रमाणें होतें.

र्थतत्त्वलक्षणायामज्ञाननिद्रायाः प्रबुद्धो जागर्ति संयमी संयमवाञ्जितेन्द्रियो योगीत्यर्थः । यस्यां ग्राह्यग्राहकभेदलक्षणायामविद्यानिद्रायां प्रसुप्तान्येव भूतानि जाग्रतीत्युच्यते यस्यां निशायां प्रसुप्ता इव स्वप्नदृशः सा निशाविद्यारूपत्वात्परमार्थतत्त्वं पश्यतो मुनेः। अतः कर्माण्यविद्यावस्थायामेव चोद्यन्ते न विद्यावस्थायाम् । विद्यायां हि सत्यामु-

---

कारण, जे अतद्बुद्धि आहेत ( ह्मणजे परमार्थतत्त्वाहून भिन्न अशा द्वैतप्रपंचाचे ठिकाणींच ज्यांचीं बुद्धि प्रवृत्त झालेली आहे ) त्यांना परमार्थतत्त्व अगोचर आहे. तेव्हां अज्ञानी पुरुषांना रात्रीप्रमाणें असलेली जी परमार्थतत्त्वरूप ( ह्मणजे ब्रह्मज्ञानरूप ) अवस्था त्या अवस्थेमध्यें ( अर्थात् अज्ञानी जनांच्या रात्रीमध्यें ) अज्ञानरूप निद्रेपासून सावध झालेला जितेंद्रिय असा ज्ञानी पुरुष जागत असतो. वस्तुतः निद्रिस्थ असलेले पुरुष ज्याप्रमाणें स्वप्नें अवलोकन ( करून संभाषण वगैरे ) करूं लागले असतां जाग्रदवस्थेमध्यें असल्यासारिखे होतात त्याचप्रमाणें ग्राह्यग्राहकभेदरूप (ह्मणजे ग्राह्य वस्तु भिन्न आणि ग्रहण करणारा भिन्न अशाप्रकारचा भेद हेंच जिचें स्वरूप आहे त्या ) अज्ञाननिद्रेमध्यें वस्तुतः गाढ निद्रिस्थ असलेलेही अज्ञानी प्राणी ज्या रात्रीमध्यें (अर्थात् अज्ञानमय अवस्थेमध्यें ) जागत असतात ती परमार्थतत्त्व अवलोकन करणाऱ्या मुनीची ( ह्मणजे ब्रह्मनिष्ठाची ) रात्र होय. ( सारांश, द्रष्टा, दर्शन व दृश्य इत्यादि प्रकारच्या भेदांनीं भरलेल्या ज्या अज्ञानामध्यें ब्रह्मज्ञानरहित पुरुष व्यवहार करीत असतात तें द्वैताला आश्रय असलेलें अज्ञान ब्रह्मनिष्ठाला रात्रीप्रमाणें होतें. ह्मणजे रात्रीं ज्याप्रमाणें प्राणी कसलाही व्यवहार न करितां स्वस्थ पडून रहातात त्याप्रमाणें ह्या अज्ञानरूप रात्रीमध्यें ब्रह्मवेत्ता पुरुष हा मी व हें माझें इत्यादि प्रकारचा कोणताच व्यवहार करीत नाहीं ) तस्मात्, अज्ञानावस्थेमध्येंच कर्में

**दिते सवितरि शार्वरमिव तमः प्रणाशमुपगच्छत्यविद्या। प्राग्विद्योत्पत्तेरविद्या प्रमाणबुद्ध्या गृह्यमाणा क्रियाकारकफलभेदरूपा सती सर्वकर्महेतुत्वं प्रतिपद्यते। नाप्रमाणबुद्ध्या गृह्यमाणायाः कर्महेतुत्वोपपत्तिः प्रमाणभूतेन वेदेन मम चोदितं कर्तव्यं कर्मेति हि कर्मणि कर्ता प्रवर्तते नाविद्यामात्रमिदं**

---

विहित आहेत; ज्ञानावस्थेमध्यें नाहींत. ( क्रिया, कारक, फल हा भेद अज्ञानावस्थेंतच असतो व ) सूर्य उदय पावला असतां रात्रिसंबंधीं अंधकार जसा नाहींसा होऊन जातो तसें ज्ञान झालें असतां अज्ञान नाहींसें होऊन जातें ( तेव्हां अर्थातच ज्ञानावस्थेमध्यें कर्म विहित असण्याचा संभव नाहीं. ) सारांश, ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वी भेदस्वरूप जें अज्ञान ( ह्मणजे क्रिया--कर्ता, कारण, संप्रदान, अपादान इत्यादि--कारक आणि फल हीं भिन्न भिन्न आहेत अशी समजूत हें ज्याचें स्वरूप आहे असें जें अज्ञान अर्थात् अज्ञानावस्थेंत प्रमाणभूत असलेलें जें कर्मकांड ) त्याचें प्रमाणबुद्धीनें ( ह्मणजे ह्यांत सांगितलेलें सर्व प्रमाण आहे अशा बुद्धीनें ) ग्रहण होत असल्यामुळें सर्व कर्मांच्या प्रवृत्तीला तें कारणीभूत होत असतें. ज्ञान उत्पन्न झाल्यानंतर अज्ञानाचें ह्मणजे अर्थात् अज्ञानविषयक कर्मकांडाचें अप्रमाणबुद्धीनें ग्रहण होत असल्यामुळें ह्मणजे कर्मकांड प्रमाण नाहीं असा अंतःकरणाचा निश्चय होत असल्यामुळें तें अज्ञानविषयक कर्मकांड ज्ञानी पुरुषाची कर्मामध्यें प्रवृत्ति करण्यास कारणीभूत होण्याचा संभव नाहीं. तात्पर्य, ( अज्ञानावस्थेमध्यें ) प्रमाणभूत असलेल्या वेदानें ह्मणजे कर्मकांडविषयक श्रुतीनें विहित असलेलें जें कर्म तें मला कर्तव्य आहे असें समजून अज्ञानी पुरुष मी कर्ता आहें अशा समजुतीनें कर्मामध्यें प्रवृत्त होत असतो. क्रिया, कारक, फल इत्यादि प्रकारचें हें अज्ञानमय द्वैत सर्व रात्रीप्रमाणें ( अंधारानें भरलेलें ) आहे असें समजणारा ज्ञानी पुरुष कर्मामध्यें प्रवृत्त होत नाहीं.

**सर्वं निशेवेति । यस्य पुनर्निशेवाविद्यामात्रमिदं सर्वं भेदजातमिति ज्ञानं तस्यात्मज्ञस्य सर्वकर्मसंन्यास एवाधिकारो न प्रवृत्तौ तथा च दर्शयिष्यति तद्बुद्धयस्तदात्मान इत्यादिना ज्ञाननिष्ठायामेव तस्याधिकारम् । तत्रापि प्रवर्तकप्रमाणाभावे प्रवृत्त्यनुपपत्तिरिति चेन्न स्वात्मविषयत्वादात्मज्ञानस्य ।**

---

क्रिया, कारक, फल, ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता इत्यादि सर्व प्रकारचा भेदसमुदाय केवळ रात्रीप्रमाणें अज्ञानरूप आहे, अशी ज्याची समजूत झालेली असेल त्या आत्मज्ञानी पुरुषाचा सर्व कर्मांचा संन्यास करण्याविषयींच अधिकार आहे; कर्मप्रवृत्तीविषयीं अधिकार नाहीं. आत्मज्ञानी पुरुषाचा ज्ञाननिष्ठेविषयींच अधिकार असल्याचें भगवानांनींही ( पुढें पंचमाध्यायांत ) " तद्बुद्धयस्तदात्मानः " इत्यादि वाक्यशेषानें दर्शविलें आहे. ( आतां आत्मज्ञानहीन पुरुषाची कर्मांचे ठिकाणीं प्रवृत्ति होण्यास ज्याप्रमाणें विधिरूप प्रवर्तक प्रमाणाची अपेक्षा असते त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषाचीही ज्ञाननिष्ठेमध्यें प्रवृत्ति होण्यास प्रवर्तक प्रमाणाची ह्मणजे विधीची अपेक्षा आहे. तेव्हां )" प्रवर्तक प्रमाणाचा ह्मणजे विधीचा जर ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं अभाव असेल तर ज्ञाननिष्ठेमध्यें त्याची प्रवृत्ति होण्याचा संभव नाहीं " ही शंका व्यर्थ आहे. कारण, ( आत्मज्ञान आणि आत्मा ह्यांपैकीं विधीची अपेक्षा कोणाला आहे ह्मणून समजावयाचें ? आत्मज्ञान होण्याला विधीची अपेक्षा आहे ह्मणावें तर जुळत नाहीं. कारण, ) स्वरूप हाच आत्मज्ञानाचा विषय आहे आणि ह्मणूनच तें उत्पन्न होण्यास आत्मबाह्य विधीची अपेक्षा नाहीं. आतां आत्म्याला विधीची अपेक्षा आहे ह्मणून ह्मणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण, जें साध्य असेल तें प्राप्त होण्याला प्रवर्तकप्रमाणसंज्ञक विधीची अपेक्षा असते. आत्मा हा साध्य करून घेण्याचा नसून तो स्वतःसिद्धच आहे. सारांश, ) आत्मा हा आत्मरूपच असल्यामुळें त्याला स्वतःविषयीं प्रवर्तकप्रमाणाची अपेक्षा नाहीं. ( आतां

**न ह्यात्मनः स्वात्मनि प्रवर्तकप्रमाणापेक्षात्मत्वादेव तदन्तत्वाच्च सर्वप्रमाणानां प्रमाणत्वस्य न ह्यात्मस्वरूपाधिगमे सति पुनः प्रमाणप्रमेयव्यवहारः संभवति । प्रमातृत्वं ह्यात्मनो निवर्तयत्यन्त्यं प्रमाणम् । निवर्तयदेव चाप्रमाणी भवति स्वप्नकालप्रमाणमिव च प्रतिबोधे । लोके च वस्त्वधिगमे प्रवृत्तिहेतुत्वादर्शनात्प्रमाणस्य । तस्मान्नात्मविदः कर्मण्यधिकार इति सिद्धम् ॥ ६९ ॥**

---

आत्मा आणि आत्मज्ञान ह्यांना जरी विधीची अपेक्षा नसली तरी आत्मज्ञानी पुरुषाला प्रमाण व प्रमेय एतद्विषयक व्यवहाराच्या नियमनाकरितां विधीची अपेक्षा आहे ह्मणून ह्मणावें तर तेंही योग्य नाहीं ) कारण, सर्व प्रमाणांचें प्रामाण्य आत्मज्ञानापर्यंतच आहे. आत्मज्ञानाची उत्पत्ति झाली असतां सर्व प्रमाणांच्या प्रामाण्याचें पर्यवसान होत असतें आणि त्याचप्रमाणें आत्मज्ञान उत्पन्न झालें असतां अज्ञानमूलक व्यवहारही आत्मज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं रहाण्याचा संभव नसतो. तेव्हां, अर्थातच त्या अज्ञानमूलक व्यवहाराच्या नियमनाकरितां आत्मज्ञानी पुरुषाला विधीची अपेक्षा रहात नाहीं ) सारांश, ( अद्वितीय अशा ) आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें असतां पुनरपि (द्वैतावस्थेंतच असणारा जो ) प्रमाण व प्रमेय एतद्विषयक भेदव्यवहार (तो) संभवत नाहीं. कारण, अद्वैतज्ञानरूप जें शेवटलें प्रमाण तें आत्म्याच्या प्रमातृत्वाची ह्मणजे ज्ञातृत्वाची निवृत्ति करितें आणि निवृत्ति करितां करितांच जागृतावस्थेंत निवृत्त होणाऱ्या स्वप्नावस्थेंतील प्रमाणाप्रमाणें तें निवृत्त होत जातें. शिवाय, लोकव्यवहारांतही वस्तुज्ञान झाल्यानंतर ज्ञापक प्रमाण पुरुषाची वस्तुज्ञानाकडे प्रवृत्ति होण्यास कारणीभूत होत असल्याचें दिसत नाहीं. तस्मात्, ( कोणत्याही प्रकारानें विचार करून पाहिलें असतां ) आत्मज्ञानी पुरुषाला कर्माविषयीं अधिकार नाहीं हें सिद्ध आहे *६९.

---

* ह्या श्लोकावरील भाष्य समजण्यास उपयोगीं पडण्यासारखीं कांहीं मंडनमिश्रांचीं वार्तिकें बृहदारण्योपनिषद्भाष्यवार्तिकापैकीं मराठी तात्पर्यासह पुढें दिलीं आहेत,

नन्वेवमपि मानत्वव्याघातः स्यात्क्रियाविधेः ।
वेदान्तेष्वप्यनाश्वासस्तथा च प्रसजेद्ध्रुवम् ॥ १६१ ॥
नैतदेवं यतोशेषमानानामपि मानता ।
आ परात्मावबोधात्स्यात्तत्र सर्वसमाप्तितः ॥ १६२॥
नातोवतारो मानानामैकात्म्येनैव संक्षयात् ।
श्येनादिविधिबाधः स्यादहिंसाविधिना यथा ॥ १६३॥

---

अहो, अद्वैतानुभवस्वरूप ब्रह्माविषयीं वेदांतांचें प्रामाण्य मानिल्यानें कर्मकांडाला अप्रामाण्य येणार. कारण, कर्म हें कारकादि भेदावर अवलंबून आहे आणि अभेदप्रतिपादक वेदांतांनीं त्या भेदाचें निराकरण केलेलें आहे. बरें, केवळ वेदांतांचेंच प्रामाण्य इच्छिणाऱ्या अद्वैतवाद्यांना कर्मकांड अप्रमाण होणें अनिष्ट नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. कारण, कर्मकांड हा तरी वेदांतीलच एक भाग असून वेदांत हाही वेदांतीलच एक भाग आहे. तेव्हां कर्मकांड अप्रमाण ठरल्यानें वेद अप्रमाण ठरत असल्यामुळें त्यांतील वेदांतावरही प्रमाण ह्मणून लोकांचा विश्वास निःसंशय रहाणार नाहीं. तस्मात्, कर्मकांडाला अप्रामाण्य येणें इष्ट नाहीं ॥ १६१ ॥

कर्मकांडाला अप्रामाण्य इष्ट नाहीं हें ह्मणणें बरोबर नाहीं. कर्मकांड अप्रमाण ह्मणून जें ह्मटलें आहे तें तात्त्विक दृष्टीनें ह्मटलें आहे. व्यावहारिक दृष्टीनें ह्मटलेलें नाहीं. तेव्हां, तत्त्वदृष्ट्या कर्मकांड जरी अप्रमाण ठरलें तरी व्यवहारदृष्ट्या तें प्रमाणभूत आहेच. कारण, परमात्म्याचें ज्ञान होईपर्यंत ज्याअर्थी सर्व प्रमाणांना प्रामाण्य आहे त्याअर्थीं ज्ञान उत्पन्न होईपर्यंत पूर्वकालीं कर्मकांड प्रमाणभूत आहेच आहे. ज्ञान उत्पन्न झालें असतां सर्व कर्मांची समाप्ति होत असल्यामुळें कर्मकांडही अप्रमाण होणार हें उघड आहे ॥ १६२ ॥

आतां ज्ञानी पुरुषही देह असेपर्यंत कर्मकांड प्रमाण मानून चालत असल्याचें दिसतें. तेव्हां, ज्ञानानंतर कर्मकांड अप्रमाण हें ह्मणणें

कर्माण्यतो विधीयन्तेविद्यावन्तं नरं प्रति ।
न तु विध्वस्तसकलकर्महेतुं द्विजं प्रति ॥ १६४ ॥
सर्वकर्मनिरासेतो ह्यधिकारो विवेकिनः ।
यथोक्तन्यायतः सिद्धो न तु कर्मसु कर्हिचित् ॥१६५॥
कारकव्यवहारे हि शुद्धं वस्तु न वीक्ष्यते ।
शुद्धे वस्तुनि सिद्धे च कारकव्यापृतिस्तथा ॥१६६॥

---

बरोबर कसें होईल ? अशी शंका कोणी करील; परंतु, ती बरोबर नाहीं. कारण, ज्ञानानंतर प्रत्यक्षादि प्रमाणांच्या प्रवृत्तीला हेतुभूत जें अज्ञान तें ऐकात्म्याच्या योगानेंच क्षीण होत असल्यामुळें प्रमाणांची प्रवृत्तिच होत नाहीं. आतां ऐक्यज्ञान हेंही एक प्रमाण असल्यामुळें प्रत्यक्षादि प्रमाणांचा बाध त्याच्यानें होणार नाहीं. कारण, एकाप्रमाणानें दुसऱ्या प्रमाणांचा बाध होत असल्याचें दिसत नाहीं अशीही एक शंका ह्या ठिकाणीं येण्याचा संभव आहे; परंतु, विचाराअंतीं ती शंका टिकणार नाहीं. कारण, " न हिंस्यात्सर्वा भूतानि " ह्या अहिंसाप्रतिपादक विधीनें ज्याप्रमाणें " श्येनेनाभिचरन्यजेत " इत्यादि विधींचा बाध होतो त्याचप्रमाणें " तत्त्वमसि " इत्यादि वाक्यांच्या योगानें उत्पन्न झालेल्या ज्ञानानें ज्ञानोत्पत्तीपूर्वी प्रवृत्त झालेल्या विधींचा वगैरे बाध होतो ॥ १६३ ॥

ह्मणून ज्ञानहीन पुरुषालाच उद्देशून कर्मे विहित आहेत. ज्ञानाच्या योगानें सर्वकर्मांना हेतुभूत असलेला ब्राह्मण्यादिकाविषयींचा अभिमान ज्याचा नाहींसा झाला आहे त्या ज्ञानी द्विजाला उद्देशून कर्माचें विधान नाहीं ॥ ६४ ॥

सारांश, पूर्वोक्त न्यायानें विवेक, वैराग्य इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषाचा सर्वकर्मसंन्यासपूर्वक श्रवणादिकांविषयींच अधिकार आहे; कर्मांविषयीं कधींही नाहीं ॥ ६५ ॥

काकोलूकनिशेवायं संसारोऽज्ञात्मवेदिनोः ।
या निशा सर्वभूतानामित्यवोचत्स्वयं हरिः ॥ ३१३ ॥

---

आतां विवेकी आणि विरक्त अशा पुरुषालाही अत्मज्ञान होईपर्यंत ' यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ' ह्या वचनावरून कर्मत्याग करणें योग्य दिसत नाहीं. तस्मात् , जिज्ञासूला कर्माधिकार आहेच आहे; अशी शंका कोणी करील; परंतु, ती बरोबर नाहीं. कारण, कारकव्यवहार असतांना ( ह्मणजे कर्म असतांना ) आत्मज्ञानाची इच्छाच उत्पन्न होत नाहीं आणि यदाकदाचित् जरी आत्मज्ञानाची इच्छा असली तरी कर्मांचे ठिकाणींच चित्ताचें लय लागून राहिलें असल्यामुळें तो आत्मज्ञानेच्छु पुरुष शुद्ध अशा आत्म्याला जाणण्यास समर्थ होत नाहीं. ह्यास्तव, विवेक उत्पन्न झाला असतां कर्मत्यागच उचित आहे आणि ' यज्ञदानतपःकर्म ' हें वाक्य नित्य कर्माचें स्तावक आहे. असो. कर्माचे ठिकाणीं चित्ताचें लय लागून राहिलें असतांना ज्याप्रमाणें शुद्ध आत्म्याचें ज्ञान होण्यास जिज्ञासु समर्थ होत नाहीं त्याचप्रमाणें शुद्ध जें आत्मतत्त्व तिकडे लय लागलें असतां कर्माला हेतुभूत जो ब्राह्मण्यादिकांचा अभिमान तो शिथिल होत असल्यामुळें त्या पुरुषाचें चित्त कर्मांचे ठिकाणीं गुंतून रहात नाहीं. अर्थात् कर्मांविषयीं त्याला अधिकार रहात नाहीं* ॥ १६६ ॥

विद्वानाच्या दृष्टीनें विषयादिकांचा आणि अविद्वानाच्या दृष्टीनें आत्मतत्त्वाचा अभाव असतो हें ह्या वार्तिकांत दृष्टांतानें दर्शविलें आहे. अज्ञानी आणि ज्ञानी ह्यांना हा संसार काकपक्षी आणि उलूकपक्षी ह्यांच्या रात्रीप्रमाणें आहे. ह्मणजे काकप्रभृति पक्ष्यांची जी रात्र तिच्यामध्यें उलूकपक्षी जागत असतात ह्मणून त्यांच्या दृष्टीनें ती रात्र नसते आणि जेव्हां काकप्रभृति पक्षी जागत असतात तेव्हां उलूकपक्ष्यांच्या

---

* ही वार्तिकें संबंधवार्तिकांपैकीं आहेत.

दृष्टीनें रात्र असते; परंतु, काकप्रभृति पक्ष्यांच्या दृष्टीनें तिचा अभाव असतो. त्याचप्रमाणें अज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें हा संसार जेव्हां असतो तेव्हां त्याच्या दृष्टीनें आत्मतत्त्वाचा अभाव असतो आणि विद्वानाला जेव्हां आत्मतत्त्वाचा अनुभव येत असतो तेव्हां त्याच्या दृष्टीनें संसाराचा अभाव असतो. हीच गोष्ट श्रीहरींनीं 'या निशा सर्वभूतानां' ह्या श्लोकांत सांगितली आहे ॥ ३१३ ॥ ( हें वार्तिक पहिल्या अध्यायापैकीं आहे ).

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ७०

---

विदुषस्त्यक्तैषणस्य स्थितप्रज्ञस्य यतेरेव मोक्षप्राप्तिर्न त्वसंन्यासिनः कामकामिन इत्येतमर्थं दृष्टान्तेन प्रतिपादयिष्यन्नाह आपूर्य० कामकामी ॥ ७० ॥ आपूर्यमाणमद्भिरचलप्रतिष्ठमचलतया प्रतिष्ठावस्थितिर्यस्य तमचलप्रतिष्ठं समुद्रमापः सर्वतो गताः प्रविशन्ति स्वात्मस्थमविक्रियमेव सन्तं यद्वत्तद्वत्कामा विषयसंनिधावपि सर्वत इच्छाविशेषा यं पुरुषं समुद्रमिवापो विकुर्वन्तः प्रविशन्ति सर्वे आत्मन्येव

---

उदकानें समुद्र नेहमीं भरत असतांनाही त्याची मर्यादा न चळतां ज्याप्रमाणें उदक त्यामध्यें प्रविष्ट होतें त्याप्रमाणें सर्व इच्छा ज्या पुरुषामध्यें ( विकृति उत्पन्न न करितां ) प्रविष्ट होतात त्याला मोक्षप्राप्ति होते; विषयाभिलाषी पुरुषाला होत नाहीं ॥ ७० ॥

पुत्रादिविषयक इच्छांचा ज्यानें त्याग केलेला आहे व ज्याची बुद्धि स्थिर झालेली आहे अशा ज्ञानवान् यतीलाच मोक्षप्राप्ति होते. संन्यास न घेतलेल्या अशा विषयाभिलाषी पुरुषाला मोक्षप्राप्ति होत नाहीं. हा अर्थ दृष्टांतानें दर्शविण्याकरितां " आपूर्यमाण० न कामकामी " हा श्लोक भगवानांनीं सांगितला आहे. सर्व बाजूंनीं असलेलें उदक ज्याप्रमाणें उदकानें भरून निघणाऱ्या आणि अचलपणानें स्थित असलेल्या समुद्रामध्यें प्रविष्ट होतें आणि ज्याप्रमाणें तें उदक एकसारिखें आंत प्रविष्ट होत असतांनाही समुद्र आपल्या मर्यादेमध्येंच रहात असून विकार पावतच नाहीं त्याचप्रमाणें विषय संनिध असतांनाही सर्व इच्छा ज्या पुरुषाचे ठिकाणीं प्रविष्ट होतात ह्मणजे समुद्रामध्यें जसें उदक समुद्राचे ठिकाणीं विकार उत्पन्न न करितांच प्रविष्ट होतें तशा सर्व इच्छा ज्या पुरुषाचे ठिकाणीं प्रविष्ट होतात अर्थात् विषयसंबंधीं इच्छा

**प्रलीयन्ते न स्वात्मवशं कुर्वन्ति स शान्तिं मोक्षमाप्नोति नेतरः कामकामी काम्यन्त इति कामा विषयास्तान्कामयितुं शीलं यस्य स कामकामी नैव प्राप्नोतीत्यर्थः ॥ ७० ॥**

---

जागच्या जागींच लीन होत असून ज्या पुरुषाला आपल्या अधीन करीत नाहींत त्याला शांति ह्मणजे मोक्ष प्राप्त होतो; इतर जो काम-कामी ह्मणजे विषयाभिलाषी पुरुष असेल त्याला मोक्ष प्राप्त होतच नाहीं. अचलप्रतिष्ठ=अचलपणानें असणाऱ्या मर्यादेनें युक्त=मर्यादा सोडून न जाणारा. काम ह्मणजे विषय त्यांचा अभिलाष करणें हें ज्याचें शील आहे तो कामकामी; अर्थात् विषयाभिलाषी ७०.

मोक्ष हा ज्ञानाचें फल आहे. तेव्हां जो ज्ञानी असेल तो जरी संन्यासी नसला तरी त्याला मोक्षप्राप्ति होणें उचित दिसतें. तस्मात्, विद्वानाला ह्मणजे ज्ञानी पुरुषाला मोक्षप्राप्ति होण्यास संन्यासाचीच अवश्यकता कां आहे अशी कोणाला शंका येईल ह्मणून तिचें निरसन होण्याकरितां भाष्यकारांनीं वरील प्रमाणें सदहू श्लोकाला अवतरण दिलें आहे. आत्मसंबंधीं वरवर ज्ञान होऊन विवेक, वैराग्य इत्यादि साधनांनीं जो युक्त झाला असेल आणि सर्वप्रकारच्या एषणांपासून ह्मणजे इच्छांपासून परावृत्त होऊन श्रवणादिकांच्या द्वारें ज्याचे ठिकाणीं आत्मविषयक साक्षात्कार उत्पन्न झाला असेल असा जो मुख्य संन्यासी त्यालाच मोक्षप्राप्ति होते; विषयाभिलाषानें घेरून टाकिलेल्या इतर पुरुषाला होत नाहीं. हें दृष्टांतानें दर्शविण्याकरितां ' रागद्वेषवियुक्तैस्तु ' ह्या श्लोकांमध्येंच प्रतिपादित असलेली गोष्ट भगवान् श्रीकृष्ण ' आपूर्यमाणमचल० न कामकामी ' ह्या श्लोकांत सांगत आहेत. हा ' विदुष० व्यन्नाह ' ह्या भाष्याचा आशय होय. उदक सर्व बाजूंनीं समुद्रामध्यें येत असल्यामुळें समुद्राला वृद्धि अथवा ऱ्हास होण्याचा संभव आहे अशी कोणाला शंका येईल ती न यावी ह्मणून ' अचलप्रतिष्ठं ' हें

विशेषण समुद्राला दिलें आहे आणि ' समुद्राचें जें उदकमय ठरीव रूप त्यामध्यें कमजास्तपणा ह्मणजे ऱ्हास अथवा वृद्धि कधींही होत नसल्यामुळें तो सर्वदां एक रूपानें स्थित असतो ' हा तें विशेषण समुद्राला देण्याचा आशय आहे. अनेक नद्यांचीं उदकें ज्याअर्थीं समुद्रामध्यें जात असतात त्याअर्थीं समुद्राच्या स्वरूपांत वृद्धिरूप अथवा ऱ्हासरूप विकार उत्पन्न होऊन तो सर्वदां समर्याद रहाण्याचा संभव नाहीं. अशी ह्या ठिकाणीं शंका येण्याचा संभव असल्यामुळें तिच्या निरसनार्थ भाष्यकारांनीं ' स्वात्मस्थमविक्रियमेव सन्तं ' असें लिहिलें आहे. विषयेच्छा तृप्त करण्याचीं साधनें संनिध नसतांना ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं जरी विषयेच्छा प्रविष्ट होऊन विकार उत्पन्न करीत नसल्या तरी तीं साधनें समीप असतांना त्या इच्छा ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं प्रविष्ट होऊन विकार उत्पन्न करितील. अशी शंका न यावी ह्मणून भाष्यकारांनीं ' विषयसंनिधावपि ' असें ह्मटलें आहे. )

( मधुसूदनसरस्वतींनीं ' अचलप्रतिष्ठं ' ह्या पदाचा अर्थ ' अनतिक्रान्तमर्यादं ' असा भाष्यकारांना इष्ट असल्याप्रमाणें केला असून ' अचलानां मैनाकादीनां प्रतिष्ठा यस्मिन्निति वा गाम्भीर्यातिशय उक्तः ' असा भाष्यकारांना अभिमत नसलेला दुसरा एक अर्थ विकल्पानें केलेला आहे. परंतु, हा भाष्यविरुद्ध वैकल्पिक अर्थ बरोबर नाहीं. कारण, विषयसांनिध्य असतांनाही ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं विषयेच्छा विकार उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहींत हें ह्या श्लोकांत समुद्राचा दृष्टांत घेऊन सांगितलें असल्यामुळें मर्यादा सोडून न जाणारा हाच अर्थ ' अचलप्रतिष्ठं ' ह्या पदाचा ह्या ठिकाणीं विवक्षित आहे. निर्विकारत्व दर्शविणें हाच उद्देश असल्यामुळें सदर्हू पदाचा आशय अतिशय गंभीरपणा असा ह्या ठिकाणीं काढितां येत नाहीं. शिवाय, मैनाकप्रभृति पर्वत इंद्राच्या वज्राला भिऊन समुद्रामध्यें दडून राहिले होते असें इतिहासप्रसिद्ध असल्यामुळें आणि पूर्वीं पर्वतांना पंख असल्याचें प्रसिद्ध

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥

---

यस्मादेवं तस्माद्विहाय० मधिगच्छति॥ ७१ ॥ विहाय परित्यज्य कामान्यः संन्यासी पुमान्सर्वानशेषतः कार्त्स्न्येन चरति जीवनमात्रचेष्टाशेषः पर्यटतीत्यर्थः । निस्पृहः शरीरजीवनमात्रेपि निर्गता स्पृहा यस्य स निस्पृहः सन्निर्ममः शरीरजीवन मात्राक्षिप्तपरिग्रहेपि ममेदमित्यभिनिवेशवर्जितः । निरहंकारो विद्यावत्त्वादिनिमित्तात्मसंभावनारहित इत्यर्थः । स एवंभूतः स्थितप्रज्ञो ब्रह्मविच्छान्तिं सर्वसंसारदुःखोपरमलक्षणां निर्वाणाख्यामधिगच्छति प्राप्नोति ब्रह्मभूतो भवतीत्यर्थः ॥ ७१ ॥

---

असल्यामुळें मैनाकादि पर्वतांचे ठिकाणीं अचल शब्द अनादि कालापासून लागणें योग्य आहे असें मानण्याला कांहीं कारण दिसत नाहीं. असो. ह्या श्लोकांतील ‘ अचलप्रतिष्ठं ’ हें विशेषण पुरुषालाही लागतें व त्यावेळीं त्याचा अर्थ अचल अशा ब्रह्माचे ठिकाणीं ज्याचें लय लागलेलें आहे असा होतो ).

( नीलकंठपंडितांनीं ह्या श्लोकावरील टीकेमध्यें भाष्यकारांना अभिमत नसलेला असा बराच मजकूर लिहिलेला आहे. परंतु, त्या त्यांच्या लिहिण्यावर वाक्यशेषविरोध वगैरे दोष येत आहेत ७० )

तस्मात्, विषयांचा त्याग करून जो पुरुष स्पृहा, ममत्वबुद्धि आणि अहंकार ह्यांनीं रहित होऊन संचार करितो त्याला मोक्षप्राप्ति होते ॥७१॥

ज्याअर्थीं असा प्रकार आहे त्याअर्थीं जो संन्यासी पुरुष सर्व विषयांचा सर्वस्वीं त्याग करून संचार करितो ह्मणजे अर्थात् जीवन हाच व्यापार अवशिष्ट ठेवून जो पर्यटन करीत असतो आणि त्याचप्रमाणें निस्पृह, निर्मम व निरहंकार असा जो असतो त्या स्थितप्रज्ञ ब्रह्मवेत्त्या पुरुषाला सर्व संसारदुःखांचा उपरम हें जिचें लक्षण आहे अशी निर्वाण

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे साङ्ख्ययोगो नाम द्वितीयोध्यायः ॥ २ ॥

---

सैषा ज्ञाननिष्ठा स्तूयते एषा ब्राह्मी० मृच्छति ॥ ७२ ॥ एषा यथोक्ता ब्राह्मी ब्रह्मणि भवेयं स्थितिः सर्वं कर्म संन्यस्य ब्रह्मरूपेणैवावस्थानमित्येतत् । हे पार्थ नैनां स्थितिं

---

संज्ञक ह्मणजे मोक्षसंज्ञक शांति प्राप्त होते. अर्थात्, तो ब्रह्मभूत होतो. निस्पृह=शरीर कायम रहाण्याचीही ज्याला इच्छा राहिलेली नाहीं असा. निर्मम=शरीर चालण्याकरितां स्वीकारिलेल्या अन्नादिकांचे ठिकाणींही हें माझें अशी बुद्धि न ठेवणारा. निरहंकार=तत्त्वज्ञानादि कारणांमुळें स्वतःविषयीं अभिमान ज्याचे ठिकाणीं नाहीं असा ७१.

हे पार्था, ही ब्रह्मविषयक अवस्था आहे. ही प्राप्त झाली असतां पुरुषाला मोह उत्पन्न होत नाहीं आणि पुरुषाला वयाच्या शेंवटल्या भागांतही जरी ही स्थिति प्राप्त झाली तरी सुद्धां त्याला ब्रह्मरूप मोक्ष प्राप्त होतो ॥ ७२ ॥

ह्याप्रमाणें महामुनिव्यासप्रणीतलक्षग्रंथात्मकश्रीमहाभारतांतर्गत भीष्मपर्वांतील ब्रह्मविद्या आणि योगशास्त्र एतद्विषयक व श्रीकृष्णार्जुनसंवादात्मक श्रीमद्भगवद्गीतासंज्ञक उपनिषदांपैकीं सांख्ययोगनामक दुसरा अध्याय समाप्त झाला ॥ २ ॥

( संक्षेप आणि विस्तर अशा दोन्हीं प्रकारांनीं ठिकठिकाणीं दर्शविलेल्या ) त्या ह्या ज्ञानमार्गाची ‘ एषा ब्राह्मी०मृच्छति ’ ह्या श्लोकामध्यें प्रशंसा केली आहे. एषा ह्मणजे पूर्वीं सांगितलेली ही स्थिति ह्मणजे सर्व कर्म सोडून देऊन ब्रह्मरूपानें असणें ही स्थिति ब्राह्मी

**प्राप्य लब्ध्वा न विमुह्यति न मोहं प्राप्नोति स्थित्वास्यां स्थितौ ब्राह्मयां यथोक्तायामन्तकालेप्यन्ते वयस्यपि ब्रह्म-निर्वाणं ब्रह्मनिर्वृतिं मोक्षमृच्छति गच्छति किमु वक्तव्यं ब्रह्मचर्यादेव संन्यस्य यावज्जीवं यो ब्रह्मण्येवावतिष्ठते स ब्रह्मनिर्वाणमृच्छतीति॥७२॥इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीमद्भगवद्गीताभाष्ये द्वितीयोध्यायः ॥ २ ॥**

---

ह्मणजे ब्रह्माचे ठिकाणीं असणारी होय. हे पार्था, ही स्थिति प्राप्त झाली असतां पुरुषाला मोह प्राप्त होत नाहीं व ह्या वर सांगितलेल्या ब्राह्मी स्थितीमध्यें पुरुषाची शेंवटल्या वयांत ह्मणजे वार्धक्यसमयींही जरी प्रवृत्ति झाली तरी त्याला ब्रह्मनिर्वाण ह्मणजे ब्रह्मनिर्वृति अर्थात् मोक्ष प्राप्त होतो. तस्मात् , ब्रह्मचर्याश्रमानंतर ( गृहस्थाश्रमाचा स्वीकार न करितां ) संन्यास घेऊन आमरणांत जो ब्रह्माचेच ठिकाणीं लय लावून रहातो त्याला मोक्ष प्राप्त होतो; हें कशाला सांगितलें पाहिजे ? ७२

( ' एषा स्थितप्रज्ञलक्षणप्रसङ्गात्कथिता ब्राह्मी ब्रह्मशब्देनात्र ब्रह्म-विदुच्यते ब्रह्मविद्ब्रह्मैव भवतीति श्रुतेस्तस्येयं ब्राह्मी स्थितिः ' असें नील-कंठपंडितांनीं व्याख्यान केलें आहे व त्याचा अर्थ " स्थितप्रज्ञ पुरु-षाचीं लक्षणें सांगण्याच्या प्रसंगानें कथन केलेली ही ब्राह्मी स्थिति. ब्रह्म शब्दानें ह्या ठिकाणीं ब्रह्मवेत्ता असें घ्यावें. कारण, ब्रह्मवेत्ता ब्रह्मच होतो अशी श्रुति आहे. तेव्हां त्या ब्रह्मवेत्त्याची स्थिति ती ब्राह्मी स्थिति " असा आहे. परंतु, ब्रह्मशब्दाचा मुख्य अर्थ स्वीकारून वाक्यार्थ होत असतांना गौण अर्थ स्वीकारणें उचित नसल्यामुळें भाष्यकारांनीं नीलकंठपंडिताप्रमाणें कारण नसतांना आड मार्गाचें अव-लंबन केलें नाहीं. ' अन्तकालेपि ' ह्या पदांचा अर्थ ' मृत्युसमयेपि ' असा श्रीधरस्वामींनीं भाष्यविरुद्ध केलेला आहे. परंतु तो बरोबर नाहीं.

कारण, पूर्वी संस्कारही नसतांना मरणसमयीं एकाएकीं अशा प्रकारची स्थिति पुरुषाला प्राप्त होण्याचा संभव नाहीं. श्रीधरस्वामींचें हें व्याख्यान त्यांच्याच एका दुसऱ्या ह्मणण्याशींही विरुद्ध आहे. कारण, आठव्या अध्यायांतील 'यं यं वापि स्मरन्भावं' ह्या श्लोकावरील टीकेंत त्यांनीं 'यस्मात्पूर्ववासनैवान्तकाले स्मृतिहेतुर्न तु तदा विवशस्य स्मरणोद्यमः संभवति' असें ह्मटलें आहे व त्याचें तात्पर्य "पूर्ववासना हीच अंतकालीं स्मरणाला कारण होणारी आहे. ज्याच्याविषयीं पूर्ववासना नाहीं त्याच्याविषयीं तशा पराधीन स्थितीमध्यें पुरुषाच्या हातून ती पूर्ववासनारहित गोष्ट मनांत आणण्याचा प्रयत्न होणें संभवनीय नाहीं" असें आहे. तेव्हां ज्याअर्थीं पूर्ववासनेवांचून मरणसमयीं उगीच एखाद्या गोष्टीचें स्मरण होण्याचाही संभव नाहीं असें जर श्रीधरस्वामीच ह्मणत आहेत तर पूर्वसंस्कार नसतांना मरणसमयीं एकएकीं पुरुषाला ब्राह्मी स्थिति प्राप्त होण्याचा संभव नाहीं हें उघडच आहे. )

( हे अर्जुना, शोक आणि मोह ह्यांच्या अधीन होणें अशा प्रकारचा स्वभाव तुलाही योग्य नाहीं; परंतु, जीवन्मुक्त स्थितींत असणें तुला योग्य आहे. हें सुचविण्याकरितां भगवानांनीं अर्जुनाला उद्देशून 'पार्थ' हें संबोधन घातलेलें आहे ७२ )

ह्याप्रमाणें श्रीमत्परमहंसपरिव्राचकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपाद ह्यांचे शिष्य जे भगवान् श्रीमच्छंकराचार्य ह्यांनीं केलेल्या श्रीमद्भगवद्गीताभाष्यापैकीं दुसरा अध्याय समाप्त झाला ॥ २ ॥

---

शास्त्रस्य प्रवृत्तिनिवृत्तिविषयभूते द्वे बुद्धी भगवता निर्दिष्टे सांख्ये बुद्धिर्योगे बुद्धिरिति च । तत्र प्रजहाति यदा कामा-नित्यारभ्याध्यायपरिसमाप्तेः सांख्यबुद्ध्याश्रितानां संन्यासं कर्तव्यमुक्त्वा तेषां तन्निष्ठतयैव च कृतार्थतोक्ता एषा ब्राह्मी स्थितिरिति । अर्जुनाय च कर्मण्येवाधिकारस्ते मा ते सङ्गो-स्त्वकर्मणीति कर्मैव कर्तव्यमुक्तवान्योगबुद्धिमाश्रित्य न तत एव श्रेयःप्राप्तिमुक्तवान् । तदेतदालक्ष्य पर्याकुलीभूतबुद्धिर-र्जुन उवाच । कथं भक्ताय श्रेयोर्थिने यत्साक्षाच्छ्रेयः-साधनं सांख्यबुद्धिनिष्ठां श्रावयित्वा मां कर्मणि दृष्टानेका-

---

( कोणतेंही शास्त्र प्रवृत्त होण्यास प्रतिपाद्य विषय अवश्य लागत असतो. त्याप्रमाणें ) भगवान् श्रीकृष्णांनीं सांख्यसंबंधीं ह्मणजे परमार्थ-वस्तुविवेकसंबंधीं बुद्धि ( ह्मणजे ज्ञान ) आणि त्याचप्रमाणें योगसंबंधीं ह्मणजे ईश्वरप्रीत्यर्थ कर्मानुष्ठानसंबंधीं बुद्धि अशा दोन बुद्धि गीताशा-स्त्राच्या प्रवृत्तीला विषयभूत असलेल्या दुसऱ्या अध्यायामध्यें अर्जुनाला कथन केल्या. पैकीं ‘ प्रजहाति यदा कामान् ’ ह्या श्लोकापासून तों दुसरा अध्याय समाप्त होईपर्यंत सांख्यसंबंधीं बुद्धीचा आश्रय करून राहि-लेल्या पुरुषांचें संन्यास हें कर्तव्य सांगून तें तिचे ठिकाणीं निष्ठा ठेवि-ल्यानेंच कृतार्थ होतात, असें ‘ एषा ब्राह्मी स्थितिः ’ ह्या श्लोकानें सांगितलें आणि त्याचप्रमाणें योगबुद्धीचा आश्रय करून ‘ कर्मण्येवा-धिकारस्ते । मा ते सङ्गोस्त्वकर्मणि ’ इत्यादि वाक्यांनीं कर्म हेंच अर्जु-नाला भगवानांनीं कर्तव्य ह्मणून मात्र सांगितलें; परंतु, कर्मांच्याच योगानें मोक्षप्राप्ति होते असें मात्र त्यांनीं अर्जुनाला सांगितलें नाहीं. तेव्हां हें लक्ष्यांत अणून अर्जुन मनामध्यें व्याकुल झाला आणि आपल्या मनाशींच प्रश्न करूं लागला कीं, “ सांख्यबुद्धिविषयक निष्ठा हें जें मोक्षप्राप्तीचें प्रत्यक्ष साधन तें मोक्षाची इच्छा करणाऱ्या अशा

नर्थयुक्ते पारंपर्येणाप्यनैकान्तिकश्रेयःप्राप्तिफले नियुञ्ज्यादिति युक्तः पर्याकुलीभावोऽर्जुनस्य । तदनुरूपश्च प्रश्नो ज्यायसी चेदित्यादिः । प्रश्नापाकरणवाक्यं च भगवतोक्तं यथोक्तविभागविषये शास्त्रे । केचित्त्वर्जुनस्य प्रश्नार्थमन्यथा कल्पयित्वा तत्प्रतिकूलं भगवतः प्रतिवचनं वर्णयन्ति यथा चात्मना संबन्धग्रन्थे गीतार्थो निरूपितस्तत्प्रतिकूलं चेह पुनः प्रश्नप्रतिवचनयोरर्थं निरूपयन्ति । कथं तत्र संबन्धग्रन्थे तावत्स-

---

दुसऱ्या भक्ताला सांगून हा भगवान् श्रीकृष्ण धडधडीत अनेक अनर्थ ज्याच्यामध्यें आहेत आणि परंपरेनेंही ज्याचें मोक्षप्राप्तिरूप फल निश्चित नाहीं अशा कर्माचे ठिकाणीं माझी कशी योजना करील ? " असें अर्जुनाला वाटल्यामुळें त्याचें मन गोंधळून जाणें साहजिकच आहे आणि त्या स्थितीला अनुरूप असाच त्याचा ' ज्यायसी चेत्कर्मणस्ते' इत्यादि प्रकारचा प्रश्न आहे व ह्या प्रश्नाचें निरसन करणारें वाक्यही, ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा ही पूर्वोक्त विभागव्यवस्था दर्शविणाऱ्या शास्त्रामध्यें ( अर्थात् " एषा तेभिहिता सांख्ये " इत्यादि प्रकारानें ), भगवानांनीं दर्शविलें आहे.

परंतु, कांहीं लोक ( ह्मणजे वृत्तिकार ) अर्जुनाच्या प्रश्नाचा भलताच अर्थ करून त्याला प्रतिकूल असें भगवानांचें उत्तर असल्याचें दर्शवितात. इतकेंच नव्हे परंतु, उपोद्घातामध्यें जो गीताशास्त्राचा आशय ह्मणून त्यांनीं स्वतः सांगितला आहे त्यालाच विरुद्ध असा ह्या तिसऱ्या अध्यायांतील प्रश्नोत्तरांचा अर्थ ते करीत आहेत. उपोद्घातामध्यें ह्यांनीं जो गीताशास्त्राचा उद्देश दर्शविला आहे त्याला विरुद्ध असा प्रश्नोत्तरांचा अर्थ ह्या तिसऱ्या अध्यायामध्यें ह्यांनीं कसा केला आहे ह्मणून विचाराल तर सांगतों. त्या वृत्तीमध्यें जो उपोद्घातविषयक ग्रंथ आहे त्यांत " ( ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि यति ह्यां-

वेषामाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयो गीताशास्त्रे निरूपितोऽर्थ इत्युक्तं पुनर्विशेषितं च यावज्जीवं श्रुतिचोदितानि कर्माणि परित्यज्य केवलादेव ज्ञानान्मोक्षः प्राप्यत इत्येतदेकान्तेनैव प्रतिषिद्धमितीह त्वाश्रमविकल्पं दर्शयता यावज्जीवश्रुतिचोदितानामेव कर्मणां परित्याग उक्तः। तत्कथमीदृशं विरुद्धमर्थमर्जुनाय ब्रूयाद्भगवाञ्छ्रोता वा कथं विरुद्धमर्थमवधा-

---

पैकीं ) कोणत्याही आश्रमाचें अवलंबून करणाऱ्या पुरुषाला मोक्षाचें साधन ह्मणजे ज्ञान आणि कर्म ह्यांची सांगड हीच गोष्ट गीताशास्त्रामध्यें सांगितलेली आहे " असें ह्मटलें आहे. इतकेंच नव्हे परंतु, जिवांत जीव आहे तोंपर्यंत अग्निहोत्र चालवावें इत्यादि अर्थाच्या श्रुतींनीं विहित असलेल्या कर्मांचा त्याग करून एकट्याच ज्ञानाच्या योगानें मोक्ष प्राप्त होतो हें तर सर्वस्वींच निषिद्ध आहे असें आणखी वर ह्मणून ठेविलें आहे, आणि ह्या ठिकाणीं तर आश्रमविकल्प दर्शविणाऱ्या त्यांनींच यावज्जीवकर्मबोधक श्रुतिवाक्यांनीं विहित असलेल्याच कर्मांचा त्याग सांगितलेला आहे. तेव्हां ह्यांचें ह्मणणें जर खरें धरिलें तर अनर्थ होत आहे. कारण, अशा प्रकारची विरुद्ध गोष्ट भगवान् अर्जुनाला सांगतील तरी कशी ? आणि त्याचप्रमाणें त्यांचा उपदेश श्रवण करणारा अर्जुन तरी असली पूर्वापरविरुद्ध गोष्ट ऐकून घेईल कशी ?

( मोक्षाचें प्रत्यक्ष साधन भगवानांनीं इतरांना सागितलें आणि मला मात्र कर्मच करीत रहाण्याविषयीं उपदेश केला असें मनांत आणून व्याकुल झालेला अर्जुन त्यांना तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं प्रश्न करीत आहे. असा ह्या अध्यायाचा पूर्वींच्या अध्यायाशीं आपल्या मताप्रमाणें भाष्यकारांनीं वर दर्शविल्याप्रमाणें संबंध सांगितला आणि आतां ' केचित्त्वर्जुनस्य ' येथपासूनच्या ग्रंथानें वृत्तिकारांचा अभिप्राय बरोबर नाहीं असें भाष्यकार दर्शवीत आहेत. वृत्तिकारांच्या मताप्रमाणें

ज्ञान आणि कर्म ह्या दोहोंचा समुच्चय ह्मणजे मिलाफ मोक्षप्राप्तीचें साधन आहे, हें निश्चित करण्याकरितां अर्जुनानें भगवानांना प्रश्न केला असें जर मानिलें तर ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें मुख्य साधन आहे अशाच अर्थाचें भगवानांनीं प्रत्युत्तर देणें योग्य आहे; परंतु, भगवानांनीं त्याप्रमाणें अर्जुनाच्या प्रश्नाला उत्तर दिलेलें नाहीं. तेव्हां ज्ञान व कर्म ह्यांच्या समुच्चयाला अनुलक्षून प्रश्न आहे असें मानिलें तर प्रश्नाचें उत्तर समुच्चय विषयक नसल्यामुळें वृत्तिकारांच्या मताप्रमाणें चाललें असतां प्रश्न आणि प्रत्युत्तर ह्यामध्यें परस्पर विरोध येतो. हा ' केचित्त्वर्जुनस्य ०वर्णयन्ति ' ह्या भाष्याचा आशय होय. शिवाय दुसरें असें कीं, वृत्तिकारांच्या मताचें अवलंनब केलें असतां अर्जुनाचा प्रश्न आणि भगवानांचें उत्तर ह्यामध्यें परस्पर विरोध येणें येवढाच दोष त्या व्याख्यानावर येऊन रहात नाहीं; परंतु, दुसराही एक दोष येत आहे. कारण, वृत्तिकारांनीं पूर्वीं जें लिहिलें आहे त्याच्याशींच त्यांच्या ह्या अध्यायांतील लिहिण्याचा विरोध येतो तो कसा हें पहा. वृत्तिकारांनीं गीताशास्त्राच्या आरंभीं जो उपोद्घात लिहिला आहे त्या उपोद्घातामध्यें गीताशास्त्रांतील उद्देश एक सांगितला असून त्याला विरुद्ध असा ह्या अध्यायांतील प्रश्नोत्तरांचा अर्थ ते करीत आहेत. हा ' यथा० निरूपयन्ति ' ह्या भाष्याचा अभिप्राय होय. उपोद्घातांत दर्शविलेल्या गीताशास्त्राच्या उद्देशाशीं ह्या तिसऱ्या अध्यायांतील प्रश्नोत्तरांचा अर्थ ते विरुद्ध कसा करीत आहेत ह्मणून विचाराल तर सांगतो. त्या वृत्तीमध्यें आरंभीं असलेल्या उपोद्घातांत " कोणत्याही आश्रमाचें अवलंबन करणाऱ्या पुरुषाला मोक्षप्राप्तीचें साधन ह्मणजे ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय ह्याच गोष्टीचें गीताशास्त्रामध्यें निरूपण केलेलें आहे " असें सांगितलें आहे. आतां सर्वकर्मसंन्यासपूर्वक अशा केवल ज्ञानाच्याच योगानें मोक्षप्राप्ति होते असा गीताशास्त्रांतील सिद्धांत असल्यामुळें वृत्तिकारांना वस्तुतः पाहिलें असतां समुच्चय विवक्षित नाहीं,

असें जर कोणी ह्मणेल तर तेंही बरोबर नाहीं. कारण, सर्वकर्मसंन्यास-पूर्वक अशा केवल अल्प ज्ञानानेंच मोक्षप्राप्ति कधींही होत नाहीं. परंतु, अग्निहोत्रप्रभृति कर्मांसहवर्तमान ज्ञानाच्या योगानें मोक्षप्राप्ति होते हीच गोष्ट येथून तेथून सर्व गीताशास्त्रामध्यें सिद्ध केलेली आहे, असा त्यांनीं आपल्या उपोद्घातांत गीताशास्त्राचा उद्देश स्पष्ट दर्शविला असून यावज्जीवकर्मविधायक श्रुतींनीं विहित असलेल्या कर्मांचा त्याग करून केवल ज्ञानानें मोक्षप्राप्ति होते हें मत निःसंशय सदहूं श्रुतिवाक्यांनीं बाधित असल्यामुळें स्वीकारण्यास योग्य नाहीं, असें त्यांनीं आणखी वर ह्मणून ठेविलें आहे. तेव्हां वृत्तिकारांना ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय विवक्षित नव्हता असे ह्मणतां येत नाहीं. हे ' कथं तत्र० प्रतिषिद्ध-मिति ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. प्रथमतः उपोद्घातामध्यें " ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें मुख्य साधन आहे, हा गीताशास्त्रांतील प्रतिपाद्य विषय होय. " अशी वृत्तिकारांनीं प्रतिज्ञा केली असून " यावज्जीवकर्मविषयक श्रुतीशीं विरोध येत असल्यामुळें श्रौतकर्मांचा परित्याग होणें संभवनीयच नाहीं " असें ह्मटलें आहे आणि ह्या तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं संन्याशांनीं ज्ञानमार्गाचें अवलंबन करून कर्मठ गृहस्थांनीं कर्ममार्गाचें अवलंबन करावें असा आश्रमविभाग दर्शविला आहे. तेव्हां कोणत्याही आश्रमांतील पुरुषाला कर्माचा त्याग करितां येत नाहीं असें प्रथम ज्याअर्थीं सांगितलें आहे आणि ज्याअर्थीं संन्यासी आणि कर्मी असा आश्रमविभाग ह्या अध्यायांत दर्शविला आहे त्याअर्थीं वृत्तिकारांच्या लिहिण्यांत पूर्वापर विरोध येतो ही गोष्ट सहज सिद्ध होत आहे. हा ' इह त्वाश्रमविकल्पं० परित्याग उक्तः ' ह्या भाष्याचा सारांश होय. आतां भगवानांनीं जसें गीतेमध्यें सांगितलें तसेंच वृत्तिकारांनीं स्पष्ट करून दाखविलें. तेव्हां, भगवानांच्या सांगण्यांतच जर परस्परविरोध असेल तर त्यांचें ह्मणणें जसें असेल तसें स्पष्ट करून दाखविणाऱ्या वृत्तिकारांचा ह्यांत काय अपराध आहे ? अशी कोणी शंका करील

**रयेत् । तत्रैतत्स्याद्गृहस्थानामेव श्रौतकर्मपरित्यागेन केवला-देव ज्ञानान्मोक्षः प्रतिषिध्यते न त्वाश्रमान्तराणामित्येतदपि पूर्वोत्तरविरुद्धमेव । कथं सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयो गीताशास्त्रे निश्चितोर्थ इति प्रतिज्ञायेह कथं तद्विरुद्धं केवलादेव ज्ञानान्मोक्षं ब्रूयादाश्रमान्तराणाम् । अथ मतं श्रौत-**

---

परंतु ती अगदींच अयोग्य आहे. कारण, जो साक्षात् षड्गुणैश्वर्यसंपन्न आहे त्याला पूर्वी सांगितल्याचें भान राहिलें नाहीं व अर्जुनाच्याही हें लक्ष्यांत आलें नाहीं अशी कल्पना करणें अगदींच अयोग्य आहे हा "तत्कथमीदृशं०मवधारयेत्" ह्या भाष्याचा आशय होय. )

आतां श्रौतकर्मांचा त्याग करून केवल ज्ञानाच्या योगानें गृहस्थांना मात्र मोक्षप्राप्ति होत नाहीं; परंतु इतर आश्रमांत राहणाऱ्यांना होत नाहीं असें नाहीं असा वृत्तिकारांचा आशय आहे. असें जरी कोणी ह्मणेल, तरी सुद्धां वृत्तिकारांचें ह्मणणें पूर्वापरविरुद्ध होतेंच. कसें ह्मणाल तर सांगतों. "कोणत्याही आश्रमाचें अवलंबन करणाऱ्या पुरुषाला ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय हेंच मोक्षाचें साधन होय ही गोष्ट गीताशास्त्रांत सिद्ध केली आहे" अशी प्रथमतः उपोद्घातामध्यें प्रतिज्ञा करून "गृहस्थव्यतिरिक्त इतर तीन आश्रमी पुरुषांना केवल ज्ञानानेंच मोक्षप्राप्ति होते." असें ह्या तिसऱ्या अध्यायामध्यें उपोद्घाताशीं विरुद्ध वृत्तिकार कसें सांगतील ?

( परिपक्व ज्ञान झालें नसतांना केवल वर वर झालेल्या आत्मज्ञानाच्या योगानें मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्या गृहस्थांना मात्र "जिवांतजीव आहे तोंपर्यंत अग्निहोत्र होम करावा इत्यादि वेदवाक्यांनीं विहित असलेल्या अग्निहोत्रादि श्रौतकर्मांचा त्याग करून मोक्षप्राप्ति होणार नाहीं. कारण, यावज्जीवकर्मबोधक वेदवाक्यांनींच त्याचा बाध होत आहे. करितां, गृहस्थांना केवल आत्मज्ञानाच्या योगानें मोक्षप्राप्ति

कर्मापेक्षयैतद्वचनं केवलादेव ज्ञानाच्छ्रौतकर्मरहिताद्गृहस्थानां मोक्षः प्रतिषिध्यत इति। तत्र गृहस्थानां विद्यमानमपि स्मार्तं कर्माविद्यमानवदुपेक्ष्य ज्ञानादेव केवलादित्युच्यत इति। एतदपि विरुद्धम्। कथम्। गृहस्थस्यैव स्मार्तकर्मणा समु-

---

होणार नाहीं; इतर आश्रम्यांना होईल. असा वृत्तिकारांचा आशय आहे. सारांश, मोक्षप्राप्तीला स्वरूपतःच कर्मत्यागाचा अथवा केवळ ज्ञानापासून मोक्षप्राप्तीचा निषेध आहे असें वृत्तिकार ह्मणत नाहींत. हा वृत्तिकारांच्या उपोद्घातांतील आशय आहे आणि ह्या तिसऱ्या अध्यायामध्यें गृहस्थव्यतिरिक्त जे कर्मत्यागी इतर तीन आश्रमांतील पुरुष त्यांना मात्र आत्मज्ञानाच्या योगानें मोक्षप्राप्ति होत असल्याचें विवक्षित आहे. तस्मात्, कर्मत्यागाचा निषेध गृहस्थांना सांगितला असल्यामुळें आणि इतर तिन्ही आश्रमांतील पुरुषांना कर्मत्यागाची अनुज्ञा असल्यामुळें वृत्तिकारांच्या लिहिण्याला पूर्वापर विरोध येत नाहीं. अशा रीतिनें जर कोणी वृत्तिकारांच्या लिहिण्यावर येत असलेल्या विरोधदोषाचें निरसन करूं लागेल तरी सुद्धां वस्तुतः विरोधदोष नाहींसा होतच नाहीं. हा " तत्रैतस्या० पूर्वोत्तरविरुद्धमेव " ह्या भाष्याचा आशय होय. )

आतां श्रौतकर्मरहित अशा केवल ज्ञानाच्याच योगानें गृहस्थांना मोक्षप्राप्ति होत नाहीं. हें ह्मणणें, श्रौत कर्म गृहस्थांनीं अवश्य केलें पाहिजे, अशा अभिप्रायानें आहे; आणि त्या ह्मणण्यांत गृहस्थांना उद्देशून जें ज्ञानाचें केवलत्व सांगितलें आहे तें स्मार्त कर्म विद्यमान असूनही तें नसल्यासारिखें समजून सांगितलें आहे. असें जर तुमचें मत असेल तर तेंही बरोबर नाहीं.

( श्रौत कर्माचें अनुष्ठान गृहस्थांना अवश्य आहे हें दर्शविण्याच्या उद्देशानें केवल आत्मज्ञानापासून गृहस्थांना मोक्षप्राप्ति नाहीं असें वृत्ति-

कारांनीं सांगितलें आहे. केवळ ज्ञानानें प्राप्त होणारा मोक्ष गृहस्थांना मात्र प्राप्त होत नाहीं व इतरांना मात्र प्राप्त होतो, असें सांगण्याचा वृत्तिकारांचा आशय नाहीं. कारण, गृहस्थव्यतिरिक्त इतर आश्रमी पुरुषांनाही मोक्षप्राप्तीला श्रौतकर्मांची जरी जरूरी नाहीं तरी स्मार्तकर्मांची सांगड असावी लागतेच; असें धरून चाललें तर हा ' अथ मतं० प्रतिषिध्यत इति ' ह्या भाष्याचा आशय होय. अहो, श्रौतकर्मरहित अशा केवल ज्ञानानें गृहस्थांना मोक्षप्राप्ति होत नाहीं, हें ह्मणणें श्रौतकर्माला अनुलक्षून आहे, असें जें मत तें मुळीं बरोबरच नाहीं. कारण, गृहस्थांना श्रौतकर्म नाहीं असें जरी घटकाभर धरून चाललें तरी स्मार्तकर्म आहेच आहे. तेव्हां, एक श्रौत कर्म सोडिलें असतांही स्मार्तकर्म अवशिष्ट असल्यामुळें श्रौतकर्मरहित अशा केवल ज्ञानानें गृहस्थांना मोक्षप्राप्ति होत नाहीं, हें ह्मणणें बरोबर होतच नाहीं. तेव्हां, वृत्तिकारांची पडलेली बाजू उचलून धरण्याकरितां तुह्मांला जर पुढें यावयाचें असेल तर श्रौत आणि स्मार्त ह्या कर्मांना अनुलक्षून वृत्तिकारांनीं केवल ज्ञानानें गृहस्थांना मोक्षप्राप्तीचा निषेध सांगितला असा वृत्तिकारांचा आशय तुह्मांला ओढून ताणून काढिला पाहिजे. अशी वृत्तिकारांच्या बाजूनें चालणाऱ्यांवर कोटी येईल, परंतु, तिचें निरसनही थोडक्यांत आहे. कारण, गृहस्थांना श्रौतकर्म मुख्य आहे तेव्हां, तें मुख्य कर्म नाहींसें झालें असतां स्मार्त कर्म जरी अवशिष्ट राहिलें तरी श्रौतापेक्षां तें गौण असल्यामुळें असूननसून सारखेंच आहे असें समजून वृत्तिकारांनीं श्रौतकर्मरहित अशा केवल ज्ञानाच्या योगानें गृहस्थांना मोक्षप्राप्ति होत नाहीं, असें सांगितलें आहे. हें ' तत्र गृहस्थानां ० त्युच्यत इति ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. )

हेंही विरुद्धच आहे. कारण, स्मार्त कर्म आणि ज्ञान ह्याच केवळ

**विवेकिभिः शक्यमवधारयितुम् । किं च यदि मोक्षसाधनत्वेन स्मार्तानि कर्माण्यूर्ध्वरेतसां समुच्चीयन्ते तथा गृहस्थ-**

---

दोहोंच्या समुच्चयानें गृहस्थांना मात्र मोक्षप्राप्ति होत नाहीं; परंतु, इतर आश्रम्यांना ही गोष्ट लागू नाहीं. अशी विचारी मनुष्यांची समजूत होणें शक्य तरी कसें ?

( " श्रौत कर्म गृहस्थांना मुख्य आहे; तेव्हां त्याचाच अभाव झाला असतां स्मार्त कर्म असलें काय आणि नसलें काय त्यांत कांहीं मोठासा मतलब नाहीं. असें समजून वृत्तिकारांनीं श्रौतकर्मरहित अशा केवल ज्ञानाच्या योगानें गृहस्थांना मोक्षप्राप्ति होत नाहीं असा निषेध सांगितला आहे व तें त्यांचें सांगणें ह्या दृष्टीनें योग्यही आहे " असें जें वृत्तिकाराची बाजू उचलणाराचें ह्मणणें तेंही बरोबर नसून विरुद्धच आहे. कारण, गृहस्थांना श्रौत कर्म मुख्य आहे आणि इतरांना नाहीं; असें धरून चाललें असतां गृहस्थांना मात्र श्रौतस्मार्तकर्मासहवर्तमान ज्ञान मुक्तीला कारणीभूत होतें. श्रौत कर्म त्यांना मुख्य असल्यामुळें तें जर नसलें तर केवल स्मार्तकर्मासहवर्तमान ज्ञानानें त्यांना मुक्ति होत नाहीं; परंतु, इतर आश्रम्यांना श्रौत कर्म मुख्य नसल्यामुळें केवल स्मार्त कर्मानें युक्त जें ज्ञान त्या ज्ञानाच्या योगानें त्यांना मोक्षप्राप्ति होण्याला अडचण पडत नाहीं; असा विभाग मानावा लागेल. परंतु, असा विभाग मानण्याचें कांहीं योग्य कारण नसल्यामुळें तुमच्या ह्या स्वकपोलकल्पित विभागव्यवस्थेनें विचारी पुरुषांचें समाधान होणें शक्य नाहीं. हें ' एतदपि विरुद्धम् । कथं गृहस्थस्यैव० शक्यमवधारयितुम् । ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. )

दुसरें असें कीं, ऊर्ध्वरेत्या पुरुषांना ह्मणजे गृहस्थव्यतिरिक्त इतर तीन आश्रमी पुरुषांना मोक्षसाधन ह्मणून ज्ञानाबरोबर केवल स्मार्त कर्मांचीच जर अवश्यकता असेल तर त्याच न्यायानें गृहस्थालाही मोक्षसाधन

**स्यापीष्यतां स्मार्तैरेव समुच्चयो न श्रौतैः । अथ श्रौतैः स्मार्तैश्च गृहस्थस्यैव समुच्चयो मोक्षायोर्ध्वरेतसां तु स्मार्तकर्ममात्रसमुच्चिताज्ज्ञानान्मोक्ष इति । तत्रैवं सति गृहस्थस्यायासबाहुल्याच्छ्रौतं स्मार्तं च बहुदुःखरूपं कर्म शिरस्यारोपितं स्यात् । अथ गृहस्थस्यैवायासबाहुल्यकारणान्मोक्षः स्यान्नाश्रमान्तराणां श्रौतनित्यकर्मरहितत्वादिति तदप्यसत् । सर्वोपनिषत्स्वितिहासपुराणयोगशास्त्रेषु च ज्ञानाङ्गत्वेन**

---

ह्मणून ज्ञानाबरोबर स्मार्त कर्मांचीच अवश्यकता असावी. ज्ञानाबरोबर श्रौत कर्मेंही मोक्षसाधन ह्मणून गृहस्थाला अवश्य असण्याचें कारण नाहीं. सारांश, मोक्षप्राप्ति होण्याकरितां श्रौत आणि स्मार्त ह्या दोन्ही कर्मांची ज्ञानाशीं जोड असणें गृहस्थाला मात्र अवश्य आहे आणि इतर तिन्ही आश्रम्यांना फक्त स्मार्त कर्मांचीच ज्ञानाला जोड असली ह्मणजे मोक्षप्राप्ति होते; असें जर मानिलें तर दोन्ही कर्मांचें अनुष्ठान चालविण्यांत आयास फार असल्यामुळें बिचाऱ्या गृहस्थाच्या डोक्यावर श्रौत व स्मार्त कर्म ह्मणजे हें एक अनेकदुःखरूप ओझेंच विनाकारण लादल्यासारिखें होणार आहे.

( श्रौतस्मार्तकर्मांसहवर्तमान ज्ञान गृहस्थांना मोक्षप्राप्तीला अवश्यक असून इतर आश्रम्यांना मोक्षप्राप्ति होण्यास फक्त स्मार्त कर्म आणि ज्ञान असलें ह्मणजे पुरें आहे; असा ऐच्छिक विभाग मानण्याला कांहीं कारण दिसत नाहीं, हें तर सिद्धच आहे; इतकेंच नव्हे परंतु, असा पक्षपात न मानण्याविषयीं मात्र एक सयुक्तिक कारण आहे. हा, भाष्यांतील ‘ किं च ’ ह्या पदांचा आशय होय. )

आतां आयास पुष्कळ ह्या कारणामुळें गृहस्थालाच मोक्षप्राप्ति होण्याचा संभव असून इतर आश्रम्यांना श्रौत असें जें नित्य कर्म त्याचा अभाव असल्यामुळें मोक्षप्राप्ति होण्याचा संभव नाहीं असें ह्मणावें तर

**मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानादाश्रमविकल्पसमुच्चयविधा-नाच्च श्रुतिस्मृत्योः । सिद्धस्तर्हि सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः**

---

तेंही अयोग्यच आहे. कारण, सर्व उपनिषदें, इतिहास, पुराणें आणि योगशास्त्र ह्या सर्वांमध्यें मुमुक्षूला ज्ञानाच्या अंगभूत ह्मणून सर्वकर्म-संन्यासाचें विधान केलेलें आहे आणि श्रुतिस्मृतींमध्यें मोक्षप्राप्तीला आश्रमविकल्प अथवा आश्रमसमुच्चय सांगितलेला आहे.

( फलाधिक्य साधनाधिक्यावर अवलंबून असतें असा न्याय आहे. तेव्हां, श्रौत आणि स्मार्त असें जें अनेक प्रकारचें कर्म त्याचें अनुष्ठान होण्यास फारच क्लेश पडत असतात. करितां, श्रौतस्मार्तकर्मनिष्ठ गृह-स्थाचे ठिकाणीं आयासरूप साधनाचें आधिक्य असल्यामुळें मोक्षप्राप्ति-ही गृहस्थाला होणारच होणार; इतर आश्रमांना नाहींच होणार. कारण, " जिवांत जीव आहे तोंपर्यंत अग्निहोत्र होम करावा " इत्यादि प्रकारच्या श्रुतींनीं विहित असलेलें जें नित्य कर्म त्यांचा इतर आश्रम्यांचे ठिकाणीं अभाव आहे. तेव्हां, न्यायदृष्टीनें पाहूं गेलें असतां गृहस्थाला मोक्ष प्राप्त होणारच, हें निर्विवाद ठरत असून इतर आश्रम्यांना मोक्ष-प्राप्ति होणार नाहीं हें उघडच होत आहे. हें ' अथ० त्वादिति ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. गृहस्थाला मोक्षप्राप्ति होणारच व इतर आश्र-म्यांना नाहींच होणार; हें ह्मणणेंही अयोग्यच आहे. कारण, उपनिषदें, इतिहास, पुराण, योगशास्त्र इत्यादिकांशीं विरुद्ध येणारा जो न्याय तो सर्वस्वीं त्याज्यच आहे. आतां सर्व आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम श्रेष्ठ मानिला असल्यामुळें श्रुतिविहित अग्निहोत्रादि कर्में ज्यांच्या हातून होण्याचा संभव नाहीं असे जे अंधप्रभृति लोक त्यांच्याकरितां कर्मसंन्यास सांगि-तलेला आहे असें ह्मणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण, अग्निहोत्रादि श्रौतकर्मांना अनधिकृत असे जे अंधळे वगैरे त्यांना उद्देशून संन्यास सांगितला आहे असें ह्मणतां येत नाहीं. कारण, संन्यासाला श्रवण,

**समुच्चयः । न मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानात् । व्युत्थायाथ**

मनन वगैरे अवश्यक आहे, आणि बहिरे अंधळे वगैरे जे लोक त्यांचे ठिकाणीं श्रवणमननादिकांचा संभव असणें अशक्य आहे. तेव्हां बहिरे, अंधळे इत्यादिकांकरितां कर्मसंन्यासाचें विधान केलेलें नाहीं आणि गृहस्थाश्रम सर्व आश्रमांमध्यें श्रेष्ठ आहे ही गोष्ट विचाराअंती सिद्धही होत नाहीं. शिवाय, ब्रह्मचर्याचे ठिकाणीं निष्ठा असल्यास संकल्पपूर्वक आजन्मपर्यंत त्याच आश्रमामध्यें रहावें. त्याच आश्रमांत यावज्जीव राहण्याची इच्छा नसल्यास समावर्तन कर्मानें तो ब्रह्मचर्याश्रम समाप्त करून गृहस्थाश्रम स्वीकारावा. गृहस्थाश्रमांत शेंवटपर्यंत राहण्याची इच्छा नसल्यास वानप्रस्थाश्रमाचें अवलंबन करावें आणि वानप्रस्थाश्रमांत आजन्म राहण्याची इच्छा नसेल तर चतुर्थाश्रम स्वीकारावा. किंवा वैराग्य झाल्यास ब्रह्मचर्याश्रम समाप्त करून मधल्या दोन्ही आश्रमांचें अवलंबन न करितां एकदम चतुर्थाश्रमाचा परिग्रह करावा. ब्रह्मचर्याश्रम समाप्त करून गृहस्थाश्रम घेतल्यावर वैराग्य प्राप्त झालें असतां वानप्रस्थाश्रमाचें अवलंबन न करितां संन्यास स्वीकारावा आणि वानप्रस्थामध्यें गेल्यावर दृढ वैराग्य उत्पन्न झालें असतां त्या आश्रमांत आजन्म न राहतां वैराग्य होतांक्षणीं चतुर्थाश्रमाचा परिग्रह करावा. असें जाबाल श्रुतीमध्यें सांगितलें असल्यामुळें आणि ज्या आश्रमाची इच्छा होईल त्यामध्यें रहावें अशीही स्मृति असल्यामुळें आश्रम एक, दोन, तीन अथवा चारी करावेत, असें स्पष्ट होत आहे आणि ह्मणूनच गृहस्थाश्रमाचें प्राधान्य मानितां येत नाहीं. हा ‘ तदप्यस ० श्रुतिस्मृत्योः ’ ह्या भाष्याचा आशय होय. )

तर मग कोणत्याही आश्रमाचें अवलंबन करणाऱ्याला ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय हें मोक्षप्राप्तीचें साधन ठरलेंच ह्मणावयाचें असें ह्मणणेंही बरोबर होणार नाहीं. कारण, पुढील श्रुतिस्मृतींमध्यें सर्व

भिक्षाचर्यं चरन्ति । तस्मान्न्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुः । न्यास एवात्यरेचयदिति । न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुरिति च । ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेदित्याद्याः । त्यज धर्ममधर्मं च उभे सत्यानृते त्यज । उभे सत्यानृते त्यक्त्वा येन त्यजसि तत्त्यज । संसारमेव निःसारं दृष्ट्वा सारदिदृक्षया । प्रव्रजन्त्यकृतोद्वाहाः परं वैराग्यमाश्रिता इति बृहस्पतिः । कर्मणा बध्यते जन्तुर्विद्यया च विमुच्यते । तस्मात्कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिन इति शुकानुशासनम् । इहापि

---

कर्मांचा त्याग करावा असें सांगितलें आहे. " पुत्रादिविषयक इच्छांपासून पराङ्मुख होऊन भिक्षाचरणाचें अर्थात् संन्यासाचें अवलंबन करावें; ह्या सत्यावलंबनप्रभृति तपामध्यें संन्यास हें तप श्रेष्ठ आहे; कर्मापेक्षां संन्यासच श्रेष्ठ आहे; कर्म, प्रजा अथवा धन हीं जीं पितृलोकादिलोकप्राप्तीचीं साधनें त्यांचा त्याग करून संसारापासून विरक्त झालेल्या मुमुक्षूंना सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञानानेंच मोक्ष प्राप्त झाला; ब्रह्मचर्य समाप्त करून संन्यासच घ्यावा " इत्यादि प्रकारच्या श्रुति आहेत आणि " धर्म व अधर्म ह्यांचा त्याग कर; सत्य आणि असत्य हीं दोन्ही सोडून दे आणि हीं दोन्हीं सोडिल्यावर ज्याच्या योगानें धर्मादिकांचा तूं त्याग करीत आहेस त्याचा ( ह्मणजे मीं धर्माधर्मादिकांचा त्याग केला अशा रीतीचा जो अभिमान त्याचा ) ही तूं त्याग कर; ब्रह्मचर्याश्रमामध्यें असतांनाच परम वैराग्य प्राप्त झालेले लोक संसारांत कांहींएक सार नाहीं असें अवलोकन करून तें पहाण्याच्या उद्देशानें विवाह न करितांच संन्यास घेतात. " असें बृहस्पतींनीं सांगितलें आहे व " कर्मानें जीव बद्ध होत असून ज्ञानाच्या योगानें मुक्त होत असतो; तस्मात्, परिणामाकडे दृष्टि देणारे यति कर्म करीत नाहींत " अशी शुकाचार्यांचीही आज्ञा आहे; शिवाय, ह्या भगवद्गीतेमध्येंही ( पांचव्या अध्यायांत)

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्येत्यादि। मोक्षस्य चाकार्यत्वान्मुमुक्षोः कर्मानर्थक्यम् । नित्यानि प्रत्यवायपरिहारार्थमनुष्ठेयानीति चेन्न। असंन्यासिविषयत्वात्प्रत्यवायप्राप्तेः। न ह्यग्निकार्याद्यकरणात्संन्यासिनः प्रत्यवायः कल्पयितुं शक्यो यथा ब्रह्मचारिणामसंन्यासिनामपि कर्मिणाम् । न तावन्नित्यानां कर्मणामभावादेव भावरूपस्य प्रत्यवायस्योत्पत्तिः कल्पयितुं शक्या कथमसतः सज्जायेतेत्यसतः सज्जन्मासंभवश्रुतेः। यदि**

---

" मनःपूर्वक सर्व कर्मांचा त्याग करून " वगैरे सांगितलें आहे. मोक्ष हें कार्य नसल्यामुळेंही मुमुक्षूला कर्म निरर्थक असल्याचें सिद्ध आहे.

( ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि संन्यास हे चारी आश्रम जर श्रुतिस्मृतिमूलकच आहेत तर प्रत्येक आश्रमांमध्यें जें कांहीं कर्म सांगितलेलें असेल तें कर्म आणि ज्ञान मोक्षाचें साधन ही गोष्ट सिद्धच आहे. हें ' सिद्धस्तर्हि० समुच्चयः ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. ' मोक्षस्य चाकार्यत्वान्मुमुक्षोः कर्मानर्थक्यम् । ' ह्या भाष्यांतील चकाराचा आशय " दिलेल्या श्रुतिस्मृतीवरून मुमुक्षूला सर्वकर्मत्याग अवश्य असल्याचें सिद्धच आहे आणि " असा आहे. )

आतां प्रत्यवाय न लागावा एतदर्थ नित्य कर्मे करावीं असें ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण, जो संन्यासी नसेल त्याला अकरणीं प्रत्यवाय लागेल. अग्निकार्य वगैरे न केल्यामुळें संन्यास न घेतलेल्या कर्मठ ब्रह्मचाऱ्यांना ज्याप्रमाणें प्रत्यवाय लागेल त्याप्रमाणें संन्याशांना प्रत्यवाय लागेल अशी कल्पना करणें योग्य होणार नाहीं. शिवाय, अभावापासून भावाची उत्पत्ति कशी होईल अशा अर्थाची अभावोत्पत्तीच्या असंभवाविषयीं श्रुति असल्यामुळें नित्य कर्मांच्या अभावापासूनच भावरूप प्रत्यवाय उत्पन्न होतो अशी कल्पना करणें शक्य नाहीं.

( विहित कर्म न केल्यानें, निषिद्धाचें आचरण केल्यानें आणि विष-

विहिताकरणादसंभाव्यमपि प्रत्यवायं ब्रूयाद्वेदस्तदानर्थकरो

यांचे ठिकाणीं आसक्ति ठेविल्यानें पुरुषाला पातित्य प्राप्त होतें; तस्मात्, मुमुक्षु जरी झाला तरी विहित कर्म न केल्यामुळें लागणारा जो प्रत्यवाय त्याच्या निवृत्तीकरितां त्याला हें नित्य कर्म केलेंच पाहिजे; असें जर कोणी ह्मणेल तर तें बरोबर होणार नाहीं. हें 'नित्यानि० चेन्न,' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. कारण, जें कर्म ज्याला विहित आहे त्याला तें न झालें असतां प्रत्यवाय लागतो; ज्याला ज्या कर्माचा अधिकार नाहीं त्याला तें हातून न झाल्याबद्दल प्रत्यवायही लागण्याचा संभव नाहीं. सारांश, मुमुक्षूला सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञान हेंच मोक्षप्राप्तीचें साधन असल्यामुळें नित्य कर्म न केल्यानें त्याला प्रत्यवाय लागण्याचा संबंध नाहीं. कर्मसंन्यासाचा ज्याला अधिकार नाहीं अशा पुरुषाला नित्य कर्म हातून न झाल्यामुळें प्रत्यवाय लागणार आहे. हा 'असंन्यासि० प्राप्तेः' ह्या भाष्याचा आशय होय. तात्पर्य, अग्निकार्य, अध्ययन वगैरे ब्रह्मचाऱ्याला विहित आहे. तेव्हां, त्यानें जर तें न केलें तर त्याला प्रत्यवाय लागेल; संन्याशाचें अग्निकार्य, अध्ययन वगैरे विहित कर्मच नाहीं आणि ह्मणूनच तें न केल्याबद्दल त्याला प्रत्यवायही लागण्याचा संभव नाहीं. हें 'न ह्यग्निकार्याद्य० मसंन्यासिनामपि कर्मिणाम् ।' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. शिवाय, प्रत्यवाय ही गोष्ट भावरूप आहे आणि नित्य कर्माचा अभाव ही गोष्ट भावरूप नाहीं; तेव्हां अभाव हेंच ज्या गोष्टीचें स्वरूप आहे ह्मणजे जी गोष्ट विद्यमान नाहीं तिच्यापासून भावरूप गोष्ट उत्पन्न होणार नाहीं. ( कारण, अभावापासून भावाची उत्पत्ति कशी होईल ? ह्या श्रुतीमध्यें ) अभावापासून भावाची उत्पत्ति होणें असंभवनीय सांगितलें आहे. हें 'न तावन्नित्यानां कर्मणाम० सज्जन्मासंभवश्रुतेः' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. )

विहित कर्माचें अनुष्ठान न केल्यामुळें असंभवनीयही प्रत्यवाय

वेदोऽप्रमाणमित्युक्तं स्यात्। विहितस्य करणाकरणयोर्दुःखमात्रफलत्वात्। तथा च कारकं शास्त्रं न ज्ञापकमित्यनुपपन्नार्थं कल्पितं स्यात्। न चैतदिष्टं तस्मान्न संन्यासिनां कर्माण्यतो ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः। ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिरित्यर्जुनस्य प्रश्नानुपपत्तेश्च। यदि हि भग-

---

लागतो असें वेद ह्मणेल तर विहिताचें अनुष्ठान करणें आणि न करणें ह्या दोहोंचें फल दुःख हेंच असल्यामुळें अनर्थकारक वेद अप्रमाण आहे असें ह्मणावें लागेल आणि असंभाव्यही प्रत्यवाय लागत असल्याचें वेद सांगतो असें धरून चाललें ह्मणजे शास्त्र हें कारक आहे, ज्ञापक नाहीं अशी अयोग्य गोष्ट कल्पित केल्यासारिखें होणार आहे; परंतु, हें इष्ट नाहीं. तस्मात्, संन्याशांना कर्में अवश्यक नाहींत आणि ह्मणूनच ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीला साधन आहे हें सिद्ध होत नाहीं. "कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर तुला अभिमत असेल तर" हा अर्जुनाचा प्रश्नही जुळत नाहीं; हें ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय सिद्ध न होण्याचें दुसरें कारण होय.

(वेदामध्यें नित्य कर्माचें विधान केलेलें आहे व तें नित्य कर्म न केल्यास प्रत्यवाय लागतो असें त्यांत सांगितलें आहे. तेव्हां, कर्म न केल्यानें प्रत्यवाय लागत नाहीं असें कसें ह्मणतां येईल? अशी शंका बरोबर होणार नाहीं. अशी जर शंका करावी तर अनर्थाला कारण होणारा हा वेद अप्रमाण आहे असें ह्मणावें लागेल. कारण, ही शंका तरी मुमुक्षूच्याच बाजूनें ह्मणून आपण करणार आहांत. तेव्हां आपणांला मुक्तिच इष्ट आहे. विहित कर्म केल्याचें फल पितृलोकप्राप्ति हें आहे व तें तुह्मांसही इष्ट नाहीं. तेव्हां विहित कर्म केलें असतां पितृलोकप्राप्तिरूप जें अनिष्ट फल तें प्राप्त होणार आणि न केलें असतां प्रत्यवाय लागणार. करितां, कर्म करून आणि न करूनही दुःख हीच

फलप्राप्ति होणारी असल्यामुळें नित्य कर्माचें विधान करून अकरणीं प्रत्यवाय सांगणारा वेद मुमुक्षूला अनर्थावह होणारा असल्यामुळें अप्रमाण आहे, असें ह्मणावेंच लागेल. हें ' यदि विहिताकरणा० फलत्वात् ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां अभावालाही भाव उत्पन्न करण्याचें सामर्थ्य वेद उत्पन्न करील आणि विहित कर्म न केल्यानें लागणारा जो प्रत्यवाय त्याचा परिहार विहित कर्म केल्यानें होईल,असें ह्मणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण, एकादी नसती गोष्ट शास्त्र कधीं उत्पन्न करीत नाहीं. जी गोष्ट पूर्वींची असेल परंतु अज्ञात असेल तिचें ज्ञान शास्त्र करून देतें. तेव्हां, अभावाला भावोत्पत्ति करण्याचें सामर्थ्य वेद आणून देईल असें मानणें ह्मणजे शास्त्र हें करविणारें असून समजविणारें नाहीं अशी अप्रसिद्ध गोष्ट कल्पित करावी लागेल आणि अशी ती कल्पित केली ह्मणजे वेदाला अप्रामाण्य आहे ही गोष्ट निर्विवाद खरी ठरूं लागेल. हें ' तथा च० कल्पितं स्यात् ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. बरें वेदाला अप्रामाण्य येई नां ? त्याच्याशीं काय कर्तव्य आहे ? असें जर ह्मणाल तर सर्वज्ञ ईश्वरापासून उत्पन्न झालेला जो वेद त्यांत कोणत्याही दोषाचा लेश नसल्यामुळें तसें मानणें इष्ट नाहीं. हा ' न चैतदिष्टम् । ' ह्या भाष्याचा आशय होय. सारांश, ज्ञाननिष्ठ जे संन्यासी त्यांना कर्मसंन्यास अवश्य असल्यामुळें कर्मानुष्ठानाचा संभव नाहीं आणि ह्मणूनच इतरांना विहित असलेलें जें नित्य कर्म तें न केल्यापासून त्यांना प्रत्यवाय लागण्याचा संभव नाहीं. ह्यास्तव, संन्याशांना कर्में नाहींत हें सिद्ध आहे आणि ह्मणूनच मोक्षप्राप्तीला ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय सिद्ध होत नाहीं हेंही निर्विवाद आहे. हें ' तस्मान्न० नुपपत्तिः ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय सिद्ध न होण्याचें कारण आणखीही एक आहे आणि तें " कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर तुला अभिमत असेल " इत्यादि प्रकारचा जो प्रश्न ह्या अध्यायाचे आरंभींच अर्जुनानें श्रीकृ-

वता द्वितीयेध्याये ज्ञानं कर्म च समुच्चयेन त्वयानुष्ठेयमित्युक्तं स्यात्ततोऽर्जुनस्य प्रश्नोनुपपन्नो ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिरिति । अर्जुनाय चेद्बुद्धिकर्मणी त्वयानुष्ठेये इत्युक्ते या कर्मणो ज्यायसी बुद्धिः साप्युक्तैवेति तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशवेति प्रश्नो न कथंचनोपपद्यते । न चार्जुनस्यैव ज्यायसी बुद्धिर्नानुष्ठेयेति भगवतोक्तं पूर्वमिति कल्पयितुं युक्तं येन ज्यायसी चेदिति प्रश्नः स्यात् । यदि पुनरे-

---

ष्णांना केला आहे तो जुळत नाहीं, हें होय. कारण, दोन्ही मिळून मोक्षाचें साधन असें जर आहे तर त्या दोहोंमध्यें अमुक मुख्य आणि अमुक गौण असें मानितां येणार नाहीं. )

दुसऱ्या अध्यायामध्यें भगवानांनीं अर्जुनाला " ज्ञान आणि कर्म ह्यांचें एकत्रपणानें तुला अवलंबन केलें पाहिजे, " असें जर सांगितलें असतें तर " कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ, असें जर तुला वाटत असेल तर " इत्यादि प्रकारचा अर्जुनाचा प्रश्नच योग्य होणार नाहीं. कारण, " बुद्धि आणि कर्म ह्या दोहोंचें तुला अवलंबन केलें पाहिजे " असें जर भगवानांनीं अर्जुनाला सांगितलें असेल तर कर्मापेक्षां श्रेष्ठ जें ज्ञान तें ( त्या दोहोंपैकींच एक असल्यामुळें ) सांगितलेलेंच आहे. तेव्हां, " हे केशवा, ह्या क्रूर कर्माचेच ठिकाणीं तूं माझी कां योजना करीत आहेस ? " हा अर्जुनाचा प्रश्न कोणत्याही प्रकारानें संभवतच नाहीं. बरें,—श्रेष्ठ ज्ञानाचें अवलंबन तुला करितां उपयोगींच नाहीं असें अर्जुनाला उद्देशून भगवानांनीं पूर्वीं सांगितलें असल्यामुळें अर्जुनानें "कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर " इत्यादि प्रकारचा प्रश्न भगवानांना केला तो बरोबर केला—अशी जर कल्पना करावी तर ती योग्य नाहीं. (कारण, परमात्मवस्तुविवेकविषयक ज्ञान हें तुला सांगितलें. " असें दुसऱ्या अध्यायांतील एकुणचाळिसाव्या श्लोकांत भगवानांनींच म्हटलें आहे. )

कस्य पुरुषस्य ज्ञानकर्मणोर्विरोधाद्युगपदनुष्ठानं न संभवतीति भिन्नपुरुषानुष्ठेयत्वं भगवता पूर्वमुक्तं स्यात्ततोयं प्रश्न उपपन्नो ज्यायसी चेदित्यादिः । अविवेकतः प्रश्नकल्पनायामपि भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन भगवतः प्रतिवचनं नोपपद्यते । न चाज्ञाननिमित्तं भगवत्प्रतिवचनं कल्प्यम् । अस्माच्च भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन ज्ञानकर्मनिष्ठयोर्भगवतः प्रतिवचनदर्शनाज्ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः । तस्मात्केवलादेव ज्ञानान्मोक्ष इत्येषोर्थो निश्चितो गीतासु सर्वोपनिषत्सु च ज्ञानकर्मणा-

---

ज्ञान आणि कर्म ह्यांचा परस्पर विरोध असल्यामुळें एका पुरुषाच्या हातून एकसमयावच्छेदानें दोहोंचें अवलंबन होण्याचा संभव नाहीं. तेव्हां, ज्ञानाधिकारी भिन्न आणि कर्माधिकारी भिन्न असें जर भगवानांनीं पूर्वीं सांगितलें असेल तर मात्र " कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर " इत्यादि प्रकारचा प्रश्न अर्जुनानें करणें योग्य दिसतें. आतां ( भगवानांनीं जें सांगितलें तें अर्जुनाला समजलें नाहीं, तेव्हां ) अज्ञानामुळें अर्जुनानें असा प्रश्न केला, अशी जरी कल्पना केली तरी सुद्धां जुळत नाहीं. कारण, अर्जुनाच्या प्रश्नाला जें भगवानांनीं उत्तर दिलें आहे त्यांत ज्ञान आणि कर्म ह्यांचें अवलंबन ( अधिकाराप्रमाणें ) भिन्न भिन्न पुरुषांनीं करावें असें सांगितल आहे, तें जुळणार नाहीं. आतां भगवानांचें उत्तरही अज्ञानमूलकच आहे अशी कल्पना करणेंही योग्य नाहीं. ( कारण, सर्वज्ञत्वाविषयीं ज्याची प्रसिद्धि आहे त्या भगवानानें अज्ञानग्रस्त होऊन अर्जुनाला कांहींतरी उत्तर दिलें, अशी कल्पना करणें ह्मणजे निव्वळ साहस आहे. ) तेव्हां, ह्यामुळे व ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग ह्यांचें अवलंबन भिन्न भिन्न पुरुषांनीं करावें असें भगवानांचें उत्तर दृष्टोत्पत्तीस येत असल्यामुळें ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय विवक्षित असल्याचें सिद्ध होत नाहीं. सारांश, केवळ ज्ञाना-

अर्जुन उवाच ॥

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।
तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥

---

रेकं वद निश्चित्येति चैकविषयैव प्रार्थनानुपपन्ना । उभयोः समुच्चयसंभवे कुरु कर्मैव तस्मात्त्वमिति च ज्ञाननिष्ठासंभवमर्जुनस्यावधारणेन दर्शयिष्यति ।

ज्यायसी श्रेयसी चेद्यदि कर्मणः सकाशात्ते तव मताभिप्रेता बुद्धिर्ज्ञानं हे जनार्दन यदि बुद्धिकर्मणी समुच्चिते इष्टे तदैकं श्रेयःसाधनमिति कर्मणो ज्यायसी बुद्धिरिति कर्मणोतिरिक्तकरणं बुद्धेरनुपपन्नमर्जुनेन कृतं स्यान्न हि

---

ज्याच योगानें मोक्ष प्राप्त होतो; हाच अर्थ गीतेमध्यें आणि कोणत्याही उपनिषदांमध्यें निश्चित आहे. शिवाय, ज्ञान आणि कर्म ह्या उभयतांचा समुच्चय होण्याचा जर संभव असता तर ज्ञान आणि कर्म ह्यांपैकीं मला योग्य कोणतें तें एक निश्चयपूर्वक सांग अशी दोहोंपैकीं एकालाच उद्देशून जी अर्जुनानें भगवानांची प्रार्थना केली आहे तीही योग्य होणार नाहीं. इतकेंच नव्हें परंतु, अर्जुनाचे ठिकाणीं ज्ञाननिष्ठा असंभवनीय आहे, हें " तूं आपला कर्मच कर " ह्मणून भगवानांनीं पुढें चवथ्या अध्यायामध्यें निश्चयपूर्वक दर्शविलेंच आहे.

अर्जुन प्रश्न करितोः—हे जनार्दना, हे केशवा, कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर तुला अभिमत असेल तर क्रूर कर्मामध्यें तूं माझी कशा करितां योजना करीत आहेस ? ॥ १ ॥

हे जनार्दना, कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर तुला वाटत असेल तर हा पहिल्या अर्ध्या श्लोकाचा अर्थ होय. ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय जर मोक्षप्राप्तीचें साधन ह्मणून भगवानांना इष्ट असेल तर त्यांपैकीं एकच मोक्षप्राप्तीचें साधन असें समजून " कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ " ह्मणून

**तदेव तस्मात्फलतोऽतिरिक्तं स्यात्तथा कर्मणः श्रेयस्करी भगवतोक्ता बुद्धिरश्रेयस्करं च कर्म कुर्विति मां प्रतिपादयति तत्किं नु कारणमिति भगवत उपालम्भमिव कुर्वंस्तत्किं कस्मात्कर्मणि घोरे क्रूरे हिंसालक्षणे मां नियोजयसि केशवेति च यदाह तच्च नोपपद्यते । अथ स्मार्तेनैव कर्मणा समुच्चयः सर्वेषां भगवतोक्तोऽर्जुनेन चावधारितश्चेत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसीत्यादि कथं युक्तं वचनम् ॥ १ ॥**

---

कर्मापेक्षां ज्ञानाला अर्जुनानें श्रेष्ठ मानणें योग्य दिसणार नाहीं व समुच्चयपक्ष स्वीकारिला असतां कर्मापेक्षां ज्ञान फलानें श्रेष्ठ असें होणारही नाहीं. त्याचप्रमाणें " कर्मापेक्षां ज्ञान अधिक श्रेयस्कारक ह्मणून भगवानानें सांगितलें आणि ज्ञानापेक्षां कमी श्रेयस्कारक जें कर्म तें कर ह्मणून तोच मला सांगत आहे; तेव्हां ह्याचें कारण काय ? " ह्मणून भगवानांना टोंचून बोलण्याच्या उद्देशानेंच कीं काय " तर क्रूर ह्मणजे हिंसा हेंच ज्याचें लक्षण आहे अशा कर्माचे ठिकाणीं, हे केशवा, तूं माझी योजना कां करीत आहेस ? " असें जें अर्जुनानें ह्मटलें तेंही समुच्चयपक्ष स्वीकारिला असतां जुळणार नाहीं. आतां स्मार्तकर्मासहवर्तमान ज्ञान हेंच सर्वांना मोक्षप्राप्तीचें साधन ह्मणून भगवानांनीं सांगितलें व अर्जुनानें ऐकून घेतलें असें जरी धरून चाललें तरी क्रूरकर्मामध्यें तूं मला कां घालीत आहेस वगैरे प्रकारचें अर्जुनाचें ह्मणणें योग्य कसें होईल ? १.

( ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन असें जर भगवानांना इष्ट असेल तर दोन मिळून होणारें जें मोक्षसाधन तें एकच असल्यामुळें कर्मापासून ज्ञान वेगळें करणें अयोग्य आहे. हें ' यदि बुद्धिकर्मणी० कृतं स्यात् ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां दोन मिळून एक साधन जरी असलें तरी त्या दोहोंपैकीं फलानें एक अधिक कां बरें असणार नाहीं ? अशीही शंका योग्य होणार नाहीं. कारण,

केवल कर्मापेक्षां फलाच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां केवल ज्ञान अधिक असें समजून कर्मापासून ज्ञानाचें पृथक्करण करणें योग्य होणारच नाहीं. कारण, ज्ञान आणि कर्म ह्यांचा मिलाफ मोक्षप्राप्तीला साधन आहे असा समुच्चयपक्ष धरून चाललें ह्मणजे दोहोंपैकीं एक मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें मानितां येत नाहीं आणि ह्मणूनच एकापासून दुसरें फलाच्या दृष्टीनें भिन्न समजतां येत नाहीं. हें ' न हि तदेव० स्यात्। ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. ' दूरेण ह्यवरं कर्म ' ह्या श्लोकामध्यें भगवानांनीं कर्मापेक्षां ज्ञान अधिक श्रेयस्कर सांगून ज्ञानापेक्षां कर्म कमी श्रेयस्कर ह्मटलें आहे; तथापि तेंच कर्म ' कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु ' ह्या वचनानें अनुरक्त अशा मज भक्ताला कर ह्मणून भगवानच सांगत आहेत. तेव्हां, असें करण्याला कारण दिसत नसल्यामुळें अत्यंत क्रूर अशा कर्माचे ठिकाणींच माझी योजना करणें हें भगवानांचें करणें योग्य नव्हे ह्मणून अर्जुन जें ह्मणत आहे तें समुच्चयपक्ष स्वीकारिला असतां जुळत नाहीं. हें " तथा कर्मणः श्रेयस्करी० तच्च नोपपद्यते " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. शिवाय, श्रौत आणि स्मार्त ह्या दोन्ही कर्मांसहवर्तमान ज्ञान हें गृहस्थांना मोक्षप्राप्तीचें साधन असून इतरांना केवल स्मार्तकर्मांसहवर्तमान ज्ञान मोक्षप्राप्तीचें साधन आहे ह्मणून भगवानांनीं सांगितलें आणि अर्जुनानें तें ऐकून घेतलें, असें जर वृत्तिकारांच्या ह्मणण्याप्रमाणें गृहीत धरून चाललें तर " हे केशवा, क्रूरकर्माचे ठिकाणीं तूं माझी योजना कशाकरितां करीत आहेस? " असें अर्जुनाचें श्रीकृष्णांना ह्मणणेंच योग्य दिसत नाहीं. कारण, ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें भगवानांचें मत धरून चाललें असतां केवल कर्म भगवानांनीं अर्जुनाला करावयास सांगणें संभवनीय नाहीं. हें ' अथ० वचनम् ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. )

( देवांच्या प्रतिपक्ष्यांना तूं पीडा देणारा आहेस; परंतु, मी देवशत्रु नसल्यामुळें तूं मला घोर कर्म करण्याची प्रेरणा करून पीडा देत आहेस हें तुला योग्य नाहीं. हें ' जनार्दन ' ह्या संबोधनानें अर्जुनानें सुच-

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोहमाप्नुयाम् ॥

---

किं च व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे । तदेकं० याम् ॥ २ ॥ व्यामिश्रेणेव यद्यपि विविक्ताभिधायी भगवांस्तथापि मम मन्दबुद्धेर्व्यामिश्रमिव भगवद्वाक्यं प्रतिभाति । तेन मम बुद्धिं मोहयसीव । बुद्धिव्यामोहापनयाय हि प्रवृत्तस्त्वं तु कथं मोहयस्यतो ब्रवीमि बुद्धिं मोहयसीव मे ममेति । त्वं तु भिन्नकर्तृकयोर्ज्ञानकर्मणोरेकपुरुषानुष्ठानासंभवं यदि मन्यसे तत्रैवं सति तत्तयोरेकं बुद्धिं कर्म वेदमेवार्जुनस्य योग्यं बुद्धिशक्त्यवस्थानुरूपमिति निश्चित्य वद ब्रूहि । येन

---

विलें आहे आणि त्याचप्रमाणें ब्रह्मादिकांवर कृपा करण्याकरितां तूं जात असतोस तसाच मज भक्तावर कृपा करणारा हो; जनार्दन होऊं नकोस, हें अर्जुनानें ' केशव ' ह्या संबोधनानें दर्शविलें १. )

ह्या जशा कांहीं घोंटाळ्याच्या भाषणानें तूं माझ्या बुद्धीला मोह पाडिल्यासारिखें करीत आहेस; ह्याकरितां, ज्याच्या योगानें माझें कल्याण होईल असें कोणतें तरी एक निश्चयपूर्वक तूं मला सांग ॥ २ ॥

शिवाय, तूं भगवान् जरी स्पष्ट बोलणारा आहेस तथापि मज मंदबुद्धीला तुज भगवानाचें भाषण जसें कांहीं घोंटाळ्याचें दिसत आहे. ह्यामुळें तूं जसा कांहीं माझ्या बुद्धीला मोह पाडीत आहेस असें मला वाटतें. अरे, तूं माझ्या बुद्धीचा भ्रम दूर करण्याकरितां प्रवृत्त झाला असून उलट मोह कसा पाडीत आहेस ? ह्याकरितां, तूं जसा कांहीं माझ्या बुद्धीला मोह पाडीत आहेस असें मी ह्मणतों. असो. ज्ञान आणि कर्म ह्यांचे अधिकारी भिन्न भिन्न असल्यामुळें तीं दोन्हीं एके ठिकाणीं असण्याचा संभव नाहीं असें जर तुला वाटत आहे आणि ह्याप्रमाणें जर तुझें मत आहे तर "हेंच अर्जुनाला योग्य आहे; ह्मणजे, ह्याची बुद्धि, शक्ति

**ज्ञानेन कर्मणा वान्यतरेण श्रेयोहमाप्नुयां प्राप्नुयाम् । यदि हि कर्मनिष्ठायां गुणभूतमपि ज्ञानं भगवतोक्तं स्यात्तत्कथं तयोरेकं वदेत्येकविषयैवार्जुनस्य शुश्रूषा स्यात् । न हि भगवतोक्तमन्यतरदेव ज्ञानकर्मणोर्वक्ष्यामि नैव द्वयमिति येनोभयप्राप्त्यसंभवमात्मनो मन्यमान एकमेव प्रार्थयेत् ॥ २ ॥**

---

आणि अवस्था ह्यांना अनुरूप आहे ह्याचा पूर्ण विचार करून त्यांपैकीं एक ज्ञान अथवा कर्म मला सांग. ह्मणजे त्या ज्ञानाच्या योगानें अथवा कर्माच्या योगानें मला श्रेय प्राप्त होईल. कर्मनिष्ठेमध्यें ज्ञान गौण ह्मणून भगवानांनीं सांगितलें असें जरी समुच्चयपक्ष गृहीत धरून मानिलें तरी ' त्यांपैकीं एक सांग ' ह्मणून एकच ऐकून घेण्याविषयीं अर्जुनाला इच्छा कशी होईल ? बरें ज्ञान आणि कर्म हीं दोन्ही आपणांला प्राप्त होण्याचा संभव नाहीं असें समजून अर्जुनानें एकच निश्चित सांगण्याविषयीं प्रार्थना केली ह्मणून ह्मणावें तर ज्ञान आणि कर्म यांपैकीं एकच तुला सांगेन; दोन सांगणार नाहीं " असें भगवानांनीं ह्मटलेंही नाहीं २.

( तस्मात्, ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन आहे, ह्या मताला अनुरूप असा अर्जुनाचा प्रश्न नाहीं. हें भाष्यांतील ' किं च ' ह्या पदांचें तात्पर्य होय. भगवान् स्पष्ट बोलणारे असल्यामुळें त्यांचें भाषण घोंटाळ्याचें असें अर्जुनाला ह्मणणें योग्य नाहीं. अशी शंका येऊं नये एतदर्थ ' यद्यपि० प्रतिभाति ' असें भाष्यकारांनीं ह्मटलें आहे. अंतःकरण, शरीरसामर्थ्य आणि युद्धारंभ ही अवस्था ह्यांना अनुरूप हा भाष्यांतील ' बुद्धिशक्त्यवस्थानुरूपं ' ह्या पदाचा अर्थ होय. ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन आहे. तेव्हां, कर्मनिष्ठा सांगतेवेळीं ज्ञाननिष्ठाही भगवानांनीं सांगितली. असें वृत्तिकारांच्या बाजूचें ह्मणणें जरी घटकाभर कबूल केलें तरी सुद्धां

ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन आहे ही गोष्ट सिद्ध होत नाहीं. कारण, कर्मनिष्ठेचें प्रतिपादन करितेवेळीं गौण ह्मणून ह्मणा अथवा मुख्य ह्मणून ह्मणा ज्ञाननिष्ठा भगवानांनीं जरी कथन केली असली तरी ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं मिळून मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें वृत्तिकारप्रभृति समुच्चयमताभिमानी पुरुषांचें मत असल्यामुळें ज्ञान अथवा कर्म ह्या दोहोंपैकीं कोणतें तरी एक मला सांग अशी अर्जुनाची भगवानांना प्रार्थना होण्याचा संभव नाहीं. कारण, दोन्हीं मिळून मोक्षप्राप्तीचें साधन आहे; दोहोंपैकीं एक साधन नाहीं; असें जर आहे तर अर्जुन एकच समजून घेण्याकरितां भगवानांची प्रार्थना कां ह्मणून करील ? हा ' यदि हि शुश्रूषा स्यात् । ' ह्या भाष्याचा आशय होय. आतां ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय जरी मोक्षप्राप्तीचें साधन आहे तरी तीं दोन्हीं आपणांला भगवानांपासून प्राप्त होण्याचा संभव नाहीं. करितां, आधीं त्यांपैकीं एकाचें अवलंबन करावें आणि मग दुसरें प्राप्त करून घेण्याच्या उद्योगास लागावें. असा विचार करून अर्जुनानें कोणतें तरी एक सांगण्याविषयीं भगवानांची प्रार्थना केली हें ह्मणणेंही जुळणार नाहीं. कारण, ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं मी तुला सांगणार नाहीं; ह्यांपैकीं कोणतें तरी एक सांगेन असें भगवानांनीं अर्जुनाला सांगितलें असल्याचें जर सिद्ध होत नाहीं तर भगवानांपासून आपणांला दोन्हीं प्राप्त होण्याचा संभव नाहीं असें समजून अर्जुनानें कोणतें तरी एक कथन करण्याविषयीं भगवानांची प्रार्थना केली असें धरून चालणें योग्य होणार नाहीं. शिवाय, समुच्चयाभिमानी लोकांकरितां घटकाभर भगवानांनीं अर्जुनाला तसें सांगितलें ह्मणून जरी गृहीत धरिलें तरी सुद्धां अनर्थच होत आहे. कारण, भगवानांनीं ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें गीतेमध्यें प्रतिपादन केलें आहे हणून जर वृत्तिकारप्रभृति समुच्चयाभिमानी म्हणत आहेत तर तशा प्रकारें भगवानांनीं अर्जुनाला सांगितलें असल्याचें गृहीत धरून चालणें

त्यांनाही इष्ट नाहीं. तस्मात्, भगवानांपासून ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं प्राप्त होण्याचा संभव नाहीं असें समजून अर्जुनानें कोणतें तरी एक सांगण्याविषयीं भगवानांची प्रार्थना केली अशी कल्पना करणें अयोग्य आहे. हें 'न हि० प्रार्थयेत्।' ह्या भाष्याचें तात्पर्य होय.)

( व्यामिश्र ह्या पदाचा अर्थ मिश्रणयुक्त=संदेहयुक्त=घोंटाळ्याचा असा आहे. तेव्हां, घोंटाळा कोणता अथवा अर्जुनाला संदेह येण्याचें कारण काय ? हें नीट समजल्यावांचून हा दुसरा श्लोक नीट कळणार नाहीं. करितां—हें स्पष्ट करून सांगणें अवश्य आहे. 'बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि' इत्यादि श्लोकांनीं कर्मप्रशंसा केलेली आहे, 'या निशा सर्वभूतानां' इत्यादि प्रकारानें ज्ञानाची प्रशंसा केलेली आहे, 'कर्मण्येवाधिकारस्ते' इत्यादिप्रकारानें कर्माचेच ठिकाणीं माझा अधिकार ह्मणून सांगितलें आहे आणि 'त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन' ह्या वचनानें ज्ञाननिष्ठेविषयींही माझा अधिकार असल्याचें दर्शविलें आहे—असें अर्जुनाला वाटलें आणि ह्मणून "ज्ञान आणि कर्म ह्यांमध्यें मुख्य काय व गौण काय आणि त्याचप्रमाणें माझा अधिकार कशाविषयीं आहे आणि कशाविषयीं नाहीं" इत्यादि प्रकारचा अर्जुनाला संदेह आला, ह्मणून "व्यामिश्रेण" हें विशेषण अर्जुनानें "वाक्येन" ह्या विशेष्याला दिलें आहे. अर्जुनाला जरी संदेह आला तरी भगवानांचें बोलणें संदेहोत्पादक असण्याचा संभव नाहीं. तेव्हां, भगवानांचें सांगणें जरी संदेहरहित असलें तरी आपलीच मति मंद असल्यामुळें आपणांला नीट आकलन न होऊन तें संदेहयुक्त वाटत आहे. तस्मात्, संदेहोत्पादक आणि बुद्धिमोहकारक उपदेश भगवानांनीं केला असें ह्मणण्यापेक्षां भगवानांचें सांगणें आपणांला समजलें नाहीं असा आपणांकडेच कमीपणा घेणें सर्वस्वीं योग्य आहे असें समजून ह्या श्लोकांत 'व्यामिश्रेणेव' आणि 'मोहयसीव' ह्या दोन्ही ठिकाणीं अर्जुनानें 'इव' ह्या पदाची योजना केलेली आहे. २ )

श्रीभगवानुवाच ॥

लोकेस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ॥
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम् ॥ ३ ॥

---

प्रश्नानुरूपमेव प्रतिवचनं श्रीभगवानुवाच लोके०नाम्॥३॥ लोकेस्मिञ्छास्त्रार्थानुष्ठानाधिकृतानां त्रैवर्णिकानां द्विविधा द्विप्रकारा निष्ठा स्थितिरनुष्ठेयतात्पर्यं पुरा पूर्वं सर्गादौ प्रजाः सृष्ट्वा तासामभ्युदयनिःश्रेयसप्राप्तिसाधनं वेदार्थसंप्रदायमाविष्कुर्वता प्रोक्ता मया सर्वज्ञेनेश्वरेण हेनघापाप । तत्र का सा द्विविधा निष्ठेत्याह तत्र ज्ञानयोगेन ज्ञानमेव योगस्तेन सांख्यानामात्मानात्मविषयविवेकज्ञानवतां ब्रह्मचर्याश्रमादेव कृतसंन्यासानां वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थानां परमहंसपरिव्राज-

---

श्रीभगवान् ह्मणतातः—हे निष्पापा अर्जुना, ह्या लोकामध्यें मीं दोन प्रकारचे वर्तनक्रम पूर्वीं सांगितलेले आहेत. ज्ञानयोगानें सांख्यांचा आणि कर्मयोगानें कर्मठांचा ॥ ३ ॥

अर्जुनाच्या प्रश्नाला अनुरूप असेंच प्रतिवचन श्री भगवानांनीं " लोकेस्मिन्द्विविधा० योगिनाम् ॥ ३ ॥ " ह्या श्लोकामध्यें दिलें आहे. हे निष्पापा, पूर्वीं ह्मणजे सृष्टीचे आरंभीं प्रजा उत्पन्न केल्यानंतर त्यांना अभ्युदय आणि मोक्ष प्राप्त होण्याचें साधन ह्मणून वैदिक संप्रदाय प्रसिद्धीस आणण्याकरितां मीं सर्वज्ञ ईश्वरानें शास्त्रप्रतिपादित गोष्टी करण्याचा अधिकार ज्यांना आहे अशा त्रैवर्णिकांची ( ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांची ) दोन प्रकारची निष्ठा ह्मणजे स्थिति कथन केली. स्थिति ह्मणजे कर्तव्यतत्परता. ती दोन प्रकारची स्थिति कोणती ह्मणाल तर सांगतों. त्यांपैकीं सांख्यांना ह्मणजे आत्मानात्मविषयकविवेकजन्यज्ञान ज्यांना झालेलें आहे, ब्रह्मचर्याश्रमानंतर लगेंच संन्यास घेऊन वेदांताच्या श्रवणमननादिकांनीं उत्पन्न झालेल्या चांगल्या ज्ञानाच्या

कानां निष्ठा प्रोक्ता कर्मयोगेण कर्मैव योगः कर्मयोगस्तेन कर्मयोगेण योगिनां कर्मिणां निष्ठाप्रोक्तेत्यर्थः। यदि चैकेन पुरुषेणैकस्मै पुरुषार्थाय ज्ञानं कर्म च समुच्चित्यानुष्ठेयं भगवतेष्टमुक्तं वक्ष्यमाणं वा गीतासु वेदेषु चोक्तं कथमिहार्जुनायोपसन्नाय प्रियाय विशिष्टभिन्नपुरुषकर्तृके एव ज्ञानकर्मनिष्ठे ब्रूयात्। यदि पुनरर्जुनो ज्ञानं कर्म च द्वयं श्रुत्वा स्वयमेवानुष्ठास्यत्यन्येषां तु भिन्नपुरुषानुष्ठेयतां वक्ष्यामीति मतं भगवतः कल्प्येत तदा रागद्वेषवानप्रमाणभूतो भगवान्कल्पितः

---

योगानें ज्यांना आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झालेला आहे आणि ह्मणूनच ब्रह्माचेच ठिकाणीं लय लागून राहिलेले असे जे परमहंसपारिव्राजक बनलेले आहेत त्यांना ज्ञानरूप योगानें मीं स्थिति सांगितली आहे. अर्थात्, ज्ञानमार्गाचें अवलंबन करून त्यांनीं असावें असें मीं सांगून ठेविलें आहे आणि त्याचप्रमाणें योग्यांना ह्मणजे कर्मठांना मीं कर्मरूप योगानें स्थिति सांगितली आहे. अर्थात् , कर्माचें अवलंबन करून त्यांनीं रहावें असें सांगून ठेविलें आहे. तात्पर्य, एका पुरुषानें एका पुरुषार्थप्राप्तीकरितां अर्थात् मोक्षप्राप्तीकरितां ज्ञान आणि कर्म ह्या दोहोंचें बरोबरीनें अवलंबन करावें, असें जर भगवानांना इष्ट असेल इतकेंच नव्हे परंतु, गीतेमध्यें त्यांनीं सांगितलें असेल किंवा पुढें सांगितलें जाणार असेल आणि त्याप्रमाणें वेदामध्येंही सांगितलें असेल तर ह्या ठिकाणीं प्रिय आणि शरणागत अशा अर्जुनाला भिन्न भिन्न अधिकाऱ्यांनींच स्वीकारण्यास योग्य अशा ज्ञानविषयक व कर्मविषयक दोन्ही निष्ठा भगवान् कसें सांगतील ? आतां " अर्जुन ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं ऐकून घेऊन स्वतः दोहोंचेंही अवलंबन करील आणि अर्जुनावांचून इतर जे लोक आहेत त्यांना मात्र मी ज्ञान आणि कर्म ह्यांचे अधिकारी भिन्न भिन्न आहेत ह्मणून सांगेन " असें जर भगवा-

स्यात् । तच्चायुक्तम् । तस्मात्कयापि युक्त्या न समुच्चयो ज्ञानकर्मणोः । यदर्जुनेनोक्तं कर्मणो ज्यायस्त्वं बुद्धेस्तच्च स्थितमनिराकरणात् । तस्याश्च ज्ञाननिष्ठायाः संन्यासिनामेवानुष्ठेयत्वं भिन्नपुरुषानुष्ठेयत्ववचनाच्च भगवत एवमेवानुमतमिति गम्यते ३

---

नांचें मत कल्पावें तर भगवान् ( अर्जुनावर अतिशय प्रेम आणि इतरांचे ठिकाणीं द्वेष करीत असल्याचें सिद्ध होत असल्यामुळें ते ) रागद्वेषांनीं युक्त आणि ह्मणूनच अप्रमाणभूत आहेत असें कल्पित केल्यासारिखें होईल. परंतु, तसें होणें योग्य नाहीं. तस्मात्, कोणत्याही युक्तीनें पाहूं गेलें असतां ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय मोक्षप्राप्तीचें साधन आहे ही गोष्ट सिद्ध होत नाहीं. कर्मापेक्षां ज्ञानाचें श्रेष्ठत्व जें अर्जुनानें ह्मटलें आहे त्याचें निराकरण पुढें केलेलें नसल्यामुळें तें सिद्धच आहे आणि त्या ज्ञाननिष्ठेविषयीं संन्याशांचाच अधिकार आहे, असेंच भगवानांना अभिमत असल्याचें त्यांनीं ज्ञान आणि कर्म ह्यांचें भिन्न भिन्न पुरुषांनीं अवलंबन करावें असें सांगितलें असल्यामुळें दिसत आहे ३.

( ह्या श्लोकांतील 'पुरा' ह्या पदाचा अर्थ मधुसूदन, नीलकंठ आणि श्रीधरस्वामी ह्यांनीं व विकल्पानें आपल्या शास्त्रप्रकाशिकेमध्यें आनंदगिरींनींही पूर्वीच्या अध्यायांत असा केला आहे; परंतु, तो बरोबर नाहीं. कारण, पूर्वीच्या अध्यायांत दोन प्रकारची निष्ठा कथन केली असें जर भगवानांना विवक्षित असतें तर तो अध्याय संपतांक्षणींच हा श्लोक जवळच असल्यामुळें 'प्रोक्ता' येवढ्या पदानेंच निर्वाह झाला असतां. 'लोकेस्मिन्' ह्या पदांचें व 'पुरा' ह्या पदाचें कारण नाहीं. तस्मात्, मधुसूदनप्रभृतींनीं केलेला अर्थ ग्राह्य नसून भाष्यकारांप्रमाणेंच अर्थ करणें अवश्य आहे. " बाबा रे, तुझें चित्त शुद्ध होण्याकरितांच मी तुला स्वधर्मानें वागण्यास सांगत आहें; ह्यांत कांहीं माझा मतलब नाहीं. तुझें कल्याण व्हावें एवढीच माझी इच्छा आहे. " हें सुचवि-

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ॥**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

---

ण्याकरितां श्रीकृष्णांनीं अर्जुनाला उद्देशून 'अनघ' हें संबोधन घातलेलें आहे.

ज्ञानेश्वरप्रभृति साधुजनांच्या आधारानें ह्मणून कांहीं आधुनिक लोक कर्मठांना नांवें ठेवीत असतात. ह्यास्तव, त्यांचें तें नांवें ठेवणें किती किंमतीचें आहे ह्याचा निर्णय होण्याकरितां ह्या अध्यायांतील कांहीं श्लोकांवरील ज्ञानेश्वर महाराजांची टीका देणें अवश्य आहे. ह्या श्लोकाचें व्याख्यान ज्ञानेश्वर महाराज पुढीलप्रमाणें करितातः—

या बोला श्रीअच्युत । ह्मणत असे विस्मित । अर्जुना हा ध्वनित । अभिप्रावो ॥ ३२ ॥ जे बुद्धियोग सांगतां । सांख्यमत संस्था । प्रकटिली स्वभावतां । प्रसंगें आह्मीं ॥ ३३ ॥ तो उद्देश तूं नेणसीचि । ह्मणोनि शिणलासि वायाचि । तरी आतां जाणें मीचि । उक्त दोन्ही ॥ ३४ ॥ अवधारी वीर श्रेष्ठा । ये लोकीं या दोनी निष्ठा । मजचिपासून प्रगटा । अनादिसिद्धा ॥ ३५ ॥ एक ज्ञानयोग ह्मणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिजे । जेथ वोळखी सवें पाविजे । तद्रूपता ॥ ३६ ॥ एक कर्मयोग जाण । जेथ साधक जन निपुण । होऊंनिया निर्वाण । पावती वेळे ॥ ३७ ॥ हे मार्ग तरी दोन्ही । परी एकवटती निदानीं । जैसी सिद्धसाध्य भोजनीं । तृप्ति एक ॥ ३८ ॥ कां पूर्वापर सरिता । भिन्न दिसती वाहतां । मग सिंधूमिळणीं ऐक्यता । पावतीं शेखीं ॥ ३९ ॥ तैसी दोनींही मतें । सूचिती एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते । आधीन असे ॥ ४० ॥ देखें उत्प्लुवनासारिखा । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नर केंवि तैसा । पावे वेगा ॥ ४१ ॥ तो हळूं हळूं ढाळें ढाळें । केतुलेनि एके वेळे । मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥ ४२ ॥ तैसें देख पां विहंगममतें । अधिष्ठोनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥ येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें । पूर्णता अवसरें । पावते होती ॥ ४४ ॥

न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४

मां च बन्धकारणे कर्मण्येव नियोजयसीति विषण्णमनसमर्जुनं कर्म नारभ इत्येवं मन्वानमालक्ष्याह भगवान्न कर्मणामनारम्भादिति । अथ वा ज्ञानकर्मनिष्ठयोः परस्परविरोधादेकेन पुरुषेण युगपदनुष्ठातुमशक्यत्वे सतीतरेतरानपेक्षयोरेव पुरुषार्थहेतुत्वे प्राप्ते कर्मनिष्ठाया ज्ञाननिष्ठाप्राप्तिहेतुत्वेन पुरुषार्थहेतुत्वं न स्वातन्त्र्येण ज्ञाननिष्ठा तु कर्मनिष्ठोपायलब्धात्मिका सती स्वातन्त्र्येण पुरुषार्थहेतुरन्यानपेक्षेत्ये-

कर्म न केल्यानें पुरुषाला कर्मशून्यता प्राप्त होत नाहीं. कारण, केवल कर्मसंन्यासानेंच सिद्धि प्राप्त होत नाहीं ॥ ४ ॥

" अरे, कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें कबूल करूनही मला मात्र तूं आपला जन्ममरणरूप बंधाला कारण होणाऱ्या कर्माचेच ठिकाणीं योजीत आहेस " असा विचार मनांत आणून खिन्न झालेला अर्जुन " मी कर्माचें अवलंबन करणार नाहीं. " अशा विचारांत आहे असें पाहून भगवानांनीं ' न कर्मणामनारम्भात् ' असें म्हटलें आहे ( असा मागच्या श्लोकाशीं ह्या श्लोकाचा संबंध समजावा— ) अथवा ज्ञानतत्परता आणि कर्मतत्परता ह्यांचा परस्परविरोध असल्याकारणानें एकाच पुरुषाच्या हातून दोहोंचें अवलंबन एकाच वेळीं होणें अशक्य आहे. तेव्हां, परस्परांची अपेक्षा न धरितां त्यांपैकीं प्रत्येक स्वतंत्रच मोक्षप्राप्तीचें साधन होणार आहे. असें अर्जुनाला वाटेल तें न वाटावें एतदर्थ कर्मतत्परतेला ज्ञानतत्परताप्राप्तीचें साधन ह्या नात्यानें मोक्षकारणत्व आहे; स्वतंत्ररीतीनें नाहीं. परंतु, ज्ञानतत्परता ही कर्मतत्परतारूप उपायानें प्राप्त होणारी असल्यामुळें कर्मतत्परतेची गरज न बाळगिता स्वतंत्रपणानेंच मोक्षप्राप्तीचें साधन होणारी आहे. ही गोष्ट अर्जु-

**तमर्थं प्रदर्शयिष्यन्नाह भगवान्न कर्म० समधिगच्छति॥ ४ ॥**

**न कर्मणामनारम्भादप्रारम्भात्कर्मणां क्रियाणां यज्ञादीनामिह जन्मनि जन्मान्तरे वानुष्ठितानामुपात्तदुरितक्षयहेतुत्वेन सत्त्वशुद्धिकारणानां तत्कारणत्वेन च ज्ञानोत्पत्तिद्वारेण ज्ञाननिष्ठाहेतूनां ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः। यथादर्शतलप्रख्ये पश्यत्यात्मानमात्मनीत्यादिस्मरणादनारम्भादननुष्ठानान्नैष्कर्म्यं निष्कर्मभावं कर्मशून्यतां ज्ञानयोगेन निष्ठां निष्क्रियात्मस्वरूपेणैवावस्थानमिति यावत्पुरुषो नाश्नुते न प्राप्नोतीत्यर्थः। कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं नाश्नुत इति वचनात्तद्विपर्ययात्तेषामारम्भान्नैष्कर्म्यमश्नुत इति गम्यते कस्मात्पुनः कारणात्कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं नाश्नुत इति।**

---

नाला समजवून देण्याकरितां भगवानांनीं ' न कर्मणामनारम्भा० समधिगच्छति ॥ ४ ॥ हा श्लोक सांगितला आहे. ( —असा संबंध समजावा. ) इहजन्मीं अथवा जन्मांतरीं केलेलीं यज्ञयागादि कर्मे संचित पापाच्या नाशाच्या द्वारानें अंत:करणशुद्धीला कारणीभूत होत असतात आणि चित्तशुद्धीला कारणीभूत होत असल्यामुळें ज्ञानोत्पत्तिद्वारा ज्ञाननिष्ठेला कारणीभूत होतात. कारण, अरसा स्वच्छ केला असतां ज्याप्रमाणें त्यांत प्रतिबिंब दृष्टीस पडतें त्याचप्रमाणें पापकर्माचा क्षय झाला असतां पुरुषाचे ठिकाणीं ज्ञान उत्पन्न होतें. अशी स्मृति आहे. तस्मात् , कर्मांचें अनुष्ठान न केल्यानें नैष्कर्म्य=निष्कर्मता=कर्मशून्यता=ज्ञानयोगतत्परता अर्थात् निष्क्रिय अशा आत्मस्वरूपानें असणें ही स्थिति पुरुषाला प्राप्त होत नाहीं. कर्मानुष्ठान न केल्यानें नैष्कर्म्य अवस्था प्राप्त होत नाहीं ह्या ह्मणण्यावरून त्याच्या उलट प्रकाराचें अवलंबन केल्यानें ह्मणजे त्यांचें अनुष्ठान केल्यानें पुरुषाला नैष्कर्म्य अवस्था प्राप्त होत असल्याचें अनुमान होतें. आतां कर्मानुष्ठान न केल्यानें नैष्कर्म्यावस्था

उच्यते कर्मारम्भस्यैव नैष्कर्म्योपायत्वात्। न ह्युपायमन्तरेणो-पेयप्राप्तिरस्ति। कर्मयोगोपायत्वं च नैष्कर्म्यलक्षणस्य ज्ञान-योगस्य श्रुताविह च प्रतिपादनात्। श्रुतौ तावत्प्रकृतस्यात्मलो-कस्य वेद्यस्य वेदनोपायत्वेन तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेनेत्यादिना कर्मयोगस्य ज्ञानयोगोपायत्वं प्रतिपादितम् । इहापि च संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुम-योगतः । योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये । यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणामित्यादि प्रतिपाद-यिष्यति । ननु च अभयं सर्वभूतेभ्यो दत्त्वा नैष्कर्म्यमाचरे-दित्यादौ कर्तव्यकर्मसंन्यासादपि नैष्कर्म्यप्राप्तिं दर्शयति

---

पुरुषाला प्राप्त न होण्याचें कारण काय ह्मणून विचाराल तर सांगतों. कर्मा-नुष्ठान हाच नैष्कर्म्यावस्था प्राप्त होण्याचा उपाय आहे आणि उपायानेंच प्राप्त होणारी जी गोष्ट आहे तिची प्राप्ति उपायावांचून होत नाहीं. नैष्कर्म्य जो ज्ञानयोग तो प्राप्त होण्याला कर्मयोग हा उपाय आहे. श्रुती-मध्यें आणि ह्या गीतेमध्येंही असेंच सांगितलें आहे. श्रुतीमध्यें " कर्म-कांडाच्या योगानें ब्राह्मण त्या आत्म्याला जाणण्याची इच्छा करितात वगैरे मजकुरानें कर्मयोग हा ज्ञानयोगाचा उपाय असल्याचें सांगितलें आहे आणि ह्या गीतेंतही " हे महाबाहो, कर्मयोगावांचून संन्यास प्राप्त होणें दुर्घट आहे; फलाविषयीं आसक्ति न धरितां अंतःकरण-शुद्धि व्हावी एतदर्थ कर्मठ लोक कर्म करीत असतात. यज्ञ, दान आणि तप हीं कर्में फलेच्छा न धरणाऱ्या विचारी लोकांच्या अंतःकर-णशुद्धीला कारणीभूत होणारीं आहेत " इत्यादि प्रकारानें भगवा-नांनीं पुढें सांगितलें आहे. आतां सर्व भूतांना अभय देऊन नैष्कर्म्याचें अवलंबन करावें इत्यादि प्रकारच्या वचनामध्यें कर्तव्यकर्माच्या त्यागा-नेंच नैष्कर्म्यप्राप्ति होत असल्याचें दर्शविलें असून व्यवहारामध्येंही कर्मा-

**लोके च कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यमिति प्रसिद्धतरमतश्च नैष्कर्म्यार्थिनः किं कर्मारम्भेणेति प्राप्तमत आह न च संन्यसनादेवेति। नापि संन्यसनादेव केवलात्कर्मपरित्यागमात्रादेव ज्ञानरहितात्सिद्धिं नैष्कर्म्यलक्षणां ज्ञानयोगेन निष्ठां समधिगच्छति न प्राप्नोति ॥ ४ ॥**

---

नुष्ठानाचा अभाव ह्मणून नैष्कर्म्य हें चांगलें प्रसिद्ध आहे. तेव्हां, नैष्कर्म्येच्छु पुरुषाला कर्मानुष्ठानाचा उपयोग काय ? अशी शंका ह्या ठिकाणीं येईल ह्मणून भगवानांनीं 'न च संन्यसनादेव' हें उत्तरार्ध सांगितलें आहे, ( व त्याचा अर्थ ) संन्यासाच्याच योगानें ह्मणजे ज्ञानरहित अशा केवल कर्मपरित्यागाच्याच योगानें नैष्कर्म्यलक्षणसिद्धि ह्मणजे ज्ञानयोगानें निष्ठा पुरुषाला प्राप्त होत नाहीं ( असा आहे ) ४.

( उत्तरमीमांसेंतील तिसऱ्या अध्यायांतल्या चवथ्या पादांतील सहाव्या अधिकरणाचा ह्या चवथ्या श्लोकांत सांगितलेल्या मजकुराशीं संबंध आहे असें वाटतें. करितां, हा श्लोक व ह्यावरील भाष्य ह्यांचा आशय वाचकांच्या नीट लक्ष्यांत यावा ह्मणून सदहू अधिकरणांतील सूत्रें व त्यावरील आचार्यांचें भाष्य मराठी तात्पर्यासह पुढें देतों. )

---

# सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत् ॥ २६ ॥

इदमिदानीं चिन्त्यते किं विद्याया अत्यन्तमेवानपेक्षाश्रमकर्मणामुतास्ति काचिदपेक्षेति । तत्रात एवाग्नीन्धनादीन्याश्रमकर्माणि विद्यायाः स्वार्थसिद्धौ नापेक्ष्यन्त एवमत्यन्तमेवानपेक्षायां प्राप्तायामिदमुच्यते सर्वापेक्षा चेति । अपेक्षते च विद्या सर्वाण्याश्रमकर्माणि नात्यन्तमनपेक्षैव । ननु विरुद्धमिदं वचनमपेक्षते चाश्रमकर्माणि विद्या नापेक्षते चेति । नेति ब्रूमः । उत्पन्ना हि विद्या फलसिद्धिं प्रति न किंचिदन्यदपेक्षत उत्पत्तिं प्रति त्वपेक्षते । कुतः । यज्ञादिश्रुतेः । तथा हि श्रुतिस्तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन

आतां ज्ञानाला आश्रमकर्मांची मुळींच गरज नाहीं किंवा कांहीं गरज आहे ह्याचा विचार करूं. प्रथमतः अग्नींधनप्रभृति कर्मांची ज्ञानाला स्वार्थसिद्धीकरितां अपेक्षा नाहीं अशी पूर्वींच्या अधिकरणावरून कोणाला शंका येईल ती न यावी ह्मणून ‘ सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत् ’ हें अधिकरण सांगितलें आहे; आणि विद्येला सर्व आश्रमकर्मांची जरूर आहे; मुळींच जरूर नाहीं असें नाहीं. हें त्या अधिककरणांतील तात्पर्य आहे. आतां पूर्वींच्या अधिकरणाकडे लक्ष्य दिलें असतां ज्ञानाला आश्रमकर्मांची अपेक्षा नाहीं असें होत असून ह्या अधिकरणामध्यें ज्ञानाला आश्रमकर्मांची अपेक्षा असल्याचें सांगितलें आहे ह्मणावें तर पूर्वापरविरुद्ध दिसतें. अशी शंका कोणी करील परंतु, ती बरोबर नाहीं असें आह्मी ह्मणतों. ज्ञान उत्पन्न झालें असतां त्याची फलसिद्धि जी मोक्षप्राप्ति तिला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं; परंतु, ज्ञानोत्पत्ति होण्याला आश्रमकर्मांची अपेक्षा आहे. कां ह्मणाल तर ‘ तमेतं० नाशकेन ’ अशी श्रुति आहे आणि ह्या श्रुतीमध्यें यज्ञादिकांना ज्ञान-

दानेन तपसानाशकेनेति यज्ञादीनां विद्यासाधनभावं दर्शयति । विविदिषासंयोगाच्चैषामुत्पत्तिसाधनभावोवसीयते । अथ यद्यज्ञ इत्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तदित्यत्र विद्यासाधनभूतस्य ब्रह्मचर्यस्य यज्ञादिभिः संस्तवाद्यज्ञादीनामपि हि साधनभावः सूच्यते । सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति। यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीमीत्येवमाद्या च श्रुतिराश्रमकर्मणां विद्या साधनभावं सूचयति । स्मृतिरपि कषायपक्तिः कर्माणि ज्ञानं तु परमा गतिः । कषाये कर्मभिः पक्वे ततो ज्ञानं प्रवर्तत इत्येवमाद्या । अश्ववदिति योग्यतानिदर्शनम् । तथा च योग्यतावशेनाश्वो न लाङ्गलाकर्षणे युज्यते रथचर्यायां तु युज्यत एवमाश्रमकर्माणि विद्यया फलसिद्धौ नापेक्ष्यन्त उत्पत्तौ चापेक्ष्यन्त इति ॥ २६ ॥

---

साधन ह्मटलें आहे व 'विविदिषन्ति' ह्या शब्दावरून यज्ञादिक ज्ञानाच्या उत्पत्तीला साधन आहेत, हें निश्चित होत आहे व 'अथ यद्यज्ञ० तत्' ह्या छांदोग्य श्रुतीमध्येंही ज्ञानसाधनभूत ब्रह्मचर्याचा यज्ञादिकांनींच निर्देश केला असल्यामुळें यज्ञादिकांनाही ज्ञानसाधनत्व असल्याचें सूचित होत आहे. 'सर्वे वेदा० संग्रहेण ब्रवीमि' इत्यादि प्रकारची काठकश्रुतिही आश्रमकर्मांना ज्ञानसाधनत्व असल्याचें सुचवीत आहे व त्याचप्रमाणें 'कषायपक्तिः कर्माणि० ततो ज्ञानं प्रवर्तते' इत्यादि प्रकारची स्मृतिही कर्मं परंपरेनें ज्ञानसाधन असल्याचें दर्शवीत आहे. 'अश्ववत्' हें सूत्रांतील पद योग्यता दर्शविण्याच्या उद्देशानें आहे आणि "योग्यतेनें पाहूं गेलें असतां ज्याप्रमाणें अश्वाचा उपयोग नांगर ओढण्याकडे करणें योग्य नसून रथ ओढण्याकडे करणें योग्य आहे. त्याचप्रमाणें आश्रमकर्मांची फलसिद्धीकरितां ज्ञानाला अपेक्षा नसून उत्पत्तीकरितां आहे हा त्या पदाचा आशय आहे ॥ २६ ॥

**शमदमाद्युपेतः स्यात्तथापि तु तद्विधेस्त-दङ्गतया तेषामवश्यानुष्ठेयत्वात् ॥२७॥६॥**

यदि कश्चिन्मन्येत यज्ञादीनां विद्यासाधनभावो न न्याय्यो विध्यभावात् । यज्ञेन विविदिषन्तीत्येवंजातीयका हि श्रुति-रनुवादस्वरूपा विद्याभिष्ठवपरा । इत्थं महाभागा विद्या यद्य-ज्ञादिभिरेतामवाप्तुमिच्छन्तीति । तथापि तु शमदमाद्युपेतः स्याद्विद्यार्थी । तस्मादेवंविच्छान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यतीति विद्यासाधनत्वेन शमदमादीनां विधानाद्विहितानां चावश्यानुष्ठेयत्वात् । नन्व-त्रापि शमाद्युपेतो भूत्वा पश्यतीति वर्तमानापदेश उपलभ्यते न विधिः । नेति ब्रूमः । तस्मादिति प्रकृतप्रशंसापरिग्रहा-

यज्ञादिकांना ज्ञानसाधनत्व असणें योग्य नाहीं. कारण, यज्ञादिकां-विषयीं विधि नाहीं. 'यज्ञेन विविदिषन्ति' इत्यादि प्रकारची श्रुति अनु-वादरूप आहे आणि "अशाप्रकारें विद्याही मोठी योग्य आहे. कारण, यज्ञादिकांच्या योगानें लोकही प्राप्त होण्याची इच्छा करीत असतात." ह्याप्रमाणें ज्ञानाची प्रशंसा करण्याकडे सदर्हू श्रुतीचें तात्पर्य आहे, असें जरी एकाद्याला वाटलें ( आणि त्याचें तें वाटणें जरी समजुतीकरितां खरें ह्मणून घटकाभर गृहीत धरिलें ) तरी "तस्मादेवंविच्छान्तो दान्त उपरत० पश्यति" ह्या बृहदारण्यक श्रुतीमध्यें ज्ञानसाधन ह्या नात्यानें शमदमादिकांचें विधान केलें असल्यामुळें आणि विहित अशा शम-दमादिकांचें अनुष्ठान करणें अवश्य असल्यामुळें ज्ञानेच्छु पुरुषानें शम-दमादिकांनीं युक्त झालेंच पाहिजे. आतां "ह्या बृहदारण्यक श्रुतीम-ध्येंही शमदमादिकांनीं युक्त होऊन जाणितो असा वर्तमाननिर्देश उप-लब्ध होत आहे; विधि उपलब्ध होत नाहीं" असें ह्मणावें तर तें बरो-

द्विधित्वप्रतीतेः । पश्येदिति च माध्यंदिना विस्पष्टमेव विधिमधीयते । तस्माद्यज्ञाद्यनपेक्षायामपि शमादीन्यपेक्षितव्यानि । यज्ञादीन्यपि त्वपेक्षितव्यानीति यज्ञादिश्रुतेरेव । ननूक्तं यज्ञादिभिर्विविदिषन्तीत्यत्र न विधिरुपलभ्यत इति । सत्यमुक्तं तथापि त्वपूर्वत्वात्संयोगस्य विधिः परिकल्पते । न ह्ययं यज्ञादीनां विविदिषासंयोगः पूर्वं प्राप्तो येनानूद्येत । तस्मात्पूषा प्रपिष्टभागोदन्तको हीत्येवमादिषु चाश्रुतविधिकेष्वपि

---

बर नाहीं असें आह्मी ह्मणतों. कारण, ( ज्याअर्थी ह्याप्रमाणें आत्म्याला जाणून पुरुष पापकर्मानें युक्त होत नाहीं ) त्याअर्थी ह्याप्रमाणें आत्मज्ञानेच्छु पुरुषानें शमादिकांनीं युक्त होऊन आत्मविचार करावा असा विधि असल्याचें दिसतें. कारण, ‘ तस्मात् ’ ह्या पदानें प्रकृत जी आत्मज्ञानाची प्रशंसा तिचा परिग्रह होत आहे. शिवाय, काण्वपाठामध्यें जरी स्पष्ट विधि असल्याचें दिसत नाहीं तरी माध्यंदिन पाठामध्यें ‘ पश्यति ’ ह्या पदाचे ठिकाणीं ‘ पश्येत् ’ असें विधिबोधक पद स्पष्ट आहे. तस्मात् , यज्ञादिकांची ज्ञानाला अपेक्षा नाहीं असें जरी घटकाभर भलतेंच गृहीत धरिलें तरी शमादिकांची अपेक्षा असल्याचें सिद्ध आहे. यज्ञादिकांची ज्ञानोत्पत्तीला अपेक्षा आहे हें तर तद्विषयक श्रुतीवरूनच ( ह्मणजे ‘तमेतं वेदानुवचनेन० नाशकेन ’ ह्या बृहदारण्यक श्रुतीवरूनच ) सिद्ध आहे. आतां “ विविदिषन्ति ज्ञानेन ” ह्या श्रुतीमध्यें विधि उपलब्ध होत नाहीं असें पूर्वीं ह्मटलें आहे तेव्हां हें कसें? ” ह्मणून विचाराल तर सांगतों. त्या ठिकाणीं विधि उपलब्ध होत नाहीं असें पूर्वीं ह्मटलें खरें; तथापि संबंधाच्या अपूर्वत्वामुळें ह्या ठिकाणीं विधीची कल्पना करणें अवश्य आहे. कारण, ज्ञानेच्छेशीं हा यज्ञादिकांचा संबंध पूर्वीं प्राप्त झालेला नाहीं ह्मणून ह्या ठिकाणीं अनुवाद आहे असें होत नाहीं. “ तस्मात्पूषा प्रपिष्टभागोदन्तको हि ” इत्यादि प्रकारच्या

वाक्येष्वपूर्वत्वाद्विधिं परिकल्प्य पौष्णं पेषणं विकृतौ प्रतीयेते-त्यादिविचारः प्रथमे तन्त्रे प्रवर्तितः । तथा चोक्तं विधिर्वा धारणवदिति । स्मृतिष्वपि भगवद्गीताद्यास्वनभिसंधाय फल-मनुष्ठितानि यज्ञादीनि मुमुक्षोर्ज्ञानसाधनानि भवन्तीति प्रप-ञ्चितम् । तस्माद्यज्ञादीनि शमदमादीनि च यथाश्रमं सर्वा-ण्येवाश्रमकर्माणि विद्योत्पत्तावपेक्षितव्यानि । तत्राप्येवंविदिति विद्यासंयोगात्प्रत्यासन्नानि विद्यासाधनानि शमादीनि विविदिषासंयोगात्तु बाह्यतराणि यज्ञादीनीति विवेक्त-व्यम् ॥ २७ ॥ ६ ॥

---

वाक्यांमध्यें विधि श्रुत नसतांनाही अपूर्वत्वामुळें विधीची कल्पना करून पूषदेवतेसंबंधीं पेषण विकृतीमध्यें समजावें. इत्यादि प्रकारचा विचार पूर्वमीमांसेमध्यें केलेला आहे आणि त्याचप्रमाणें ‘ विधिर्वा धारणवत् ’ ह्मणून ह्याच पादांतील दुसऱ्या अधिकरणामध्यें सूत्रकारांनींही ह्मटलें आहे; व फलाची इच्छा न धरितां केलेली यज्ञादि कर्मे मुमुक्षूंच्या ज्ञानोत्पत्तीला साधन होतात ह्मणून भगवद्गीताप्रभृति स्मृतींमध्येंही सविस्तर प्रतिपादन केलें आहे. तस्मात्, यज्ञादिक आणि शमदमादिक सर्व आश्रमकर्में ज्या त्या आश्रमाला अनुसरून ज्ञानोत्पत्तीकरितां अवश्य केलीं पाहिजेत. त्यांत सुद्धां शमदमादिकांचा प्रत्यक्ष ज्ञानाशीं संबंध असल्यामुळें तीं अंतरंग ज्ञानसाधनें आहेत आणि यज्ञादिकांचा ज्ञानेच्छेशीं संबंध असल्यामुळें तीं ज्ञानसाधनें बाह्य आहेत असा भेद मानणें अवश्य आहे ॥ २७ ॥ ६ ॥

( ह्या श्लोकाचें व्याख्यान ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे. वांचोनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईजेना ॥ ४५ ॥ कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होईजे । हे अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥ सांगें पैलतीरा जावें ।

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ॥**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

---

**कस्मात्पुनः कारणात्कर्मसंन्यासमात्रादेव ज्ञानरहितात्सिद्धिं नैष्कर्म्यलक्षणां पुरुषो नाधिगच्छतीति हेत्वाकाङ्क्षायामाह नहि॰ गुणैः ॥ ५ ॥ न हि यस्मात्क्षणमपि कालं जातु कदाचित्कश्चित्तिष्ठत्यकर्मकृत्सन् । कस्मात् । कार्यते हि यस्मादवश एव कर्म सर्वः प्राणी प्रकृतिजैः प्रकृतितो**

---

ऐसें व्यसन कां जेथ पावे । तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ॥ ४७ ॥ ना तरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसेनि पाक न कीजे । कीं सिद्धही न सेविजे । केवि सांगें ॥ ४८ ॥ जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापार असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजे ॥ ४९ ॥ ह्मणोनि आईकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था । तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥ आणि आपुलालिये चाडे । आपादिलें हें मोडे । कीं त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे ॥ ५१ ॥ हें वायांचि सैरा बोलिजे । उकल तरी देखोनि पाहिजे । परी त्यजितां कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥

ज्याअर्थी प्रकृतिजन्य गुण परतंत्र अशा प्राणिमात्राकडून कर्म करवितात त्याअर्थी कर्म न करितांना क्षणभर देखील कधींही कोणाला राहतां येत नाहीं ॥ ५ ॥

ज्ञानरहित अशा केवल कर्मत्यागाच्याच योगानें नैष्कर्म्यरूप सिद्धि पुरुषाला प्राप्त न होण्याचें कारण काय ह्मणून अर्जुनाला हेतूविषयीं आकांक्षा उत्पन्न होईल ह्मणून श्रीकृष्ण सांगतात. प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्त्व, रज आणि तम हे गुण अज्ञानी अशा प्राणिमात्राला आपल्या अधीन करून घेऊन त्याच्या हातून कर्म करवितात. तस्मात्, कोणीही अज्ञ पुरुष एक क्षणभर सुद्धां कर्म न करितां कधींही रहात नाहीं.

**जातैः सत्त्वरजस्तमोभिर्गुणैः । अज्ञ इति वाक्यशेषो यतो वक्ष्यति गुणैर्यो न विचाल्यत इति । सांख्यानां पृथक्करणादज्ञानामेव हि कर्मयोगो न ज्ञानिनाम् । ज्ञानिनां तु गुणैरचाल्यमानानां स्वतश्चलनाभावात्कर्मयोगो नोपपद्यते । तथा च व्याख्यातं वेदाविनाशिनमित्यत्र ॥ ५ ॥**

---

उत्तरार्धामध्यें ' सर्वः ' ह्या पदापुढें ' अज्ञः ' हें पद अध्याहृत समजावें. कारण, गुणांच्या योगानें जो ढळला जात नाहीं असें पुढें चवदाव्या अध्यायामध्यें ह्मटलें आहे. ह्याच अध्यायांतील तिसऱ्या श्लोकामध्यें सांख्यांचें ह्मणजे ज्ञानी पुरुषांचें पृथक्करण केलें असल्यामुळें अज्ञानी पुरुषांनाच कर्मयोग अवश्यक असून ज्ञानी पुरुषांना तो नसल्याचें सिद्ध होत आहे. सत्त्वप्रभृति गुणांच्या योगानें वृत्तीपासून ढळले न जाणारे ज्ञानी पुरुष स्वतः ढळण्याचा संभव नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं कर्म योग असणें संभवत नाहीं. आणि त्याचप्रमाणें ' वेदाविनाशिनम् ' ह्या श्लोकाचे वेळीं व्याख्यान केलें आहे ५.

श्रीधरस्वामींनीं "कर्मणां च संन्यासस्तेष्वनासक्तिमात्रं न तु स्वरूपेणाशक्यत्वादित्याह...कश्चिदपि ज्ञानी वाज्ञो वा " असें ह्या श्लोकाचें व्याख्यान केलें आहे; परंतु, तें त्यांचें भाष्यविरुद्ध व्याख्यान अयोग्य आहे. कर्मांचा संन्यास ह्मणजे त्यांचे ठिकाणीं आसक्ति न ठेवणें; प्रत्यक्ष कर्मांचा त्याग असा अर्थ कर्मसंन्यास ह्याचा करूं नये. कारण, तसें होणें अशक्य आहे. ही गोष्ट अर्जुनाला समजविण्याकरितां भगवानांनीं 'न हि कश्चित् ' हा श्लोक सांगितला...कश्चित् ह्मणजे ज्ञानी अथवा अज्ञानी असा कोणताही पुरुष " असा श्रीधरस्वामींच्या अवतरणाचा आशय आहे. हें व्याख्यान चुकीचें आहे व तें ' अज्ञः ' हें पद अध्याहृत घ्यावें लागतें हें भाष्यकारांप्रमाणें श्रीधरस्वामींच्या लक्ष्यांत आलें नसल्यामुळें त्यांच्याहातून झालेलें आहे. आतां प्रत्यक्ष उपलब्ध असलेल्या पदांनीं

श्लोकाचा अर्थ होत असतांना अध्याहारदोष पत्करून श्लोकार्थ करण्याचें कारण काय अशी एक शंका भाष्यकारांच्या व्याख्यानावर कदाचित् येण्याचा संभव आहे; परंतु ती टिकणार नाहीं. कारण, पुरुषाच्या हातून जे कांहीं व्यापार होत असतात त्याला कारण सत्त्व, रज आणि तम हे प्रकृतिजन्य गुण होत. परंतु, ज्ञानी पुरुषाला हे गुण स्वरूपावस्थेपासून च्युत करण्याला समर्थ होत नाहींत. असें चवदाव्या अध्यायांत सांगितलें आहे आणि गुणावांचून स्वस्वरूपीं स्थित असलेला ज्ञानी स्वरूपावस्थेपासून च्युत होण्याचा संभव नाहीं. तेव्हां, अर्थात् त्याच्या हातून कर्म होणारच नाहीं. सारांश, ह्या पांचव्या श्लोकामध्यें भाष्यकारांप्रमाणें ‘ अज्ञः ’ हें पद अध्याहृत घेऊन ह्या श्लोकाचा अर्थ—कोणताही अज्ञानी पुरुष क्षणभर देखील कधींही कर्म न करितां रहात नाहीं. कारण, अज्ञानी अशा प्रत्येक परतंत्र प्रण्याला प्रकृतिजन्य गुण कर्म करायाला लावितातच—असा भाष्यकारांना विवक्षित असल्याप्रमाणें केल्यावांचून गत्यंतरच नाहीं. पुरुष ज्ञानी असो अथवा अज्ञानी असो त्याला एक क्षणभर देखील कर्म न करितां कधींही राहतां येत नाहीं. असें श्रीधरस्वामींचें मत जर खरें मानिलें तर समाधिस्थिति ज्यांत सांगितली आहे असें प्रत्यक्ष योगशास्त्रच व्यर्थ होऊं लागेल. भाष्यकारांची परवा न करितां श्रीधरस्वामींनीं केलेलें हें व्याख्यान त्यांच्याच पुढल्या श्लोकावरील व्याख्यानाशीं विरुद्ध आहे. कारण, पुढल्या श्लोकाला त्यांनींच “ अतोऽज्ञं कर्मत्यागिनं निन्दति ( ह्मणून अज्ञ अशा कर्मत्यागी पुरुषाची भगवान् निंदा करितात ) ” असें अवतरण दिलें आहे. तस्मात्, भगवद्गीतेंतील चवदाव्या अध्यायांतील मजकुरांशीं, योगशास्त्राशीं आणि स्वतःच्याच लेखाशीं विरुद्ध असलेलें हें श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान सर्वस्वीं त्याज्य आहे. खरोखर श्रीधरस्वामींच्या ह्या भाष्यविरुद्ध संस्कृत व्याख्यानापेक्षां भाष्याला अनुसरून असलेलें ज्ञानेश्वर महाराजांचें मराठी व्याख्यान अतिशयच उत्कृष्ट आहे. तें

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ॥**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥६॥**

---

यस्त्वनात्मज्ञश्चोदितं कर्म नारभत इति तदसदेवेत्याह कर्मेन्द्रियाणि० उच्यते ॥ ६ ॥ कर्मेन्द्रियाणि हस्तादीनि

---

येणेंप्रमाणें:—जंव प्रकृतीचें अधिष्ठान । तंव सांडी मांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । अपैसी असे ॥ ५३ ॥ देखे विहित कर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसांडीलें। तरी स्वभाव काय निमाले । इंद्रियांचे ॥ ५४ ॥ सांगें श्रवणी ऐकावें ठेलें । कीं नेत्रींचें तेज गेलें । हें नासारंध्र बुझालें । परिमळ नेघे ॥ ५५ ॥ ना तरी प्राणापानगति । कीं निर्विकल्प जाहली मति । कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटालिया ॥ ५६ ॥ हे स्वप्नावबोध ठेले । कीं चरण चालों विसरलें । हें असो काय निमाले । जन्म मृत्यू ॥ ५७ ॥ हें न ठकेचि जरी कांहीं । तरी सांडिलें एथ तें कायी । ह्मणोनि कर्मत्याग नाहीं । प्रकृतिमंता ॥ ५८ ॥ कर्म पराधीनपणें । निपजत असे प्रकृतिगुणें । येरीं धरीं मोकळीं अंतःकरणें । वाहिजे वायां ॥ ५९ ॥ देखें रथीं आरूढि जे । मग जरी निश्चळ बैसिजे । तरी चळ होऊनि हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥ कां उचलिलें वायुवशें । चळे शुष्क पत्र जैसें । निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ ६१ ॥ तैसे प्रकृति आधारें । कर्मेंद्रिय विकारें । निष्कर्माही व्यापारे । निरंतर ॥ ६२ ॥ ह्मणऊनि संग जंव प्रकृतीचा । तंव त्याग न घडे कर्मांचा । ऐशियाहि करूं ह्मणती तयांचा आग्रहचि उरे ॥ ६३ ॥ )

अंतःकरण शुद्ध झालें नसतांनाही जो पुरुष कर्मेंद्रियांचें संयमन करून मनामध्यें विषयांचें चिंतन करीत राहतो त्याला दुराचारी असें ह्मणतात ॥ ६ ॥

आत्मज्ञान झालें नसतांनाही जो पुरुष विहित कर्माचें अनुष्ठान करीत नाहीं त्या पुरुषाचें तें करणें अयोग्यच आहे. असें भगवानांनीं

यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ॥
कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

---

संयम्य संहृत्य य आस्ते तिष्ठति मनसा स्मरंश्चिन्तयन्निन्द्रियार्थान्विषयान्विमूढात्मा विमूढान्तःकरणो मिथ्याचारो मृषाचारः पापाचारः स उच्यते ॥ ६ ॥

यस्तु पुनः कर्मण्यधिकृतोऽज्ञो बुद्धीन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन कर्मेन्द्रियैर्वाक्पाण्यादिभिः । किमारभत इत्याह कर्मयोगमसक्तः सन्स विशिष्यत इतरस्मान्मिथ्याचारात् ॥ ७ ॥

---

" कर्मेन्द्रियाणि० उच्यते ॥ ६ ॥ " ह्या श्लोकांत सांगितलें आहे. अंतःकरण मोहयुक्त असतांना ( अर्थात् रागद्वेषादिकांनीं मलिन असतांना ) जो पुरुष हस्तप्रभृति कर्मेंद्रियांचें संयमन करून मनामध्यें विषयांचें चिंतन करीत राहतो त्याला दुराचरणी असें ह्मणतात. मिथ्याचार=ज्याचें आचरण खोटें आहे=ज्याचें आचरण पातकावह आहे ६.

( ज्ञानेश्वर महाराज ह्मणतातः—जें उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य हों पाहती । परी कर्मेंद्रियप्रवृत्ति । निरोधुनी ॥ ६४ ॥ तयां कर्मत्याग न घडे । जे कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती ते फुडें । दरिद्र जाण ॥ ६५ ॥ ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा । वोळखावे तत्त्वता । भ्रांति नाहीं ॥ ६६ ॥ )

हे अर्जुना, मनाच्या योगानें ज्ञानेंद्रियांचें संयमन करून कर्मेंद्रियांच्या योगानें जो कर्मयोगाचें अनुष्ठान आसक्त न होतां करितो तो अधिक होय ॥ ७ ॥

हे अर्जुना, जो कर्माधिकारी अज्ञ पुरुष मनाच्या योगानें ज्ञानेंद्रियांचें संयमन करून वाणी, हस्त इत्यादि कर्मेंद्रियांनीं कर्मयोगाचें अनुष्ठान विषयासक्त न होतां करितो तो इतर जो मिथ्याचरणी पुरुष त्यापेक्षां श्रेष्ठ होय. कशाचें अनुष्ठान करितो ही शंका न रहावी ह्मणून

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ॥
शरीरयात्रापि च ते न प्रसिध्येदकर्मणः ॥ ८ ॥

---

यत एवमतः नियतं० दकर्मणः ॥ ८ ॥ नियतं नित्यं यो यस्मिन्कर्मण्यधिकृतः फलाय चाश्रुतं तन्नियतं कर्म तत्कुरु त्वं हेऽर्जुन । यतः कर्मज्यायोधिकतरं फलतो हि यस्मादकर्मणोकरणादनारम्भात् । कथं शरीरयात्रापि शरीरस्थितिरपि च ते तव न प्रसिध्येत्प्रसिद्धिं न गच्छेदकर्मणोकरणात् । अतो दृष्टः कर्माकर्मणोर्विशेषो लोके ॥ ८ ॥

---

ह्या ठिकाणीं ' कर्मयोगं ' हें पद भगवानांनीं स्पष्ट घातलेले आहे ७.

( नीलकंठ पंडितांनीं आणि विकल्पानें मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकांतील ' मनसा ' ह्या पदाचें व्याख्यान ' मनसा सह ' असें भाष्यविरुद्ध केलें आहे; परंतु तें बरोबर नाहीं. कारण, पूर्वींच्या श्लोकामध्यें ज्याप्रमाणें मनाला साधनत्व आहे त्याप्रमाणें ह्याही श्लोकांत असणें इष्ट आहे, तें रहात नाहीं आणि कारण नसतांना सहशब्दाचा अध्याहार करावा लागतो. असो. ७ )

अरे तूं नित्य कर्म करीत जा. कारण, कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें अधिक चांगलें. अरे, कर्म केल्यावांचून तुझा देहही चालणार नाहीं॥८॥

( कर्मेंद्रियांचें संयमन करून मनामध्यें विषयांचें चिंतन करीत राहणाऱ्या पापी पुरुषापेक्षां ज्ञानेंद्रियांचें मनानें संयमन करून कर्मेंद्रियांच्या योगानें, फलासक्ति न धरितां, कर्मानुष्ठान करणारा श्रेष्ठ. ) असें ज्याअर्थीं आहे त्याअर्थीं, हे अर्जुना, तूं नित्य कर्म कर. जो ज्या कर्माविषयीं अधिकृत असतो आणि ज्या कर्माचें फल श्रुत नसतें तें नियत ह्मणजे नित्य कर्म होय. तें कर्म, हे अर्जुना, तूं कर. कारण, फलाच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां; कर्माचें अनुष्ठान न करण्यापेक्षां कर्म ( अर्थात् कर्मानुष्ठान ) श्रेष्ठ आहे. कसें ह्मणशील तर सांगतों.

**यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र लोकोयं कर्मबन्धनः ॥**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥**

---

**यच्च मन्यसे बन्धार्थत्वात्कर्म न कर्तव्यमिति तदप्यसत् । कथम् । यज्ञार्थां० समाचर ॥ ९ ॥ यज्ञो वै विष्णुरिति श्रुतेर्यज्ञ ईश्वरस्तदर्थं यत्क्रियते तद्यज्ञार्थं कर्म तस्मात्कर्मणोन्यत्रान्येन कर्मणा लोकोयमधिकृतः कर्मकृत्कर्मबन्धनः कर्म बन्धनं यस्य सोयं कर्मबन्धनो लोको न तु यज्ञार्थादतस्तदर्थं यज्ञार्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः कर्मफलसङ्गवर्जितः सन्समाचार निर्वर्तय ॥ ९ ॥**

---

अरे, कर्म केल्यावांचून तुझी शरीरस्थितिही कायम राहणार नाहीं. तस्मात् , कर्म आणि कर्माभाव ह्यांतील भेद लोकांमध्यें प्रसिद्धच आहे ८.

हे कुंतीपुत्रा अर्जुना, ईश्वरप्रीत्यर्थ कर्मावांचून हे कर्माधिकारी लोक दुसरें कर्म करूं लागले असतां तेंच कर्म त्यांच्या बंधाला कारण होतें. ह्यास्तव, तूं फलाविषयीं आसक्ति न धरितां ईश्वरप्रीत्यर्थ कर्म कर ॥९॥

बंध हें कर्माचें फल असल्यामुळें कर्म करूं नये, असें जें तुला वाटतें तेंही अयोग्य आहे. कसें ह्मणशील तर सांगतों. ईश्वराकरितां जें कर्म त्याशिवाय इतर कर्माच्या योगानें हे कर्माधिकारी लोक कर्म करूं लागले असतां त्याच कर्मरूप बंधनानें ते युक्त होतात. ईश्वराकरितां केलेल्या कर्मानें ते कर्मबद्ध होत नाहींत. ह्यास्तव, हे कुंतीपुत्रा, तूं मुक्तसंग होऊन ह्मणजे कर्मफल प्राप्त होण्याविषयीं आसक्ति न धरून कर्म करीत जा. यज्ञ हाच विष्णु अशी श्रुति असल्यामुळें यज्ञशब्दाचा अर्थ ईश्वर असा होतो व ह्मणून ‘ यज्ञार्थ कर्म ’ ह्याचा अर्थ ईश्वराकरितां केलें जाणारें कर्म असा होतो. ‘ कर्मबंधनः ’ ह्या विशेषणाचा अर्थ कर्म हेंच ज्याचें बंधन आहे असा होतो ९.

( ज्ञानेश्वरमहाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान पुढीलप्रमाणें केलें

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ॥
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥

इतश्चाधिकृतेन कर्म कर्तव्यं सह० कामधुक् ॥ १० ॥ सहयज्ञा यज्ञसहिताः प्रजास्त्रयो वर्णास्ताः सृष्ट्वोत्पाद्य पुरा सर्गादावुवाचोक्तवान्प्रजापतिः प्रजानां स्रष्टा । अनेन यज्ञेन प्रसविष्यध्वं प्रसवो वृद्धिरुत्पत्तिस्तां कुरुध्वम् । एष यज्ञो वो युष्माकमस्तु भवत्विष्टकामधुक् । इष्टानभिप्रेतान्कामान्फलविशेषान्दोग्धीतीष्टकामधुक् ॥ १० ॥

आहे:—स्वधर्म जो बापा । तोचि नित्य यज्ञ जाण पां । ह्मणोनि वर्ततां तेथ पापा । संचार नाहीं ॥ ८१ ॥ हा निजधर्म जैं सांडे । आणि कुकर्मीं रति घडे । तैंचि बंध पडे । सांसारिक ॥ ८२ ॥ ह्मणोनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञ याजन । जो करी तया बंधन । कांहींचें न घडे ॥ ८३ ॥ हा लोक कर्में बांधिला । जो परतंत्रा भुलला । तो नित्य यज्ञातें चुकला । ह्मणोनिया ॥ ८४ ॥ ९ )

पूर्वी यज्ञासहवर्तमान प्रजा उत्पन्न करून ब्रह्मदेव त्यांना ह्मणाला " ह्याच्या योगानें तुह्मी आपली उत्तरोत्तर अभिवृद्धि करून घ्या. हा यज्ञ तुमच्या इच्छा परिपूर्ण करील " ॥ १० ॥

ह्मणून कर्माधिकारी पुरुषानें कर्म केलेंच पाहिजे. कारण, पूर्वी सृष्टि उत्पन्न करितेवेळीं प्रजाधिपतीनें ह्मणजे प्रजा उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवानें प्रजा ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे तीन वर्ण उत्पन्न करून त्यांना सांगितलें " ह्या यज्ञाच्या योगानें तुह्मी आपली वृद्धि करून घ्या. हा यज्ञ तुह्मांला अभिमत असलेलीं फलें देईल. इष्ट= मनामध्यें आणिलेलें. काम=फलें १०.

( ज्ञानेश्वरमहाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहे:— आतां येचि विषयीं पार्था । तुज सांगेन एक मी कथा । जैं सृष्ट्यादि

देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ॥
परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

---

कथं देवा० मवाप्स्यथ ॥ ११ ॥ देवानिन्द्रादीन्भावयत वर्धयतानेन यज्ञेन ते देवा भावयन्त्वाप्याययन्तु वृष्ट्यादिना वो युष्मानेवं परस्परमन्योन्यं भावयन्तः श्रेयः परं मोक्षलक्षणं

---

संस्था । ब्रह्मेनें केली ॥ ८५ ॥तैं नित्य याग सहितें । सृजिलीं भूतें समस्तें । परि नेणतींचि तियें यज्ञातें । सूक्ष्म ह्मणउनी ॥ ८६ ॥ ते वेळीं प्रजीं विनाविला ब्रह्मा । देवा काय आश्रयो एथ आह्मां । तंव ह्मणे तो कमळजन्मा । भूतांप्रति ॥ ८७ ॥ तुह्मां वर्णविशेषवशें। आह्मीं हा स्वधर्म विहिला असे । यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥ ८८ ॥ तुह्मी व्रत नियम न करावें । शरीरातें न पीडावें । दूरिकेंही न वचावें । तीर्थासि गा ॥ ८९ ॥ योगादिकें साधनें । साकांक्ष आराधनें । मंत्र यंत्र विधानें । ह्मणी करा ॥ ९० ॥ देवतांतरां न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें । तुह्मी स्वधर्मयज्ञीं यजावें । अनायासें ॥ ९१ ॥ अहेतुकें चित्तें । अनुष्ठायां यातें । पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ९२ ॥ तैसा स्वधर्मरूप मख । हाचि सेव्य तुह्मां एक । ऐसें सत्यलोकनायक । बोलतां जाहला ॥ ९३ ॥ देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु हा होईल । मग प्रजा हो न सांडील । तुमतें कदां ॥ ९४ ॥ १०. )

ह्या यज्ञाच्या योगानें तुह्मी देवांना तृप्त करा ह्मणजे ते तुमची अभिवृद्धि करितील आणि ह्याप्रमाणें परस्परांना वृद्धिंगत करणारे तुह्मी उत्कृष्ट प्रकारचें कल्याण प्राप्त करून घ्याल ॥ ११ ॥

यज्ञ इष्ट फल देणारा कसा ह्मणून विचाराल तर सांगतों. इंद्रादि देवांना तुह्मी ह्या यज्ञाच्या योगानें वृद्धिंगत करा ( अर्थात् तृप्त करा); ह्मणजे ते वृष्टि वगैरेंच्या योगानें तुमची अभिवृद्धि करितील. ह्याप्रमाणें परस्परांना तुह्मी वृद्धिंगत करूं लागला असतां ज्ञानप्राप्तीच्या द्वारानें

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ॥
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

---

ज्ञानप्राप्तिक्रमेणावाप्स्यथ स्वर्गं वा परं श्रेयोवाप्स्यथ ॥ ११ ॥

किंच । इष्टान्भोगा० स्तेन एव सः ॥ १२ ॥ इष्टानभिप्रेतान्भोगान्हि वो युष्मभ्यं देवा दास्यन्ते वितरिष्यन्ति स्त्रीपशुपुत्रादीन् । यज्ञभाविता यज्ञैर्वर्धितास्तोषिता इत्यर्थः । तैर्देवैर्दत्तान्भोगानप्रदायादत्त्वानृण्यमकृत्वेत्यर्थः । एभ्यो देवेभ्यो यो भुङ्क्ते स्वदेहेन्द्रियाण्येव तर्पयति स्तेन एव तस्कर एव स देवादिस्वापहारी ॥ १२ ॥

---

तुह्मांला उत्कृष्ट प्रकारचें ( मोक्षसंज्ञक ) कल्याण प्राप्त होईल अथवा स्वर्गरूप उत्कृष्ट कल्याण प्राप्त होईल ११.

( ह्या श्लोकाचें व्याख्यान ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुढील प्रमाणें केलें आहे:—जैं येणें करूनि समस्तां । परितोष होईल देवतां । मग ते तुह्मा ईप्सितां । अर्थाते देती ॥ ९५ ॥ या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्तां । योगक्षेम निश्चिता । करिती तुमचा ॥ ९६ ॥ तुह्मी देवातें भजाल । देव तुह्मां तुष्टतील । ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ९७ ॥ तेथ तुह्मी जें करूं ह्मणाल । तें आपैसें सिद्धी जाईल । वांच्छितही पुरेल । मानसींचें ॥ ९८ ॥ वाचा सिद्धि पावाल । आज्ञापक होआल । ह्मणिये तुमतें मागतील । महाऋद्धि ॥ ९९ ॥ ११ )

यज्ञानें संतुष्ट केलेले देव तुह्मी इच्छिलेले भोग तुह्मांला देतील. त्या देवांनीं दिलेल्या भोग्य वस्तूंचा त्यांना न देतां जो उपभोग घेतो तो चोरच समजावा ॥ १२ ॥

यज्ञांच्या योगानें संतुष्ट केलेले देव तुह्मीं इच्छिलेले भोग ह्मणजे स्त्रिया, पशु, पुत्र इत्यादि तुह्मांला देतील. परंतु, ( त्या भोगांची फेड तुह्मांला केली पाहिजे. कारण, ) देवांनीं दिलेल्या त्या भोगांचा उपभोग त्या देवांना न देतां ह्मणजे त्यांचे उतराई न होतां जो घेतो अर्थात्

आपला देह आणि इंद्रियें ह्यांनाच केवळ जो तृप्त करितो तो देवादिकांचें द्रव्य हरण करणारा असा तस्करच होय १२.

( भाष्यांतील ‘ आनृण्यमकृत्वा ’ ह्या पदांचें स्पष्टीकरण आनंदगिरींनीं—‘ देवानामृषीणां पितॄणां च यज्ञेन ब्रह्मचर्येण प्रजया च संतोषमनापाद्य ’ ह्मणजे देव ऋषि आणि पितर ह्यांना अनुक्रमें यज्ञानें ब्रह्मचर्यानें आणि संतानानें संतुष्ट न करितां—असा केला आहे. परंतु, भाष्यांतील ‘ आनृण्यमकृत्वा ’ ह्या पदांचा अर्थ “उतराई न होतां” एवढाच ह्या ठिकाणीं विविक्षित आहे. स्त्री, पशु, पुत्र इत्यादि भोग देव देतात असें भाष्यकारांनीं ह्मटलें आहे आणि ह्या भोगांचा देवांना न देतां जो उपभोग घेतो, असा मूळ श्लोकांतील ‘ अप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते ’ ह्या पदांचा अर्थ उत्तान होतो; परंतु, स्त्री, पशु, पुत्र इत्यादिकांचा देवांना दिल्यावांचून जो उपभोग घेतो असा विचित्र अर्थ सदहू पदांचा उत्तान अर्थ घेतला असतां होत असल्यामुळें ‘ अप्रदायैभ्यः ’ ह्या पदांचा अर्थ भाष्यकारांनीं “ देवांचें उतराई न होतां ” असा केला आहे. ही गोष्ट टीकाकार आनंदगिरींच्या लक्ष्यांत न आल्यामुळेंच कीं काय कोणजाणें ‘ ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येणर्षिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्य एष वा अनृणो यः पुत्री यज्वा ब्रह्मचारिवासी ’—ब्राह्मण तीन गोष्टींनीं ऋणीच उत्पन्न होतो. ब्रह्मचर्यानें तो ऋषींचा ऋणी असतो; यज्ञानें तो देवांचा ऋणी असतो; आणि प्रजेच्या योगानें पितरांचा ऋणी असतो. तेव्हां पुत्रवान्, यज्ञ करणारा आणि ब्रह्मचर्य केलेला जो असेल तोच अनृणी—ही तैत्तिरीय श्रुति लक्ष्यांत घेऊन भाष्यकारांनीं ‘ अप्रदाय ’ ह्या पदाचा अर्थ ‘ आनृण्यमकृत्वा ’ असा केला असा टीकाकार आनंदगिरीचा समज झाला असावा व त्याला अनुसरून त्यांनीं भाष्यांतील सदहू दोन पदांचें स्पष्टीकरण वर लिहिल्याप्रमाणें केलें असावें असें वाटतें. परंतु तें बरोबर नाहीं. पंचमहायज्ञांच्या द्वारें उतराई न होतां असा अर्थ भाष्यकारांना विवक्षित आहे

असें वाटतें. असो. पंचमहायज्ञांच्या द्वारें देवांचें उतराई न होतां असा अर्थ ‘ अप्रदायैभ्यः ’ ह्या पदांचा घेऊन ज्ञानेश्वर महाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान भाष्यकारांना अनुसरून मोठ्या मार्मिक रीतीनें केलें आहे तें येणेंप्रमाणें:—जैसें ऋतुमतीचें द्वार । वनश्री निरंतर । वोळगे फळभार । लावण्येसीं ॥ १०० ॥ तैसें सर्वसुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत । येईल देखा काढत । तुह्मांपाठीं ॥ १ ॥ ऐसे समस्त भोगभरित । होआल तुह्मी अनार्त । जरी स्वधर्मैकनिरत । वर्ताल बापा ॥ २ ॥ कीं जालिया सकळ संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा । लुब्ध होऊनियां स्वादा । विषयाचिया ॥ ३ ॥ तिहीं यज्ञभावितीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी । तयां स्वधर्मी सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ ४ ॥ अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन । प्राप्तवेळे भोजन । ब्राह्मणाचें ॥ ५ ॥ विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथी । संतोष नेदील ज्ञाती । आपुलिये ॥ ६ ॥ ऐसा स्वधर्मक्रियारहित । आथिलेंपणें गर्वित । केवळ भोगासक्त । होईल जो ॥ ७ ॥ तया मग अपावो थोर आहे । जेणें तें हातींचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ॥ ८ ॥ जैसें गतायु शरीरीं । चैतन्य वास न करी । कां निर्दैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी ॥ ९ ॥ तैसा स्वधर्म जरी लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला । जैसा दीपासवें पसरला । प्रकाश जाय ॥ ११० ॥ तैसी निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वसती न घडे । आयिका प्रजाहो फुडें । विरंचि ह्मणे ॥ ११ ॥ ह्मणऊनि स्वधर्म जो सांडील । तयाते काळ दंडील । चोर ह्मणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ १२ ॥ मग सकळ दोष भंवते । गिंवसोनि घेती तयातें । रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैसीं ॥ १३ ॥ तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें । दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥ १४ ॥ ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां । कल्पांतींही सर्वथा । प्राणिगण हो ॥ १५ ॥ ह्मणऊनि निजवृत्ति हे न

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ॥**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥१३॥**

---

**ये पुनः यज्ञाशि०णात् ॥ १३ ॥ देवयज्ञादीन्निर्वर्त्य तच्छिष्टमशनममृताख्यमशितुं शीलं येषां ते यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः सर्वपापैश्चुल्ल्यादिपञ्चसूनाकृतैः प्रमादकृतहिंसादिजनितैश्चान्यैः । ये त्वात्मम्भरयो भुञ्जते ते त्वघं पापं स्वयमपि पापा ये पचन्ति पाकं निर्वर्तयन्त्यात्मकारणादात्महेतोः ॥ १३ ॥**

---

सांडावी । इंद्रियें बरळों नेदावीं । ऐसें प्रजांतें शिकवी । चतुरानना॥ १६ जैसें जळचरां जळ सांडे । मग तत्क्षणीं मरण मांडे । हा स्वधर्म तेणें पाडें । विसंबोनये ॥ १७ ॥ ह्मणोनि तुह्मी समस्तीं । आपुलालिया कर्मीं उचितीं । निरत व्हावें पुढत पुढतीं । ह्मणियत असे ॥१८॥१२ )

यज्ञशेष भक्षण करणारे सज्जन सर्व पातकांपासून मुक्त होतात आणि जे दुराचरणी स्वतःकरितांच पाकसिद्धि करितात ते पातकाचा स्वीकार करीत असतात ॥ १३ ॥

देवयज्ञ वगैरे उरकल्यावर अवशिष्ट राहिलेलें अमृतसंज्ञक अन्न भक्षण करण्याचा ज्यांचा स्वभाव ते हा ' यज्ञशिष्टाशिनः ' ह्या पदाचा अर्थ होय. जे यज्ञशेष भक्षण करणारे असतात ते सज्जन असतात आणि तेच सर्व पातकांपासून मुक्त होतात. चूल वगैरे पांच हिंसेचीं कारणें आहेत, त्यांच्या योगानें घडलेलीं पातकें आणि प्रमादमूलक हिंसाजन्य इतर पातकें ह्यांपासून हा ' सर्वकिल्बिषैः ' ह्या पदाचा अर्थ होय. जे केवल स्वतःचेंच पोषण करण्याविषयीं उद्युक्त असतात ह्मणजे जे पुरुष केवल स्वतःकरितांच पाकसिद्धि करितात ते पातकाचाच स्वीकार करितात १३.

(देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ आणि ब्रह्मयज्ञ हे पंचमहा-

यज्ञ होत व भाष्यकारांनीं हेंच दर्शविण्याच्या उद्देशानें ' देवयज्ञादीन् ' असें पद भाष्यांत घातलें आहे. अग्नीमध्यें होमकरणें ह्याला देवयज्ञ ह्मणतात; पितरांच्या उद्देशानें तर्पण व श्राद्ध करणें ह्याला पितृयज्ञ असें ह्मणतात; भूतांना उद्देशून बलिप्रदान करणें ह्याला भूतयज्ञ ह्मण-तात; ब्राह्मणांना भोजन घालणें ह्याला मनुष्ययज्ञ असें ह्मणतात आणि निदान थोडेसें तरी वेदाध्ययन करणें ह्याला ब्रह्मयज्ञ असें ह्मणतात. चूल, पाटावरवंटा, उखळमुसळ, पाण्याचें भांडें आणि केरसुणी हीं पांच हिंसेचीं कारणें आहेत आणि ह्या पांचांनीं होणाऱ्या ज्या हिंसा त्यांना पंचसूना असें ह्मणतात. सूना ह्या शब्दाचा मूळ अर्थ वधस्थान असा आहे. पाकसिद्धीचें साधन चूल हें आहे आणि पाकसिद्धि होत असतांना कांहीं जीव दग्ध होण्याचा संभव आहे ह्मणून चुलीला हिंसेचें कारण असें ह्मटलें आहे. वाटतांना हिंसा होण्याचा संभव आहे ह्मणून पाटा आणि वरवंटा हें जें वाटण्याचें साधन त्याला हिंसेचें साधन असें ह्मटलें. कांडतांना कांहीं जीव चिरडून मरण्याचा संभव आहे ह्मणून उखळ आणि मुसळ हें जें कांडण्याचें साधन त्याला हिंसेचें कारण असें ह्मटलें. पाणी भरतांना कांहीं जीव मरण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें केर काढितांना कांहीं प्राणी मरण्याचा संभव अस-ल्यामुळें केरकाढण्याचें साधन जी केरसुणी तिला हिंसेचें साधन असें ह्मटलें आहे. निष्काळजीपणामुळें न समजतां जी दोषास्पद गोष्ट हातून घडते तो प्रमाद होय. तेव्हां प्रमादकृत हिंसा ह्मणजे काळजी न घेत-ल्यामुळें न समजतां पाय वगैरे पडून होणारी प्राण्यांची हिंसा. ' प्रमा-दकृतहिंसादिजनितैः ' ह्या पदांतील आदिशब्दानें अशुचिस्पर्श वगैरे घ्यावें असें टीकाकार ह्मणतात. श्लोकांतर्गत ' यज्ञशिष्टाशिनः ' ह्या पदांतील यज्ञशब्दाचा अर्थ पंचमहायज्ञ असा आहे. )

( ज्ञानेश्वर महाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहेः—देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि । जो असितये समृद्धि । विनियोग

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ॥**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

---

**इतश्चाधिकृतेन कर्म कर्तव्यम् । जगच्चक्रप्रवृत्तिहेतुर्हि**

---

करी ॥ १९ ॥ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादि-कीं यजी । पितरोद्देशें ॥ १२० ॥ या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेसीं हवन करितां । हुतशेष स्वभावता । उरे जें जें ॥ २१ ॥ तें सुखें आपुलें घरीं । कुटुंबेसीं भोजन करी । कीं भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥ २२ ॥ तें यज्ञावशिष्ट भोगीं । ह्मणोनि सांडिजे तो अघीं । जयापरी महारोगी । अमृतसिद्धि ॥ २३ ॥ कीं तत्त्वनिष्ठ जैसा । नागवे भ्रांतिलेशा । तो शेष भोगी तैसा । नाकळे दोषा ॥ २४ ॥ ह्मणोनि स्वधर्मे जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेसीं ॥ २५ ॥ हें वांचूनि पार्था । राहटों नये अन्यथा । ऐसी आद्य हे कथा । श्रीमु-रारि सांगे ॥ २६ ॥ जे देहचि आपणयें मानिती । आणि विषयांतें भोग्य ह्मणती । या परतें न स्मरती । आणिक कांहीं ॥ २७ ॥ हें यज्ञोप-करण सकळ । नेणतसा ते बाळ । अहंबुद्धि केवळ । भोगूं पहाती ॥ २८ ॥ इंद्रियरुचीसारिखें । करविती पाक निकें । ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ २९ ॥ हें संपत्ति जात आघवें । हवन द्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥ हें सांडोनिया मूर्ख । आप-णपें यालागीं देख । निपजाविती पाक । नानाविध ॥ ३१ ॥ जिहीं यज्ञसिद्धी जाये । परेशा तोष होये । तें हें सामान्य अन्न न होये । ह्मणोनियां ॥ ३२ हें न ह्मणावें साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण । हें जीवन हेतुकारण । विश्वा यया ॥ ३३ ॥ १३ )

अन्नापासून भूतें उत्पन्न होतात; पर्जन्यापासून अन्नाची उत्पत्ति होते; यज्ञ पर्जन्यावर अवलंबून आहे व कर्मापासून यज्ञाची उत्पत्ति आहे ॥ १४ ॥

तस्मात्, ( अज्ञ अशा ) अधिकारी पुरुषानें कर्म केलेंच पाहिजे. कारण,

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ॥
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

---

कर्म। कथमिति। उच्यते। अन्नाद्भवन्ति ० कर्मसमुद्भवः॥ १४॥ अन्नाद्भुक्ताल्लोहितरेतःपरिणतात्प्रत्यक्षं भवन्ति जायन्ते भूतानि। पर्जन्याद्वृष्टेरन्नस्य संभवोऽन्नसंभवः। यज्ञाद्भवति पर्जन्यः। अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते । आदित्याज्जायते वृष्टि-र्वृष्टेरन्नं ततः प्रजा इति स्मृतेः । यज्ञोपूर्वं स च यज्ञः कर्म-समुद्भवः। ऋत्विग्यजमानयोश्च व्यापारः कर्म ततः समुद्भवो यस्य यज्ञस्यापूर्वस्य स यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

तच्च कर्म ब्रह्मोद्भवं० यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५॥ कर्म ब्रह्मोद्भवं ब्रह्म वेदः स उद्भवः कारणं यस्य तत्कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि

---

हें जगच्चक्र चालण्याला कर्म हेंच कारण आहे. कसें ह्मणाल तर सांगतों. भक्षण केलेलें अन्न शुक्रशोणितरूप बनलें असतां त्यापासून प्रत्यक्ष प्राणी उत्पन्न होतात; पर्जन्यापासून अन्नाची उत्पत्ति होते आणि यज्ञापासून पर्जन्य पडतो. कारण, अग्नीमध्यें यथाविधि टाकिलेली आहुति सूर्याकडे जाते; सूर्यापासून पर्जन्यवृष्टि होते; पर्जन्यवृष्टीपासून अन्नाची उत्पत्ति होते आणि त्या अन्नापासून प्रजांची उत्पत्ति होते. असें (मनु) स्मृतींत सांगितलें आहे. यज्ञ ह्मणजे अपूर्व. त्या यज्ञाची उत्पत्ति कर्मापासून आहे. ऋत्विज आणि यजमान ह्या उभयतांची ( द्रव्य आणि देवता ह्यांसंबंधानें ) होणारी जी चळवळ तें कर्म होय व त्या कर्मापा-सून ज्या अपूर्व यज्ञाची उत्पत्ति आहे तो यज्ञ कर्मसमुद्भव होय १४.

वेद हें कर्माचें कारण आहे असें तूं समज. परमात्मा वेदाचें कारण आहे. तस्मात् , वेद हा सर्वव्यापी जरी आहे तरी मुख्यतः यज्ञामध्येंच त्याचें सर्वदां पर्यवसान आहे ॥ १५ ॥

तें कर्म ब्रह्मोद्भव आहे ह्मणजे ब्रह्मसंज्ञक जो वेद हें त्या कर्माचें

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

---

जानीहि ब्रह्म पुनर्वेदाख्यमक्षरसमुद्भवम् । अक्षरं ब्रह्म परमात्मा समुद्भवो यस्य तदक्षरसमुद्भवं ब्रह्म वेद इत्यर्थः । यस्मात्साक्षात्परमात्माख्यादक्षरात्पुरुषनिःश्वासवत्समुद्भूतं ब्रह्म तस्मात्सर्वार्थप्रकाशकत्वात्सर्वगतम् । सर्वगतमपि सन्नित्यं सदा यज्ञविधिप्रधानत्वाद्यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

एवमित्थमीश्वरेण वेदयज्ञपूर्वकं जगच्चक्रं प्रवर्तितं नानुवर्तयतीह लोके यः कर्मण्यधिकृतः सन्नघायुरघं पापमायुर्जीवनं यस्य सोघायुः पापजीवन इति यावत् । इन्द्रियाराम इन्द्रियैराराम आरमणमाक्रीडा विषयेषु यस्य स इन्द्रिया-

---

कारण आहे असें तूं समज आणि त्याचप्रमाणें ब्रह्मसंज्ञक वेद अक्षर-समुद्भव आहे. सारांश, अक्षर ह्मणजे ब्रह्म अर्थात् परमात्मा हें वेदाच्या उत्पत्तीचें कारण आहे. ज्याअर्थीं परमात्मसंज्ञक अक्षरापासून पुरुषाच्या निःश्वासाप्रमाणें ब्रह्म ह्मणजे वेद उत्पन्न झाला आहे त्याअर्थीं तो सर्वव्यापी आहे. कारण, सर्व गोष्टी त्यामध्यें दर्शविलेल्या आहेत. असो. वेद सर्वव्यापी जरी आहे तरी त्यामध्यें यज्ञविधीचें प्राधान्य असल्यामुळें यज्ञामध्येंच त्याचें नेहमीं पर्यवसान होत असते ॥ १५ ॥

हे पार्था, ह्याप्रमाणें लाऊन दिलेल्या चक्राला अनुसरून जो ह्या लोकामध्यें वागत नाहीं त्या इंद्रियांच्या योगानें विषयांमध्येंच रममाण होणाऱ्या पुरुषाचें जीवन पातकावह असून जगणेंही व्यर्थ असतें ॥ १६ ॥

कर्माधिकारी असतांनाही जो पुरुष ह्याप्रमाणें ईश्वरानें प्रवृत्त केलेल्या ह्या जगच्चक्राला अध्ययन आणि यज्ञ इत्यादिकांच्या द्वारानें अनुसरून ह्या जगतामध्यें वागत नाहीं तो अघायु ह्मणजे पापरूप जीवनानें युक्त असून इंद्रियांच्याच योगानें विषयांचे

रामो मोघं वृथा हे पार्थ स जीवति । तस्मादज्ञेनाधिकृतेन कर्तव्यमेव कर्मेति प्रकरणार्थः । प्रागात्मज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तेस्तादर्थ्येन कर्मयोगानुष्ठानमधिकृतेनानात्मज्ञेन कर्तव्यमेवेत्येतन्न कर्मणामनारम्भादित्यत आरभ्य शरीरयात्रापि च ते न प्रसिध्येदकर्मण इत्येवमन्तेन प्रतिपाद्य यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्रेत्यादिना मोघं पार्थ स जीवतीत्येवमन्तेनापि ग्रन्थेन प्रासङ्गिकमधिकृतस्यानात्मविदः कर्मानुष्ठाने बहुकारणमुक्तं तदकरणे च दोषसंकीर्तनं कृतम् ॥ १६ ॥

---

ठिकाणीं क्रीडा करीत असतो आणि ह्मणूनच, हे पार्था, तो व्यर्थ जिवंत रहातो. तस्मात्, अज्ञ अशा अधिकारी पुरुषानें कर्म केलेंच पाहिजे हा एकंदर ह्या प्रकरणाचा अर्थ होय.

(भाष्यांतील 'वेदयज्ञपूर्वकं' ह्या पदाचा अन्वय 'प्रवर्तितं' ह्या पदाकडे न करितां 'नानुवर्तयति' ह्या पदाकडे करावा. जगच्चक्र ह्मणजे जगतांत घालून दिलेली राहटी. वेदाध्ययन, यज्ञयाग इत्यादि वर्णाश्रमधर्मविहित कर्मांच्या द्वारानें जो कर्माधिकारी असतांनाही इश्वरानें घालून दिलेल्या ह्या जगताच्या राहटीला अनुसरून वागत नाहीं त्याचें जीवन पापमयच आहे असें समजावें. तस्मात्, जिवांतजीव आहे तोंपर्यंत आत्मज्ञानरहित अशा कर्माधिकारी पुरुषानें नित्य कर्म अवश्य केलेंच पाहिजे. हें 'एवमित्थ० प्रकरणार्थः' ह्या भाष्याचें तात्पर्य होय.)

'न कर्मणामनारम्भात्' येथपासून 'शरीरयात्रापि च ते न प्रसिध्येदकर्मणः' हा श्लोक संपेपर्यंत भगवानांनीं, "आत्मज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होईपर्यंत ती प्राप्त होण्याकरितां अनात्मज्ञ अशा अधिकारी पुरुषानें कर्म योगाचें अनुष्ठान केलेंच पाहिजे" असें प्रतिपादन करून 'यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र' इत्यादि श्लोकापासून 'मोघं पार्थ स जीवति' येथपर्यंतच्या ग्रंथानें अनात्मज्ञ अशा अधिकारी पुरुषानें कर्मा-

नुष्ठान करण्याविषयीं प्रसंगोपात्त अनेक कारणें सांगून ते कर्मानुष्ठान न केलें असतां काय दोष लागतो तें सांगितलें १६.

( अधिकारी पुरुषानें कर्म केलेंच पाहिजे असें जर आहे तर अनात्मज्ञ जो असेल त्यानेंच केलें पाहिजे हें विशेष सांगण्याचें कारण काय ? ज्ञाननिष्ठ पुरुषालाही कर्माचा अधिकार असल्यामुळें त्यानेंही कर्मानुष्ठान करावेंच अशी शंका कोणाला येईल ह्मणून भाष्यकारांनीं ' प्रागात्मज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तेस्तादर्थ्येन ' येथपासूनच्या भाष्यानें पूर्वीं सांगितलेल्याचा अनुवाद केला आहे. ज्ञान आणि कर्म हीं परस्परविरुद्ध असल्यामुळें ज्ञाननिष्ठ पुरुषाच्या हातून कर्म होणें शक्य नाहीं. ह्याकरितां, ज्याला आत्मज्ञान नसेल त्यानें चित्तशुद्धि वगैरेच्या द्वारानें ज्ञान प्राप्त होण्याकारितां कर्म केलेंच पाहिजे. ही गोष्ट ह्या अध्यायांतील चवथ्या श्लोकापासून तों आठवा श्लोक संपेपर्यंत भगवानांनीं स्पष्ट करून सांगितली आहे. हें ' प्रागात्मज्ञान० प्रतिपाद्य ' ह्या भाष्याचें तात्पर्य होय. भाष्यांतील ' बहुकारणं ' ह्या शब्दाचा अर्थ ईश्वरप्रसाद, देवताप्रीति वगैरे असा टीकाकारांनीं केला आहे १६. )

( ज्ञानेश्वरमहाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहेः— ऐसी हे आदि परंपरा । संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगीतली या अध्वरा । लागूनियां ॥ ३८ ॥ ह्मणूनिया समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु । नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इयें ॥ ३९ ॥ तो पातकाची रासी । जाण भार भूमीसी । जो कुकर्मीं इंद्रियांसी । उपेगा गेला ॥ १४० ॥ तें जन्मकर्म सकळ । अर्जुना अति निष्फळ । जैसें कीं अभ्रपटळ । अकाळींचें ॥ ४१ ॥ कां गळां स्तन अजेचे । तैसें जियालें देखें तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ॥ ४२ ॥ ह्मणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्म करणें न सांडावा । सर्व भावें भजावा । हाचि एक ॥ ४३ ॥ हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोधें आलें । मग उचित कां आपलें । वोसंडावें ॥ ४४ ॥ परिसपां सव्यसाची । मूर्ति लाहोनि

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥

एवं स्थिते किमेवं प्रवर्तितं चक्रं सर्वेणानुवर्तनीयमाहोस्वित्पूर्वोक्तकर्मयोगानुष्ठानोपायप्राप्यामनात्मविदा ज्ञानयोगेनैव निष्ठामात्मविद्भिः सांख्यैरनुष्ठेयामप्राप्तेनैवेत्येवमर्थमर्जुनस्य प्रश्नमाशङ्क्य स्वयमेव वा शास्त्रार्थस्य विवेकप्रतिपत्त्यर्थमेतं वै तमात्मानं विदित्वा निवृत्तमिथ्याज्ञानाः सन्तो ब्राह्मणा मिथ्याज्ञानवद्भिरवश्यं कर्तव्येभ्यः पुत्रैषणादिभ्यो व्युत्थायाथ भिक्षाचर्यं शरीरस्थितिमात्रप्रयुक्तं चरन्ति । न तेषामात्मज्ञाननिष्ठाव्यतिरेकेणान्यत्कार्यमस्तीत्येवं श्रुत्यर्थमिह गी-

देहाची । खंती करिती कर्मांची । ते गांवढे गा ॥ ४५ ॥ १६ )

जो मनुष्य आत्म्याचेच ठिकाणीं रत असतो, आत्म्याच्याच योगानें जो तृप्त असतो आणि आत्म्याच्याच योगानें जो संतुष्ट असतो त्याला कांहीं एक कर्तव्य रहात नाहीं ॥ १७ ॥

इतका प्रकार झाला असतांना “ ह्या घालून दिलेल्या जगाच्या राहटीचें अनुकरण प्रत्येकानें करावें किंवा आत्मज्ञानी सांख्यांनीं अवलंबन करण्यास योग्य आणि पूर्वोक्त कर्मयोगानुष्ठानरूप उपायानें प्राप्त होणारी अशी जी ज्ञाननिष्ठा ती प्राप्त न झालेल्या आत्मज्ञानरहित पुरुषानेंच त्या राहटीला अनुसरून वागावें ” अशा आशयाचा अर्जुनाचा प्रश्न येईल असें समजून भगवानांनीं ‘ यस्त्वात्मरतिरेव० न विद्यते’ असें अर्जुनाला सांगितलें आहे असा ह्या श्लोकाचा संबंध समजावा. अथवा “ ह्या आत्म्याला जाणून ब्राह्मण मिथ्याज्ञानापासून निवृत्त झाले असतां मिथ्याज्ञान ज्यांचे ठिकाणीं आहे अशा पुरुषांना अवश्य कर्तव्य ज्या पुत्रैषणा वगैरे त्यांपासून परावृत्त होऊन शरीर कायम राहण्याला अवश्यक इतक्याच भिक्षान्नावर ते निर्वाह करून राहतात;

ताशास्त्रे प्रतिपिपादयिषितमाविष्कुर्वन्नाह भगवान्। यस्त्वात्म० कार्यं न विद्यते ॥ १७॥ यस्तु सांख्य आत्मज्ञाननिष्ठ आत्मरतिरात्मन्येव रतिर्न विषयेषु यस्य स आत्मरतिरेव स्याद्भवेदात्मतृप्तश्चात्मनैव तृप्तो नान्नरसादिना मानवो मनुष्यः संन्यास्यात्मन्येव च संतुष्टः संतोषो हि बाह्यार्थलाभेन सर्वस्य भवति तमनपेक्ष्यात्मन्येव च संतुष्टः। सर्वतो वीततृष्ण इत्येतत् य ईदृश आत्मवित्तस्य कार्यं करणीयं न विद्यते नास्तीत्यर्थः॥ १७॥

---

त्यांना आत्मज्ञानतत्परतेवांचून दुसरें कांहींएक कर्तव्य राहिलेलें नसतें." अशा प्रकारचा बृहदारण्यक श्रुतींतील अर्थ ह्या गीताशास्त्रामध्यें प्रतिपादन करणें भगवानांना इष्ट आहे व तोच ' यस्त्वात्मरतिरेव ' वगैरे ग्रंथानें त्यांनीं अर्जुनाला सांगितला आहे—असा ह्या श्लोकाचा संबंध जाणावा. आत्मरति ह्मणजे आत्म्याविषयींच ज्याला अभिरुचि आहे आणि विषयांची ज्याला मुळींच आवड नाहीं असा. जो आत्मज्ञानाविषयीं तत्पर सांख्य असेल, आत्म्याच्याच योगानें जो तृप्त होत असून अन्नरसादिकांच्या योगानें जो तृप्त होत नसेल आणि त्याचप्रमाणें आत्म्याच्याच योगानें जो संतुष्ट असेल अर्थात् सर्वस्वीं जो निरिच्छ बनलेला असेल त्या संन्यासी आत्मज्ञानी पुरुषाला कांहींएक कर्तव्य रहात नाहीं. बाह्य वस्तूंचा लाभ झाला असतां सर्वांना संतोष होत असतो; परंतु, त्याची अपेक्षा न करितां आत्म्याच्याच योगानें संतुष्ट असणारा ह्मणजे अर्थात् सर्वप्रकारें निरिच्छ झालेला अशा प्रकारचा जो आत्मज्ञानी त्याला कांहींएक कर्तव्य रहात नाहीं. हा उत्तरार्धाचा आशय होय १७.

( रति ह्मणजे विषयासक्ति; तृप्ति ह्मणजे कांहीं विशेष प्रकारचा विषयोपभोग प्राप्त झाल्यामुळें होणारें सुख आणि संतोष ह्मणजे कोणत्याही इष्ट विषयाचा लाभ झाल्यामुळें होणारें सामान्य सुख १७.)

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥
न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

किं च नैव०व्यपाश्रयः ॥ १८ ॥ नैव तस्य परमात्मरतेः कृतेन कर्मणार्थः प्रयोजनमस्ति । अस्तु तर्ह्यकृतेनाकरणेन प्रत्यवायाख्योनर्थो नाकृतेनेह लोके कश्चन कश्चिदपि प्रत्यवायप्राप्तिरूप आत्महानिलक्षणो वा नैवास्ति । न चास्य सर्वभूतेषु ब्रह्मादिस्थावरान्तेषु भूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः प्रयोजननिमित्तक्रियासाध्यो व्यपाश्रयो व्यपाश्रयणम् । कंचिद्भूतविशेषमाश्रित्य न साध्यः कश्चिदर्थोस्ति । येन तदर्था

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—देखें असतेनि देहधर्में । एथ तोचि एक न लिंपे कर्में । जो अखंडित रमे । आपणपैं ॥ ४६ ॥ जे तो आत्मबोधें तोषला । तरी कृतकार्य देख जाहला । ह्मणोनि सहजें सांडवला । कर्मसंगा ॥ ४७ ॥ १७ )

इहलोकीं कर्म केल्यानें त्याला कांहीं लाभही होत नाहीं आणि न केल्यानें त्याचा कांहीं तोटाही होत नाहीं. कारण, कोणत्याही प्राण्याशीं त्याचा कसल्याही प्रकारचा संबंध राहिलेला नसतो ॥ १८ ॥

शिवाय, त्या परमात्म्याचेच ठिकाणीं रत असलेल्या पुरुषाचें केलेल्या कर्माशीं कांहीं एक प्रयोजन नसतें. “ तर मग कर्म न केल्यामुळें इहलोकीं त्याला कांहीं प्रत्यवायसंज्ञक अनर्थ प्राप्त होत असेल ” ह्मणून ह्मणाल तर इहलोकीं त्याला प्रत्यवायप्राप्तिरूप अथवा आत्महानिरूप अशी गोष्ट प्राप्त होत नाहीं. ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत असलेल्या सर्व प्राण्यांपैकीं कोणत्याही प्राण्याच्या आश्रयानें ह्याची कोणतीही गोष्ट साध्य होणारी नसते. ब्रह्मादि स्थावरांत प्राण्यांपैकीं एकाद्या प्राण्यामुळें जर याचा कांहीं उद्देश सिद्धीस जाणारा असेल तर त्याकरितां कांहीं कर्म करणें अवश्य होईल; परंतु, प्राण्यांपैकीं कोणाच्याही

**क्रियानुष्ठेया स्यात् । न त्वमेतस्मिन्सर्वतःसंप्लुतोदकस्थानीये सम्यग्दर्शने वर्तसे ॥ १८ ॥**

---

आश्रयानें ह्याला कोणतीच गोष्ट साध्य करणें उरलेलें नसतें. ( ही गोष्ट परमात्म्याविषयींच अभिरुचि असलेल्या पुरुषाविषयीं झाली. परंतु, हे अर्जुना ) सर्व बाजूंनीं उदकानें परिपूर्ण असलेल्या जलाशयाप्रमाणें असलेल्या ह्या उत्तम ज्ञानमार्गाला अनुसरून तुझें वर्तन नाहीं ( ह्मणून तुला ही गोष्ट लागूं नाहीं ) १८.

( स्वर्गादिप्राप्तिविषयक अभ्युदय आणि मोक्ष हीं दोन फलें अनुक्रमें प्रवृत्तिमार्गानें व निवृत्तिमार्गानें पुरुषाला प्रत्यक्ष प्राप्त होणारीं आहेत. तेव्हां, ह्या दोहोंपैकीं एकाद्याची प्राप्ति होण्याकरितां आत्मज्ञानी पुरुषाला कृतकर्माचा कांहीं तरी उपयोग होईल ह्मणून ह्मणशील तर, हे अर्जुना, तें बरोबर नाहीं. कारण, आत्मज्ञानी पुरुषाला स्वर्गादिप्राप्तिविषयक अभ्युदयाची परवाच रहात नसल्यामुळें तो त्याच्या प्राप्तीची इच्छा धरीत नाहीं, आणि मोक्ष तर त्याला प्राप्त झालेलाच असतो. तेव्हां, केलेल्या कर्माचा त्याला कांहीं एक उपयोग नाहीं. आतां, " आत्मज्ञानी पुरुषानें जर नित्य कर्म न केलें तर त्याला कांहीं तरी प्रत्यवायरूप अनर्थ प्राप्त होईल; ह्यास्तव, तो अनर्थ टाळण्याकरितां त्यानें कर्म करावें " ह्मणून ह्मणशील तर तेंही बरोबर नाहीं. कारण, जो आत्मनिष्ठ आहे त्याला नित्य कर्म करण्याविषयीं अधिकार नाहीं व ह्मणूनच तें न केल्याबद्दल त्याला प्रत्यवायही लागण्याचा संभव नाहीं. तस्मात् , प्रत्यवायप्राप्ति आणि आत्महानि असे जे दोन अनर्थ इहलोकीं पुरुषाला प्राप्त होण्याचा संभव आहे त्यांपैकीं आत्मज्ञानी पुरुषाला एकही प्राप्त होणें शक्य नाहीं. अर्थात्, प्रत्यवाय अथवा आत्महानि टाळण्याकरितां आत्मज्ञानी पुरुषाला कर्म करण्याची अवश्यकता नाहीं. आतां ब्रह्मदेवापासून स्थावरयोनीपर्यंत असंख्य प्राणी पडलेले आहेत आणि ह्या

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ॥**
**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

---

**यत एवं तस्मा०ष: ॥१९॥ तस्मादसक्तः सङ्गवर्जितःसततं सर्वदा कार्यं कर्तव्यं नित्यं कर्म समाचर निर्वर्तय । असक्तो**

---

प्राण्यांपैकीं एकाद्याच्या तरी आश्रयानें आत्मज्ञानी पुरुषाचा कांहीं उद्देश सिद्धीस जाण्याचा संभव आहे. तेव्हां तो सिद्धीस नेण्याकारितां त्यानें कर्म अवश्य केलें पाहिजे ह्मणून ह्मणशील तर कोणत्याही प्राण्याच्या आश्रयानें आत्मज्ञानी पुरुषाची कोणतीही गोष्ट सिद्धीस जाण्याची राहिलेली नसतें. ह्मणून त्याकरितां त्याला कर्म करण्याचें कारणही रहात नाहीं. परंतु, " मग असें जर आहे तर मीही आपला पूर्वीं सांगितलेल्या तत्त्वज्ञानाचा आश्रय करीन आणि कर्मत्याग करून स्वस्थ बसेन. " ह्मणून ह्मणशील तर, हे अर्जुना, सर्व कर्मफलांचा अंतर्भाव ज्यामध्यें होतो अशा उत्तम ज्ञानाविषयीं तूं अद्यापि योग्य झाला नाहींस. ह्याकरितां, तुला कर्मत्याग करितांही येणार नाहीं १८.)

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—तृप्ति जाहलिया जैशी । साधनें सरतीं आपैसीं । देखें आत्मतुष्टी तैसी । कर्म नाहीं ॥ ४८ ॥ जंववरी अर्जुना। तो बोध भेटेना मना। तंवचि या साधना। भजावें लागे ॥४९॥१८.)

तस्मात् , तूं आपला फलाविषयीं आसक्ति न धरितां सर्वदां नित्य कर्म करीत जा. कारण, आसक्ति न ठेवितां कर्म करणाऱ्या पुरुषाला मोक्षप्राप्ति होते ॥ १९ ॥

ज्याअर्थी तूं ज्ञाननिष्ठ झाला नाहींस त्याअर्थी तूं आपला कर्मफलाची इच्छा न धरितां नेहमीं आपलें नित्य कर्म करीत जा. (आतां " कर्माचें फल मोक्षप्राप्तीहून भिन्न आहे आणि मला तर मोक्षप्राप्तीचीच इच्छा आहे. तेव्हां इच्छेला अनुरूप असें ज्याचें फल नाहीं तें कर्म करण्याविषयींच तूं मला आग्रह कां करीत आहेस ? " ह्मणून

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ॥
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

---

हि यस्मात्समाचरन्नीश्वरार्थं कर्म कुर्वन्परं मोक्षमाप्नोति पुरुषः सत्त्वशुद्धिद्वारेणेत्यर्थः ॥ १९ ॥

यस्माच्च कर्मणै० सि॥२०॥कर्मणैव हि यस्मात्पूर्वे क्षत्रिया विद्वांसः संसिद्धिं मोक्षं गन्तुमास्थिताः प्रवृत्ता जनकादयो जनकाश्वपतिप्रभृतयः। यदि ते प्राप्तसम्यग्दर्शनास्ततो लोकसंग्रहार्थं प्रारब्धकर्मत्वात्कर्मणा सहैवासंन्यस्यैव कर्म संसिद्धिमास्थिता इत्यर्थः । अथाप्राप्तसम्यग्दर्शना जनकादयस्तदा कर्मणा सत्त्वशुद्धिसाधनभूतेन क्रमेण संसिद्धिमा-

---

विचारशील तर, हे अर्जुना, ) फलाविषयीं आसक्ति न धरितां कर्म करणाऱ्या ह्मणजे अर्थात् ईश्वरप्रीत्यर्थ कर्म करणाऱ्या पुरुषाला अंतः-करणशुद्धीच्या द्वारानें मोक्ष प्राप्त होतो. १९.

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—ह्मणऊनि तूं नियत । सकळ कामना रहित । होऊनियां उचित । स्वधर्मे रहाटें ॥ १५० ॥ जे स्वधर्मे निष्कामता । अनुसरले पार्था । ते कैवल्य परमपद तत्वता । पावले जगीं ॥ ५१ ॥ १९)

जनकप्रभृति क्षत्रियांना कर्माच्याच योगानें सिद्धि प्राप्त झालेली आहे आणि लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊनही तुला कर्म करणें योग्य आहे॥२०॥

ज्याअर्थीं पूर्वीचे जनक, अश्वपति इत्यादि ज्ञानी क्षत्रिय कर्माच्याच योगानें मोक्षाप्रत जाण्यास प्रवृत्त झाले होते त्याअर्थीं तुलाही कर्मच केलें पाहिजे. त्या जनकप्रभृतींना चांगलें ज्ञान प्राप्त झालेलें होतें असें धरिलें तर ते प्रारब्ध कर्माच्या अधीन असल्यामुळें लोकसंग्रहाकरितां त्यांनीं कर्मासहवर्तमानच ह्मणजे कर्मत्याग न करितांच मोक्ष प्राप्त करून घेतला असा श्लोक लावावा, आणि जनकप्रभृतींना चांगलें ज्ञान प्राप्त झालेलें नव्हतें असें जर धरिलें तर अंतःकरणशुद्धीला

**स्थिता इति व्याख्येयः श्लोकः । अथ मन्यसे पूर्वैरपि जनकादिभिरप्यजानद्भिरेव कर्तव्यं कर्म कृतं तावता नावश्यमन्येन कर्तव्यं सम्यग्दर्शनवता कृतार्थेनेति तथापि प्रारब्धकर्मायत्तस्त्वं लोकसंग्रहमेवापि प्रयोजनं लोकस्योन्मार्गप्रवृत्तिनिवारणं लोकसंग्रहस्तमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

---

साधनभूत असलेल्या कर्माच्या योगानेंच क्रमाक्रमानें त्यांना मोक्षप्राप्ति झाली असें श्लोकाचें व्याख्यान करावें. आतां " पूर्वी होऊन गेलेलें जनकप्रभृति क्षत्रिय अज्ञानी होते ह्मणूनच त्यांनीं आत्मज्ञानरहित पुरुषाला अवश्य असलेलें कर्म केलें ह्मणून तेवढ्यावरून चांगलें आत्मज्ञान होऊन कृतार्थ झालेल्या दुसऱ्या पुरुषानेंही कर्म अवश्य केलेंच पाहिजे असें होत नाहीं. " ह्मणून ह्मणशील तर, हे अर्जुना, तूं प्रारब्ध कर्माच्या अधीन आहेस ; ह्याकारितां, लोकसंग्रहाकडे लक्ष्य देऊनही ह्मणजे तो उद्देश लक्ष्यांत घेऊनही तुला कर्म करणें योग्य आहे २०.

( जितेंद्रिय अशा विवेकसंपन्न पुरुषाचें श्रवणादिकांच्या योगानें एकसारिखें ब्रह्माचे ठिकाणीं जरी लय लागून राहणें शक्य असलें तरी तूं क्षत्रिय असल्यामुळें तुला विहित कर्मांचा त्याग करितां येणारच नाहीं. फार कशाला ? जनक, अश्वपति, अजातशत्रु इत्यादि क्षत्रिय तर चांगले ज्ञानीच होते नां ? परंतु, तेही कर्मत्याग न करितां कर्माच्याच योगानें मोक्ष प्राप्त करून घेण्यास उद्युक्त झाले; तेव्हां ज्याअर्थी त्यांनींही विहित कर्मांचा त्याग केला नाहीं त्याअर्थी तुलाही तो करितां येणार नाहीं. आतां " चांगलें आत्मज्ञान ज्यांना झालें असेल अशा कर्मत्यागी पुरुषांनाच मोक्षप्राप्त होत असल्याचें प्रसिद्ध आहे. तेव्हां असें असतांना जनकादिकांना कर्माच्याच योगानें मोक्षप्राप्ति झाली हें तूं ह्मणतोस कसें ? " ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, जनकादिक चांगले आत्मज्ञानी होते किंवा त्यांना चांगलें आत्मज्ञान प्राप्त झालें

नव्हतें ह्यांपैकीं तुझें काय मत आहे ? त्यांना चांगलें आत्मज्ञान प्राप्त झालें होतें असें जर तुझें मत असेल तर त्यांनीं कर्मत्याग केला नव्हता ही गोष्ट प्रसिद्ध असल्यामुळें लोकांची उन्मार्गाकडे प्रवृत्ति होऊं नये एतदर्थ त्यांनीं कर्मत्याग केला नाहीं असें धरावें लागेल. सारांश, चांगल्या प्रकारचें आत्मज्ञान जरी प्राप्त झालें तरी कर्मत्यागाचा अधिकार ब्राह्मणालाच आहे. आपण जर ब्राह्मण असतो तर आपणाला चांगलें आत्मज्ञान झाल्यानंतर कर्मत्याग करणें योग्य झालें असतें ; परंतु, क्षत्रिययोनींत जन्मास घालणाऱ्या कर्माच्या योगानें आपल्याला देह प्राप्त झाला आहे; तस्मात्, आपण कर्मत्याग केला असतां इतर क्षत्रियही कर्मत्याग करूं लागतील आणि असें झालें असतां अनर्थच होईल. तस्मात्, लोकांची प्रवृत्ति स्वधर्माकडे व्हावी आणि उन्मार्गाकडे त्यांची प्रवृत्ति होऊं नये, एतदर्थ आपणाला कर्म केलेंच पाहिजे असें समजून जनक, अश्वपति, अजातशत्रु इत्यादिकांनीं उत्तम प्रकारचें आत्मज्ञान झालें असतांही कर्मत्याग केला नाहीं असें मानावें लागेल. आतां ते जनकप्रभृति चांगले आत्मज्ञानी नव्हते असें जर तुझें मत असेल तर अंतःकरणशुद्धीला साधन असलेलें जें कर्म त्याचें अनुष्ठान करून ते क्रमानें मोक्षाला जाऊन पोंचले असें मानणें भाग येईल. आतां "जनकादिकांची गोष्ट येथें पाहिजे कशाला ? ते अज्ञानी होते आणि ह्मणूनच त्यांनीं आत्मज्ञानरहित अशा पुरुषाला विहित असलेलें कर्म केलें. ही गोष्ट बरोबरच झाली. परंतु, त्या अज्ञानी लोकांनीं कर्म केलें ह्मणून माझ्या सारिख्या ज्ञानप्राप्तीनें कृतार्थ झालेल्या पुरुषानेंही तें अवश्य केलेंच पाहिजे हा न्याय कोठला ? " असें जरी ह्मणशील तरी, हे अर्जुना, तुला कर्म अवश्य केलेंच पाहिजे. कारण, तूं प्रारब्ध कर्माच्या अधीन आहेस. अरे, तुझ्यासारिख्या क्षत्रियाला जरी उत्तमप्रकारचें आत्मज्ञान झालें असलें तरी तुह्मांला कर्मत्याग करितां येणार नाहीं. कारण, कर्मत्यागाचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे; आणि क्षत्रिय-

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ॥
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते २१ ॥

---

लोकसंग्रहं कः कर्तुमर्हति कथं चेत्युच्यते यद्य०ते ॥२१॥ यद्यत्कर्माचरति येषु येषु श्रेष्ठः प्रधानस्तत्तदेव कर्माचरतीतरोन्यो जनस्तदनुगतः । किं च स श्रेष्ठो यत्प्रमाणं

---

जन्मदायक अशा कर्मांच्या योगानें तुला शरीर प्राप्त झाल्याचें प्रत्यक्ष दिसत आहे. तेव्हां, तूं चांगला ज्ञानी आहेस असें जरी गृहीत धरिलें तरी सुद्धां लोकसंग्रह करण्याकरितां ह्मणजे लोकांची प्रवृत्ति उन्मार्गाकडे होऊं नये एतदर्थ कर्म करणें अवश्य आहे हें लक्ष्यांत घेऊन तुला कर्मत्याग करणें योग्य होणार नाहीं. हें ह्या श्लोकावरील भाष्याचें तात्पर्य होय २०.)

(ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—देखपा जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥ ५२ ॥ या कारणें पार्था । होआवी कर्मीं आस्था । हे आणिकाही एका अर्था । उपकारेल ॥ ५३ ॥ जे आचरतां आपणापायां । देखी लागेल लोका यया । तरी चुकेल या अपाया । प्रसंगेचि ॥ ५४ ॥ देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असें उरलें । लोकांलागीं ॥५५॥ मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ ५६ ॥ हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे । तिहीं करणेंपरी जाणिजे । मार्गातें या ॥५७॥२०)

श्रेष्ठ पुरुष जें जें कर्म करितो तेंच तें कर्म दुसरे लोक करूं लागतात आणि तो जी गोष्ट प्रमाण मानितो तीच गोष्ट लोकही प्रमाण मानूं लागतात ॥ २१ ॥

" लोकसंग्रह कोणी करावा आणि तो कशा करितां करावा" ह्मणून विचारशील तर सांगतों. ज्या ज्या लोकांमध्यें मुख्य असलेला पुरुष जें जें कर्म करितो तेंच तेंच कर्म त्याचे अनुयायी इतर लोक

**कुरुते लौकिकं वैदिकं वा लोकस्तदनुवर्तते तदेव प्रमाणीकरोतीत्यर्थः ॥ २१ ॥**

---

करूं लागतात आणि व्यवहार अथवा शास्त्र ह्यासंबंधानें जी गोष्ट तो प्रमाण मानितो तीच गोष्ट इतर प्रमाण मानूं लागतात २१.

( " ज्ञानवान् असल्यामुळें कृतार्थ झालेला जो पुरुष त्यानें लोकसंग्रहाकरितां तरी कां ह्मणून कर्म करावें? वास्तविक पाहूं गेलें असतां त्याला लोकसंग्रह करण्याची अवश्यकता दिसत नाहीं आणि ह्मणूनच मला कर्माची जरूर नाहीं " असें विचारशील तर, हे अर्जुना, मी ह्याचें उत्तर सांगतों. तूं जरी आपणाला आत्मज्ञानी आणि ह्मणूनच कृतार्थ समजत असलास तरी सुद्धां तुला वर्णाश्रमधर्मविहित कर्म हें केलेंच पाहिजे. कारण, आज तुह्मी क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ ह्मणून समजले जात आहां आणि जातींतील श्रेष्ठ लोक ज्याप्रमाणें वर्तन करूं लागतात त्याचप्रमाणें त्या जातींतील त्याला श्रेष्ठ मानणारे इतर त्याचे अनुयायी लोक वागूं लागतात आणि शास्त्राच्या संबंधानें अथवा व्यवहाराच्या संबंधानें जी गोष्ट तो प्रमाणभूत मानूं लागतो तीच गोष्ट इतर लोक प्रमाण मानूं लागतात. तेव्हां, तूं जर विहित कर्माचा त्याग केलास तर " हे धर्मनिष्ठ पांडव जर असें वागतात तर आपणांला तसें वागण्याला काय चिंता आहे " असें मनांत आणून लोकही आपल्या स्वधर्मापासून निवृत्त होतील आणि असें झालें असतां मोठा अनर्थ गुदरेल. तस्मात्, ज्ञानवान् जरी झाला तरी त्यानें लोकमर्यादेचें संरक्षण करण्याकरितां तरी वर्णाश्रमविहित कर्म केलेंच पाहिजे. हा ह्या श्लोकावरील भाष्याचा आशय होय २१.)

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः— एथ वडील जें जें करिती। तया नाम धर्म ठेविती। तेंचि येर अनुष्ठिती। सामान्य सकळ॥ ५८ ॥ हें ऐसें असे स्वभावें। ह्मणोनि कर्म न सांडावें। विशेषें आचरावें। लागे संतीं ॥ ५९ ॥ २१ )

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

---

**यद्यत्र ते लोकसंग्रहकर्तव्यतायां विप्रतिपत्तिस्तर्हि मां किं न पश्यसि न मे० कर्मणि ॥२२॥ न मे मम पार्थ नास्ति न विद्यते कर्तव्यं त्रिष्वपि लोकेषु किंचन किंचिदपि कस्मान्नानवाप्तमप्राप्तमवाप्तव्यं प्रापणीयं तथापि वर्त एव च कर्मण्यहम् ॥२२॥**

---

हे अर्जुना, ह्या त्रैलोक्यामध्यें मला यत्किंचितूही कर्तव्य उरलेलें नाहीं. कारण, मला प्राप्त न झालेली अशी कोणतीच गोष्ट नाहीं. तथापि, मी कर्म करीतच आहें ॥ २२ ॥

लोकसंग्रह करण्याविषयीं जर तुला शंका असेल तर तूं माझ्याकडे कां बरें पाहत नाहींस; अरे हे अर्जुना, तिन्ही लोकांमध्यें मला कोणतेंही कर्तव्य उरलेलें नाहीं. कां ह्मणशील तर सांगतों. अप्राप्त असल्यामुळें प्राप्त करून घ्यावयाची अशी कोणतीही गोष्ट माझ्यासंबंधानें नाहीं. परंतु, इतकें जरी आहे तरी मी आपला कर्म करीतच असतों २२.

( अरे, एखादी अप्राप्त गोष्ट प्राप्त करून घेण्याकरितां तुलाही कांहीं कर्तव्य असण्याचा संभव आहेच आहे. तेव्हां, " कांहींएक कर्तव्य नाहीं असें तूं कसें ह्मणतोस ? " ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, ह्या त्रैलोक्यामध्यें मला प्राप्त न झालेली अशी कोणतीही गोष्ट नाहीं आणि ह्मणूनच त्रैलोक्यामध्यें मला कांहीं कर्तव्य उरलेलें नाहीं. आतां " कर्म करण्याचें जर कांहीं प्रयोजन उरलेलें नाहीं तर तूं उगीच ह्या कर्मांचे भानगडींत पडतोस कशाला ? " ह्मणून विचारशाल तर, हे अर्जुना, मला तसें करितां येणार नाहीं. लोकसंग्रहाकरितां ह्मणजे लोकांची सन्मार्गाकडे प्रवृत्ति होऊन उन्मार्गापासून ते निवृत्त होण्याकरितां मलाही वर्णाश्रमधर्मविहित कर्माचें अनुष्ठान केलेंच पाहिजे आणि तें मी करीतच आहें. हें ह्या श्लोकावरील भाष्याचें तात्पर्य होय २२. )

यदि ह्यहं न वर्तेय जातु कर्मण्यतन्द्रितः ॥
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ॥
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

---

यदि हि पुनरहं न वर्तेय जातु कदाचित्कर्मण्यतन्द्रितोऽनलसः सन्मम श्रेष्ठस्य सतो वर्त्म मार्गमनुवर्तन्ते मनुष्या हे पार्थ सर्वशः सर्वप्रकारैः ॥ २३ ॥

---

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः— आतां आणिकाचिया गोठी। कायशा सांगों किरीटी। देखें मीचि इये राहाटी। वर्तत असें ॥ १६० ॥ काय सांकडें कांहीं मातें। कीं कवणें एके आर्तें। आचरें मी धर्मातें। ह्मणसी जरी ॥ ६१ ॥ तरी पुरतेपणा लागीं। आणिक दुसरा नाहीं जगीं। ऐसी सामग्री माझ्या आंगीं। जाणसी तूं ॥ ६२ मृत गुरुपुत्र आणिला। तो तुवां पवाडा देखिला। तोही मी उगला। कर्मीं वर्तें ॥६३॥२२ )

मी निष्काळजीपणा न करितां जर कर्म करण्याविषयीं तत्पर राहिलों नाहीं तर, हे अर्जुना, लोकही सर्व प्रकारें माझ्याच मार्गाला अनुसरून वागूं लागतील ॥ २३ ॥

( आतां " लोकसंग्रह करण्यापासून उपयोग काय ? लोकसंग्रह करण्यांत कांहींएक अर्थ नाहीं. " ह्मणून विचारशील तर ) हे अर्जुना, मी जर कदाचित् तत्पर राहून कर्मानुष्ठान केलें नाहीं तर इतर लोक सर्व प्रकारें मज श्रेष्ठाच्याच मार्गाचें अनुकरण करूं लागतील २३.

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—परी स्वधर्मीं वर्तें कैसा। साकांक्ष कां होय जैसा। तयाचि एका उद्देशा। लागोनिया ॥ ६४ ॥ जें भूतजात सकळ। असें आह्मा आधीनचि केवळ। तरी न व्हावें बरळ। ह्मणोनियां ॥ ६५ ॥ २३ )

अरे, मीं जर कर्म केलें नाहीं तर हे सर्व लोक नाश पावतील. मी

**तथा च को दोष इत्याह। उत्सीदेयु० मिमाः प्रजाः ॥२४॥ उत्सीदेयुर्विनश्येयुरिमे सर्वे लोका लोकस्थितिनिमित्तस्य कर्मणोभावान्न कुर्यां कर्म चेदहम्। किं च संकरस्य च कर्ता स्याम्। तेन कारणेनोपहन्यामिमाः प्रजाः प्रजानामनुग्रहाय प्रवृत्त उपहतिमुपहननं कुर्यामित्यर्थः। ममेश्वरस्याननुरूपमापद्येत ॥ २४ ॥**

---

वर्णसंकर होण्यास कारणीभूत होईन आणि ह्मणूनच ह्या प्रजांचा घात करण्यासही कारण होईन ॥ २४ ॥

आतां "तूं तत्पर राहून जर कर्म केलें नाहींस तर काय दोष होणार आहे ?" ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, मीं जर कर्म न केलें तर लोकस्थिति कायम राहण्याला निमित्तभूत जें वर्णाश्रमधर्मविहित कर्म त्याचा अभाव झाल्यामुळें हे सर्व लोक नाश पावतील. इतकेंच नव्हे परंतु, मी वर्णसंकरही करणारा होईन आणि लोकांवर अनुग्रह करण्याकरितांच प्रवृत्त झालेला असा मी त्याच करण्यामुळें लोकांच्या वधाला कारणीभूत होईन व असें करणें मज ईश्वराला योग्य होणार नाहीं २४.

("अरे, तूं जर कर्म नाहीं केलेंस आणि तूं श्रेष्ठ ह्मणून कर्म न करण्यामध्यें तुझेंच अनुकरण जर लोकांनीं केलें तर त्यांत काय मोठासा अनर्थ होणार आहे ? लोकांनीं तुझें अनुकरण करून ही कर्मकटकट एकदांची संपली तर बरी" ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, मी कर्म न केल्यानें काय अनर्थ होईल तो पहा. मी ईश्वरच जर कर्मांचा त्याग करूं लागलों तर मला अनुसरून वागणारे लोकही कर्म करणार नाहींत हें उघड आहे. परंतु, मीं कर्म न केल्यामुळें लोकांनीं कर्मत्याग करणें इष्ट होणार नाहीं. कारण, वर्णाश्रमधर्मविहित कर्म हेंच जगताच्या स्थितीला कारणीभूत आहे. तेव्हां त्या कर्माचा अभाव झाला असतां ह्या लोकांचा नाश होऊं लागेल. कारण, मींच कर्म सोडिलें ह्मणजे

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ॥
कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

---

यदि पुनरहमिव त्वं कृतार्थबुद्धिरात्मविदन्यो वा तस्याप्यात्मनः कर्तव्याभावेऽपि परानुग्रह एव कर्तव्य इति सक्ताः कर्म० संग्रहम् ॥ २५ ॥ सक्ताः कर्मण्यस्य कर्मणः फलं मम भविष्यतीति केचिदविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत कुर्याद्वि-

---

लोकांची प्रवृत्तिही तसेंच करण्याकडे होऊन कसलाच धरबंध राहणार नसल्यामुळें वर्णसंकर होऊन जाईल आणि वर्णसंकर झाला असतां ह्या प्रजांचा घात होईल. परंतु, तसें होणें मला इष्ट नाहीं. कारण, मी लोकांवर अनुग्रह करण्याकरितां प्रवृत्त झालों आहें. तेव्हां अर्थात् स्वतः कर्म न केल्यानें लोकनाशास कारणीभूत होणें मज लोकरक्षक ईश्वराला योग्य होणार नाहीं २४. )

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—आह्मीं पूर्णकाम होउनी । जरी आत्मस्थिती राहुनी । तरी प्रजा हे कैसेनी । निस्तरेल ॥ ६६ ॥ इहीं आमुची वास पाहावी । मग वर्तती परी जाणावी । ते लोकस्थिति आघवी । नासिली होईल ॥ ६७ ॥ ह्मणोनि समर्थ जो एथें । आथिला सर्वज्ञते । तेणें विशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ ६८ ॥ २४ )

हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, कर्मफलाची इच्छा धरून ज्याप्रमाणें अज्ञानी लोक कर्म करीत असतात त्याचप्रमाणें लोकसंग्रह करण्याच्या उद्देशानें ज्ञानी पुरुषानें फलाविषयीं आसक्ति न धरितां कर्म करीत असावें ॥ २५ ॥

जरी तूं माझ्याप्रमाणें कृतार्थ असलास किंवा दुसरा कोणी आत्मवेत्ता असला तरी त्याला स्वतः करितां जरी कांहीं एक कर्तव्य नसलें तरी दुसऱ्यावर अनुग्रह हा त्याला केलाच पाहिजे. ह्याकरितां, ह्या कर्माचें फल मला प्राप्त होईल अशी कर्मफलाविषयीं आसक्ति धरून

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ॥
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

---

द्वानात्मवित्तथासक्तः सन् । तद्वत्किमर्थं करोति तच्छृणु चिकीर्षुः कर्तुमिच्छुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

एवं लोकसंग्रहं चिकीर्षोर्न ममात्मविदः कर्तव्यमस्त्यन्यस्य वा लोकसंग्रहं मुक्त्वा ततस्तस्यात्मविद इदमुपदिश्यते न बुद्धि० चरन् ॥ २६ ॥ बुद्धेर्भेदो बुद्धिभेदो मयेदं कर्तव्यं भोक्तव्यं चास्य कर्मणः फलमिति निश्चितरूपाया बुद्धेर्भेदनं चालनं

---

ज्याप्रमाणें, हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, कांहीं अज्ञानी लोक कर्म करीत असतात. त्याचप्रमाणें परंतु, फलाविषयीं आसक्ति न धरितां आत्मज्ञानी पुरुषानें कर्म करीत असावें. अज्ञानी पुरुषाप्रमाणें ज्ञानी पुरुषानें कशा करितां कर्म करावें ह्मणून विचारशील तर ऐक. लोकसंग्रहकरण्याची इच्छा धरून त्यानें करावें २५.

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—देखें फलाचिया आशा । आचरे कामुक जैसा । कर्मीं भर होआवा तैसा । निराशाही ॥ ६९ ॥ जे पुढत पुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय सर्वथा । ह्मणवूनियां ॥ ७० ॥ मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरे लावावें । अलौकिक नोहावें । लोकांप्रति ॥ ७१ ॥ २५ )

कर्माचे ठिकाणीं आसक्ति धरून राहिलेल्या अज्ञानी लोकांचा ज्ञानी पुरुषानें बुद्धिभेद करूं नये; इतकेंच नव्हे परंतु, अवधानपूर्वक स्वतः कर्म करून लोकांकडून सर्व कर्में करवावीत ॥ २६ ॥

ह्याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा धरणाऱ्या मज आत्मज्ञानी पुरुषाला अथवा मजसारिख्या दुसऱ्या कोणाला लोकसंग्रहाशिवाय दुसरें कोणतेंही कर्तव्य राहिलेलें नाहीं. तथापि त्या आत्मज्ञानी पुरुषाला हा उपदेश आहे. मीं हें कर्म केलें पाहिजे आणि ह्या कर्माचें फल

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ॥
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥

---

**बुद्धिभेदस्तं न जनयेन्नोत्पादयेदज्ञानामविवेकिनां कर्मसङ्गिनां कर्मण्यासक्तानामासङ्गवतां किं तु कुर्याज्जोषयेत्कारयेत्सर्वकर्माणि विद्वान्स्वयं तदेवाविदुषां कर्म युक्तोभियुक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

**अविद्वानज्ञःकथं कर्मसु सज्जत इत्याह प्रकृ०मन्यते ॥२७॥ प्रकृतेः प्रकृतिः प्रधानं सत्त्वरजस्तमसां गुणानां साम्यावस्था**

---

मला प्राप्त झालें पाहिजे अशा प्रकारें ज्यांची बुद्धि दृढ झालेली आहे, त्या कर्मासक्त अविवेकी लोकांच्या त्या बुद्धींत आपण फेर पाडूं नये. इतकेंच नव्हे परंतु, तें जें अज्ञानी लोकांचें कर्म तें आपण स्वतः मोठ्या तत्परतेनें आचरून दाखवून सर्व कर्में अज्ञानी पुरुषाकडून करवावीत २६.

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—जें सायास स्तन सेवी । तें पक्कान्नें केवि जेवी । ह्मणोनि बालका जैसीं नेदावीं । धनुर्धरा ॥ ७२ ॥ तैसी कर्मीं जयां अयोग्यता । तयांप्रति नैष्कर्म्यता । न प्रगटावी खेळतां। आदिकरुनी ॥ ७३ ॥ तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी। निष्कर्मींही दावावी । आचरोनी ॥ ७४ ॥ तया लोकसंग्रहालागीं। वर्ततां कर्मसंगीं । तो कर्मबंध आंगीं । वाजेलना ॥ ७५ ॥ जैसी बहुरूपियांची रावो राणी। स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोक संपादणी । तैसीच करिती ॥ ७६ ॥ २६ )

अहंकाराच्या योगानें ज्याचें अंतःकरण नानाप्रकारें मोहित झालें आहे असा पुरुष मायेच्या गुणांनीं होत असलेलीं कर्में मीच करीत आहें असें मानितो ॥ २७ ॥

अविद्वान् ह्मणजे आत्म्याविषयीं अज्ञानी असलेला पुरुष कर्मांचे ठिकाणीं कसा आसक्त होऊन राहतो ? असा प्रश्न अर्जुन कदाचित्

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ॥
गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

---

तस्याः प्रकृतेर्गुणैर्विकारैः कार्यकरणरूपैः क्रियमाणानि कर्माणि लौकिकानि शास्त्रीयाणि च सर्वशः सर्वप्रकारैरहंकारविमूढात्मा कार्यकरणसंघातात्मप्रत्ययोऽहंकारस्तेन विविधं नानाविधं मूढ आत्मान्तःकरणं यस्य सोयं कार्यकरणधर्मा कार्यकरणाभिमान्यविद्यया कर्माण्यात्मनि मन्यमानस्तत्तत्कर्मणामहं कर्तेति मन्यते ॥ २७ ॥

यः पुनर्विद्वान् । तत्त्ववि० ज्जते ॥ २८ ॥ तत्त्ववित्तु महा-

---

करील ह्मणून भगवान् ह्मणतातः— सत्व, रज आणि तम ह्या गुणांची साम्यावस्था अशी जी माया तिच्या कार्यकरणरूप विकारांच्या योगानें ह्मणजे देह व इंद्रियें ह्यांच्या योगानें होणारीं जीं व्यावहारिक व शास्त्रीय कर्में तीं सर्व प्रकारें मी करीत आहें असें—अहंकाराच्या योगानें नानाप्रकारें ज्याचें अंतःकरण मोहित झालेलें आहे, तो देहेंद्रियधर्मी व देहेंद्रियाभिमानी पुरुष अज्ञानाच्या योगानें मानूं लागतो ह्मणजे त्या त्या कर्मांचा कर्ता मीच आहें असें मानूं लागतो २७.

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—देखें पुढिलाचें वोझें । जरी आपला माथा घेईजे । तरी सांगे कान दाटिजे । धनुर्धरा ॥ ७७ ॥ तैसीं शुभाशुभें कर्में । जियें निपजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता ह्मणे ॥ ७८ ॥ ऐसा अहंकारारूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥ ७९ ॥ हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां ॥ ८० ॥ २७ )

परंतु, हे महाबाहो, गुणविभाग आणि कर्मविभाग ह्यांचें तत्त्व जो जाणणारा आहे तो गुणांचे ठिकाणीं गुणांची प्रवृत्ति असते असें समजून आसक्त होत नाहीं ॥ २८ ॥

**बाहो कस्य तत्त्ववित् । गुणकर्मविभागयोर्गुणविभागस्य कर्मविभागस्य च तत्त्वविदित्यर्थः । गुणाः करणात्मका गुणेषु विषयात्मकेषु वर्तन्ते नात्मेति मत्वा न सज्जते सक्तिं न करोति ॥ २८ ॥**

---

हे महाबाहो अर्जुना, "तत्त्ववेत्ता पुरुष, इंद्रियरूप गुण विषयरूप गुणांचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिलेले असतात; आत्मा नसतो "असें समजून कर्माविषयीं अभिमान धरीत नाहीं. कसलें तत्त्व जाणणारा ? ह्मणून विचारशील तर गुणकर्मविभागांचा तत्त्ववेत्ता. सारांश, गुणविभाग आणि कर्मविभाग ह्यांचें तत्त्व जाणणारा २८.

( गुणाश्च कर्माणि च गुणकर्माणि । विभागश्च विभागश्च विभागौ । गुणकर्मभ्यो विभागौ गुणकर्मविभागौ तयोर्गुणकर्मविभागयोः । असा सदहू श्लोकांतील ' गुणकर्मविभागयोः ' ह्या समासाचा विग्रह करावा. गुणांपासून जो विभाग तो गुणविभाग आणि कर्मापासून जो विभाग तो कर्मविभाग. विभाग=विभक्तपणा=भेद. गुणांपासून आणि कर्मापासून आत्मा भिन्न आहे, असें समजणारा. अर्थात् गुण ह्मणजे देह आणि इंद्रियें ह्यांहून मी भिन्न आहें; देह आणि इंद्रियें हें माझें स्वरूप नव्हें आणि त्याचप्रमाणें देह आणि इंद्रियें ह्यांनीं केलेलीं जीं कर्मे त्यांच्याशीं माझा कांहीं एक संबंध नाहीं; मी त्या कर्माचा कर्ता नव्हे, असें जाणणारा. हा ' गुणविभागस्य कर्मविभागस्य च तत्त्वविदित्यर्थः ' ह्या भाष्याचा आशय होय. उत्तरार्धामध्यें दोन ठिकाणीं गुण हा शब्द आहे. एक प्रथमांत आणि एक सप्तम्यंत. प्रथमांत " गुण " शब्दाचा अर्थ श्रवणादि इंद्रियें असा आहे आणि सप्तम्यंत " गुण " शब्दाचा अर्थ शब्दादिविषयांचे ठिकाणीं असा आहे. तेव्हां शब्दादि विषयांचे ठिकाणीं श्रवणादि इंद्रियें रमत असतात; आत्मा त्या ठिकाणीं रमत नसतो. असें समजून वर सांगितलेला तत्त्वज्ञानी पुरुष कर्माचे ठिकाणीं आसक्ति

ठेवीत नाहीं. ह्मणजे ह्या कर्मांचा कर्ता मी आहें असें मानीत नाहीं. हा ' गुणाः करणात्मका गुणेषु॰न करोति ' ह्या भाष्याचा आशय होय. )

( गुणांपासून जो विभाग तो गुणविभाग आणि कर्मांपासून जो विभाग तो कर्मविभाग. --गुणांहून आणि कर्मांहून आत्मा भिन्न आहे. त्याचा त्यांच्याशीं कांहीं एक संबध नाहीं--असा ज्याला साक्षात्कार झालेला आहे तो. असा अर्थ ' गुणकर्मविभागयोस्तत्त्ववित् ' ह्या पदांचा भाष्यकारांना इष्ट आहे; व तो अर्थ विभाग हा शब्द समासांत असल्यामुळेंच निघत आहे; परंतु, मधुसूदनसरस्वतींना भाष्यकारांचा आशय नीट कळला नसल्यामुळेंच कीं काय कोणजाणें त्यांनीं भाष्यकारांच्या व्याख्यानावर आक्षेप घेतला आहे. ते ह्मणतातः--" गुणविभागस्य कर्मविभागस्य च तत्त्वविदिति वा । अस्मिन्पक्षे गुणकर्मणोरित्येतावतैव निर्वाहे विभागपदस्य प्रयोजनं चिन्त्यम् । अर्थः-- गुणविभागाचें आणि कर्मविभागांचें तत्त्व जाणणारा असाही एक अर्थ पाहिजे असल्यास भाष्यकारांच्या मताप्रमाणें पूर्वार्धाचा होतो; परंतु, असा अर्थ केला असतां ' गुणकर्मणोः ' एवढ्यानेंच निर्वाह होत असल्यामुळें ' विभाग ' हें पद घालण्याचें प्रयोजन नाहीं ". परंतु, हा त्यांचा आक्षेप भाष्यकारांचा आशय नीट न समजल्यामुळें चुकीचा आहे हें वर दर्शविल्यावरून उघड होत आहे. ज्या मधुसूदनसरस्वतींनीं भाष्यकारांचा आशय लक्ष्यांत न घेतां त्यांच्यावर असा आक्षेप घेण्याचें साहस केलें त्यांच्या स्वतःच्या व्याख्यानावर काय दोष येतात हें त्यांच्या लक्ष्यांतच आलें नाहींसें दिसतें. असो. मधुसूदनसरस्वतींनीं भाष्यकारांची परवा न बाळगितां ह्या श्लोकाचें व्याख्यान केलें आहे तें येणेंप्रमाणेंः-- " गुणा देहेन्द्रियान्तःकरणान्यहंकारास्पदानि कर्माणि च तेषां व्यापारभूतानि ममकारास्पदानीति गुणकर्मेति द्वन्द्वैकवद्भावः । विभज्यते सर्वेषां जडानां विकारिणां भासकत्वेन पृथग्भवतीति विभागः स्वप्रकाशज्ञानरूपोसङ्ग आत्मा गुणकर्म च विभागश्चेति द्वन्द्वस्तयोर्गुणकर्मविभागयोर्भास्यभास-

कयोर्जडचैतन्ययोर्विकारिनिर्विकारयोस्तत्त्वं याथात्म्यं यो वेत्ति सः।"
अर्थः—गुण ह्मणजे अहंकाराला स्थानभूत असा देह, इंद्रियें आणि अंतः-करण; आणि कर्मे ह्मणजे देहेंद्रियादिकांचे व्यापार. सारांश, ज्यांचे ठिकाणीं अविद्वानांची आत्मबुद्धि होते असे जे देहेंद्रियादिक ते गुण होत आणि ज्यांचे ठिकाणीं अविद्वानांची ममत्वबुद्धि होते ह्मणजे हीं माझीं आहेत असें ज्यांच्याविषयीं वाटतें असे जे देहेंद्रियादिकांचे व्यापार तीं कर्में होत. गुणकर्म हा समाहारद्वंद्वसमास आहे असें समजावें. भासकत्व ह्या नात्यानें विकारी अशा सर्व जडपदार्थां-हून जो विभक्त असतो अर्थात् जो पृथक् असतो तो विभाग होय. सारांश, स्वप्रकाश, ज्ञानरूप व संगरहित आत्मा हा विभाग ह्या शब्दाचा अर्थ होय. 'गुणकर्म च विभागश्च ' गुणकर्मविभागौ असा हा द्वंद्व समास समजावा. त्या गुणकर्मविभागांचे—अर्थात् भास्य आणि भासक, जड आणि चैतन्य विकारयुक्त आणि निर्विकार असे जे—गुणकर्म व आत्मा ह्यांचें तत्त्व ह्मणजे यथार्थ स्वरूप जो जाणितो तो गुणकर्मवि-भागांचें तत्त्व जाणणारा होय". असें व्याख्यान मधुसूदनसरस्वतींनीं भाष्यविरुद्ध केलेलें आहे; परंतु, तें बरोबर नाहीं. कारण, 'गुणकर्म-विभागयोः' ह्या समासांतील "गुणकर्म" येवढें जर एकच पद त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें मानिलें तर 'विभाग' हें पद समासामध्यें प्रथम असावयाला पाहिजे होतें. कारण, ज्या पदांत स्वर कमी असतात तें पद समासामध्यें आधीं असावें लागतें असा व्याकरणाचा नियम आहे. तेव्हां मधुसूदनसरस्वतींच्या ह्मणण्याप्रमाणें चाललें असतां 'गुणकर्मविभागयोः' असा जो समास आहे तो 'विभागगुणकर्मणोः' असा असावयाला पाहिजे होता. तस्मात्, हा दोष येत असल्यामुळें मधुसूदनसरस्वतींचें व्याख्यान स्वीकारितां येत नाहीं. आतां "विभागगु-णकर्मणोः" असा समास असावयाचा. परंतु, भगवानांचें वचन छांदस आहे असें समजून निपातप्रकरण अनित्य आहे असें मानिलें ह्मणजे

मधुसूदनसरस्वतींच्या व्याख्यानावर दोष येत नाहीं " असें कोणी ह्मणूं लागेल ; परंतु, तें ह्मणणें योग्य होणार नाहीं. कारण, भाष्यांत सुचविल्याप्रमाणें सदहूं समासाचें व्याख्यान केलें असतां छांदसत्वादि दोष मानिल्यावांचून जर वाक्यार्थ सरळ होत आहे तर बुद्ध्या आड मार्गांत शिरून वाक्यार्थ करणें योग्य नाहीं. शिवाय, तुष्यतुदुर्जनन्यायानें घटकाभर छांदसत्व आणि निपातप्रकरणाचें अनित्यत्व हीं गृहीत धरून तरी मधुसूदनसरस्वतींच्या व्याख्यानावर दुसरा कांहीं दोष येत नाहीं ह्मणून ह्मणावें तर तीही पंचाईतच आहे. कारण, विभाग ह्या शब्दाचा लोकप्रसिद्ध अर्थ टाकून अप्रसिद्ध अर्थ करावा लागतो आणि अशी कल्पना जरी केली तरी ती सरळ करितां न येतां क्लिष्टच करावी लागते. तस्मात् , भाष्यकारांचा आशय लक्ष्यांत न घेतां मधुसूदनसरस्वतींनीं त्यांच्या विरुद्ध जें व्याख्यान केलेलें आहे तें सर्वस्वीं त्यागासच पात्र आहे.)

(नीलकंठपंडितानीं भाष्यकार, श्रीधरस्वामी आणि मधुसूदनसरस्वती ह्या तिघांचीं मतें देऊन आपलें स्वतःचें ह्मणून एक व्याख्यान आणखी वेगळें दिलें आहे. पंडित लिहितातः—'यस्तत्त्ववित्स गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा गुणविभागे कर्मविभागे च न सज्जत इति योजना । गुणानां सत्त्वरजस्तमसां विभागो बुद्ध्यहंकारज्ञानेन्द्रियकर्मेन्द्रियविषयरूपेण विभज्यावस्थानं तस्मिन्न सज्जते । इद महमिति न मन्यते । तथा हि शरीरे गौरेहं गौरोस्मि हस्ताभ्यामात्ते मयेदमात्तमिति चक्षुषा दृष्टे मयेदं दृष्टमित्यहंकारेणाभिमते ममेदमित्यभिमन्यते। बुद्धौ विक्रियमाणायामहं सुखीति च सर्वेषु बुद्ध्यादिषु विभज्य गृह्यमाणेष्वपि प्रत्येकं प्रत्यक्त्वमध्यस्याहमिदमिति ममेदं कर्मेति च मन्यते । एतेन कर्मविभागोप्यावश्यकत्वेन व्याख्यातः। अन्यथा चिदात्मन्येवादानादिकर्तृत्वं दुःखादिमत्त्वं चापतति। अयं च कर्मविभागः श्रुत्यापि दर्शितः। अन्धो मणिमविन्दत्। तमनङ्गुलिरावयत्। अग्रीवः प्रत्यमुञ्चत्। तमजिह्वा असश्चतेति। अन्धः स्वयं प्रकाशहीनोपि चक्षुरादिर्मणिं रूपादिकं विषयमविन्दत्प्रकाशयाति । अनङ्गुलिः

काष्ठलोष्ठादिवज्जडत्वात्स्वयं कर्म कर्तुमशक्तोपि पाण्यादिरावयदासीव्य-द्विषयमुपादत्ते । अग्रीवाश्छिन्नशिरस्कवन्निर्जीवोहंकारस्तं प्रत्यमुञ्चद्ग्रीवायां धारयति ममेदं लब्धमिति मन्यते । अजिह्वो धीधातुर्जडत्वात्स्वयं स्वगत-सुखदुःखयोः पट इव स्वगतरूपादेः प्रकाशनेसमर्थोप्यहं सुखी दुःखीति चानुभवति । तथा चात्मानात्मनोर्याथात्म्यज्ञो व्यावृत्तेष्वहंकारादिषु तत्क-र्मसु चाभिमानादिषु कुसुमेषु सूत्रमिवानुवर्तमानमात्मानं तेभ्यः पृथग्भूतं जानन्गुणा धीचक्षुरादयो गुणेषु दुःखरूपादिषु वर्तन्ते न त्वात्मेति मत्वा न सज्जतेहमेव हस्तादिसङ्घातरूपो ममैवेदमादानादिकं कर्मेति न सक्तो भवतीत्यर्थः ।

अर्थः—जो तत्त्ववेत्ता आहे तो गुण गुणांचे ठिकाणीं असतात असें समजून गुणविभागाचे ठिकाणीं आणि कर्मविभागाचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं असा ह्या श्लोकाचा अन्वय लावावा. गुण ह्मणजे सत्त्व, रज आणि तम. ह्यांचा विभाग ह्मणजे बुद्धि, अहंकार, ज्ञानेंद्रियें, कर्में-द्रियें आणि विषय ह्यांच्या रूपानें वेगवेगळें असणें. त्याचे ठिकाणीं तत्ववेत्ता पुरुष आसक्त होत नाहीं ह्मणजे बुद्धि, अहंकार, ज्ञानेंद्रियें इत्यादिस्वरूपच मी आहें असें मानीत नाहीं. उदाहरणार्थः—तत्त्वज्ञान न झालेला पुरुष शरीर गौरवर्ण असतांना मीच गौरवर्ण आहें असें समजतो; हातांनीं कांहीं पदार्थ घेतला असतां मींच घेतला असें मानितो; डोळ्यांनीं कांहीं गोष्ट पाहिली असतांना मीं पाहिली असें धरून चालतो; अहंकारानें एकाद्या गोष्टीचा अभिमान धरिला असतांना हे माझें ह्मणून अभिमान धरितो. बुद्धि विकार पावूं लागली असतां मी सुखी आहें असें मानूं लागतो. ह्याप्रकारें बुद्ध्यादिकांचें वेगवेगळें ग्रहण होऊं लागलें असतांनाही प्रत्येकाचे ठिकाणीं आत्मबुद्धि करून हा मी व हें माझें कर्म असें तो मानूं लागतो; ह्मणजे बुद्धि, अहंकार, ज्ञान इत्या-दिक आपणांहून भिन्न आहेत असें न समजतां हें सर्व मीच आहें असें समजून त्यांच्या योगानें होणारीं कर्मेंही माझींच आहेत असें मानूं

लागतो. असो. ह्याचप्रमाणें कर्मविभागाविषयींही समजावें. नाहींतर आदानादिकांचें कर्तृत्व आणि दुःखादिमत्त्व चिदात्म्याचे ठिकाणींच येऊं लागेल. ह्मणजे ग्रहण करणारा वगैरे चिदात्माच आहे आणि दुःखी वगैरे चिदात्माच आहे असें होऊं लागेल. हा कर्मविभाग ' अन्धोमणिमविन्दत्। तमनङ्गुलिरावयत्। अग्रीवः प्रत्यमुञ्चत्। तमजिह्वा असश्चत। ह्या श्रुतीनेंही दर्शविला आहे. ह्या श्रुतीचा अर्थ येणें प्रमाणें:—नेत्रादि ज्ञानेंद्रियें स्वतः ह्मणजे प्रकाशहीन असतांनाही रूपादिविषय प्रकाशित करितात ; हस्तादि कर्मेंद्रियें काष्ठ, लोष्ठ इत्यादिकांप्रमाणें जड असल्यामुळें स्वतः कर्म करण्यास असमर्थ असतांनाही विषयाचें ग्रहण करितात; तसाच अहंकार हा मान तुटलेल्याप्राण्याप्रमाणें निर्जीव असतांनाही मला हें प्राप्त झालें असें मानूं लागतो; आणि आपल्या ठिकाणीं असलेल्या रूपादिकांचें प्रकाशन करण्यास पटाप्रमाणें बुद्धि जड असल्यामुळें असमर्थ असतांनाही मी सुखी, मी दुःखी इत्यादि प्रकारचा अनुभव घेऊं लागते. असो. आत्मा कोणता ? आणि आत्मव्यतिरिक्त गोष्टी कोणत्या ? ह्यांचें तत्त्व जाणणारा पुरुष अहंकारादिक आणि त्यांचीं जीं अभिमानादि कार्यें हीं निवृत्त झालीं असतां माळेंतील पुष्पांमध्यें असलेलें सूत्र ज्याप्रमाणें त्या पुष्पांहून वेगळें असतें त्याचप्रमाणें आत्मा अहंकार प्रभृतींपासून व त्यांच्या अभिमानप्रभृतिकार्यांपासून, भिन्न आहे; असें जाणत असतां आणि बुद्धि, नेत्र इत्यादि गुण दुःख, रूप इत्यादि गुणांचे ठिकाणीं राहतात. आत्मा त्यांचे ठिकाणीं नसतो असें समजून आसक्त होत नाहीं. ह्मणजे हात, पाय वगैरे मीच असून आदानप्रभृति कर्म माझेंच आहे असें समजून तो त्यांचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं.

ह्या नीलकंठपंडितांच्या व्याख्यानावर दोन दोष येतात. कारण, ' गुणकर्मणोर्न सज्जते ' येवढ्यानेंच पंडितांचा अर्थ निघत असल्यामुळें समासांतील ' विभाग ' हें पद व्यर्थ होतें आणि शिवाय ' तथाचात्मानात्मनोर्यांथा०सक्तो भवतीत्यर्थः ' असें जें पंडितांनीं शेवटीं लिहिलें

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ॥
तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

ये पुनः प्रकृते॰चालयेत् ॥ २९ ॥ प्रकृतेर्गुणैः सम्यङ्मूढाः संमोहिताः सन्तः सज्जन्ते गुणानां कर्मसु गुणकर्मसु वयं कर्म कुर्मः फलायेति तान्कर्मसंगिनोऽकृत्स्नविदः कर्मफल-मात्रदर्शिनो मन्दान्मन्दप्रज्ञान्कृत्स्नविदात्मवित्स्वयं न विचाल-

आहे त्याचा त्यांच्याच व्याख्यानाशीं विरोध येतो.

( मोठे मोठे बाहू शत्रूंचा वध करण्यास प्रवृत्त होत आहेत; मी शत्रु मारण्यास प्रवृत्त होत नाहीं. असें समजून तूंही "वधकर्ता मी आहें" असें समजूं नकोस. हें अर्जुनाला सुचविण्याच्या उद्देशानें भगवानांनीं त्याला उद्देशून " महाबाहो " हें संबोधन घातलें आहे २८ )

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—जे तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभाव नाहीं । जेथ कर्मजात पाहीं । निपजत असे ॥ ८१ ॥ ते देहाभिमान सांडुनी । गुणकर्मे वोलांडूनी । साक्षिभूत होऊनी । वर्तती देहीं ॥ ८२ ॥ ह्मणोनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नाकळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेता ॥ ८३ ॥ २८ )

जे मायाशक्तीच्या गुणांच्या योगानें मोहित झालेले पुरुष गुणांच्या कर्मांचे ठिकाणीं आसक्त होतात त्या अनात्मज्ञ मंदबुद्धि पुरुषांना आत्मज्ञानी पुरुषानें चाळवूं नये ॥ २९ ॥

प्रकृतीच्या गुणांनीं ह्मणजे मायाशक्तीच्या देहेंद्रियरूप विकारांनीं मोहित झाल्यामुळें जे त्या देहादिरूप गुणांच्या कर्मांचे ठिकाणीं आसक्त होतात ह्मणजे फलप्राप्ति होण्याकरितां आह्मी कर्म करीत आहोंत अशी त्यांचे ठिकाणीं स्वकीय बुद्धि ठेवितात त्या कर्मसंबंधीं व मंदबुद्धि अशा अनात्मज्ञ पुरुषांना अर्थात् केवळ कर्मफलाकडेच दृष्टि देणाऱ्यांना स्वतः आत्मज्ञानी पुरुषानें चाळवूं नये. बुद्धीला भेद पडणें हेंच चाळ-

येत् । बुद्धिभेदकरणमेव चालनं तन्न कुर्यादित्यर्थः ॥ २९ ॥

---

विणें होय. तें करूं नये हा ' न विचालयेत् ' ह्या पदांचा अर्थ होय. गणकर्णसु ह्या समासाचा विग्रह ' गुणानां कर्माणि गुणकर्माणि तेषु गुणकर्मसु ' असा करावा २९.

( 'कृत्स्नवित्' ह्या पदाचा अर्थ भाष्यकारांनीं आत्मवेत्ता=आत्मज्ञानी असा केला आहे. ह्यावरून 'अकृत्स्नविदः' ह्या पदाचा अर्थ अनात्मज्ञ= आत्मज्ञानशून्य असा करावा. श्रीधरस्वामींनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान ' ये प्रकृतेर्गुणैः सत्त्वादिभिः संमूढाः सन्तो गुणेष्विन्द्रियेषु तत्कर्मसु च सज्जन्ते वयं कुर्म इति तानकृत्स्नविदो मन्दमतीन्कृत्स्नवित्सर्वज्ञो न विचालयेत् ' असें केलें आहे व त्याचा अर्थ " मायेच्या सत्त्वादि गुणांनीं मूढ होऊन जे इंद्रियें व त्यांचीं कर्में ह्यांचे ठिकाणीं आसक्त होतात ह्मणजे आह्मी कर्में करितों असें समजतात. त्या असर्वज्ञ मंदमति पुरुषांना सर्वज्ञानें चाळवूं नये. " असा आहे. परंतु, हें त्यांचें व्याख्यान बरोबर नाहीं. ' प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ' ह्या श्लोकावरील व्याख्यानांत श्रीधरस्वामींनींच " प्रकृतेर्गुणैः प्रकृतिकार्यैरिंद्रियैः सर्वप्रकारेण क्रियमाणानि यानि कर्माणि " असें ह्मटलें आहे. त्याच्याशीं ह्या व्याख्यानाचा विरोध येतो. सारांश, ' प्रकृतेर्गुणैः 'ह्या पदांचा जो अर्थ आहे तोच अर्थ ह्या श्लोकांतील त्याच पदांचा असणें योग्य दिसतें. सबब, श्रीधरस्वामींचें हें भाष्यविरुद्ध व त्यांच्या स्वतःच्याच उक्तीशीं विरुद्ध असलेलें व्याख्यान बरोबर नाहीं. गुणांच्या कर्मांचे ठिकाणीं ह्मणजे अर्थात् देहादिकांच्या कर्मांचे ठिकाणीं असा अर्थ भाष्यकारांनीं केला असून त्याच्या विरुद्ध अर्थ ह्मणजे इंद्रियें आणि त्यांचीं कर्में ह्यांचे ठिकाणीं असा श्रीधरस्वामींनीं केलेला आहे. तोही अयोग्यच आहे. कारण, ' गुणसंमूढाः ' ह्यांतील गुणशब्दाचा अर्थ देह, इंद्रियें वगैरे असाच करावा लागतो

हें वर दर्शविलेंच आहे. तेव्हां देहेंद्रियादिविषयक आसक्ति हा अर्थ गुणसंमूढाः' येवढ्या पदानेंच जर होऊन गेलेला आहे तर पुनरपि ' गुणेष्विन्द्रियेषु तत्कर्मसु ' असें व्याख्यान करून पुनरुक्ति करणें योग्य नाहीं. 'नीलकंठपंडितानींही—' प्रकृतेः प्रकृतिसंबन्धिषु गुणेषु देहादिषु कर्मसु गमनादिषु च सज्जन्ते ' प्रकृतीचे देहादिक गुण आणि गमनादि कर्मे ह्या दोहोंचे ठिकाणीं जे आसक्त होतात—असें व्याख्यान भाष्यविरुद्ध केलें आहे; परंतु, तेंही बरोबर नाहीं. कारण, ' प्रकृतेः ' ह्या शब्दाचा अन्वय ' गुणकर्मसु' ह्या पदाकडे घेण्याचें कांहीं एक प्रयोजन दिसत नाहीं. कारण, तसा अन्वय न घेतांही ' गुणकर्मसु ' ह्या पदांचा अर्थ नीलकंठपंडितांच्या ह्मणण्याप्रमाणें होण्याला अडचण येत नाहीं. ' गुणकर्मसु ' ह्याचें व्याख्यान गुणांच्या कर्मांचे ठिकाणीं असें न करितां देहादिकांचे ठिकाणीं व कर्मांचे ठिकाणीं असें केलें आहे तें अयोग्य आहे हें श्रीधरस्वामींच्या व्याख्यानाचा विचार करिताना वर सांगितलेंच आहे. श्रीधरस्वामींनीं ' कृत्स्नवित् ' आणि 'अकृत्स्नविदः' ह्या पदांचा अर्थ भाष्यकारांना अभिमत असल्याप्रमाणें आत्मज्ञानी आणि आत्मज्ञानरहित असा न करितां अनुक्रमें सर्वज्ञ व असर्वज्ञ असा केलेला आहे; परंतु, तो बरोबर नाहीं. कारण, असर्वज्ञ कोणाला ह्मणावयाचें हें ठरवितां येणें अशक्य आहे. ज्याला लेशमात्र ज्ञान आहे त्याही पुरुषाचा असर्वज्ञ ह्या पदामध्यें समावेश होऊं लागेल आणि ज्याला जवळ जवळ आत्मज्ञान झालेलें आहे त्याचाही समावेश त्या पदानें होईल. तेव्हां, ज्याला जवळ जवळ आत्मज्ञान झालेलें आहे त्याची बुद्धि कर्मापासून वळवून आत्म्याकडे लावूं नये असें होऊं लागेल; परंतु, तसें होणें इष्ट नाहीं. ह्याकरितां, ' कृत्स्नवित् ' आणि ' अकृत्स्नविदः ' ह्या पदांचा अर्थ भाष्यकारांनीं दर्शविल्याप्रमाणें आत्मज्ञानी आणि आत्मज्ञानशून्य असा केल्यावांचून गत्यंतरच नाहीं. भाष्यकारांनीं ' कृत्स्नवित् ' ह्या शब्दाचा आत्मज्ञानी असा जो अर्थ केला आहे त्याला बृहदारण्यकोपनिषदंतर्गत पहिल्या

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ॥**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

कथं पुनः कर्मण्यधिकृतेनाज्ञेन मुमुक्षुणा कर्म कर्तव्यमित्युच्यते मयि० विगतज्वरः ॥ ३० ॥ मयि वासुदेवे परमेश्वरे सर्वज्ञे सर्वात्मनि सर्वाणि कर्माणि संन्यस्य निक्षिप्याध्यात्मचेतसा विवेकबुद्ध्याहं कर्तेश्वराय भृत्यवत्करोमीत्यनया बुद्ध्या । किं च निराशीस्त्यक्ताशीर्निर्ममो ममभावश्च निर्गतो यस्य तव स त्वं निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरो विगतसंतापो विगतशोकः सन्नित्यर्थः ॥ ३० ॥

अध्यायापैकीं चवथ्या ब्राह्मणांतील श्रुति प्रमाण आहे २९ )

( ज्ञानेश्वर महाराज असें ह्मणतातः—एथ कर्मीं तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे । प्रकृतीचेनि आटोपें । वर्तत असे ॥ ८४ ॥ इंद्रियें गुणाधारें । राहटतीं निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आपादी जो ॥ ८५ ॥ २९ )

सर्व कर्में माझे ठिकाणीं विवेकबुद्धीनें समर्पण करून आणि फलेच्छा व ममत्वबुद्धि ह्यांचा त्याग करून शोकरहित असा तूं युद्ध कर ॥ ३० ॥

आतां अज्ञ आणि ह्मणूनच कर्माधिकारी परंतु मुमुक्षु अशा पुरुषानें कर्म कसें करावें ह्मणून विचारशील तर सांगतों. सर्वज्ञ आणि सर्वात्मा असा जो मी परमेश्वर वासुदेव त्या माझे ठिकाणीं सर्व कर्में विवेकबुद्धीनें ह्मणजे मी कर्ता आहें आणि चाकराप्रमाणें ईश्वराकरितां कर्म करीत आहें अशा बुद्धीनें तूं समर्पण कर; आणि शोकरहित होऊन व फलेच्छा आणि ममत्वबुद्धि ह्यांचा त्याग करून तूं युद्ध कर. निर्मम=“माझें” ही बुद्धि ज्याच्यापासून गेली आहे असा. विगतज्वर= ज्याच्यापासून ज्वर नाहींसा झाला आहे असा. ज्वर=संताप=शोक ३०.

( ‘ निर्ममो भूत्वा ’ ह्मणजे पुत्र, भ्राते, पितृव्य इत्यादिकांचे ठिकाणीं मम-

त्वबुद्धि न धरितां ह्मणजे हे माझे आहेत असें मनामध्यें न आणितां. मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान केल्यावर शेवटीं " अत्र भगवदर्पणं निष्कामत्वं च सर्वकर्मसाधारणं मुमुक्षोर्निर्ममत्वं त्यक्तशोकत्वं च युद्धमात्रे प्रकृतमिति द्रष्टव्यम्। अन्यत्र ममताशोकयोरप्रसक्तत्वात्। " अशी व्यवस्था सांगितलेली आहे; परंतु, ती बरोबर नाहीं. ह्या श्लोकामध्यें भगवदर्पण, निष्कामत्व, निर्ममत्व आणि त्यक्तशोकत्व अशीं चार मुमुक्षूला उद्देशून सांगितलीं आहेत; परंतु, ह्या चोहोंपैकीं पहिलीं दोन ह्मणजे भगवदर्पण व निष्कामत्व हीं प्रत्येक कर्माला लागू आहेत. परंतु, निर्ममत्व आणि त्यक्तशोकत्व हीं मात्र युद्धाविषयींच समजावीं. सारांश, कोणतेंही कर्म असो, तें ईश्वरार्पणबुद्धीनें व निष्कामबुद्धीनेंच मुमुक्षूनें करावें व युद्ध करीत असतांना मात्र ममत्वबुद्धि आणि शोक ह्यांचा त्याग करावा. युद्धावांचून इतर कर्मांचे ठिकाणीं ममता आणि शोक ह्यांची प्राप्तिच येत नसल्यामुळें अशी व्यवस्था मानणें योग्य आहे. " असा मधुसूदनसरस्वतींच्या ह्मणण्याचा आशय आहे. परंतु, भाष्यकारांनीं न सुचविलेली ही व्यवस्था बरोबर नाहीं. कारण, हें कर्म माझें, हें मी करीत आहें, अशा रीतीनें कोणत्याही कर्माविषयीं ममत्वबुद्धि असण्याचा संभव आहे. तेव्हां मधुसूदनांनीं युद्धावांचून इतर कर्मांचे ठिकाणीं ममत्वाची प्राप्तिच नाहीं असें ह्मटलेलें अयोग्य आहे आणि त्याचप्रमाणें युद्धावांचून इतर कर्मांपैकीं पुष्कळ कर्में निष्फल होत असतात व कांहीं कष्टसाध्य होतात व कर्म निष्फल झालें असतां अथवा तें होण्यास फारच कष्ट झाले असतां वाईट वाटणें अगर संताप येणें हें अगदीं संभवनीय आहे. तेव्हां युद्धावांचून इतर कर्मांसंबंधानें शोक प्राप्त होण्याचा संभव नाहीं हेंही मधुसूदनसरस्वतींचें ह्मणणें बरोबर नाहीं. शिवाय ' सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा ' असा जो दुसऱ्या अध्यायांतील अठेचाळिसाव्या श्लोकांत भगवानांचा अर्जुनाला उपदेश आहे तो शोकादिकांच्या निवृत्तीकरितांच आहे. हें लक्ष्यांत आणिलें ह्मणजे मधुसूदनस-

रस्वतींनीं सांगितलेली ही व्यवस्था अयोग्य आहे; हें उघडच होत आहे

( ज्ञानेश्वरमहाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहे:— तरी उचितें कर्में आघवीं । तुवां आचरोनी मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति विन्यसावी । आत्मरूपीं ॥ ८६ ॥ हें कर्म मी कर्ता । कां आचरेन या अर्था । ऐसा अभिमान झणें चित्ता। रिघों देसी ॥ ८७ ॥ तुवां शरीर परा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावें । भोग सकळ ॥ ८८ ॥ आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इये रथीं । देई आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ ८९ ॥ जगीं कीर्ति रूढवी । स्वधर्माचा मान वाढवी । इया भारापासोनि सोडवी । मेदिनी हे ॥ १९० ॥ आतां पार्था निःशंक होई । या संग्रामा चित्त देई । एथ हेवांचूनि कांहीं । बोलों नये ॥ ९१ ॥ )

(ज्ञानेश्वर महाराजांनीं ह्या आपल्या व्याख्यानामध्यें " आरूढ पां इये रथीं " असें ह्मटलें आहे तें बरोबर नाहीं. अर्जुन रथावरून खालीं उतरलाच नव्हता. तेव्हां अर्थातच तो खालीं उतरला होता असें समजून जो जो मजकूर ज्ञानेश्वर महाराजप्रभृतींनीं लिहिलेला आहे तो बरोबर मानितां येणार नाहीं हें उघड आहे. गीतेच्या पुस्तकांतून प्रथमतः कोठें कोठें चित्र काढिलेलें असतें व त्या चित्रांत अर्जुन हात जोडून रथाखालीं उभा आहे असें दाखविलेलें असतें तेंही ह्या ज्ञानेश्वर महाराजप्रभृतींच्या व्याख्यानाच्या आधारानेंच असल्यामुळें चुकीचें आहे. ज्ञानेश्वर महाराजांचें हें व्याख्यान बरोबर कसें नाहीं तें पाहूः— ' एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् । विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः। ' हा पहिल्या अध्यायांतील शेवटला श्लोक आहे व ह्या श्लोकांतील ' रथोपस्थ उपाविशत् ' ह्या पदांचें व्याख्यान ज्ञानेश्वर महाराजांनीं असें केलें आहे:—मग अत्यंत उद्वेगला । न धरत गाहिवर आला । तेथ उडी घातली खालां । रथौनियां ॥ ६९ ॥ जैसा राजकुमर पदच्युत। सर्वथां होय उपहत । कां रवि राहुग्रस्त । कळाहीन॥७०॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ॥
श्रद्धावन्तोनसूयन्तो मुच्यन्ते तेपि कर्मभिः ॥ ३१ ॥

---

यदेतन्मतं कर्म कर्तव्यमिति सप्रमाणमुक्तं तत्तथा ये मे०

---

नातरा महासिद्धिसभ्रमें । जिंतिला तापस श्रमें । मग आकळूनि कामें । दीन कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धर । अत्यंत दुःखें जर्जर । दिसे जेथ रहंवर । त्याजिला तेणें ॥ ७२ ॥

ह्या व्याख्यानांत ज्ञानेश्वर महाराजांनीं अर्जुनानें रथाखालीं उडी घातली, त्यानें उत्तम रथाचा त्याग केला; अशा अर्थाचे शब्द स्पष्ट घातले आहेत. पहिल्या अध्यायांतील एकुणतीस व तीस ह्या श्लोकामध्यें अर्जुनानें भगवानांना " हे कृष्णा, माझे हातपाय मोडले आहेत. तोंड कोरडें पडलें आहे; अंगाचा थरकांप होऊन अंगावर कांटा आला आहे; गांडीव हातांतून गळूं लागलें आहे; सर्वांगाचा दाह होत आहे आणि घेरी आल्यासारिखें होत असल्यामुळें माझ्यानें आतां उभें राहवत नाहीं; " असें ह्मटलें आहे. तिकडें लक्ष्य दिलें ह्मणजे ' रथोपस्थ उपाविशत् ' ह्याचा अर्थ रथाखालीं उडी घातली असा करणें नीट दिसत नाहीं. रथावरून खालीं उतरण्याला अथवा उडी टाकण्याला मनुष्य सावध असला पाहिजे. शोकानें मन गोंधळून जाऊन ज्याला नीट देहभान देखील राहिलेलें नाहीं व त्यामुळें ज्याच्या हातांतील शस्त्रास्त्रें आपोआप गळूं लागलीं आहेत अशा अवस्थेंतील पुरुषाला रथावरून उडी टाकण्या इतका सावधपणा राहणें कठीण दिसत असल्यामळें आनदागिरिप्रभृति टीकाकारांनीं " रथोपस्थ उपाविशत् " ह्या पदांचा " रथावर बसला असा अर्थ केला आहे " तोच बरा दिसतो ३० )

जीं मनुष्यें मत्सर सोडून देऊन श्रद्धापूर्वक माझ्या मताप्रमाणें नित्य वागतात तींही कर्मापासून मुक्त होतात ॥ ३१ ॥

कर्म केलें पाहिजे ह्मणून मीं जें आपलें मत कथन केलें तें सप्रमाण

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ॥
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

---

कर्मभिः ॥ ३१ ॥ ये मे मदीयमिदं मतमनुतिष्ठन्त्यनुवर्तन्ते मानवा मनुष्याः श्रद्धावन्तः श्रद्दधाना अनसूयन्तोसूयां च मयि गुरौ वासुदेवेकुर्वन्तो मुच्यन्ते तेप्येवंभूताः कर्मभिर्धर्माधर्माख्यैः ॥ ३१ ॥

---

कथन केलें आहे. त्याप्रमाणें ह्या माझ्या मताला अनुसरून जे मानव श्रद्धेनें आणि मी जो गुरु वासुदेव त्याचे ठिकाणीं मत्सरबुद्धि न धरितां वागतात ते सुद्धां धर्माधर्मसंज्ञक कर्मापासून मुक्त होतात ३१.

( फलेच्छा न धरितां चित्तशुद्धीला कारणीभूत होत असलेल्या कर्माचें अनुष्ठान करीत असावें असें जें मज परमेश्वराचें मत सप्रमाण प्रतिपादन केलेलें आहे त्याला अनुसरून जे कोणी इतरही मानव असूया न धरितां श्रद्धेनें नित्य वागतात तेही अंतःकरणशुद्धीच्या द्वारानें ज्ञानप्राप्ति होऊन पापपुण्यसंज्ञक कर्मापासून मुक्त होतात. अत्यंत विश्वसनीय अशा सर्वज्ञ ईश्वरानें जें सांगितलें तें सत्यच आहे असा निश्चय धरणारे हा ह्या ठिकाणीं ' श्रद्धावन्तः ' ह्या विशेषणाचा अर्थ होय. दुःखरूप कर्में करण्याविषयीं हा आह्मांला विनाकारण आज्ञा करीत आहे; अशा प्रकारचा दोषारोप मज ईश्वराचे ठिकाणीं न करितां कर्मकरणारे हा ' अनसूयन्तः ' ह्या पदाचा अर्थ होय. )

( ज्ञानेश्वर महाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहेः— हे अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजें । श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥ ९२ ॥ ३१ )

परंतु, जे विनाकारण दोषबुद्धि धरून ह्या माझ्या मताप्रमाणें वागत नाहींत ते अविवेकी कोणत्याही प्रकारच्या ज्ञानाला अयोग्य असून पुरुषार्थांपासून भ्रष्ट आहेत असें तूं समज ॥ ३२ ॥

**ये तु तद्विपरीता एतन्मम मतमभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति नानुवर्तन्ते मे मतं सर्वेषु ज्ञानेषु विविधं मूढास्ते सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टान्नाशं गतानचेतसोऽविवेकिनः ॥ ३२ ॥**

---

जे त्यांच्या विपरीत असतात ह्मणजे विनाकारण दोषबुद्धि धरून जे ह्या माझ्या मताप्रमाणें वागत नाहींत ते अविवेकी पुरुष सर्व प्रकारच्या ज्ञानाविषयीं सर्व प्रकारें मूढ आणि नाश पावलेले आहेत असें तूं समज ३२.

( जे श्रद्धाहीन असून माझ्या ह्या मताची असूया करितात ह्मणजे विनाकारण दोषारोप करून माझी निंदा करितात आणि माझ्या मताप्रमाणें वागत नाहींत ते सर्वप्रकारच्या ज्ञानाविषयीं सर्वप्रकारें मूढ असतात असें तूं समज आणि त्याचप्रमाणें ते सर्वप्रकारच्या पुरुषार्थांना मुकलेले असतात हेंही तूं लक्ष्यांत ठेव. ह्या वरील भाष्याचा आशय होय. कर्म आणि सगुण व निर्गुण ब्रह्म ह्यांपैकीं ज्यांना एकाचेंही कोणत्याही प्रकारचें ज्ञान नाहीं ते 'सर्वज्ञानविमूढ' होत. अचेतस्=अविवेकी. नष्ट=सर्वप्रकारच्या पुरुषार्थांना मुकलेले. )

( ह्या श्लोकाचें व्याख्यान ज्ञानेश्वर महाराजांनीं असें केलें आहे:— नातरी प्रकृतिमंत होउनि । इंद्रियां लळा देउनी । जे हें माझें मत आव्हेरुनी । वोसंडिती ॥ ९४ ॥ जें सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखिती । कां अर्थवाद ह्मणती । वाचाळपणें ॥ ९५ ॥ ते मोहमदिरा भुलले । विषयविषें घारले । अज्ञानपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ॥ ९६ ॥ देखें शवाच्या हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें । ना तरी जात्यंधा पाहलें । प्रमाण नोहे ॥ ९७ ॥ कां चंद्राचा उदय जैसा । उपयोगा नवचे वायसा । मूर्खा विवेक हा तैसा । रुचेल ना ॥ ९८ ॥ तैसे जे पार्था । विमुख ह्या परमार्था । तयांसि भाषण सर्वथा । करावेना ॥ ९९ ॥ ह्मणोनि ते न मानिती । आणि निंदाही

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ॥**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥**

---

**कस्मात्पुनः कारणात्त्वदीयं मतं नानुतिष्ठन्ति परधर्माननुतिष्ठन्ति स्वधर्मं च नानुवर्तन्ते त्वत्प्रतिकूलाः कथं न बिभ्यति त्वच्छासनातिक्रमदोषात्तत्राह सदृशं ० रिष्यति ॥ ३३ ॥ सदृशमनुरूपं चेष्टते कस्याः स्वस्याः स्वकीयायाः प्रकृतेः प्रकृतिर्नाम पूर्वकृतधर्माधर्मादिसंस्कारो वर्तमानजन्मादावभिव्यक्तः सा प्रकृतिस्तस्याः सदृशमेव सर्वो जन्तुर्ज्ञानवानपि किं पुनर्मूर्खस्तस्मात्प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति मम वान्यस्य वा ॥ ३३ ॥**

---

करूं लागती । सांगें पतंग काय साहती । प्रकाशातें ॥ २०० ॥ पतंग दीपीं आलिंगन । तेथ त्यासि अचुक मरण । तेवि विषयाचरण । आत्मघाता ॥ २०१ ॥ ३२ )

प्राणी ज्ञानवान् जरी असला तरी तो आपल्या स्वभावाला अनुसरून वागत असतो. कारण, प्राणी आपल्या स्वभावावर जातात, स्वभावापुढें निग्रह काय करणार आहे ? ॥ ३३ ॥

" कोणत्या कारणामुळें लोक तुझ्या मताप्रमाणें वागत नाहींत ह्मणजे परधर्माचें अवलंबन करितात आणि स्वधर्माला अनुसरून वागत नाहींत ? आणि त्याचप्रमाणें तुझ्या विरुद्ध होऊन तुझी आज्ञा उल्लंघन करण्याच्या दोषाला ते कसे भीत नाहींत ? " ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, तुला सांगतों. अरे, ज्ञानवान् जरी असला तरी कोणीही प्राणी आपल्या प्रकृतीला अनुरूप असेंच वर्तन करीत असतो. तेव्हां मूर्खांची तर गोष्ट कशाला पाहिजे ? तस्मात्, प्राणी हे आपल्या जातीवर जातात, त्याला माझ्या अथवा दुसऱ्याच्या निग्रहाचा काय उपयोग होणार ? पूर्व जन्मामध्यें हातून घडलेल्या पापपुण्यादिकांचा जो

संस्कार ह्या जन्मीं वगैरे अभिव्यक्त होतो त्याला प्रकृति असें ह्मणतात ३३.

( आतां प्राणी तुझ्या विरुद्ध होऊन तुझी आज्ञा उल्लंघन करण्याचें भय बाळगीत नाहींत आणि स्वधर्माला अनुसरून वागावें असें जें तुझें मत त्याच्या अनुरोधानें न वागतां परधर्माचें अवलंबन करितात. ह्याचें कारण काय ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, सांगतों. हा " कस्मात्पुनः कारणात्त्वदीयं० तत्राह " ह्या भाष्याचा आशय होय. अरे, ज्ञानवान् प्राणी सुद्धां आपल्या स्वभावानुरूप वागत असतो मग मूर्खांची तर गोष्ट पाहिजे कशाला ? तस्मात्, प्राणी आपआपल्या जातीवरच जात असतात. " आतां प्राणी जरी स्वभावाच्या अधीन असले तरी त्या त्यांच्या स्वभावाचा तूं निग्रह कां करीत नाहींस ? " ह्मणून ह्मणशील तर, हे अर्जुना, असें करूं नका ह्मणून प्राण्यांचा जरी मीं अथवा राजानें निषेध केला तरी त्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. कारण, पूर्वजन्मार्जित पापपुण्यादिकांचा संस्कार जो ह्या जन्मीं वगैरे प्राण्यांचे ठिकाणीं अभिव्यक्त झालेला असतो तो सर्वांपेक्षां प्रबल असल्यामुळें त्याच्यापुढें आह्मासारख्यांच्या आज्ञेचें भय प्राणी बाळगीत नाहींत. हा " सदृशमनुरूपं० मम वान्यस्य वा " ह्या भाष्याचा आशय होय ३३. )

( ज्ञानेश्वर महाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहे:— ह्मणोनि इंद्रियें एके । जाणतेनि पुरुखें । लावावीं ना कौतुकें । आदिकरुनी ॥ २ ॥ हांगा सर्पेंसीं खेळों येइल । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धी जाईल । सांगे हालाहल जिरेल । सेविलेया काई ॥ ३ ॥ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला । तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥ ४ ॥ येरवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नानाभोगरचना । मेळवावी ॥ ५ ॥ आपण सायासें करूनि बहुतें । सकळाही समृद्धिजातें । उदोअस्त या देहातें । प्रतिपाळावें कां ॥ ६ ॥ सर्वस्वें शिणोनि एथें । आर्जवावीं संपत्तिजातें । तेणें स्वधर्म

इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ॥
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥

---

यदि सर्वो जन्तुरात्मनः प्रकृतिसदृशमेव चेष्टते न च प्रकृतिशून्यः कश्चिदस्ति ततः पुरुषकारस्य विषयानुपपत्तेः शास्त्रानर्थक्यप्राप्ताविदमुच्यते इन्द्रियस्ये० पन्थिनौ ॥ ३४ ॥ यस्येति । इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे सर्वेन्द्रियाणामर्थे शब्दादिविषय इष्टे रागोऽनिष्टे द्वेष इत्येवं प्रतीन्द्रियार्थे रागद्वेषाववश्यंभाविनौ । तत्रायं पुरुषकारस्य शास्त्रार्थस्य च विषय उच्यते । शास्त्रार्थे प्रवृत्तः पूर्वमेव रागद्वेषयोर्वशं नागच्छेत् ।

---

सांडूनि देहातें । पोखावें काई ॥ ७ ॥ मग हें तंव पांच मेळावा । शेखीं अनुसरेल पंचत्वा । तेवेळीं केला कें गिंवसवा । शीण आपुला ॥ ८ ॥ ह्मणूनि केवळ देहभरण । तें जाणें उघडी नागवण । यालागीं एथ अंतःकरण । देयावेना ॥ ९ ॥ ३३ )

विषयांचे ठिकाणीं प्रीति व द्वेष असतात. तस्मात्, त्यांच्या अधीन होऊं नये. कारण, तीं ह्या पुरुषाला आड येणारीं आहेत ॥ ३४ ॥

आतां " प्रत्येक प्राणी जर आपल्या प्रकृतीला अनुसरूनच वागत असतो आणि प्रकृतिरहित असा जर कोणीही नाहींच तर पुरुषप्रयत्नाचा उपयोग होण्याला जागाच नसल्यामुळें विधिनिषेधबोधक शास्त्रच व्यर्थ झालें असें ह्मणावयाचें " ह्मणून ह्मणशील तर, हे अर्जुना, पुरुषप्रयत्न आणि शास्त्रप्रतिपादित विधिनिषेधहीं व्यर्थ नाहींत. कारण, सर्व इंद्रियांच्या विषयांचे ठिकाणीं राग आणि द्वेष ह्मणजे जो विषय इष्ट असेल त्याविषयीं प्रीति आणि जो अनिष्ट असेल त्या विषयीं द्वेष हीं अवश्य असतातच. तेव्हां शास्त्राप्रमाणें वागण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषानें प्रथमपासूनच राग आणि द्वेष ह्यांच्या अधीन होऊन राहूं नये. हा पुरुषप्रयत्नाचा व शास्त्रार्थाचा विषय होय. कारण, जो पुरु-

**या हि पुरुषस्य प्रकृतिः सा रागद्वेषपुरःसरैव स्वकार्ये पुरुषं प्रवर्तयति तदा स्वधर्मपरित्यागः परधर्मानुष्ठानं च भवति। यदा पुना रागद्वेषौ तत्प्रतिपक्षेण नियमयति तदा शास्त्रदृष्टिरेव पुरुषो भवति न प्रकृतिवशः। तस्मात्तयो रागद्वेषयोर्वशं न गच्छेत्। यतस्तौ ह्यस्य पुरुषस्य परिपन्थिनौ श्रेयोमार्गस्य विघ्नकर्तारौ तस्करावित्यर्थः ॥ ३४ ॥**

---

षाचा स्वभाव असतो, ह्मणजे पूर्वजन्मार्जित पापपुण्यादिकांचा संस्कार जो इहजन्मीं वगैरे पुरुषाचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत असतो, तो रागद्वेषपूर्वकच आपल्या कार्याचे ठिकाणीं पुरुषाची प्रवृत्ति करीत असतो आणि त्याचवेळीं पुरुषाच्या हातून स्वधर्मत्याग व परधर्मावलंबन हीं होत असतात. परंतु, राग आणि द्वेष ह्यांना विरुद्ध असलेला जो विवेक त्याच्या योगानें जेव्हां पुरुष रागद्वेषांचें संयमन करूं लागतो तेव्हां तो शास्त्राकडेच दृष्टि देऊन वागणारा होतो. प्रकृतीच्या अधीन अर्थात् पूर्वजन्मार्जित पापपुण्यादि संस्काराच्या अधीन होत नाहीं. तस्मात् , राग आणि द्वेष ह्यांच्या अधीन होऊन राहूं नये. कारण, चोरांप्रमाणें ते ह्या पुरुषाच्या मोक्षमार्गाला विघ्न आणणारे शत्रु आहेत ३४.

( " आतां सर्व प्राणी जर आपल्या प्रकृतीच्या अधीन आहेत तर शास्त्राला अथवा व्यवहाराला अनुसरून पुरुषानें आपल्या इच्छेनें कांहीं करावयाचें असल्यास तें त्याच्या हातून होण्याचा संभवच नसल्यामुळें शास्त्रांत सांगितलेलें विधि व निषेध व्यर्थच होणार. कारण, प्रकृतिरहित असें जर कांहीं प्राणी असते तर त्यांना आपल्या इच्छेप्रमाणें वागतां आलें असतें आणि शास्त्रबोधित विधिनिषेधांचा त्यांचे ठिकाणीं उपयोग झाला असता. परंतु, प्रकृतिरहित ह्मणजे पूर्वजन्मार्जितपापपुण्यादिसंस्काररहित असा कोणीही प्राणी नाहीं आणि ह्मणूनच पुरुषप्रयत्नाचा उपयोग होण्याला जागाच नसल्यामुळें विधिनिषेधबोधक

शास्त्र निरर्थक आहे असेंच ह्मणावें लागणार. ” अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून भगवान् सांगतात. हें “ यदि सर्वो जन्तु० विदमुच्यते ” ह्या भाष्याचें तात्पर्य होय. “ इन्द्रियस्य ” हें पद दोनदां असल्यामुळें भाष्यकारांनीं ह्या दोहोंचा मिळून अर्थ सर्व इंद्रियांचा असा केला आहे. फूलन फूल त्यानें तोडून आणिलें ह्याचा अर्थ ज्याप्रमाणें सर्व फुलें तोडून आणिलीं असा होतो त्याचप्रमाणें इंद्रियाचें इंद्रियाचें ह्याचा अर्थ सर्व इंद्रियांचें असा होतो. असो. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हें श्रवणादि इंद्रियांचें विषय होत. ह्यांपैकीं जो विषय अनुकूल असेल तो शास्त्रानें जरी निषिद्ध सांगितलेला असला तरी त्याचे ठिकाणीं अभिरुचि उत्पन्न होते आणि जो आपणाला प्रतिकूल वाटत असेल तो शास्त्रविहित जरी असला तरी त्याच्या विषयीं द्वेष उत्पन्न होतो. अशा प्रकारें प्रत्येक विषयाचे ठिकाणीं अनुकूलता आणि प्रतिकूलता ह्या रीतीनें राग आणि द्वेष हे असतातच. तेव्हां त्या रागद्वेषांच्या अधीन न होणें हाच पुरुषप्रयत्नाचा व शास्त्राचा उपयोग होय. उदाहरणार्थः—शब्द हा श्रवणेंद्रियाचा विषय आहे व हा शास्त्रविहित आणि शास्त्रनिषिद्ध असा दोन्ही प्रकारचा असण्याचा संभव आहे. कीर्तन, पुराण वगैरे श्रवण करणें ही गोष्ट शास्त्रविहित आहे आणि नटाचें वगैरे गायन ऐकणें ही गोष्ट शास्त्रानें निषिद्ध आहे. परंतु, पूर्वजन्मार्जित पापपुण्यादिकांचा संस्कार ज्याप्रमाणें पुरुषाचे ठिकाणीं व्यक्त झालेला असेल त्याप्रमाणें त्या पुरुषाची स्वाभाविक प्रवृत्ति होईल. तो संस्कार जर विपरीत झालेला असला तर शास्त्रानें निषिद्ध मानिलेल्या गोष्टींकडे ह्मणजे नटाचें गायन करणें वगैरेकडे त्याची प्रवृत्ति होऊं लागेल आणि पुराण, कीर्तन इत्यादिकांचें श्रवण शास्त्रविहित असतांनाही त्याविषयीं त्याचे ठिकाणीं तिरस्कार उत्पन्न होईल. तेव्हां अशा रीतीनें आपल्या कल्याण्याला आड येणारे जे रागद्वेष त्यांच्या तावडींत न सांपडणें ही गोष्ट पुरुषप्रयत्न आणि शास्त्र ह्यांवर

अवलंबून आहे. कोणतेंही कृत्य करण्याकडे पुरुषाची प्रवृत्ति होण्यास आणि त्याचप्रमाणें कोणत्याही गोष्टीचा तिट्कारा येण्यास दोन कारणें मुख्य असावीं लागतात. उदाहरणार्थः—ब्राह्मणाची सुरापानाकडे प्रवृत्ति होण्यास दोन कारणें अवश्य आहेत. सुरापानापासून आपल्याला काय परिणाम भोगावा लागेल किंवा हें आपल्या कल्याणाला कसें आड येईल हें माहीत नसणें हें एक कारण आणि सुरापान केल्यानें अन्नपचन होऊन श्रम परिहार वगैरे होतात अशी समजूत असणें हें दुसरें कारण. ह्या दोन कारणांमुळेंच पुरुषाची प्रकृति, ह्मणजे पूर्वजन्मार्जितधर्माधर्मादिसंस्कार, निषिद्ध गोष्ट करण्याकडे पुरुषाची प्रवृत्ति करीत असते. राग आणि द्वेष हे पुरुषाच्या कल्याणाचे शत्रु आहेत असें जें वर सांगितलें त्यांपैकीं राग ( ह्मणजे अवड अथवा लोलुपता ) ह्याप्रमाणें पुरुषाच्या कल्याणाला शास्त्रनिषिद्ध गोष्ट करण्याकडे त्याची प्रवृत्ति करून आड येत असतो. आतां द्वेष कसा आड येत असतो तो पहा:—अभिरुचि उत्पन्न होऊन कोणतीही निषिद्ध गोष्ट करण्याकडे पुरुषाची प्रवृत्ति होण्याला ज्याप्रमाणें ती गोष्ट केल्यापासून काय तोटा होणार ह्याचें ज्ञान नसणें व केली असतां फायदा होईल अशी समजूत असणें हीं कारणें अवश्यक असतात त्याचप्रमाणें द्वेष अथवा तिरस्कार उत्पन्न होऊन शास्त्रविहित गोष्टीचा त्याग करण्याकडे पुरुषाची प्रवृत्ति होणें ह्यालाही ती गोष्ट केल्यापासून कल्याण होतें हें माहीत नसणें व केल्यापासून अकल्याण होतें अशी समजूत असणें हीं दोन कारणें असावीं लागतात. उदाहरणार्थः—पूर्वजन्मार्जितपुण्यपापादिकांच्या संस्कारामुळें कांहीं पुरुषांना शास्त्रविहित अशा संध्यावंदनाचा तिट्कारा येऊन ते त्या कर्मापासून पराङ्मुख होत असतात. ह्याला कारणें दोन आहेत. संध्यावंदन केलें असतां आपलें कल्याण होतें हें ठाऊक नसणें आणि संध्यावंदन न केलें तर फायदा होईल अशी उलट समजूत असणें. ह्या दोन कारणांमुळें शास्त्रविहित अशा संध्यावंदनादि कर्मांपासून कांहीं ब्राह्मणांची

पराङ्मुखता दिसून येते आणि शास्त्रनिषिद्ध असें सुरापान वगैरे करण्याकडे कांहीं ब्राह्मणांची पूर्वजन्मार्जितसंस्कारामुळें प्रवृत्ति होत असल्याचें ऐकण्यांत येतें. आतां, विहित गोष्ट करण्याकडे पुरुषाची प्रवृत्ति होण्यास आणि निषिद्ध गोष्टीपासून पुरुषाची पराङ्मुखता होण्यास शास्त्र व पुरुषप्रयत्न ह्यांचा कसा उपयोग होतो तो पहा. सुरापान केल्यापासून काय परिणाम वाईट होतो हें प्रथम माहीत नसतें आणि तें केल्यापासून फायदा होतो अशी समजूत असते. ह्मणून सुरापानाकडे ब्राह्मणांची प्रवृत्ति झालेली असते परंतु " कृमिकीट-पतङ्गानां विड्भुजां चैव पक्षिणाम् । हिंस्रानां चैव सत्त्वानां सुरापो ब्राह्मणो व्रजेत् " ह्या धर्मशास्त्रांत सांगितलेल्या वचनाप्रमाणें सुरापानाचा परिणाम वाईट होतो असें मनांत ठसलें ह्मणजे सुरापानाकडे प्रवृत्ति होण्यास जीं दोन कारणें असावीं लागतात त्यांपैकीं एक कारण कमी होतें आणि सुरापानापासून अन्नपचन, श्रमपरिहार वगैरे गोष्टी होतात एवढेंच कारण शिलक राहतें; परंतु, हें एक कारण पुरुषाची प्रवृत्ति पूर्वींप्रमाणें सुरापानाकडे सुरू ठेवण्यास समर्थ होत नाहीं. पूर्वीं सुरा-पान वगैरे करण्यांत पुढें सरसावलेलेही कांहीं लोक सर्वस्वीं त्या निषिद्ध कृत्यापासून, शरीरावर वगैरे त्याचा विशेषसा वाईट परिणाम झाला नसतांनाही, परावृत्त होत असतात असें जें कांहीं लोकांविषयीं कधीं कधीं ऐकण्यांत येतें त्यांतलें तरी कारण हेंच. कारण शास्त्रांत सांगितलेला सुरापानाचा परिणाम काय होतो हें कळलें ह्मणजे सुरा-पानापासून अन्नपचन, श्रमपरिहार वगैरे होतात अशी जी एकच समजूत शिलक असते ती सुरापानाकडे त्या पुरुषाची प्रवृत्ति करण्यास समर्थ होत नाहीं. उदाहरणार्थः—साखर आणि विष हीं अन्नांत कालवून ठेविलेलीं आहेत. परंतु, ह्यांत विष आहे हें ठाऊक नसून फक्त साखर कालविलेली आहे एवढ्याच समजुतीवर एकादा पुरुष जर तें अन्न भक्षण करण्याला प्रथमतः प्रवृत्त झाला असला तरीं त्यांत विष आहे

असें त्याला समजून आल्यावर फक्त साखरेच्या फायद्याकडे दृष्टि देऊन तो तें अन्न खाण्यास पुढें प्रवृत्त होणार नाहीं. सारांश, अनिष्ट परिणामाचें ज्ञान नसतां इष्ट परिणाम होईल अशी समजूत असली ह्मणजेच पुरुषाची प्रवृत्ति निषिद्ध कर्म करण्याकडे होत असते आणि अनिष्ट परिणाम जर समजून आला तर इष्ट परिणाम होईल ही एकटी समजूत पुढें त्या मनुष्याची निषिद्ध कर्म करण्याकडे प्रवृत्ति करण्यास समर्थ होत नाहीं त्याचप्रमाणें संध्यावंदनादि नित्य कर्मे आपल्या कल्याणाला कारणीभूत होत असतात ही गोष्ट एकदां शास्त्रानें कळून आली ह्मणजे संध्यावंदनादि नित्य कर्मे करण्यांत व्यर्थ त्रास मात्र होतो ही जी एकच समजूत अवशिष्ट राहते ती पूर्वीप्रमाणें संध्यावंदनादि नित्य कर्मांचे ठिकाणीं पुरुषाची द्वेषबुद्धि उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं. असो. ह्याप्रमाणें विधिनिषेधबोधक शास्त्र विहित कर्मांकडे पुरुषाची प्रवृत्ति करितें आणि निषिद्ध कर्मांपासून त्याला निवृत्त करितें व स्वाभाविक जे रागद्वेष तेच शास्त्रीय ज्ञानानें नाहींसे झाले असतां केवल जे पूर्वजन्मार्जितधर्माधर्मादिसंस्कार ते निषिद्ध कर्मांकडे शास्त्रज्ञ पुरुषाची प्रवृत्ति करण्यास समर्थ होत नाहींत. तस्मात्, पुरुषप्रयत्न आणि विधिनिषेधबोधक शास्त्र हीं निरर्थक नाहींत. हा ह्या श्लोकावरील भाष्याचा आशय आहे ३४. )

( ह्या श्लोकाचें व्याख्यान ज्ञानेश्वर महाराजांनीं असें केलें आहे:— येऱ्हवीं इंद्रियांचिया अर्था। सारिखा विषय पोषितां। संतोष कीर चित्ता। आपजेल॥ २१० ॥ परी तो संवचोराचा सांगात। जैसा नावेक स्वस्थ। जंव नगराचा प्रांत। सांडिजेना॥ ११ ॥ बापा विषयाची मधुरता। ह्मणें आवडी उपजे चित्ता। तो परिणाम विचारितां। प्राणहरी॥ १२ ॥ देखें इंद्रियीं काम असे। तो लावी सुख दुरासे। जैसा गळीं मीन आमिषें। भुलविजे गा॥ १३ ॥ परी तयामाजीं गळु आहे। जो प्राणातें घेऊनि जाये। तो जैसा ठाऊवा नोहे। झांकलेपणें॥ १४ ॥ तैसें अभि-

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

**तत्र रागद्वेषप्रयुक्तो मन्यते शास्त्रार्थमप्यन्यथा परधर्मोपि धर्मत्वादनुष्ठेय एवेति तदसत् । श्रेयान्स्व० भयावहः ॥ ३५ ॥ श्रेयान्प्रशस्यतरः स्वो धर्मः स्वधर्मो विगुणोपि विगतगुणोप्यनुष्ठीयमानः परधर्मात्स्वनुष्ठितात्साद्गुण्येन संपादितादपि ।**

लाषें येणें कीजेल । विषयांची आशा धरिजेल । तरीं वरपडा होईजेल । क्रोधानळा ॥ १५ ॥ जैसा कवळोनियां पारधी । घातेचियेसंधी । आणी मृगातें बुद्धि । साधावया ॥ १६ ॥ एथ तैसीचि परी आहे । ह्मणूनि संग हा तुज नोहे । पार्था दोन्ही काम क्रोध हे । घातक जाणें ॥ १७॥ ह्मणऊनि हा आश्रयोचि न करावा । मनेंही आठवो न धरावा । एक निजवृत्तीचा वोलावा । नासों नेदी ॥ १८ ॥ ३४ )

स्वधर्माच्या अनुष्ठानांत जरी कांहीं वैगुण्य झालें तरी सुद्धां तो उत्तम प्रकारें आचरिलेल्या परधर्मापेक्षां श्रेष्ठ होय. इतकेंच नव्हे परंतु, परधर्मामध्यें राहून जगण्यापेक्षां स्वधर्मांत राहून मरण येणेंही श्रेयस्कर आहे. कारण, परधर्म भयंकर आहे ॥ ३५ ॥

( राग आणि द्वेष हे कल्याणाला कसे आड येतात ह्मणून विचारशील तर सांगतों. ) राग आणि द्वेष ह्यांनीं युक्त असलेल्या मनुष्याची शास्त्रार्थाविषयींही भलतीच समजूत होते ह्मणजे परधर्मही स्वधर्माप्रमाणें धर्मच असल्यामुळें त्याचेंही अनुष्ठान करावें असें तो मानूं लागतो; परंतु, हें त्याचें मानणें अयोग्य आहे. कारण, यथासांग आचरिलेल्याही परधर्मापेक्षां स्वधर्म आचरितांना कांहीं वैगुण्य झालें तरी सुद्धां स्वधर्मच परधर्मापेक्षां अधिक प्रशस्त होय. फार कशाला ? ( स्वधर्माला धरून राहिलें तर मरण येण्याचें ठरलें आहे आणि परधर्माचें अवलंबन करून राहिलें असतां जगणें निश्चित

अर्जुन उवाच ॥

---

**स्वधर्मे स्थितस्य निधनं मरणमपि श्रेयः परधर्मे स्थितस्य जीवितात् । कस्मात् । परधर्मो भयावहो नरकादिलक्षणं भयमावहति यतः ॥ ३५ ॥**

---

झालेलें आहे. असा प्रसंग जरी आला तरी ) परधर्माचें अवलंबन करून जीवंत राहण्यापेक्षां स्वधर्मामध्यें राहून मरण येणेंही अधिक श्रेयस्कर आहे. कारण, परधर्म परिणामीं नरकादिरूप भय प्राप्त होण्याला कारणीभूत होणारा आहे. ३५ )

( ज्ञानेश्वर महाराजांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान असें केलें आहे:— अगा स्वधर्म आपुला । जरी कां कठिण जाहला । तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥ १९ ॥ येरु आचार जो परावा । तो देखतां कीर बरवा । परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥ २२० ॥ सांगें शूद्रघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केविं सेवावीं । दुर्बळ जरी जाहला ॥ २१ ॥ हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केवि इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२ ॥ तरी लोकांचीं धवळारें । देखोनियां मनोहरें । असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवि ॥ २३ ॥ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली । तऱ्ही भोगितां तेचि भली । जियापरी ॥ २४ ॥ तेवि आवडे तैसा सांकड । आचरतां जऱ्ही दुवाड । तऱ्ही स्वधर्मचि सुरवाड । परत्रींचा ॥ २५ ॥ हांगा साकर आणि दूध । हें गौल्यें कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ॥ २६ ॥ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते आळुकीचि उरेल । जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा ॥ २७ ॥ ह्मणोनि आणिकांसि जें विहित । आणि आपण पेयां अनुचित । तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥ २८ ॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेचु होईल जीविता । तोहि निकावर उभयतां । दिसत असे ॥ २९ ॥ ३५ )

**अथ केन प्रयुक्तोयं पापं चरति पूरुषः ॥**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥३६॥**

---

**यद्यप्यनर्थमूलं ध्यायतो विषयान्पुंसो रागद्वेषौ ह्यस्य परिपन्थिनाविति चोक्तं विक्षिप्तमनवधारितं च तदुक्तं तत्संक्षिप्तं निश्चितं चेदमेवेति ज्ञातुमिच्छन्नर्जुन उवाच ज्ञाते हि तस्मिंस्तदुच्छेदाय यत्नं कुर्यामिति। अथ केन० नियोजितः ॥३६॥ अथ केन हेतुभूतेन प्रयुक्तः सन्राज्ञेव भृत्योयं पापं कर्म चरत्याचरति पूरुषः स्वयमनिच्छन्नपि हे वार्ष्णेय वृष्णिकुलप्र-**

---

अर्जुन प्रश्न करितोः—हे वृष्णिकुलोत्पन्ना श्रीकृष्णा, स्वतः इच्छा नसतांनाही बळजोरीनेंच कीं काय नियुक्त केलेला हा पुरुष कोणाच्या प्रेरणेमुळें पापाचरण करीत असतो ? ॥ ३६ ॥

पुरुष विषयांचें चिंतन करूं लागला असतां त्यांचे ठिकाणीं त्याची प्रीति जडते इत्यादि प्रकारानें ( दुसऱ्या अध्यायांतील बासष्ट व त्रेसष्ट श्लोकामध्यें ) आणि राग व द्वेष हे पुरुषाचे शत्रु आहेत इत्यादि प्रकारानें ( तिसऱ्या अध्यायांतील चवतिसाव्या श्लोकामध्यें ) अनर्थाचें मूळ जरी सांगितलेलें आहे तरी तें अनेक ठिकाणीं दर्शविलेलें आहे आणि अनर्थाचें मूळ हेंच ह्मणून निश्चयपूर्वक सांगितलेलें नाहीं. तस्मात्, हेंच अनर्थाचें मूळ असें थोडक्यांत व निश्चित समजावें ह्मणजे तें समजलें असतां मी त्याचा उच्छेद करण्याला यत्न करीन. अशी इच्छा धरून अर्जुन श्रीकृष्णांना प्रश्न करितोः— “ हे वृष्णिकुलोत्पन्ना श्रीकृष्णा, स्वतः इच्छा नसतांनाही राजानें आज्ञा केलेला सेवक ज्याप्रमाणें पापकर्म करितो त्याचप्रमाणें कोणीं कारणीभूत होऊन प्रेरणा केल्यामुळें हा पुरुष स्वतः इच्छा नसतांनाही पापकर्माचें आचरण करीत असतो ! ( पारतंत्र्यावांचून खरोखर असा प्रकार होणें संभवनीय नाहीं. ) तेव्हां राजानें आज्ञा केलेल्या सेवकाप्रमाणें ज्याची

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ॥
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥

---

सूत बलादिव नियोजितो राज्ञेवेत्युक्तो दृष्टान्तः ॥ ३६ ॥

शृणु त्वं तं वैरिणं सर्वानर्थकरं यं त्वं पृच्छसि श्रीभगवानुवाच । ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना । ऐश्वर्यादिषट्कं

---

प्रेरणा झाल्यामुळें हा पुरुष पापकर्माचें आचरण करितो तो वैरी कोण हें मला सांग? ३६.

( " ज्याप्रमाणें तूं स्वतः जन्ममरणरहित असतांनाही कोणी अत्यंत प्रीतींतील भक्तानें प्रार्थना केल्यामुळें वृष्णिकुलामध्यें जन्माला आलास, त्याप्रमाणें " हें सुचविण्याकरितां अर्जुनानें भगवानांना उद्देशून ' वार्ष्णेय ' असें संबोधन घातलें आहे. असा संबोधनाचा आशय लक्ष्यांत घेतला ह्मणजे हे श्रीकृष्णा, तूं स्वतः जन्ममरणरहित असूनही आणि ह्मणूनच जन्म घेण्याविषयीं तुझी इच्छा नसतांनाही ज्याप्रमाणें कोणी अत्यंत दृढ भक्तानें प्रार्थना केल्यामुळें वृष्णिकुलामध्यें जन्माला आलास त्याप्रमाणें कोणीं कारणीभूत होऊन प्रेरणा केल्यामुळें हा पुरुष स्वतः पापाचरणाची इच्छा करीत नसतांनाही पापाचरण करीत असतो? हें मला सांग असा ह्या श्लोकाचा तात्पर्यार्थ निघतो ३६. )

श्रीभगवान् उत्तर देतातः— बा अर्जुना, अधाशी व महापापी असा हा रजोगुणोद्भव काम आहे आणि क्रोधही हाच आहे. तस्मात्, हा काम ह्या संसारामध्यें वैरी आहे असें तूं समज ॥ ३७ ॥

अरे, सर्व प्रकारचे अनर्थ उत्पन्न करणारा जो वैरी तूं विचारीत आहेस तो कोण हें तूं ऐकून घे; असें सांगण्याच्या उद्देशानें श्रीभगवान् ह्मणजे " संपूर्ण ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, वैराग्य आणि मोक्षोपायभूत ज्ञान ह्या सहांना भग अशी संज्ञा आहे. " ह्या वचनांत सांगितल्याप्रमाणें ऐश्वर्य

यस्मिन्वासुदेवे नित्यमप्रतिबन्धत्वेन सामस्त्येन च वर्तते। उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामागतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति । उत्पत्त्यादिविषयं च विज्ञानं यस्य स वासुदेवो वाच्यो भगवानिति । काम एष क्रोध एष रजोगुण० वैरिणम् ॥ ३७ ॥ काम एष सर्वलोकशत्रुर्यन्निमित्ता सर्वानर्थप्राप्तिः प्राणिनां स एष कामः प्रतिहतः केनचित्क्रोधत्वेन परिणमते । अतः क्रोधोऽप्येष एव । रजोगुणसमुद्भवो रजश्च तद्गुणश्च स रजोगुणः स समुद्भवो यस्य स कामो रजोगुणसमुद्भवो रजोगुणस्य वा समुद्भवः। कामो ह्युद्भूतो रजः प्रवर्तयन्पुरुषं प्रवर्तयति । तृष्णया ह्यहं कारित इति दुःखितानां रजःकार्ये सेवादौ प्रवृत्तानां प्रलापः

---

वगैरे सहा गुण ज्या वासुदेवाचे ठिकाणीं प्रतिबंधरहित व संपूर्णपणें नित्य असतात आणि " प्राण्यांची उत्पत्ति व विनाश ह्यांचीं कारणें, प्राण्यांची भावी संपत्ति व विपत्ति आणि प्राण्यांचें ज्ञान व अज्ञान हीं सहा जो जाणितो त्याला भगवान् असें ह्मणावें " ह्या वचनांत सांगितल्याप्रमाणें उत्पत्तिकारणादिविषयक ज्ञान ज्याचे ठिकाणीं आहे तो लोकांपासून भगवान् ही संज्ञा लावून घेण्यास पात्र असलेला वासुदेव अर्जुनाला ह्मणालाः—हा काम सर्व लोकांचा शत्रु आहे व ह्याच्याचमुळें प्राण्यांना सर्व प्रकारचे अनर्थ प्राप्त होत असतात. त्या ह्या कामाचा कोणी विघात केला असतां हाच क्रोधरूप बनतो; ह्मणून क्रोधही हाच आहे. हा रजोगुणसमुद्भव आहे; ह्मणजे रजोगुण ह्याचें कारण आहे; अथवा रजोगुणाचें हा कारण आहे. काम उत्पन्न झाला असतां रजोगुणाला प्रवृत्त करीतच ( दुःखदायक कर्मांमध्यें ) पुरुषाची प्रवृत्ति करीत असतो. कारण, " अरे, आशेनें मला ही गोष्ट करावयाला लाविली " ह्मणून रजोगुणकार्यरूप सेवा वगैरे करण्यास प्रवृत्त झालेल्या दुःखित लोकांची

धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ॥
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

---

श्रूयते। महाशनो महदशनमस्येति महाशनोत एव महापाप्मा। कामेन हि प्रेरितो जन्तुः पापं करोत्यतो विद्ध्येनं काममिह संसारे वैरिणम् ॥ ३७ ॥

---

ओरड कानावर येत असते. हा अधाशी आणि ह्मणूनच महापापी आहे. कारण, कामानें प्रेरणा केली असतां प्राणी पाप करितो. तस्मात्, हा काम ह्या संसारामध्यें वैरी आहे असें समज. 'रजश्च तद्गुणश्च रजोगुणः स समुद्भवो यस्य सः' असा 'रजोगुणसमुद्भवः' ह्या समासाचा विग्रह करावा अथवा 'रजोगुणस्य समुद्भवः' असाही करावा ३७.

( न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः । नालमेकस्य तत्सर्वमिति मत्वा शमं व्रजेत् ॥ असें महाभारतांत दोन श्लोक सांगितले आहेत व त्यांचा अर्थ—विषयांच्या उपभोगानें काम कधींही शांत होत नाहीं; हविर्द्रव्याच्या योगानें वृद्धिंगत होणाऱ्या अग्नीप्रमाणें तो उलट वाढतच जातो. सारांश, पृथ्वीमध्यें असलेलें धान्य, द्रव्य, पशु, स्त्रिया हीं सर्व जरी एकाला मिळालीं तरी सुद्धां त्याची तृप्ति होत नाहीं असें समजून शमाचें अवलंबन करावें—असा आहे. तेव्हां हे श्लोक लक्ष्यांत घेतले असतां " महाशन=अधाशी=खादाड=कधींही तृप्त न होणारा " असें जें कामाला विशेषण दिलें आहे तें अगदीं योग्य आहे असें सिद्ध होतें.*३७ )

---

* सर्व अनर्थांचें मूळ कामच आहे असें बृहदारण्यकोपनिषदांतील प्रथमाध्यायांतर्गत चतुर्थ ब्राह्मणाच्या शेवटल्या कंडिकेपासून तों सदर्हू अध्याय संपेपर्यंत प्रतिपादन केलें आहे व हा विषय नीटसमजण्याकरितां ह्या ठिकाणीं सदर्हू श्रुति व त्यावरील भाष्य दिलें असतांही अप्रासंगिक होणार नाहीं. परंतु, ह्या प्रकरणांत सुमारें दोनशें पृष्ठें जाण्याचा संभव असल्यामुळें निरुपायास्तव तें येथें देतां आलें नाहीं.

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ॥
कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

---

कथं वैरीति दृष्टान्तैः प्रत्याययति धूमेन०आवृतम् ॥३८॥ धूमेन सहजेनाव्रियते वह्निः प्रकाशात्मकोऽप्रकाशात्मकेन यथा वादर्शो मलेन च यथोल्बेन गर्भवेष्टनेन जरायुणावृत आच्छादितो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

किं पुनस्तदिदंशब्दवाच्यं यत्कामेनावृतमित्युच्यते। आवृतं ज्ञानमे०नलेन च॥ ३९ ॥ आवृतमेतेन ज्ञानं ज्ञानिनो नित्यवैरिणा। ज्ञानी हि जानात्यनेनाहमनर्थे प्रयुक्तः पूर्वमेवेति

---

ज्याप्रमाणें धूमानें अग्नि, मलानें आरसा आणि गर्भाशयानें गर्भ आच्छादित असतो त्याचप्रमाणें त्या कामानें हें आच्छादित झालेलें आहे ॥३८॥

काम हा वैरी कसा हें दृष्टांतांनीं प्रत्ययास आणून देण्याकरितां भगवान् ह्मणतात :— सहज अशा अप्रकाशरूप धूमानें प्रकाशस्वरूप अग्नि ज्याप्रमाणें आच्छादित असतो, मलाच्या योगानें आरसा जसा आच्छादिलेला असतो आणि उल्बानें ह्मणजे जरायुसंज्ञक गर्भवेष्टनानें ज्याप्रमाणें गर्भ आच्छादित झालेला असतो त्याप्रमाणें त्या कामाच्या योगानें हें आच्छादित झालेलें असतें ३८.

हे कुंतीपुत्रा अर्जुना, वासना हेंच ज्याचें रूप आहे आणि अतृप्त असल्यामुळें ज्याची पूर्तता होणें दुर्घट आहे व ज्ञानीपुरुषाचा जो नित्य वैरी आहे अशा ह्या कामानें ज्ञान आच्छादित केलेलें आहे ॥ ३९ ॥

हें आच्छादित झालें आहे असें मागल्या श्लोकांत सांगितलें; परंतु, 'हें' ह्या दर्शकसर्वनामानें काय घ्यावयाचें ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, सांगतों. ज्ञानी पुरुषाचा नित्य वैरी असलेल्या ह्या कामानें ज्ञान आच्छादित केलेलें आहे. ज्ञानी पुरुष "ह्यानें मला अनर्थांत पाडिलें" ह्मणून, पूर्वींच ह्मणजे काम उत्पन्न झाल्यावर त्याचें दुःखरूप कार्य प्राप्त

**दुःखी च भवति नित्यमेव। अतोसौ ज्ञानिनो नित्यवैरी न तु मूर्खस्य। स हि कामं तृष्णाकाले मित्रमिव पश्यंस्तत्कार्ये दुःखे प्राप्ते जानाति तृष्णयाहं दुःखित्वमापादित इति न पूर्वमेवातो ज्ञानिन एव नित्यवैरी। किंरूपेण कामरूपेण काम इच्छैव रूपमस्येति कामरूपस्तेन दुष्पूरेण दुःखेन पूरणमस्येति दुष्पूरस्तेनानलेन नास्याल पर्याप्तिर्विद्यत इत्यनलस्तेन॥३९॥**

---

होण्यापूर्वीच जाणीत असतो आणि तेव्हांपासून तो नित्य दुःखीही होतो. ह्मणून हा ज्ञानी पुरुषाचा वैरी आहे; मूर्खाचा नव्हे. कारण, वासना उत्पन्न होतेवेळीं तो कामाला मित्राप्रमाणें समजत असतो आणि त्या कामाची कृति जें दुःख तें प्राप्त झाल्यावर मात्र वासनेच्या योगानें मला दुःख भोगावयाला लाविलें असें समजतो; परंतु, पूर्वीं तसें समजत नाहीं. ह्मणून हा ज्ञानी पुरुषाचाच नित्य वैरी आहे. आतां ह्याचें रूप तरी काय आहे ह्मणून विचारशील तर सांगतों. हा कामरूप आहे. अर्थात् काम ह्मणजे इच्छा हेंच ह्याचें रूप आहे. ह्मणून ह्याला कामरूप असें ह्मणतात. शिवाय हा ' दुष्पूर ' आहे; ह्मणजे दुःखानें ह्याची पूर्तता होत असते. ह्मणून ह्याला 'दुष्पूर' असें ह्मणतात. हा ' दुष्पूर' असण्याचें कारण इतकेंच कीं; ह्याची कधीं तृप्ति होत नाहीं ३९.

( मधुसूदनसरस्वतींनीं " ज्ञानं " ह्या शब्दाचें व्याख्यान " ज्ञायतेनेनेति ज्ञानमन्तःकरणं "—ज्याच्या योगानें कांहीं समजलें जातें तें ज्ञान ह्मणजे अंतःकरण—असें केलें आहे. परंतु, भाष्यकारांना अभिमत नसलेलें हें व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, " पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशन " ह्या उपसंहारविषयक श्लोकामध्यें " ज्ञानविज्ञाननाशनं " हें विशेषण कामाला दिलेलें आहे. त्याचा विचार केला असतां ह्या श्लोकांतील ज्ञानशब्दाचा अर्थ अंतःकरण असा कारितां येत नाहीं. कारण, ह्या ठिकाणीं जो ज्ञानशब्दाचा अर्थ आहे तोच

इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ॥
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

किमधिष्ठानः पुनः कामो ज्ञानस्यावरणत्वेन वैरी सर्वस्येत्यपेक्षायामाह ज्ञाते हि शत्रोरधिष्ठाने सुखेन शत्रुनिबर्हणं कर्तुं शक्यत इति। इन्द्रिया०देहिनम् ॥ ४० ॥ इन्द्रियाणि मनो बुद्धिश्चास्य कामस्याधिष्ठानमाश्रय उच्यते। एतैरिन्द्रियादिभिराश्रयैर्विमोहयति विविधं मोहयत्येष कामो ज्ञानमावृत्याच्छाद्य देहिनं शरीरिणम् ॥ ४० ॥

" ज्ञानविज्ञाननाशनं " ह्या ठिकाणीं असणें अवश्य आहे. परंतु, ज्ञान ह्या शब्दाचा अर्थ अंतःकरण असा जर केला तर काम हा अंतःकरणाचा नाश करणारा अर्थात् वासनेचा क्षय करणारा आहे असें भलतेंच ठरूं लागेल. करितां, भाष्यकारांच्या विरुद्ध मधुसूदनसरस्वतींनीं केलेलें हें काल्पनिक व्याख्यान सर्वस्वीं त्याज्य आहे. ह्या एकुणचाळिसाव्या श्लोकांत " आवृतं ज्ञानमेतेन " असें असून पुढल्या चाळिसाव्या श्लोकांतही ' एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनं ' असें ह्मटलें आहे. परंतु, ह्या एकुणचाळिसाव्या श्लोकांतीलच ज्ञानशब्दाचें विपरीत व्याख्यान, भाष्यकारांची परवा न बाळगितां, मधुसूदनसरस्वतींनीं कां केलें हें समजत नाहीं. असो ३९. )

इंद्रियें, मन व बुद्धि हें ह्याचें अधिष्ठान आहे. ह्यांच्या योगानें ज्ञान आच्छादित करून हा प्राण्याला मोह पाडीत असतो ॥ ४० ॥

"ज्ञानाचें आच्छादन करणारा ह्या नात्यानें सर्वांशीं वैरभाव करणारा हा काम असतो तरी कोठें ? कारण, शत्रूचें राहण्याचें ठिकाण एकदां समजून आलें ह्मणजे शत्रूचा नाश सहज करणें शक्य होतें" असें अर्जुन विचारील ह्मणून भगवान् सांगतात:—इंद्रियें, मन आणि बुद्धि हें ह्या कामाचें अधिष्ठान ह्मणजे आश्रयस्थान आहे. ह्या इंद्रियप्रभृति आश्रयांच्या

तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ॥
पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

---

यत एवं तस्मा०शनम् ॥४१॥ तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ पूर्वं नियम्य वशीकृत्य भरतर्षभ पाप्मानं पापाचारं कामं प्रजहिहि परित्यज। एनं प्रकृतं वैरिणं ज्ञानविज्ञाननाशनं ज्ञानं शास्त्रत आचार्यतश्चात्मादीनामवबोधो विज्ञानं विशेषतस्तदनुभवस्तयोर्ज्ञानविज्ञानयोः श्रेयःप्राप्तिहेत्वोर्नाशनं प्रजहिह्यात्मनः परित्यजेत्यर्थः ॥ ४१ ॥

---

योगानें हा काम ज्ञान आच्छादित करून देहधारी पुरुषाला नानाप्रकारांनीं मोह पाडीत असतो ४०.

तस्मात्, हे भरतवंशजश्रेष्ठा अर्जुना, तूं आधीं इंद्रियनिग्रह करून ज्ञान आणि विज्ञान ह्यांचा नाश करणाऱ्या ह्या पापी कामाचा अगदीं त्याग कर ॥ ४१ ॥

ज्याअर्थीं असा प्रकार आहे त्याअर्थीं, हे भरतर्षभा, तूं आधीं इंद्रियांचें संयमन करून ज्ञान आणि विज्ञान ह्यांचा नाश करणारा जो हा वैरी व पापी काम त्याला तूं आपणापासून सोडून दे. ज्ञान=शास्त्र आणि गुरु ह्यांच्या पासून प्राप्त होणारें आत्म्याचें वगैरें ज्ञान. विज्ञान=विशेषेंकरून त्या आत्म्यादिकांच्या ज्ञानाचा अनुभव. तेव्हां मोक्षप्राप्तीला हेतुभूत असलेलें ज्ञान व विज्ञान ह्यांचा नाश करणाऱ्या कामाचा तूं त्याग कर ४१.

( मूळश्लोकांत ‘ आदौ ’ असें पद असून भाष्यकारांनीं त्याचें व्याख्यान ‘ पूर्वं ’ अर्थात् पूर्वीं असें केलें आहे. परंतु, कशाच्या पूर्वीं ह्याचा खुलासा सहज होणारा असल्यामुळें भाष्यांत केलेला नाहीं. तेव्हां भाष्यांतील ‘ पूर्वं ’ ह्या पदाचा अर्थ कामाचा निग्रह करण्याचे पूर्वीं अथवा कामानें मोह पाडण्याचे पूर्वीं असा समजावा. भाष्यकारांनीं

'प्रजहिहि' असें एक पद घेतलें आहे आणि त्याचा अर्थ 'त्याग कर' असा अगदीं बरोबर केलेला आहे; परंतु, श्रीधरस्वामींनीं 'प्रजहि' एवढेंच पद वेगळें मानून 'हि' हें पद वेगळें मानिलेलें आहे आणि पहिल्या 'प्रजहि' ह्या पदाचा अर्थ 'घातय' ह्मणजे ठार मार असा करून अवशिष्ट राहिलेलें जें 'हि' हें पद त्याचा अर्थ 'स्फुटं=स्पष्टपणें=उघड उघड' असा केला आहे. परंतु, हें भाष्यविरुद्ध असलेलें पांडित्य ग्राह्य नाहीं. काम हा अमूर्त आहे; तेव्हां मनापासून त्याचा त्याग करणें हेंच त्याला मारणें होय. शस्त्रानें त्याचा शिरश्छेद करणें संभवनीय नाहीं. तेव्हां अर्थातच 'प्रजहिहि' हीं दोन पदें मानणें योग्य नाहीं. "हा" धातूचा द्विवचनांत आज्ञार्थी प्रयोग केला असतां त्याचीं रूपें "जहाहि, जहिहि, जहीहि अशीं विकल्पानें तीन होत असतात. ही गोष्ट श्रीधरस्वामींच्या लक्ष्यांत आली नसल्यामुळेंच कीं काय कोण जाणे 'प्रजहि' येवढेंच पद वेगळें मानून त्यांनीं त्याचा अर्थ 'वध कर' असा केला आहे. परंतु, भाष्यकारांनीं दर्शविल्याप्रमाणें सरळ अर्थ होत असतांना आड मार्गांत जाण्याचें कारण दिसत नाहीं. असो. ह्या श्लोकांतील आज्ञार्थी लोटाचा जो प्रयोग आहे तो 'हन्' धातूचा नसून 'हा' ह्या धातूचा आहे असें समजावें. आतां "प्रजहिह्यात्मनः परित्यजेत्यर्थः" असें भाष्य आहे व ह्यांतील पदें "प्रजहि, हि, आत्मनः" अशींही पडण्याचा संभव आहे. तेव्हां भाष्यकारांनीं 'प्रजहिहि असें एकच पद कशावरून घेतलें आहे ? श्रीधरस्वामींप्रमाणें भाष्यकारांनींही दोन पदें कशावरून घेतलीं नसतील ? आणि शस्त्राच्या योगानें कामाचा शिरश्छेद करितां येणें संभवनीय नाहीं ह्मणून प्रजहि ह्याच पदाचा अर्थ भाष्यकारांनीं "परित्यज" असा कशावरून केला नसेल ?" अशी कोणी शंका करील; परंतु, ती टिकणार नाहीं. कारण, भाष्यकारांना 'प्रजहि' असें पद पाडणें जर इष्ट असतें तर पूर्वोक्तानुवादपूर्वक पुढल्या श्लोकाला त्यांनीं जें "इंद्रियाण्यादौ नियम्य कामं शत्रुं जहिहीत्युक्तं तत्र किमा-

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ॥**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

---

श्रयः कामं जह्यादित्युच्यते " असें अवतरण दिलें आहे तें " इंद्रियाण्यादौ नियम्य कामं शत्रुं जहीत्युक्तं तत्र किमाश्रयः कामं हन्यादित्युच्यते " असें दिलें असतें. ' जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ' ह्या उपसंहारविषयक वचनामध्यें 'जहि' असें पद आहे. तेव्हां ह्या ठिकाणींही ' प्रजाहि ' असें पद भाष्यकारांना इष्ट आहे असें मानण्यास हरकत नाहीं " अशीही एक शंका कशीतरी ह्या ठिकाणीं एकादा करूं लागेल ; परंतु, पुढल्या श्लोकाला भाष्यकारांनीं जें अवतरण दिलें आहे त्याचा विचार केला असतां ती शंका टिकणार नाहीं हें उघड आहे. भाष्योत्कर्षदीपिकाकारांचेंही लक्ष्य भाष्यकारांनीं दिलेल्या पुढील श्लोकाच्या अवतरणाकडे गेलें नाहींसें दिसतें. नीलकंठपंडितांनीं ह्या श्लोकाचें व्याख्यान ' यस्मादिन्द्रियाण्यस्याधिष्ठानं सामन्तस्येव गिरिदुर्गादिकं तस्मात्तान्येव नियम्य वशीकृत्यैनं कामं हि निश्चयेन प्रजाहि प्रकर्षेण नाशय...हन्तव्यत्वे हेतुः पाप्मानमत्युग्रं...' असें भाष्यविरुद्ध केलें आहे. परंतु, तेंही श्रीधरस्वामींच्या व्याख्यानाप्रमाणेंच त्याज्य आहे. कांहीं पुस्तकांतून मुळामध्यें व भाष्यामध्यें " प्रजहीहि " असा पाठ आढळतो व त्याचप्रमाणें पुढल्या श्लोकाला जें भाष्यकारांनीं अवतरण दिलेलें आहे त्यांतही " जहीहीत्युक्तं " असा पाठ आढळतो. तेव्हां असे पाठ कांहीं पुस्तकांतून आढळणें हेंही एक " हि " हें पद मुळांत वेगळें नसण्याविषयीं जबरदस्त प्रमाण आहे. )

( सामान्य भरतवंशजांनींही ह्या कामरूप शत्रूचा त्याग केलेला आहे आणि तूं तर भरतवंशजांमध्यें श्रेष्ठ आहेस. तेव्हां तुला तर ह्याचा त्याग अवश्य केलाच पाहिजे. हें सुचविण्याकरितां भगवानांनीं अर्जुनाला उद्देशून ' भरतर्षभ ' असें संबोधन घातलें आहे ४१ )

इन्द्रियाण्यादौ नियम्य कामं शत्रुं जहिहीत्युक्तं तत्र किमाश्रयः कामं जह्यादित्युच्यते । इन्द्रियाणि०परतस्तु सः ॥ ४२ ॥ इन्द्रियाणि श्रोत्रादीनि पञ्च देहं स्थूलं बाह्यं परिच्छिन्नं चापेक्ष्य सौक्ष्म्यान्तरस्थत्वव्यापित्वाद्यपेक्ष्य पराणि प्रकृष्टान्याहुः पण्डिताः। तथेन्द्रियेभ्यः परं मनः संकल्पविकल्पात्मकम् । तथा मनसस्तु परा बुद्धिर्निश्चयात्मिका । तथा यः सर्वदृश्येभ्यो बुद्ध्यन्तेभ्योऽभ्यन्तरो यं देहिनमिन्द्रियादिभिराश्रयैर्युक्तः कामो ज्ञानावरणद्वारेण मोहयतीत्युक्तं स बुद्धेर्द्रष्टा परमात्मा ॥ ४२ ॥

---

स्थूल देहापेक्षां इंद्रियें पलीकडलीं आहेत असें ह्मणतात ; इंद्रियांपेक्षां मन पलीकडलें आहे ; मनापेक्षां बुद्धि पलीकडली आहे आणि बुद्धीच्या जो पलीकडे आहे तो परमात्मा होय ॥ ४२ ॥

" इंद्रियांचें प्रथम संयमन करून कामरूप शत्रूचा त्याग कर असें सांगितलें; परंतु, कोणाच्या आधारानें पुरुषानें कामाचा त्याग करावा ?" अशी शंका येईल ती न यावी एतदर्थ भगवान् ह्मणतातः—श्रवणादि पांच इंद्रियें ( ह्मणजे श्रवणेंद्रिय, त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय आणि घ्राणेंद्रिय, हीं पांच इंद्रियें ) परिच्छिन्न आणि बाह्य असा जो स्थूल देह त्याच्यापेक्षां सूक्ष्म, अभ्यंतर आणि व्यापी असल्यामुळें पंडितांनीं त्यांना परिच्छिन्न व बाह्य अशा स्थूल देहापेक्षां दूरचीं असें ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें श्रवणादि इंद्रियांपेक्षां संकल्पविकल्पात्मक मन दूर आहे. तशीच मनापेक्षां निश्चयात्मिका बुद्धि दूर आहे आणि त्याचप्रमाणें बुद्धीपर्यंत सर्व दृश्य वस्तूंहून जो आंत आहे आणि ज्या देहधाऱ्याला इंद्रियप्रभृति आश्रयांनीं युक्त असलेला काम ज्ञानाच्छादनद्वारानें मोहित करितो असें पूर्वीं सांगितलें आहे तो बुद्धीचा द्रष्टा परमात्मा होय ४२.

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ॥
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः॥३॥

---

एवं० सदम् ॥ ४३ ॥ एवं बुद्धेः परमात्मानं बुद्ध्वा ज्ञात्वा संस्तभ्य सम्यक्स्तम्भनं कृत्वा स्वेनैवात्मना संस्कृतेन मनसा सम्यक्समाधायेत्यर्थः । जह्येनं शत्रुं हे महाबाहो कामरूपं दुरासदं दुःखेनासद आसादनं प्राप्तिर्यस्य तं दुरासदं दुर्विज्ञेयानेकविशेषमिति ॥ ४३ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्य-

---

ह्याप्रमाणें बुद्धीहून पर असलेला जो आत्मा त्याला स्वतः मनःसंयमनपूर्वक जाणून, हे महाबाहो, कामरूप दुष्प्राप शत्रूचा तूं त्याग कर ॥ ४३ ॥

ह्याप्रमाणें महामुनिव्यासप्रणीतलक्षग्रंथात्मकश्रीमहाभारतांतर्गत भीष्मपर्वांतील ब्रह्मविद्या आणि योगशास्त्र एतद्विषयक व श्रीकृष्णार्जुनसंवादात्मक श्रीमद्भगवद्गीतासंज्ञक उपनिषदांपैकीं कर्मयोगनामक तिसरा अध्याय समाप्त झाला ॥ ३ ॥

संस्तभ्य ह्मणजे चांगलें स्तंभन करून अर्थात् शुद्ध चित्ताच्या योगानें मनाचें चांगलें संयमन करून ह्याप्रमाणें बुद्धीहून पर ह्मणजे बुद्धिसाक्षी जो आत्मा त्याला जाण आणि, हेमहाबाहो, जो तावडींत सांपडणें कठीण आहे त्या कामरूप शत्रूचा तूं त्याग कर ४३.

( भाष्यामध्यें ‘ दुर्विज्ञेयानेकविशेषं ’ असें व्याख्यान दुरासदं ह्या पदाचें केलें आहे. त्याचा अर्थ महाशनत्व ह्मणजे खादाडपणा महापापरूपत्व इत्यादि अनेक अतर्क्य गोष्टींनीं युक्त असा करावा ४३ )

ह्याप्रमाणें श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य गोविंदभगवत्पूज्यपाद ह्यांचे

पादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीमद्भगवद्गीताभाष्ये
र्मप्रशंसायोगो नाम तृतीयोध्यायः ॥ ३ ॥

---

ोष्य जे भगवान् श्रीमच्छंकराचार्य ह्यांनीं केलेल्या श्रीमद्भगवद्गीताभा-
ष्यापैकीं कर्मप्रशंसायोगनामक तिसरा अध्याय समाप्त झाला ॥ ३ ॥

( परमार्थप्रपानामक टीकेमध्यें ह्या तिसऱ्या अध्यायाचें तात्पर्य एका
लोकांत दिलेलें आहे. तो श्लोक येणें प्रमाणें:—

यज्ञाद्यं वर्णधर्मोचितमपि नियतं कर्म श ेप्रदं स्यान्न त्याज्यं कार्यमेत-
द्गुणमपि यतोकर्मणः कर्म शस्तम् । जीवन्मर्त्यः कदाचित्करचरणयुतो नैव
ोष्ठत्यकर्मा तस्माच्छ्रेयान्स्वधर्मो यदुपतिगदितश्चित्तशुद्ध्यै तृतीये ॥ ३ ॥ )

श्रीभगवानुवाच ॥

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

योयं योगोध्यायद्वयेनोक्तो ज्ञाननिष्ठालक्षणः ससंन्यासः कर्मयोगोपायो यस्मिन्वेदार्थः परिसमाप्तः प्रवृत्तिलक्षणो निवृत्तिलक्षणश्च गीतासु च सर्वास्वयमेव योगो विवक्षितो भगवतातः परिसमाप्तं वेदार्थं मन्वानस्तं वंशकथनेन स्तौति श्रीभगवान् । इमं० वेऽब्रवीत् ॥ १ ॥ इममध्यायद्वयेनोक्तं योगं विवस्वत आदित्याय सर्गादौ प्रोक्तवानहं जगत्परिपालयितॄणां क्षत्रियाणां बलाधानाय तेन योगबलेन युक्तास्ते समर्था भवन्ति ब्रह्म परिरक्षितुं ब्रह्मक्षत्रे परिपालिते जगत्परिपाल-

श्रीभगवान् ह्मणतातः—हा अविनाशी योग मी सूर्याला सांगितला होता; सूर्यानें मनूला कथन केला आणि मनूनें इक्ष्वाकूला त्याचा उपदेश केला ॥ १ ॥

कर्मयोग हा ज्याच्या प्राप्तीचा उपाय आहे असा ज्ञाननिष्ठारूप योग कर्मसंन्यासासहवर्तमान ह्या दोन अध्यायांमध्यें कथन केला आहे. ह्या योगांत प्रवृत्तिरूप आणि निवृत्तिरूप अशा सर्व वेदार्थाचा अंतर्भाव होत आहे आणि सर्व गीतेमध्यें ह्याच योगाचें प्रतिपादन करण्याचा भगवानांचा उद्देश आहे. तस्मात्, वेदाचें तात्पर्य ह्या ज्ञाननिष्ठारूप योगामध्यें संपूर्ण झालें असें समजून परंपरा सांगण्याच्या द्वारानें त्या योगाची श्रीभगवान् प्रशंसा करितातः—( दुसऱ्या व तिसऱ्या अशा ) दोन अध्यायांनीं कथन केलेला हा योग मीं जगताचें परिपालन करणाऱ्या क्षत्रियांना सामर्थ्य येण्याकारितां सृष्टीचे आरंभीं सूर्याला कथन केला होता. कारण, त्या योगसामर्थ्यानें क्षत्रिय युक्त झाले असतां ते ब्राह्मण जातीचें संरक्षण करण्यास समर्थ होतात आणि ब्राह्मण व क्षत्रिय ह्या

**यितुमलम्। अव्ययमव्ययफलत्वात्। न ह्यस्य सम्यग्दर्शननिष्ठालक्षणस्य मोक्षाख्यं फलं व्येति। स च विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवे स्वपुत्रायादिराजायाब्रवीत् ॥ १ ॥**

---

दोन जातींचें परिपालन झालें असतां त्यांच्याकडून सर्व जगताचें परिपालन होणें शक्य होतें. ह्याचें फल अव्यय ( ह्मणजे अविनाशी ) असल्यामुळें हा अव्यय ( ह्मणजे अविनाशी ) आहे. कारण, उत्कृष्ट ज्ञानमार्ग हें ज्याचें स्वरूप आहे अशा ह्या योगाचें फल कधींही नाहींसें होत नाहीं. असो. त्या सूर्यानें ह्या योगाचा उपदेश मनूला केला व मनूनें आदिराजा जो आपला पुत्र इक्ष्वाकु त्याला ह्याचा उपदेश केला १.

( 'इमं सन्ध्योपासनादिनिर्विकल्पकसमाध्यनुष्ठानान्तं कर्मयोगं ज्ञाननिष्ठोपसर्जनं पारिव्राज्यानधिकारिणां राज्ञामेव योग्यं विवस्वते सूर्याय... अहं...प्रोक्तवान्पुराव्ययमविच्छिन्नसंप्रदायं ' असें ह्या श्लोकाच्या पूर्वार्धाचें व्याख्यान नीलकंठपंडितांनीं केलें आहे व त्याचा आशय ज्ञाननिष्ठेला ज्याच्यामध्यें गौणत्व दिलेलें आहे, संन्यासाला अनाधिकारी असलेल्या राजांनाच जो योग्य आहे आणि ज्याचा संप्रदाय अविच्छिन्न चालत आलेला आहे असा संध्योपासनापासून निर्विकल्पकसमाधीपर्यंत असलेला कर्मयोग मीं सूर्याला कथन केला " असा आहे. परंतु, हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, " इमं " ह्या शब्दाचा अर्थ कर्मयोगं असा जर केला तर दुसऱ्या अध्यायांतील विषयांचा समावेश 'इमं' ह्या सर्वनामानें होत नाहीं हा त्या व्याख्यानावर दोष येतो. आतां " इमं ह्या शब्दाचा अर्थ—दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांत सांगितलेला—असा कशाला करावयाला पाहिजे ? तिसऱ्या अध्यायांत सांगितलेला असा नीलकंठपंडितांप्रमाणें करण्याला काय हरकत आहे ? निलकंठपडितांच्या ह्मणण्याप्रमाणें अर्थ केला असतां दुसऱ्या अध्यायांतील विषयाचा समावेश 'इमं' ह्या शब्दामध्यें न झाल्यानें

तोटा तो काय होणार ? " अशी एक शंका पंडितांच्या वतीनें येथें येण्याचा संभव आहे; परंतु, ती टिकणार नाहीं. कारण, दोन्ही अध्यायांत सांगितलेल्या विषयासंबंधानें प्रामाण्याबद्दल शंका येऊं नये ह्मणून विद्येचा परंपरासंप्रदाय भगवान् दर्शवीत आहेत, अशा आशयाचें नीलकंठपंडितांनीं ह्या श्लोकाला जें " अध्यायद्वयोक्तेर्थे प्रामाण्यशङ्का मा भूदिति विद्यावंशसंप्रदायं... दर्शयति असें " अवतरण दिलें आहे त्याच्याशींच विरोध येतो. सारांश, भाष्यकारांची परवा न करितां नील-कंठपंडितांनीं केलेलें पूर्वार्धाचें व्याख्यान त्यांच्याच लिहिण्याशीं विरुद्ध येत असल्यामुळें ग्राह्य करितांच येत नाहीं. पूर्वी कथन केलेला योग राजांनाच योग्य आहे असें जें नीलकंठपंडितांचें भाष्यविरुद्ध ह्मणणें आहे तेंही चुकीचेंच आहे. कारण, दुसऱ्या व तिसऱ्या अध्याया-मध्यें जो वेदार्थ संक्षेपानें कथन केला त्याचेंच पुढें सर्व गीतेमध्यें विस्तरानें प्रतिपादन केलेलें आहे. तेव्हां पूर्वी सांगितलेला योग क्षत्रियांनाच योग्य आहे असें जर नीलकंठपंडितांचें ह्मणणें खरें मानिलें तर गीताप्रतिपादित धर्मांना ब्राह्मणादिकांचा अधिकार नाहीं असें होऊं लागेल आणि असें झालें असतां फारच अनर्थ होतील. " श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः " हा श्लोक गीतेंत आहे; इतकेंच नव्हे परंतु, जो अध्याय फक्त क्षत्रियांकरितांच आहे असें नीलकंठपंडित ह्मणतात त्या तिसऱ्या अध्यायांतच हा श्लोक आहे. तेव्हां हा श्लोक क्षत्रियांकरि-तांच आहे असें ह्मटलें ह्मणजे स्वधर्मत्यागाचा दोष काय तो क्षत्रि-यांनाच! ब्राह्मणादिकांना नाहीं! असें होऊं लागेल व अशाच प्रकारचे आणखी शेंकडों अनर्थ होतील. करितां, नीलकंठपंडितांच्या ह्या भाष्यविरुद्ध पांडित्याची योग्यता प्रलापापेक्षां जास्त आहे असें ह्मणण्याचें धाडस कोणीं करावें ? ' अव्ययं ' ह्या पदाचें व्याख्यान ' अव्यय-फलत्वात् ' असें भाष्यकारांनीं केलेलें आहे. परंतु, ह्या नीलकंठपंडितांना

**एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ॥**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥**

---

**एवं परंपरा० परंतप ॥२॥ एवं क्षत्रियपरम्पराप्राप्तमिमं राजर्षयो राजानश्च त ऋषयश्च राजर्षयो विदुरिमं योगम् । स योगः कालेनेह महता दीर्घेण नष्टो विच्छिन्नसंप्रदायः संवृत्तो हे परंतप। आत्मनो विपक्षभूताः पर उच्यन्ते ताञ्छौ-**

---

तें न रुचून त्यांनीं सदहू पदाचें व्याख्यान “ अविच्छिन्नसंप्रदायं ” ह्मणजे ज्याचा संप्रदाय अविच्छिन्न चालत आलेला आहे असें केलें आहे. हें भाष्यविरुद्ध व्याख्यान करितांना पंडितांचें लक्ष्य शेजा-रच्या श्लोकाकडेही गेलें नाहीं हें तर मोठेंच आश्चर्य आहे. असो. “ बराच काळ लोटल्यावर तो योग नाहींसा झाला ; अर्थात् त्याचा संप्रदाय विच्छिन्न झाला, ” अशा अर्थाचा मजकूर पुढल्याच श्लोकांत असल्यामुळें “ अविच्छिन्नसंप्रदायं ” असा जो पंडितांनीं ‘ अव्ययं ’ ह्या शब्दाचा भाष्यविरुद्ध अर्थ केला आहे तोही सर्वस्वीं त्याज्यच आहे. भाष्यकारांची परवा न करितां ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून आपल्या ज्ञानाच्या फाजील घमेंडीवर त्यांचे विरुद्ध वटवट केलेली आहे त्यांनीं केवळ प्रकाशामध्यें सूर्याशीं स्पर्धा करूं पाहणाऱ्या काजव्याप्रमाणें स्वतःला उपहासास्पद मात्र करून घेतलेलें आहे असें ठिकठिकाणीं स्पष्टपणें नजरेस येतें १ )

ह्याप्रमाणें परंपरेनें प्राप्त झालेला हा योग राजर्षींनीं जाणिला; परंतु, हे शत्रुतापना, बराच काळ लोटल्यामुळें तो योग ह्या वेळीं नाहींसा झालेला आहे ॥ २ ॥

ह्याप्रमाणें क्षत्रियपरंपरेनें प्राप्त झालेला हा योग राजर्षि जाणीत आले; परंतु, दीर्घ काल लोटल्यामुळें येथें ह्याचा संप्रदाय, हे शत्रुतापना, नाहींसा झाला आहे. आपल्या विरुद्ध बाजूला असणाऱ्यांना पर असें

र्यतेजोगभस्तिभिर्भानुरिव तापयतीति परंतपः शत्रुतापन इत्यर्थः ॥ २ ॥

---

ह्मणतात. त्या प्रतिपक्ष्यांना शौर्यरूप तेजःकिरणांच्या योगानें सूर्याप्रमाणें जो ताप देणारा तो परंतप अर्थात् शत्रुतापन होय २.

( राजे असून जे ऋषि ते राजर्षि असा ' राजर्षि ' शब्दाचा अर्थ भाष्यकारांनीं " राजानश्च त ऋषयश्च राजर्षयः " असा विग्रह करून दर्शविला आहे आणि राजर्षि ह्या शब्दाचा अर्थही राजा असून ऋषीप्रमाणें वागणारा असाच लोकांमध्यें रूढ आहे; तथापि नीलकंठपंडितांनीं बुद्धीच्या आडमार्गांत शिरून ' राजर्षयः ' ह्या सामासिक शब्दाचें व्याख्यान " जनकाजातशत्रुकैकेयप्रभृतयो राजान ऋषयश्च सनकवसिष्ठाद्याः सूक्ष्मार्थदर्शिनस्ते " असें केलें आहे व त्याचा आशय "जनक, अजातशत्रु, कैकेय इत्यादि राजे आणि ऋषि ह्मणजे सनक, वसिष्ठ वगैरे सूक्ष्मार्थदर्शी " असा आहे. परंतु, हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, राजे आणि ऋषि हे वेगळे वेगळे समजून जर राजर्षयः हा द्वंद्व समास मानिला तर राजेलोकांपेक्षां योग्यतेच्या मानानें ऋषि अधिक श्रेष्ठ असल्यामुळें समासामध्यें ऋषि हें पद प्रथम असावयाला पाहिजे होतें. तस्मात्, पंडितांच्या व्याख्यानावर हा व्याकरणाचा दोष येत असल्यामुळें त्यांचें तें भाष्यविरुद्ध व्याख्यान स्वीकारितां येत नाहीं. कर्मयोगासहवर्तमान ज्ञानयोगाचा संप्रदाय जर विच्छिन्न झालेला होता तर पांडवांचे वेळीं ह्या भरतखंडामध्यें लोक कोठेंच ईश्वरप्रोक्त अनादि धर्माला अनुसरून वागणारे नव्हते कीं काय अशी एक शंका ह्या ठिकाणीं येते. परंतु, ती टिकत नाहीं. कारण, ह्या श्लोकांत ' विदुः ' हें पद आहें तें फारच खूबीचें आहे. त्याचा अर्थ राजर्षि पूर्वी जाणीत होते असाही होतो अथवा राजर्षि सांप्रत जाणीत आहेत असाही होतो. आतां राजर्षि सांप्रत जाणीत आहेत असा जर अर्थ केला तर

**स एवायं मया तेद्य योगः प्रोक्तः पुरातनः ॥**
**भक्तोसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

---

**दुर्बलानजितेन्द्रियान्प्राप्य नष्टं योगमिममुपलभ्य लोकं चापुरुषार्थसंबन्धिनं स एवायं० तदुत्तमम् ॥ ३ ॥ स एवायं मया ते तुभ्यमद्येदानीं योगः प्रोक्तः पुरातनो भक्तोसि मे सखा चासीति । रहस्यं हि यस्मादेतदुत्तमं योगो ज्ञानमित्यर्थः ॥ ३ ॥**

---

त्याची परंपरा विच्छिन्न झाली आहे हें भगवानांचें ह्मणणें जुळत नाहीं अशी एकादा शंका करील; परंतु, ' इह ' ह्या पदाकडें लक्ष्य दिलें असतां त्याची शंका रहाणार नाहीं. ' इह ' ह्या शब्दाचा अर्थ ह्या ठिकाणीं, ह्या प्रदेशामध्यें अथवा ह्या वेळीं असा होतो. दुर्बल अशा अजितेंद्रियांना प्राप्त झाल्यामुळें नाहींसा झालेला हा योग माझ्या पासून समजून घेऊन तूं जितेंद्रिय पुनरपि लोकांमध्यें चांगला स्थापित करशील. हें सुचविण्याकरितां अर्जुनाला उद्देशून भगवानांनीं " परंतप" हें संबोधन घातलें आहे असें भाष्योत्कर्षदीपिकाकार ह्मणतात २ )

तोच हा पुरातन योग तूं माझा भक्त व सखा असल्यामुळें मीं आज तुलाच सांगितला आहे. कारण, हें उत्कृष्ट ज्ञान गुह्य आहे ॥ ३ ॥

दुर्बल अशा अजितेंद्रिय लोकांना प्राप्त झाल्यामुळें हा योग नाहींसा झाला आहे असें पाहून आणि लोकही पुरुषार्थापासून च्युत होत आहेत असें अवलोकन करून तोच हा पुरातन योग मीं आज तुला तूं भक्त व सखा असल्यामुळें कथन केला आहे. कारण, हें ज्ञान गुह्य आहे ३.

( हा योग सध्यांच संप्रदायरहित कशानें झाला अशी कोणाला शंका येईल ती न यावी एतदर्थ " दुर्बलानजितेन्द्रियान्प्राप्य " असें भाष्यकारांनीं ह्मटलें आहे. आतां लोकांचे ठिकाणीं कामक्रोध वगैरेच

अर्जुन उवाच ॥

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ॥**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

---

मुख्यत्वें करून असल्यामुळें कामक्रोधादिकांनीं ग्रस्त झालेल्या ह्या योगाची परंपरा जरी विच्छिन्न झालेली असली तरी ह्या योगावांचून जर लोकांना पुरुषार्थाची प्राप्ति होत असेल तर ह्या योगाचा उपदेश करून उपयोग काय? अशी कोणी शंका घेईल; परंतु ती उपयोगी नाहीं. कारण, पूर्वोक्त योगाचा अभाव झाल्यास लोकांना उत्तम पुरुषार्थाची प्राप्ति होत नाहीं. ह्यास्तव, योग नष्ट झाल्यामुळें लोकही पुरुषार्थाला मुकत आहेत असें अवलोकन करून मीं हा योग तुला कथन केला. हें " दुर्बला०चापुरुषार्थसंबन्धिनम् । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. पूर्वींचा योग त्याची परंपरा विच्छिन्न झाल्यामुळें नाहींसा झाला. आतां हा दुसराच योग भगवान् मजकरितां सांगत आहेत अशी कदाचित् अर्जुनाला शंका येईल ती न यावी ह्मणून भगवानांनीं " स एवं ह्मणजे तोच असें ह्मटलें आहे. बरें, ह्या योगाचा उपदेश जर तुला कर्तव्यच होता तर तो दुसऱ्या कोणाला न करितां तूं मलाच कशाकरितां केलास ? असा कदाचित् अर्जुनाचा प्रश्न होईल ह्मणून " भक्तोसि मे सखा चेति " असें भगवानांनीं ह्मटलें आहे. कारण, " विद्या ब्राह्मणाकडे गेली आणि ह्मणाली—माझें रक्षण कर; मी तुझें भांडार आहें. मला दूषण देणारा, सरळपणानें न वागणारा आणि जितेंद्रिय नसणारा असा जो असेल त्याला तूं मला देऊं नकोस. तूं अशा रीतीनें माझें संरक्षण केलेस ह्मणजे माझ्या ठिकाणीं सामर्थ्य कायम राहील—" अशी श्रुति आहे ३ ).

अर्जुन प्रश्न करितो:—तुझा जन्म अलीकडला असून सूर्याचा जन्म पूर्वींचा आहे. तेव्हां तूंच पूर्वीं हा योग कथन केलास हें मीं कसें समजावें ? ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच ॥

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ॥
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

---

भगवता विप्रतिषिद्धमुक्तमिति मा भूत्कस्यचिद्बुद्धिरिति परिहारार्थं चोद्यमिव कुर्वन्नर्जुन उवाच ॥ अपरं० प्रोक्तवानिति ॥ ४ ॥ अपरमर्वाग्वसुदेवगृहे भवतो जन्म परं पूर्वं सर्गादौ जन्मोत्पत्तिर्विवस्वत आदित्यस्य तत्कथमेतद्विजानीयामविरुद्धार्थतया यस्त्वमेवादौ प्रोक्तवानिमं योगं स एव त्वमिदानीं मह्यं प्रोक्तवानसीति ॥ ४ ॥

या वासुदेवेनीश्वरासर्वज्ञाशङ्का मूर्खाणां तां परिहरञ्श्रीभगवानुवाच यदर्थो ह्यर्जुनस्य प्रश्नः । बहूनि० परंतप ॥ ५ ॥ बहूनि मे मम व्यतीतान्यतिक्रान्तानि जन्मानि तव च हेर्जुन

---

भगवानानें कांहींतरा भलतेंच सांगितलें अशी कदाचित् एकाद्याची समज होईल ती न व्हावी एतदर्थ भगवानांच्या सांगण्यावर शंका घेतल्यासारिखें करून अर्जुन प्रश्न करितो:—तुझा जन्म अलीकडला ह्मणजे वसुदेवाच्या घरीं झालेला आहे आणि सूर्याची उत्पत्ति तर पूर्वी ह्मणजे सृष्टीचे आरंभींच झालेली आहे. तेव्हां, ज्या तूं पूर्वी हा योग कथन केलास त्याच तूं मला आतां कथन केलास ह्यांत कांहीं विरुद्ध प्रकार नाहीं असें मीं कसें समजावें ४.

श्रीभगवान् ह्मणतात:—हे शत्रुतापना अर्जुना, तुझे व माझे पुष्कळ जन्म होऊन गेले ते सर्व मी जाणीत आहें ; तूं जाणीत नाहींस ॥ ५॥

वासुदेव ईश्वर नव्हे आणि सर्वज्ञही नव्हे अशी जी मूर्ख लोकांना शंका होती तिचा परिहार व्हावा ह्मणून अर्जुनानें प्रश्न केला होता व त्या शंकेचाच परिहार होण्याकरितां श्रीभगवान् अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर देतात:—हे शत्रुतापना अर्जुना, तुझे व माझे पुष्कळ जन्म होऊन

अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन् ॥
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

---

तान्यहं वेद जाने सर्वाणि न त्वं वेत्थ जानीषे धर्माधर्मादिप्रतिबद्धज्ञानशक्तित्वात् । अहं पुनर्नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावत्वादनावरणज्ञानशक्तिरिति वेदाहं हे परंतप ॥ ५ ॥

कथं तर्हि तव नित्येश्वरस्य धर्माधर्माभावेपि जन्मेत्युच्यते । अजोपि०म्यात्ममायया ॥ ६ ॥ अजोपि जन्मरहितोपि संस्तथाव्ययात्माक्षीणज्ञानशक्तिस्वभावोपि संस्तथा भूतानां ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तानामीश्वर ईशनशीलोपि सन्प्रकृतिं स्वां मम वैष्णवीं मायां त्रिगुणात्मिकां यस्या वशे सर्वं जगद्वर्तते यया मोहितं सत्स्वमात्मानं वासुदेवं न जानाति

---

गेले व ते सर्व मी जाणीत आहें. परंतु, पापपुण्यादिकांनीं तुझी ज्ञानशक्ति प्रतिबद्ध झाली असल्यामुळें तूं जाणीत नाहींस. नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त असें माझें स्वरूप असल्यामुळें माझी ज्ञानशक्ति प्रतिबद्ध झालेली नाहीं आणि ह्मणून मी जाणीत आहें ५.

मी अज, अव्ययात्मा आणि भूताधिपति असतांनाही स्वकीय मायेचें अवलंबन करून आपल्या मायेच्या योगानें देहधारी होतों ॥ ६ ॥

तर मग नित्य जो ईश्वर त्याचे ठिकाणीं धर्म व अधर्म ह्यांचा अभाव असतांनाही त्याला जन्म कसा अशी शंका अर्जुनाला येईल ह्मणून भगवान् सांगतातः—मी वस्तुतः अज ह्मणजे जन्मरहित जरी आहे, त्याचप्रमाणें अव्ययात्मा ह्मणजे कधींही कमी न होणारी ज्ञानशक्ति हें जरी माझें स्वरूप आहे आणि त्याचप्रमाणें आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व प्राण्यांचा ईश्वर जरी मी आहें ह्मणजे सर्व प्राण्यांचें नियमन करणें हें जरी माझें शील आहे तरी जिच्या अधीन हें सर्व जगत् आहे व जिनें मोहित केल्यामुळें तें आपल्या आत्म्या वासुदेवाला जाणीत नाहीं

**तां प्रकृतिं स्वामधिष्ठाय वशीकृत्य संभवामि देहवानिव भवामि जात इवात्ममायया आत्मनो मायया न परमार्थतो लोकवत् ॥६॥**

---

त्या प्रकृतीला अर्थात् त्रिगुणात्मिक अशा स्वकीय वैष्णवी मायेला स्वाधीन करून मी देहधारी असल्यासारिखा होतों ह्मणजे आपल्या मायेच्या योगानें मी उत्पन्न झाल्यासारिखा होतों. लोकांप्रमाणें मी वस्तुतः उत्पन्न होत नाहीं ६.

( ह्या श्लोकाचाच अर्थ लक्ष्यांत घेऊन भाष्यकारांनीं गीताशास्त्राच्या उपोद्घातामध्यें कांहीं मजकूर लिहिलेला आहे व तो पहिल्या अंकांत येऊन गेलेलाही आहे ; परंतु, त्याचें स्पष्टीकरण व्हावें तसें त्या ठिकाणीं झालें नाहीं असें वाटल्यावरून पुनरपि तो मजकूर ह्या ठिकाणीं देऊन त्याचें स्पष्टीकरण करूं; ह्मणजे ह्या श्लोकावरील भाष्याचा आशय लक्ष्यांत येण्याला पंचाईत पडणार नाहीं. सदर्हू मजकूर येणेंप्रमाणें:— " स च भगवाञ्ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः सदा संपन्नस्त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां मूलप्रकृतिं वशीकृत्याजोऽव्ययो भूतानामीश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावोपि सन्स्वमायया देहवानिव जात इव च लोकानुग्रहं कुर्वन्निव लक्ष्यते स्वप्रयोजनाभावेपि भूतानुजिघृक्षया । " ह्या भाष्याचें तात्पर्य येणेंप्रमाणें:—ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बल, वीर्य आणि तेज ह्या सहा गुणांनीं सर्वदां युक्त असलेला तो भगवान् आपल्या त्रिगुणात्मक वैष्णवी मायेला ह्मणजे मूलप्रकृतीला स्वाधीन ठेवून अज, अव्यय, भूतांचा ईश्वर आणि नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त अशा स्वरूपानें युक्त असूनही आपल्या मायेच्या योगानें देहधारी असल्यासारिख्या होऊन अर्थात् उत्पन्न झाल्यासारिखा होऊन लोकावर अनुग्रह करीत आहेसा दिसतो. असें करण्यांत त्याला स्वतःला कांहीं एक उद्देश साधावयाचा नसून प्राणिमात्रावर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें तो हें करीत असतो. ह्या भाष्याचें स्पष्टीकरण येणेंप्रमाणें:—ब्राह्मण्याचें रक्षण करण्याकरितां

नारायण वसुदेवापासून आपल्या अंशानें अवतीर्ण झाले असें पूर्वीं भाष्यकारांनीं सांगितलें आहे. तेव्हां भगवान् नारायण वसुदेवापासून जन्मास येऊन जर आज्ञाप्रमाणेंच देहधारी वगैरे झालेले आहेत तर ते आमच्या सारिखेच आहेत. आमच्यापेक्षां त्यांचे ठिकाणीं कांहीं विशेष प्रकार असल्याचें दिसत नसल्यामुळें ते ईश्वर होते असें ह्मणतां येत नाहीं अशी कोणाला शंका येईल ती न यावी एतदर्थ भाष्यकारांनीं ' स च भगवाञ्ज्ञानैश्वर्य० ' इत्यादि भाष्य लिहिलें आहे. भगवान् ह्या शब्दाचा अर्थ "ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना ॥" ह्या स्मृतिवचनावरून ऐश्वर्यादि सहा गुणांनीं संपन्न असा होत आहे व तोच भाष्यकारांनीं " ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः सदा संपन्नः " ह्या व्याख्यानानें दर्शविला आहे. आतां ज्ञान, ऐश्वर्य इत्यादि गुणांनीं सर्वदां संपन्न असल्यामुळें भगवान् नारायण ईश्वर आहेत असें जरी सिद्ध होत आहे तरी त्यांनीं जन्मास येणें नीट दिसत नाहीं. कारण, ते जन्ममरणरहित आहेत आणि नित्य, शुद्ध, बुद्ध आणि मुक्त असा त्यांचा स्वभाव आहे. तेव्हां त्यालाच विरुद्ध अशा जन्मादिकांचा त्यांचे ठिकाणीं संभव असणार कोठून ? कारण, जो प्राणिमात्रांचा नियंता आहे आणि अर्थातच जो स्वतंत्र आहे तो आपण होऊन जन्ममरणाच्या फेऱ्यांत येण्याचा अनर्थ स्वतःवर ओढून घेणार नाहीं. बरें देहादिकांचा स्वीकार करून ह्याला कांहीं फल प्राप्त करून घ्यावयाचें आहे असें ह्मणावें तर तसेंही संभवनीय दिसत नाहीं. तेव्हां ह्या परमेश्वराचा जन्म वगैरे शक्य कसें ? अशी शंका येईल ती न यावी ह्मणून ' त्रिगुणात्मिकां० ' इत्यादि भाष्य लिहिलेलें आहे ' प्रकृतिं स्वामधिष्ठाय असें जें चवथ्या अध्यायांतील ह्या सहाव्या श्लोकांत सांगितलें आहे तेंच ' त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां मूलप्रकृतिं वशीकृत्य ' ह्या शब्दांनीं उपोद्घातांत भाष्यकारांनीं दर्शविलें आहे. नित्य=अकार्यस्वरूप, शुद्ध=अकारण, बुद्ध=अजड, मुक्त= पारतंत्र्यरहित.

( मधुसूदनसरस्वतींनीं ह्या चवथ्या अध्यायांतील सहाव्या श्लोकाचें व्याख्यान भाष्यकारांना अनुसरून सविस्तर केलेलें आहे आणि आपल्या व्याख्यानाचे शेवटीं भाष्यकारांचें मत थोडक्यांत देऊन दुसरें एक भाष्यविरुद्ध मतही आपल्याच टीकेंत गोवून दिलेलें आहे व तेंही बरोबर असल्याविषयीं सुचविलें आहे. करितां, मधुसूदनसरस्वतींनीं धड-धडीत भाष्यकारांच्या मताचे विरुद्ध असलेल्या ज्या मताला आपल्या भाष्यानुसारी व्याख्यानासमीप जागा दिली त्या भाष्यविरुद्ध मताची योग्यता काय आहे ती पाहूं. मधुसूदनसरस्वती लिहितातः—

" नित्यो यः कारणोपाधिर्मायाख्योनेकशक्तिमान् । स एव भगवद्देह इति भाष्यकृतां मतम् । अन्ये तु परमेश्वरे देहदेहिभावं न मन्यन्ते किं तु यश्च नित्यो विभुः सच्चिदानन्दघनो भगवान्वासुदेवः परिपूर्णो निर्गुणः परमात्मा स एव तद्विग्रहो नान्यः कश्चिद्भौतिको मायिको वेति "।

ह्याप्रमाणें एक भाष्यविरुद्ध मत मधुसूदनसरस्वतींनीं आपल्या टीकेंत दर्शविलें आहे. हे मधुसूदनसरस्वती नुसतें हें भाष्यविरुद्ध मत आपल्या टीकेंत दर्शवूनच स्वस्थ रहाते तर कदाचित् तिकडे दुर्लक्ष्य केलें असतें. परंतु, हे महाराज आपल्या ज्ञानाची भर घालून सदहूं भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर असल्याचें सिद्ध करून दाखवीत आहेत. मधुसूदनसर-स्वती ह्मणतातः—

" अस्मिन्पक्षे योजना । आकाशवत्सर्वगतश्च नित्यः । अविनाशी वा अरेयमात्मानुच्छित्तिधर्मेत्यादिश्रुतेः । असंभवस्तु सतोनुपपत्तेः । नात्मा-श्रुतेर्नित्यत्वाच्च ताभ्य इत्यादिन्यायाच्च । वस्तुगत्या जन्मविनाशरहितः सर्वभासकः सर्वकारणमायाधिष्ठानत्वेन सर्वभूतेश्वरोपि सन्नहं प्रकृतिं स्वभावं सच्चिदानन्दघनैकरसम् । मायां व्यावर्तयति स्वामिति । निजस्वरूप-मित्यर्थः । स भगवः कस्मिन्प्रतिष्ठितः स्वे महिम्नीति श्रुतेः । स्वस्वरूप-माधिष्ठाय स्वरूपावस्थित एव सन्संभवामि देहदेहिभावमन्तरेणैव देहिव-द्व्यवहरामि । कथं तर्ह्यदेहे सच्चिदानन्दघने देहत्वप्रतीतिरत आह ।

आत्ममायेति । निर्गुणे शुद्धे सच्चिदानन्दरसघने मयि भगवति वासुदेवे देहदेहिभावशून्ये तद्रूपेण प्रतीतिर्मायामात्रमित्यर्थः । तदुक्तं कृष्णमेन-मवेहि त्वमात्मानमखिलात्मनाम् । जगद्धिताय सोप्यत्र देहीवाभाति माययेति ॥ अहो भाग्यमहो भाग्यं नन्दगोपव्रजौकसाम् । यन्मित्रं पर-मानन्दं पूर्णं ब्रह्म सनातनमिति च ॥ ”

ह्या मधुसूदनी टीकेंतील मजकुराचें तात्पर्य येणेप्रमाणें:—अनेक शक्तींनीं युक्त असा जो मायासंज्ञक नित्य कारणोपाधि तोच भगवानांचा देह असें भाष्यकारांचें मत आहे. परंतु, दुसरें व्याख्यानकार परमेश्व-राचे ठिकाणीं देहदेहिभाव मानीत नाहींत. तर ते ह्मणतात “ नित्य, सर्वव्यापी, परिपूर्ण व निगुर्ण असा जो सच्चिदानंदघन भगवान् वासुदेव परमात्मा तोच स्वतः देह होय. त्याला दुसरा कसला भौतिक अथवा मायिक देह नाहीं ”. ह्या व्याख्यानकारांच्या मतानें ह्या श्लोकाचें व्याख्यान असें करावें; “ आत्मा हा आकाशाप्रमाणें सर्वगत असून नित्य आहे:—अरे, हा उच्छेदधर्मरहित आत्मा अविनाशी आहे. ” इत्यादि प्रका-रच्या श्रुति आहेत “ आणि सत्स्वरूप ब्रह्माची उत्पत्ति नाहीं; कारण, तसें संभवनीयच नाहीं. ” “ आत्म्याला उत्पत्ति नाहीं; कारण, श्रुती-मध्यें असें कोठें दृष्टीं पडत नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, त्या श्रुतीवरून आत्मा नित्य असल्याचें सिद्ध आहे. ” इत्यादि प्रकारचे उत्तरमीमांसे-मध्यें सिद्धांत आहेत. तेव्हां सदहू श्रुति आणि वेदांतशास्त्राचे सिद्धांत ह्यांवरून ह्या श्लोकांतील पहिल्या पादाचा अर्थ “ वस्तुतः जन्मविनाश-रहित ” असा होतो. असो. जन्मविनाशरहित, सर्वभासक आणि सर्वांना कारणीभूत जी माया तिचें अधिष्ठान असल्यामुळें सर्व भूतांचा ईश्वरही असतांना मी स्वस्वरूपाचें अवलंबन करून ह्मणजे स्वस्वरूपीं स्थित असून संभवतों ह्मणजे देह आणि देही हें नातें नसतांनाच देहधारी प्राण्यांप्रमाणें मी वागतों. “ तर मग देहरहित असा जो सच्चिदानंदघन परमात्मा त्याचे ठिकाणीं देहत्वप्रतीति कशी होते

ह्मणजे लोकांना तो देहधारी आहे असा कां वाटतो ? " अशी कोणाला शंका येईल ह्मणून " स्वतःच्या मायेनें " असें सांगतात. तात्पर्य, निर्गुण आणि शुद्ध असा मी देहदेहिभावशून्य सच्चिदानंदमय भगवान् वासुदेव त्याचे ठिकाणीं तशी जी प्रतीति होते ह्मणजे तो देहधारी आहे असें जें लोकांना वाटतें तो केवल मायेचा खेळ आहे. कारण, " हा कृष्ण सर्वांचा आत्मा आहे असें तूं समज. हा जगताच्या हिताकरितां मायेच्या योगानें ह्या ठिकाणीं देहधाऱ्याप्रमाणें भासतो. अहाहा ! कायहो ह्या नंदगोपाच्या गोकुलामध्यें राहणाऱ्यांचें भाग्य ह्मणावें तरी ! अहो, परमानंदस्वरूप असें सनातन पूर्ण ब्रह्मच ह्यांचा सखा आहे. ह्या श्लोकांतील प्रकृति ह्या शब्दाचा अर्थ स्वस्वरूप असा आहे हें दर्शविण्याकरितां ' स्वाम् ' हें विशेषण घातलेलें आहे. )

( आतां ह्या मताचा विचार करूं. देहदेहिभाव परमेश्वराचे ठिकाणीं नाहीं असेंच जर नुसतें ह्या मतांत सांगितलें असतें तर तें भाष्यकारांच्या मताशीं विरुद्ध नाहीं. कारण, भाष्यकारांनीं तरी ईश्वराचे ठिकाणीं वस्तुतः देहदेहिभाव नसून तो मायेमुळें आहे असेंच ह्मटलेलें आहे. परंतु, नित्य, व्यापी, सच्चिदानंदमय व परिपूर्ण असा जो निर्गुण परमात्मा भगवान् वासुदेव तोच शरीर ; त्या निर्गुण परमात्म्याहून भिन्न असा भौतिक अथवा मायिक देह त्या परमात्म्याला नाहीं असें जें ह्मटलेलें आहे तें मात्र बरोबर नाहीं. कारण, निर्गुण परमात्मा तोच देह असें जर मानिलें तर तो देह साकार अथवा निराकार असा कोणता तरी एका प्रकारचा समजणें अवश्य आहे. आतां तो देह साकार आहे असें जर धरून चाललें तर निर्गुण जो परमात्मा त्याच्याच स्वरूपांत कांहीं फेरबदल होऊन साकार देह बनतो असें तरी मानिलें पाहिजे किंवा त्या निर्गुण परमात्म्याच्या स्वरूपांत कांहीं फेरबदल होत नसतांनाही शुक्तीचे ठिकाणीं भासणाऱ्या रजताप्रमाणें परमेश्वराचे ठिकाणीं तो देह असतो असें तरी मानिलें पाहिजे. पैकीं स्वरूपामध्येंच

फेरबदल होऊन ज्याप्रमाणें दुधाचें दही बनतें त्याचप्रमाणें निर्गुण आणि निर्विकार असा जो परमात्मा त्याच्या स्वरूपामध्येंच कांहीं फेरबदल होऊन साकार देह बनतो, असें ह्मणावें तर तें ह्मणणें बरोबर दिसत नाहीं. कारण, " निष्कलं निष्क्रियं शान्तं निरवद्यं निरञ्जनम् ।" इत्यादि श्रुतीवरून निर्विकार ह्मणून सिद्ध असलेला जो परमात्मा त्याच्या स्वरूपांत विकाररूप फरबदल होणें असंभवनीय आहे. शिवाय, निर्गुण व निर्विकार अशा परमात्म्याच्या स्वरूपांत विकार उत्पन्न होऊन तो देह बनतो असें जर ह्या भाष्यविरुद्ध व्याख्यान करणाऱ्या पंडितांच्या मुर्वतीकरितां घटकाभर गृहीत धरूं ह्मणावें तर तेंही नीट दिसत नाहीं. कारण, परमात्म्याचे ठिकाणीं विकार उत्पन्न होतो असें जर असेल तर तो नित्य ह्मणजे त्रिकालाबाधित आहे असें ह्मणतां येणार नाहीं. आतां " शिंपेच्या स्वरूपांत वस्तुतः कांहींएक फेरबदल होत नसतांनाही ज्याप्रमाणें तिचे ठिकाणीं रजतत्वप्रतीति होते ह्मणजे लोकांना ज्याप्रमाणें ती शिंप आहे असें न वाटतां तें रुपें आहे असें वाटतें त्याचप्रमाणें निर्गुण परमात्म्याच्या स्वरूपांत यत्किंचित्‌ही फेरबदल न होतां लोकांना मात्र तो साकार देह आहे असें वाटतें. " ह्मणून ह्मणावें तरीही जुळत नाहीं. कारण, वस्तूच्या स्वरूपांत यत्किंचित्‌ही फेरबदल न होतां लोकांना ती दुसरीच वस्तु दिसणें ही गोष्ट होण्याला माया अवश्यक आहे. तेव्हां ईश्वराच्या स्वरूपांत यत्किंचित्‌ही फेरबदल न होतां लोकांना तो देहधारी भासतो असें ह्मटलें असतां ईश्वराचे ठिकाणीं मायिक देहाचा संबंध नाहीं असें जें पूर्वी ह्या पंडितांनीं ह्मणून ठेविलें आहे तें खोटें ठरतें. तस्मात्, भौतिक आणि मायिक ह्या देहांशिवाय परमात्म्याचे ठिकाणीं असणारा जो परमात्मरूप देह तो साकार आहे हें सिद्ध होत नाहीं. बरें, निर्विकार आहे असें ह्मणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण, अस्थूलमनणव्हस्वमदीर्घम् । तदेतदपूर्वमनपरमनन्तरमबाह्यम् । अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स

शृणोत्यकर्णः । सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।" इत्यादि श्रुति-स्मृतींवरून कोणताही आकार परमात्म्याचे ठिकाणीं नाहीं असें सिद्ध होत आहे. कारण, त्या श्रुतिस्मृतींचा अर्थ "परमात्मा स्थूल नाहीं, सूक्ष्म नाहीं, ऱ्हस्व नाहीं व दीर्घ नाहीं. अलीकडे नाहीं, पलीकडे नाहीं, आंत नाहीं व बाहेर नाहीं. हातपाय नसतांना धावणारा व ग्रहण करणारा, चक्षुरिंद्रिय नसतांना पाहणारा व कान नसतांना ऐकणारा. सर्व इंद्रियांच्या व्यापारांनीं व्याप्त झाल्यासारिखा भासणारा; परंतु, वस्तुतः कोणतेंच इंद्रिय ज्याला नाहीं" असा आहे. तेव्हां कोणत्याही प्रकारचा ज्याला आकार नाहीं असा जो निर्गुण परमात्मा त्याला कांहीं एक विशेष आकाराचा निराकार ह्मणून देह आहे हें ह्मणणेंच "मम माता वन्ध्या" ह्या ह्मणण्याप्रमाणें विरुद्ध आहे. तेव्हां, निर्गुण परमात्मा हाच देह आहे; परमात्म्याचे ठिकाणीं दुसऱ्या भौतिक अथवा मायिक देहाचा संबंध नाहीं, हें भाष्यविरुद्ध मत सर्वस्वीं त्याज्यच मानावें लागतें आणि "कृष्णमेनमवेहि त्वमात्मानमखिलात्मनाम् । जगद्धिताय सोऽप्यत्र देहीवाभाति मायया ॥ अहो भाग्यमहो भाग्यं नन्दगोपव्रजौकसाम् । यन्मित्रं परमानन्दं पूर्णं ब्रह्म सनातनम् ।" हीं दोन्हीं वचनेंही भाष्यकारांच्या मताशींच चांगलीं जुळतात. 'प्रकृति' शब्दाचा अर्थ ह्या ठिकाणीं ह्या भाष्यविरुद्ध व्याख्यानकारांनीं स्वस्वरूप असा केला आहे. परंतु, त्याला कांहींएक प्रमाण नसून भाष्यकारांनीं माया असा जो अर्थ केला आहे त्याला मात्र "मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्" ही श्वेताश्वतरोपनिषदांतील श्रुति प्रमाण आहे. ह्या चवथ्या अध्यायांतील सहावा श्लोक खेरीज करून सुमारें पंचवीस ठिकाणीं गीतेमध्यें 'प्रकृति' हा शब्द आलेला आहे. परंतु, त्याचा अर्थ स्वस्वरूप असा कोठेंही नाहीं. उदाहरणार्थः—तिसऱ्या अध्यायांतील पांचव्या श्लोकांत "प्रकृतिजैर्गुणैः" असें आहे. ह्या ठिकाणच्या प्रकृति शब्दाचा अर्थ स्वस्वरूप असा

नाहीं. ‘ प्रकृतेः क्रियमाणानि ’ असें सत्ताविसाव्या श्लोकांत आहे; परंतु, त्याचाही अर्थ माया असाच आहे. एकुणतिसाव्या श्लोकांत ‘ प्रकृति ’ शब्द आहे त्याचाही अर्थ माया असाच आहे. तेहेतिसाव्या श्लोकांत ‘ प्रकृतेर्ज्ञानवानपि ’ असे शब्द आहेत; परंतु, त्यांतील प्रकृतिशब्दाचा अर्थ “ पूर्वजन्मार्जितधर्माधर्मादिसंस्कार ” असा आहे. सातव्या अध्यायांतील चवथ्या श्लोकामध्यें ‘ भिन्ना प्रकृतिरष्टधा ’ अशीं पदें आहेत; परंतु, ह्यांतही प्रकृतिशब्दाचा अर्थ मायाशक्ति असाच आहे. पांचव्या श्लोकांत ‘ प्रकृतिं विद्धि मे पराम् ’ असें आहे; परंतु तेथीलही प्रकृति ह्या शब्दाचा अर्थ माया असाच आहे. चवथ्या अध्यायांतील सहाव्या श्लोकांत जो प्रकृतिशब्द आहे त्याचा अर्थ ‘ स्वाम् ’ हे विशेषण असल्यामुळें माया असा करितां येत नाहीं असें जें वर निकालांत काढलेल्या भाष्यविरुद्ध व्याख्यानांत ह्मटलें आहे तें बरोबर नाहीं हें सातव्या अध्यायांतील चवथ्या व पांचव्या श्लोका-वरून सिद्ध होत आहे. कारण, ‘ स्वाम् ’ ह्या शब्दाचा अर्थ आणि चवथ्या व पांचव्या श्लोकांत असलेल्या ‘ मे ’ ( ह्मणजे माझी ) ह्या पदाचा अर्थ वस्तुतः एकच आहे. असो. सातव्या अध्यायांतील विसाव्या श्लोकांत तर ‘ प्रकृत्या नियता स्वया ’ असें ह्मटलें आहे व चतुर्थाध्यायांतर्गत सहाव्या श्लोकामध्यें ज्याप्रमाणें ‘प्रकृतिम्’ ह्या विशे-ष्याला ‘स्वाम्’ हें विशेषण दिलें आहे त्याचप्रमाणें ‘प्रकृत्या’ ह्या विशे-ष्याला स्वया हें विशेषण दिलें आहे; परंतु, इतकें असूनही येथें ‘प्रकृति’ शब्दाचा अर्थ जन्मान्तरार्जितसंस्कार असाच आहे; स्वस्वरूप असा नाहीं. जन्मान्तरार्जितसंस्कार आणि स्वस्वरूप ह्यांमध्यें अर्थदृष्ट्या भेद नाहीं असें ह्मणावें तर जन्ममरणरहित असा परमात्मा जन्मादि विका-रांनीं युक्त आहे असें होऊं लागेल. असो. नवव्या अध्यायांतील सातव्या श्लोकांत ‘ प्रकृतिं यान्ति मामिकाम् । ’ असें ह्मटलें आहे व येथील ‘ प्रकृति ’ शब्दाचा अर्थही मायाशक्ति असाच आहे. आठवा

श्लोक " प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनःपुनः । भूतग्राममिमं कृत्स्न-मवशं प्रकृतेर्वशात्" असा आहे. ह्यांतही 'प्रकृतिम्' ह्या विशेष्याला 'स्वाम्' हें विशेषण असतांना त्या विशेष्याचा अर्थ माया असाच आहे व उत्तरार्धांतील 'प्रकृति' शब्दाचा अर्थ जन्मांतरार्जित ' संस्कार ' असा आहे. " मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् " असें दहाव्या श्लोकांत आहे व येथील 'प्रकृति' शब्दाचा अर्थही माया असाच आहे. 'प्रकृति' शब्दाचा अर्थ स्वस्वरूप असा नाहीं ह्याविषयीं गीतेंतून आणखीही कांहीं उदाहरणें देतां येतील; परंतु, विस्तरभयास्तव येवढ्यावरच थांबणें बरें. नीलकंठपंडितांनीं ह्या श्लोकाचें जें व्याख्यान केलें आहे त्यांतही भाष्यविरुद्ध मजकूर लिहिला आहे. इतकेंच नव्हे परंतु, भाष्यविरुद्ध मजकूर लिहून तो अगदीं बरोबर असल्याविषयीं स्वतःची खात्री असल्यामुळें " वास्तविक पाहूं गेलें असतां ह्या श्लोकाचा अर्थ हा आह्मीं केला आहे असाच होतो; परंतु, भाष्यामध्यें मात्र कांहीं वेगळ्याच प्रकारानें व्याख्यान केलें आहे, तें चिंत्य आहे. " असें दर्शविण्याकरितांच कीं काय कोण जाणें त्यांनीं आपल्या व्याख्यानाचे शेंवटीं भाष्यकारांचें मत संक्षेपानें दिलें आहे. तेव्हां भाष्यरूप सूर्यापुढें नीलकंठपंडितांच्या दीपिकेचा प्रकाश कितीसा पडत आहे तो पाहूं. नीलकंठपंडित ह्मणतात:—

किं तर्हि योगिनां सर्वज्ञत्वप्रसिद्धेस्त्वं जातिस्मरो जीवोसीत्याशंक्याह । अज इति ॥ देहान्निष्कृष्टस्याजत्वाव्ययत्वे न त्वेवाहं जातु नासमित्यत्र साधिते । इह तु देहविशिष्टस्यैव ते उच्येते ईश्वरोपीत्यनेन । देहान्निष्कृष्टस्यास्मदादेरपीश्वरत्वं तत्त्वमस्यहं ब्रह्मास्मीत्यादिश्रुतिप्रसिद्धमतो देहविशिष्टस्यैवाजत्वनित्यत्वे दृढीक्रियेते अन्यथानीश्वरत्वप्रसंगात् । न ह्यादित्यान्तर्यामिणः परमेश्वरस्य हिरण्यश्मश्रुत्वादिविशिष्टो देहो जन्मव्ययवानिति वक्तुं शक्यम् । अकर्मजत्वात् । कर्मफलस्य हि पराकाष्ठा हैरण्यगर्भशरीरप्राप्तिः । न च पुरुषो ह वै नारायणोकामयतात्यतिष्ठेयं सर्वाणि भूतान्यहमेवेदं

सर्वं स्यामिति स एतं पुरुषमेधं पञ्चरात्रं यज्ञक्रतुमपश्यदित्यादिना शतपथे नारायणाख्यस्य परमात्मनः सहस्रशीर्षा पुरुषः। सहस्राक्षः सहस्रपात् ॥ स भूमिं विश्वतो वृत्वा। अत्यतिष्ठद्दशांगुलमिति। पादोस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवीति च पुरुषसूक्तप्रतिपाद्यस्य सर्वाणि भूतान्यतिक्रम्य स्थितस्येश्वरस्यापि शरीरं पञ्चरात्राख्यकर्मविशेषफलमिति श्रूयत इति वाच्यं तत्र नारायणशब्देन हिरण्यगर्भस्यैव विवक्षितत्वात्। न हि परमेश्वरस्य पूर्णकामस्य सर्वानतिक्रम्य स्थितस्य पुनरत्यतिष्ठेयं सर्वाणि भूतानीति कामना भवति। ननु परमेश्वरेपि कामना दृष्टा। सोकामयत बहु स्यां प्रजायेयेतीति चेच्छ्लाघनीयप्रज्ञो देवानां प्रियो यत आप्तकामस्य का स्पृहेति श्रुतेर्लोकवत्तु लीलाकैवल्यमिति न्यायाच्च निस्पृहस्य लीलयैव ब्रह्मांडकोटीः सृजतो भगवतो राजगोपालस्य कर्म किंकरेण कर्मणा सार्वात्म्यं प्रार्थयता साम्यमापादयति। तस्मान्न कर्मफलं भगवतः शरीरम्। अत एव न भौतिकं विराट्सूत्रात्मातिरिक्तस्य भौतिकस्याभावात्। तस्माद्युक्तमजोपि सन्निति। ननु तर्हि भगवच्छरीरस्य किमुपादानमविद्येति चेन्न परमेश्वरे तदभावात्। जीवाविद्या चेन्न शुक्तिरजतादेरिव तुच्छत्वापत्तेः। चिन्मात्रं चेन्न चितः साकारत्वायोगात्। तथात्वे वा तस्यातीन्द्रियत्वापत्तिः। तस्मात्किमालम्बो भगवद्देहो देवकीगर्भप्रवेशजननबाल्यकौमारपौगंडयौवनादिप्रतीतिविषय इति चेच्छृणु प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममाययेति। अयमर्थः। जीवात्मानो ह्यनात्मभूतां प्रकृतिं तेजोबन्नात्मिकां पञ्चभूतात्मिकां वाधिष्ठाय संभवन्ति जन्मादि लभन्ते अहं तु स्वां प्रत्यगनन्यां प्रकृतिं प्रत्यक्चैतन्यमेवेत्यर्थः। तदेवाधिष्ठाय न तूपादानान्तरमात्ममायया स्वीयमायया संभवामि यथा कश्चिन्मायावी स्वयं स्वस्थानादप्रच्युतस्वभावोप्यदृश्यो भूत्वा स्थूलसूक्ष्मभूतान्यनुपादायैव केवलया मायया द्वितीयं मायाविनं स्वसदृशमेव सूत्रमार्गेण गगनमारोहन्तं सृजत्येवमहं कूटस्थचिन्मात्रोग्राह्यः स्वमायया चिन्मयमात्मनः शरीरं सृजामि तस्य

बाल्याद्यवस्थाश्च सूत्रारोहणवद्दर्शयामि। एतावांस्तु विशेषः। लौकिको मायावी मायामुपसंहरन्द्वितीयं मायाविनमप्युपसंहरति। अहं तु तामनुपसंहरन्स्वविग्रहमपि नोपसंहारामीति। एवं हि सति हिरण्यश्मश्रुत्वादिलक्षणविग्रहयोगिनश्चैतन्यस्यान्तस्तद्धर्मोपदेशादित्यादिन्यायसिद्धं वियदाद्युपादानत्वलक्षणं सर्वेश्वरत्वं युज्यते नान्यथेति ॥ तस्मात्सिद्धं परमेश्वरस्य मायामयं शरीरं नित्यमित्येकेनैव देहेन विवस्वन्तमुपदिश्य त्वामप्युपदिशामीति। भाष्ये तु स्वां प्रकृतिं वैष्णवीं त्रिगुणात्मिकां मायामधिष्ठाय वशीकृत्यात्ममायया संभवामि देहवाञ्जात इवात्मनो मायया न परमार्थतो लोकवदिति व्याख्यातम् ॥

ह्या नीलकंठपंडितांच्या व्याख्यानाचें तात्पर्य येणें प्रमाणें:—
योगी पुरुष सर्वज्ञ ह्मणजे भूत, भविष्य वगैरे जाणीत असतात अशी प्रसिद्धि आहे आणि तूंही पूर्वी होऊन गेलेले स्वतःचे जन्म पुष्कळ जाणात आहेस. तेव्हां तूं पूर्वजन्मीं झालेला वृत्तांत स्मरणारा जीव आहेस कीं काय ? अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून भगवानांनीं ह्या श्लोकांत तिचें निरसन केलें आहे. देहातिरिक्त आत्मा उत्पत्तिविनाशरहित आहे हें " न त्वेवाहं जातु नासं " ह्या ठिकाणीं सिद्ध झालें आहे. ह्या श्लोकांत परमात्मा देहासहवर्तमान उत्पत्तिविनाशरहित आहे हें 'ईश्वरोऽपि सन्' इत्यादि मजकुरानें प्रतिपादिलेलें आहे. ' तें ब्रह्म तूं आहेस "; " मी ब्रह्म आहें. " इत्यादि श्रुतींवरून देहातिरिक्त असे आह्मांसारिखेही ईश्वर असल्याचें सिद्ध आहे. ह्मणजे देहाचा संबंध मनामध्यें न घेतां " न त्वेवाहं जातु नासं " ह्या श्लोकामध्यें परमात्मा श्रीकृष्ण उत्पत्तिविनाशरहित असल्याचें ज्याप्रमाणें सिद्ध झालें आहे त्याचप्रमाणें देहाची गोष्ट मनांत न घेतां वर दर्शविलेल्या श्रुतींवरून आह्मांसारिखेही उत्पत्तिविनाशरहित असल्याचें सिद्ध होत आहे. तेव्हां उत्पत्तिविनाशराहित्य हीच गोष्ट जर ईश्वरत्व येण्याला कारण असेल तर आह्मीही ईश्वरच आहोंत. तेव्हां परमात्मा श्रीकृष्ण आणि इतर ह्यांमध्यें वस्तुतः भेद तो काय ?

अशी शंका राहण्याचा संभव आहे ह्मणून परमात्मा आणि इतर लोक ह्यांमध्यें असलेला भेद ह्या श्लोकामध्यें दर्शविला आहे. सारांश, इतर लोक देहाशिवाय उत्पत्तिविनाशरहित असतात आणि ईश्वर देहासह्वर्तमान उत्पत्तिविनाशरहित असतो ही गोष्ट ह्या ठिकाणीं सिद्ध केलेली आहे. कारण, हें जर सिद्ध न होईल तर ईश्वर आणि इतर लोक ह्यांमध्यें कांहीं भेद रहात नसल्यामुळें ईश्वराचे ठिकाणीं ईश्वरत्व नसून तोही सामान्य लोकांप्रमाणेंच आहे असें होऊं लागेल. सुवर्णश्मश्रु वगैरे लक्षणांनीं युक्त असलेला सूर्यांतर्यामी परमेश्वराचा देह उत्पत्तिविनाशयुक्त आहे असें ह्मणतां येणें शक्य नाहीं. कारण, तो देह कर्मजन्य नाहीं. हिरण्यगर्भाचा देह प्राप्त होणें ही कर्मफलाची पराकाष्ठा होय. "— मीं सर्व प्राण्यांपेक्षां श्रेष्ठ व्हावें व हें सर्व मींच व्हावें अशी नारायणनामक पुरुषाला इच्छा झाली असतां हा पंचरात्रसंज्ञक नरमेध यज्ञक्रतु तें फल देणारा आहे असें त्यानें अवलोकन केलें—वगैरे प्रकारानें शतपथ ब्राह्मणामध्यें सांगितलेलें आहे व त्याचप्रमाणें—अनंत मस्तकांनीं, अनंत इंद्रियांनीं व अनंत पायांनीं युक्त असलेला तो पुरुष सर्व ब्रह्मांड व्यापून दहा अंगुलें उरला; सर्व प्राणी ह्या पुरुषाचा एक भाग आहे व ह्याचे तीन भाग स्वर्गामध्यें आहेत असें पुरुषसूक्तामध्यें सांगितलें आहे. तेव्हां पुरुषसूक्तामध्यें सर्व प्राण्यांचें अतिक्रमण करून असलेल्या ज्या परमात्म्याचें प्रतिपादन केलें आहे त्या नारायणसंज्ञक परमात्म्याचें शरीर पंचरात्रसंज्ञक कांहीं विशेष कर्माचें फल असल्याचें श्रुतीवरून सिद्ध होत आहे." अशी शंका करितां येणार नाहीं. कारण, त्या ठिकाणीं नारायणशब्दाचा अर्थ "हिरण्यगर्भ" असाच विवक्षित आहे. सर्व भूतांचें अतिक्रमण करून राहिलेला जो पूर्णकाम परमात्मा त्याला पुनरपि "सर्व प्राण्यांपेक्षां मी श्रेष्ठ व्हावें" अशी इच्छा होण्याचा संभवच नाहीं. आतां "मी पुष्कळ व्हावें अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली इत्यादि प्रकारची श्रुति असल्यामुळें ईश्वराचे ठिकाणीं

कामना असल्याचें दिसत आहे " असें जर कोणी ह्मणूं लागला तर त्या महापंडिताच्या बुद्धीची मोठी तारीफच करावी लागेल. कारण, " जो मुळींच पूर्णकाम आहे त्याला इच्छा कसली असणार " अशी श्रुति आहे आणि " ज्याप्रमाणें कांहीं एक उद्देश मनांत न आणितां श्वासोच्छ्वास वगैरे करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होत असते त्याचप्रमाणें जगद्रचना करणें ही ईश्वराची केवल लीला आहे. " असा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे. तेव्हां केवल लीलेनेंच कोट्यावधि ब्रह्मांडें उत्पन्न करणारा जो निस्पृह भगवान् गोपालाधिपति त्याचें कर्म आणि एकाद्या सेवकाचें कर्म तो सारिखेंच समजत आहे. तस्मात् भगवानांचें शरीर कर्मफल नव्हें आणि ह्मणूनच भौतिकही नव्हें. कारण, विराट् आणि सूत्रात्मा ह्यांवांचून भौतिकाचा अभाव आहे. तस्मात् " अजोपि सन् " वगैरे जें ह्मटलें आहे तें बरोबर आहे. तर मग भगवानांचें शरीर कशाचें बनलें आहे ? अविद्या हें त्या शरीराचें मूल कारण आहे असें ह्मणावें तर परमेश्वराचे ठिकाणीं तिचा अभाव आहे. जीवांची अविद्या हें कारण ह्मणावें तर शुक्तीचे ठिकाणीं भासणाऱ्या रजताप्रमाणें तें खरें ठरणार नाहीं. चैतन्य हेंच कारण ह्मणावें तर चैतन्याला आकृति संभवनीय नाहीं आणि तसें संभवनीय असलें तरी तें शरीर इंद्रियगोचर होण्याचा संभव नाहीं. तस्मात्, देवकीच्या उदरीं भगवान् आले, भगवान् उत्पन्न झाले, ही भगवानांची बाल्यावस्था आहे, ही कौमारावस्था आहे, ही पौगंडावस्था आहे, आतां भगवान् यौवनावस्थेंत आले आहेत इत्यादि प्रकारें ज्या देहाविषयीं लोकांना प्रतीति येते तो भगवानांचा देह कशाचा आहे अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून भगवान् सांगतात " ऐक. मी आपल्या प्रकृतीचें अवलंबन करून आपल्या मायेनें उत्पन्न होत असतों. " प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया " ह्या उत्तरार्धाचा अर्थ असा आहेः—इतर जीवांना तेज, आप व पृथ्वी अशी भूतत्रयात्मक अथवा पंचभूता-

त्मक जी अनात्मभूत प्रकृति ह्मणजे उपादानकारण तिचें अवलंबन करून जन्मादिक प्राप्त होतात. परंतु, मी तर स्वचैतन्याचेंच अवलंबन करून उत्पन्न होत असतों. सारांश, दुसऱ्या उपादानकारणाचें अवलंबन न करितां त्या चैतन्याचेंच अवलंबन करून मी आपल्या मायेनें उत्पन्न होत असतो. उदाहरणार्थः—ज्याप्रमाणें एकादा जादूगार स्वतः आपलें स्थान सोडून गेल्याशिवाय अदृश्य होऊन स्थूल व सूक्ष्म भूतांचा स्वीकार न करितांच केवल आपल्या मायेच्या योगानें आपल्या सारिखाच दुसरा मायावी सूत्रमार्गानें आकाशांत चढत असलेला असा उत्पन्न करितो त्याचप्रमाणें निर्विकार व चैतन्यमय असा मी आपल्या मायेच्याच योगानें चिन्मय असें आपलें शरीर उत्पन्न करून सुतानें आकाशांत चढून जाण्याप्रमाणें मी त्या शरीराच्या बाल्यप्रभृति अवस्था दर्शवीत असतों. इतर जादूगार आणि मी ह्यांच्यामध्यें काय जो भेद आहे तो हा. पृथ्वींतील जादूगार आपल्या मायेचा उपसंहार करूं लागला असतां त्या मायेनें उत्पन्न केलेल्या दुसऱ्या मायावी पुरुषाचाही तो उपसंहार करितो आणि मी मायेचा उपसंहार न करितां आपल्या शरीराचाही उपसंहार करीत नाहीं; तें मी तसेंच कायम ठेवितों. हा सदहू श्लोकांतील उत्तरार्धाचा अर्थ होय. असो. ह्याप्रमाणें अर्थ मानिला असतां "ईश्वराचेच धर्म सांगितल्यामुळें सूर्यमंडलादिकांचे ठिकाणीं सुवर्णश्मश्रु वगैरे लक्षणांनीं युक्त ह्मणून जो सांगितला आहे तो परमेश्वरच होय." ह्या वेदांतशास्त्राच्या सिद्धांतावरून सुवर्णश्मश्रु वगैरे लक्षणांनीं युक्त असलेला देह धारण करणारा आणि आकाशप्रभृति भूतांना मूळ असलेला पुरुष सर्वांचा ईश्वरच आहे ही गोष्ट सिद्ध होते. तस्मात्, परमेश्वराचें मायामय शरीर नित्य आहे आणि ज्या देहानें सूर्याला उपदेश केला त्याच देहानें मी तुला उपदेश करीत आहें असें तो अर्जुनाला सांगत आहे हें सिद्ध झालें. ह्या प्रकारें "प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया" ह्या उत्तरार्धाचा अर्थ

आहे. परंतु, भाष्यामध्यें ह्या उत्तरार्धाचें व्याख्यान " स्वां प्रकृतिं॰ लोकवत् " असें केलें आहे.

ह्याप्रमाणें नीलकंठपंडितांच्या ह्मणण्याचा आशय आहे; परंतु, हें त्यांचें भाष्यविरुद्ध पांडित्य बरोबर नाहीं. सुवर्णश्मश्रु वगैरे प्रकारांनीं युक्त असलेला सूर्यांतर्यामी देहच जर कृष्णादिरूप देह असेल तर तो तसाच लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आला असता. श्रीकृष्ण मेघश्याम आहेत असें लोकांना वाटलें नसतें. आतां " वस्तुतः भगवानांचा देह सुवर्णश्मश्रु वगैरे लक्षणांनीं युक्त असाच आहे; परंतु, मेघवर्ण वगैरे लक्षणांनीं युक्त असल्यासारिखा जो भासतो तो केवळ मायेचा खेळ आहे." असें कोणी नीलकंठपंडितांच्या बाजूनें ह्मणूं लागेल तर साधक जनावर अनुग्रह करण्याकरितां भगवान् स्वतः शरीररहित असूनही मायेच्या योगानें सूर्यांतर्यामी, कृष्णादिस्वरूप वगैरे अनेक देह घेत असतात, असें ह्मणणें बरें. कारण, मेघश्यामवर्णानें युक्त वगैरे प्रकारचा जो देह दिसतो तो वस्तुतः हिरण्यश्मश्रु वगैरे लक्षणांनीं युक्त असूनही मायेनें वेगळ्या प्रकारचा दिसतो, असें मानण्याला कांहीं प्रमाण दिसत नाहीं. सारांश, एकच नित्य देह मायेने भिन्न प्रकारचा भासतो असें ह्मणण्यापेक्षां शरीररहित असा परमात्मा स्वेच्छेनें अनेक अनित्य देह धारण करीत असतो असें समजणें चांगलें. कारण, "ईश्वर शरीरराहित आहे" असें श्रुतींत सांगितलें आहे. वस्तुतः निर्गुण असा जो परमात्मा त्याचे ठिकाणीं सुवर्णश्मश्रु वगैरे प्रकार खरें नसून मायिकच आहेत आणि ह्मणूनच आदित्यांतर्यामी देहही वस्तुतः परमात्म्याला नाहीं ही गोष्ट सिद्धच आहे. जादूगाराचा दृष्टांत देऊन नीलकंठपंडितांनीं ईश्वराच्या शरीराचें नित्यत्व सिद्ध केलें आहे तेंही बरोबर नाहीं. कारण, भगवान् श्रीकृष्ण देवकीपासून प्रथमतः चतुर्भुज उत्पन्न झाले होते; परंतु तें स्वरूप गुप्त करून ते पुनरपि द्विभुज झाले आणि तेंही अदृश्य करून पुनरपि त्यांनीं आपलें चतुर्भुज रूप दर्शविलें. ही गोष्ट इतिहासामध्यें प्रसिद्ध आहे. तेव्हां ईश्वराचें मायिक शरीर नित्य आहे

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ॥**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

---

**तच्च जन्म कदा किमर्थं चेत्युच्यते यदा यदा० सृजाम्यहं ॥ ७ ॥ यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्हानिर्वर्णाश्रमादि-**

---

असें ह्मणतां येत नाहीं. इतर जादूगाराप्रमाणें मायेनें धारण केलेलें आपलें शरीर ईश्वर गुप्त करीत नाहीं असें जर ह्मणावें तर मोहिनी-प्रभृतींचीं जीं अनेक रूपें भगवानांनीं धारण केलीं तीं सर्व एकाच वेळीं लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येणें अवश्य आहे. तस्मात् , ईश्वर स्वतः शरीररहित असतांनाच भक्तजनावर अनुग्रह करण्याकरितां नानाप्रकारचीं शरीरें धारण करून तीं गुप्त करीत असतो असें मानिल्यावांचून गत्यंतरच नाहीं. असो. )

( कांहीं लोक नित्य, अवयवरहित आणि निर्विकार अशा आनंद-स्वरूप परमात्म्याला हस्तपादादि अवयव वास्तविकच आहेत असें प्रतिपादन करीत असतात. परंतु, ह्या त्यांच्या प्रतिपादनाला कांहींच आधार नसल्यामुळें त्यांचें खंडण करण्याच्या खटपटींत पडण्यापेक्षां मधुसूदनसरस्वती ह्मणतात त्याप्रमाणें " निर्युक्तिकं ब्रुवाणास्तु नास्माभिर्विनिवार्यते—युक्तीवांचून कांहींतरी बरळत सुटणाऱ्यांचें आह्मी निवारण करीत नाहीं—ह्या न्यायाचें अवलंबन करून स्वस्थ बसणेंच बरें. कारण, शेंकडों श्रुतिस्मृतींनीं—नित्य, अवयवशून्य आणि निर्विकार ह्मणून—सिद्ध असलेला जो परमात्मा त्याचे ठिकाणीं जर कोणाच्या मतानें हस्तपादादि अवयव असण्याचा संभव असेल तर तो खुशाल असो ६. )

जेव्हां जेव्हां धर्माची हानि आणि अधर्माची वृद्धि होते तेव्हां तेव्हां, हे भारता अर्जुना, मी स्वतःला जन्मास आल्यासारिखें दाखवीत असतों॥७॥

तो तुझा जन्म केव्हां आणि कशाकरितां होत असतो ? ह्मणून विचारशील तर सांगतोंः—जेव्हां जेव्हां वर्णाश्रमादि लक्षणांनीं युक्त

**लक्षणस्य प्राणिनामभ्युदयनिःश्रेयससाधनस्य भवति भारताभ्युत्थानमुद्भवोधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं मायया ॥ ७ ॥**

---

अशा प्राण्यांच्या अभ्युदयाचें व मोक्षाचें साधन असलेल्या धर्माची हानि होते आणि अधर्माचा उद्भव होतो तेव्हां मी आपल्या मायेनें स्वतःला उत्पन्न करितों ७.

( मधुसूदनसरस्वतींनीं ' आत्मानं सृजामि ' ह्या पदांचें व्याख्यान " आत्मानं देहं सृजामि नित्यसिद्धमेव सृष्टमिव दर्शयामि " असें केलें आहे व त्याचा आशय " मी आत्मा ह्मणजे देह उत्पन्न करितों ह्मणजे नित्यसिद्ध जो देह तो मायेच्या योगानें मी उत्पन्न केल्यासारिखा दर्शवितों " असा आहे. परंतु, हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, परमेश्वराचा देह जर नित्यसिद्ध असेल तर तो दोहोंपैकीं कोणत्यातरी एका प्रकारचा असला पाहिजे. एक परमेश्वराहून भिन्न तरी असला पाहिजे किंवा परमेश्वररूपच असला पाहिजे हें उघड आहे. आतां तो परमेश्वराहून भिन्न आहे असें जर मानिलें तर नित्यसिद्ध अशी वस्तु परमात्म्याहून दुसरी कोणतीही नसल्यामुळें तसें मानितां येत नाहीं. स्वतःहून भिन्न नसलेला असा नित्यसिद्ध देह परमेश्वराला आहे असें ह्मणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण, तो देह एक परिच्छिन्न तरी असला पाहिजे किंवा अपरिच्छिन्न तरी असला पाहिजे. आतां तो ईश्वरस्वरूप देह परिच्छिन्न आहे असें जर धरून चाललें तर ईश्वर नेहमीं परिच्छिन्नच आहे; सर्वव्यापी नाहीं असें होऊं लागेल आणि तो देह अपरिच्छिन्न आहे ह्मणजे त्याचा आकार अपरिमित आहे असें जर ह्मणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण, देह ह्मणजे अवयवांचा समुदाय; अर्थात् परिमित अकारानें युक्त. तेव्हां अपरिच्छिन्न ह्मणजे अपरिमित आकारानें युक्त असा देह परिमिताकाररूप आहे हें ह्मणणें " मम माता वन्ध्या " ह्या ह्मणण्याप्रमाणेंच व्यर्थ आहे. )

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ॥**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

---

**किमर्थं परित्राणाय० युगे युगे ॥ ८ ॥ परित्राणाय परिरक्षणाय साधूनां सन्मार्गस्थानां विनाशाय च दुष्कृतां पापकारिणाम् । किं च धर्मसंस्थापनार्थाय धर्मस्य सम्यक्स्थापनं तदर्थं संभवामि युगे युगे प्रतियुगम् ॥ ८ ॥**

---

( तूं भरतवंशामध्यें उत्पन्न झाला आहेस; ह्मास्तव, धर्महानि करणें तुला योग्य नाहीं. हें अर्जुनाला सुचविण्याकरितां भगवानांनीं त्याला उद्देशून " भारत " हें संबोधन घातलें आहे ७. )

साधूंच्या रक्षणाकरितां, पापी लोकांच्या नाशाकरितां आणि धर्मसंस्थापनेकरितां मी प्रत्येक युगामध्यें अवतार घेत असतों ॥ ८ ॥

आतां कशाकरितां मी जन्म घेत असतों तें सांगतों. सन्मार्गानें चालणाऱ्या लोकांचें रक्षण व्हावें, पाप करणाऱ्या लोकांचा नाश व्हावा आणि धर्माचें चांगल्या रीतीनें स्थापन व्हावें एतदर्थ ( ह्मणजे ह्या तीन कार्यांकरितां ) मी प्रत्येक युगामध्यें उत्पन्न होत असतों ८.

( भाष्यकारांनीं " किं च " असें ह्मणून धर्मसंस्थापना हें तिसरें ईश्वराच्या अवताराचें कारण दर्शविलें आहे. परंतु, मधुसूदनसरस्वतींना तें न रुचून त्यांनीं " तदुभयं कथं स्यादिति तदाह धर्मसंस्थापनार्थाय० " असें भाष्यविरुद्ध व्याख्यान केलें आहे. ह्याप्रमाणें व्याख्यान केलें असतां श्लोकाचा अर्थ " सन्मार्गानें वागणाऱ्या लोकांचें रक्षण व्हावें आणि पापी लोकांचा नाश व्हावा एतदर्थ धर्मसंस्थापना करण्याकरितां मी अवतार धारण करितों " असा होतो. परंतु, हें मधुसूदनसरस्वतींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, नुसती धर्मसंस्थापना केल्यानें सज्जनांचें रक्षण आणि पापी लोकांचा नाश होण्याचा संभव नाहीं. एक धर्मसंस्थापना केल्यानें हीं दोन कार्यें जर अपोआप

होण्याचा संभव असता तर गीता वगैरेचा उपदेश करूनच श्रीकृष्ण स्वस्थ बसले असते ; परंतु, त्यांनीं तसें केलें नाहीं. उपदेशाच्या योगानें त्यांनीं धर्माची स्थापना केली, युधिष्ठिरप्रभृति सन्मार्गवर्ती लोकांचें रक्षण केलें आणि कंसप्रभृति दुर्जनांचा नाश केला. सारांश, नुसत्या गीतेचा उपदेश करून धर्मसंस्थापना केल्यानें काम भागलें नाहीं. दुष्टांचा वध आणि सज्जनांचें रक्षण हीं दोन्हीं कार्यें त्यांना वेळोंवेळीं करावीं लागलीं आहेत. उदाहरणार्थः— कंस, शिशुपाल इत्यादि दुष्टांचा वध भगवानांनीं प्रत्यक्ष केला आहे. घटोत्कच राक्षस महापापी असल्यामुळें त्याचा वध भगवानांना कर्तव्य होता आणि सन्मार्गानें वागणाऱ्या अर्जुनाचें रक्षणही कर्तव्य होतें. परंतु, ह्या दोन्हीं गोष्टी भगवानांनीं एकाच प्रसंगांत साधून घेतल्याचें प्रसिद्ध आहे. तो इतिहास असा:– कर्ण कवचकुंडलासहवर्तमानच उत्पन्न झालेला होता आणि ह्मणून त्याचा वध होणें फारच दुर्घट असून अर्जुनाशीं तर तो विरोधभावानें वागत होता. हा प्रकार लक्ष्यांत आणून इंद्रानें कर्णापाशीं त्या स्वाभाविक कवचकुंडलांची याचना केली व सूर्यानें कर्णाला स्वतःचीं कवच कुंडलें इंद्राला न देण्याविषयीं पूर्वीं सुचविलें असतांही कर्णानें तीं इंद्राला देऊन टाकिलीं. तेव्हां इंद्रानें प्रसन्न होऊन कर्णाला एक शक्ति दिली होती व " ही शक्ति तूं ज्या शत्रूवर टाकशील त्या एका शत्रूचा वध होईलच " असें त्याला सांगितलें होतें. ती वासवी शक्ति अर्जुनाच्या वधाकरितां कर्णानें राखून ठेविली होती आणि कसाही प्रसंग आला तरी इतरावर तिचा प्रयोग करावयाचाच नाहीं असा अगदीं त्यानें निश्चयच केलेला होता. तेव्हां कर्णापासून अर्जुनाचें रक्षण कसें व्हावें ही भगवानांना मोठी काळजी पडली होती; त्या काळजीचें निवारण जयद्रथवधाच्या दिवशीं झालें. त्या दिवशीं कौरवपांडवांमध्यें रात्रीं युद्ध झालें आणि त्या युद्धांत पांडवांकडील योद्धा भीमसेनपुत्र घटोत्कच यानें कौरवसैन्याचा फारच नाश केला. तेव्हां आपण ह्या घटोत्कचाच्या हातून वाचत नाहीं असें

कौरवपक्षीयांना वाटून त्यांनीं वासवी शक्ति घटोत्कचावर टाकण्याविषयीं कर्णाची प्रार्थना केली व त्यानें जरी प्रथमतः ती घटोत्कचावर न टाकण्याविषयीं पुष्कळ आढेवेढे घेतले तरी " आज जर ह्या घटोत्कचाच्या हातून जिवंत सुटलों तर पुढें अर्जुनाचा वध करण्याला आपण शिलक राहणार; परंतु, आज ह्या राक्षसाच्या हातून सुटका होण्याचा संभव दिसत नाहीं " असें कर्णाला वाटलें व त्यानें शेवटीं वासवी शक्ति घटोत्कचावर टाकून त्याचा वध केला व त्याच्या योगानें श्रीकृष्णांची दोन्हीं कार्यें सिद्धीस गेलीं. पांडवांचें रक्षण व्हावें ह्मणून अश्वत्थाम्याच्या छाप्याचे दिवशीं भगवानांनीं पांडवांपैकीं कोणालाही त्या शिबिरामध्यें राहूं दिलें नाहीं. " उद्यां निष्पांडवी पृथ्वी करीन किंवा मी पडेन अशी भीष्मांनीं प्रतिज्ञा केली असतां पांडवांचें रक्षण व्हावें ह्मणून भगवानांनीं भीष्मांना दुसरीच गोष्ट करण्याचें भाग पाडिलें. शत्रूचा हा बाण अर्जुनाला लागला असतां अर्जुनाचा वध होईल असें समजून भगवानांनीं रथावर भार घालून शत्रूचें शरसंधान चुकाविलें. भीष्मांशीं युद्ध चाललें असतांना अर्जुनाला भीष्म मारणार असें वाटूनच कीं काय कोण जाणें अर्जुनाचें रक्षण होण्याकरितां भगवान् रथाखालीं उडी टाकून भीष्मावर धांवले. जरासंध गदा घेऊन युद्धामध्यें उभा राहिला असतां पांडवांना जय येण्याचा संभवच नाहीं असें समजून कौरवपांडवांच्या युद्धाचा प्रसंग येण्याचे पूर्वींच भगवानांनीं मोठ्या युक्तीनें जरासंधाचा वध करविला; व शत्रूनें टाकिलेली शक्ति अर्जुनाला निःसंशय मारील असें समजून त्याचें रक्षण होण्याकरितां भगवानांनीं ती आपल्या वक्षःस्थलावर धारण केली. अशीं हजारों उदाहरणें दाखवितां येतील. सारांश, भगवान् उपदेशाच्या द्वारानें नुसती धर्मस्थापनाच करून राहिले नाहींत. दुष्टांचा वध व सज्जनांचें रक्षण हीं दोन्हीं कृत्यें त्यांनीं शेंकडों वेळां प्रत्यक्ष केल्याचें इतिहासप्रसिद्ध आहे आणि ह्मणूनच मधुसूदनसरस्वतींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

---

**तज्जन्म कर्म च०सोऽर्जुन ॥ ९ ॥ जन्म मायारूपं कर्म च साधु-**

---

सर्वस्वीं त्याज्य आहे. श्रीधरस्वामींनीं " साधुरक्षणेन दुष्टवधेन च धर्मं स्थिरीकर्तुं युगे युगे तत्तदवसरे संभवामीत्यर्थः " असें ह्या श्लोकाचें तात्पर्य काढिलेलें आहे व त्याचा आशय " साधूंच्या रक्षणानें व दुष्टांच्या वधानें धर्म स्थिर करण्याकरितां मी प्रत्येक युगामध्यें समय पाहून अवतार धारण करीत असतों " असा आहे. परंतु, हें भाष्य-विरुद्ध तात्पर्य बरोबर नाहीं. कारण, केवल वसुदेव, पांडव इत्यादिकां-सारख्यांचें रक्षण केल्यानें आणि कंसादिकासारख्यांचा वध केल्यानें धमस्थापना कधींही होणार नाहीं. ह्या दोन गोष्टींनींच जर धर्मस्थापना होत असती तर धर्मसंस्थापनेकरितां भगवानांना व्यासरूपानें अवतीर्ण होण्याचें प्रयोजनच नव्हतें. व्यासादि महर्षींनीं हातांत शस्त्र घेऊन दुष्टांचा वध व सज्जनांचें रक्षण केलेलें नाहीं आणि धर्मसंस्थापनेकरितां त्यांचा अवतार झाला हें तर प्रसिद्ध आहे. वेदव्यासासारख्या महर्षींनीं धर्मस्थापनेकरितां जर इतिहास, पुराणें, स्मृत्या, सूत्रें इत्यादि ग्रंथ प्रणीत करून ठेविले नसते तर चातुर्वर्ण्यधर्माचें स्थैर्य कसें राहिलें असतें हें एक श्रीधरस्वामींनाच ठाऊक. असो. सज्जनरक्षण, दुर्जननाश आणि धर्मसंस्थापन ह्यांपैकीं कधीं कधीं एकाकरितां, कधीं कधीं दोहोंकरितां आणि कधीं कधीं ह्या तिन्ही गोष्टी करण्याकरितां ईश्व-राचा अवतार होतो ही गोष्ट सिद्ध आहे व ह्मणूनच श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध तात्पर्य त्याज्य आहे ८. )

हे अर्जुना, माझा जन्म व माझें दिव्य कर्म जो ह्याप्रमाणें खरें खरें जाणतो त्याला देहत्यागानंतर पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं ; परंतु, तो मला येऊन मिळतो ॥ ९ ॥

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

---

परित्राणादि मे मम दिव्यमप्राकृतमैश्वरमेवं यथोक्तं यो वेत्ति तत्त्वतस्तत्त्वेन यथावत्त्यक्त्वा देहमिमं पुनर्जन्म पुनरुत्पत्तिं नैति न प्राप्नोति मामेत्यागच्छति स मुच्यते हेर्जुन ॥ ९ ॥

नैष मोक्षमार्ग इदानीं प्रवृत्तः किं तर्हि पूर्वमपि वीतरागभयक्रोधा० मद्भावमागताः ॥ १० ॥ वीतरागभयक्रोधा रागश्च भयं च क्रोधश्च वीता विगता येभ्यस्ते वीतरागभयक्रोधा मन्मया ब्रह्मविद ईश्वराभेददर्शिनो मामेव परमेश्वरमुपाश्रिताः केवलज्ञाननिष्ठा इत्यर्थः । बहवोनेके ज्ञानतपसा ज्ञानमेव च परमात्मविषयं तपस्तेन ज्ञानतपसा पूताः परां

---

हे अर्जुना, माझी मायारूप उत्पत्ति आणि इतरांच्या हातून होण्यास अशक्य व केवल मज ईश्वराच्याच हातून होण्यास शक्य असें माझें साधुपरिपालन वगैरे कर्म जो यथार्थ रीतीनें जाणतो तो ह्या देहाचा त्याग केल्यानंतर पुनरपि जन्मास येत नाहीं. परंतु, तो मलाच येऊन मिळतो; अर्थात् मुक्त होतो ९.

अरे, विषयवासना, भय व क्रोध हीं ज्यांच्यापासून गेलीं आहेत असे माझें अवलंबन करून राहणारे अनेक लोक ज्ञानरूप तपानें शुद्ध होऊन मोक्षाला गेलेले आहेत ॥ १० ॥

अरे, हा मोक्षमार्ग आतांच प्रचारांत आला आहे असें नसून हा पूर्वीपासूनच चालत आलेला आहे. कारण, राग, भय आणि क्रोध हीं ज्यांच्यापासून नाहींशीं झालीं आहेत असें जे वीतरागभयक्रोध, मद्रूप बनलेले ह्मणजे ब्रह्मवेत्ते अर्थात् ईश्वरामध्यें आणि आपणामध्यें भेद न मानणारे आणि माझेच ह्मणजे परमेश्वराचेंच अवलंबन करून राहिलेले अर्थात् केवल ज्ञाननिष्ठ असे अनेक लोक ज्ञानतपाच्या योगानें

**शुद्धिं गताः सन्तो मद्भावमीश्वरभावं मोक्षमागताः समनुप्राप्ताः । इतरतपोनिरपेक्षज्ञाननिष्ठा इत्यस्य लिङ्गं ज्ञानतपसेति विशेषणम् ॥ १० ॥**

---

ह्मणजे परमात्मसंबंधीं ज्ञान हेंच कोणी तप त्या तपाच्या योगानें पवित्र ह्मणचे उत्कृष्ट प्रकारें शुद्ध झाल्यामुळें मद्रूप ह्मणजे ईश्वररूप बनलेले आहेत ;अर्थात्, मोक्षप्राप्ति झालेले आहेत. दुसऱ्या तपाची अपेक्षा न धरितां ज्ञानाचेंच अवलंबन करून राहिलेले लोक मुक्त झाले हें दर्शविण्याकरितां ' ज्ञानतपसा पूताः ' असें विशेषण भगवानांनीं दिलेलें आहे १०.

( भाष्यकारांनीं " मन्मयाः " ह्या पदाचें व्याख्यान " ईश्वराभेददर्शिनः " असें केलें असून श्रीधरस्वामींनीं सदहू पदाचें व्याख्यान " मदेकचित्ताः ह्मणजे माझ्याकडेच लक्ष्य असलेले " असें केलें आहे तें बरोबर नाहीं. कारण, ईश्वर अर्जुनाला सांगत आहेत. तेव्हां मन्मय ह्या शब्दाचा अर्थ " ईश्वरमय=ईश्वररूप अर्थात् ईश्वराहून स्वतःला भिन्न न मानणारे " असाच सरळ होतो. ' मदेकचित्ताः ' असें व्याख्यान केलें असतां मयशब्दाचा सरळ अर्थ विनाकारण सोडून द्यावा लागतो. श्रीधरस्वामींनीं " मत्प्रसादलभ्यं यदात्मज्ञानं च तपश्च तत्परिपाकहेतुः स्वधर्मस्तयोर्द्वंद्वैकवद्भावस्तेन ज्ञानतपसा पूताः शुद्धा निरस्ताज्ञानतत्कार्यमलाः सन्तो मद्भावं सायुज्यं प्राप्ता बहवः । " असें ह्या श्लोकांतील उत्तरार्धाचें भाष्यविरुद्ध व्याख्यान केलें आहे व त्याचा आशय " माझ्या प्रसादानें प्राप्त होणारें जें आत्मज्ञान आणि त्या आत्मज्ञानाचा परिपाक होण्याला हेतुभूत जें तप ह्मणजे स्वधर्म त्यांच्या योगानें पवित्र झालेले ह्मणजे अज्ञान आणि त्याचें कार्य एतद्रूप मल ज्यांचा नाहींसा झाला आहे अशा पुष्कळ लोकांना माझी सायुज्यता प्राप्त झाली आहे ". असा आहे; परंतु, श्रीधरस्वामींचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, ' ज्ञानतपसा ' ह्याचा अर्थ समाहार द्वंद्व समास

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ॥
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

---

तव तर्हि रागद्वेषौ स्तो येन केभ्यश्चिदेवात्मभावं प्रयच्छसि न सर्वेभ्य इत्युच्यते ये यथा० पार्थ सर्वशः ॥११॥ ये यथा येन प्रकारेण येन प्रयोजनेन यत्फलार्थितया मां प्रपद्यन्ते तांस्तथैव तत्फलदानेन भजाम्यनुगृह्णाम्यहमित्येतत् । तेषां मोक्षं प्रत्यनर्थित्वात् । न ह्येकस्य मुमुक्षुत्वं फलार्थित्वं च युगपत्संभवति । अतो ये फलार्थिनस्तान्फलप्रदानेन । ये यथोक्तकारिणस्त्वफलार्थिनो मुमुक्षवश्च ताञ्ज्ञानप्रदानेन ये

---

मानून ' ज्ञान आणि स्वधर्मरूप तप ' असा केला असतां ' ज्ञान आणि धर्माचरणरूप कर्म ह्या दोहोंनीं मिळून मोक्षप्राप्ति होते ' असें ठरेल; परंतु, हें सिद्धांताला विरुद्ध आहे. करितां, श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान ग्राह्य करितां येत नाहीं. १० )

जे मला जसे भजतात तसाच मी त्यांच्यावर अनुग्रह करितों ; हे पार्था, सर्व प्रकारांनीं मनुष्य माझ्या मार्गाचें अनुकरण करीत असतात ॥ ११ ॥

आतां ज्या अर्थीं तूं कांहींनाच मोक्ष देतोस आणि सर्वांना देत नाहींस त्याअर्थीं राग आणि द्वेष हे तुझे ठिकाणीं आहेत अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून तिचें निरसन भगवानांनीं ह्या अकराव्या श्लोकांत केलेलें आहे. जे पुरुष जसे—ज्या प्रकारानें = ज्या उद्देशानें = ज्या फलप्राप्तीच्या इच्छेनें—मला भजतात त्यांच्यावर मी तसाच ह्मणजे त्यांनीं इच्छिलेलें फल देण्यानेंच अनुग्रह करितों. कारण, त्यांना मोक्षप्राप्तीची इच्छा नसते. एकाचेच ठिकाणीं एकाच वेळीं मुमुक्षुत्व आणि फलाची इच्छा हीं दोन्ही असण्याचा संभव नाहीं. ह्यास्तव, जे फलेच्छु असतात त्यांच्यावर फलप्रदानरूपद्वारा मी अनुग्रह करितों. जे मुमुक्षु फलाची इच्छा न धरितां शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें

ज्ञानिनः संन्यासिनो मुमुक्षवश्च तान्मोक्षप्रदानेन तथार्तानार्तिहरणेनेत्येवं यथा प्रपद्यन्ते ये तांस्तथैव भजामीत्यर्थः । न पुना रागद्वेषनिमित्तं मोहनिमित्तं वा कंचिद्भजामि । सर्वथापि सर्वावस्थस्य ममेश्वरस्य वर्त्म मार्गमनुवर्तन्ते मनुष्याः। यत्फलार्थितया यस्मिन्कर्मण्यधिकृता ये प्रयतन्ते ते मनुष्या उच्यन्ते हे पार्थ सर्वशः सर्वप्रकारैः ॥ ११ ॥

---

कर्मे करितात त्यांच्यावर मी ज्ञानदानानें अनुग्रह करीत असतों. जे ज्ञानी मुमुक्षु संन्यासी असतात त्यांच्यावर मोक्षज्ञानाच्या द्वारानें मी अनुग्रह करीत असतों आणि त्याचप्रमाणें जे दुःखी असतात त्यांचें दुःख परिहार करण्याच्या द्वारानेंच मी त्यांच्यावर अनुग्रह करीत असतों. सारांश, जे ज्या उद्देशानें मला भजत असतात त्यांच्यावर मी तसाच अनुग्रह करीत असतों. रागद्वेषांमुळें अथवा मोहामुळें मी कोणावरही अनुग्रह करीत नाहीं. तात्पर्य, हे पार्था, कांहीं असलें तरी मनुष्य सर्व प्रकारांनीं माझ्याच मार्गाला अनुसरत असतात. कारण, मी ईश्वरच सर्वांच्या रूपानें स्थित असतों. ह्यांतील मनुष्य शब्दाचा अर्थ " विवक्षित फलप्राप्तीच्या उद्देशानें झटणारे वर्णाश्रमादिकर्माधिकारी " असा आहे ११.

(—' ईश्वर सर्वांनाच मोक्ष देत असेल तर पूर्वीच्या श्लोकांतील " वीतरागभयक्रोधाः, मन्मयाः, मामुपाश्रिताः, ज्ञानतपसा पूताः, व मद्भावमागताः " हीं विशेषणें व्यर्थ होत आणि सर्वांना ईश्वर मोक्ष देत नसून कांहींनाच देतो असें असेल तर त्याचें ठिकाणीं आवडनिवड असल्याचें दिसत आहे आणि ह्मणूनच ईश्वरत्व नसल्याचें स्पष्ट होत आहे. ' असें मनांत आणून " तर मग तुझ्याठिकाणीं आवडानिवडआहे; कारण, असा प्रकार आहे ह्मणूनच तूं सर्वांना मोक्ष न देतां कांहींनाच देत असतोस—अशी कदाचित् अर्जुनाला शंका येईल ती न यावी एतदर्थ

श्रीकृष्ण ह्मणतात–हे अर्जुना, जे मुमुक्षु असतात त्यांना ज्ञानप्राप्तिद्वारा मी मोक्ष देतों आणि जे दुसऱ्या फलांची इच्छा धरून मला भजत असतात त्यांनीं तें फल प्राप्त होण्याचे उपाय केले ह्मणजे त्यांना मी तेंच देत असतों; ह्मणून माझे ठिकाणीं आवडनिवड हा प्रकार नाहीं. हें " तव० मित्येतत् " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां मुमुक्षूंनीं ईश्वराला भजणें योग्य आहे; परंतु, ज्यांना इतर फलाची इच्छा असेल त्यांना ईश्वरालाच भजण्याचें कारण काय ? अशी शंका उपयोगीं नाहीं. कारण, कोणतेंही फल हें ईश्वराधीन असल्यामुळें तें प्राप्त होण्याकरितां फलेच्छु पुरुषांनीं ईश्वराला भजणें आवश्यकच आहे. हा उत्तरार्धांतील आशय होय. आतां जे जे ह्मणून ईश्वराला भजतात त्या सर्वांनाच परमेश्वरानें मुक्ति कां देऊं नये ? अशी शंका कोणी करील; परंतु ती उपयोगीं नाहीं. कारण, जे अभ्युदयाची इच्छा करीत असतात त्यांना मोक्षाची इच्छाच नसते. तेव्हां ज्या उद्देशानें ईश्वरभजन केलेलें नाहीं त्याची प्राप्ति ईश्वरभजनानें होईल कशी ? हें " तेषां मोक्षं प्रत्यनर्थित्वात्। " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. " अभ्युदय होण्याची इच्छा आणि मोक्षप्राप्तीची इच्छा हीं दोन्हीं एकाच पुरुषाचे ठिकाणीं कशावरून संभवणार नाहींत ? इच्छांचे अनेक प्रकार असल्यामुळें एकाद्या पुरुषाचे ठिकाणीं असली मिश्र इच्छाही संभवेल " असें ह्मणतां येणार नाहीं. कारण, मोक्षावांचून कोणत्याही फलाची इच्छा असणें हें बंधाचें कारण आहे आणि बंध व मोक्ष हे अंधकार व प्रकाश ह्यांप्रमाणें परस्परांशीं विरुद्ध आहेत. तेव्हां एकाच ठिकाणीं आणि एकाच वेळीं ज्याप्रमाणें प्रकाश आणि अंधकार असण्याचा संभव नाहीं त्याचप्रमाणें एकाचेच ठिकाणीं मुमुक्षुत्व आणि फलेच्छा एकदम असण्याचा संभव नाहीं. तस्मात्, मुमुक्षु आणि फलेच्छु हे भिन्न भिन्न असल्यामुळें ईश्वराचा अनुग्रहही भिन्न भिन्न प्रकारचा असणार हें उघड आहे. हें " न ह्येकस्य० संभवति " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां नित्य व नैमित्तिक कर्मे करणाऱ्या पुरुषांचे ठिकाणीं फलाची

इच्छा नसून जर मोक्षाची इच्छा असेल तर त्यांच्यावर तुझा अनुग्रह कशा प्रकारचा होईल ? ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, फलाची इच्छा न धरितां मुमुक्षु बनून जे शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्मांचें अनुष्ठान करीत असतात त्यांच्यावर ज्ञानप्रदानानें मी अनुग्रह करीत असतों. सर्व कर्मांचा त्याग करून केवल मोक्षाचीच अपेक्षा करणारे जे ज्ञानी पुरुष असतात त्यांच्यावर मी मोक्षप्रदानानें अनुग्रह करीत असतों आणि त्याचप्रमाणें ज्ञानादि साधन जवळ नसून जे कोणी दुःखी पुरुष केवळ दुःखपरिहार होण्याकरितांच मला भजत असतात त्यांचें दुःख परिहार करणें हाच मी त्यांच्यावर अनुग्रह करीत असतों. सारांश, ज्या उद्देशानें जे पुरुष मला भजत असतात तो उद्देश मी त्यांचा सिद्धीस नेत असतों. हें " अतो ये० भजामीत्यर्थः। " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. भक्ताची जशी इच्छा असेल तसाच मी त्याच्यावर अनुग्रह करीत असतों. राग, द्वेष, मोह इत्यादि प्रकारचें कसलेंही दुसरें कारण माझ्या अनुग्रहाला नाहीं. हा " न पुना राग० भजामि । " ह्या भाष्याचा आशय होय. प्राण्यांना कांहीं फलप्राप्तीची इच्छा असो अथवा मोक्षाची इच्छा असो ती परिपूर्ण होण्याला त्यांनीं मला भजणें आवश्यक आहेच आहे. कारण, अधिकारानुरूप कर्मानुष्ठान करणारे पुरुष कांहीं फलप्राप्तीच्या उद्देशानें इंद्रादि देवतांना भजत असतात. परंतु, इंद्रादि देवतांच्या रूपानें मीच स्थित असल्यामुळें कोणत्याही फलाच्या उद्देशानें कोणत्याही देवतेचें जरी आराधन केलें तरी तें माझेंच आराधन होणार. तात्पर्य, मुमुक्षु अथवा अभ्युदयेच्छु कोणी झाला तरी माझ्याच ज्ञानरूप अथवा कर्मरूप मार्गाचें अवलंबन करूनअसणार. हें " सर्वथापि० मनुष्याः । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. श्लोकामध्यें " मनुष्याः " असें पद आहे तेव्हां मनुष्यांवांचून इतरांना ईश्वराच्या मार्गाला अनुसरून वागण्याचा निषेधच आहे कीं काय ? अशी शंका कोणाला येईल ह्मणून भाष्यकारांनीं " यत्फलार्थितया० उच्यन्ते । " असें ह्मटलें आहे )

काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥१२॥

---

यदि तवेश्वरस्य रागादिदोषाभावस्तदा सर्वप्राणिष्वनुजिघृक्षायां तुल्यायां सर्वफलप्रदानसमर्थे च त्वयि सति वासुदेवः सर्वमिति ज्ञानेनैव मुमुक्षवः सन्तः कस्मात्त्वामेव सर्वे न प्रतिपद्यन्त इति शृणु तत्र कारणं काङ्क्षन्तः० कर्मजा ॥१२॥ काङ्क्षन्तोभिलषन्तः कर्मणां सिद्धिं फलनिष्पत्तिं प्रार्थयन्तो यजन्त इहास्मिँल्लोके देवता इन्द्राग्न्याद्याः । अथ योन्यां देवतामुपास्तेन्योसावन्योहमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानामिति श्रुतेस्तेषां हि भिन्नदेवतायाजिनां फलाकाङ्क्षिणां

---

( इतर लोक सुद्धां माझ्या मार्गाला अनुसरून वागत असतात आणि तूं माझा संबंधी असूनही मला अनुसरून वागत नाहींस. हें मोठें आश्चर्य आहे. असें सुचविण्याकरितां अर्जुनाला उद्देशून भगवानांनीं " पार्थ " हें संबोधन योजिलें आहे ११. )

कर्मफलाची इच्छा धरणारे पुरुष इहलोकीं देवतांचें यजन करीत असतात. कारण, मनुष्यलोकामध्यें कर्माचें फल सत्वर येत असतें ॥ १२ ॥

आतां रागादि दोषांचा अभाव असल्यामुळें अनुग्रहाची इच्छा सर्व प्राण्यांविषयीं जर तुज इश्वराची सारखीच आहे आणि सर्व फल देण्याला जर तूं समर्थ आहेस तर " वासुदेवच सर्व कांहीं आहे " असें समजूनच सर्व लोक केवल मोक्षाचीच अपेक्षा धरून तुझाच कां आश्रय करीत नाहींत ? " ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, ह्याचें कारण, काय तें ऐक. कर्मफलप्राप्तीची इच्छा करणारे लोक इहलोकीं इंद्र, अग्नि इत्यादि देवतांचें पूजन करीत असतात. हा भिन्न आणि मी भिन्न अशा समजुतीनें जो आत्म्याशिवाय इतर देवतेची उपासना करीत असतो तो अज्ञानी असून पशूप्रमाणें देवांना उपयोगी पडतो

**क्षिप्रं शीघ्रं हि यस्मान्मानुषे लोके मनुष्यलोके हि शास्त्राधिकारः। क्षिप्रं हि मानुषे लोक इति विशेषणादन्येष्वपि कर्मफलसिद्धिं दर्शयति भगवन्। मानुषे लोके वर्णाश्रमादिकर्माणीति विशेषः। तेषां च वर्णाश्रमाद्यधिकारिणां कर्मणां फलसिद्धिः क्षिप्रं भवति कर्मजा कर्मभ्यो जाता ॥ १२ ॥**

---

अशी श्रुति आहे. सारांश, ज्याअर्थीं आत्मभिन्न देवतेची उपासना करणाऱ्या फलाभिलाषी पुरुषांना मनुष्यलोकामध्यें कर्मफलाची प्राप्ति सत्वर होते त्याअर्थीं मोक्षमार्गापासून ते विमुख होत असतात. शास्त्राधिकार मनुष्यलोकामध्येंच आहे. मनुष्यलोकामध्यें कर्मफल सत्वर प्राप्त होतें असें विशेषतः सांगितलें आहे ह्यावरून इतर लोकांमध्येंही कर्मफल प्राप्त होत असल्याचें भगवानांनीं दर्शविलें आहे. वर्णाश्रमादिकर्माचा अधिकार ही गोष्ट मनुष्यलोकामध्यें विशेष आहे. ह्यामुळें वर्णाश्रमादिकांचा ज्यांना अधिकार आहे अशा लोकांच्या कर्मांचें फल मनुष्यलोकामध्यें सत्वर येतें. कर्मजा ह्मणजे कर्मापासून उत्पन्न झालेली १२.

( " लोक ज्या मार्गाला अनुसरून वागणारे असतील त्याप्रमाणें परमेश्वर त्यांच्यावर अनुग्रह करीत असतो. अनुग्रह करण्यामध्यें आवडनिवड हा प्रकार ईश्वराचे ठिकाणीं नाहीं. असें जर असेल तर आवडनिवड नाहीं ह्यावरूनच अनुग्रह करण्याची इच्छा सर्व प्राण्यांसंबंधानें ईश्वराचे ठिकाणीं सारखीच असणार आणि ती जर सारखी आहे तर भगवानाला अल्प फल देण्याचें सामर्थ्य आहे आणि मोक्षसंज्ञक महाफल देण्याचें सामर्थ्य नाहीं असें ह्मणणें योग्य नव्हे. तेव्हां, ज्ञान, इच्छा आणि क्रियासामर्थ्य हीं ज्याचे ठिकाणीं अप्रतिहत आहेत त्या तुला कोणतेंही फल देण्याचें सामर्थ्य आहेच आहे. ह्यास्तव, अनुग्रहाची इच्छा वर सांगितल्याप्रमाणें तुझे ठिकाणीं सारखीच असतांना आणि कोणतेंही फल देण्याचें सामर्थ्य तुला असतांना सर्वही लोक

अभ्युदयरूप जें तुच्छ फल त्याची आशा न धरितां मोक्षाचीच अपेक्षा धरून ज्ञानमार्गानें तुझाच कशा करितां आश्रय करीत नाहींत?'' असें विचारशील तर, हे अर्जुना, अभ्युदयरूप कर्मफलाची इच्छा करणाऱ्या लोकांना मोक्षाची अपेक्षा नसते आणि ह्मणूनच मोक्षप्राप्तीचा उपाय जें ज्ञान त्यापासूनही ते पराङ्मुख असतात आणि ह्मणूनच त्यांना मोक्षप्राप्ति होत नाहीं. आपली अभ्युदयविषयक इच्छा तृप्त होण्याकरितां ते इंद्रादि देवतांचें इहलोकीं पूजन करीत असतात. कारण, इहलोकीं देवतापूजन केलें असतां कर्मफलाची प्राप्ति लवकर होते. हें " यदि तवेश्वरस्य ० कारणम् । " ह्या अवतरण भाष्याचें व श्लोकाचें तात्पर्य होय. अभ्युदयरूप कर्मफलाची इच्छा धरणारे पुरुष पूज्य व पूजक हे भिन्न भिन्न आहेत असें समजत असतात; परंतु, आत्म्याच्या अज्ञानामुळेंच ही त्यांची समज झालेली असते. कारण, " मी वेगळा आणि मला फल देणारा देव वेगळा अशा समजुतीनें जो आत्म्याहून भिन्न देवतेची उपासना करीत असतो त्याला आत्मज्ञान नसतें. ह्यामुळें एकादा पशु ज्याप्रमाणें नांगर ओढणें वगैरे प्रकारानें आमच्या उपयोगीं पडतो त्याचप्रमाणें तो अज्ञानी पुरुष यागादिकांच्या योगानें देवांच्या उपयोगीं पडतो. " अशी बृहदारण्यक श्रुति आहे हें " अथ योन्यां० श्रुतेः । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. ' अन्य देवतेची उपासना करणारे ते फलाभिलाषी पुरुष ज्ञानमार्गाची अपेक्षा कां धरीत नाहींत ? ' असें विचारशील तर, हे अर्जुना, वर्णाश्रमकर्माधिकारी पुरुषांना मनुष्यलोकामध्यें ज्याअर्थी कर्मफलाची सिद्धि सत्वर होते त्याअर्थी मोक्षमार्गापासून ते विमुख असतात. हें " तेषां हि० मानुषे लोके । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. " मानुषे लोके " हीं पदें घालण्याचें कारण काय ? अशी कोणाला शंका येईल तिचें निरसन व्हावें एतदर्थ " मनुष्यलोके हि शास्त्राधिकारः " असें भाष्यकारांनीं लिहिलें आहे व " वर्णाश्रमादिविभागविषयक शास्त्राप्रमाणें कर्म

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

---

**मानुष एव लोके वर्णाश्रमादिकर्माधिकारो नान्येषु**

---

करण्याचा अधिकार मनुष्यलोकामध्येंच आहे " हें त्या ह्मणण्याचें तात्पर्य आहे. आतां " शास्त्राधिकार जर मनुष्यलोकामध्येंच आहे तर मनुष्यलोकाशिवाय इतर लोकांमध्यें कर्मफलाची सिद्धि होत नाहीं कीं काय ? " अशी शंका येईल ती न यावी एतदर्थ ' क्षिप्रं हि मानुषे लोके ' असें भगवानांनीं सांगितलें आहे आणि ह्या पदांवरूनच " इतर लोकांमध्येंही कर्मफलसिद्धि होतेच ; परंतु मनुष्यलोकामध्यें ती सत्वर होते " असें भगवानांनीं दर्शविल्याचें सिद्ध होत आहे. हें क्षिप्रं हि० भगवान् । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. आतां मनुष्यलोकामध्यें कर्मफलाची सिद्धि सत्वर होते आणि इतर लोकांमध्यें तिला विलंब लागतो, असा प्रकार असण्याचें कारण इतकेंच कीं वर्णाश्रमादिकर्माधिकार इतर लोकांपेक्षां मनुष्यलोकामध्यें विशेष आहे. तेव्हां सत्वर फलप्राप्तीचें साधन मनुष्यलोकांत असल्यामुळें ह्या ठिकाणीं कर्मफलाची सिद्धि सत्वर होते आणि इतर लोकांमध्यें तें साधन नसल्यामुळें कर्मफलसिद्धि होण्यास विलंब लागतो. हें "मानुषे लोके वर्णाश्रमादिकर्माणीति विशेषः । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. सारांश, मनुष्यलोकामध्यें कर्मफलाची सिद्धि सत्वर होत असते. ह्यास्तव, कर्मफलाभिलाषी पुरुष प्रायः ज्ञानमार्गापासून पराङ्मुख असतात. हें " तेषां० भवति । " ह्या भाष्याचें तात्पर्य होय १२ )

गुणकर्मव्यवस्थापूर्वक चारी वर्ण मीं उत्पन्न केले आहेत आणि अशा प्रकारें मायेनें जरी मी त्यांचा कर्ता आहें तरी वस्तुतः मी कर्ता नाहीं आणि ह्मणूनच संसारीही नाहीं असें तूं समज ॥ १३ ॥

" मनुष्यलोकामध्येंच वर्ण, आश्रम इत्यादिकांना अनुलक्षून कर्माचा

लोकेष्विति नियमः किंनिमित्त इति । अथवा वर्णाश्रमादिप्रविभागोपेता मनुष्या मम वर्त्मानुवर्तन्ते सर्वश इत्युक्तं कस्मात्पुनः कारणान्नियमेन तवैव वर्त्मानुवर्तन्ते नान्यस्येत्युच्यते चातुर्वर्ण्यं० मव्ययम् ॥ १३ ॥ चातुर्वर्ण्यं चत्वार एव वर्णाश्चातुर्वर्ण्यं मयेश्वरेण सृष्टमुत्पादितं ब्राह्मणोस्य मुखमासीदित्यादिश्रुतेः । गुणकर्मविभागशो गुणविभागशः कर्मविभागशश्च । गुणाः सत्त्वरजस्तमांसि तत्र सात्त्विकस्य सत्त्वप्रधानस्य ब्राह्मणस्य शमो दमस्तप इत्यादीनि कर्माणि सत्त्वोपसर्जनरजःप्रधानस्य क्षत्रियस्य शौर्यतेजःप्रभृतीनि कर्माणि तमउपसर्जनरजःप्रधानस्य वैश्यस्य कृष्यादीनि कर्माणि रज-

---

अधिकार आहे इतर लोकांमध्यें नाहीं. असा नियम कशाकरितां आहे ? असा—किंवा वर्णाश्रमादिव्यवस्थेनें युक्त असलेले पुरुष सर्व प्रकारांनीं माझ्या मार्गाला अनुसरून वागत असतात असें सांगितलें आहे; परंतु, ते तुझ्याच मार्गाला अनुसरून वागत असतात आणि इतराचा मार्ग स्वीकारित नाहींत ह्या नियम असण्याचें कारण काय " असा—अर्जुन प्रश्न करील ह्मणून भगवान् सांगतातः—चातुर्वर्ण्य ह्मणजे ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे ) चारच वर्ण मीं ईश्वरानें उत्पन्न केले आहेत. ब्राह्मणजाति परमेश्वराच्या मुखापासून झाली, अशी श्रुति (भगवानांच्या ह्मणण्याला प्रमाण) आहे. चार वर्ण कसे उत्पन्न केले ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, गुणकर्मविभागानें ह्मणजे गुणविभागानें आणि कर्मविभागानें ते मीं उत्पन्न केले. गुण ह्मणजे सत्व, रज आणि तम. ह्या वर्णांमध्यें सात्विक, ह्मणजे सत्वगुण ज्याचे ठिकाणीं प्रधान आहे अशा, ब्राह्मणाचीं शम, दम, तप इत्यादि कर्में होत; सत्वमिश्रित रजोगुणाचें प्राधान्य ज्याचे ठिकाणीं आहे अशा क्षत्रियाचीं शौर्य, तेज वगैरे कर्में होत; तमोगुणामिश्रित रजोगुणाचें प्राधान्य ज्याचे ठिकाणीं आहे अशा वैश्याचीं कृषि वगैरे कर्में होत

**उपसर्जनतमःप्रधानस्य शूद्रस्य शुश्रूषैव कर्मेत्येवं गुणकर्मविभागशश्चातुर्वर्ण्यं मया सृष्टमित्यर्थः । तच्चेदं चातुर्वर्ण्यं नान्येषु लोकेष्वतो मानुषे लोक इति विशेषणम् । हन्त तर्हि चातुर्वर्ण्यस्य सर्गादेः कर्मणः कर्तृत्वात्तत्फलेषु युज्यमेतो न**

---

आणि रजोगुणमिश्रित तमोगुणाचें प्राधान्य ज्याचे ठिकाणीं आहे अशा शूद्राचें शुश्रूषा हेंच कर्म होय. ह्याप्रमाणें गुणकर्मविभागानें चार वर्ण मीं उत्पन्न केले हा पूर्वार्धाचा अर्थ होय. परंतु, ते हे चार वर्ण इतर लोकांमध्यें नाहींत ह्मणून (मागल्या श्लोकांत) "मानुषे लोके" असें ह्मटलें आहे. ( सारांश, मनुष्यलोकामध्येंच ईश्वरानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण व आश्रम वगैरे उत्पन्न केले असल्यामुळें वर्णाश्रमादिपूर्वक कर्मांचा अधिकार मनुष्यलोकामध्येंच आहे; इतर लोकांमध्यें नाहीं. कारण, इतर लोकांमध्यें वर्णादिकांचाच जर अभाव आहे तर वर्णाश्रमादिकांना अनुलक्षून विहित असलेल्या कर्मांचा अधिकार तेथें कोठून असणार ? तेव्हां वर्णाश्रमादिविषयक कर्मांचा अधिकार मनुष्यलोकामध्येंच आहे आणि इतर लोकांमध्यें नाहीं असा नियम कां असावा? ही शंका उरत नाहीं आणि त्याचप्रमाणें वर्ण व आश्रम हे ईश्वरानें उत्पन्न करून त्या त्या वर्णाला व आश्रमाला उद्देशून तीं तीं कर्मेंही जर ईश्वरानेंच लावून दिलीं आहेत तर वर्णाश्रमादिविभागव्यवस्था ज्यांच्यामध्यें आहे असे अधिकारी ईश्वरानेंच घालून दिलेल्या मार्गाचेंच अवलंबन करून असणार हें उघड आहे. तस्मात्, वर्णाश्रमादिविभागव्यवस्थेनें संबद्ध असलेले लोक इतराच्या मार्गाचें अवलंबन न करितां ईश्वरानेंच घालून दिलेल्या मार्गाचेंच अवलंबन कां करितात हीही शंका रहात नाहीं. " तर मग चार वर्ण उत्पन्न करणें ह्या कर्माचें कर्तृत्व जर तुझ्याकडे आहे तर त्या कर्माचें फलही तुझ्याकडे असलेंच पाहिजे. तस्मात्, कर्तृत्व आणि फलभोक्तृत्व

**त्वं नित्यमुक्तो नित्येश्वर इत्युच्यते। यद्यपि मायासंव्यवहारेण तस्य कर्मणां कर्तारमपि सन्तं तथापि मां परमार्थतो विद्ध्यकर्तारमत एवाव्ययमसंसारिणं च मां विद्धि ॥ १३ ॥**

---

जर तुझ्याकडे आहे तर तूं नित्यमुक्त आणि नित्येश्वर नाहींस " असें ह्मणशील तर, हे अर्जुना, ह्याचें उत्तर सांगतों. अरे, मायेमुळें जरी मी त्या कर्माचा कर्ता आहें तरी वस्तुतः मी कर्ता नाहीं आणि ह्मणूनच व्ययुक्त ह्मणजे संसारीही मी नाहीं असें तूं समज १३.

( " शरीरारम्भकगुणवैषम्यादपि न सर्वे समानस्वभावा इत्याह " असें अवतरण मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाला दिलें आहे व त्याचा अर्थ " शरीरोत्पादक गुणांमध्यें वैषम्य असल्यामुळें सर्व वर्णांचे स्वभाव सारखे नाहींत असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे " असा आहे; परंतु, शरीरारंभक गुणांमध्यें वैषम्य असल्यामुळेंच चारी वर्णांचे स्वभाव भिन्न भिन्न झालेले आहेत असें जर भगवानांना सांगावयाचें असतें तर " चातुर्वर्ण्यं समुत्पन्नं गुणकर्मविभागशः " येवढें ह्मणण्यानेंच काम झालें असतें. " मया सृष्टं " असें जें त्यांनीं ह्मटलें आहे तें ह्मणण्याचें कारणच पडलें नसतें. तस्मात्, मधुसूदनसरस्वतींचें भाष्यविरुद्ध अवतरण बरोबर नाहीं. श्रीधरस्वामींनीं 'अव्ययम्' ह्या पदाचा अर्थ 'निर्विकार=ज्याचा मोठेपणा कधींही कमी होत नाहीं=जो संसारी नाहीं' असा भाष्यकारांना अभिमत असल्याप्रमाणें न करितां " आसक्तिराहित्येन श्रमरहितं ह्मणजे फलाविषयीं आसक्ति नसल्यामुळें श्रमरहित " असा केला आहे; परंतु तो बरोबर नाहीं. कारण, फलासक्ति नसणें हें जर श्रमराहित्याचें कारण असेल तर निष्काम कर्म करणाऱ्या पुरुषांना श्रम होऊं नयेत; परंतु, कसल्याही फलाची इच्छा न धरितां ईश्वरप्रीत्यर्थ यात्रा वगैरे करीत हिंडणाऱ्या पुरुषांना थकवा येत नाहीं असें दिसत नाहीं. तस्मात्, श्रीधरस्वामींचें "अव्ययम्" ह्या पदाचें भाष्यविरुद्ध व्याख्यान त्याज्य आहे.)

( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण परमेश्वरानें प्रथम उत्पन्न केले. ब्राह्मणादि वर्णांचे ठिकाणीं सत्वादि गुणांचें प्राधान्य त्यानें ठेविलें आणि शम, दम वगैरे कर्मेंही त्या त्या वर्णाला ईश्वरानेंच लावून दिलीं. सारांश, वर्णाश्रमव्यवस्था ईश्वरानेंच उत्पन्न केलेली आहे, असें ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें तात्पर्य स्पष्ट आहे; परंतु, ह्याच पूर्वार्धाचा आधार देऊन कांहीं आधुनिक लोक वर्णव्यवस्था जन्मावर अवलंबून नसून त्या त्या व्यक्तीचे ठिकाणीं आढळून येणाऱ्या गुणांवर अवलंबून आहे असें ह्मणत असतात व त्या आपल्या ह्मणण्याला विश्वामित्राचें उदाहरण देत असतात. करितां, त्यांनीं डोळे उघडून ह्या श्लोकांतील ‘ मया सृष्टम् ’ ह्या पदांकडे लक्ष्य द्यावें. सदहू पदांचा विचार केला ह्मणजे वर्णव्यवस्था ईश्वरानें मानवांच्या बुद्धीवर अवलंबून ठेविलेली नाहीं हें स्पष्ट होत आहे. मन्वादिप्रभृति महर्षींनींही वर्णव्यवस्था जन्मानंतर व्यक्तीचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या गुणकर्मांवर अवलंबून आहे असें न सांगतां ती जन्मावरच अवलंबून आहे असें ह्मटलें आहे.

**सर्ववर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु ।**
**आनुलोम्येन संभूता जात्या ज्ञेयास्त एव ते ॥ ५ ॥**

असें मनुस्मृतींतील दहाव्या अध्यायांत सांगितलें आहे व त्याचा अर्थ— कोणत्याही वर्णामध्यें असो, परपुरुषसंबंधरहित अशा विवाहित स्त्रीचे ठिकाणीं त्याच वर्णाच्या पुरुषापासून उत्पन्न झालेले मातापितरांच्याच जातीचे असें समजावें— असा आहे. ह्या ठिकाणीं आनुलोम्येन असें पद आहे. त्याचा उपयोग ह्या वचनांत चांगलासा होत नसून पुढल्या वचनांत करावा असें टीकाकार कुल्लूकभट्ट ह्मणतात. त्याप्रमाणें सदहू पदाचा विनियोग समजावा अथवा विद्वज्जनांना योग्य दिसत असल्यास आनुलोम्येन ह्या पदाचा अर्थ—सरळ रीतीनें ह्मणजे अधिक वयाच्या पतीपासून कमी वयाच्या स्त्रीचे ठिकाणीं अशा रीतीनें—असा करावा. याज्ञवल्क्यमुनींनींही “ सवर्णेभ्यः सवर्णासु जायन्ते हि सजातयः । ”

ह्या वचनांत विवाहित स्त्रीचे ठिकाणीं त्याच वर्णाचे पुरुषापासून त्याच वर्णाचीं अपत्यें उत्पन्न होतात असें सांगितलें आहे. तेव्हां वर्णव्यवस्था जन्मावरच अवलंबून आहे ही गोष्ट अबाधित आहे. दुसऱ्या अध्यायांतील शेहेचाळिसाव्या श्लोकाचें व्याख्यान करितेवेळीं सूतसंहितेंतील

**सर्वेषां जन्मना जातिर्नान्यथा कर्मकोटिभिः ।**
**पश्वादीनां यथा जातिर्जन्मनैव न चान्यथा ॥**

असें जें वचन मराठी तात्पर्यासह दिलें आहे तेंही ह्यासंबंधानें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. मनुस्मृतींतील वचनांत ' अक्षतयोनिषु ' असें पद आहे; त्यावरून पुनर्विवाहित स्त्रीचे ठिकाणीं त्याच वर्णाच्या दुसऱ्या पतीनें उत्पन्न केलेली संतति त्याच जातीची होईल किंवा नाहीं ह्याचा नीट खुलासा होत नाहीं; परंतु, ब्राह्मणादि तीन वर्णांमध्यें स्त्रीचा पुनर्विवाह निषिद्ध असल्यामुळें ह्या तीन वर्णांपैकीं एकाद्या धर्मबाह्यानें विवाहित स्त्रीशीं पुनर्विवाह करून तिचे ठिकाणीं संतति उत्पन्न केली असतां ती संतति जातीनें शूद्रधर्मी होते, असें देवलस्मृतींतील वचनावरून उघड होत आहे.

**द्वितीयेन तु यः पित्रा सवर्णायां प्रजायते ।**
**अवावट इति ख्यातः शूद्रधर्मा स जातितः ॥**

असें तें वचन असून त्याचा अर्थ—दुसऱ्या पित्यानें सवर्णस्त्रीचे ठिकाणीं उत्पन्न केलेली जी संतति तिला अवावट अशी संज्ञा असून ती जातीनें शूद्रधर्मी होय—असा आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण ब्रह्मदेवानें सृष्टीचे आरंभीं उत्पन्न केले आहेत असें श्रुतीमध्यें सांगितलें असून स्मृतींतूनही तसेंच सांगितलेलें आहे.

**लोकानां तु विवृद्ध्यर्थं मुखबाहूरुपादतः ।**
**ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रं च निरवर्तयत् ॥ ३१ ॥**

असें मनुस्मृतींतील पहिल्या अध्यायांत सांगितलेलें आहे आणि सर्व सृष्टीच्या रक्षणार्थ त्या महातेजस्वी ब्रह्मदेवानेंच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य

आणि शूद्र यांना वेगळीं वेगळीं कर्में लावून दिलीं असेंही सदहू अध्यायांतच सांगितलें आहे.

**सर्वस्यास्य तु सर्गस्य गुप्त्यर्थं स महाद्युतिः ।**
**मुखबाहूरुपज्जानां पृथक्कर्माण्यकल्पयत् ॥ ८७ ॥**

ह्या वचनाचा विचार केला असतां सिद्ध असलेल्या वर्णांना वेगळीं वेगळीं कर्में सांगितलीं असल्याचें स्पष्ट होत आहे. सारांश, ज्या वर्णांत ज्याची उत्पत्ति झाली असेल त्यानें कोणतीं कर्में करावीं हें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे. ज्याची ज्या कर्माकडे प्रवृत्ति असेल त्यानें अमुक अमुक वर्णांचा स्वीकार करावा असें शास्त्रांत सांगितलेलें नाहीं. तात्पर्य, सिद्ध वर्णांना अनुलक्षून शास्त्रामध्यें कर्मविधान केलेलें आहे; कर्मप्रवृत्तीला अनुलक्षून वर्णविधान केलेलें नाहीं.

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

असें गीतेंतील अठराव्या अध्यायांत भगवानांनीं सांगितलें आहे व ह्या वचनाचा विचार केला असतांही ब्राह्मणादि वर्णांना उद्देशून कर्मव्यवस्था असल्याचें स्पष्ट होत आहे. कर्मप्रवृत्तीला अनुलक्षून वर्णव्यवस्था असल्याचें दिसत नाहीं. कर्माच्या अभिरुचीप्रमाणें वर्णव्यवस्था मानावी असें जर कांहीं आधुनिकांच्या ह्मणण्याप्रमाणें इष्ट असतें तर

**जीवेदेतेन राजन्यः सर्वेणाप्यनयं गतः ।**
**न त्वेव ज्यायसीं वृत्तिमभिमन्येत कर्हिचित् ॥ ९५ ॥**
**यो लोभादधमो जात्या जीवेदुत्कृष्टकर्मभिः ।**
**तं राजा निर्धनं कृत्वा क्षिप्रमेव प्रवासयेत् ॥ ९६ ॥**
**वरं स्वधर्मो विगुणो न पारक्यः स्वनुष्ठितः ।**
**परधर्मेण जीवन्हि सद्यः पतति जातितः ॥ ९७ ॥**

अशीं वचनें मनुस्मृतीमध्यें असण्याचें कारण नव्हतें.

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।**

**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥**
**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षत्रकर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**
**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥**

ह्या गीतेंतील वचनांत ब्राह्मणादि जातींना अनुलक्षून शमादि कर्मांचें विधान केलेलें आहे. शमादि विशिष्ट कर्मांकडे दिसून येणाऱ्या प्रवृत्तीला अनुलक्षून ब्राह्मणादि वर्णांचें विधान केलेलें नाहीं. सारांश, शम, दम, तप, शौच इत्यादि कर्में ब्राह्मण जातीला विहित आहेत असें सांगितलेलें आहे. शमादि कर्मांकडे ज्याची प्रवृत्ति असेल अथवा शमादि कर्में करण्याची ज्याची इच्छा असेल त्याची ब्राह्मण जाति असें सांगितलेलें नाहीं. तसेंच शौर्य, तेज, धैर्य इत्यादि कर्में क्षत्रिय जातीला विहित आहेत असें सांगितलेलें आहे. ह्या कर्मांकडे ज्याच्या मनाची प्रवृत्ति असेल त्याची क्षत्रिय जाति असें सांगितलेलें नाहीं. त्याचप्रमाणें शेतकी, गोरक्षण व दुकानदारी हीं कर्में वैश्य जातीचीं आहेत असें सांगितलें आहे; शेतकी वगैरेकडे ज्यांची प्रवृत्ति असेल त्यांची जाति वैश्य समजावी असें सांगितलें नाहीं आणि त्याचप्रमाणें शूद्रजातीला द्विजसेवा विहित आहे असें सांगितलें आहे; सेवाकर्म करण्याकडे ज्याची प्रवृत्ति असेल त्याची जाति शूद्र समजावी असें सांगितलें नाहीं.

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

असें गीतेंतील तिसऱ्या अध्यायांत सांगितलेलें आहे आणि

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**
**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥**

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥**
**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**
**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोपि तत् ॥ ६० ॥**

असें अठराव्या अध्यायांत सांगितलें आहे व तें सांगणें ब्राह्मणादि वर्ण सिद्ध आहेत असें मानिल्यावांचून जुळतच नाहीं. तें कसें जुळत नाहीं तें पहाः—

" स्वधर्माच्या अनुष्ठानांत जरी कांहीं वैगुण्य झालें तरी सुद्धां तो उत्तम प्रकारें आचरिलेल्या परधर्मापेक्षां श्रेष्ठ होय; इतकेंच नव्हे परंतु, परधर्मामध्यें राहून जगण्यापेक्षां स्वधर्मांत राहून मरण पावणें हें श्रेयस्कर आहे. कारण, परधर्म भयंकर आहे ". असें तिसऱ्या अध्यायांतील पस्तिसाव्या श्लोकांत सांगितलें आहे; परंतु, कर्मप्रवृत्तीवर जर जाति अवलंबून असती तर अर्जुनाला उद्देशून भगवानांना असें ह्मणण्याचें प्रयोजनच नव्हतें. कारण, ज्या ज्या कर्माकडे अर्जुनाची प्रवृत्ति होईल ती ती त्याची जातिच झाली असती. ह्या श्लोकांत "स्वधर्मः" असें पद आहे. तेव्हां स्वत्व ह्मणजे जाति जर कर्मप्रवृत्तीवर अवलंबून असती तर स्वधर्म श्रेयस्कर असें ह्मणण्याचें कारणच पडलें नसतें. अठराव्या अध्यायांतील वर दिलेल्या श्लोकांत " स्वे स्वे कर्मणि, स्वकर्मनिरतः, स्वकर्मणा, स्वधर्मः, स्वभावनियतं कर्म, सहजं कर्म, स्वभावजेन, स्वेन कर्मणा " अशीं पदें आहेत त्यांचा अर्थही जाति सिद्ध आहे असें धरिल्यावांचून लागणारच नाहीं. कर्मप्रवृत्तीवर अवलंबून जर जाति असती तर श्रीरामचंद्रांना शंबूकाचा वध करण्याचें कारण नव्हतें.

**कपिलाक्षीरपानेन ब्राह्मणीगमनेन च ।**
**वेदाक्षरविचारेण शूद्रश्चाण्डालतां व्रजेत् ॥**

ह्या श्रुतिवचनामध्यें वेदाक्षरविचारानें शूद्राला चाण्डालत्व प्राप्त होतें

असें सांगितलें. आहे कर्मप्रवृत्तीवर जर जाति अवलंबून असती तर वरील वचनाचा चतुर्थभाग " शूद्रो ब्राह्मणतां व्रजेत् " असा असता.

**वर्णा आश्रमाश्च स्वभावकर्मनिष्ठाः प्रेत्य कर्मफलमनुभूय ततः शेषेण विशिष्टदेशजातिकुलधर्मायुःश्रुतवृत्तवित्तसुखमेधसो जन्म प्रतिपद्यन्ते** अशी स्मृति आहे व तिचा अर्थ—वर्णाश्रमधर्मी पुरुष आपआपल्या वर्णाला व आश्रमाला विहित असलेल्या कर्मांच्या अनुष्ठानाविषयीं जे तत्पर असतात ते मरणानंतर कर्मफलाचा उपभोग घेऊन अवशिष्ट राहिलेल्या कर्मानुशयाच्या योगानें उत्तम देश, जाति, कुल, धर्म, आयुष्य, विद्या, आचरण, द्रव्य, सुख आणि मेधा ह्यांनीं युक्त होऊन जन्मास येतात—असा आहे. ह्यांतील " उत्तम " ह्या विशेषणाचा अन्वय देश, जाति, कुल इत्यादि सर्व विशेष्यांशीं आहे. जाति ही जन्मतःच सिद्ध धरिल्यावांचून ह्या स्मृतीचाही अर्थ नीट लागणार नाहीं.

अमुक अमुक गुणांनीं युक्त असा पुत्र व्हावा अशी ज्याची इच्छा असेल त्यानें अमुक अमुक अनुष्ठान करावें असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलेलें असतें; परंतु, ब्राह्मण पुत्र होण्याची इच्छा असल्यास शूद्रानें अमुक अमुक करावें असें मात्र कोठें सांगितलेलें नसतें. कारण, जाति ही मातापितरांच्या जातीवरच अवलंबून आहे.

जाति कर्मप्रवृत्तीवर अवलंबून असणें संभवनीयच नाहीं. उदाहरणार्थः—एकाद्या शूद्राला पुत्र झाला व त्या पुत्राला द्विजविहित वैदिक कर्मांची इच्छा झाली. तेव्हां कर्मप्रवृत्तीवर जाति अवलंबून आहे असें मानिलें ह्मणजे ह्याच्या मनाची प्रवृत्ति वैदिककर्माकडे आहे ह्मणून हा ब्राह्मण होणार. आतां द्विजत्वसिद्धि आणि वैदिक कर्मांचा अधिकार प्राप्त होण्याला उपनयन हा वैदिक संस्कार अवश्य आहे; परंतु, ह्याला जर ती इच्छा उपनयनसंस्काराच्या परमावधीचा जो काल आहे तो संपल्यानंतर झाली असेल तर हा उपनयनावांचून रहाणार

आणि अर्थातच द्विजत्वसिद्धिच त्याला प्राप्त होणार नाहीं. आतां उपनयनकालावधि संपण्यापूर्वीं ह्याला ब्राह्मण होण्याची इच्छा झाली तरी सुद्धां द्विजत्वसिद्धीला आवश्यक जो वैदिक उपनयनसंस्कार तो ह्याचा होणें असंभवनीय आहे. कारण, **पितैवोपनयेत्पुत्रं** असें धर्मशास्त्र आहे व पित्यानेंच पुत्राचें उपनयन करावें असा त्याचा अर्थ आहे. परंतु, पिता शूद्र असल्यामुळें त्याला उपनयन करण्याचा आधिकार नाहीं. "आतां वैदिक संस्कार करण्याला पिता अनधिकारी झाला असल्यास ब्राह्मण ज्ञातींतीलही मुलाचा उपनयनसंस्कार दुसऱ्या एकाद्या ब्राह्मणाला करितां येतो. तेव्हां ह्या ठिकाणींही तसें करावें ह्मणजे अडचण नाहीं." असें कोणी ह्मणेल तर तेंही जुळत नाहीं. कारण, गर्भाधानापासून ज्याचे संस्कार समंत्रक झाले असतील तोच वैदिककर्माचा अधिकारी होतो आणि उपनयनसंस्कार होण्यालाही तोच योग्य होतो. परंतु, गर्भाधानसंस्कार हा जनक पित्यावांचून दुसऱ्याकडून होण्याचा संभवच नसल्यामुळें व ह्याचा जनक पिता शूद्र असल्यामुळें ह्याचा तो संस्कार वैदिक मंत्रांनीं झालेला नाहीं आणि ह्मणूनच ह्याला द्विजत्वप्राप्ति ह्या जन्मीं होण्याचा संभवच नाहीं. पुत्र उत्पन्न झाल्यावर जातकर्मादि संस्कार करावे लागतात; परंतु, जो द्विज असेल त्याचे ते संस्कार समंत्रक व्हावयाचे असतात व द्विजेतरांना समंत्रक संस्कारांचा अधिकार नाहीं. तेव्हां ब्राह्मणादिवर्णप्राप्ति पुरुषाच्या कर्मप्रवृत्तीवर अवलंबून आहे असें जर मानिलें तर पुत्राची प्रवृत्ति कोणत्या कर्माकडे आहे हें पक्कें समजून येईपर्यंत ब्राह्मण ज्ञातींतील मातापितरांना सुद्धां पुत्राचे जातकर्मादि संस्कार करितां येणार नाहींत आणि संस्कारकालावधि होईपर्यंत पुत्राची निश्चित प्रवृत्ति कोणत्या कर्माकडे आहे हें समजून न आल्यास मातापितर ब्राह्मण असतांनाही त्यांची संतति संस्कारहीनत्वामुळें जातिभ्रष्ट होणार व कांहीं कालानें ब्राह्मण ही जातिच नामशेष होऊन जाणार हें उघड आहे.

मन हें फार चंचल असल्यामुळें त्याची प्रवृत्ति विवक्षित कर्मांचेच ठिकाणीं सारखी राहण्याचा संभव नाहीं. तेव्हां वर्णव्यवस्था कर्मप्रवृत्तीवर अवलंबून मानिली तर एकच व्यक्ति वरचेवर भिन्न भिन्न वर्णांची होऊं लागेल व तसें झालें असतां फारच अनर्थ होईल. स्त्रीची प्रवृत्ति दान, धर्म, व्रत, देवदर्शन, ब्राह्मणभोजन वगैरे कर्मांकडे असून पतीची प्रवृत्ति अगदीं उलट ह्मणजे शूद्रजातीला योग्य अशा कर्मांकडे असल्याचें पुष्कळ ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतें. तेव्हां वर्णव्यवस्था कर्मप्रवृत्तीवर अवलंबून आहे असें मानावयाचें ह्मणजे स्त्री ब्राह्मणवर्णांत राहणार व पति शूद्र होणार. तेव्हां अशा भिन्नवर्णी बनलेल्या जोडप्यापासून झालेली संतति ह्मणजे शूद्रानें ब्राह्मणवर्णांतील स्त्रीचे ठिकाणीं उत्पन्न केलेली संतति धर्मशास्त्रानें चांडाल जातीची होणार हें निर्विवाद आहे आणि वर्णव्यवस्था कर्मप्रवृत्तीवर अवलंबून आहे असें गृहीत धरिलें ह्मणजे आज मित्तीला ब्राह्मणजाति नामशेष झाली असून ह्या जातींतील लोक सर्व चांडाल झाले आहेत हें सहज ठरणार आहे व त्याचप्रमाणें शूद्रजातिही नामशेषच झाली असून त्या जातींतीलही लोक सर्व चांडालच बनले आहेत असें ठरणार आहे. कारण, ब्राह्मणधर्माप्रमाणें वागण्याची स्त्रीची इच्छा आणि शूद्रधर्माप्रमाणें वागण्याची पतीची इच्छा असा प्रकार शूद्रजातींतही पुष्कळ ठिकाणीं आहे. सारांश, स्त्री ब्राह्मणवर्ण बनलेली आणि पति शूद्रच कायम राहिलेला असा प्रकार शूद्रजातींत असल्यामुळें त्यांच्यापासून उत्पन्न झालेली संतति चांडाल जातीची होणार व ब्राह्मणवर्णांतील स्त्रीशीं समागम केल्यानें पतिही चांडाल ठरणार. तात्पर्य, गुणकर्मविभागव्यवस्थेनें चारी वर्णांची उत्पत्ति ईश्वरानेंच केलेली आहे. उत्पन्न झालेल्या मनुष्यांची वर्णव्यवस्था गुणकर्मांवरून ठरविण्याचा अधिकार त्यानें इतरांना दिलेला नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण परमेश्वरानें आपल्या शरीराच्या वेगवेगळ्या स्थानापासून उत्पन्न केले आहेत आणि वर्णव्यतिरिक्त इतर

जाति कांहीं भिन्न भिन्न वर्णांच्या स्त्रीपुरुषापासून उत्पन्न झाल्या असून कांहीं कामधेनु वगैरे पासून उत्पन्न झाल्या आहेत. आतां " कर्मप्रवृत्तीवर जर वर्णव्यवस्था अवलंबून नाहीं तर विश्वामित्र क्षत्रिय असतांना दुसरा जन्म घेतल्यावांचून ब्राह्मण कसा झाला ? " ही शंका उरली, तिचा विचार करूं.

विश्वामित्र आणि परशुराम हे उभयतां कुशिकराजाचे वंशज होत. कुशिकानें ब्राह्मण्य प्राप्त होण्याविषयीं अतिशय तपश्चर्या केली आणि च्यवन भार्गव मुनींची फारच उत्तम रीतीनें सेवा केली. तेव्हां " तुझ्या पुत्राचा पुत्र तुला ब्राह्मणत्व आणील " असा त्या मुनींनीं वर दिला असतां " माझ्या कुलाला ब्राह्मण्य कसें प्राप्त होईल ? " ह्मणून कुशिकानें प्रश्न केला. तेव्हां ते ह्मणाले " हे राजा, भृगुवंशज ऋचीक तुझ्या नातेशीं ह्मणजे गाधीच्या कन्येशीं विवाह करील आणि तिचे ठिकाणीं क्षत्रधर्मानें वागणारा असा ब्राह्मणपुत्र तो उत्पन्न करील व त्याचप्रमाणें विप्रधर्मानें वागणारा असा क्षत्रिय विश्वामित्र तुझ्या कुलामध्यें गाधीचा पुत्र ह्मणून तो अर्पण करील. अशी उलटापालट होण्याला स्त्रिया कारण होतील व **हें सर्व कांहीं ब्रह्मदेवाच्याच आज्ञेनें होईल.** ह्यांत अंतर पडणार नाहीं. सारांश, तुझ्यापासून जो तिसरा पुरुष होईल त्याचे कारकीर्दीत तुह्मांला ब्राह्मण्य प्राप्त होईल ".

असें महाभारतांतर्गत अनुशासनपर्वांतील ५५ व ५६ ह्या अध्यायांत सांगितलेलें आहे व हेंच स्पष्टपणें महाभारतांतर्गत शांतिपर्वांतील ४९ व्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराला पुरातन वृत्तांत ह्मणून कथन केलें आहे.

युद्धांत जय येऊन राज्याभिषेक झाल्यानंतर युधिष्ठिर श्रीकृष्णाकडे गेला असतां श्रीकृष्ण कोणाचें तरी ध्यान करीत आहेत असें त्याला वाटलें व " आपण कोणाचें ध्यान करीत आहां ? " असें युधिष्ठिरानें विचारिल्यानंतर " भीष्म माझें ध्यान करीत आहे; ह्मणून त्याच्याकडे माझें

मन गुंतलें आहे " असें भगवानांनीं युधिष्ठिराला सांगितलें आणि शिवाय ते असेंही ह्मणाले कीं, " हे युधिष्ठिरा, तो भीष्म, भूत, भविष्य आणि वर्तमान हें सर्व जाणीत असून धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहे आणि ह्मणूनच मी मनानें त्याच्याकडे गेलों आहें. हे राजा, तो स्वर्गास गेल्यानंतर ही पृथ्वी चंद्ररहित रात्रीप्रमाणें शून्य होईल. करितां, हे युधिष्ठिरा, तुला जें कांहीं विचारावयाचें असेल तें तूं त्या गंगानंदन भीष्माला विचारून घे. अरे, तो कौरवधुरंधर भीष्म अस्तास गेल्यावर सर्व ज्ञानांचा अस्त होईल ". ह्याप्रमाणें भगवानांनीं सांगितलें असतां युधिष्ठिर त्यांच्यासहवर्तमान भीष्माकडे जावयास निघाला. तेव्हां जातां जातां परशुरामसरोवरापाशीं आल्यावर भगवानांनीं परशुरामांचें चरित्र प्रसंगवशात् युधिष्ठिराला सांगितलें आणि " परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी केली असतां पृथ्वीवर पुनरपि क्षत्रिय झाले कसे ? " ह्मणून युधिष्ठिरानें प्रश्न केल्यावर ते ह्मणाले " जन्हुराजाला अज ह्मणून एक मुलगा होता. त्या अजाला बलाकाश्व ह्मणून पुत्र झाला व त्या बलाकाश्वाला कुशिक ह्मणून एक मोठा धर्मवेत्ता पुत्र झाला. त्यानें इंद्ररूप पुत्र प्राप्त होण्याविषयीं उग्र तपश्चर्या केली. तेव्हां त्याची तपश्चर्या पाहून इंद्रानेंच त्याचें पुत्रत्व स्वीकारिलें. सारांश, स्वतः इंद्रच त्या कुशिक राजाचा गाधि ह्मणून पुत्र झाला. त्या गाधीला सत्यवती ह्मणून एक कन्या झाली व ती कन्या त्यानें भृगुपुत्र ऋचीकाला दिली. तिच्या शुचिर्भूतपणानें तो भृगुपुत्र ऋचीक संतुष्ट झाला व त्यानें तिला आणि तिच्या पित्यालाही पुत्रप्राप्ति होण्याकारितां चरु सिद्ध केला व " हा चरु तूं भक्षण कर आणि हा तुझ्या मातेला भक्षण करूं दे. ह्मणजे तुझ्या मातेला पृथ्वींतील क्षत्रियांना अजिंक्य व श्रेष्ठ श्रेष्ठ क्षत्रियांचा नाश करणारा असा तेजस्वी पुत्र होईल आणि तुलाही ह्या चरूच्या योगानें धैर्यवान्, शमावलंबी व तपोनिष्ठ असा द्विजश्रेष्ठ पुत्र होईल " असें आपल्या भार्येला हाक मारून त्यानें सांगितलें व ह्याप्रमाणें भार्येला सांगून तो

तपोनिष्ठ भृगुनंदन ऋषि अरण्यांत चालता झाला. इकडे तीर्थयात्रा करीत हिंडणारा गाधिराजा त्याचवेळीं पत्नीसहवर्तमान ऋचीकाच्या आश्रमाप्रत आला. तेव्हां त्याच्या सत्यवती कन्येनें ते दोन्ही चरु घेतले आणि आनंदित होऊन भर्त्याचें ह्मणणें तिनें आपल्या मातेला कथन केलें. नंतर मातेनें अज्ञानामुळें आपला चरु त्या सत्यवतीनामक कन्येला दिला आणि तिचा चरु आपण स्वीकारिला. ह्याप्रकारें चरुभक्षण करण्यांत प्रमाद झाल्यामुळें सत्यवतीचे ठिकाणीं क्षत्रियनाशक गर्भ राहिला. तेव्हां तिला अवलोकन करून ऋचीक ह्मणाला “ हे कल्याणि, चरु बदलून तुला मातेनें फसविलें आहे. ह्यामुळें अत्यंत क्रोधी असा क्रूरकर्मी पुत्र तुला होईल आणि तपोनिष्ठ व ब्राह्मण असा तुझा भ्राता निपजेल. तुझ्या चरूमध्यें मीं संपूर्ण ब्राह्मणवीर्य घातलेलें होतें व तुझ्या मातेला जो चरु द्यावयाचा होता त्यामध्यें मीं संपूर्ण क्षत्रियवीर्य स्थापन केलें होतें. परंतु, हे कल्याणि, चरु स्वीकारण्यांत बदल झाल्यामुळें आतां असें होणार नाहीं. सारांश, तुझ्या मातेचा पुत्र ब्राह्मण होईल व तुझा पुत्र क्षत्रिय होईल ”. ह्याप्रमाणें ऋचीकानें सांगितलें असतां त्याची भार्या सत्यवती प्रणिपातपूर्वक कांपत कांपत त्याला ह्मणाली “ भगवन्, असें ह्मणणें आपणांला योग्य नाहीं ”. ह्यावर ऋचीक ह्मणाला “ हे भद्रे, माझी अशी इच्छा नव्हती; परंतु, चरु बदलल्यामुळें तुझे ठिकाणीं घोर कर्म करणारा गर्भ उत्पन्न झाला आहे ”. हें ऐकून घेऊन सत्यवती ह्मणाली:— हे प्रभो, मनांत आणाल तर आपण त्रैलोक्य सुद्धां उत्पन्न कराल; मग एका पुत्राची कथा काय? हे प्रभो, आपण मला शमावलंबी व आचरणानें सरळ असा पुत्र द्या ”. ऋचीक ह्मणतो:—हे कल्याणि, मीं थट्टेंत सुद्धां पूर्वी कधीं अनृत भाषण केलेलें नाहीं. तेव्हां अग्नि सिद्ध करून समंत्रक चरु तयार करण्याविषयीं मीं केलेलें अनुष्ठान खोटें कसें होईल? हे कल्याणि, तुझ्या पित्याचें सर्व कुल ब्राह्मण होईल हें मला पूर्वींच दिसून आलें आहे आणि तपाच्याच योगानें हें मीं जाणिलें आहे. ह्यावर सत्य-

वती ह्मणाली " हे प्रभो, तर मग आपणा उभयतांचा पौत्र आपल्या ह्मणण्याप्रमाणें क्रूरकर्मी होवो. हे तपस्विश्रेष्ठ, मला तर शमावलंबी पुत्र प्राप्त झालाच पाहिजे. ऋचीक ह्मणतोः—हे वरवर्णिनि, पुत्र आणि पौत्र ह्यांमध्यें मी कांहीं भेद समजत नाहीं. करितां, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें तसें होईल. श्रीकृष्ण सांगतातः—नंतर, सत्यवतीला तपोनिष्ठ असा जमदग्नि ह्मणून पुत्र झाला आणि कुशिकनंदन गाधीला विश्वामित्र झाला. असो. ऋचीकाला तपोनिष्ठ जमदग्नि पुत्र झाला व त्या जमदग्नीला सर्व-विद्यापारंगत, विशेषतः धनुर्वेदपारंगत, क्षत्रियनाशक, श्रेष्ठ व प्रदीप्त अग्नीप्रमाणें तेजस्वी असा अति भयंकर परशुराम ह्मणून पुत्र झाला ".

विश्वामित्राची मूळ उत्पत्ति ज्या चरूच्या योगानें झाली त्या चरूमध्यें ब्रह्मवीर्यच संपूर्णपणें ठेविलें होतें असें ह्यावरून स्पष्ट होत आहे. तेव्हां विश्वामित्र वास्तविक क्षत्रियापासून ब्राह्मण झालेला नसून तो मूळपासून ब्राह्मणच होता हें निर्विवाद आहे.

**विश्वं हि ब्रह्म सुमहच्चरौ तव समाहितम् ।**
**क्षत्रवीर्यं च सकलं तव मात्रे समर्पितम् ॥**
**विपर्ययेण ते भद्रे नैतदेवं भविष्यति ।**
**मातुस्ते ब्राह्मणो भूयात्तव च क्षत्रियः सुतः ॥**

असे श्लोक शांतिपर्वामध्यें आहेत व दोन चरु भार्येच्या हवाली करून ऋचीक मुनि तपश्चर्या करण्याकरितां अरण्यामध्यें गेले आणि परत आल्यावर आपल्या भार्येनें क्षत्रियनाशक असा क्रूरकर्मी गर्भ धारण केला असल्याचें त्यांनीं अवलोकन केलें असा मजकूर वरील श्लोकांच्या पूर्वींच्या श्लोकांत आहे. चरुभक्षण केल्यावर ऋचीक मुनींचा आपल्या भार्येशीं आणि गाधिराजाचा स्वस्त्रीशीं समागम झाल्याचें ह्यांत सांगितलेलें नाहीं. ह्यावरून विश्वामित्राची गर्भरूपानें उत्पत्ति देखील गाधिराजाच्या वीर्यापासून झालेली नसून चरूच्या प्रभावानेंच झालेली आहे असें दिसतें.

विश्वामित्र तपश्चर्येच्या योगानें स्वतः ब्राह्मण झाला इतकेंच नव्हें; परंतु, तपश्चर्येच्या योगानें त्यानें आपल्या पित्याला व पितामहालाही ब्राह्मण करून घेतलें असें महाभारतावरून होत असून पातंजलमहाभाष्यांत तर **अनृष्यानन्तर्ये बिदादिभ्योऽञ्** । ह्या सूत्राचें व्याख्यान करते-वेळीं तसें स्पष्ट सांगितलेंच आहे. बिदादिगणांत ऋषिवाचक जे शब्द असतील त्यांहून गोत्रापत्यार्थीं अञ् प्रत्यय होतों आणि ऋषिवाचक जे शब्द नसतील त्यांहून आनंतर्यापत्यार्थींच अञ् प्रत्यय होतो; असें सदर्हू सूत्राचें तात्पर्य आहे. तेव्हां " कौशिको विश्वामित्रः " हा प्रयोग कसा झाला ? ह्मणून शंका आली. आनंतर्यापत्य ह्मणजे पुत्र आणि गोत्रापत्य ह्मणजे पौत्रापासून पुढले पुरुष. कुशिकाचा पुत्र गाधि व गाधीचा पुत्र विश्वामित्र. अर्थात् , विश्वामित्र हा कुशिकाचें गोत्रा-पत्य होय. परंतु, कुशिक ऋषि नसून राजा होता असें जर प्रसिद्ध आहे ह्मणजे कुशिक हा शब्द ऋषिवाचक नव्हे असें जर सिद्ध आहे तर कुशिकशब्दाहून आनंतर्यापत्यार्थींच अञ् प्रत्यय होणें योग्य अस-तांना गोत्रापत्यार्थीं तो कसा झाला ? अशी शंका येणें स्वाभाविकच आहे " व कुशिक ऋषि होता. तेव्हां ऋषिवाचक कुशिकशब्दाहून गोत्रापत्यार्थीं अञ् प्रत्यय होऊन—कौशिको विश्वामित्रः—असें झालें तें योग्यच झालें " अशाप्रकारें सदर्हू शंकेचें समाधान करण्याच्या उद्देशानें महाभाष्यकारांनीं

**विश्वामित्रस्तपस्तेपे नानृषिः स्यामिति । तत्रभवानृषिः संपन्नः । स पुनस्तपस्तेपे नानृषेः पुत्रः स्यामिति । तत्र-भवान्गाधिरपि ऋषिः संपन्नः । स पुनस्तपस्तेपे नानृषेः पौत्रः स्यामिति । तत्रभवान्कुशिकोपि ऋषिः संपन्नः ।**

असें लिहिलें आहे व त्याचें तात्पर्य— " मीं ऋषि असावें ह्मणून विश्वामित्रानें तपश्चर्या केली ; तेव्हां तो ऋषि झाला. नंतर " जो ऋषि नाहीं अशाचा पुत्र मीं नसावें " ह्मणून त्यानें पुनरपि तपश्चर्या

केली ; तेव्हां त्याचा पिता गाधिही ऋषि झाला. तदनंतर " जो ऋषि नाहीं अशाचा पौत्रही मीं न व्हावें " ह्मणून त्यानें पुनरपि तपश्चर्या केली असतां त्याचा अजा कुशिकही ऋषि झाला "—असें आहे.

सारांश, ज्याचें सर्वच अघटित आहे त्याचें उदाहरण घेऊन वर्णव्यवस्था जन्मतः सिद्ध नाहीं ह्मणण्यांत अर्थ काय ?

शिवाय कर्मप्रवृत्तीवरच जर वर्णप्राप्ति अवलंबून असती तर विश्वामित्राला ब्राह्मण्य मिळविण्याकरितां तपश्चर्या करण्याचें कारण काय होतें ? विश्वामित्राच्या पिंडाची उत्पत्तिही वास्तविक विचार केला असतां क्षत्रियवीर्यापासून झालेली नव्हती; परंतु, क्षत्रियकुलांत त्याचा जन्म वगैरे झाल्यामुळें बीजरूपानें तो ब्राह्मण असूनही ब्राह्मण्यप्राप्तीकरितां त्याला तपश्चर्या करावी लागली. " वसिष्ठमुनींच्या ब्रह्मदंडानें विश्वामित्राचा सर्वस्वीं पराभव झाल्यावर ब्राह्मण्यप्राप्तीकरितां त्यानें तपश्चर्येला आरंभ केला आणि फलमूलांवर उपजीविका करून एक सहस्र संवत्सरपर्यंत त्यानें अत्यंत घोर तपश्चर्या केली. तेव्हां ब्रह्मदेवानें त्याला राजर्षि ह्मटलें. तदनंतर पुनरपि फलमूलांवर उपजीविका करून सहस्र संवत्सरपर्यंत त्यानें उग्र तपश्चर्या केली असतां ब्रह्मदेवानें त्याला ऋषि ह्मटलें. नंतर, कौशिकी नदीचे तीरीं त्यानें पुनरपि हजारों वर्षें घोर तपश्चर्या केली असतां ब्रह्मदेवानें त्याला महर्षि ह्मटलें. तेव्हां, " ब्रह्मर्षि ही संज्ञा मला प्राप्त व्हावी " ह्मणून विश्वामित्रानें विनंति केली असतां " तूं अद्यापि जितेंद्रिय झाला नाहींस " ह्मणून ब्रह्मदेवानें त्याला सांगितलें. तेव्हां वायुभक्षण करून पुनरपि त्यानें सहस्र संवत्सरपर्यंत फारच घोर तपश्चर्या केली. परंतु, क्रोधदमन झालें नाहीं असें समजून आल्यावर " ब्राह्मण्य प्राप्त होईपर्यंत मी श्वासोश्वासही करणार नाहीं व आहारही करणार नाहीं " असा निश्चय करून त्यानें पुनरपि एक सहस्र संवत्सरपर्यंत मौन धारण करून तपश्चर्या केली आणि सहस्र संवत्सर झाल्यानंतर आपलें व्रत परिपूर्ण झालें असें समजून विश्वामित्र भोजन करण्यास

उद्युक्त झाला; तों इतक्यांत इंद्रानें ब्राह्मणाचें रूप घेऊन तें तयार झालेलें अन्न मागितलें. तेव्हां तें सर्व अन्न त्या ब्राह्मणाला देऊन टाकून भोजन न करितां पुनरपि विश्वामित्रानें श्वास न सोडितां तपश्चर्या करण्याचा निश्चय केला. तेव्हां त्याचप्रमाणें एक सहस्र संवत्सरपर्यंत तपश्चर्या झाली असतां त्याच्या मस्तकांतून धूर निघूं लागला व त्याच्यायोगानें सर्व त्रैलोक्य तप्त होऊन गोंधळून गेलें. तेव्हां ब्रह्मदेवानें त्याला ब्रह्मर्षि ह्मटलें व पुढें देवांच्या विनंतीवरून वसिष्ठांनींही त्याचें ब्रह्मर्षित्व कबूल केलें ".

असा मजकूर वाल्मीकिरामायणांतील बालकांडामध्यें सत्तावन सर्गापासून पासष्ट सर्गापर्यंत आहे.

स्वतःच्या मालकीची एकादी जागा असल्यास तिच्यामध्यें वाडा बांधावयाचा अधिकार मालकाला पूर्णपणें असतो आणि त्या वाड्यामध्यें त्याला इच्छेप्रमाणें पाहिजे तशी उलटापालट करितां येते. परंतु, ज्याची मालकी नाहीं त्याला तशी गोष्ट करितां येणार नाहीं. तेव्हां त्याच न्यायानें सृष्टीचा उत्पादक जो ब्रह्मदेव त्याला सृष्टीमध्यें पाहिजे तो फेरफार करण्याचा पूर्ण अधिकार आहे. हा अधिकार यःकश्चित् मानवांचा नाहीं व ते कांहीं फेरबदल करूं लागल्यास तो होणारही नाहीं. सत्ताधारी सार्वभौमराजानें एकाद्या शतमूर्खाला एकाद्या देशाचा सुभेदार नेमिला ह्मणून दुसऱ्या एकाद्या सत्ताहीनाला तसें करितां येईल काय ? सारांश, सृष्टीचा अधिपति जो ब्रह्मदेव त्यानें क्षत्रियाला ब्राह्मण ह्मटलें ह्मणून स्वतःच्या देहेंद्रियादिकांवरही ज्यांची सत्ता नाहीं अशा मानवांना तसें करितां येईल काय ?

हजारों वर्षें तपश्चर्या केल्यामुळें, विश्वामित्र ब्राह्मण बनला व दोन हजार वर्षेंपर्यंत तर त्यानें श्वासोच्छ्वासही न करितां तपश्चर्या केली. तेव्हां सध्यांच्या आयुर्मानानें अशी कोणीं ब्राह्मणेतरानें तपश्चर्या केल्यास त्यालाही सृष्टीचा अधिपति भगवान् ब्रह्मदेव ब्राह्मण ह्मणेल. श्वासोच्छ्वासही न करितां हजारों वर्षें विश्वामित्रानें तपश्चर्या केली वगैरे प्रकारचा

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥**

---

मजकूर ज्या ग्रंथांमध्यें आहे त्याच ग्रंथांमध्यें विश्वामित्र ब्राह्मण झाल्याचें सांगितलें आहे. तेव्हां पुराणग्रंथांवर भरंवसा नसल्यामुळें ब्राह्मण्यप्राप्ती-विषयीं विश्वामित्राची तपश्चर्या ज्याला खरी वाटत नसेल त्याला विश्वा-मित्र ब्राह्मण झाला हेंही खरें मानण्याचें कारण नाहीं हें उघड आहे.

विश्वामित्रानें त्रिशंकु राजाला देहासहवर्तमान स्वर्गास पाठविलें व त्याच्याकरितां दुसरें नक्षत्रमंडल उत्पन्न केलें. तेव्हां विश्वामित्रानें प्रति-सृष्टि निर्माण केली ह्मणून सृष्टि निर्माण करण्याची इच्छा झालेल्या मानवाला जसें विधातृत्व येणें असंभवनीय आहे तसेंच ब्राह्मण जातीला विहित असलेलीं कर्में करण्याची इच्छा झालेल्या ब्राह्मणेतराला ब्राह्मण होतां येणें अशक्य आहे. सारांश, ज्ञानेश्वरमहाराजांच्या सामर्थ्यानें एका रेड्यानें वेदपठण करून दाखविलें ह्मणून ज्याप्रमाणें " जातशृंगं महिष-मुपनयीत तमध्यापयीत ( शिंगें आलेल्या रेड्याची मुंज करून त्याला वेद पढवावा ) " असा विधि मानता येणार नाहीं त्याचप्रमाणें तपः-सामर्थ्यानें व जगदुत्पादक ब्रह्मदेवाच्या ह्मणण्यानें विश्वामित्र ब्राह्मण झाला ह्मणून दुसऱ्या एकाद्या ब्राह्मणेतराला ब्राह्मणविहित कर्में कर-ण्याची इच्छा झाल्यानें ब्राह्मण होतां येणार नाहीं.

" चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः " ह्या वचनाचा आधार देऊन वर्णव्यवस्था कर्मप्रवृत्तीवर अवलंबून आहे असें कांहीं लोक भलतेंच प्रतिपादन करीत असतात त्याचें निराकरण, धर्मनिष्ठ अशा सामान्य लोकांनाही, करितां यावें एतदर्थ प्रसंगोपात्त ह्या ठिकाणीं जास्त मजकूर लिहिणें भाग पडलें ह्याबद्दल विद्वज्जनांनीं क्षमा करावी १३. )

कर्में मला बद्ध करीत नाहींत व कर्मफलाविषयीं माझी आसक्तिही नाहीं. तेव्हां अशा प्रकारें जो मला जाणितो तो कर्मानें बद्ध होत नाहीं ॥ १४ ॥

**येषां तु कर्मणां कर्तारं मां मन्यसे परमार्थतस्तेषामकर्तैवाहं यतो न मां० बध्यते ॥ १४ ॥ न मां तानि कर्माणि लिम्पन्ति देहाद्यारम्भकत्वेनाहंकाराभावान्न च तेषां कर्मणां फलेषु मे स्पृहा तृष्णा । येषां तु संसारिणामहं कर्तेत्यभिमानः कर्मसु स्पृहा तत्फलेषु च तान्कर्माणि लिम्पन्तीत्येवं युक्तं तदभावान्न मां कर्माणि लिम्पन्तीत्येवं योन्योपि मामात्मत्वेनाभिजानाति नाहं कर्ता न मे कर्मफले स्पृहेति स कर्मभिर्न बध्यते । तस्यापि न देहाद्यारम्भकाणि कर्माणि भवन्तीत्यर्थः ॥ १४ ॥**

---

तूं मला ज्या कर्मांचा कर्ता समजत आहेस त्यांचा मी वस्तुतः कर्ता नाहींच. कारण, माझे ठिकाणीं अहंकाराचा अभाव असल्यामुळें देहादिकांच्या उत्पादकत्वानें कर्में मला बद्ध करीत नाहींत ( ह्मणजे माझे ठिकाणीं अहंकार नसल्यामुळें तीं कर्में मला जन्म वगैरे प्राप्त करून देण्यास कारण होत नाहींत. ) शिवाय, त्या कर्मांच्या फलाविषयीं मला इच्छाही नसते. ( हें एक कर्मबंधन नसण्याचें दुसरें कारण होय. सारांश, ) मी कर्ता आहें असा ज्या संसारी पुरुषांचे ठिकाणीं कर्मांविषयीं अभिमान असतो व त्या कर्मांच्या फलाविषयीं ज्यांची आसक्ति असते त्यांना कर्में बद्ध करितात; हें योग्य आहे. परंतु, त्या दोहोंचाही ह्मणजे कर्तृत्वाभिमान व कर्मफलतृष्णा ह्या दोहोंचाही माझे ठिकाणीं अभाव असल्यामुळें मला कर्में बद्ध करीत नाहींत. ( आतां " तुज ईश्वराला कर्मबंध नाहीं हें समजलें; परंतु, हें समजण्यानें जीवांना काय लाभ होणार आहे ? " अशी अर्जुनाला शंका राहूं नये ह्मणून भगवान् त्याला सांगतात. ) ह्याप्रकारें जो इतरही कोणी मला आत्मत्वानें जाणितो ह्मणजे मी कर्मांचा कर्ता नव्हे आणि कर्मफलाविषयीं माझी इच्छा नाहीं असें जो समजतो तो कर्मांच्या योगानें बद्ध होत नाहीं. तात्पर्य,

( मी कर्मांचा कर्ता नव्हे व कर्मफलाची मला इच्छा नाहीं असें समजणारा ईश्वर माझ्याहून भिन्न नाहीं असें जो समजतो ) त्याचींही कर्में देहादिकांच्या उत्पत्तीला कारण होत नाहींत. ( अर्थात् जन्ममरणपरंपरारूप संसार देण्याला त्याचीं कर्में समर्थ होत नाहींत ) १४.

( मी ह्या कर्मांचा कर्ता असा अभिमान माझे ठिकाणीं नसल्यामुळें देहादिसंबंध घडवून आणून कर्में मला संसारामध्यें बद्ध करीत नाहींत. शिवाय, कर्मफलाविषयीं माझी आसक्ति नाहीं आणि ह्मणूनही मला कर्मबंधन होत नाहीं. कर्तृत्वाभिमान व फलाविषयीं आसक्ति हीं माझे ठिकाणीं नसल्यामुळें मला तर कर्मबंधन होत नाहींच ; परंतु, कर्तृत्वाभिमान व फलासक्ति ह्यांनीं रहित असलेल्या मला जो आत्मरूपानें जाणितो ह्मणजे " परमात्म्याहून भिन्न नसलेल्या माझे ठिकाणीं कर्तृत्व नाहीं व कर्मफलाची इच्छाही नाहीं " असें जो जाणितो तोही कर्मांनीं बद्ध होत नाहीं. सारांश, कर्मांच्या योगानें देहादिकांचा संबंध घडून त्यालाही संसार प्राप्त होत नाहीं. हें ह्या श्लोकाचें व त्यावरील भाष्याचें तात्पर्य आहे. )

( " लिम्पन्ति " ह्या पदाचें व्याख्यान श्रीधरस्वामींनीं " असक्तं न कुर्वन्ति " असें केलें आहे व त्याचा अर्थ " आसक्त करीत नाहींत" असा आहे; परंतु " न मे कर्मफले स्पृहा " असें पुढें असल्यामुळें व त्याचा अर्थ—कर्मफलाविषयीं माझी आसक्ति नाहीं—असा स्पष्ट असल्यामुळें श्रीधरस्वामींच्या व्याख्यानावर पुनरुक्तीचा दोष येतो आणि ह्मणून त्यांचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान त्याज्य ठरतें. नीलकंठपंडितांनीं ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें व्याख्यान " ननु कर्तुरपि कथमकर्तृत्वमत आह न मामिति । कर्मलेपोपि कुतो नास्तीत्यत आह न मे इति । यः कर्तृत्वाभिमानी स लिप्यते यस्तु फलेच्छुः स एवात्मनः कर्तृत्वं मन्यत इति फलेच्छाभावादकर्ताकर्तृत्वाच्च न लिप्यत इति " असें केलें आहे व त्याचा अर्थ—" अरे तूं कर्ता असून तुझे ठिकाणीं अकर्तृत्व कसें ? "

अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून भगवानांनीं " न मां कर्माणि लिम्पन्ति " असें ह्मटलें आहे आणि " कर्मलेपही तुला कां नाहीं " अशी शंका येईल ह्मणून भगवानांनीं " न मे कर्मफले स्पृहा " असें ह्मटलें आहे. कारण, ज्याला कर्तृत्वाभिमान असतो तो कर्मांनीं लिप्त होतो आणि जो फलेच्छु असतो तोच स्वतःला कर्ता समजत असतो. तात्पर्य, फलेच्छेचा अभाव असल्यामुळें ईश्वर कर्ता नाहीं आणि कर्ता नसल्यामुळें तो कर्मानें लिप्त होत नाहीं—असा आहे; परंतु, हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, कर्तृत्वाभिनिवेश आणि फलासक्ति हीं दोन्हींही बंधाला कारण आहेत. तेव्हां फलेच्छेचा अभाव असणें हेंच कर्मबंधन असण्याचें कारण असें ह्या ठिकाणीं प्रतिपादन करणें योग्य नव्हे. फलेच्छा नसणें हेंच जर कर्मबंधनापासून अर्थात् संसारापासून मुक्त होण्याला पुरें असेल तर फलेच्छारहित जो मुमुक्षु तो कर्मफलाची इच्छा करीत नाहीं एवढ्यानेंच कर्तृत्वाभिमानशून्य ठरून तो बंधनरहित ठरणार असल्यामुळें जन्ममरणरूप संसारांतून लगेंच मुक्त होतो असें होऊं लागेल आणि असें झालें असतां " बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते " असें जें भगवांनांनीं सातव्या अध्यायांत सांगितलें आहे त्याला विरोध येईल. करितां , नीलकंठपंडितांचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान ग्राह्य मानितां येत नाहीं. " कर्मफले स्पृहाराहित्येन मां योभिजानाति सोपि कर्मभिर्न बध्यते । मम निर्लेपत्वे कारणं निरहंकारत्वं निःस्पृहत्वादिकं जानतस्तस्याप्यहंकारादिशैथिल्यात् । " असें ह्या श्लोकाच्या उत्तरार्धाचें व्याख्यान श्रीधरस्वामींनीं केलें आहे व—" कर्मफलेच्छाशून्य मी आहें " असें जो मला जाणितो तो कर्मांनीं बद्ध होत नाहीं. कारण, मज ईश्वराला कर्मबंधन नसण्याचें कारण अहंकारराहित्य, निःस्पृहत्व वगैरे आहे असें जो समजतो त्याचाही अहंकार वगैरे शिथिल होतो "—असा त्याचा अर्थ आहे. परंतु हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, ईश्वराहून मी

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

---

नाहं कर्ता न मे कर्मफले स्पृहेत्येवं ज्ञात्वा कृतं कर्म० कृतम् ॥ १५ ॥ एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरप्यतिक्रान्तैर्मुमुक्षुभिः कुरु तेन कर्मैव त्वं न तूष्णीमासनं नापि संन्यासः कर्तव्यस्तस्मात्त्वं पूर्वैरप्यनुष्ठितत्वाद्यद्यनात्मज्ञस्त्वं तदात्मशु-

---

भिन्न नाहीं असा साक्षात्कार झाल्यावांचून कर्तृत्वादिकांचा सर्वस्वीं उच्छेद होणें संभवनीयच नाहीं आणि ह्मणूनच ईश्वराची कर्मफलाविषयीं आसक्ति नाहीं ह्मणून तो बद्ध होत नाहीं एवढेंच ज्ञान असलेल्या पुरुषाला मोक्षप्राप्ति होण्याचा कधींही संभव नाहीं. कारण, एवढेंच समजल्यानें जर मोक्षप्राप्ति होण्याचा संभव असेल तर मुक्तीला ब्रह्मात्मसाक्षात्काराची गरजच रहात नसल्यामुळें एवढीच माहिती असलेले लक्षावधि मूढ लोक अनायासानें कर्मबंधापासून मुक्त होऊं लागतील. परंतु, असें होणें वेदांतशास्त्राच्या मुख्य सिद्धांतालाच विरुद्ध आहे आणि ह्मणूनच श्रीधरस्वामींचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान त्याज्य आहे १४.)

असें समजून पूर्वींच्याही मुमुक्षूंनीं कर्म केलें आहे. तस्मात् , प्राचीनांनीं केलेलें पुरातन कर्मच तूं कर ॥ १५ ॥

मी कर्ता नाहीं आणि कर्मफलाविषयीं माझी आसक्ति नाहीं, असें समजून पूर्वीं होऊन गेलेल्याही मुमुक्षूंनीं कर्म केलें आहे. ह्या कारणामुळें तूं कर्म कर. स्वस्थ बसणें तुला उपयोगीं नाहीं आणि संन्यास करणेंही तुला योग्य नाहीं. तस्मात्, ज्याअर्थीं पूर्वीं होऊन गेलेल्याही मुमुक्षूंनीं कर्म केलें आहे त्याअर्थीं तूं जर आत्मज्ञानी नसशील तर चित्तशुद्ध्यर्थ कर्म कर आणि जर तत्त्वज्ञानी असशील तर लोकसंग्रहाकरितां ( ह्मणजे भलत्याच मार्गाकडे लोकांची प्रवृत्ति न व्हावी एतदर्थ )तूं कर्म कर. ( आतां पूर्वीं होऊन गेलेल्या मूढ पुरुषांनीं जर कर्म केलें असेल

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६॥

---

द्व्यर्थं तत्त्वविद्भिर्लोकसंग्रहार्थं पूर्वैर्जनकादिभिः पूर्वतरं कृतं नाधुनातनं कृतं निर्वर्तितम् ॥ १५ ॥

तत्र कर्म चेत्कर्तव्यं त्वद्वचनादेव करोम्यहं किं विशेषितेन पूर्वैः पूर्वतरं कृतमित्युच्यते । यस्मान्महद्वैषम्यं कर्मणि कथं किं कर्म० सेऽशुभात् ॥ १६ ॥ किं कर्म किं चाकर्मेति कवयो मेधाविनोऽप्यत्रास्मिन्कर्मादिविषये मोहिता मोहं

---

तर माझ्यासारिख्या ज्ञानी पुरुषानें तें कां करावें ? ह्मणून विचारशील तर हे अर्जुना, ) पूर्वी होऊन गेलेल्या जनकादि(ज्ञानी लो)कांनीं कर्म केलेलें आहे व तें कर्म त्यांनीं अलीकडे उत्पन्न केलें नसून पुरातन कालापासूनच चालत आलेलें आहे १५.

कर्म कोणतें आणि अकर्म कोणतें ह्याविषयीं बुद्धिमानांनाही संशय प्राप्त झालेला असतो. तस्मात् , तें कर्म कोणतें व अकर्म कोणतें हें मी तुला सांगतों; ह्मणजे तें जाणून तूं संसारापासून मुक्त होशील ॥१६॥

" मनुष्य लोकांमध्यें जर कर्म केलेंच पाहिजे तर मी तें तुझ्या सांगण्यावरूनच करीन; पूर्वींच्या लोकांनीं केलेलें पुरातन कर्म तूं कर हें तूं विशेष मला कशाकरितां सांगत आहेस ?" ह्मणून विचारशील तर सांगतों. कर्माविषयीं ज्याअर्थीं मोठा संशय आहे त्या अर्थीं पूर्वींच्या लोकांनीं केलेलें पुरातन कर्म असें विशेष सांगितल्यानें त्या कर्माचे ठिकाणीं जशी तुझी प्रवृत्ति अनायासें होईल तशी केवळ माझ्या सांगण्यावरून होणार नाहीं. असें समजून पूर्वींच्या लोकांनीं केलेलें पुरातन कर्म तूं कर असें मीं तुला सांगितलें. कर्माविषयीं लोकांना मोठा संशय कसा आहे ? ( देहादिकांचें चलनवलन ह्मणजे कर्म हें प्रसिद्ध असतांना कर्म कोणतें ह्याविषयीं संशय तो कसला ? ह्मणून विचारशील तर हे अर्जुना, ) कर्म कोणतें

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

---

**गता अतस्ते तुभ्यमहं कर्माकर्म च प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा विदित्वा कर्मादि मोक्ष्यसेऽशुभात्संसाराच्च चैतत्त्वया मन्तव्यं कर्म नाम देहादिचेष्टा लोकप्रसिद्धमकर्म नाम तदक्रिया तूष्णीमासनं किं तत्र बोद्धव्यमिति ॥ १६ ॥**

---

आणि अकर्म कोणतें ह्याविषयीं विद्वानांनाही संशय आलेला आहे. ( तेव्हां, तुला तर त्याविषयीं संशय येण्याचा जास्त संभव आहे व त्याच्या निवृत्तीकरितां माझ्यासारिख्या आप्ताच्या सांगण्याची अवश्यकता आहे. तस्मात् , कर्म कोणतें आणि अकर्म कोणतें हें मी तुला सागतों ; ह्मणजे तें कर्म वगैरे जाणून तूं अशुभापासून ह्मणजे संसारापासून मुक्त होशील ) १६.

( " तच्च तत्त्वविद्भिः सह विचार्य कर्तव्यम् । न लोकपरम्परामात्रेणेत्याह " असें श्रीधरस्वामींनीं ह्या श्लोकाला भाष्यविरुद्ध अवतरण दिलें आहे व त्याचा आशय—" तें कर्म तत्त्ववेत्त्यांसहवर्तमान विचार करून तूं कर. लोकपरंपरा चालत आलेली आहे ह्मणूत तूं करूं नकोस असें सुचविण्याच्या उद्देशानें भगवान् सांगतात "—असा आहे ; परंतु, हें त्यांचें भाष्यविरुद्ध अवतरण बरोबर नाहीं. कारण, पूर्वीच्या लोकांनीं परंपरागत केलेलें जें कर्म तेंच तूं कर असें जर मागल्या श्लोकांतील उत्तरार्धांत भगवानांनीं प्रत्यक्ष सांगितलें आहे तर ह्या श्लोकांत अगदींच त्याच्या विरुद्ध भगवान् कसें सांगतील? सारांश , श्रीधरस्वामींच्या अवतरणावर पूर्वापरविरुद्धता हा दोष येत असल्यामुळें त्यांचें भाष्यविरुद्ध अवतरण त्याज्य आहे १६. )

कर्माचें, विकर्माचें आणि अकर्माचें तत्त्व समजून घेतलें पाहिजे. कारण, त्यांचें तत्त्व कळणें कठीण आहे ॥ १७ ॥

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥

---

कस्माडुच्यते कर्मणो० कर्मणो गतिः ॥ १७ ॥ कर्मणः शास्त्रविहितस्य हि यस्मादप्यस्ति बोद्धव्यं बोद्धव्यं चास्त्येव विकर्मणः प्रतिषिद्धस्य तथाकर्मणश्च तूष्णींभावस्य बोद्धव्यमस्तीति त्रिष्वप्यध्याहारः कर्तव्यो यस्माद्गहना विषमा दुर्विज्ञाना कर्मण इत्युपलक्षणार्थं कर्मादीनां कर्माकर्मविकर्मणां गतिर्याथात्म्यं तत्त्वमित्यर्थः ॥ १७ ॥

किं पुनस्तत्त्वं कर्मादेर्यद्बोद्धव्यं वक्ष्यामीति प्रतिज्ञातमु-

---

आतां " कर्म ह्मणजे देहादिकांची हालचाल आणि अकर्म ह्मणजे ती हालचाल न करणें अर्थात् स्वस्थ बसणें हें लोकप्रसिद्ध आहे. तेव्हां त्याविषयीं समजून घेण्यासारखें तें काय असणार ? " असें तूं मनांत आणूं नकोस. कां ह्मणशील तर सांगतों. अरे, शास्त्रविहित कर्माचेंही तत्त्व समजलें पाहिजे; शास्त्रनिषिद्ध कर्माचेंही तत्त्व जाणिलें पाहिजे. आणि अकर्माचेंही ह्मणजे स्वस्थ बसण्याचेंही तत्त्व जाणिलें पाहिजे. कारण, कर्म, अकर्म आणि विकर्म ह्यांचें तत्त्व समजणें कठीण आहे. ह्या श्लोकांतील तिन्ही षष्ठ्यंत पदांपुढं ( " तत्त्वं " आणि ) " अस्ति " इतकें अध्याहृत घेतलें पाहिजे. " गहना कर्मणो गतिः " ह्या ठिकाणीं " कर्मणः " हें पद उपलक्षणार्थ आहे असें समजून त्याचा अर्थ–कर्म, अकर्म आणि विकर्म ह्यांचें– असा करावा १७.

कर्माचे ठिकाणीं जो अकर्म पहातो आणि अकर्माचे ठिकाणीं जो कर्म अवलोकन करितो तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान्, योगी आणि सर्व कर्में करणारा होय ॥ १८ ॥

" जें सांगेन ह्मणून तूं ह्मणालास तें समजून घेण्याला अवश्य असें कर्मादिकांचें तत्त्व कोणतें ? " ह्मणून विचारशील तर, हें अर्जुना, सांगतों:–

च्यते कर्म० कर्मकृत् ॥ १८ ॥ कर्मणि कर्म क्रियत इति व्यापारमात्रं तस्मिन्कर्मण्यकर्म कर्माभावं यः पश्येदकर्मणि च कर्माभावे कर्तृतन्त्रत्वात्प्रवृत्तिनिवृत्त्योर्वस्त्वप्राप्यैव हि सर्व एव क्रियाकारकादिव्यवहारोविद्याभूमावेव कर्म यः पश्येत्पश्यति स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तो योगी कृत्स्नकर्मकृत्समस्तकर्मकृच्च स इति स्तूयते कर्माकर्मणोरितरेतरदर्शी । ननु किमिदं विरुद्धमुच्यते कर्मण्यकर्म यः पश्येदित्यकर्मणि च कर्मेति न हि कर्माकर्म स्यादकर्म वा कर्म तत्र विरुद्धं कथं पश्येद्द्रष्टा ।

---

जें केलें जातें तें कर्म ही कर्म शब्दाची व्युत्पत्ति होय. तेव्हां कर्म ह्मणजे देहादिकांची कसल्याही प्रकारची हालचाल. ह्या कर्माचे ठिकाणीं जो कर्माचा अभाव अवलोकन करितो आणि क्रिया, कारक इत्यादि सर्वही व्यवहार अज्ञानावस्थेंतीलच असून आत्म्याशीं वस्तुतः त्याचा संबंध नसल्यामुळें आणि प्रवृत्ति व निवृत्ति हीं दोन्हीं कर्तृतंत्र असल्यामुळें ह्मणजे कारकाधीन असल्यामुळें प्रवृत्तीप्रमाणें निवृत्तीचे ठिकाणीं जो कर्म अवकोकन करितो तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान् ,तोच योगी आणि तोच सर्व कर्मे करणारा जाणावा. अशी कर्माचे ठिकाणीं अकर्म व अकर्माचे ठिकाणीं कर्म अवलोकन करणाऱ्या पुरुषाची प्रशंसा केलेली आहे. " अहो, पण—कर्माचे ठिकाणीं अकर्म व अकर्माचे ठिकाणीं कर्म जो अवलोकन करितो तो—हें असें भलतेंच काय सांगितलेलें आहे "? अहो, जें कर्म आहे तें कधींही अकर्म होणार नाहीं आणि जें अकर्म आहे तें कधीं कर्मही होणार नाहीं. तेव्हां पहाणारा विरुद्ध कसा पाहील ?

( देहादिकांच्या हालचालीला लोकामध्यें कर्म ह्मणण्याचा प्रघात आहे आणि देहादिकांचे व्यापार बंद असणें ह्मणजे कर्माचा अभाव अशी लोकांमध्यें समज आहे; परंतु, जी जी ह्मणून क्रिया ती कर्तृप-

भूति कारकांवर अवलंबून आहे आणि आत्म्याचे ठिकाणीं कर्तृत्वादि-कांचा मुळींच संभव नाहीं. तेव्हां, लोकांमध्यें ज्याला कर्म ह्मणतात त्याचा आत्म्याशीं कांहींएक संबंध नसल्यामुळें त्याच्यासंबंधानें पाहूं गेलें असतां तें वस्तुतः कर्म नव्हे. प्रवृत्ति ह्मणजे देहादिकांचा व्यापार आणि निवृत्ति ह्मणजे देहादिकांची व्यापाररहित स्थिति. प्रवृत्ति आणि निवृत्ति हीं दोन्हींही कर्त्यावर अवलंबून आहेत. ह्मणजे प्रवृत्तीला ज्याप्रमाणें कर्त्याची अपेक्षा आहे त्याप्रमाणें निवृत्तीलाही आहे. तेव्हां कर्तृतंत्रत्व ह्मणजे कारकाधीनत्व हें प्रवृत्ति व निवृत्ति ह्या दोहोंमध्यें सारखेंच असल्यामुळें प्रवृत्तीप्रमाणें निवृत्तिही वास्तविक पाहूं गेले असतां कर्मच आहे. आतां " निवृत्ति ही आत्म्याचे अधीन असल्यामुळें ह्मणजे अर्थात् कर्त्रादि कारकांचा तेथें अभाव असल्यामुळें तिचा कर्मामध्यें समावेश करणें योग्य नाहीं. " असें जर कोणी ह्मणेल तर तें बरोबर नाहीं. कारण, क्रिया, कारक, फल हा सर्वही व्यवहार केवळ अज्ञानावस्थेंतीलच आहे; ह्या व्यवहाराचा आत्म्याशीं कांहीं एक संबंध नाहीं. तेव्हां, कारकाधीन जी निवृत्ति तिचा आत्म्याशीं संबंध नसल्यामुळें आणि कारकाधीनत्व हें प्रवृत्तीप्रमाणें तिचेही ठिकाणीं सारिखेंच असल्यामुळें निवृत्ति ही प्रवृत्तीप्रमाणें कर्म आहे. सारांश, लोकांमध्यें जें अकर्म समजलें जातें तें वस्तुतः कर्मच आहे. तेव्हां लोकप्रसिद्ध जें कर्म त्याचे ठिकाणीं जो अकर्म अवलोकन करितो ह्मणजे लोकांमध्यें ज्याला कर्म ह्मणत असतात तें कर्म नव्हे असें जो समजतो व त्याचप्रमाणें अकर्माचे ठिकाणीं जो कर्म अवलोकन करितो ह्मणजे लोकांमध्यें ज्याला अकर्म ह्मणण्याचा प्रघात आहे तें वस्तुतः अकर्म नसून कर्मच आहे असें जो समजतो तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान्, योगी आणि सर्व कर्मै करणारा होय. अशी, लोकप्रसिद्ध कर्माचे ठिकाणीं अकर्मबुद्धि करून लोकप्रसिद्ध अकर्माचे ठिकाणीं कर्मबुद्धि करणाऱ्याची, स्तुति केली आहे. हें " कर्मणि कर्म क्रियत इति व्यापारमात्रं० स्तूयते

**नन्वकर्मैव परमार्थतः सत्कर्मवदवभासते मूढदृष्टेर्लोकस्य तथा कर्मैवाकर्मवत्तत्र यथाभूतदर्शनार्थमाह भगवान्कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादि। अतो न विरुद्धम्। बुद्धिमत्त्वाद्यु-**

---

कर्माकर्मणोरितरेतरदर्शी " ह्या भाष्याचें तात्पर्य होय. अहो, हें असें विरुद्ध काय सांगतां ? कर्म कधींही अकर्म होणें नाहीं आणि अकर्म कधींही कर्म होणें नाहीं. तेव्हां, जो कोणी पहाणारा असेल तो कर्म हें अकर्म आणि अकर्म हें कर्म असें विरुद्ध अवलोकन करील कसा ?

अहो, वस्तुतः जें अकर्मच आहे तें कर्माप्रमाणें मूढदृष्टि लोकांना भासतें व त्याचप्रमाणें जें खरोखर कर्मच आहे तें अकर्माप्रमाणें दिसतें. तेव्हां कर्म आणि अकर्म ह्यांचें यथार्थ ज्ञान होण्याकरितां भगवानांनीं " कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि० " इत्यादि सांगितलें आहे. ह्मणून भगवानांचें हें सांगणें विरुद्ध नाहीं. ( सारांश, ब्रह्म हें वस्तुतः अकर्म ह्मणजे कर्मरहित असूनही भ्रांतीच्या योगानें विवेकहीन लोकांना तें कर्मसाहित असल्याचें भासतें आणि त्याचप्रमाणें द्वैत हें वास्तविक कर्मयुक्त असतांना अधिष्ठान जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं संसृष्ट असल्यामुळें तेंही त्या ब्रह्माप्रमाणें कर्मरहित असल्यासारखें भासू लागतें. तेव्हां वस्तुतः जें कर्म त्याचे ठिकाणीं अकर्माचा व अकर्माचे ठिकाणीं कर्माचा भास लोकांना होत असल्याचें सिद्ध असल्यामुळें कर्म आणि अकर्म ह्यांचें यथार्थ ज्ञान होण्याकरितां भगवानांचें वरील वचन योग्यच आहे. उदाहरणार्थः—एकाद्या ठिकाणीं शिंपला असतांना तें रुपें आहे असा जर भ्रांतीनें कोणाचा ग्रह झाला तर त्याचा तो ग्रह नाहींसा होऊन त्याला यथार्थ ज्ञान होण्याकरितां भ्रमानें सिद्ध जें रजत त्याचा अनुवाद करून त्या भ्रमाला अधिष्ठान जी शुक्ति ती सांगावी लागते; ह्मणजे " अरे, रजत रजत ह्मणून जें हें तुला वाटत होतें तें आतां वास्तविक रजत नसून शुक्ति आहे हें तूं अवलोकन कर. अर्थात् रजत

**पपत्तेश्च बोद्धव्यमिति च यथाभूतं दर्शनमुच्यते न च विपरीतज्ञानादशुभान्मोक्षणं स्याद्यज्ज्ञात्वा मोक्षसेऽशुभादिति चोक्तम् । तस्मात्कर्माकर्मणी विपर्ययेण गृहीते प्राणिभिस्त-**

---

रजत ह्मणून जें तूं घेऊन बसला होतास त्या रजताचे ठिकाणीं तूं ही वस्तुतः आतां खरोखर शुक्ति अवलोकन कर असें त्याला सांगावें लागतें. त्याचप्रमाणें कर्मरूप ह्मणून भ्रांतीनें ज्याविषयीं अज्ञानी पुरुषाचा ग्रह झाला आहे तो ग्रह दूर होऊन यथार्थ ज्ञान होण्याकरितां जो हा आत्मा तुला कर्मयुक्त वाटत आहे तो वस्तुतः कर्मयुक्त नसून कर्मादिरहित आहे. हें दर्शविण्याकरितां भगवानांनीं कर्माचे ठिकाणीं अकर्म जो अवलोकन करितो आणि अकर्माचे ठिकाणीं जो कर्म अवलोकन करितो असें सांगितलें आहे. तात्पर्य, आत्म्याचे ठिकाणीं भ्रांतीनें आरोपित जें कर्म वगैरे त्याचा अनुवाद करून त्या भ्रांतीला अधिष्ठान जो कर्मादिरहित आत्मा त्याचा बोध भगवान् ह्या श्लोकामध्यें करीत असल्यामुळें ह्या ठिकाणीं विरोध असण्याचा संभवही नाहीं. कारण ) बुद्धिमत्त्वादिकांची उपपत्ति होत असल्यामुळेंही ( ब्रह्मज्ञानच ह्या ठिकाणीं भगवानांना विवक्षित आहे. ) असेंच मानिलें पाहिजे. बोद्धव्यं ( ह्मणजे तत्त्व जाणिलें पाहिजे ) असें ज्याअर्थीं ह्याच्याच मागल्या श्लोकांत भगवानांनीं सांगितलें आहे त्याअर्थीं आत्म्याचें यथार्थ ज्ञानच ह्या ठिकाणीं भगवानांनीं सांगितलें आहे. दुसरें असें कीं, विपरीत ज्ञान झाल्यानें अशुभ जो संसार त्यापासून मोक्ष होणार नाहीं आणि भगवानांनीं तर " यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् " ( जें कर्म व अकर्म जाणिलें असतां तूं अशुभ संसारापासून मुक्त होशील ) असें सांगितलें आहे. ( निर्विकार जो आत्मा त्याहून इतर सर्व मायामात्र असल्यामुळें आत्मव्यतिरिक्त अशा कोणाच्याही ज्ञानानें बुद्धिमत्त्व, युक्तत्व व सर्वकर्मकर्तृत्व हीं पुरुषाला प्राप्त होण्याचा संभव नाहीं आणि ह्या श्लोकांत तर " स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः

**द्विपर्ययग्रहणनिवृत्त्यर्थं भगवतो वचनं कर्मण्यकर्म य इत्यादि। न चात्र कर्माधिकरणमकर्मास्ति कुण्डे बदराणीव नाप्य-कर्माधिकरणं कर्मास्ति कर्माभावत्वादकर्मणोतो विपरीते**

---

कृत्स्नकर्मकृत्" ह्मणून बुद्धिमत्त्वादिकांचा निर्देश केलेला आहे. तस्मात्, ज्याअर्थी इतराच्या ज्ञानानें पुरुष बुद्धिमान्, योगी आणि सर्वकर्मकर्ता होण्याचा संभव नाहीं त्याअर्थी आत्मज्ञानाचा उपदेश करणेंच ह्या प्रकरणामध्यें भगवानांना विवक्षित असल्याचें सिद्ध होत आहे. शिवाय " कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः । अकर्मणश्च बोद्धव्यं " असें ह्मटलें आहे आणि अशुभ संसारापासून मुक्ति हें ह्या बोधाचें फल सांगितलें आहे. तेव्हां आत्मज्ञानावांचून इतरानें संसारापासून मुक्त होण्याचा संभव नसल्यामुळें आणि आत्मज्ञानाचे ठिकाणींच बोधशब्दाची प्रसिद्धि असल्यामुळें ह्मणजे बोध ह्या शब्दाचा मुख्य अर्थ आत्मज्ञान असाच असल्यामुळें ह्या प्रकरणामध्यें निर्विकार जो आत्मा त्याचेंच प्रतिपादन भगवानांना विवक्षित असल्याचें सिद्ध होत आहे. ) तस्मात्, कर्म आणि अकर्म ह्यांविषयीं प्राण्यांचा भलताच समज झालेला आहे. त्यांचा तो भलताच समज दूर होण्याकरितां भगवानांचें " कर्मण्यकर्म यः पश्येत्" हें वचन आहे व तें विरुद्ध नाहीं. शिवाय, कुंडे बदराणि ( ह्मणजे कुंडांत बोरें ) ह्याप्रमाणें ह्या ठिकाणीं कर्म हें अकर्माचें अधिकरण नाहीं आणि अकर्म हेंही कर्माचें अधिकरण नाहीं. कारण, अकर्म ह्मणजे कर्माचा अभाव ( सारांश, "कुंडांत बोरें आहेत" ह्या वाक्यामध्यें कुंड बोरांचा आधार आहे असा बोध होतो व कुंड आणि बोरें हीं दोन्हीं भावरूप असल्यामुळें ह्यांमध्यें आधाराधेयभाव संभवतो; ह्मणजे एकावर दुसरें ठेवितां येणें शक्य होतें; परंतु " कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः " ह्या ठिकाणीं कर्म हें अकर्माचें अधिकरण आहे व अकर्म हें कर्माचें अधिकरण आहे ह्मणजे कर्मावर अकर्म ठेविलेलें आहे व

**गृहीते एव कर्माकर्मणी लौकिकैर्यथा मृगतृष्णिकायामुदकं शुक्तिकायां वा रजतम् । ननु कर्म कर्मैव सर्वेषां न क्वचिद्व्यभिचरति तत्र नौस्थस्य नावि गच्छन्त्यां तटस्थेष्वगतिषु नगेषु प्रतिकूलगतिदर्शनाद्दूरेषु चक्षुषासंनिकृष्टेषु गच्छत्सु गत्यभावदर्शनादेवमिहाप्यकर्मण्यहं करोमीति कर्मदर्शनं कर्मणि चाकर्मदर्शनं विपरीतदर्शनं येन तन्निराकरणार्थमुच्यते कर्मण्यकर्म**

---

अकर्मावर कर्म ठेविलेलें आहे असें ह्मणतां येत नाहीं. तात्पर्य, अकर्म हें भावरूप नसून अभावरूप असल्यामुळें त्याचा भावरूप कर्माशीं आधाराधेयभाव मुळींच संभवत नाहीं; ह्मणजे कर्म ह्या भावरूप वस्तूवर अकर्म ही अभावरूप वस्तु आहे आणि अकर्म ह्या अभावरूप वस्तूच्या आधारावर कर्म ही भावरूप वस्तु आहे हें संभवत नाहीं.) तस्मात्, मृगजलाचे ठिकाणीं ज्याप्रमाणें लोकांची उदकबुद्धि झालेली असते अथवा शिंपेचे ठिकाणीं ज्याप्रमाणें रजतबुद्धि झालेली असते त्याचप्रमाणें कर्म आणि अकर्म ह्यांविषयींही खरोखर शास्त्रज्ञानशून्य लोकांचा भलताच ग्रह झालेला असतो. ( मृगजल आणि उदक ह्यांमध्यें अथवा शुक्तिका आणि रजत ह्यांमध्यें जसें पहिलें दुसऱ्याच्या आधारावर व दुसरें पहिल्याच्या आधारावर राहिलेलें असें ह्मणतां येत नाहीं त्याचप्रमाणें कर्म आणि अकर्म ह्यांमध्यें आधाराधेयभाव आहे असें ह्मणतां येत नाहीं. ) आतां " जें वस्तुतः कर्म असेल तें सर्वांनाही कर्मच भासतें आणि जें अकर्म असेल तें अकर्मच भासतें; ह्यांत विरोध कोठेंही येत नाहीं " असें ह्मणावें तर तें बरोबर नाहीं. कारण, नावेमध्यें जो बसलेला असतो त्याची नाव वस्तुतः एका प्रदेशावरून दुसऱ्या प्रदेशावर जात असते व तीरावरील वृक्ष गतिरहितच असतात; परंतु, तीरावरील वृक्ष गमन करीत आहेत असें त्याला दिसतें आणि त्याचप्रमाणें दूर प्रदेशामध्यें असलेले ह्मणजे सन्निध नसलेले लोक वस्तुतः

**यः पश्येदित्यादि तदेतदुक्तप्रतिवचनमप्यसकृदत्यन्तविपरीतद-र्शनभावितया मोमुह्यमानो लोकः श्रुतमप्यसकृत्तत्त्वं विस्मृत्य मिथ्याप्रसङ्गमवतार्यावतार्य चोदयतीति पुनः पुनरुत्तरमाह**

---

गमन करीत असतांनाही ते निश्चल आहेत असें त्याच्या दृष्टीला दिसूं लागतें. तसेंच ह्या ठिकाणींही-अकर्माचे ठिकाणीं मी करितों असा कर्माभास आणि कर्माचे ठिकाणीं अकर्म हा विपरीत भास होत असतो. ह्मणून त्याचें निराकरण होण्याकरितां " कर्मण्यकर्म यः पश्येत् " इत्यादि भगवानांचें वचन आहे. ( सारांश, तीरस्थ वृक्ष गतिरहित असतांनाही नौका चालत असल्यामुळें जसें तींत बसणाऱ्याला ते वृक्षच चालत आहेत असें भासतें; त्याचप्रमाणें अविक्रिय जो आत्मा त्याचे ठिकाणीं वस्तुतः कर्माचा संबंध नसतांनाही कर्माचा भास लोकांना होतो आणि लांब असलेले लोक चालत असतांनाही ज्याप्रमाणें निश्चल आहेत असें भासतें त्याचप्रमाणें कर्ममय जो द्वैतप्रपंच त्याचे ठिकाणीं कर्मा-भाव असा विपरीत भास होतो. तेव्हां असा विपरीत भास जो होतो त्याचें निरसन होण्याकारितां " कर्मण्यकर्म यः पश्येत् " हें भगवानांचें वचन आहे. आतां " कर्म आणि कर्माभाव हीं दोन्हींही आरोपितच अस-ल्यामुळें अविक्रिय आत्म्याचें ज्ञान ह्या ठिकाणीं भगवानांना विवक्षित आहे असें ह्मणावें तर अव्यक्तोयमचिन्त्योयं ", " न जायते म्रियते वा " इत्यादि प्रकारें निर्विकार आत्म्याचेंच प्रतिपादन केलें असल्या-मुळें ह्या ठिकाणीं पुनरुक्ति दोष येतो " अशी शंका येण्याचा संभव आहे; परंतु, ही शंका योग्य नाहीं. (कारण,) आत्मा क्रियारहित आहे; त्याचे ठिकाणीं क्रियेचा यत्किंचितूही संबंध नाहीं असें अनेक वेळां जरी सांगितलेलें आहे तरी निर्विकार जो आत्मा त्याहून अत्यंत विपरीत अशी जी समज ह्मणजे मिथ्या ज्ञान त्याचा दृढतर संस्कार झाला असल्यामुळें अतिशय मोह पावत असलेल्या लोकांना श्रुत

**भगवान्दुर्विज्ञेयत्वं चालक्ष्य वस्तुनः। अव्यक्तोयमचिन्त्योयं न जायते म्रियत इत्यादिनात्मनि कर्माभावः श्रुतिस्मृतिन्याय-प्रसिद्ध उक्तो वक्ष्यमाणश्च। तस्मिन्नात्मनि कर्माभावेकर्मणि कर्मविपरीतदर्शनमत्यन्तनिरूढम्। यतः किं कर्म किमक-र्मेति कवयोप्यत्र मोहिताः। देहाद्याश्रयं कर्मात्मन्यध्यारोप्याहं कर्ता ममैतत्कर्म मयास्य कर्मणः फलं भोक्तव्यमिति च तथाहं तूष्णीं भवामि येनाहं निरायासोकर्मा सुखी स्यामिति**

---

असलेल्याही आत्मतत्त्वाची विस्मृति पडते आणि वारंवार भलताच प्रसंग पाहून आत्मा क्रियावान् आहे असें ते प्रतिपादन करूं लागतात. तेव्हां आत्म्याचें ज्ञान होणें कठिण आहे असें जाणून भगवान्ही पुन्हां पुन्हां आत्मतत्त्वाचेंच प्रतिपादन करीत आहेत. " अव्यक्तोयमचिन्त्योयं, " " न जायते म्रियते वा कदाचित् " इत्यादि प्रकारांनीं श्रुतिस्मृतिन्याय-सिद्ध असा आत्म्याचे ठिकाणीं कर्माभाव सांगितलेला आहे आणि तो पुढेंही ( सर्व कर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ह्मणून पांचव्या अध्यायांत ) सांगणार आहेत. कर्माभाव ह्मणजे अकर्म असा जो आत्मा त्या आत्म्याचे ठिकाणीं कर्म हा विपरीत प्रकार भासणें हें अगदीं खिळून गेलेलें आहे. ( सारांश, मी कर्ता अशी ज्याची त्याची समजूत अस-ल्यामुळें आत्म्याचे ठिकाणीं कर्मभ्रम हा अत्यंत रूढ झालेला आहे. ) आत्म्याचे ठिकाणीं कर्मभ्रम असल्याचें " किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः " ह्या वचनानें भगवानांनींही सांगितलें आहे. ( " आत्मा जर वस्तुतः क्रियारहित आहे तर त्याचे ठिकाणीं कर्मभ्रम संभवेल कसा ? " ह्मणून ह्मणाल तर सांगतों. देहादिकांवर अवलंबून अस-लेलें जें कर्म तें आत्म्याचेच ठिकाणीं स्थापून मी ह्या कर्माचा कर्ता आहें; माझें हें कर्म आहे; मला ह्या कर्माचें फल भोगावयाचें आहे असें लोक समजत असून देह आणि इंद्रियें ह्यांवर अवलंबून असलेला

कार्यकरणाश्रयव्यापारोपरमं तत्कृतं च सुखित्वमात्मन्यध्यारोप्य न करोमि किंचित्तूष्णीं सुखमासमित्यभिमन्यते लोकस्तत्रेदं लोकस्य विपरीतदर्शनापनयनायाह भगवान्कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादि । अत्र च कर्म कर्मैव सत्कार्यकरणाश्रयं कर्मरहितेविक्रिय आत्मनि सर्वैरध्यस्तं यतः पण्डितोऽप्यहं करोमीति मन्यते । अत आत्मसमवेततया सर्वलोकप्रसिद्धे कर्मणि नदीकूलस्थेष्विव वृक्षेषु गतिः प्रातिलोम्येना-

---

जो व्यापार तो बंद झाला असतां आणि त्याच्यामुळें त्या देहादिकांना कांहीं सुख झालें असतां तें सर्व आत्म्याचेच ठिकाणीं स्थापून मी आतां कांहीं करीत नाहीं; मी खुशाल स्वस्थ बसलों आहें. असेंही लोक मानितात. तेव्हां लोकांची जी ही भलतीच समज ती दूर होण्याकरितां हें " कर्मण्यकर्म यः पश्येत् " इत्यादि भगवानांनीं सांगितलें आहे. ह्या लोकव्यवहारामध्यें देह आणि इद्रियें ह्यांच्यावर अवलंबून असलेलें जें कर्म तें आपल्या कर्मरूपानेंच स्थित असतांना तें कर्म वस्तुतः कर्मरहित आणि अविक्रुत असा जो आत्मा त्याचेच ठिकाणीं सर्व लोक ( देहादिकांच्या आरोपाच्या द्वारानें ) आरोपित करीत असतात. ( ह्मणजे ज्या देहादिकांवर कर्म अवलंबून असतें ते देहादिकच आत्म्याचे आहेत असें समजून त्यांच्या योगानें घडलेलें कर्म आत्म्यानेंच केलें असें सर्व लोक समजत असतात. ) कारण, विवेकी पुरुष सुद्धां मीं करितों असें ह्मणत असतो. ( मग विवेकशून्य पुरुषाची तर गोष्ट कशाला पाहिजे ? ) ह्यास्तव, आत्मसंबद्ध ह्मणून सर्व लोकांच्या दृष्टीनें प्रसिद्ध असलेलें जें कर्म तें आत्म्याचे ठिकाणीं अकर्म आहे; अर्थात् त्या कर्माचा आत्म्याचे ठिकाणीं अभाव आहे असें जो जाणितो ह्मणजे नदीचे तीरावर असलेल्या वृक्षांचे ठिकाणीं सर्व लोकांच्या दृष्टीनें जरी गतीचा भास होत असला तरी त्या वृक्षाचे

**तोकर्म कर्माभावं यथाभूतं गत्यभावमिव वृक्षेषु यः पश्येदकर्मणि च कार्यकरणव्यापारोपरमे कर्मवदात्मन्यध्यारोपिते तूष्णीमकुर्वन्सुखमास इत्यहंकाराभिसन्धिहेतुत्वात्तस्मिन्नकर्मणि च कर्म यः पश्येद्य एवं कर्माकर्मविभागज्ञः स बुद्धिमान्पण्डितो मनुष्येषु स युक्तो योगी कृत्स्नकर्मकृच्च सोऽशुभान्मोक्षितः कृतकृत्यो भवतीत्यर्थः ।**

**अयं श्लोकोऽन्यथा व्याख्यातः कैश्चित् । कथं नित्यानां किल कर्मणामीश्वरार्थेऽनुष्ठीयमानानां तत्फलाभावादकर्माणि तान्युच्यन्ते गौण्या वृत्त्या तेषां चाकरणमकर्म तच्च प्रत्य-**

---

ठिकाणीं वस्तुतः गतीचा अभाव आहे असें जाणणाऱ्या समंजस मनुष्याप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं भासमान होत असलेलें जें कर्म तें वस्तुतः अकर्म आहे असें जो जाणितो आणि त्याचप्रमाणें देहेंद्रियांचा व्यापार बंद झाला असतांना तो आत्म्याचा बंद झाला असा जो भास होत असतो ह्मणजे देहेंद्रियादिकांचा व्यापार बंद झाला असतांना " मी कांहीं न करितां सुखांत बसलों आहें " असा अहंकारामुळें जो आरोपित केलेल्या कर्माप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं कर्माभाव आरोपित झालेला असतो तो वस्तुतः कर्माभाव नसून कर्म आहे असें जो जाणितो अर्थात् अशा प्रकारें कर्माकर्माचा विभाग जो समजतो तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान् ह्मणजे पंडित व योगी असून संपूर्ण कर्मे करणाराही तोच होतो; अर्थात्, अशुभ अशा संसारांतून मुक्त होऊन तो कृतकृत्य होतो.

ह्या श्लोकाचें व्याख्यान कांहींनीं दुसऱ्या रीतीनें केलेलें आहें. कसें तें पहा. ते ह्मणतातः—अकर्मे ह्मणजे नित्यकर्मे. कारण, ईश्वरप्रीत्यर्थ केलीं जाणारीं जीं नित्य कर्मे त्यांचें फल नाहीं. तेव्हां गौण अर्थानें नित्य कर्मांनाच अकर्मे असें ह्मणत असतात. त्या नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें हा अकर्मशब्दाचा मुख्य अर्थ होय. परंतु, त्याचें अनुष्ठान न

वायफलत्वात्कर्मोच्यते गौण्यैव वृत्त्या तत्र नित्ये कर्मण्य-कर्म यः पश्येत्फलाभावाद्यथा धेनुरपि गौरगौरुच्यते क्षीराख्यं फलं न प्रयच्छतीति तद्वत्तथा नित्याकरणे त्वकर्मणि कर्म यः पश्येन्नरकादिप्रत्यवायफलं प्रयच्छतीति। नैतद्युक्तं व्याख्या-नमेवंज्ञानादशुभान्मोक्षानुपपत्तेर्यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेशुभादिति भगवतोक्तं वचनं बाध्येत । कथं नित्यानामनुष्ठानादशुभा-

---

केल्यानें प्रत्यवाय हें फल प्राप्त होत असल्यामुळें गौण अर्थानें त्याला कर्म असें ह्मणतात. तेव्हां, ज्याप्रमाणें व्यायलेली गाय दूध देत नसली ह्मणजे तिला गाय ह्मणत नाहींत त्याचप्रमाणें फलाचा अभाव असल्या-मुळें नित्य कर्माचेच ठिकाणीं जो अकर्मदृष्टि करितो आणि त्याच-प्रमाणें नित्य कर्माचें अनुष्ठान न करणें हें जें अकर्म तें अकर्म नरका-दिप्रत्यवायरूप फल देणारें असल्यामुळें त्या अकर्माचेच ठिकाणीं जो कर्मदृष्टि करितो तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान्, तोच योग्य आणि तोच सर्वकर्मकर्ता होय—असा ह्या श्लोकाचा अर्थ आहे. परंतु, हें व्याख्यान योग्य नाहीं. कारण, नित्य कर्म हेंच अकर्म आणि नित्य कर्माचें अनु-ष्ठान न करणें हें कर्म असें समजल्यानें अशुभ जो संसार तो निवृत्त होण्याचा संभव नसल्यामुळें " यज्ज्ञात्वा मोक्षसेशुभात् " ह्या भगवा-नांच्या वचनाला बाध येऊं लागेल. (धर्मेण पापमपनुदति ह्मणजे नित्य-कर्मानुष्ठानरूप धर्माच्या योगानें पापनाश होत असल्याचें श्रुतीमध्यें प्रसिद्ध आहे आणि दुरितक्षयावांचून नित्य कर्माच्या अनुष्ठानाचें दुसरें फल नाहीं. तेव्हां ज्याचें दुसरें फल नाहीं असें जें नित्य कर्म तें अकर्म असें समजून नित्य कर्माचें अनुष्ठान सुरू ठेविलें असतां अशुभक्षय कसा होणार नाहीं ? आणि ) भगवानांच्या वचनाला बाध कसा येईल? ह्मणून विचाराल तर सांगतों. अहो " क्षेत्रज्ञस्येश्वरज्ञानाद्विशुद्धिः परमा मता "—ईश्वराचें ज्ञान झाल्यानेंच जीवाची चांगली शुद्धि होते—अशी

**त्स्यान्नाम मोक्षणं न तु तेषां फलाभावज्ञानान्न हि नित्यानां फलाभावज्ञानमशुभमुक्तिफलत्वेन चोदितं नित्यकर्मज्ञानं वा**

---

स्मृति असल्यामुळें नित्य कर्मांच्या अनुष्ठानानें सर्वस्वीं अशुभाचा क्षय होण्याचा जरी संभव नाहीं तरी ) नित्य कर्मांच्या अनुष्ठानानें पुरुषाची अशुभापासून मुक्तता होईल ( असें आह्मीं फार तर तुमच्याकरितां घटिकाभर गृहीत धरून चालूं ; परंतु, असें गृहीत धरल्यानें उपयोग काय होणार ? नित्य कर्मांच्या अनुष्ठानानें अशुभ क्षय होतो असें जरी मानिलें तरी ह्या प्रकरणामध्यें तें विवक्षित नाहीं. कारण " यज्ज्ञात्वा मोक्षसेऽशुभात् " ह्या वचनावरून ज्ञानापासूनच अशुभनिवृत्ति होते अशी भगवानांनीं प्रतिज्ञा केल्याचें सिद्ध होत आहे. आतां " ज्ञानानें अशुभक्षय होतो असें जें भगवानांनीं सांगितलें आहे त्यांतील ज्ञान-शब्दाचा अर्थ—नित्य कर्मांचें फल नाहीं हें ज्ञान—असा करावा " ह्मणून ह्मणाल तर जुळत नाहीं. कारण, ) नित्य कर्मांचे ठिकाणीं फलाचा अभाव आहे येवढें समजल्यानें अशुभ जो संसार त्यापासून मुक्तता होत नाहीं. ( तात्पर्य, अशुभ जो संसार त्याची उत्पत्ति जर—नित्य कर्मांना फल नाहीं—ही गोष्ट माहीत नसल्यामुळें झालेली नाहीं तर नित्य कर्मांना फल नाहीं ही गोष्ट माहीत झाल्यानें त्या अशुभ संसाराचा नाश होण्याचाही संभव नाहीं. सारांश, ज्याच्या अज्ञानामुळें ज्याची प्रवृत्ति झाली असेल त्याच्या ज्ञानामुळें त्याची निवृत्ति होणें उचित आहे. नित्य कर्मांना फल नाहीं ह्या गोष्टीच्या अज्ञानामुळें जर अशुभप्रवृत्ति झालेली नाहीं तर त्या गोष्टीच्या ज्ञानामुळें अशुभनिवृत्तिही होण्याचा संभवच नाहीं. शिवाय, जी गोष्ट इंद्रियप्रत्यक्ष नसते ती शास्त्रावरून निश्चित करावयाची असते; परंतु ) नित्य कर्मांचें फल नाहीं असें ज्ञान झाल्यानें अशुभापासून मुक्ति हें फल प्राप्त होतें असें कोठें शास्त्रांत सांगितलेलें नाहीं व नित्यकर्मज्ञानानें अशुभनिवृत्ति हें फल

न च भगवतैवेहोक्तम् । एतेनाकर्मणि कर्मदर्शनं प्रत्युक्तं न ह्यकर्मणि कर्मेति दर्शनं कर्तव्यतयेह चोद्यते नित्यस्य तु कर्त-

---

प्राप्त होतें असेंही सांगितलेलें नाहीं. आतां " ह्याविषयीं भगवानांनींच ह्याठिकाणीं सांगितलें आहे " असें कोणी ह्मणूं लागेल; परंतु, तें बरोबर नाहीं. ( कारण, " यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् " हें भगवानांचें वचन साधारणच आहे. " नित्य कर्मांना फल नाहीं असें समजून " असा ज्ञात्वा ह्या शब्दाचा विशेष अर्थ ह्या ठिकाणीं करितां येत नाहीं. ) नित्य कर्मांचें फल नाहीं असें समजल्यानें अशुभापासून मुक्तता होण्याचा संभव नाहीं आणि ह्मणूनच—नित्य कर्माचे ठिकाणीं जो अकर्मदृष्टि करितो तो—असा अर्थ " कर्मण्यकर्म यः पश्येत् " ह्या पूर्वार्धातील पदांचा करितां येत नाहीं; हीं गोष्ट सिद्ध झाली. तेव्हां हाच न्याय लक्ष्यांत घेतला असतां " अकर्मणि च कर्म यः " ह्या पदांचें—नित्यानुष्ठान न करणें प्रत्यवायजनक असल्यामुळें त्या अकर्माचे ठिकाणीं जो कर्मदृष्टि करितो तो—असें जें व्याख्यान केलेलें आहे त्याचें अर्थातच खंडण होऊन जातें. ( त्याचें वेगळें खंडण करण्याची अवश्यकता रहात नाहीं. आतां " नामादिकांचे ठिकाणीं फलाकरितां ज्याप्रमाणें ब्रह्मदृष्टि विहित असते त्याचप्रमाणें नित्यकर्मानुष्ठानाभावरूप अकर्माचे ठिकाणीं कर्मदृष्टि ह्या ठिकाणीं विहित आहे असें मानिलें असतां अशुभापासून मुक्तीचा असंभव नाहीं " असें ह्मणाल तर तें जुळत नाहीं. कारण, ) ह्या श्लोकामध्यें (वृत्तिकारांच्या मतानेंही ) नित्य कर्म करावें येवढेंच विवक्षित आहे. अकर्माचे ठिकाणीं कर्मदृष्टि फलाकरितां करावी असें विधान वृत्तिकारांच्या मतानें मानितां येत नाहीं. ( आतां " वृत्तिकारांच्या मतानेंही नित्य कर्म करावें येवढेंच ह्या श्लोकामध्यें विवक्षित नाहीं; परंतु, नित्य कर्मांच्या अनुष्ठानाकडे लोकांची प्रवृत्ति व्हावी एतदर्थ नित्य कर्मांचें अनुष्ठान केलें नसतां प्रत्यवाय लागतो असें

**व्यतामात्रं न चाकरणान्नित्यस्य प्रत्यवायो भवतीति विज्ञानात्किंचित्फलं स्यान्नापि नित्याकरणं ज्ञेयत्वेन चोदितं नापि कर्माकर्मेति मिथ्यादर्शनादशुभान्मोक्षणं न च बुद्धिमत्त्वं युक्तता कृत्स्नकर्मकृत्त्वादि च फलमुपपद्यते स्तुतिर्वा। मिथ्याज्ञानमेव हि साक्षादशुभरूपं कुतोन्यस्मादशुभान्मोक्षणं न हि**

---

ज्ञानही कर्तव्य ह्मणून वृत्तिकारांच्या मतानें ह्या श्लोकामध्यें विवक्षित आहे " असें ह्मणावें तर तेंही योग्य नाहीं. कारण, नित्य कर्म न केल्यानें प्रत्यवाय लागतो हें ज्ञान झाल्यानें यत्किंचित्ही फल प्राप्त होण्याचा संभव दिसत नाहीं. ( नित्य कर्माच्या अनुष्ठानाकडे प्रवृत्ति होणें हें ह्याचें फल ह्मणतां येत नाहीं. कारण, " अहरहः सन्ध्यामुपासीत" इत्यादि प्रकारच्या विधिवाक्यांवरूनच नित्य कर्माकडे लोकांची प्रवृत्ति होईल. बरें, ह्याशिवाय त्या ज्ञानाचें दुसरें कांहीं फल आहे ह्मणावें तर तें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. तस्मात्, नित्य कर्म न केल्यानें प्रत्यवाय लागतो हें ज्ञान निष्फल असल्यामुळें तें ह्या ठिकाणीं कर्तव्य ह्मणून विवक्षित असण्याचा संभव नाहीं. नित्य कर्माचें अकरण हें ह्या ठिकाणीं जाणावें ह्मणून विवक्षित नाहीं. शिवाय, जें नित्य कर्म तें अकर्म अशी मिथ्या समजूत झाल्यानें अशुभ अशा संसारापासून मुक्तता, बुद्धिमत्त्व, योगीपणा, सर्वकर्मकर्तृत्व इत्यादि फल प्राप्त होण्याचा संभव नाहीं आणि ही प्रशंसा आहे असेंही मानितां येत नाहीं. ( कारण, फलवत्त्व किंवा प्रशंसा खऱ्या खऱ्या ज्ञानाचीच असणें योग्य आहे. मिथ्या ज्ञानापासून फलप्राप्ति होण्याचा संभव नाहीं आणि मिथ्याज्ञानाबद्दल प्रशंसा केल्याचेंही कोठें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. (आतां "स्वप्नामध्यें झालेलें मिथ्या ज्ञानही सफल होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें " अशी वृत्तिकारांच्या बाजूनें शंका घ्यावी तर तीही बरोबर नाहीं. कारण, जें ज्याच्या विरुद्ध असेल तें त्याची निवृत्ति करण्याला समर्थ होईल.

**तमस्तमसो निवर्तकं भवति । ननु कर्मणि यदकर्मदर्शनमकर्मणि वा कर्मदर्शनं न तन्मिथ्याज्ञानं किं तर्हि गौणं फलभावाभावनिमित्तम्। न कर्माकर्मविज्ञानादपि गौणात्फलस्याश्रवणान्नापि श्रुतहान्यश्रुतपरिकल्पनया कश्चिद्विशेषो लभ्यते।**

---

अंधकार अंधकाराची निवृत्ति करण्यास समर्थ होणार नाहीं. सारांश, ) मिथ्या ज्ञान हेंच साक्षात् अशुभस्वरूप आहे. तेव्हां, साक्षात् अशुभ असें जें मिथ्या ज्ञान त्याच्या योगानें दुसऱ्या अशुभापासून पुरुषाची मुक्तता कशी होणार ? अंधकार अंधकाराची निवृत्ति करण्यास समर्थ होत नाहीं.

( शुक्तीकडे लांबून नजर गेल्यावर ती शुक्ति आहे किंवा रजत आहे हें जवळ जाऊन न पहातां अविचारपूर्वक हें रजत असें जें शुक्तीचे ठिकाणीं एकाद्याला ज्ञान होतें तें ज्ञान मिथ्या असें ह्मणतां येईल; परंतु, कर्म आणि अकर्म हीं विवेकानें भासमान होत असतात. तेव्हां ) कर्माचे ठिकाणीं जी अकर्मदृष्टि किंवा अकर्माचे ठिकाणीं जी कर्मदृष्टि तें मिथ्या ज्ञान नव्हे; तर तें फलाभाव आणि फलभाव एतन्निमित्तक गौण ज्ञान होय. ( सारांश, लोकांना जें कर्म दिसतें तें अकर्म अशी जी कर्माचे ठिकाणीं अकर्मदृष्टि तिचे ठिकाणीं फलाभाव हा गुण आहे आणि अकर्माचे ठिकाणीं जी कर्मदृष्टि तिचे ठिकाणीं प्रत्यवायरूप फलाचें अस्तित्व हा गुण आहे, तेव्हां फलाभाव आणि फलभाव एतन्निमित्तक जें ज्ञान तें गौण ज्ञान होय. )असें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, नित्य कर्म हें फलरहित असल्यामुळें अकर्म होय हें ज्ञान गौण जरी मानिलें तरी त्या ज्ञानाचें कांहीं फल श्रुत नाहीं. ( तेव्हां ती गौणता सुद्धां अयोग्यच आहे. आतां " नित्य कर्म हें फलरहित असल्यामुळें अकर्म होय आणि नित्य कर्माच्या अनुष्ठानाचा अभाव हा प्रत्यवायरूप फल उत्पन्न करणारा असल्यामुळें कर्म होय. अशाप्रकारें कर्माकर्मादिविषयक गौण ज्ञान सांगण्याच्या मिषानें नित्य कर्म करावें हें सांगणें

**स्वशब्देनापि शक्यं वक्तुं नित्यकर्मणां फलं नास्त्यकरणाच्च तेषां नरकपातः स्यादिति। तत्र व्याजेन परव्यामोहरूपेण कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादिना किं तत्रैवं व्याचक्षाणेन भगवतोक्तं वाक्यं लोकव्यामोहार्थमिति व्यक्तं कल्पितं स्यात् ।**

---

या ठिकाणीं विवक्षित असल्यामुळें गौण ज्ञानावर अफलत्व हा दोष येत नाहीं " असें कोणी वृत्तिकारांच्या मतानें ह्मणूं लागेल तर तेंही जुळत नाहीं. कारण, ) ज्ञानानें अशुभापासून मुक्ति होते असें जें ह्या श्लोकांत सांगितलें आहे तें सोडून देणें आणि ह्या श्लोकांत सांगितलें नसलेलें जें नित्यकर्मानुष्ठान त्याची कल्पना करणें ह्या खटाटोपानें कांहींही लब्ध होत नाहीं. अहो, नित्य कर्मांचें फल नाहीं; परंतु, तीं न केल्यानें मात्र नरकपात प्राप्त होतो. ह्मणून त्यांच अनुष्ठान केलें पाहिजे असें भगवानांना स्पष्ट शब्दांनीं सांगता येणें शक्य होतें. ( सारांश, स्पष्टार्थवाचक शब्दांचा प्रयोग करूनच जर उद्देश सिद्धीस जाण्याचा संभव आहे तर तो उद्देश सिद्धीस नेण्याकरितां सरळ मार्ग सोडून देऊन भगवानांनीं बुद्ध्याच आडमार्गानें तें सुचविलें अशी कल्पना करणें योग्य नव्हे. ) तात्पर्य, सरळ शब्दांनीं सहज सांगतां येणें शक्य असतांना " कर्मण्यकर्म यः पश्येत् " इत्यादि प्रकारच्या, दुसऱ्याला घोंटाळ्यांत घालणाऱ्या, व्याजोक्तीचें अवलंबन करून भगवानांना काय प्राप्त झालें ? सारांश, अशा प्रकारें वृत्तिकारांच्या मताप्रमाणें व्याख्यान करूं लागणें ह्मणजे " कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः । स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ " हें वचन भगवानांनीं लोकांना घोंटाळ्यांत घालण्याकरितां सांगितलें आहे अशी स्पष्ट कल्पना करणें होय. ( आतां " नित्यकर्मानुष्ठान लोकांचे हातून घडण्याकरितां भगवानांनीं व्याजरूपानेंही तें सांगणें योग्य आहे" असें ह्मणावें तर स्पष्ट शब्दांनीं तसें सांगणें शक्य असतांना व्याजोक्तीनें सांगण्यांत कांहीं विशेष लाभ

न चैतच्छद्मरूपेण वाक्येन रक्षणीयं वस्तु नापि शब्दान्तरेण पुनः पुनरुच्यमानं सुबोधं स्यादित्येवं वक्तुं युक्तम्। कर्मण्येवाधिकारस्त इत्यत्र हि स्फुटतर उक्तार्थो न पुनर्वक्तव्यो भवति सर्वत्र च प्रशस्तं बोद्धव्यं च कर्तव्यमेव न निष्प्रयोजनं बोद्धव्यमित्युच्यते न च मिथ्याज्ञानं बोद्धव्यं भवति तत्प्रत्युपस्थापितं वा वस्त्वाभासम्। नापि नित्यानामकरणादभा-

---

नाहीं हें वर सांगितलेंच आहे. ) नित्यकर्मानुष्ठान ही गोष्ट मोठी गौप्य असून ती ह्या छद्मरूप वचनानें भगवानांनीं गुप्त ठेविली आहे असें ह्मणावें तर तेंही अयोग्यच आहे. ( कारण, तिसऱ्या अध्यायामध्यें नित्यकर्मानुष्ठान स्पष्टपणें सांगितलेलें आहे. आतां " चांगलें ज्ञान होण्याकरितां ज्याप्रमाणें ठिकठिकाणीं आत्मप्रतिपादन फिरून फिरून अनेक प्रकारांनीं केलेलें असतें त्याचप्रमाणें ) वेगवेगळ्या शब्दांनीं पुन्हां पुन्हां नित्यकर्मानुष्ठान सांगितलें असतां सुबोध होईल ह्मणून ह्या ठिकाणीं व्याजोक्तीनें त्याचें प्रतिपादन केलें आहें " ह्मणून ह्मणावें तर तेंही योग्य नाहीं. कारण, " कर्मण्येवाधिकारस्ते " ह्या तिसऱ्या अध्यायांतील वचनामध्यें ज्या गोष्टीचें अगदीं स्पष्टपणें प्रतिपादन केलें त्याच गोष्टीचें चांगलें ज्ञान होण्याकरितां पुनरपि ह्या ठिकाणीं व्याजोक्तीनें प्रतिपादन करण्याचें कारण उरत नाहीं. शिवाय, ( व्यवहारामध्यें अथवा शास्त्रामध्यें ) सर्व ठिकाणीं जें प्रशस्त असेल आणि जें करण्याला योग्य असेल तेंच बोद्धव्य ह्मणजे समजून घेण्यास योग्य असें ह्मणत असतात. ज्याचें कांहीं फल नाहीं ( आणि जें प्रशस्त नाहीं ) त्याला बोद्धव्य असें ह्मणत नाहींत. जें ज्ञान मुळींच मिथ्या आहे तें कधींही बोद्धव्य ( ह्मणजे समजून घेण्यास योग्य ) होत नाहीं आणि मिथ्या ज्ञानाला विषयभूत जी वस्तु ती वास्तविक वस्तु नसून वस्त्वाभास असल्यामुळें तीही बोद्धव्य होत नाहीं. ( नित्य कर्मांचें अकरण प्रत्यवायोत्पादक असल्यामुळें त्या

**वात्प्रत्यवायभावोत्पत्तिर्नासतो विद्यते भाव इति वचनात्कथमसतः सज्जायेतेति च दर्शितम्। असतः सज्जन्मप्रतिषेधादसतः सदुत्पत्तिं ब्रुवतासदेव सद्भवेत्सच्चाप्यसद्भवेदित्युक्तं स्यात्। तच्चायुक्तं सर्वप्रमाणविरोधात्। न च निष्फलं विदध्यात्कर्म शास्त्रं दुःखस्वरूपत्वाद्दुःखस्य च बुद्धिपूर्वकतया कार्यत्वा-**

---

अकरणाचे ठिकाणीं गौण अर्थानें कर्मशब्दाचा प्रयोग करण्याला हरकत नाहीं. कारण, प्रत्यवायहेतुत्व हेंच गौण अर्थानें त्याचा प्रयोग करण्याचें निमित्त होय असें जें पूर्वीं वृत्तिकारांच्या बाजूचें ह्मणणें होतें तेंही बरोबर नाहीं. कारण, ) नित्य कर्माचें अकरण हें अभावरूप असल्यामुळें त्या अभावरूप अकरणापासून प्रत्यवाय ह्या भावाची उत्पत्ति होणार नाहीं. " नासतो विद्यते भावः " असें भगवानांचें दुसऱ्या अध्यायामध्यें वचन आहे आणि " कथमसतः सज्जायेत " ह्या श्रुतीमध्येंही अभावापासून भावाची उत्पत्ति होण्याचा संभव नाहीं ह्मणून दर्शविलें आहे. तात्पर्य, अभावापासून भावाच्या उत्पत्तीचा निषेध श्रुतीनेंही केला असल्यामुळें नित्यानुष्ठानाकरणरूप अभावापासून प्रत्यवायरूप भावाची उत्पत्ति होते असें जे ह्मणत असतील त्यांनीं, अभाव हाच भाव होतो आणि भाव हाच अभाव होतो, असें ह्मटल्यासारखें होईल. परंतु, सर्व प्रमाणांना विरोध येत असल्यामुळें हें त्यांचें ह्मणणें अयोग्य आहे. शिवाय, ( फलाचा अभाव हेंच नित्य कर्माचे ठिकाणीं "अकर्म" ह्या शब्दाचा प्रयोग गौण अर्थानें करण्याचें निमित्त होय. ह्मणून जें वृत्तिकारांच्या बाजूनें पूर्वीं प्रतिपादन करण्यांत आलें होतें तेंही बरोबर नाहीं. कारण, ) निष्फल कर्म दुःखस्वरूप असल्यामुळें शास्त्र त्याचें विधान कधींही करणार नाहीं आणि दुःखाला बुद्धिपूर्वक कार्यत्व कधींही येण्याचा संभव नाहीं. ( सारांश, दुःख ही गोष्ट साध्य करून घेण्याकरितां कोणीही बुद्धिपूर्वक यत्न करणार नाहीं. आतां " नित्य कर्माचें स्वर्गादि फल

नुपपत्तेस्तदकरणे च नरकपाताभ्युपगमेनर्थायैवोभयथापि करणेकरणे च शास्त्रं निष्फलं कल्पितं स्यात् । स्वाभ्युपगमविरोधश्च नित्यं निष्फलं कर्मेत्यभ्युपगम्य मोक्षफलायेति ब्रुवतः । तस्माद्यथाश्रुत एवार्थः कर्मण्यकर्मेत्यादेस्तथा च व्याख्यातोस्माभिः श्लोकः ॥ १८ ॥

---

जरी नसलें तरी तीं न केल्यामुळें प्राप्त होणारा जो नरकरूप प्रत्यवाय त्याचा निरास होण्याकरितां दुःखरूपही नित्य कर्मांचें अनुष्ठान करावें" असें ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं ) कारण, नित्य कर्मांचें अकरण नरकपाताला कारणीभूत होतें असें मानिलें ह्मणजे नित्य कर्मांचें अनुष्ठान करणें आणि न करणें ह्यांपैकीं कांहीं झालें तरी तद्विषयक शास्त्र व्यर्थ कल्पित केलें आहे असें होणार आणि मोक्षरूप फल प्राप्त होण्याकरितां नित्य कर्म करावें असें वृत्तिकारांच्या बाजूनें कोणाचें ह्मणणें असेल तर नित्य कर्म निष्फल हें मत धरून चालणाऱ्या त्याच्या स्वमताशींच विरोध येतो. तस्मात्, "कर्मण्यकर्म यः पश्येत्" ह्या श्लोकाचा अर्थ यथाश्रुतच केला पाहिजे आणि हा यथाश्रुत अर्थ करून आह्मीं श्लोकाचें व्याख्यानही केलेलें आहे १८.

( "परमेश्वराराधनलक्षणे कर्मणि विषयेऽकर्म कर्मेदं न भवतीति यः पश्येत्तस्य ज्ञानहेतुत्वेन बन्धकत्वाभावात् । अकर्मणि च विहिताकरणे कर्म यः पश्येत्प्रत्यवायापादकत्वेन बन्धहेतुत्वात्" असें श्रीधरस्वामींनीं ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें व्याख्यान भाष्यविरुद्ध केलें आहे व त्याचा अर्थ—परमेश्वराराधनरूप जें कर्म तें ज्ञानोत्पत्तीला कारण असल्यानें बंधाला कारण होत नसल्यामुळें कर्म होत नाहीं असें जो जाणितो आणि विहिताकरण हें प्रत्यवायजनक असल्यानें बंधाला कारण होत असल्यामुळें कर्म आहे असें जो जाणितो—असा आहे. परंतु, हें व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, नित्य कर्माला फल नाहीं ह्मणून तें कर्मच नव्हे

आणि नित्य कर्म न केलें तर प्रत्यवाय लागतो ह्मणून नित्य कर्म न करणें हें कर्मच आहे येवढें ज्ञान झाल्यानें अशुभ जो संसार त्याच्यापासून मुक्तता होण्याचा संभव नाहीं आणि ह्मणूनच असा अर्थ केला असतां " यज्ज्ञात्वा मोक्षसेशुभात् " ह्या भगवानांच्या उक्तीला बाध येऊं लागेल. ज्यांना अनुष्ठानाची अपेक्षा आहे अशीं जीं नित्य कर्में त्यांचें फल नाहीं येवढें ज्ञान झाल्यानें अशुभापासून मुक्तता होत नाहीं आणि ईश्वराराधनरूप कर्म हें अकर्म आणि तें न करणें हें कर्म हें मिथ्या ज्ञानच अशुभस्वरूप असल्यामुळें अशा ज्ञानाच्या योगानें दुसऱ्या अशुभापासून मुक्तता होण्याचा संभव नाहीं. कारण, अंधकार अंधकाराचा नाशक कधींही होत नाहीं. शिवाय, अकर्म हें अभावरूप असल्यामुळें त्याच्यापासून भावरूप प्रत्यवायाची उत्पत्ति होते असें ह्मणणें " कथमसतः सज्जायेत " ह्या श्रुतीशीं विरुद्ध आहे. सारांश, श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं व अशा प्रकारचें व्याख्यान बरोबर नाहीं असें भाष्यांतही दर्शविलें असल्यामुळें येथें त्याचें विशेष खंडण करण्याचें कारण दिसत नाहीं. मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाचें एक व्याख्यान भाष्यकारांप्रमाणें केलें असून दुसरेंही एक व्याख्यान ह्याप्रमाणें केलें आहे:—

" कर्मणि ज्ञानकर्मणि दृश्ये जडे सद्रूपेण स्फुरणरूपेण चानुस्यूतं सर्वभ्रमाधिष्ठानमकर्मावेद्यं स्वप्रकाशचैतन्यं परमार्थदृष्ट्या यः पश्येत्तथाकर्मणि च स्वप्रकाशदृग्वस्तुनि कल्पितं कर्म दृश्यं मायामयं न परमार्थसत्। दृग्दृश्ययोः संबन्धानुपपत्तेः। यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति। सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सत इति श्रुतेः। एवं परस्पराध्यासेपि शुद्धं वस्तु यः पश्यति मनुष्येषु मध्ये स एव बुद्धिमान्नान्यः। अस्य परमार्थदर्शित्वादन्यस्य चापरमार्थदर्शित्वात्। स च बुद्धिसाधनयोगयुक्तोन्तःकरणशुद्ध्यैकाग्रचित्तोतः स एवान्तःकरणशुद्धिसाधनः कृत्स्नकर्मकृदिति वास्तवधर्मैरेव स्तूयते। यस्मादेवं तस्मात्त्वमपि परमार्थदर्शी भव

तावतैव कृत्स्नकर्मकारित्वोपपत्तेरित्यभिप्रायः "। ह्या व्याख्यानाचें तात्पर्य असें आहे:—

"दृश्य व जड असें जें ज्ञानकर्म त्याचे ठिकाणीं स्फुरणरूपानें सर्व भ्रमाधिष्ठान असें जें स्वप्रकाशचैतन्य तें अनुस्यूत आहे असें जो खरोखर समजेल आणि त्याचप्रमाणें अकर्माचे ठिकाणीं ह्मणजे स्वप्रकाश अशी जी दृग्वस्तु तिचे ठिकाणीं कल्पित जें दृश्यकर्म तें मायामय आहे; वास्तविक त्याला सत्ता नाहीं. कारण, "यस्तु सर्वाणि भूतानि" अशी श्रुति असल्यामुळें दृक् आणि दृश्य ह्यांचा संबंध होणें संभवनीय नाहीं. ह्याप्रमाणें परस्पराध्यासामध्येंही शुद्ध आत्मा जो अवलोकन करितो तोच मनुष्यांमध्यें बुद्धिमान्; दुसरा नाहीं. कारण, ह्याची समजूत वास्तविक खरी आहे आणि दुसऱ्याची वास्तविक खरी नाहीं. ज्ञानसाधनरूप योगानेंही तोच युक्त आहे. अर्थात् अंतःकरणशुद्धि करून एकाग्रचित्त झालेला असा तोच आहे आणि ह्मणूनच अंतःकरणशुद्धीला साधनभूत अशीं सर्व कर्में करणाराही तोच आहे. ह्मणून ज्ञानी पुरुषाची वास्तविक गुणांनींच स्तुति केलेली आहे. सारांश, ज्याअर्थीं असें आहे त्याअर्थीं, अर्जुना, तूंही परमार्थदर्शी हो. कारण, तेवढ्यानेंच सर्वकर्मकर्तृत्व प्राप्त होतें".

परंतु, हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, घटादिरूप जें ज्ञानकर्म त्याचें प्रकरण तूर्त चाललेलें नाहीं. "एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः । कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५॥" असा उपक्रम प्रथम केला. नंतर "किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः" ह्या श्लोकामध्यें कर्म कोणतें आणि अकर्म कोणतें हें जाणणें दुर्घट आहे ह्मणून दर्शविलें आणि "कर्मणो ह्यपि बोद्धव्यं" ह्या श्लोकामध्यें कर्म, अकर्म व विकर्म ह्यांचें तत्त्व जाणिलें पाहिजे ह्मणून भगवानांनीं दर्शविलें. तेव्हां प्रकरणाकडे पाहूं गेलें असतां जें तत्त्व बोद्धव्य ह्मणून पूर्वींच्या श्लोकांत सांगितलें त्याचेंच प्रतिपादन ह्या

श्लोकांत असणें योग्य आहे आणि असेंच समजून भाष्यकारांनीं ह्या श्लोकाचें सरळ व्याख्यान केलें आहे. ज्ञानकर्माचें प्रकरण ह्या ठिकाणीं चाललेलें नाहीं आणि ह्मणूनच मधुसूदनसरस्वतींचें व्याख्यान बरोबर नाहीं. नीलकंठपंडितांनींही एक वैकल्पिक व्याख्यान केलें आहे तें येणें प्रमाणें:—

कर्माकर्मणी वक्तव्यत्वेन बोद्धव्यत्वेन चोपक्षिप्यात्र तयोर्लक्षणप्रदर्शनमुचितम् । अतो यदकर्मणा विशेषितं तदेव कर्म नान्यादिति कर्मलक्षणं यच्च कर्मणा विशेषितं तदेवाकर्मेत्यकर्मलक्षणमिति व्याख्येयम् । अक्षरार्थस्तु कर्म यज्ञादिकं ससाधनं तदकर्म स्पन्दशून्यं कूटस्थं ब्रह्म यः पश्येत्कर्मतदङ्गेषु ब्रह्मदृष्टिमध्यसेत् । अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् । मन्त्रोहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतमित्युक्तेः । अन्यथा यत्कृतं तद्वृथाचेष्टारूपमेवातो गहना कर्मणो गतिः । किं तदकर्म यत्कर्मण्यध्यस्यत इत्याकाङ्क्षायां यत्रैतत्कर्म पुण्यपापात्मकं दृश्यते पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति तत्फलं च सुखदुःखादिकमहं सुख्यहं दुःखीति स प्रत्यक्चेतनोकर्म तत्रैवेदं कर्मास्पन्दे स्पन्दात्मकमसर्पे सर्प इवाध्यस्तमिति यः पश्येदिति । ”

ह्या व्याख्यानाचें तात्पर्य असें आहे:—

“ तत्तेकर्म प्रवक्ष्यामि ”, “कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं ” ह्मणून कर्म व अकर्म हीं कोणतीं तें मी तुला सांगेन व त्यांचें तत्त्व जाणिलें पाहिजे असें भगवानांनीं सोळाव्या व सतराव्या श्लोकांत सांगून ठेविलें आहे. तेव्हां, कर्म आणि अकर्म ह्यांचें लक्षण दर्शविणें उचित आहे व तें ह्या श्लोकांत त्यांनीं दर्शविलें आहे. तस्मात्, ज्याला अकर्म असें ह्मणतात तेंच कर्म; इतर कर्म नव्हे; हें कर्माचें लक्षण होय आणि ज्याला कर्म असें ह्मणतात तेंच अकर्म; हें अकर्माचें लक्षण होय. असें पूर्वार्धाचें व्याख्यान करावें. ह्यांतील शब्दांचा अक्षरशः अर्थ असा:—कर्म ह्मणजे यज्ञादिक व त्याचीं साधनें. ह्या साधनांसह वर्तमान यज्ञादिरूप कर्माला जो अकर्म समजतो ह्मणजे

कर्मशून्य निर्विकार ब्रह्म हेंच साधनांसहवर्तमान यज्ञादिरूप कर्म होय असें जों जाणितो; अर्थात् यज्ञादि कर्मे आणि त्यांचीं अंगें ह्यांचे ठिकाणीं " अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाह० " ह्या वचनांत सांगितल्याप्रमाणें जो ब्रह्मदृष्टि करितो तो. ह्याशिवाय जें केलें जातें ती केवळ व्यर्थ चेष्टा होय आणि ह्मणूनच कर्मतत्त्व गहन असें ह्मटलें आहे. आतां कर्माचे ठिकाणीं ज्याचा अध्यास करावयाचा तें अकर्म कोणतें ही शंका उरली. तेव्हां, " पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन " ह्या श्रुतीला अनुसरून ज्या ठिकाणीं हें पुण्यपापात्मक कर्म दृष्टोत्पत्तीस येतें आणि त्या पुण्यपापात्मक कर्माचें फल सुखदुःखादिक, मी सुखी मी दुःखी इत्यादि प्रकारें, ज्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतें तो प्रत्यगात्मा अकर्म आहे आणि निश्चल असा जो आत्मा त्याचेच ठिकाणीं हें चलनात्मक कर्म सर्प नसलेल्या रज्जूचे ठिकाणीं सर्पाप्रमाणें अध्यस्त आहे असें जो जाणितो तो बुद्धिमान् " असें नीलकंठपंडितांनीं एक वैकल्पिक व्याख्यान केलें आहे. परंतु, प्रकरणविरोध हा दोष मधुसूदनसरस्वतींच्या व्याख्यानाप्रमाणें ह्याही व्याख्यानावर सारखाच येत आहे. स्वस्थ बसणें हा अकर्मशब्दाचा लोकप्रसिद्ध अर्थ घेऊन हें वचन सांगितलेलें आहे. तेव्हां, तो अर्थ न करितां प्रत्यक् चैतन्य असा अर्थ अकर्म शब्दाचा करणें योग्य नाहीं. त्याचप्रमाणें " कर्मण्यकर्म यः पश्येत् " ह्या ठिकाणींही कर्माच्या उलट असाच अर्थ अकर्म ह्या शब्दाचा विवक्षित आहे. शिवाय, यज्ञरूप जें कर्म त्या कर्माचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टीचा अध्यास जरी केला तरी फलेच्छा आणि कर्तृत्वाभिनिवेश ह्यांचा त्याग झाल्यावांचून अशुभापासून मुक्तता होण्याचा संभव नाहीं आणि ह्मणूनच यज्ञरूप कर्माचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टीचा जो अध्यास करितो असा अर्थ " कर्मण्यकर्म यः पश्येत् " ह्या पदांचा करितां येत नाहीं. सारांश, भाष्यकारांनीं केलेलेंच व्याख्यान स्वीकारिल्यावांचून गत्यंतरच नाहीं १८. )

यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ १९ ॥

---

तदेतत्कर्मादावकर्मादिदर्शनं स्तूयते यस्य० बुधाः ॥ १९ ॥ यस्य यथोक्तदर्शिनः सर्वे यावन्तः समारम्भाः कर्माणि समारभ्यन्त इति समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः कामैस्तत्कारणैश्च संकल्पैर्वर्जिता मुधैव चेष्टामात्रा अनुष्ठीयन्ते प्रवृत्तेन चेल्लोकसंग्रहार्थं निवृत्तेन चेज्जीवनमात्रार्थं तं ज्ञानाग्निदग्धकर्माणं कर्मादावकर्मादिदर्शनं ज्ञानं तदेवाग्निस्तेन ज्ञानाग्निना दग्धानि शुभाशुभलक्षणानि कर्माणि यस्य तमाहुः परमार्थतः पण्डितं बुधा ब्रह्मविदः ॥ १९ ॥

---

ज्याचीं सर्व कर्में फलतृष्णा व कर्तृत्वाभिमान ह्यांनीं रहित असतात त्याला ब्रह्मवेत्ते ज्ञानाग्नीनें कर्में दग्ध झालेला पंडित ह्मणतात ॥ १९ ॥

कर्माचे ठिकाणीं अकर्मदर्शन आणि अकर्माचे ठिकाणीं कर्मदर्शन जें पूर्वीच्या श्लोकांत सांगितलेलें आहे त्याची प्रशंसा ह्या श्लोकांत केली आहे. पूर्वीच्या वचनांत सांगितल्याप्रमाणें कर्माचे ठिकाणीं अकर्मदृष्टि व अकर्माचे ठिकाणीं कर्मदृष्टि ठेवणाऱ्या ज्या पुरुषाचीं सर्व कर्में कामना आणि त्यांना कारणीभूत असलेले संकल्प ह्यांनीं रहित असतात ह्मणजे प्रवृत्तिमार्गामध्यें असल्यास लोकसंग्रहाकरितां आणि निवृत्तिमार्गामध्यें असल्यास जीवनाकरितांच ज्याच्या नित्यकर्मांचें अनुष्ठान केवल व्यर्थ हालचालीप्रमाणें होत असतें त्याला ब्रह्मवेत्ते खरोखर ज्ञानाग्नीनें ज्याचीं कर्में दग्ध झालीं आहेत असा पंडित ह्मणतात. ज्यांचा आरंभ केला जातो ते समारंभ अर्थात् कर्में. काम आणि त्यांना कारणीभूत संकल्प ह्यांनीं जे रहित असतात ते कामसंकल्पवर्जित होत. कर्माचे ठिकाणीं अकर्मदृष्टि आणि अकर्माचे ठिकाणीं कर्मदृष्टि हें जें ज्ञान तोच कोणी अग्नि होय. ह्या ज्ञानाग्नीच्या योगानें ज्याचीं पुण्य-

त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः ॥
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥२०॥

यस्त्वकर्मादिदर्शी सोऽकर्मादिदर्शनादेव निष्कर्मा संन्यासी जीवनमात्रार्थचेष्टः सन्कर्मणि न प्रवर्तते यद्यपि प्राग्विवेकतः प्रवृत्तः । यस्तु प्रारब्धकर्मा सन्नुत्तरकालमुत्पन्नात्मसम्यग्दर्शनः स्यात्स कर्मणि प्रयोजनमपश्यन्ससाधनं कर्म परित्यजत्येव । स कुतश्चिन्निमित्तात्कर्मपरित्यागासंभवे सति कर्मणि तत्फले च सङ्गरहिततया स्वप्रयोजनाभावाल्लोकसंग्र-

पापरूप कर्में दग्ध झालीं असतील त्याला हा " ज्ञानाग्निदग्धकर्माणं " ह्या पदाचा अर्थ होय १९.

कर्मफलाविषयीं आसक्ति न धरितां विषयाविषयीं नित्य तृप्त होऊन आणि ह्मणूनच दृष्ट अथवा अदृष्ट अशा कोणत्याही फलाच्या साधनाचें अवलंबन न करितां ( लोकदृष्टीनें ) कर्मामध्यें प्रवृत्त झालेलाही जो असेल तो वस्तुतः कांहींच करीत नाहीं ॥ २० ॥

जो कर्मादिकांचे ठिकाणीं अकर्म वगैरे अवलोकन करितो तो विवेक होण्याचे पूर्वी जरी कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त झालेला असला तरी नंतर विवेकाच्या योगानें झालेल्या त्या अकर्मादिविषयक ज्ञानामुळेंच कर्मरहित ह्मणजे संन्यासी, अर्थात् जीवनापुरतीच ज्याची हालचाल आहे असा, बनून कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त होत नाहीं. जो प्रथम कर्मामध्यें प्रवृत्त झाला असेल त्याला कर्मप्रवृत्तीनंतर त्याचे ठिकाणीं आत्मविषयक दृढ ज्ञान जर उत्पन्न झालें तर कर्मामध्यें त्याला कांहीं एक अर्थ दिसेनासा होऊन तो साधनांसहवर्तमान त्या कर्माचा त्याग करतोच करतो. ( लोकसंग्रह वगैरे ) कांहीं कारणांमुळें त्याचे हातून जर कर्मपरित्याग होणें संभवनीय नसेल तर पूर्वीप्रमाणें लोकसंग्रहार्थ जरी तो कर्मामध्यें प्रवृत्त झालेला असला तरी त्याला स्वतःला त्या कर्माची

हार्थं पूर्ववत्कर्मणि प्रवृत्तोपि नैव किंचित्करोति ज्ञानाग्निदग्धकर्मत्वात्तदीयं कर्माकर्मैव संपद्यत इत्येतमर्थं दर्शयिष्यन्नाह

त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः । कर्म० रोति सः ॥ २० ॥ त्यक्त्वा कर्मस्वभिमानं फलासङ्गं च यथोक्तेन ज्ञानेन नित्यतृप्तो निराकाङ्क्षो विषयेष्वित्यर्थः । निराश्रय आश्रयरहितः । आश्रयो नाम यदाश्रित्य पुरुषार्थं सिषाधयिषति दृष्टादृष्टेष्टफलसाधनाश्रयरहित इत्यर्थः । विदुषा क्रियमाणं कर्म परमार्थतोकर्मैव तस्य निष्क्रियात्मदर्शनसंपन्न-

---

जरूर नसल्यामुळें कर्म आणि कर्मफल ह्यांचे ठिकाणीं आसक्ति न धरितां कर्म करीत राहिलेला तो पुरुष वस्तुतः कांहीं एक करीत नाहीं. कारण, ज्ञानाग्नीच्या योगानें त्याचीं पुण्यपापात्मक कर्मे दग्ध झालीं असल्यामुळें त्यानें केलेलें कर्म अकर्मच होतें असें दर्शविण्याच्या उद्देशानें भगवानांनीं " त्यक्त्वा कर्मफलासङ्गं " हा श्लोक सांगितला आहे. वर सांगितलेल्या आत्मज्ञानाच्या योगानें कर्माविषयीं अभिमान व फलासक्ति सोडून देऊन नित्यतृप्त ह्मणजे विषयांविषयीं निरिच्छ आणि निराश्रय ह्मणजे दृष्ट अथवा अदृष्ट अशा कोणत्याही इष्टफलप्राप्तीच्या साधनाचा अवलंब न करितां असलेला पुरुष कर्मामध्यें जरी प्रवृत्त झालेला असला तरी कांहींच करीत नाहीं. "नित्यतृप्तः" ह्मणजे विषयांविषयीं निरपेक्ष. "निराश्रयः" ह्मणजे आश्रयरहित. ज्याचें अवलंबन करून आपला उद्देश सिद्धीस नेण्याची पुरुष इच्छा करीत असतो त्याला आश्रय असें ह्मणतात. तेव्हां—दृष्ट अथवा अदृष्ट असें कोणतेंही इष्ट फल प्राप्त होण्याच्या साधनाचें ज्यानें अवलंबन केलेलें नाहीं—हा ह्या श्लोकांतील " निराश्रयः " ह्या पदाचा अर्थ होय. ज्ञानवान् पुरुषाच्या हातून जें कर्म होत असतें तें वस्तुतः अकर्मच असतें. कारण, निष्क्रिय जो आत्मा त्याचें ज्ञान त्याला झालेलें असतें ( ह्मणून त्या कर्माचा त्याचे ठिकाणीं

स्वात् । तेनैवंभूतेन प्रयोजनाभावात्ससाधनं कर्म परित्यक्त-व्यमेवेति प्राप्ते ततो निर्गमासंभवाल्लोकसंग्रहचिकीर्षया शिष्ट-विगर्हणापरिजिहीर्षया वा पूर्ववत्कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि निष्क्रि-यात्मदर्शनसंपन्नत्वान्नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥

---

कांहीं एक परिणाम होत नाहीं. ) तेव्हां, अशा प्रकारचा जो ज्ञान-वान् पुरुष त्याला स्वतः कांहीं प्रयोजन रहात नसल्यामुळें साधनांसह-वर्तमान कर्माचा त्याग करणेंच जरी प्राप्त झालें आहे तरी ( आपल्या-वर्तनामुळें ) लोकांची प्रवृत्ति उन्मार्गाकडे होऊं नये ह्मणून किंवा आपण कर्मत्याग केला असतां शिष्ट लोक निंदा करतील ती होऊं नये ह्मणून जरी तो लोकदृष्टीनें पूर्वी ( अज्ञानावस्थेंत असल्या ) प्रमाणें कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त झालेला असला तरी निष्क्रियात्मज्ञान त्याला पूर्ण झालें अस-ल्यामुळें तो ( स्वतःच्या दृष्टीनें ) कांहींच करीत नाहीं. ( सारांश, तत्त्व-ज्ञानी पुरुषाशीं क्रियमाण कर्माचा कांहीं एक संबंध रहात नाहीं ) २०.

( " भवतु ज्ञानाग्निना प्राक्तनानामप्रारब्धकर्मणां दाह आगामिनां चानु-त्पत्तिः । ज्ञानोत्पत्तिकाले क्रियमाणं तु पूर्वोत्तरयोरनन्तर्भावात्फलाय भवेदिति भवेत्कस्यचिदाशंका तामपनुदति " असें मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकाला अवतरण दिलें आहे व त्याचें तात्पर्य " ज्ञानाग्नीच्या योगानें ज्यांच्या फलोपभोगाला आरंभ झालेला नाहीं अशा प्राक्तन कर्मांचा दाह होऊन भावी कर्मांची उत्पत्ति होणार नाहीं. परंतु, ज्ञानो-त्पत्तिकालीं केलें जाणारें जें कर्म त्याचा पूर्वींच्या कर्मांत व नंतरच्या कर्मांत अंतर्भाव होत नसल्यामुळें कदाचित् तें क्रियमाण कर्म फलद्रूप होऊं लागेल अशी कोणाला शंका येईल तिचें निरसन भगवानांनीं ह्या वचनांत केलेलें आहे " असा आहे. परंतु, भाष्याला धरून नस-लेलें हें अवतरण बरोबर नाहीं. कारण, " यस्य सर्वे समारम्भाः " हा मूळ श्लोक व त्यावरील भाष्य ह्यांचें अवलोकन केलें असतां ज्ञानानंतर

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥२१॥**

---

क्रियमाण कर्माचा संबंध ज्ञानी पुरुषाला होत नसल्याचें स्पष्ट दिसत आहे. इतकेंच नव्हे परंतु, " एवंभूतो जीवन्मुक्तो व्युत्थानदशायां कर्मणि वैदिके लौकिके वाभिप्रवृत्तोपि....नैव किंचित्करोति स निष्क्रियात्मदर्शनेन बाधितत्त्वादित्यर्थः । " असें जें व्याख्यान ह्या श्लोकांतील उत्तरार्धाचें प्रत्यक्ष मधुसूदनसरस्वतींनींच केलेलें आहे त्यावरूनही ज्ञानोत्तरकालीं क्रियमाण कर्माचा संपर्क ज्ञानी पुरुषाला होत नाहीं असें स्पष्ट सिद्ध होत आहे. तेव्हां, वास्तविक ह्मटलें असतां मधुसूदनसरस्वतींनीं जी शंका घेऊन अवतरण दिलें आहे ती घेण्याचें कारणच नाहीं. ज्ञानोत्पत्तिकालीं ह्याचा तरी अर्थ काय करावयाचा ? ज्ञानोत्पत्ति ज्या क्षणीं झाली असेल त्या क्षणामध्यें असा अर्थ करावा तर त्या क्षणामध्यें पापपुण्यांचा असंभव आहे. आतां ज्ञानोत्पत्तिकालीं ह्याचा अर्थ ज्ञानसाधनांच्या अनुष्ठानाचे कालीं असा करावा तर त्या वेळीं होणाऱ्या कर्मांचा अंतर्भाव पूर्व कर्मांमध्येंच होत असल्यामुळें मधुसूदनसरस्वतींच्या शंकेलाच अवकाश रहात नाहीं. ह्या शंकेला जर जागा रहाती तर भगवान् वेदव्यासांनींही त्याकरितां कांहीं तरी वेगळें सूत्र करून ठेविलें असतें; परंतु " तदधिगम उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् " एवढ्याच सूत्रावर त्यांनीं भागविलें आहे. तात्पर्य, मधुसूदनसरस्वतींनीं जी शंका घेतली आहे ती संभवत नाहीं आणि ह्मणूनच भाष्यानुसारी नसलेलें त्यांचें अवतरण मान्य करितां येत नाहीं २० )

अंतःकरण आणि बाह्य इंद्रियांसहवर्तमान देह ह्यांचें संयमन केल्यामुळें निरिच्छ आणि सर्व प्रकारच्या भोगसाधनांचा त्याग केलेला पुरुष शरीर चालण्याला अवश्यक इतकेंच कर्म केवळ करीत असेल तर त्याला संसार प्राप्त होत नाहीं ॥ २१ ॥

**यः पुनः पूर्वोक्तविपरीतः प्रागेव कर्मारम्भाद्ब्रह्मणि सर्वान्तरे प्रत्यगात्मनि निष्क्रिये संजातात्मदर्शनः स दृष्टादृष्टेष्टविषयाशीर्विवर्जिततया दृष्टादृष्टार्थे कर्मणि प्रयोजनमपश्यन्ससाधनं कर्म संन्यस्य शरीरयात्रामात्रचेष्टो यतिर्ज्ञाननिष्ठो मुच्यत इत्येतमर्थं दर्शयितुमाह निराशीर्य ० किल्बिषम् ॥२१॥ निराशीर्निर्गता आशिषो यस्मात्स निराशीः । यतचित्तात्मा चित्तमन्तःकरणमात्मा बाह्यः कार्यकरणसंघातस्तावुभावपि यतौ संयतौ येन स यतचित्तात्मा । त्यक्तसर्वपरिग्रहस्त्यक्तः सर्वः परिग्रहो येन स त्यक्तसर्वपरिग्रहः । शारीरं शरीरस्थिति-**

---

जो पूर्वी सांगितलेल्या पुरुषाहून विपरीत असेल अर्थात् लोकसंग्रहादिकांची ज्याला परवा नसेल त्याला कर्मारंभाचे पूर्वीच सर्वांतर आणि प्रत्यगात्मस्वरूप असें जें निष्क्रिय ब्रह्म तेंच आपलें स्वरूप आहे असें ज्ञान झालें असल्यामुळें दृष्ट आणि अदृष्ट अशा कोणत्याही इष्ट विषयाची परवा नसल्याकारणानें दृष्टफलक अथवा अदृष्टफलक कर्माशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं असें समजून साधनांसहवर्तमान सर्व कर्मांचा तो त्याग करितो आणि शरीर चालण्याला अवश्यक येवढाच व्यापार ज्याचा अवशिष्ट राहिलेला आहे असा तो ज्ञाननिष्ठ यति संसारापासून मुक्त होतो. हें दर्शविण्याकरितां भगवानांनीं " निराशीर्यतचित्तात्मा ० कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥ " हा श्लोक सांगितला आहे. चित्त ह्मणजे अंतःकरण आणि आत्मा ह्मणजे बाह्य इंद्रियांसहवर्तमान देह ह्या उभयतांचें ज्यानें संयमन केलें आहे तो यतचित्तात्मा होय. आशी ह्मणजे तृष्णा ज्याच्यापासून गेलेल्या आहेत तो निराशीः होय. ज्यानें कांहींही ( भोगसाधनें ) जवळ न ठेवितां यच्चयावत् सर्व वस्तूंचा त्याग केलेला आहे तो त्यक्तसर्वपरिग्रह होय. तेव्हां अंतःकरण आणि बाह्य इंद्रियांसहवर्तमान देह ह्यांचें संयमन केलें असल्यामुळें तृष्णारहित व सर्व-

मात्रप्रयोजनं केवलं तत्राप्यभिमानवर्जितं कर्म कुर्वन्नाप्नोति न प्राप्नोति किल्बिषमनिष्टरूपं पापं धर्मं च। धर्मोपि मुमुक्षोः किल्बिषमेव बन्धापादकत्वात् । किं च शारीरं केवलं कर्मेत्यत्र किं शरीरनिर्वर्त्यं शारीरं कर्माभिप्रेतमाहोस्विच्छरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं कर्मेति । किं चातो यदि शरीरनिर्वर्त्यं शारीरं कर्म यदि वा शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरमित्युच्यते यदा शरीरनिर्वर्त्यं कर्म शारीरमभिप्रेतं स्यात्तदा दृष्टादृष्टप्रयोजनं कर्म प्रतिषिद्धमपि शरीरेण कुर्वन्नाप्नोति किल्बिषमिति ब्रुवतो विरुद्धाभिधानं प्रसज्येत ।

---

परिग्रहशून्य झालेला पुरुष शरीरस्थितीला अवश्यक एवढेंच कर्म अभिमानरहित करीत असल्यानें त्याला किल्बिष ह्मणजे अनिष्ट असा पापपुण्यफलरूप संसार प्राप्त होत नाहीं. मुमुक्षुला पुण्यही बंधाला कारणीभूत होत असल्यामुळें अनिष्टच आहे. आतां " शारीरं केवलं कर्म " ह्या पदांचा अर्थ शरीरानें होणारें कर्म तें शारीर कर्म आणि शरीर कायम रहाणें एवढेंच ज्याचें प्रयोजन आहे तें शारीर कर्म असा दोनप्रकारें होण्याचा संभव आहे. त्यांपैकीं ह्या ठिकाणीं भगवानांना कोणता अर्थ इष्ट आहे ? शरीरानें होणारें जें कर्म तें शारीर कर्म असा अर्थ करण्यांत दोष काय येतो आणि शरीरस्थितीला अवश्यक जें कर्म तें शारीर कर्म असा अर्थ केल्यानें काय फलप्राप्ति होते असा कोणी प्रश्न करील तर त्याला उत्तर असें:—शरीरानें होणारें जें कर्म तें शारीर कर्म असा अर्थ जर भगवानांना इष्ट असेल तर दृष्टफलक आणि अदृष्टफलक असें शरीराच्या योगानें होणारें प्रतिषिद्धही कर्म करीत असतांना त्याला अनिष्टप्राप्ति होत नाहीं असें सांगणाऱ्या भगवानांवर भलतीच गोष्ट प्रतिपादन केल्याचा दोष येऊं लागेल. ( कारण, विहित आणि प्रतिषिद्ध ह्यांपैकीं कोणतेंही कर्म शरीरानें होण्याचा संभव आहे.

शास्त्रीयं च कर्म दृष्टादृष्टप्रयोजनं शरीरेण कुर्वन्नाप्नोति किल्बि-षमित्यपि ब्रुवतोऽप्राप्तप्रतिषेधप्रसङ्गः । शारीरं कर्म कुर्वन्निति विशेषणात्केवलशब्दप्रयोगाच्च वाङ्मनसनिर्वर्त्यं कर्म विधि-प्रतिषेधविषयं धर्माधर्मशब्दवाच्यं कुर्वन्प्राप्नोति किल्बिषमि-त्युक्तं स्यात् । तत्रापि वाङ्मनसाभ्यां विहितानुष्ठानपक्षे किल्बि-

---

तेव्हां शास्त्रनिषिद्ध असें शारीरिक कर्म केलें असतांही अनिष्टप्राप्ति होत नाहीं असें ह्मटल्यानें निषेधबोधक शास्त्राला विरोध येईल. ) बरें दृष्टफलक अथवा अदृष्टफलक असें शास्त्रविहित कर्म शरीरानें करीत असतांना अनिष्टप्राप्ति होत नाहीं असें जर भगवान् ह्मणूं लागतील तर अप्राप्तप्रतिषेध हा त्यांच्या सांगण्यावर दोष येऊं लागेल. ( कारण, शास्त्रविहित जें कर्म तें कारीरीष्टीप्रमाणें दृष्टफलक असो अथवा ज्योति-ष्टोमादिकांप्रमाणें अदृष्टफलक असो तें केलें असतां अनिष्टप्राप्ति होण्याचा संभवच नाहीं. तेव्हां जी गोष्ट मुळींच प्राप्त होण्याचा संभव नाहीं ती प्राप्त होत नाहीं हें सांगण्यांत अप्राप्तप्रतिषेध हा दोष येतो. ) शारीरं कर्म कुर्वन् असें विशेष सांगितलें असल्यामुळें अर्थात् शारीरं हें विशेषण कर्म ह्या शब्दाला लाविलें असल्यामुळें आणि केवलं ह्या शब्दाचा प्रयोग केला असल्यामुळें ( शरीरानें होणारें जें कर्म तें शारीर कर्म असा अर्थ मानिला असतां ) वाचेनें आणि मनानें होणारें जें धर्मसंज्ञक विहित अथवा अधर्मसंज्ञक प्रतिषिद्ध कर्म तें केलें असतां किल्बिष प्राप्त होतें असें विधान केल्यासारिखें होणार आहे. ( कारण, केवल शरीरानें होणारेंच कर्म केलें असतां किल्बिष प्राप्त होत नाहीं असें ह्मटलें ह्मणजे विहित अथवा निषिद्ध असें कोणतेंहीं वाणीनें अथवा मनानें होणारें कर्म केलें असतां किल्बिष प्राप्त होतें असें अर्थात् सिद्ध होणार. ) बरें वाणीनें अथवा मनानें होणारें जें कर्म त्याचें अनु-ष्ठान केलें असतां संन्याशाला किल्बिषप्राप्ति होतेच असें मानावें

षप्रातिवचनं विरुद्धमापद्येत। प्रतिषिद्धसेवापक्षेपि भूतार्थानुवादमात्रमनर्थकं स्यात्। यदा तु शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं कर्माभिप्रेतं भवेत्तदा दृष्टादृष्टप्रयोजनं कर्म विधिप्रतिषेधगम्यं शरीरवाङ्मनसनिर्वर्त्यमन्यदकुर्वंस्तैरेव शरीरादिभिः शरीरस्थितिमात्रप्रयोजनं केवलशब्दप्रयोगादहं करोमीत्यभिमानवर्जितः शरीरादिचेष्टामात्रं लोकदृष्ट्या कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्। एवंभूतस्य पापशब्दवाच्यकिल्बिषप्राप्त्यसंभवात्किल्बिषं संसारं नाप्नोति ज्ञानाग्निदग्धसर्वकर्मत्वादप्रतिब-

---

तर तें योग्य नाहीं. कारण, वाणी आणि मन ह्यांच्या योगानें विहित कर्माचें अनुष्ठान झालें असतांही किल्बिषप्राप्ति होऊं लागेल आणि तें विरुद्ध होईल. आतां वाणीनें आणि मनानें होणारें जें शास्त्रनिषिद्ध कर्म तें संन्याशाच्या हातून झालें असतां त्याला किल्बिषप्राप्ति होते असें ह्मणण्यांतही शास्त्रसिद्ध गोष्टीचाच ह्या ठिकाणीं विनाकारण अनुवाद केल्यासारिखें होईल. तेव्हां शरीरस्थिति हेंच ज्यांचें प्रयोजन आहे तें शारीर कर्म असा अर्थ जर घेतला तर विधिनिषेधशास्त्रानें बोधित असें जें शरीरानें, वाणीनें आणि मनानें होणारें दृष्टफलक आणि अदृष्टफलक इतर कर्म ( ह्मणजे देहस्थितीला अवश्यक असलेल्या कर्माहून इतर कर्म) तें न करितां त्या शरीरादिकांच्या योगानेंच ( ह्मणजे शरीर, वाणी आणि मन ह्यांच्या योगानें ) शरीर चालणें हेंच ज्याचें फल आहे असें कर्म केवल—ह्मणजे मी करीत आहें असा अभिमान न धरितां—शरीरादिकांची चेष्टा येवढेंच लोकदृष्टीनें करीत असलेल्याला किल्बिष प्राप्त होत नाहीं. सारांश, अशा प्रकारच्या पुरुषाला ( ह्मणजे विधिनिषेधशास्त्रानें बोधित जें कर्म तें देहस्थितीला अवश्यक इतकेंच करीत असलेल्या पुरुषाला ) पापसंज्ञक किल्बिष प्राप्त होण्याचा संभवच नसल्यामुळें त्याला किल्बिष ह्मणजे संसार प्राप्त होत नाहीं. तात्पर्य, ज्ञानरूप अग्नीच्या योगानें सर्व

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥२२॥**

न्धेन मुच्यत एवेति पूर्वोक्तसम्यग्दर्शनफलानुवाद एवैषः । एवं शारीरं केवलं कर्मेत्यस्यार्थस्य परिग्रहे निरवद्यं भवति ॥२१॥

त्यक्तसर्वपरिग्रहस्य यतेरन्नादेः शरीरस्थितिहेतोः परिग्रहस्याभावाद्याचनादिना शरीरस्थितौ कर्तव्यतायां प्राप्तायामयाचितमसंक्लृप्तमुपपन्नं यदृच्छयेत्यादिना वचनेनानुज्ञातं यतः शरीरस्थितिहेतोरन्नादेः प्राप्तिद्वारमाविष्कुर्वन्नाह यदृच्छात्म० निबध्यते ॥ २२ ॥ यदृच्छालाभसंतुष्टोप्रार्थितोपनतो लाभो

कर्मे दग्ध झाल्यानें प्रतिबंध राहिला नसल्यामुळें तो संसारांतून मुक्त होतो. हा पूर्वीं सांगितलेल्या आत्मज्ञानफलाचाच अनुवाद आहे. असो. ह्याप्रमाणें " शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् । " ह्या उत्तरार्धाचा अर्थ केला असतां शारीरं आणि केवलं हीं दोन्हीं विशेषणें निर्दोष लागतात २१.

मागितल्यावांचून जें मिळेल त्यावर संतुष्ट, द्वंद्वांची परवा न बाळगणारा, मत्सररहित आणि ( शरीरस्थितीला अवश्य असें अन्न ) आपोआप प्राप्त झालें किंवा न झालें तरी सारखाच असणारा पुरुष कर्म करूनही बद्ध होत नाहीं ॥ २२ ॥

ज्यानें यच्चयावत् ( उपभोगसाधनरूप वस्तूचा ) त्याग केला आहे त्या यतीपाशीं शरीर कायम रहाण्यास अवश्य असें जें अन्न वगैरे त्याच्याही परिग्रहाचा अभाव असल्यामुळें याचना वगैरे करून शरीर चालविणें त्याला प्राप्त आहे. तेव्हां " अयाचितमसंक्लृप्तमुपपन्नं यदृच्छया । " इत्यादि वचनानें—यतीच्या शरीरस्थितीला अवश्यक अशा अन्नादिकांच्या प्राप्तीचा—अनुज्ञात असलेला उपाय दर्शविण्याचा उद्देशानें भगवानांनीं " यदृच्छालाभ० न निबध्यते ॥ २२ ॥ हा श्लोक सांगितला आहे.

यदृच्छालाभस्तेन संतुष्टः संजातालंप्रत्ययो द्वन्द्वातीतो द्वन्द्वैः शीतोष्णादिभिर्हन्यमानोऽप्यविषण्णचित्तो द्वन्द्वातीत उच्यते। विमत्सरो विगतमत्सरो निर्वैरबुद्धिः समस्तुल्यो यदृच्छालाभस्य सिद्धावसिद्धौ च। य एवंभूतो यतिरन्नादेः शरीरस्थितिहेतोर्लाभालाभयोः समो हर्षविषादवर्जितः कर्मादावकर्मादिदर्शी यथाभूतात्मदर्शननिष्ठः शरीरस्थितिमात्रप्रयोजने

---

(" अयाचितमसंक्लृप्तमुपपन्नं यदृच्छया। " ह्या श्लोकार्धांतील शब्दांचा अर्थ येणेंप्रमाणेः—भिक्षेला निघण्यापूर्वीं कोणत्याही योग्य पुरुषानें निवेदन केलेली भिक्षा हें अयाचित होय; अभिशस्त आणि पतित वर्ज करून मनामध्यें कांहीं एक संकल्प न धरितां पांच अथवा सात घरांतून मागून आणिलेलें जें भिक्षान्न तें असंक्लृप्त होय आणि आपण कांहीं एक प्रयत्न न करितां भक्त जनांनीं परस्पर आपल्या समीप आणिलेलें जें अन्न तें यदृच्छयोपपन्न होय. )

मागितल्यावांचून प्राप्त झालेला जो लाभ तो यदृच्छालाभ. त्या यदृच्छालाभानें जो संतुष्ट झालेला असतो ह्मणजे जो तृप्त झालेला असतो त्याला यदृच्छालाभसंतुष्ट असें ह्मणतात. शीत, उष्ण इत्यादि द्वंद्वांच्या तडाक्यांत सांपडला असतांही ज्याच्या अंतःकरणाला विषाद होत नाहीं त्याला द्वंद्वातीत असें ह्मणतात ज्याच्यापासून मत्सर ह्मणजे वैरबुद्धि गेलेली आहे तो विमत्सर होय. आपोआप प्राप्त होणारें जें अन्नादिक तें प्राप्त झालें तरी आणि प्राप्त न झालें तरी सारखा असणारा " हा समः सिद्धावसिद्धौ च " ह्या पदांचा अर्थ होय. अशा प्रकारचा जो यति शरीर कायम रहाण्याला हेतुभूत जें अन्नादिक त्याचा लाभ झाला अथवा न झाला तरी सारखा असतो ह्मणजे अन्नादिकाचा लाभ झाला असतां ज्याला हर्ष होत नाहीं व अन्नादिक न मिळालें तरी ज्याला विषाद वाटत नाहीं असा जो असतो, कर्मादिकांचे ठिकाणीं

भिक्षाटनादिकर्मणि शरीरादिनिर्वर्त्ये नैव किंचित्करोम्यहं गुणा गुणेषु वर्तन्त इत्येवं सदा संपरिचक्षाण आत्मनः कर्तृत्वाभावं पश्यन्नैव किंचिद्भिक्षाटनादिकं कर्म करोति। लोकव्यवहारसामान्यदर्शनेन तु लौकिकैरारोपितकर्तृत्वे भिक्षाटनादौ कर्मणि कर्ता भवति । स्वानुभवेन तु शास्त्रप्रमाणादिजनितेनाकर्तैव । स एवं पराध्यारोपितकर्तृत्वं शरीरस्थिति-

---

ज्या पुरुषाची वस्तुतः अभावबुद्धि असते आणि खऱ्या आत्मज्ञानाविषयीं जो तत्पर असतो तो, शरीर चालूं रहाणें हेंच ज्याचें प्रयोजन आहे असें शरीराच्या योगानें घडणारें जें भिक्षाटण वगैरे कर्म त्या कर्माविषयीं " मी कांहीं एक करीत नाहीं ", "इंद्रियांची प्रवृत्ति विषयांचे ठिकाणीं होत असते " अशाप्रकारें नेहमीं मनामध्यें आणीत असतो आणि ह्मणूनच कर्तृत्वाचा संबंध आपणांकडे कांहींएक नाहीं असें तो समजत असतो. ह्यामुळें वस्तुतः तो भिक्षाटन वगैरे कोणतेंही कर्म करीतच नाहीं. इतर लोक ज्याप्रमाणें (स्नान, आचमन, भोजन वगैरे) व्यवहार करीत असतात त्याचप्रमाणें सदहू व्यवहार ह्या ज्ञानी पुरुषाचेही ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत असल्यामुळें लोक ह्याचे ठिकाणीं कर्तृत्वाचा अध्यारोप करीत असतात ( ह्मणजे वस्तुतः स्नान, आचमन, भोजन वगैरेपैकीं कोणतेंही कर्म हा करीत नसतांना तो स्नानादिकर्म करीत आहे असें ते विनाकारण समजतात). ह्यामुळें लोकदृष्ट्या जरी तो भिक्षाटनप्रभृति कर्म करीत असतो तरी शास्त्रीय प्रमाणांनीं उत्पन्न झालेला जो स्वानुभव त्या स्वानुभवासंबंधानें पाहूं गेलें असतां तो भिक्षाटनादि कर्मांचा कर्ता नसतोच ( ह्मणजे मी भिक्षा मागत आहें, स्नान करीत आहें वगैरे प्रकारचा कांहींएक अनुभव त्याला येत नाहीं ). सारांश, ज्या कर्मांचें कर्तृत्व लोकांनीं ह्याच्यावर विनाकारण लादलेलें असतें असें शरीर चालूं रहाण्यास उपयोगीं

**मात्रप्रयोजनं भिक्षाटनादिकं कर्म कृत्वापि न निबध्यते बन्धहेतोः कर्मणः सहेतुकस्य ज्ञानाग्निना दग्धत्वादित्यनुवाद एवैषः ॥ २२ ॥**

---

पडणारें भिक्षाटानादि कर्म ह्याच्याकडून ( लोकदृष्ट्या ) घडलें असूनही हा त्या कर्माच्या योगानें बद्ध होत नाहीं. कारण, बंधाला कारणीभूत असलेलें कर्म ज्ञानरूप अग्नीच्या योगानें हेतूसहवर्तमान दग्ध झालेलें असतें. तस्मात्, पूर्वश्लोकाच्या उत्तरार्धांत जें सांगितलें त्याचाच हा अनुवाद ह्या ठिकाणीं केला आहे २२.

( "कृत्वापि न निबध्यते" ह्या चतुर्थ चरणांतील 'अपि' हा शब्द—अभिमानरहित अशा केवल शारीर कर्माचा मुक्तीशीं विरोध नाहीं—असें सुचविण्याकरितां घातला आहे. ह्या श्लोकाचें व्याख्यान नीलकंठपंडितांनीं भाष्यविरुद्ध केलेलें आहे; परंतु, तें बरोबर नाहीं. पंडित ह्मणतातः—

**ननु सपरिग्रहः कुटुम्बभरणव्यग्रचित्ततया कथं वित्तव्ययायाससाध्यान्यग्निहोत्रादीन्यनुतिष्ठेदित्याशङ्क्याह यदृच्छेति । अप्रार्थितोपनतो लाभो यदृच्छालाभस्तेन संतुष्टः। ......द्वन्द्वातीतो बहुलाभेलाभे वा सुखदुःखाद्यतीतः । विमत्सरः परस्य लाभं दृष्ट्वा संतापहीनः । समो यदृच्छालाभेनैवेष्टिपशुचातुर्मास्यादेर्नित्यकर्मणः सिद्धावसिद्धौ च समो निर्विकारः । एवं भूतः इष्ट्यादीनि कृत्वापि तन्मूलेन स्वर्गादिना न निबध्यते । आपि शब्दात्तज्जेन प्रत्यवायेन न निबध्यते । बन्धहेतोः कर्मणस्तत्त्वज्ञानेनैव दाहात् । तथा च स्मृतिः न्यायागतधनस्तत्त्वज्ञाननिष्ठोतिथिप्रियः । श्राद्धकृत्सत्यवादी च गृहस्थोपि विमुच्यते ॥**

अर्थः—स्त्रीपुत्रादिकांचा स्वीकार केलेला पुरुष कुटुंब पोषणाच्या विचारांतच गढून गेलेला असतो. तेव्हां धनव्ययावर अवलंबून

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

---

असणारीं अग्निहोत्रादि कर्में त्यानें कशीं करावीं अशी शंका कोणाला येईल एतदर्थ भगवानांनीं "यदृच्छालाभसंतुष्टः" हा श्लोक सांगितला आहे. मागितल्यावांचून झालेला जो लाभ तो यदृच्छालाभ होय आणि ह्या लाभाच्या योगानें जो संतुष्ट असतो तो यदृच्छालाभसंतुष्ट होय. द्वंद्वातीत ह्मणजे पुष्कळ मिळालें अथवा थोडें मिळालें तरी सुखदुःखादिकांपासून अलिप्त; विमत्सर ह्मणजे दुसऱ्याला लाभ झाल्याचें अवलोकनांत आलें असतां संताप न पावणारा आणि समः ह्मणजे जें मिळेल त्याच्यावर इष्टि, पशु, चातुर्मास्य इत्यादि नित्य कर्में झालीं किंवा न झालीं तरी निर्विकार. सारांश, अशा प्रकारचा जो गृहस्थ असतो त्यानें इष्टिप्रभृति कर्में केलीं असतांही तन्मूलक स्वर्गादिकांपासून त्याला बंध प्राप्त होत नाहीं आणि तज्जन्य पापानेंही तो युक्त होत नाहीं. कारण, "न्यायानें धनप्राप्ति झालेला, ज्ञाननिष्ठ, अतिथिप्रिय, श्राद्धकर्ता आणि सत्यवादी असा गृहस्थही मुक्त होतो" अशी स्मृति असल्यामुळें बंधाला हेतुभूत असलेल्या कर्मांचा तत्त्वज्ञानानेंच दाह होत असल्याचें सिद्ध होत आहे." असें व्याख्यान नीलकंठपंडितांनीं भाष्य विरुद्ध केलें आहे. परंतु, तें चुकीचें आहे. कारण, पूर्वींच्या श्लोकामध्यें सर्वपरिग्रहरहित अशा यतींचेंच वर्णन असणें योग्य असल्यामुळें मध्यंतरीं नीलकंठपंडितांनीं घेतलेली निराधार शंका उत्पन्न होणें संभवनीयच नाहीं आणि अशी शंका आल्यामुळें भगवानांनीं हा श्लोक सांगितला आहे असें ह्मणावें तर श्लोकांतील शब्दांनीं शंकेचें समाधान होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. तस्मात्, ह्या श्लोकामध्यें परिग्रहरहित अशा यतींचेंच वर्णन असणें योग्य असून नीलकंठपंडितांचें भाष्यविरुद्ध व्याख्यान प्रमादमूलक असल्याचें सिद्ध आहे २२.)

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गमित्यनेन श्लोकेन यः प्रारब्धकर्मा सन्यदा निष्क्रियब्रह्मात्मदर्शनसंपन्नः स्यात्तदा तस्यात्मनः कर्तृकर्मप्रयोजनाभावदर्शिनः कर्मपरित्यागे प्राप्ते कुतश्चिन्निमित्तात्तदसंभवे सति पूर्ववत्तस्मिन्कर्मण्यभिप्रवृत्तोपि नैव किंचित्करोति स इति कर्माभावः प्रदर्शितः । यस्यैवं कर्माभावो दर्शितस्तस्यैव गतसङ्गस्य सर्वतो निवृत्तासक्तेर्मुक्तस्य निवृत्तधर्माधर्मादिबन्धनस्य ज्ञानावस्थितचेतसो ज्ञान एवावस्थितं चेतो यस्य सोयं ज्ञानावस्थितचेतास्तस्य यज्ञाय**

---

ज्याची कोठेंही आसक्ति नाहीं आणि ज्ञानाचे ठिकाणींच ज्याच्या चित्ताचें लय लागून राहिलेलें आहे असा मुक्त पुरुष यज्ञ शेंवटास नेण्याच्या उद्देशानें जरी कर्म करीत असला तरी त्याचें तें कर्म फलासहवर्तमान नाहींसें होतें ॥ २३ ॥

ज्याच्या कर्मफलाला आरंभ झालेला आहे अशा पुरुषाला जेव्हां -निष्क्रिय जें ब्रह्म तेंच आपण आहोंत- असें ज्ञान होतें तेव्हां आपल्या ठिकाणीं अमुक अमुक कर्तृत्वाचा अथवा कर्मत्वाचा संबंध आहे असें त्याला वाटण्याचें कारणच रहात नसल्यामुळें वस्तुतः त्याच्या हातून कर्मत्याग होणेंच जरी उचित असतें तरी कांहीं कारणामुळें तो कर्मत्याग होत नाहीं आणि ह्याप्रमाणें कर्मत्याग न होतां पूर्वीप्रमाणें जरी त्या कर्मामध्यें तो प्रवृत्तही असला तरी वस्तुतः त्याच्या कर्माचा अभावच **त्यक्त्वा कर्मफलासङ्गं** ह्या श्लोकामध्यें **नैव किंचित्करोति सः** ह्या चतुर्थ चरणाच्या योगानें दर्शविला आहे. ज्याचा **त्यक्त्वा कर्मफलासङ्गं** ह्या श्लोकामध्यें ह्याप्रमाणें कर्माभाव दर्शविला आहे तो पुरुष गतसंग ह्मणजे कोठेंही मनाची आसक्ति नसलेला, मुक्त ह्मणजे धर्माधर्मादि बंधनें निवृत्त झालेला आणि ज्ञानावस्थितचेताः ह्मणजे ज्ञानाचेच ठिकाणीं चित्ताचें लय लागून राहिलेला—असा बनत

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ॥
ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

---

यज्ञनिर्वृत्त्यर्थमाचरतो निर्वर्तयतः कर्म समग्रं सहाग्रेण कर्मफलेन वर्तत इति समग्रं कर्म तत्समग्रं प्रविलीयते विनश्यतीत्यर्थः ॥ २३ ॥

कस्मात्पुनः कारणात्क्रियमाणं कर्म स्वकार्यारम्भमकुर्वत्समग्रं प्रविलीयत इत्युच्यते यतो ब्रह्मार्पणं ब्रह्मह० समाधिना ॥ २४ ॥ ब्रह्मेति । ब्रह्मार्पणं येन करणेन ब्रह्मविद्ध-

---

असल्यामुळें यज्ञ शेवटास नेण्याकरितां जरी त्याच्या हातून कर्म घडत असलें तरी तें त्याचें कर्म समग्र ह्मणजे फलासहवर्तमान विलय पावतें; अर्थात् नाहींसें होतें २३.

कारण, होमसाधन, होमद्रव्य, अग्नि, कर्ता आणि हवनक्रिया हीं ब्रह्मवेत्त्याच्या दृष्टीनें ब्रह्मातिरिक्त नसून ब्रह्मच आहेत व ब्रह्मरूप कर्माचे ठिकाणीं लय लावून राहिलेल्या त्या ब्रह्मवेत्त्याला प्राप्त होणारें फलही ब्रह्मच आहे ॥ २४ ॥

( " कर्म होऊन शेंकडों कोट कल्प जरी लोटले तरी कर्त्याला फलोपभोग प्राप्त झाल्यावांचून तें कर्म नाहींसें होत नाहीं. सारांश, केलेल्या बऱ्या वाईट कर्माचें फल अवश्य भोगलेंच पाहिजे " अशा अर्थाची **नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि । अवश्यमेव भोक्तव्यं कृतं कर्म शुभाशुभम् ॥** ही स्मृति आहे. तेव्हां ) हातून घडत असणारेंही कर्म ( बंधनरूप ) स्वकार्यारंभ न करितां कोणत्या कारणामुळें समग्र नाहींसें होतें ? अशी शंका येण्याचा संभव आहे ह्मणून तिचें निरसन करण्याच्या उद्देशानें भगवानांनीं **ब्रह्मार्पणं ब्रह्म०** हा श्लोक सांगितला आहे. (भगवान् ह्मणतातः—अशा शंकेला जागाच रहात नाहीं ) कारण, ज्या साधनानें ब्रह्मवेत्ता अग्नीमध्यें हवि अर्पण

**विरभावपश्यति तद्ब्रह्मैवेति पश्यति तस्यात्मव्यतिरेकेणाभावं पश्यति यथा शुक्तिकायां रजताभावं पश्यति तदुच्यते ब्रह्मैवार्पणमिति । यथा यद्रजतं तच्छुक्तिकैवेति । ब्रह्म अर्पणमित्यसमस्ते पदे । यदर्पणबुद्ध्या गृह्यते लोके तदस्य ब्रह्मविदो ब्रह्मैवेत्यर्थः । ब्रह्म हविस्तथा यद्धविर्बुद्ध्या गृह्यमाणं तद्ब्रह्मैवास्य । तथा ब्रह्माग्नाविति समस्तं पदम् । अग्निरपि ब्रह्मैव यत्र हूयते ब्रह्मणा कर्त्रा ब्रह्मैव कर्तेत्यर्थः । यत्तेन हुतं**

---

करितो तें ब्रह्मच आहे असें तो पहातो ह्मणजे आत्म्याहून वेगळें होमसाधन नाहींच असें त्याला वाटतें. ( उदाहरणार्थः—शिंपेपासून लांब असणाऱ्या पुरुषाला हें रुपें आहे असें वाटत असूनही प्रत्यक्ष ती शिंप हातांत घेणाऱ्याला ) ज्याप्रमाणें शिंपेचे ठिकाणीं शिंपेहून वेगळें असें रुपें दिसतच नाहीं त्याचप्रमाणें ब्रह्मवेत्त्या पुरुषाला दर्वी वगैरे होमसाधन आत्म्याहून वेगळें दिसतच नाहीं: हें **ब्रह्मार्पणं** ह्मणजे ब्रह्मच अर्पण—ह्या शब्दांचें तात्पर्य होय. सारांश, ( लांबून पहाणाऱ्याला भासमान होणारें ) जें रुपें तें ( वस्तु प्रत्यक्ष हातांत घेऊन पहाणाऱ्याच्या दृष्टीनें जसें शुक्तीहून वेगळें नसून ) शुक्तिरूपच असतें ( तसें अज्ञानी लोकांच्या दृष्टीनें वेगळें असलेलें होमसाधन ब्रह्मवेत्त्याच्या दृष्टीनें वेगळें नसून ब्रह्मच असतें). **ब्रह्म** आणि **अर्पणं** अशीं दोन वेगवेगळीं पदें आहेत; **ब्रह्मार्पणं** एवढें समासरूप एक पद नाहीं. तेव्हां होमसाधन असें समजून जें ( अज्ञानी ) लोकामध्यें वेगळें समजलें जातें तें ह्या ब्रह्मवेत्त्या पुरुषाचें ब्रह्मच असतें असा ह्या दोन शब्दांचा अर्थ होतो. **ब्रह्म हविः** । होमद्रव्य ह्या बुद्धीनें जें घेतलें जात असतें तें ह्या ब्रह्मवेत्त्याचें ब्रह्मच असतें. **ब्रह्माग्नौ** ह्याचा अर्थही अशाच प्रकारचा आहे. **ब्रह्माग्नौ** हें एक सामासिक पद आहे. ज्यामध्यें कर्त्याकडून हवन केलें जातें तो अग्निही ब्रह्मवेत्त्याच्या दृष्टीनें ब्रह्मच असून कर्ताही ब्रह्मच

**हवनक्रिया तद्ब्रह्मैव । यत्तेन गन्तव्यं फलं तदपि ब्रह्मैव । ब्रह्मकर्मसमाधिना ब्रह्मैव कर्म ब्रह्मकर्म तस्मिन्समाधिर्यस्य स ब्रह्मकर्मसमाधिस्तेन ब्रह्मकर्मसमाधिना ब्रह्मैव गन्तव्यम् । एवं लोकसंग्रहं चिकीर्षुणापि क्रियमाणं कर्म परमार्थतोकर्म ब्रह्मबुद्ध्युपमृदितत्वात् । एवं सति निवृत्तकर्मणोपि सर्वकर्मसंन्यासिनः सम्यग्दर्शनस्तुत्यर्थं यज्ञत्वसंपादनं ज्ञानस्य**

---

आहे. त्या कर्त्यानें केलेलें जें हुत ह्मणजे त्याच्या हातून झालेलें जें हवनकर्म तेंही ब्रह्मच आहे. त्याला प्राप्त होणारें जें फल तेंही ब्रह्मच आहे. **ब्रह्मकर्मसमाधिना ।** ब्रह्मच कर्म ब्रह्मकर्म त्या ठिकाणीं ज्याचें लय लागून राहिलेलें असतें तो ब्रह्मकर्मसमाधि होय. त्या ब्रह्मकर्मसमाधि पुरुषाला फल ह्मणून ब्रह्मच प्राप्त होत असतें. ( हा **ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना** ह्या उत्तरार्धाचा अर्थ होय ). " ह्याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या ( ह्मणजे लोकांची प्रवृत्ति कुमार्गाकडे होऊं नये अशी इच्छा धरणाऱ्या ) ब्रह्मवेत्त्या पुरुषाचे हातून जें कर्म घडत असतें तेंही खऱ्या खऱ्या अर्थानें पाहूं गेलें असतां अकर्मच असतें. कारण, ब्रह्मवेत्त्याची सर्वत्र ब्रह्मबुद्धिच असल्यामुळें तिच्या योगानें कर्मबुद्धीचा नाशच झालेला असतो" ( हें ह्या श्लोकाचें तात्पर्य होय. आतां ज्याच्या पासून कर्में निवृत्त झालीं आहेत त्या लोकसंग्रहेच्छु संन्यासी पुरुषाकरितां ह्या मंत्राची प्रवृत्ति आहे असें कसें ह्मणतां येईल अशी शंका ह्या मंत्राच्या तात्पर्यासंबंधानें घेतां येत नाहीं. कारण, ) ज्याच्या पासून कर्में निवृत्त झालेलीं आहेत असा जो सर्वकर्मसंन्यासी त्याच्या उत्कृष्ट ज्ञानाची प्रशंसा करण्याकरितां—होमसाधनप्रभृति जें यज्ञामध्यें प्रसिद्ध आहे तें ह्या खऱ्या खऱ्या ज्ञानवान् ब्रह्मवेत्त्याचें अध्यात्मब्रह्मच आहे असें—जें ज्ञानाला यज्ञत्व कल्पिलें आहे तें फारच चांगलें जुळतें.

**सुतरामुपपद्यते यदर्पणाद्यधियज्ञे प्रसिद्धं तदस्याध्यात्मं ब्रह्मैव परमार्थदर्शिन इति । अन्यथा सर्वस्य ब्रह्मत्वेऽर्पणादीनामेव विशेषतो ब्रह्मत्वाभिधानमनर्थकं स्यात् । तस्माद्ब्रह्मैवेदं सर्वमित्यभिजानतो विदुषः सर्वकर्माभावः । कारकबुद्ध्यभावाच्च ।**

---

( प्रत्यक्ष यज्ञानुष्ठान करण्यास असमर्थ असलेल्या अज्ञ पुरुषाला उद्देशून ज्याप्रमाणें मानसिक यज्ञ सांगितला आहे ह्मणजे संकल्पालाच ज्याप्रमाणें यज्ञत्व कथन केलें आहे त्याचप्रमाणें ब्रह्मवेत्त्याच्या उत्कृष्ट ज्ञानाची प्रशंसा करण्याकरितां ह्या मंत्रामध्यें ज्ञानाला यज्ञत्व कल्पना केली आहे असें ह्मणणें फारच चांगलें जुळतें. आतां होमसाधन, होमद्रव्य, हवनक्रिया इत्यादिकांनाच ज्याअर्थी विशेषेंकरून ब्रह्मत्व कथन केलें आहे त्याअर्थी " ज्ञानाला ह्या मंत्रामध्यें यज्ञत्व कथन केलें आहे असें मानण्याला प्रमाण काय ?" ही शंका उरत नाहीं. कारण,) असें न मानितां सर्वच ब्रह्म आहे हें सांगण्याच्या उद्देशानें हा श्लोक भगवानांनीं सांगितला आहे असें जर ह्मणावें तर होमसाधन, होमद्रव्य इत्यादिकांनाच विशेषतः जें ब्रह्मत्व सांगितलें आहे तें व्यर्थ होईल. ( सर्वच ब्रह्म आहे असें सांगितलें असतें ह्मणजे झालें असतें. तेव्हां ज्याअर्थी सर्वच ब्रह्म आहे असें सामान्यतः न सांगतां होमसाधन, होमद्रव्य, होमाधिकरण वगैरेंचेंच विशेषतः ब्रह्मत्व कथन केलें आहे त्याअर्थी सर्व कांहीं ब्रह्मच आहे असें दर्शविण्याचा भगवानांचा उद्देश ह्या श्लोकांत दिसत नसून ब्रह्मवेत्त्याच्या ज्ञानाची प्रशंसा करण्याकरितां ज्ञानाला यज्ञत्व कथन करण्याचा त्यांचा उद्देश आहे ही गोष्ट सिद्ध आहे ). तस्मात्, हें सर्व ब्रह्मच आहे असें जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषाला सर्व कर्मांचा अभावच आहे. कारकबुद्धीचा अभाव असतो ह्यावरूनही " सर्व कांहीं आत्मस्वरूप आहे असें समजणाऱ्या ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं वस्तुतः सर्व कर्मांचा अभावच

न हि कारकबुद्धिरहितं यज्ञाख्यं कर्म दृष्टम् । सर्वमेवाग्निहोत्रादिकं कर्म शब्दसमर्पितदेवताविशेषसंप्रदानादिकारकबुद्धिमत्कर्त्रभिमानफलाभिसन्धिमच्च दृष्टं नोपमृदितक्रियाकारकफलभेदबुद्धिमत्कर्तृत्वाभिमानफलाभिसन्धिरहितं वा । इदं तु ब्रह्मबुद्ध्युपमृदितार्पणादिकारकक्रियाफलभेदबुद्धि कर्मा-

---

आहे " ही गोष्ट सिद्ध होते. ( आतां " सर्व कांहीं ब्रह्म आहे असें समजणाऱ्या ब्रह्मवेत्त्याचे ठिकाणीं कारकबुद्धीचा जरी अभाव असला तरी त्याच्या हातून धडधडीत ज्याचें अनुष्ठान होत असतें तें कर्म नव्हे असें कसें ह्मणतां येईल ? " अशी शंका येणें वाजवी नाहीं. कारण, ) यज्ञसंज्ञक कर्म कारकबुद्धिरहित असल्याचें कोठें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. अग्निहोत्रप्रभृति जें ह्मणून कांहीं यज्ञसंज्ञक कर्म आहे त्या सर्वांतही—इन्द्राय, अग्नये इत्यादि चतुर्थ्यंत शब्दांनीं निर्दिष्ट असलेली विशिष्ट देवता हें संप्रदान, व्रीहिप्रभृति होमद्रव्य हें करण इत्यादि प्रकारची कारकबुद्धि यज्ञ करणाऱ्याची असून मी ह्या यज्ञाचा कर्ता आहें असा अभिमान त्याचे ठिकाणीं असतो आणि ह्याच्या फलाचा उपभोग मी घेईन अशी इच्छाही त्याची असते असें—दृष्टोत्पत्तीस येतें. क्रिया, कारक, फल हीं आत्म्याहून भिन्न आहेत अशी बुद्धि ज्या ठिकाणीं कर्त्याची राहिलेली नाहीं किंवा मी ह्या कर्माचा कर्ता हा अभिमान आणि मी ह्याचें फल भोगणार ही इच्छा ह्यांचाही ज्या ठिकाणीं अभाव आहे असें कर्म दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. ( सारांश, कारकबुद्धि, कर्तृत्वाभिमान आणि फलेच्छा हीं असल्यावांचून यज्ञकर्मानुष्ठान होणें संभवनीयच नाहीं. ) तेव्हां ब्रह्मवेत्त्याचें जें हें दृष्टोत्पत्तीस येणारें कर्म त्याचे ठिकाणीं होमसाधनप्रभृति करणादि कारकें, क्रिया व फल हीं आत्म्याहून भिन्न आहेत अशी बुद्धि राहिलेली नसते; सर्व कांहीं ब्रह्मच आहे ह्या बुद्धीच्या योगानें तिचा नाश झालेला असतो. तस्मात्

तोकर्मैव तत् । यथा च दर्शितं कर्मण्यकर्म यः पश्येत् । कर्मण्यभिप्रवृत्तोपि नैव किंचित्करोति सः । गुणा गुणेषु वर्तन्ते । नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् । इत्यादिभिः । यथा च दर्शयंस्तत्र तत्र क्रियाकारकफलभेदबुद्ध्युपमर्दं करोति दृष्टा च काम्याग्निहोत्रादौ कामोपमर्देन काम्याग्निहोत्रादिहानिः । यथा मतिपूर्वकत्वादीनां कर्मणां कार्यविशेष-

---

त्याचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येणारें जें कर्म तें अकर्मच आहे. कारण, **कर्मण्यकर्म यः पश्येत् । कर्मण्यभिप्रवृत्तोपि नैव किंचित्करोति सः । गुणा गुणेषु वर्तन्ते । नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।** इत्यादि वचनें ( ब्रह्मवेत्त्याचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत असलेलें कर्म अकर्मच आहे ) ह्याला प्रमाण आहेत. ह्याप्रमाणें भगवानांनींही दर्शविलें आहे. (आतां ब्रह्मवेत्त्याचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत असलेलें कर्म वस्तुतः कर्म नव्हे असें जरी भगवानांनीं सांगितलें असलें तरी कर्माचें कारण नाहींसें होत नसल्यामुळें तें कर्म पुनरपि होण्याचा संभव आहे " अशी शंका ह्या ठिकाणीं कोणाला उद्भवत असल्यास ती योग्य नाहीं कारण, ) तसें दर्शवितांनाच भगवानांनीं जागोंजागीं ब्रह्मवेत्त्याचे ठिकाणीं क्रिया, कारक, फल हीं भिन्न आहेत अशी बुद्धिच रहात नसल्याचें दर्शविलें आहे. सारांश, भेदबुद्धि हें जें कारण तेंच मूळ नाहींसें झालें असल्यामुळें ब्रह्मवेत्त्याचे ठिकाणीं पुनरपि कर्माचा उद्भव होण्याचा संभव नाहीं. (अज्ञानी पुरुषाप्रमाणें ज्ञानी पुरुषही जरी कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त झालेला दृष्टीस पडतो तरी त्या ज्ञानी पुरुषाच्या हातून होणारें कर्म अकर्मच असतें हें सिद्ध आहे. कारण, ) प्रथमतः कामना असल्यामुळें काम्याग्निहोत्रादि कर्में जरी सुरू झालेलीं असलीं तरी तीं सुरू करणाऱ्याचे ठिकाणीं पुढें त्या कामनेचा अभाव झाल्यावर कर्मांतील काम्य अंश नाहींसाच झाला असल्यामुळें त्याचे ठिकाणीं प्रथम

स्यारम्भकत्वं दृष्टं तथेहापि ब्रह्मबुद्ध्युपमृदितार्पणादिकारकक्रियाफलभेदबुद्धेर्बाह्यचेष्टामात्रेण कर्मापि विदुषोऽकर्म संपद्यते । अत उक्तं समग्रं प्रविलीयत इति । अत्र केचि-

---

असलेलें काम्याग्निहोत्रत्व वगैरे नाहींसें होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. हें कर्म ह्याप्रमाणें करावें, ह्याच्या फलाचा उपभोग घ्यावा इत्यादि प्रकारचा विचार मनांत आणून सुरू केलेलीं अज्ञ पुरुषाचीं कर्में ज्याप्रमाणें त्याला फल देत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें त्याचप्रमाणें ह्या ज्ञानी पुरुषाचेही ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत असलेलीं कर्में फलदायक व्हावींत; परंतु ( तीं तशीं होत नाहींत. कारण ), ज्ञानी पुरुषाची सर्वत्र ब्रह्मबुद्धिच असल्यामुळें होमसाधनप्रभृति करणादि कारकें, क्रिया व फल हीं ब्रह्माहून भिन्न आहेत ही बुद्धि त्याचे ठिकाणीं रहातच नाहीं. ब्रह्मबुद्धीच्या योगानें ह्या बुद्धीचा नाशच झालेला असतो. तेव्हां हें कर्म ह्याप्रमाणें करावें व ह्याचें फल भोगावें इत्यादि प्रकारचा विचारच ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं नसल्याकारणानें त्या कर्माचें बरें वाईट फलही त्याला प्राप्त होत नाहीं. तस्मात्, ह्याचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येणारें जें कर्म तें अर्थात्च अकर्म होतें आणि ह्मणूनच ( पूर्वींच्या वचनामध्यें ) **समग्रं प्रविलीयते** ( ह्मणजे ज्ञानी पुरुषाच्या हातून होणारें कर्म फलासहवर्तमान नाहींसें होतें ) असें ह्मटलें आहे.

---

१ आपल्या आप्ताचा शोध लागत नाहीं ह्मणून तो लावण्याच्या उद्देशानें जर एकादा पुरुष काशीस जाण्याकरितां निघाला आणि मध्यंतरीं असुक अमुक ठिकाणीं तो आप्त आहे असें कळून आलें असतांही जर तो तसाच पुढें जाऊं लागला तर ज्याप्रमाणें कामना मनांत धरून प्रथम सुरू झालेल्या त्याच्या काम्यगमनांतील काम्य हा अंश नाहींसा झाल्यामुळें काम्यगमनत्व नाहींसें होतें त्याचप्रमाणें कामना असल्यामुळें काम्याग्निहोत्रादि कर्में जरी प्रथम सुरू झालीं असलीं तरीं तीं सुरू करणाऱ्याचे ठिकाणीं पुढें त्या कामनेचाच अभाव झाल्यास काम्य अंश नाहींसाच झाला असल्यामुळें काम्याग्निहोत्रत्व वगैरे नाहींसें होणार हें उघड आहे.

**दाहुर्यद्ब्रह्म तदर्पणादीनि । ब्रह्मैव किलार्पणादिना पञ्चविधेन कारकात्मना व्यवस्थितं सत्तदेव कर्म करोति। तत्र नार्पणादिबुद्धिर्निवर्तते किंत्वर्पणादिषु ब्रह्मबुद्धिराधीयते यथा प्रतिमादौ विष्ण्वादिबुद्धिर्यथा वा नामादौ ब्रह्मबुद्धिरिति। सत्यमेवमपि स्याद्यदि ज्ञानयज्ञस्तुत्यर्थं प्रकरणं न स्यात्। अत्र तु सम्यग्दर्शनं ज्ञानयज्ञशब्दितमनेकान्यज्ञशब्दितान्क्रिया-**

---

ह्या श्लोकाचें व्याख्यान जें होमसाधन वगैरे तें ब्रह्मच असें वर दर्शविल्याप्रमाणें न करितां कोणी ( वृत्तिकार ) “ जें ब्रह्म तेंच होमसाधन वगैरे ” असें ह्या श्लोकाचें व्याख्यान करीत असतात. ते ह्मणतातः— “ ब्रह्मच खरोखर होमसाधनप्रभृति करणादि पंचविध कारकरूपानें स्थित असून तेंच कर्म करीत आहे. ( सारांश, कर्ता, कर्म, करण, संप्रदान व अधिकरण ह्या पंचविध कारकरूपानें ब्रह्मच स्थित असून तेंच कर्म करितें हें जर कबूल आहे तर तें ब्रह्म प्रसिद्ध असल्यामुळें त्याचा अनुवाद करून होमसाधनप्रभृति करणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि, ह्या श्लोकामध्यें, कर्तव्य ह्मणून सांगितली आहे असें ह्मणण्याला हरकत नाहीं ). अर्पणादि बुद्धीची निवृत्ति ह्या श्लोकामध्यें सांगितलेली नसून ज्याप्रमाणें प्रतिमादिकांचे ठिकाणीं विष्णुप्रभृति देवताबुद्धि अथवा नामादिकांचे ठिकाणीं ब्रह्मबुद्धि कर्तव्य ह्मणून सांगितलेली असते त्याचप्रमाणें अर्पणादिकांचे ठिकाणीं ह्मणजे होमसाधनप्रभृति करणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. ” खरोखर ज्ञानयज्ञप्रशंसापर जर हें प्रकरण नसतें ( ह्मणजे ज्ञानयज्ञाची प्रशंसा करण्याकरितांच जर हें प्रकरण नसतें ) तर ह्यांच्या ह्मणण्याप्रमाणेंही श्लोकाचा अर्थ झाला असता. ज्ञानयज्ञ ह्या शब्दानें ह्या प्रकरणामध्यें उत्कृष्ट ज्ञानाचा निर्देश केला आहे आणि यज्ञसंज्ञक अनेक क्रियांचा उल्लेख करून शेंवटीं **श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञा-**

विशेषानुपन्यस्य श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञ इति ज्ञानं स्तौति । अत्र च समर्थमिदं वचनं ब्रह्मार्पणमित्यादि ज्ञानस्य यज्ञत्वसंपादने। अन्यथा सर्वस्य ब्रह्मत्वेऽर्पणादीनामेव विशेषतो ब्रह्मत्वाभिधानमनर्थकं स्यात् । ये त्वर्पणादिषु प्रतिमायां विष्णुदृष्टिवद्ब्रह्मदृष्टिः क्षिप्यते नामादिष्विव चेति ब्रुवते न तेषां ब्रह्मविद्योक्तेह विवक्षिता स्यादर्पणादिविषयत्वाज्ज्ञानस्य न

---

ज्ज्ञानयज्ञः ( ह्मणजे द्रव्यसाधनांनीं साध्य होणाऱ्या यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ प्रशस्त आहे ) ह्मणून भगवानांनीं ज्ञानाची प्रशंसा केली आहे. शिवाय, ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः इत्यादि येथील वचनज्ञानाच्या यज्ञत्वसंपादनाविषयीं समर्थ आहे. (ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः इत्यादि वचनाचें सामर्थ्य ज्ञानाच्या स्तुतिविषयींच आहे असें वाटतें. असें न मानितां) सर्व ब्रह्म आहे हें सांगण्याचाच जर भगवानांचा उद्देश असतां तर अर्पणादिकांचेंच विशेषेंकरून ब्रह्मत्व कथन करणें निरर्थकच होईल. ( आतां " अर्पणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी असें जरी मानिलें तरी ह्या श्लोकांत ब्रह्मज्ञानच विवक्षित आहे. तव्हां जें ब्रह्म तेंच अर्पण वगैरे अशा प्रकारचें व्याख्यान जरी केलें तरी तात्पर्य एकच आहे " असें ह्मणतां येणार नाहीं. कारण,) प्रतिमेचे ठिकाणीं ज्याप्रमाणें विष्णुदृष्टि करावयाची किंवा नामादिकांचे ठिकाणीं ज्याप्रमाणें ब्रह्मदृष्टि करावयाची त्याचप्रमाणें अर्पणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि ह्या श्लोकांत सांगितलेली आहे असें जे ह्मणत असतील त्यांच्या मतानें ह्या श्लोकांत ब्रह्मविद्याकथन विवक्षित आहे असें मानितां येणार नाहीं. कारण, ज्ञान हें अर्पणादिविषयक होणार. ( सारांश, ब्रह्मदृष्टीनें नामादिकांची अथवा विष्णुबुद्धीनें शालग्रामाची उपासना करावी असें जेथें सांगितलें असतें त्या ठिकाणीं नामादिक अथवा शालग्राम हेंच मुख्यतः उपास्य असतें. तव्हां अर्पणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि

**च दृष्टिसंपादनज्ञानेन मोक्षफलं प्राप्यते ब्रह्मैव तेन गन्तव्यमिति चोच्यते । विरुद्धं च सम्यग्दर्शनमन्तरेण मोक्षफलं प्राप्यत इति । प्रकृतविरोधश्च । सम्यग्दर्शनं च प्रकृतं कर्मण्यकर्म यः पश्येदित्यत्रान्ते च सम्यग्दर्शनं तस्यैवोपसंहारात्। श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः । ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिम् । इत्यादिना सम्यग्दर्शनस्तुतिमेव कुर्वन्नुपक्षीणोध्यायः । तत्राकस्मादर्पणादौ ब्रह्मदृष्टिरप्रकरणे प्रतिमायामिव विष्णुदृष्टिरुच्यत इत्यनुपपन्नम् । तस्माद्यथाव्याख्यातार्थ एवायं श्लोकः ॥ २४ ॥**

---

करावी असें मानिलें ह्मणजे ज्ञानाचा विषय मुख्यतः अर्पणादिक हेंच होऊं लागेल; ह्या श्लोकानें मुख्यतः ब्रह्मज्ञान विवक्षित आहे असें ठरणार नाहीं ). बरें, अर्पणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी इतकेंच ज्ञान झाल्यानें मोक्षफल प्राप्त होण्याचा संभव नाहीं; परंतु, **ब्रह्मैव तेन गन्तव्यं** ह्या शब्दांनीं मोक्षफल प्राप्त होतें असें सांगितलें आहे. शिवाय, अर्पणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि केल्यानें मोक्षप्राप्ति होते ह्या ह्मणण्याचा प्रस्तुत प्रकरणाशीं विरोधही येत आहे. कारण, **कर्मण्यकर्म यः पश्येत्** । ह्या ठिकाणीं ब्रह्मज्ञानाचा उपक्रम केलेला असून शेंवटपर्यंतही ब्रह्मज्ञानाचेंच प्रकरण सुरू आहे. कारण उपसंहारही त्याचाच आहे. शिवाय, **श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः । ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिम्** । इत्यादि प्रकारानें ब्रह्मज्ञानाचीच प्रशंसा करितां करितां अध्याय संपला आहे. तेव्हां प्रकरण तसें नसतांनाही प्रतिमेचे ठिकाणीं ज्याप्रमाणें विष्णुदृष्टि करावयाची त्याप्रमाणें अर्पणादिकांचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी ह्मणून एकाएकीं मध्येंच सांगितलें आहे असें ह्मणणें योग्य दिसत नाहीं. तस्मात् , ज्याप्रमाणें प्रथम व्याख्यान केलें आहे त्याचप्रमाणें ह्या श्लोकाचा अर्थ आहे २४.

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

तत्राधुना सम्यग्दर्शनस्य यज्ञत्वं संपाद्य तत्स्तुत्यर्थमन्येपि यज्ञा उपक्षिप्यन्ते दैवमेवेत्यादिना। दैवमेवा० जुह्वति ॥२५॥ दैवमेव देवा इज्यन्ते येन यज्ञेनासौ दैवो यज्ञस्तमेवापरे यज्ञं योगिनः कर्मिणः पर्युपासते कुर्वन्तीत्यर्थः । ब्रह्माग्नौ । सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । विज्ञानमानन्दं ब्रह्म । यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म । य आत्मा सर्वान्तरः । इत्यादिवचनोक्तमशनायादिसर्वसंसारधर्मवर्जितं नेति नेतीति निरस्ताशेषविशेषं ब्रह्मशब्देनोच्यते । ब्रह्म च तदग्निश्च स होमाधिकरणत्वविवक्षया ब्रह्मा-

दुसरे कर्मनिष्ठ लोक दैवयज्ञच करीत असतात आणि इतर ब्रह्मस्वरूप अग्नीमध्यें यज्ञसंज्ञक आत्म्याच्याच योगानें आत्मरूप आहुति टाकीत असतात ॥ २५ ॥

ब्रह्मज्ञानाला यज्ञत्व कथन केल्यानंतर सांप्रत त्या ज्ञानाच्या प्रशंसेकरितां दुसऱ्याही यज्ञांचा **दैवमेव** ० इत्यादि श्लोकानें भगवानांनीं उल्लेख केलेला आहे. **दैवमेव** । ज्या यज्ञानें देवांचें यजन होतें तो दैव यज्ञ होय. तोच यज्ञ दुसरे योगी ह्मणजे कर्मनिष्ठ करीत असतात. **ब्रह्माग्नौ** । "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । [वि]ज्ञानमानन्दं ब्रह्म । यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म । य आत्मा सर्वान्तरः** । इत्यादि श्रुतिवचनांनीं जें सांगितलें आहे, क्षुधाप्रभृति कोणतेही संसारधर्म ज्याचे ठिकाणीं नाहींत आणि **नेति नेति** ह्या श्रुतीनें ज्याच्या सर्व उपाधींचा निरास केलेला आहे ( ह्मणजे ज्याला कोणतीहि उपाधि नाहीं असें दर्शविलें आहे ) त्याचा उल्लेख ह्या ठिकाणीं ब्रह्म शब्दानें केलेला आहे. ब्रह्मस्वरूप अग्नि तोच ब्रह्माग्नि होय; तोच होमाचें स्थान आहे असें सांगण्याच्या उद्देशानें त्याला ब्रह्माग्नि असें ह्मटलें आहे. त्या ब्रह्माग्नीमध्यें इतर

**ग्निस्तस्मिन्ब्रह्माग्नावपरेऽन्ये ब्रह्मविदो यज्ञं यज्ञशब्दवाच्य आत्मात्मनामसु यज्ञशब्दस्य पाठात्तमात्मानं यज्ञं परमार्थतः परमेव ब्रह्म सन्तं बुद्ध्याद्युपाधिसंयुक्तमध्यस्तसर्वोपाधिधर्मकमाहुतिरूपं यज्ञेनैवात्मनैवोक्तलक्षणेनोपजुह्वति प्रक्षिपन्ति। सोपाधिकस्यात्मनो निरुपाधिकेन परब्रह्मस्वरूपेणैव यद्दर्शनं स तस्मिन्होमस्तं कुर्वन्ति ब्रह्मात्मैकत्वदर्शननिष्ठाः संन्यासिन इत्यर्थः। सोयं सम्यग्दर्शनलक्षणो यज्ञो दैवयज्ञादिषु यज्ञेषु प्रक्षिप्यते ब्रह्मार्पणमित्यादिश्लोकैः। श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतपेत्यादिना स्तुत्यर्थम् ॥ २५ ॥**

---

ह्मणजे ब्रह्मवेत्ते—बुद्धिप्रभृति उपाधींनीं युक्त व सर्व उपाधिधर्मांचा ज्याचे ठिकाणीं अध्यास केलेला आहे परंतु, खऱ्या खऱ्या अर्थानें पाहूं गेलें असतां जो परब्रह्मच आहे त्या यज्ञसंज्ञक आहुतिरूप जीवात्म्याचे यज्ञाच्याच योगानें ह्मणजे वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या-परमात्म्याच्याच योगानें हवन करीत असतात. आत्म्याच्या नामांमध्यें यज्ञ शब्दाचा पाठ असल्यामुळें ह्या श्लोकाच्या उत्तरार्धांतील यज्ञ-शब्दाचा अर्थ आत्मा असा आहे. उपाधींनीं युक्त असलेला जो जीवात्मा त्याला निरुपाधिक परब्रह्मस्वरूपानें जें जाणणें ( ह्मणजे तो वस्तुतः उपाधिरहित परब्रह्मच आहे असें जें समजणें ) तो त्याचे ठिकाणीं होम होय. तो होम ब्रह्म आणि आत्मा ह्यांचें ऐक्य आहे अशी ज्यांची समजूत दृढ झालेली आहे ह्मणजे अर्थात् जे संन्यासी आहेत ते करीत असतात. त्या ह्या आत्मज्ञानरूप यज्ञाचा उपन्यास **श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप** इत्यादि प्रकारानें ज्ञानाची प्रशंसा करण्याकरितां **ब्रह्मार्पणं** इत्यादि श्लोकांनीं केलेला आहे २५.

( **ब्रह्मार्पणं ब्रह्महविः** हा श्लोक ज्ञानाला यज्ञत्व कथन करून राहिला असतां सांप्रत त्याच ज्ञानाची प्रशंसा करण्याच्या उद्देशानें

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

---

इतर यज्ञांचा निर्देश करण्याकरितां **दैवमेवापरे यज्ञं** इत्यादि पुढील ग्रंथ आहे." हें **तत्राधुना० उपक्षिप्यन्ते** ह्या भाष्याचें तात्पर्य होय. ब्रह्मशब्दाचा अर्थ साधार दर्शविण्याकरितां **सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म** इत्यादि श्रुति भाष्यकारांनीं ह्या ठिकाणीं घेतल्या आहेत. जें अनृताच्या उलट आहे, जें जड नाहीं आणि ज्याला कोणत्याही प्रकारचा अंत नाहीं तें ब्रह्म हा **सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म** ह्या तैत्तिरीयोपनिषदांतील श्रुतीचा अर्थ होय. परमानंदस्वरूप असल्यामुळें त्या ब्रह्मालाच परमपुरुषार्थत्व आहे हें दर्शविण्याच्या उद्देशानें आचार्यांनीं **विज्ञानमानन्दं ब्रह्म** ह्या बृहदारण्यकांतील श्रुतीचा ह्या ठिकाणीं उल्लेख केलेला आहे. ब्रह्माचे ठिकाणीं ज्ञानत्व वास्तविक नसून औपचारिक आहे अशी शंका राहूं नये ह्मणून **यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म** ह्या बृहदारण्यकांतील श्रुतीचा उल्लेख केलेला आहे आणि जीव व ब्रह्म असा जर विभाग आहे तर आत्म्याला अपरिच्छिन्नत्व कसें ? ही शंका कोणाला येईल ह्मणून **य आत्मा सर्वान्तरः** ह्या श्रुतीचा उल्लेख आचार्यांनीं ह्या ठिकाणीं केलेला आहे. बुद्धीचे ठिकाणीं आरूढ होत असल्या कारणानें सर्व उपाधींचा दाह करीत असल्यामुळें ब्रह्मालाच अग्नि असें ह्मटलें आहे हें **ब्रह्म च तदग्निश्च स होमाधिकरणत्वविवक्षया ब्रह्माग्निः** ह्या भाष्याचें तात्पर्य होय. क्षुधाप्रभृति कोणताही संसारधर्म ज्याचे ठिकाणीं नाहीं असा जो निर्विशेषस्वरूप आत्मा त्याच्या योगानें हें **आत्मनैवोक्तलक्षणेन** ह्या भाष्याचें तात्पर्य होय २५. )

कांहीं पुरुष संयमरूप अग्नींचे ठिकाणीं श्रवणप्रभृति इंद्रियांचें हवन करीत असतात आणि कांहीं पुरुष इंद्रियरूप अग्नींचे ठिकाणीं शब्दादि विषयांचें हवन करीत असतात ॥ २६ ॥

**श्रोत्रादीनीन्द्रि० ग्निषु जुह्वति ॥ २६ ॥ श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये योगिनः संयमाग्निषु प्रतीन्द्रियं संयमो भिद्यत इति बहुवचनं संयमा एवाग्नयस्तेषु जुह्वतीन्द्रियसंयममेव कुर्वन्तीत्यर्थः। शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति । इन्द्रियाण्येवाग्नयस्तेष्विन्द्रियाग्निषु जुह्वति श्रोत्रादिभिरविरुद्धविषयग्रहणं होमं मन्यन्ते ॥ २६ ॥**

---

नैष्ठिकब्रह्मचारीप्रभृति इतर योगी संयमरूप अग्नींचे ठिकाणीं श्रवणप्रभृति इंद्रियांचें हवन करीत असतात, ह्मणजे इंद्रियसंयमच करीत असतात. इंद्रियें भिन्न भिन्न असल्यामुळें प्रत्येक इंद्रियाचा संयमही भिन्न आहे ह्मणून **संयमाग्निषु** असें बहुवचन श्लोकामध्यें आहे. इतर ( ह्मणजे गृहस्थाश्रमी स्वधर्मनिष्ठ मुमुक्षु ) शब्दादि विषयांचें इंद्रियरूप अग्नींचे ठिकाणीं हवन करीत असतात. सारांश, शास्त्रनिषिद्ध विषयसेवन श्रवणादि इंद्रियांनीं न करणें हाच ते इंद्रियादिरूप अग्नींचे ठिकाणीं शब्दादि विषयांचा होम समजतात. ( तात्पर्य, शास्त्रोक्तनियमांना अनुसरून विषयोपभोग घेणें हाच त्यांचा यज्ञ होय ) २६.

ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें व्याख्यान मधुसूदनसरस्वतींनीं " **धारणा ध्यानं समाधिरिति त्रयमेकविषयं संयमशब्देनोच्यते । ........ अनेन रूपेण संयमानां भेदादग्निष्विति बहुवचनं तेष्विन्द्रियाणि जुह्वति धारणाध्यानसमाधिसिद्ध्यर्थं सर्वाणीन्द्रियाणि स्वस्वविषयेभ्यः प्रत्याहरन्तीत्यर्थः** " असें केलें असून त्याचें तात्पर्य " धारणा, ध्यान व समाधि हीं तीन एके ठिकाणीं असणें ह्याला संयम असें ह्मणतात. ह्या रूपानें संयम भिन्न भिन्न असल्यामुळें **अग्निषु** असें बहुवचन श्लोकामध्यें आहे. त्या अग्नींचे ठिकाणीं इंद्रियांचें दमन करितात; ह्मणजे धारणा, ध्यान व समाधि हीं सिद्ध होण्याकरितां सर्व इंद्रियें आपआपल्या विषयांपासून ते परावृत्त करितात " असें आहे. परंतु तें

बरोबर नाहीं. प्रत्याहाररूप अग्नींचे ठिकाणीं श्रोत्रादि इंद्रियांचा होम ह्या ठिकाणीं विवक्षित आहे असें जर न मानिलें तर होमाला अधिकरणच रहात नाहीं; ह्मणजे होम ज्यामध्यें करावयाचा तें स्थानच ह्या ठिकाणीं उपलब्ध होत नाहीं. ध्यान वगैरे हें श्रोत्रादि इंद्रियांच्या होमाचें स्थान नसून मनाच्या होमाचें स्थान आहे. असो. " तदनेन प्रत्याहारधारणाध्यानसमाधिरूपं योगाङ्गचतुष्टयमुक्तं ( प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि हीं योगाचीं चार अंगें ह्या श्लोकार्धानें सांगितलेलीं आहेत असें जें मधुसूदनसरस्वतींनीं पूर्वार्धाचें सार काढिलें आहे त्यानें वेगळें खंडन करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. कारण, श्लोकांतील अक्षरस्वारस्याकडे लक्ष्य दिलें असतां प्रत्याहारच ह्या ठिकाणीं विवक्षित असल्याचें दिसतें आणि ह्मणूनच " **तत्र कंचिद्बाह्यमाभ्यन्तरं वा विशेषमुपादाय तत्र चेतसो नियमनं क्रियते । ते च संयमा अनेकविषयत्वादनेके पृथक्फलाश्च । तथा च योगसूत्रकृता प्रोक्तम् । भुवनज्ञानं सूर्ये संयमात् । चन्द्रे ताराव्यूहज्ञानम् । कण्ठकूपे क्षुत्पिपासानिवृत्तिः । इत्यादि** " असें जें नीलकंठ पंडितांनीं ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें व्याख्यान भाष्यविरुद्ध केलें आहे तेंही अयोग्य असल्याचें सिद्ध होतें. पंडितांच्या व्याख्यानांतील तात्पर्य येणेंप्रमाणें:— " बाह्य अथवा अंतस्थ अशी कांहीं विशेष गोष्ट घेऊन त्या ठिकाणीं मनाचें संयमन करितात. त्या संयमाचें विषय अनेक असल्यामुळें तेही अनेक आहेत व त्यांचीं फलेंही भिन्न भिन्न आहेत व त्याचप्रमाणें—सूर्याचे ठिकाणीं संयमन केल्यानें भुवनज्ञान होतें, चंद्राचे ठिकाणीं संयमन केल्यानें ताराव्यूहज्ञान होतें आणि कंठकूपाचे ठिकाणीं संयमन केल्यानें क्षुधा व तृषा ह्यांची निवृत्ति होते—असें योगसूत्रकारांनीं सांगितलें आहे. " असो. नीलकंठपंडितांनीं ह्या श्लोकाच्या उत्तरार्धाचें व्याख्यान " **तथान्ये विषयेभ्यः प्रत्याहृतकरणा धारणाध्यानसमाध्यात्मकं मनसः संयममेकत्र मूलाधाराद्यन्यतमचक्रे कर्तुमशक्तः समन-**

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

---

**किं च सर्वाणी० ज्ञान दीपिते ॥२७॥ सर्वाणीन्द्रियकर्माणीन्द्रियाणां कर्माणीन्द्रियकर्माणि तथा प्राणकर्माणि प्राणो वायुराध्यात्मिकस्तत्कर्माण्याकुञ्चनप्रसारणादीनि तानि चापर**

---

**स्केन्द्रियेषु विषयवियोगाद्दग्धेन्धनानलवत्स्वयं विलीनेषु तेषां समाधिबुद्धिस्तैः समनस्केन्द्रियेषु विषया एवोपसंहृताः ”** इत्यादिप्रकारें भाष्यविरुद्ध केलें असून त्याचें तात्पर्य “ विषयांपासून ज्यांनीं इंद्रियें परावृत्त केलेलीं आहेत परंतु, धारणा, ध्यान व समाधि एतत्त्रयरूप मनःसंयमन एका ठिकाणीं ह्मणजे मूलाधारप्रभृति चक्रांपैकीं एका चक्राचे ठिकाणीं करण्यास जे असमर्थ आहेत त्यांचीं इंधनें दग्ध होऊन गेलेल्या अग्नीप्रमाणें आपोआपच विषयवियोगामुळें विलीन झालेल्या मनासहवर्तमान इंद्रियांचे ठिकाणीं समाधिबुद्धि असते. सारांश, मनासहवर्तमान असलेल्या इंद्रियांचे ठिकाणीं त्यांनीं विषयांचाच उपसंहार केलेला असतो ” इत्यादि प्रकारचें आहे. परंतु, हें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, **श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति** । ह्या पूर्वार्धांतच प्रत्याहाररूप यज्ञ कथन केला आहे. तेव्हां उत्तरार्धाचें नीलकंठपंडित ह्मणतात त्याप्रमाणें व्याख्यान केलें असतां उत्तरार्धांत पूर्वार्धाहून अर्थदृष्ट्या वेगळा यज्ञ सांगितला आहे असें होत नाहीं २६. )

दुसरे पुरुष ज्ञानानें प्रचालित झालेल्या आत्मसंयमरूप योगाग्नीमध्यें सर्व इंद्रियकर्मांचा आणि प्राणकर्मांचा होम करितात ॥ २७ ॥

ज्ञानरूप स्नेहानें प्रदीप्त केलेल्या ह्मणजे विवेकविज्ञानाच्या योगानें प्रज्वलित केलेल्या आत्मसंयमरूप योगाग्नीमध्यें इतर पुरुष सर्व इंद्रियकर्मांचें आणि आध्यात्मिक वायु जो प्राण त्याच्या आकुंचन, प्रसारण इत्यादि

**आत्मसंयमयोगाग्नावात्मनि संयम आत्मसंयमः स एव योगाग्निस्तस्मिन्नात्मसंयमयोगाग्नौ जुह्वति प्रक्षिपन्ति ज्ञानदीपिते स्नेहेनेव प्रदीपिते विवेकविज्ञानेनोज्ज्वलभावमापादिते जुह्वति प्रविलापयन्तीत्यर्थः ॥ २७ ॥**

---

कर्माचें हवन करितात ह्मणजे विलापन करितात. इंद्रियांचीं जीं कर्मे तीं इंद्रियकर्मे हा **इन्द्रियकर्माणि** ह्या पदाचा अर्थ होय. प्राणांचीं जीं कर्में तीं प्राणकर्में हा **प्राणकर्माणि** ह्या पदाचा अर्थ होय. आत्म्याचे ठिकाणीं जो संयम तो **आत्मसंयम** होय. आत्मसंयमरूप जो योगाग्नि तो आत्मसंयमयोगाग्नि. त्या आत्मसंयमरूप योगाग्नीमध्यें हा **आत्मसंयमयोगाग्नौ** ह्या पदाचा अर्थ होय २७.

(इंद्रियांमध्यें ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें असे दोन भाग आहेत. ज्ञानेंद्रियें पांच आहेत व कर्मेंद्रियेंही पांच आहेत. श्रवणेंद्रिय, त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय व घ्राणेंद्रिय हीं पांच ज्ञानेंद्रियें होत आणि वागिंद्रिय, हस्तेंद्रिय, पादेंद्रिय, पाय्विंद्रिय व उपस्थेंद्रिय हीं पांच कर्मेंद्रियें होत. ऐकणें, स्पर्श समजणें, अवलोकन करणें, चव घेणें आणि वास घेणें हीं अनुक्रमें श्रवणादि ज्ञानेंद्रियांचीं कर्में होत. बोलणें, घेणें, चालणें, मलोत्सर्ग करणें आणि विषयानंदाचें सेवन करणें हीं अनुक्रमें वागादि कर्मेंद्रियांचीं कर्में होत. प्राण ह्मणजे आध्यात्मिक वायु. ह्या वायूचे प्राण, अपान, व्यान, उदान व समान असे पांच भेद असून नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय असे दुसरेही पांच भेद आहेत. पैकीं प्राणवायु मस्तकाचे ठिकाणीं असून वक्षस्थल व कंठ ह्यांमध्यें संचार करीत असतो. बुद्धि, हृदय, इंद्रियें व चित्त ह्यांना हाच आधार असून थुंकणें, शिंकणें, ढेंकर येणें, श्वास सोडणें व अन्न आंत घेणें हीं ह्याचीं कर्मे होत. अपानवायूचें अपान हेंच मुख्य स्थान असून कंबर, कोठा, जननेंद्रिय आणि मांड्या ह्या ठिकाणीं हा संचार करीत असतो. पुरुषांचें

शुक्र, स्त्रियांचें आर्तव, मल, मूत्र व गर्भ बाहेर काढणें हीं अपानवायूचीं कर्में होत. व्यानवायु मुख्यतः हृदयामध्यें रहात असून सर्व शरीरात संचार करणारा आहे. प्राणादिकांपेक्षां ह्याची गति शीघ्र आहे. चालणें, वाकणें, अंग वर उचलणें, डोळे मिटणें, उघडणें, जांभई येणें वगैरे प्राण्यांच्या सर्व क्रिया ह्या व्यानवायूवरच अवलंबून आहेत. वक्षस्थल हें उदानवायूचें मुख्य स्थान असून नाक, बेंबी व गळा ह्यांचे ठिकाणीं तो संचार करीत असतो. शब्दोच्चार, प्रयत्न, बल, वर्ण, स्मृति वगैरे ह्याचीं कर्में होत. समानवायु मुख्यतः पाचक अग्नीचे समीप रहात असून सर्व कोठ्यामध्यें संचार करीत असतो. अपक्व अन्न आमाशयामध्यें धारण करणें, तें पचविणें, त्याची निवड करणें आणि मलमूत्रादि रूपानें तें टाकून देणें हीं त्याचीं कर्में होत. नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय हे जे दुसरे पंचप्राण ते कोणी वेगळे समजतात आणि कोणी वेगळे समजत नाहींत. हे जर वेगळे मानिले तर ढेंकर येणें, डोळे उघडणें, शिंक येणें, जांभई येणें व सर्व व्यापणें हीं त्यांचीं कर्में अनुक्रमें समजावींत. हे वेगळे न मानिल्यास ह्या कर्मांचा अंतर्भाव प्राणादि पंचवायूंच्या कर्मांमध्येंच दर्शविल्याप्रमाणें करावा लागतो. ह्या श्लोकांतील **अपरे** ह्या पदाचा अर्थ ध्याननिष्ठ यति असा समजावा. हे ध्याननिष्ठ यति तेलाच्या योगानें जसा दीप प्रज्वलित होतो तसा आत्मविषयक ज्ञानाच्या योगानें योगाग्नि प्रज्वलित झाला असतां ह्मणजे आत्मविषयक ज्ञानाच्या योगानें सर्व कांहीं ज्ञात झालें असतां त्या आत्मसंयमरूप योगाग्नीमध्यें सर्व इंद्रियकर्मांचें व प्राणकर्मांचें हवन करितात; ह्मणजे प्राणव्यापार व इंद्रियव्यापार ह्यांचा निरोध करून ते नेहमीं आत्मसुखाचाच अनुभव घेत असतात; हें ह्या श्लोकाचें तात्पर्य होय. स्वस्वरूप जो आत्मा त्याचे ठिकाणीं संयम ह्मणजे चित्तवृत्तींचा निरोध ह्याला आत्मसंयम असें ह्मणावें. २७ )

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

किं च द्रव्यय० तव्रताः ॥ २८ ॥ द्रव्ययज्ञास्तीर्थेषु द्रव्यविनियोगं यज्ञबुद्ध्या कुर्वन्ति ये ते द्रव्ययज्ञाः । तपोयज्ञा ये तपस्विनस्ते तपोयज्ञाः । योगयज्ञाः प्राणायामप्रत्याहारादिलक्षणो योगो यज्ञो येषां ते योगयज्ञास्तथापरे स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च स्वाध्यायो यथाविधि ऋगाद्यभ्यासो यज्ञो येषां ते स्वाध्याययज्ञा ज्ञानयज्ञा ज्ञानं शास्त्रार्थपरिज्ञानं यज्ञो येषां ते ज्ञानयज्ञाः स्वाध्याययज्ञा ज्ञानयज्ञाश्च यतयो यतनशीलाः संशितव्रताः सम्यक्शितानि तनूकृतानि तीक्ष्णीकृतानि व्रतानि येषां ते संशितव्रताः ॥ २८ ॥

स्वीकारिलेलें व्रत निश्चयानें चालविणारे असे प्रयत्नशील पुरुष द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, स्वाध्याययज्ञ आणि ज्ञानयज्ञ करीत असतात॥२८॥

**द्रव्ययज्ञाः** । तीर्थांचे ठिकाणीं ह्मणजे सत्पात्रांचे ठिकाणीं यज्ञबुद्धीनें जे द्रव्याचा विनियोग करितात ते द्रव्ययज्ञ होत. **तपोयज्ञाः** । जे तपस्वी असतात ते तपोयज्ञ होत. **योगयज्ञाः** । प्राणायाम, प्रत्याहार इत्यादि अंगांनीं युक्त असलेला योग हाच ज्यांचा यज्ञ आहे ते योगयज्ञ होत. **तथापरे स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च** । स्वाध्याय ह्मणजे यथाविधि ऋक्प्रभृति वेदांचा अभ्यास हाच ज्यांचा यज्ञ आहे ते स्वाध्याययज्ञ होत. **ज्ञानयज्ञाः** । ज्ञान ह्मणजे वेदार्थ समजून घेणें हाच ज्यांचा यज्ञ आहे ते ज्ञानयज्ञ होत. ह्याप्रमाणें मोक्षाकरितां प्रयत्न करणारे लोक अत्यंत तीक्ष्ण नियमांचें अवलंबन करणारे आहेत. यती ह्मणजे प्रयत्नशील. ज्यांनीं आपलीं व्रतें तीक्ष्ण केलेलीं आहेत ह्मणजे ज्यांनीं आपले नियम कडक रीतीनें चालविले आहेत ते संशितव्रत होत २८.

( सत्पात्रीं द्रव्याचा विनियोग करणें हाच ज्यांचा यज्ञ आहे ते

द्रव्ययज्ञ होत. द्रव्ययज्ञ ह्मणजे पूर्तसंज्ञक आणि दत्तसंज्ञक स्मृत्युक्त यज्ञांविषयीं तत्पर. **वापीकूपतडागादिदेवतायतनानि च । अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते ॥** ह्या स्मृतिवचनांत पूर्त ह्मणजे काय हें सांगितलेलें आहे आणि—वापी, विहिरी, तडाग इत्यादि जलाशय, देवालयें व धर्मशाळा बांधणें आणि अन्नदान करणें ह्याला पूर्त ह्मणतात—हा ह्या स्मृतिवचनाचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें **शरणागतसंत्राणं भूतानां चाप्यहिंसनम् । बहिर्वेदि च यद्दानं दत्तमित्यभिधीयते॥** ह्या स्मृतिवचनांत दत्त कशाला ह्मणावें हें सांगितलें असून शरण आलेल्याचें रक्षण, प्राणिमात्राच्या हिंसेपासून पराङ्मुखत्व आणि यज्ञयागातिरिक्त दान ह्यांना दत्त असें म्हणतात—हा ह्या स्मृतिवचनाचा अर्थ आहे. तस्मात्, जलाशय, देवालयें, धर्मशाळा वगैरे बांधणें, अन्नदान करणें, शरणागताचें रक्षण करणें, प्राणिमात्रांच्या हिंसेपासून पराङ्मुख असणें व यज्ञयागव्यतिरिक्त दान करणें हाच यज्ञ आहे असें समजून त्याप्रमाणें वागणारे दान दोन प्रकारचें आहे; एक बहिर्वेदि दान आणि एक अंतर्वेदि दान. यज्ञयागादि श्रौत कर्मांमध्यें जें दान दिलें जातें त्याला अंतर्वेदि दान असें ह्मणतात व यज्ञयागाशिवाय जें दिलें जातें त्याला बहिर्वेदि दान असें ह्मणतात. हें—**द्रव्ययज्ञाः** ह्या पदाचें तात्पर्य होय. द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, इत्यादि बहुव्रीहिसमास आहेत व द्रव्य हाच ज्यांचा यज्ञ ते द्रव्ययज्ञ. तप हाच ज्यांचा यज्ञ ते तपोयज्ञ इत्यादि प्रकारचे ह्या समासांचे विग्रह आहेत. पंचाग्निसेवन, चांद्रायण, प्राजापत्य अथवा उपवास इत्यादिरूप तप करणें हाच आमचा यज्ञ होय असें समजून जे तप करीत असतात ते तपोयज्ञ होत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि ह्या आठ अंगांनीं युक्त असलेला योग ह्मणजे चित्तवृत्तिनिरोध हाच आमचा यज्ञ असें समजून जे अष्टांगयोग करीत असतात ते योगयज्ञ होत.)

( मधुसूदनसरस्वतींनीं ह्या श्लोकांत सहा यज्ञ सांगितले आहेत

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

---

**किं च अपाने० प्राणायामपरायणाः ॥२९॥ अपानेपानवृत्तौ जुह्वति प्रक्षिपन्ति प्राणं प्राणवृत्तिं पूरकाख्यं प्राणायामं**

---

अशी कल्पना करून **संशितव्रताः** ह्याचें स्पष्टीकरण **संशितव्रतयज्ञा इत्यर्थः** असें केलें आहे आणि संशितव्रत हाच सहावा यज्ञ असें दर्शविलें आहे. परंतु, भाष्य, नीलकंठी, शंकरानंदी, ज्ञानेश्वरी इत्यादि ग्रंथांना विरुद्ध असलेलें हें मधुसूदनसरस्वतींचें ह्मणणें योग्य नाहीं. कारण, मधुसूदनसरस्वतींनींच "एकंदर बारा यज्ञ सांगितले आहेत" असें दर्शविलें आहे. तेव्हां **संशितव्रताः** हा जर वेगळा यज्ञ मानिला तर यज्ञ एकंदर तेरा होतात. आतां एकुणतिसावा श्लोक आणि तिसाव्या श्लोकाचें पूर्वार्ध मिळून एकच यत्न सांगितला आहे असें मधुसूदनसरस्वतींच्या मताप्रमाणें मानिलें असतां यज्ञ तेरा होत नाहींत असें ह्मणावें तर जुळत नाहीं. कारण, **अपरे** हें पद त्या दीड श्लोकांत मिळून दोन वेळ येत असल्यामुळें यज्ञ दीड श्लोकांत मिळून एकच सांगितला आहे असें मानितांच येत नाहीं. तात्पर्य, भाष्यकारप्रभृतींच्या विरुद्ध असलेलें मधुसूदनसरस्वतींचें ह्मणणें बरोबर नाहीं. भाष्यावरील आनंदगिरी टीकेंतही **यज्ञषट्कमवतारयति** असें जें या श्लोकाला अवतरण दिलें आहे तेंही चिंत्यच आहे २८. )

त्याचप्रमाणें प्राणायामाविषयीं तत्पर असलेले कांहीं लोक अपानवायूचे ठिकाणीं प्राणवायूचा प्रक्षेप ( करून पूरकसंज्ञक प्राणायाम ) करीत असतात, प्राणवायूचे ठिकाणीं अपानवायूचा प्रक्षेप ( करून रेचकसंज्ञक प्राणायाम ) करीत असतात आणि प्राण व अपान ह्या दोहोंच्या गतींचा निरोध ( करून कुंभकसंज्ञक प्राणायाम ) करीत असतात॥२९॥

शिवाय, त्याचप्रमाणें **अपाने** ह्मणजे अपानवृत्तीचे ठिकाणीं दुसरे

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

---

कुर्वन्तीत्यर्थः । प्राणेपानं तथापरे जुह्वति रेचकाख्यं च प्राणायामं कुर्वन्तीत्येतत् । प्राणापानगती मुखनासिकाभ्यां वायोर्निर्गमनं प्राणस्य गतिस्तद्विपर्ययेणाधोगमनमपानस्य ते प्राणापानगती । एते रुद्ध्वा निरुध्य प्राणायामपरायणाः प्राणायामतत्पराः कुम्भकाख्यं प्राणायामं कुर्वन्तीत्यर्थः ॥ २९ ॥

किं च अपरे० क्षपितकल्मषाः ॥३०॥ अपरे नियताहारा नियतः परिमित आहारो येषां ते नियताहाराः सन्तः प्राणा-

---

कांहीं प्राणाचें ह्मणजे प्राणवृत्तीचें हवन करीत असतात; अर्थात् पूरकसंज्ञक प्राणायाम करीत असतात. तसेंच ते प्राणवृत्तीचे ठिकाणीं अपानवृत्तीचें हवन करितात ह्मणजे रेचकसंज्ञक प्राणायाम करीत असतात. तसेंच प्राणापानगतींचा निरोध करून प्राणायामाविषयीं तत्पर असलेले ते कुंभकसंज्ञक प्राणायाम करीत असतात. मुख आणि नासिका ह्यांच्या द्वारानें वायूचें जें बाहेर जाणें ती प्राणाची गति होय आणि ह्या गतीचे उलट ह्मणजे मुख आणि नासिका ह्यांच्या द्वारानें जें वायूचें अधोगमन ती अपानाची गति होय. त्या ह्या प्राणापानगतींचा निरोध करून प्राणायामाविषयीं तत्पर असलेले लोक कुंभकसंज्ञक प्राणायाम करीत असतात हा ह्या श्लोकांतील उत्तरार्धाचा अर्थ होय २९.

परिमिताहार सेवन करणारे असे दुसरे कांहीं (जिंकिलेल्या ) वायूंचे ठिकाणीं इतर वायूंचें हवन करीत असतात. ह्या सर्वही यज्ञवेत्त्यांचीं पापें यज्ञाच्या योगानें नाहींशीं झालेलीं असतात ॥ ३० ॥

**अपरे नियताहाराः** । ज्यांचा आहार नियत ह्मणजे परिमित आहे ते नियताहार होत. परिमित आहाराचें सेवन करून दुसरे कांहीं

**न्वायुभेदान्प्राणभेदेष्वेव जुह्वति यस्य यस्य वायोर्जयः क्रियत इतरान्वायुभेदांस्तस्मिंस्तस्मिञ्जुह्वति ते तत्र प्रविष्टा इव भवन्ति । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषा यज्ञैर्यथोक्तैः क्षपितो नाशितः कल्मषो येषां ते यज्ञक्षपितकल्मषाः ॥३०॥**

---

मुमुक्षु प्राणांचेच ठिकाणीं प्राणांचें ह्मणजे भिन्न भिन्न वायूंचें हवन करीत असतात. सारांश, ज्या ज्या वायूचा जय केला जातो त्या त्या वायूमध्यें इतर भिन्न भिन्न वायु प्रविष्ट झाल्यासारिखे होतात. **सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ।** आतांपर्यंत सांगितलेल्या यज्ञांच्या योगानें ह्या सर्वही यज्ञवेत्त्यांचें पातक नाहींसें झालेलें असतें. यज्ञांच्या योगानें ज्यांचें कल्मष ह्मणजे पातक नाहींसें झालें आहे ते यज्ञक्षपितकल्मष होत ३०.

(श्रीधरस्वामींनीं ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें व्याख्यान **अपरे त्वाहारसंकोचमभ्यस्यन्तः स्वयमेव जीर्यमाणेष्विन्द्रियेषु तत्तदिन्द्रियवृत्तिलयं होमं भावयन्तीत्यर्थः** असें केलें असून त्याचा अर्थ "आहार कमी सेवन करण्याचा अभ्यास करणारे कांहीं मुमुक्षु ( आहार कमी कमी होत चालल्यामुळें ) आपोआपच जर्जर होऊं लागलेल्या इंद्रियांचे ठिकाणीं त्या त्या इंद्रियवृत्तींचा लयरूप होम होतो असें मानीत असतात" असा आहे. परंतु, हें श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, श्रवणादि इंद्रियांचा होम—**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति । शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥** ह्या सव्विसाव्या श्लोकांत प्रत्याहाररूप अग्नींचे ठिकाणीं—होत असल्याचें पूर्वींच सांगितलेलें आहे. तस्मात्, पुनरुक्तिदोष येत असल्यामुळें हें श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान ग्राह्य नाहीं. श्रीधरस्वामींनीं एकुणतीस व तीस ह्या श्लोकांचें दुसरेंही एक व्याख्यान केलें आहे तें येणेंप्रमाणें:—

**यद्वा अपाने जुह्वति प्राणं प्राणेपानं तथापर इत्यनेन पूरकरेचकयोरावर्तमानयोर्हंसः सोहमित्यनुलोमतः प्रतिलोमत-**

श्चाभिव्यज्यमानेनाजपामन्त्रेण तत्त्वंपदार्थैक्यं व्यतीहारेण भावयन्तीत्यर्थः। तदुक्तं योगशास्त्रे सकारेण बहिर्याति हकारेण विशेत्पुनः। प्राणस्तत्र स एवाहं हंस इत्यनुचिन्तयेदिति ॥ प्राणापानगती रुद्ध्वेत्यनेन तु श्लोकेन प्राणायामयज्ञा अपरे कथ्यन्ते। तत्रायमर्थः। द्वौ भागौ पूरयेदन्नैस्तोयेनैकं प्रपूरयेत्। मारुतस्य प्रचारार्थं चतुर्थमवशेषयेदित्येवमादिवचनोक्तो नियत आहारो येषां ते कुम्भकेन प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः सन्तः प्राणानिन्द्रियाणि प्राणेषु जुह्वति कुम्भके हि सर्वे प्राणा एकीभवन्तीति तत्रैव लीयमानेष्विन्द्रियेषु होमं भावयन्तीत्यर्थः। तदुक्तं योगशास्त्रे यथा यथा सदाभ्यासान्मनसः स्थिरता भवेत्। वायुवाक्कायदृष्टीनां स्थिरता च तथा तथेति।

ह्या श्रीधरस्वामींच्या व्याख्यानाचें तात्पर्य येणेंप्रमाणें:—" पूरक आणि रेचक एकसारिखे चालले असतांना **हंसः** व **सोऽहं** असा सुलट व उलट अभिव्यक्त होणारा जो अजपामंत्र त्याच्या योगानें **तत्** आणि **त्वम्** ह्मणजे ब्रह्म व जीव ह्या पदार्थांचें तें ऐक्य मानितात. हा **अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे** ह्या श्लोकार्धाचा अर्थ होय. कारण, " सकारानें प्राण बाहेर जात असून हकारानें तो पुनरपि आंत प्रविष्ट होत असतो. तेव्हां त्या गमनागमनरूप प्राणवृत्तीचे ठिकाणीं अनुक्रमें तोच मी आणि मीच तो असें चिंतन करावें " ह्मणून योगशास्त्र आहे. **प्राणापानगती रुद्ध्वा** ह्या श्लोकानें दुसरे प्राणायामयज्ञ कथन केले आहेत. तेव्हां **प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः। अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति** ह्याचा अर्थ असा होतो:—"—अन्नांच्या योगानें दोन अंश व उदकानें एक अंश भरून काढून वायूच्या संचाराकरितां चवथा अंश शिलक ठेवावा—इत्यादि प्रकारच्या वचनामध्यें

सांगितल्याप्रमाणें ज्यांचा आहार नियमित आहे ते कुंभकाच्या योगानें प्राणापानगतींचा निरोध करून व प्राणायामाविषयीं तत्पर राहून प्राणांचें ह्मणजे इंद्रियांचें प्राणांचे ठिकाणीं हवन करितात. तात्पर्य, कुंभक सुरू झाला असतां त्याचे ठिकाणीं सर्व प्राण एकवटतात. तेव्हां तेथेंच लीन होत असलेल्या इंद्रियांचे ठिकाणीं ते होमाची कल्पना करितात. कारण, " सतत अभ्यासाच्या योगानें जशी जशी मनाची स्थिरता होते तशी तशी वायु, वाणी, शरीर आणि दृष्टि ह्यांना स्थिरता प्राप्त होते " असें योगशास्त्रांत सांगितलें आहे. "

हें श्रीधरस्वामींचें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर आहे असें ह्मणतां येत नाहीं. कारण, **प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः** ह्या एकुणतिसाव्या श्लोकांतील उत्तरार्धाचा अन्वय **अपाने जुह्वति प्राणं प्राणेपानं तथापरे** ह्या त्याच श्लोकांतील पूर्वार्धाशीं सरळ होत असतांना तो न करितां तिसाव्या श्लोकांतील **अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति** ह्या पूर्वार्धाशीं करणें योग्य नव्हे. शिवाय, " पूरक व रेचक एकसारिखे चालू असतांना **हंसः** व **सोहं** असा सुलट व उलट अभिव्यक्त होणारा जो अजपामंत्र " वगैरे प्रकारचें जें व्याख्यान श्रीधरस्वामींनीं केलें आहे ते श्लोकांतील शब्दांवरून निघत नाहीं. तस्मात्, पूरक, रेचक व कुंभक प्राणायाम ते करितात हें भाष्यकारांचेंच व्याख्यान, श्लोकांतील शब्दार्थाला अनुसरून असल्यामुळें, योग्य आहे. **प्राणान्प्राणेषु जुह्वति** ह्या पदांचें व्याख्यान **प्राणानिन्द्रियाणि** वगैरे प्रकारचें जें श्रीधरस्वामींनीं केलें आहे तेंही अयोग्यच आहे. कारण, लोकांमध्यें प्रसिद्ध नसलेल्या अर्थाची कल्पना करावी लागणें हा ह्या व्याख्यानावर दोष येतो. हाच दोष मधुसूदनसरस्वतींच्या व्याख्यानावर येत असल्यामुळें **प्राणान्प्राणेषु जुह्वति** ह्या पदांचें त्यानीं केलेलेंही व्याख्यान योग्य आहे असें ह्मणतां येत नाहीं. **प्राणेषु बाह्याभ्यन्तरकुम्भकाभ्यासनिगृहीतेषु प्राणाञ्ज्ञानेन्द्रियकर्मेन्द्रियरूपाञ्जुह्वति।चतुर्थकुम्भ-**

**काभ्यासेन विलापयन्तीत्यर्थः** । असें व्याख्यान मधुसूदनसरस्वतींनीं केलेलें असून त्याचें तात्पर्य " बाह्यविषय जो रेचक आणि आभ्यंतरविषय जो पूरक ह्या उभयतांची अपेक्षा धरून होणारा जो दोन प्रकारचा कुंभक त्याच्या अभ्यासानें निग्रह केलेल्या प्राणांचे ठिकाणीं ज्ञानेंद्रियकर्मेंद्रियरूप प्राणांचें ते हवन करितात. तात्पर्य, रेचक व पूरक ह्या उभयतांचीही अपेक्षा मुळींच न धरितां होणारा जो चतुर्थ कुंभक त्याच्या अभ्यासाच्या योगानें इंद्रियवृत्तींचा ते लय करितात. " असें आहे. ह्या मधुसूदनसरस्वतींच्या भाष्यविरुद्ध व्याख्यानावर लोकांमध्यें अप्रसिद्ध असलेल्या अर्थाची कल्पना हा तर एक दोष येत आहेच; परंतु, स्वतःच्या उक्तीशीं विरोध हा दुसराही एक दोष ह्या व्याख्यानावर येत आहे. कारण,—**अपाने जुह्वति प्राणं प्राणेपानं तथापरे । प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥ अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति** । ह्या दीड श्लोकांत मिळून प्राणायाम यज्ञ सांगितला आहे— असें मधुसूदनसरस्वतींनीं **प्राणायामयज्ञमाह सार्धेन** ह्या पदांनीं दर्शविलें आहे. परंतु, **प्राणान्प्राणेषु जुह्वति** ह्या पदांचें व्याख्यान प्राणेंद्रियांचें व कर्मेंद्रियांचें हवन करितात असें त्यांनीं केलें असल्यावरून प्राणायामरूप यज्ञाशिवाय इंद्रियनिरोधरूप यज्ञही ह्यांत सांगितल्याचें त्यांच्याच मतानें सिद्ध होत असल्यामुळें— दीड श्लोकानें प्राणायामयज्ञ सांगितला— ह्या त्यांच्या स्वतःच्याच ह्मणण्याला विरोध येतो. तस्मात्, मधुसूदनसरस्वतींचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान योग्य आहे असें ह्मणतां येतच नाहीं. नीलकंठपंडितांनीं **अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति** ह्या श्लोकाचें व्याख्यान करीत असतांना बरेंच भाष्यविरुद्ध पांडित्य केलें आहे; परंतु, अप्रसिद्ध अर्थाची कल्पना वगैरे दोष त्याही पांडित्यावर येत असल्यामुळें तें योग्य आहे असें ह्मणतां येत नाहीं ३०.)

( एकुणतिसाव्या श्लोकांत योगयज्ञाचें परिगणन केलेलें असून

तिसाव्या श्लोकांत प्राणायामयज्ञ कथन केला आहे. तेव्हां ह्या श्लोकांचें तात्पर्य नीट लक्ष्यांत येण्याकरितां अष्टांगयोग ह्मणजे काय, प्राणायाम कशाला ह्मणावें आणि अष्टांगयोगसिद्धीचें व प्राणायामसिद्धीचें फल काय हें समजणें अवश्य आहे. ह्यास्तव, विद्यारण्यस्वामिप्रणीत जीवन्मुक्तिविवेकांतील मनोनाशप्रकरणांत अष्टांग योग, प्राणायाम वगैरेंचें निरूपण फारच उत्तम प्रकारानें साधार केलें असल्यामुळें व भगवद्गीतेंतील सहाव्या अध्यायाचेंही तात्पर्य लक्ष्यांत येण्याला ह्या जीवन्मुक्तिविवेकांतर्गत मनोनाशप्रकरणाचा फारच उपयोग होणारा असल्यामुळें सदहू प्रकरण मराठी तात्पर्यासह पुढें दिलें आहे. )

अथ जीवन्मुक्तिसाधनं मनोनाशं च निरूपयामः । यद्यप्यशेषवासनाक्षये सत्यर्थान्मनो नश्यत्येव तथापि स्वातन्त्र्येण मनोनाशे सम्यगभ्यस्ते सति वासनाक्षयो रक्षितो भवति । न चाजिह्वत्वषण्डकत्वाद्यभ्यासेनैव तद्रक्षा सिद्धेति वाच्यम् । नष्टे मनस्यजिह्वत्वादीनामर्थसिद्धत्वेनाभ्यासप्रयासाभावात् । ननु मनोनाशाभ्यासस्तत्राप्यस्तीति चेदस्तु नाम । तस्यावश्यकत्वादन्तरेण मनोनाशमभ्यस्ता अप्यजिह्वत्वादयोऽस्थिरा भवन्ति । अत एव मनसो नाशनीयत्वं जनक

आतां जीवन्मुक्तीचें साधन जो मनोनाश त्याचें निरूपण करितों. संपूर्ण वासनांचा क्षय झाला असतां मनाचा नाश जरी अर्थात् होतच असतो तरी मनोनाशाचा स्वतंत्र रीतीनें चांगला अभ्यास केला असतां झालेला वासनाक्षय कायम रहातो. अजिह्वत्व, षंडकत्व इत्यादिकांच्या अभ्यासानेंच वासनाक्षयाचें रक्षण होतें असें ह्मणतां येणार नाहीं. कारण, मनाचा नाश झाला असतां अजिह्वत्व वगैरे अर्थात्च सिद्ध होत असल्यामुळें त्यांच्या अभ्यासाविषयीं प्रयत्न करण्याचें कारणच पडत नाहीं. आतां मनोनाशाचा अभ्यास अजिह्वत्वादिकांच्या अभ्यासामध्यें अंतर्भूत आहेच आहे. तेव्हां स्वतंत्र रीतीनें त्याचा अभ्यास करण्याचें कारण काय अशी शंका उपयोगी नाहीं. कारण, अजिह्वत्वादिकांच्या अभ्यासामध्यें जरी मनोनाशाच्या अभ्यासाचा अंतर्भाव होत असला तरी अजिह्वत्वादिक सिद्ध होण्याकरितां मुख्यतः मनोनाशाची अवश्यकता आहे. त्याचा अभ्यास स्वतंत्र रीतीनें केला पाहिजे. कारण, मनोनाशाचा स्वतंत्ररीतीनें जर अभ्यास झालेला नसेल तर अजिह्वत्वादिकांचा

१ अजिह्वः षण्ढकः पङ्गुरन्धो बधिरः एव च । मुग्धश्च मुच्यते भिक्षुः षड्भिरेतैर्न संशयः ॥ १ ॥ इदमिष्टमिदं नेति योऽश्नन्नपि न सज्जते । हितं सत्यं मितं वक्ति तमजिह्वं प्रचक्षते ॥२॥ अद्यजातां यथा नारीं तथा षोडशवार्षिकीम् । शतवर्षां च

( पुढें चालू. )

आह । सहस्राङ्कुरशाखात्मफलपल्लवशालिनः । अस्य संसारवृक्षस्य मनो मूलमिति स्थितम् ॥ १ ॥ संकल्पमेव तन्मन्ये

---

अभ्यास झालेला असतांनाही तीं स्थिर रहाणार नाहींत. ह्मणूनच जनकानें मनाचा नाश केला पाहिजे असें पुढील श्लोकांत दर्शविलें आहेः—हजारों अंकुर, फांद्या, फळें व पल्लव ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या संसारवृक्षाचें मूळ मन ह्मणून ठरलेलें आहे १.

---

( मागील पृष्ठावरून )

यो दृष्ट्वा निर्विकारः स षण्डकः ॥ ३ ॥ भिक्षार्थमटनं यस्य विण्मूत्रकरणाय च । योजनान्न परं याति सर्वथा पङ्गुरेव सः ॥ ४ ॥ तिष्ठतो व्रजतो वापि यस्य चक्षुर्न दूरगम् । चतुर्युगां भुवं त्यक्त्वा परिव्राट् सोन्ध उच्यते ॥ ५ ॥ हितं मितं मनोरामं वचः शोकापहं च यत् । श्रुत्वा यो न शृणोतीव बधिरः स प्रकीर्तितः ॥ ६ ॥ सांनिध्ये विषयाणां च समर्थोऽविकलेन्द्रियः। सुप्तवद्वर्तते नित्यं भिक्षुर्मुग्धः स उच्यते॥७॥

( जीवन्मुक्तिविवेके वासनाक्षयप्रकरणम् । )

अर्थः—अजिह्व, षंडक, पंगु, अंध, बधिर आणि मुग्ध असा जो भिक्षु असेल तो मुक्त होतो; हे सहा गुणच निःसंशय त्याच्या मुक्तीचें कारण आहेत १. अन्न भक्षण करीत असतांनाही हें बरें अथवा हें वाईट अशी चिकित्सा करून मिष्टान्नाविषयीं जो आसक्त होत नाहीं अथवा रुचिहीन अन्नाचा जो त्याग करीत नाहीं आणि त्याचप्रमाणें ज्याचें भाषण हितावह, सत्य व मित असतें त्याला अजिह्व असें ह्मणतात २. नुकती जन्मास आलेली स्त्री, त्याचप्रमाणें ऐन तारुण्याच्या भरांत असलेली सोळा वर्षांची युवती आणि जरेनें जर्जर झालेली शंभर वर्षांची ह्मातारी अवलोकन केली असतांही ज्याचें मन एकसारिखें विकाररहितच असतें त्याला षंडक असें ह्मणतात ३. भिक्षा आणि मलमूत्रविसर्जन ह्यांकरितांच ज्याचें गमन आहे आणि योजनापेक्षां अधिक जो जात नाहीं तो सर्वथा पंगुच होय ४. बसला असतांना अथवा चालला असतांना सोळा हात भूप्रदेश सोडून ज्याची दृष्टि दूर जात नाहीं तो अंध भिक्षु होय ५. हित, मित, चित्तवेधक आणि शोकनाशक भाषण श्रवण करूनही जो श्रवण करीत नसल्यासारिखा असतो ह्मणजे ज्याच्या मनावर त्याचा कांहीं एक परिणाम होत नाहीं त्या भिक्षूला बधिर असें ह्मणतात ६. विषयांचा उपभोग घेण्यास समर्थ असूनही विषयांचें सांनिध्य असतांना ज्याचीं इंद्रियें निर्विकार असतात ह्मणजे जो नेहमीं गाढ झोंप लागलेल्या पुरुषाप्रमाणें विषयांचें संनिधही निश्चल रहातो त्या भिक्षूला मुग्ध असें ह्मणतात ७.

संकल्पोपशमेन तत् । शोषयामि यथा शोषमेति संसार-पादपः ॥ २ ॥ प्रबुद्धोस्मि प्रबुद्धोस्मि दुष्टश्चौरो मयात्मनः । मनो नाम निहन्म्येनं मनसास्मि चिरं हत इति ॥ ३ ॥ वसिष्ठोप्याह । अस्य संसारवृक्षस्य सर्वोपद्रवदायिनः । उपाय एक एवास्ति मनसः स्वस्य निग्रहः ॥ १ ॥ मनसोभ्युदयो नाशो मनोनाशो महोदयः । ज्ञमनो नाशमभ्येति मनोज्ञस्य हि शृङ्खला ॥ २ ॥ तावन्निशीथवेताला वल्गन्ति हृदि वासनाः । एकतत्त्वदृढाभ्यासाद्यावन्न विजितं मनः ॥ ३ ॥ प्रक्षीणचित्तदर्पस्य निगृहीतेन्द्रियद्विषः । पद्मिन्य इव हेमन्ते क्षीयन्ते भोगवासनाः ॥ ४ ॥ हस्तं हस्तेन संपीड्य दन्तैर्दन्तान्विचूर्ण्य

---

तें मनोमूल संकल्परूपच आहे असें मला वाटत असून संकल्पनाशाच्याच योगानें मी तें शुष्क करून टाकीन. ह्मणजे आपोआपच संसारवृक्ष वाळून जाईल २. जागा झालों रे, जागा झालों ! आत्म्याचा अपहार करणारा मनोनामक चोर मला दिसला. ह्याला मी आतां ठार मारितों. कारण, ह्या मनाच्याच योगानें मी पुष्कळ दिवसपर्यंत ठार बुडालों आहें " ३. वसिष्ठही ह्मणतातः—" सर्व प्रकारचे उपद्रव देणाऱ्या ह्या संसारवृक्षाला स्वतःच्या मनाचा निग्रह हा एकच उपाय आहे. ! मनाचा अभ्युदय हा स्वतःचा नाश असून मनाचा नाश हा स्वतःचा मोठा अभ्युदय आहे. परंतु, ज्ञानी पुरुषाचेंच मन नाश पावत असून अज्ञानी पुरुषाचें मन ही एक त्याला शृंखलाच आहे २. अद्वितीय आत्मतत्त्वाच्या दृढ अभ्यासानें जोंपर्यंत मन जिंकून टाकिलेलें नाहीं तोंपर्यंत मध्यरात्रीं बाहेर पडणारे वासनारूप वेताळ हृदयामध्यें उड्या मारीत असतात ३. चित्ताचा गर्व नाहींसा होऊन इंद्रियरूप शत्रु पराजित झाले असतां हेमंतऋतूमध्यें ज्याप्रमाणें कमलिनी नाहींशा होतात त्याचप्रमाणें विषयोपभोगवासना नाहींशा होतात ४. ह्यास्तव,

च । अङ्गान्यङ्गैः समाक्रम्य जयेदादौ स्वकं मनः ॥ ५ ॥ एतावति धरणितले सुभगास्ते साधुचेतनाः पुरुषाः । पुरुषकथासु च गण्या न जिता ये चेतसा स्वेन ॥ ६ ॥ हृदयबिले कृतकुण्डल उल्बणकलनाविषो मनोभुजगः । यस्योपशान्तिमगमच्चन्द्रवदुदितं तमव्ययं वन्द इति ॥ ७ ॥ चित्तं नाभिः किलास्येदं मायाचक्रस्य सर्वतः । स्थीयते चेत्तदाक्रम्य तन्न किंचित्प्रबाधत इति ॥ १ ॥ गौडपादाचार्यैरप्युक्तम् । मनसो निग्रहायत्तमभयं सर्वयोगिनाम् । दुःखक्षयः प्रबोधश्चाप्यक्षया शान्तिरेव चेति ॥ अर्जुनेनोक्तम् ॥ चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।

---

हातावर हात चोळून व दांत ओंठ खाऊन प्रथमतः स्वतःचें मन जिंकावें ५. स्वतःच्या मनानें जे जिंकले गेले नाहींत तेच काय ते पुरुष एवढ्या भूतलावर सज्जन व भाग्यशील असून मोठमोठया पुरुषांच्या कथा निघाल्या असतां त्यांत गणण्यास योग्य आहेत ६. उत्कट वासनारूप विषानें युक्त असून कुंडलें धारण केलेला मनोरूप भुजंग ज्याच्या हृदयबिलांतून नाहींसा झालेला आहे त्या, चंद्राप्रमाणें उदयास आलेल्या, अविनाशी पुरुषाला माझा नमस्कार असो " ७. " खरोखर चित्त हाच ह्या मायाचक्राचा नाभिस्थानभूत मुख्य भाग आहे. ह्यास्तव, सर्व प्रकारें चित्ताचा पराजय करून राहिलें असतां तें मन कोणालाही पीडा देत नाहीं " असें दुसरे ठिकाणींही सांगितलेलें आहे १. " सर्वही योग्यांना प्राप्त होणारें अभय, दुःखक्षय, प्रबोध आणि अक्षय्य शांति हीं सर्व मनोनिग्रहावरच अवलंबून आहेत " ह्मणून गौडपादाचार्यांनींही सांगितलेलें आहे. " हे कृष्णा, मन हें केवळ चंचलच नसून शरीराला व इंद्रियांना पराधीन करून टाकणारें आहे. इतकेंच नव्हे; परंतु, हें प्रबल असून ( वरुणपाशसंज्ञक जलचर

तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करमिति ॥ ३४ ॥ एतद्वचनं हठयोगविषयम् । अत एव वसिष्ठ आह ॥ उपविश्योपविश्यैकचित्तकेन मुहुर्मुहुः । न शक्यते मनो जेतुं विना युक्तिमनिन्दितम् ॥ १ ॥ अङ्कुशेन विना मत्तो यथा दुष्टमतङ्गजः । विजेतुं शक्यते नैव तथा युक्त्या विना मनः ॥ २ ॥ मनोविलयहेतूनां युक्तीनां सम्यगीरणम् । वसिष्ठेन कृतं तावत्तन्निष्ठस्य वशे मनः ॥ ३ ॥ हठतो युक्तितश्चापि द्विविधो निग्रहो मतः ॥ ४ ॥ निग्रहो धीक्रियाक्षाणां हठो गोलकनिग्रहात् । कदाचिज्जायते कश्चिन्मनस्तेन विलीयते ॥ ५ ॥ अध्यात्मविद्याधिगमः साधुसंगम एव च । वासनासंपरित्यागः प्राणस्पन्दनिरोधनम् ॥ एतास्ता युक्तयः

---

प्राण्याप्रमाणें ) दृढही आहे. ह्यास्तव वायूच्या निरोधाप्रमाणें ह्या मनाचा निग्रह अत्यंत दुर्घट आहे असें मला वाटतें " ३४ ह्मणून अर्जुनानेंही ह्मटलें आहे. हें वचन हठयोगाविषयीं आहे. ह्मणूनच वसिष्ठ ह्मणतात:— " बसून बसून एका गोष्टीकडे वारंवार जरी लय लाविलें तरी चांगल्या युक्तीवांचून मन जिंकितां येणें शक्य नाहीं १. अंकुशावांचून जसा मदमत्त झालेला दुष्ट गज आवरून धरितां येणें शक्य नाहीं तसेंच युक्तीवांचून मन स्वाधीन होणें शक्य नाहीं २. मनाचा नाश होण्याला हेतभूत असलेल्या युक्तींचें प्रतिपादन उत्कृष्ट रीतीनें वसिष्ठानें केलें आहे. तेव्हां त्या युक्तीविषयीं जो तत्पर असतो त्याचें मन स्वाधीन असतें ३. निग्रह दोन प्रकारचा आहे. हठानें होणारा एक व युक्तीनें होणारा दुसरा ४. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांचा निग्रह एकादेवेळीं गोलकांच्या निरोधामुळें होत असतो आणि त्याच्या योगानें मनाचा नाश होतो. त्याला हठविषयक निग्रह ह्मणतात ५. आत्मविषयक ज्ञानाची प्राप्ति, साधुसमागम, वासनात्याग आणि प्राणस्पंदाचा निरोध ह्या युक्ति खरोखर

न्ति चित्तजये किल ॥ ६ ॥ सतीषु युक्तिष्वेतासु
ग्रमयन्ति ये । चेतस्ते दीपमुत्सृज्य विनि-
ञ्जोऽञ्जनैः ॥ ७ विमूढाः कर्तुमुद्युक्ता ये हठाच्चेतसो
। ते निबध्नन्ति नागेन्द्रमुन्मत्तं बिसतन्तुभिरिति ॥८॥

द्विविधो हठनिग्रहः क्रमनिग्रहश्चेति । तत्र
ोत्रादिज्ञानेन्द्रियाणि वाक्पाण्यादिकर्मेन्द्रियाणि च
कोपरोधमात्रेण हठान्निगृह्यन्ते । तद्दृष्टान्तेन मनोपि
नेग्रहीष्यामीति मूढस्य भ्रान्तिर्भवति । न तु तन्निगृ-
तद्गोलकस्य हृदयकमलस्य निरोद्धुमशक्यत्वात् ।
क्रमनिग्रह एव योग्यः । क्रमनिग्रहे चाध्यात्मविद्या-
दय उपायाः । सा च विद्या दृश्यस्य मिथ्यात्वं दृग्व-
स्वप्रकाशत्वं च बोधयति। तथा च सत्यतन्मनः स्वगो-

---

रा जय करण्याविषयीं समर्थ आहेत ६. ह्या युक्ति असतांना
जे चित्ताचें नियमन करूं पहातात ते दीपाचा त्याग करून
ा योगानें आपला नाश करून घेतात ७. जे मूढ लोक हठानें
जिंकण्यास उद्युक्त होतात ते उन्मत्त झालेल्या महागजाला कमल-
ल्या तंतूंनीं बांधूं पहातात असें समजावें " ८. निग्रह दोनप्रका-
आहे. एक हठनिग्रह व एक क्रमनिग्रह. चक्षु, श्रोत्र इत्यादि ज्ञानें-
ना आणि वाणी, हस्त इत्यादि कर्मेंद्रियांचा केवल त्या त्या गोल-
निरोध केल्यामुळें हट्टानें निग्रह करितां येतो ह्मणून त्याचा दृष्टांत
"त्याप्रमाणें मनाचाही मला निग्रह करितां येईल " असा मूढ
ला भ्रम होत असतो. परंतु, त्या मनाचा निग्रह होत नाहीं. कारण,
ा गोलक जें हृदयकमल त्याचा हट्टानें निरोध होणें अशक्य आहे.
ा क्रमनिग्रहच योग्य आहे. अध्यात्मज्ञानप्राप्ति वगैरे उपाय क्रमनिग्रहा-
ीं आहेत. त्या ज्ञानामुळें दृश्य मिथ्या असून दृग्वस्तु स्वयंप्रकाश आहे

चरेषु दृश्येषु प्रयोजनाभावं प्रयोजनवति दृग्वस्तुन्यगोचरत्वं च बुद्ध्वा निरिन्धनाग्निवत्स्वयमेवोपशाम्यति । तथा च श्रूयते यथा निरिन्धनो वह्निः स्वयोनावुपशाम्यति । तथा वृत्तिक्षयाच्चित्तं स्वयोनावुपशाम्यति ॥ योनिरात्मा ॥ यस्तु बोधितमपि तत्त्वं न सम्यग्बुध्यते यश्च विस्मरति तयोरुभयोः साधुसंगम एवोपायः । साधवो हि पुनःपुनर्बोधयन्ति स्मारयन्ति च । यस्तु विद्यामदादिदुर्वासनया पीड्यमानो न साधूननुवर्तितुमुत्सहते तस्य पूर्वोक्तविवेकेन वासनापरित्याग उपायः ।

---

असा बोध होतो. असें झालें ह्मणजे—स्वतःला गोचर असलेल्या दृश्य वस्तूंचा कांहीं एक उपयोग नाहीं आणि ज्याचा उपयोग आहे ती दृग्वस्तु आपल्याला अगोचर आहे—असें समजून आल्यावर हें मन इंधनरहित अग्नीप्रमाणें आपोआपच नाश पावतें. “ ज्याप्रमाणें इंधनरहित अग्नि आपोआप नाहींसा होतो त्याचप्रमाणें वृत्तींचा क्षय झाला असतां चित्त आत्म्याचें ठिकाणीं लीन होऊन जातें ” अशी श्रुतिही आहे. आत्मा ही चित्ताची योनि होय. ज्याला उपदेश केला असतांही तत्त्वज्ञानाचा चांगला बोध होत नाहीं आणि ज्याला विस्मरण पडतें त्या उभयतांना साधुसमागम हाच ( चित्तनाशाचा ) उपाय आहे. कारण, साधु वारंवार बोध करीत असतात आणि स्मरण देत असतात. विद्यामद, धनमद इत्यादि दुर्वासनांनीं ग्रस्त झाल्यामुळें ज्याला साधुशुश्रूषा करण्याची इच्छा नाहीं त्याला पूर्वी ( ह्मणजे वासनाक्षयनिरूपणसमयीं ) सांगितलेल्या विवेकानें* वासनात्याग करणें हाच ( मनोनाशाचा ) उपाय होय.

---

* यथा पुत्रकलत्रादिभिः पीड्यमानस्ततो विरक्तस्तन्निवर्तकं पारिव्राज्यं गृह्णाति तथा विद्यामदधनमदकुलाचारमदादिमलिनवासनाभिः पीड्यमानस्तद्विरोधिनं विवेकमभ्यसेत् । स च विवेको जनकेन दर्शितः । अद्य ये महतां मूर्ध्नि ते दिनैर्निपतन्त्यधः ॥

( पुढें चालू )

( मागील पृष्ठावरून )

हन्त चित्तमहत्तायाः कैषा विश्वस्तता तव ॥ १ ॥ क धनानि महीपानां ब्रह्मणः क जगन्ति वा । प्राक्तनानि प्रयातानि केयं विश्वस्तता तव ॥ २ ॥ कोटयो ब्रह्मणो याता गताः सर्गपरंपराः । प्रयाताः पांसुवद्भूपाः का धृतिर्मम जीविते ॥ ३ ॥ येषां निमेषणोन्मेषौ जगतां प्रलयोदयौ । तादृशाः पुरुषा नष्टा मादृशां गणनैव केति ॥४॥

( जीवन्मुक्तिविवेके वासनाक्षयप्रकरणम् )

अर्थः—ज्याप्रमाणें पुत्र, भार्या वगैरेंपासून पीडा होऊं लागली असतां पुरुष त्यांच्यापासून विरक्त होऊन पुत्रभार्यादिकांची निवृत्ति करणाऱ्या संन्यासाचा स्वीकार करितो त्याचप्रमाणें विद्यामद, धनमद, कुलाचारमद इत्यादि दुष्ट वासना पुरुषाला ग्रासूं लागल्या असतां त्यानें त्या वासनांचा विरोधी जो विवेक त्याचा अभ्यास करावा. तो विवेक जनकानें दर्शविला आहे; तो येणेंप्रमाणें:—

" आज जे मोठ्यांच्या मस्तकावर आहेत ते काहीं दिवसांनीं खालीं पडतात तेव्हां चित्तमहत्त्वाचा जो हा तुला विश्वास वाटत आहे तो काय आहे? १. राजांच्या संपत्ति कोठें आहेत आणि ब्रह्मदेवाचीं पुरातन जगतें तरी कोणीकडे गेलीं आहेत? ( ह्यांचा जर पत्ता लागत नाहीं ) तर तुझ्या ह्या विश्वासाला काय ह्मणावें? २. अरे, कोट्यावधि ब्रह्मदेव नाहींसे झाले, सृष्टीच्या परंपरा गत झाल्या आणि राजे तर धुळीच्या रजःकणांप्रमाणें असंख्य नाश पावले. तेव्हां जीविताविषयीं विश्वास कोठून धरावा? ३. सारांश, जगताची उत्पत्ति व संहार होण्यास लागणारा काल हा ज्यांच्या निमेषोन्मेषांबरोबर ( ह्मणजे डोळ्याचें पातें लवण्यास लागणाऱ्या कालाबरोबर ) आहे तशा प्रकारच्या पुरुषांचा जर नायनाट झाला तर माझ्यासारख्यांची कथा काय? " ४.

याज्ञवल्क्योषस्तादीनां यौ स्वनिष्ठपरनिष्ठौ विद्यामदौ तयोर्यथा विवेकेन प्रतीकारस्तथा धनाभिलाषक्रोधयोरप्यवगन्तव्यः । अर्थानामर्जने क्लेशस्तथैव परिपालने । नाशे दुःखं व्यये दुःखं धिगर्थान्क्लेशकारिण इति धनविषयो विवेकः ॥

( जीवन्मुक्तिविवेके वासनाक्षयप्रकरणम् )

अर्थः—विद्येसंबंधानें दुसऱ्याविषयीं स्वतःचे ठिकाणीं असलेला आणि स्वतःविषयीं दुसऱ्याचे ठिकाणीं असलेला असे दोन्ही प्रकारचे जे याज्ञवल्क्य, उषस्त इत्यादि ऋषींचे मद त्यांचा जसा विवेकानें प्रतीकार झाला तसा धनाभिलाष व क्रोध यांचाही विवेकानें प्रतीकार होतो असें समजावें. द्रव्य मिळविण्यास व मिळविलेलें रक्षण करण्यास क्लेश पडत असून त्याचा नाश झाला असतां दुख होतें व खर्च झाला असतांही दुःख होतें. तस्मात्, ह्या दुःखदायक द्रव्याला धिक्कार असो; हा द्रव्यसंबंधीं विवेक होय.

क्रोधोपि द्विविधः स्वनिष्ठः परविषयः परनिष्ठः स्वविषयश्चेति । तत्र स्वनिष्ठं प्रत्येवमुक्तम् । अपकारिणि कोपश्चेत्कोपे कोपः कथं न ते । धर्मार्थकाममोक्षाणां प्रसह्य परिपन्थिनि ॥ फलान्वितो धर्मयशोर्थनाशनः स चेदपार्थः स्वशरीरतापनः । न चेह नामुत्र हिताय यः सतां मनांसि कोपः समुपाश्रयेत्कथमिति ॥ स्वविषयं प्रत्येवमीरितम् । न मेपराधः किमकारणे नृणां मदभ्यसूयेत्यपि नैव चिन्तयेत् । न यत्कृता प्राग्भवबन्धनिःसृतिस्ततोपराधः परमो नु चिन्त्यताम् ॥ नमोस्तु कोपदेवाय स्वाश्रयज्वालिने भृशम् । कोप्यस्य मम वैराग्यदायिने दोषबोधिन इति ॥

( वासनाक्षयप्रकरणम् )

अर्थः–क्रोधही दोन प्रकारचा आहे. दुसऱ्याविषयीं आपल्या ठिकाणीं असलेला आणि आपणाविषयीं दुसऱ्याचे ठिकाणीं असलेला. ह्यांपैकीं स्वतःचे ठिकाणीं दुसऱ्याविषयीं असलेल्या कोपासंबंधानें ह्याप्रमाणें विवेक करावा ह्मणून सांगितलें आहे:–" अपकार करणाऱ्यावर जर तुझा कोप असेल तर धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चतुर्वर्गाचा एकाएकीं नाश करणारा जो तुझा क्रोध त्याच्यावरच तुझा कोप कां होत नाहीं? धर्म, अर्थ व यश ह्यांचा नाश हेंच ज्याचें फल आहे, उपयोग कांहीं एक नसून आपल्या शरीराला मात्र जो ताप देणारा आहे आणि इहलोकीं व परलोकींही ज्याच्यापासून कांहीं एक उपयोग होत नाहीं असा जो कोप तो सज्जनांच्या मनामध्यें राहील कसा? स्वतःविषयीं दुसऱ्याचे ठिकाणीं असलेल्या क्रोधासंबंधानें असें ह्मटलें आहे:— " — माझा कांहीं एक अपराध नाहीं; लोक विनाकारण कां ह्मणून माझा मत्सर करीत आहेत ?—असें कधींही मनांत न आणितां, पूर्वी मीं संसारबंधापासून सुटण्याचा उपाय कांहीं एक केला नाहीं हा माझाच मोठा अपराध आहे, असें मनांत वागवावें. कोपरूप देव आपल्या आश्रयदात्याचाच अतिशय दाह करीत असून क्रुद्ध होणाऱ्या मला वैराग्य उत्पन्न करून दोष दर्शवीत असतो. तस्मात्, त्याला नमस्कार असो. "

धनाभिलाषः क्रोधवद्योषित्पुत्राभिलाषावपि विवेकेन निवर्तनीयौ । तत्र योषिद्विवेको वसिष्ठेन दर्शितः । मांसपाञ्चालिकायास्तु यन्त्रलोलेङ्गपञ्जरे । स्नाय्वस्थिग्रन्थिशालिन्याः स्त्रियाः किमिव शोभनम् ॥ १ ॥ त्वङ्मांसरक्तबाष्पाम्बु पृथक्कृत्वा विलोचने । समालोकय रम्यं चेत्किं मुधा परिमुह्यसि ॥ २ ॥ मेरुशृङ्गतटोल्लासि गङ्गाजलरयोपमा । दृष्टा यस्मिन्स्तने मुक्ताहारस्योल्लासशालिता ॥ ५ ॥ श्मशानेषु दिगन्तेषु स एव ललनास्तनः । श्वभिरास्वाद्यते काले लघुपिण्ड इवान्धसः ॥ ६ ॥ केशकज्जलधारिण्यो दुःस्पर्शा लोचनप्रियाः । दुष्कृताग्निशिखा नार्यो दहन्ति तृणवन्नरम् ॥ ११ ॥ ज्वलतामतिदूरेपि सरसा अपि नीरसाः । स्त्रियो हि नरकाग्नीनामिन्धनं चारु दारुणम् ॥ १२ ॥ कामनाम्ना किरातेन विकीर्णा मुग्धचेतसाम् । नार्यो नरविहङ्गानामङ्गबन्धनवागुराः ॥ १८ ॥ जन्मपल्वल -

( मागील पृष्ठावरून. )

मत्स्यानां चित्तकर्दमचारिणाम् । पुंसां दुर्वासनारज्जुर्नारी बडिशपिण्डिका ॥ २० ॥ सर्वेषां दोषरत्नानां सुसमुद्गिकयानया । दुःखशृङ्खलया नित्यमलमस्तु मम स्त्रिया ॥ २३ ॥ इतो मांसमितो रक्तमितोऽस्थीनीति वासरैः । ब्रह्मन्कतिपयैरेव याति स्त्री विशारुताम् ॥ २५ ॥ यस्य स्त्री तस्य भोगेच्छा निःस्त्रीकस्य क्व भोगभूः । स्त्रियं त्यक्त्वा जगत्त्यक्तं जगत्त्यक्त्वा सुखी भवेत् ॥ ३५ ॥

अर्थः—स्नायु व अस्थि ह्यांच्या ग्रंथींनीं युक्त असलेली जी मांसाची बाहुली स्त्री तिच्या, शकटादि यंत्राप्रमाणें चंचल असलेल्या, शरीररूप पिंजऱ्यामध्यें काय बरें चांगलें आहे ? १. त्वचा, मांस, रक्त व अश्रुजल हीं वेगवेगळीं घेऊन मग तिचे नेत्र रमणीय असतील तर पहा; नाहीं तर व्यर्थ कशाकरितां मोहित होत आहेस? २ मेरुपर्वताच्या शिखरावर झळकत असलेल्या गंगाजलाच्या प्रवाहाचे उपमेस योग्य झालेली अशी मोत्यांच्या हारानें आलेली शोभा ज्या स्तनाचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते ५ तोच स्त्रीचा स्तन वेळ आली ह्मणजे गांवाबाहेरील स्मशानामध्यें भाताच्या लहानशा पिंडाप्रमाणें मिटक्या मारमारून कुत्रीं खात असतात ६. केशरूप कज्जल धारण करीत असून दिसण्यांतच मनोहर असलेल्या स्त्रिया स्पर्श करणाऱ्या पुरुषाला भयंकर अशा दुष्कृत्यरूप अग्नीची ज्वाला असून त्या पुरुषाला तृणाप्रमाणें दग्ध करून टाकीत असतात ११. वर वर सरस दिसूनही वस्तुतः नीरस असलेल्या ह्या स्त्रिया फार लांबूनही ( विषयलुब्ध पुरुषांना ) दग्ध करून टाकणाऱ्या नरकरूप अग्नीचें मनोहर परंतु भयंकर असें इंधन आहेत १२. अहो, स्त्रिया ह्मणजे कामनामक पारध्यानें मूढपुरुषरूप पक्ष्यांना पकडण्याकरितां एक प्रकारचीं जाळींच पसरलेलीं आहेत १८. जन्मरूप तळ्यामध्यें रहात असून चित्तरूप कर्दमामध्यें संचार करणाऱ्या पुरुषरूप मत्स्यांचें स्त्री हें एक दुष्टवासनारूप गळानें युक्त असलेलें आमिष होय २०. दुःखरूप शृंखलेनें युक्त असलेली सर्वदोषरूप रत्नांची ही स्त्रीरूप बळकट पेटी मला आतां पुरें झाली २३. हे ब्रह्मनिष्ठ, येथें पहावें तर मांस, तेथें दृष्टि द्यावी तर रक्त आणि तिकडे नजर फेंकावी तर अस्थि अशी ही स्त्री अगदीं थोडक्याच दिवसांत नाश पावत असते २५. तस्मात्, ज्याला स्त्री असेल त्याला विषयवासना असणार. अपत्नीक पुरुषाला विषयोपभोगाचा संभव कोठून ? सारांश, एका स्त्रीचा त्याग केला ह्मणजे पुरुषाला संपूर्ण जगताची पर्वा बाळगण्याचें मुळींच कारण रहात नाहीं व जगताची जरूर राहिली नाहीं ह्मणजे पुरुष सुखी होतो ३५.

पुत्रविवेको ब्रह्मानन्दे दर्शितः । अलभ्यमानस्तनयः पितरौ क्लेशयेच्चिरम् । लब्धोऽपि गर्भपातेन प्रसवेन च बाधते ॥ १ ॥ जातस्य ग्रहरोगादिः कुमारस्य च मूर्खता ।

**वासनानामतिप्राबल्येन त्यक्तुमशक्यत्वे प्राणस्पन्दनिरोधनमुपायः। प्राणस्पन्दनवासनयोश्चित्तप्रेरकत्वात्तयोर्निरोधे चित्तशान्तिरुपपद्यते । प्रेरकत्वं च वसिष्ठ आह द्वे बीजे चित्तवृक्षस्य वृत्तिव्रततिधारिणः । एकं प्राणपरिस्पन्दो द्वितीयं दृढवासना ॥ मती सर्वगता संवित्प्राणस्पन्देन बोध्यते । संवे-**

---

वासना अतिशय प्रबल झाल्यामुळें त्यांचा त्याग करणें जर अशक्य झालें तर प्राणस्पंदाचा निरोध हाच मनोनाशाचा उपाय होय. कारण, प्राणस्पंदन आणि वासना हीं उभयतां चित्ताला प्रेरणा करीत असतात. तेव्हां त्यांचा निरोध झाला असतां चित्ताचा नाश होतो. प्राणस्पंदन व वासना हीं चित्ताचीं प्रेरक ह्मणून वसिष्ठांनींही सांगितलें आहे; तें येणेंप्रमाणें:—" वृत्तिरूप वेली धारण करणाऱ्या चित्तरूप वृक्षाचीं दोन बीजें आहेत; प्राणपरिस्पंद हें एक आणि दृढवासना हें दुसरें १. सर्व-

---

( मागील पृष्ठावरून. )

उपनीते त्वविद्यत्वमनुद्वाहश्च पण्डिते ॥ २॥ यूनश्च परदारादिर्दारिद्र्यं च कुटुम्बिनः । पित्रोर्दुःखस्य नास्त्यन्तो धनी चेन्म्रियते तदेति ॥ ३ ॥

( जीवन्मुक्तिविवेके वासनाक्षयप्रकरणम् । )

अर्थः–ब्रह्मानंदग्रंथामध्यें पुत्रविवेक दर्शविला आहे तो येणेंप्रमाणें:–"होत नसलेला मुलगा आईबापांना पुष्कळ दिवसपर्यंत दुःख देत असतो, होऊं लागला तर गर्भपातानें अथवा उत्पन्न होतांना प्रसूतिकालीं दुःख देतो, उत्पन्न झाला ह्मणजे पूतनादि ग्रह, रोग इत्यादि त्याला पीडा करूं लागले असतां मातापितरांना दुःख होतें, चालूं बोलूं लागल्यावर तो मूढ राहिला तर आईबाप दुःखी असतात व उपनयन झाल्यावर त्याला विद्या नसणें हें एक मातापितरांच्या दुःखाला कारण होतें. बरें, उपनयन होऊन मुलगा विद्वान् झाला तर त्याचा विवाह होत नाहीं ह्मणून आईबाप कष्टी होत असतात २. पुत्र यौवनावस्थेमध्यें आल्यावर त्याला जर परस्त्रीचें वगैरे व्यसन लागलें तर तें एक मातापितरांच्या दुःखालाच कारण होत असतें. बरें, त्याला परस्त्रीचें व्यसन वगैरे कांहीं एक न लागतां कुटुंबी बनून जर दरिद्री राहिला तर तें दारिद्र्यही आईबापांना दुःखदायकच होत असतें आणि मुलगा दरिद्री न होतां धनाढ्य होऊन जर का मृत्यु पावला तर त्या मातापितरांच्या दुःखाला अंतच नाहीं " ॥ ३ ॥

दनादनन्तानि ततो दुःखानि चेतस इति ॥ यथा भस्मच्छन्नमग्निं लोहकारा दृतिभ्यां धमन्ति तत्र च दृत्युत्पन्नवायुना सोऽग्निर्ज्वलति तथा चित्तोपादानेन काष्ठस्थानीयेनाज्ञानेनावृता संवित्प्राणस्पन्देन बोध्यमाना चित्तवृत्तिरूपेण प्रज्वलति । तस्माच्चित्तवृत्तिनामकात्संविज्ज्वालारूपात्संवेदनाद्दुःखान्युत्पद्यन्ते । सेयं प्राणस्पन्देन प्रेरिता चित्तोत्पत्तिः । अन्यां च स एवाह भावसंवित्प्रकटितामनुभूतां च राघव । चित्तस्योत्पत्तिमपरां वासनाजनितां शृणु ॥ दृढाभ्यस्तपदार्थैकभावनादतिचञ्चलम् । चित्तं संजायते जन्मजरामरणकारणमिति । न

---

व्यापी ज्ञानवृत्ति प्राणस्पंदानें बोधित होते आणि त्याच्यामुळें त्या चित्तरूप संवेदनापासून अनंत दुःखें उत्पन्न होतात २. " भस्मानें आच्छादित झालेल्या अग्नीला लोहार भात्यांनीं फुंकूं लागले असतां तेथें त्या भात्याच्या योगानें उत्पन्न झालेल्या वायूमुळें ज्याप्रमाणें तो अग्नि प्रज्वलित होतो त्याचप्रमाणें चित्ताला कारण जें अज्ञान हेंच एक कोणी काष्ठ, त्याच्या योगानें व्याप्त झालेल्या संवेदनवृत्तीला प्राणस्पंदरूप वायूचा झटका बसूं लागला असतां ती चित्तवृत्तिरूपानें प्रज्वलित होते आणि नंतर त्या चित्तवृत्तिनामक संवेदनापासून दुःखें उत्पन्न होतात; ती ही प्राणस्पंदानें ( ह्मणजे प्राणवायूच्या हालचालीनें ) घडून आलेली चित्ताची उत्पत्ति होय. चित्ताची दुसरी उत्पत्तिही त्या वसिष्ठांनींच सांगितली आहे, ती येणेंप्रमाणें:—" सुखदुःखांच्या संवेदनामुळें प्रकट झालेली आणि लोकांच्या अनुभवास आलेली अशी जी वासनेमुळें झालेली चित्ताची दुसरी उत्पत्ति ती, हे राघवा, तूं श्रवण कर १. पदार्थसंबंधीं भावनेचा एकसारिखा दृढ अभ्यास झाला असतां अत्यंत चंचल असें चित्त त्याच्यापासून उत्पन्न होतें व तें जन्म, जरा आणि मरण ह्यांना कारण होतें २. " प्राण आणि वासना हीं उभयतां नुसतीं

केवलं प्राणवासनयोश्चित्तप्रेरकत्वं किं तु परस्परप्रेरकत्वमप्यस्ति । तदाह वसिष्ठः । वासनावशतः प्राणस्पन्दस्तेन च वासना । क्रियते चित्तबीजस्य तेन बीजाङ्कुरक्रम इति ॥ अत एवान्यतरनाशेनोभयनाशमप्याह द्वे बीजे चित्तवृक्षस्य प्राणस्पन्दनवासने । एकस्मिंश्च तयोः क्षीणे क्षिप्रं द्वे अपि नश्यत इति ॥ तयोर्नाशोपायं नाशफलं चाह प्राणायामदृढाभ्यासैर्युक्त्या च गुरुदत्तया । आसनाशनयोगेन प्राणस्पन्दो निरुध्यते ॥ असङ्गव्यवहारित्वाद्भवभावनवर्जनात् । शरीरनाशदर्शित्वाद्वासना न प्रवर्तते ॥ वासनासंपरित्यागाच्चित्तं

---

चित्ताचींच प्रेरक नसून परस्परांचींही प्रेरक आहेत व तेंही वसिष्ठांनीं सांगितलें आहे. ते ह्मणतातः—" वासनेमुळें प्राणस्पंद व त्याच्या योगानें वासना उत्पन्न होत असते आणि ह्मणूनच त्याच्या योगानें ह्या चित्तवृक्षाचा, बीजोत्पत्तीमुळें अंकुरोत्पत्ति आणि अंकुरोत्पत्तीमुळें बीजोत्पत्ति, असा क्रम सुरू रहातो १." वासना आणि प्राणस्पंद हीं परस्परांचीं उत्पादक आहेत, ह्मणूनच एकाचा नाश झाला असतां दोहोंचाही नाश होतो, असें वसिष्ठांनीं " प्राणस्पंदन आणि वासना हीं चित्तवृक्षाचीं दोन बीजें असून त्यांपैकीं एकाचा नाश झाला आसतां दोन्हींही सत्वर नाश पावतात १. " ह्या श्लोकांत सांगितलें आहे. प्राणस्पंद आणि वासना ह्यांच्या नाशाचा उपाय कोणता आणि त्यांचा नाश झाला असतां काय फल प्राप्त होतें हें वसिष्ठांनींच सांगितलें आहे, तें येणेंप्रमाणें:—" प्राणायामाविषयीं दृढ अभ्यास, गुरूनीं सांगितलेली युक्ति आणि आसन व योग्य आहार ह्यांच्या योगानें प्राणस्पंदाचा निरोध होतो. कोठेंही आसक्ति न धरिल्यानें, संसारविषयक विचार वर्ज्य केल्यानें आणि शरीर नश्वर आहे असें समजल्यानें वासना प्रवृत्त होत नाहीं १. वासनेचा त्याग झाला असतां आणि प्राणस्पंदाचा निरोध झाला असतां

गच्छत्यचित्तताम् । प्राणस्पन्दनिरोधाच्च यथेच्छसि तथा कुरु ॥ एतावन्मात्रकं मन्ये रूपं चित्तस्य राघव । यद्भावनं वस्तुनोन्तर्वस्तुत्वेन रसेन च ॥ यदा न भाव्यते किंचिद्धेयोपादेयरूपि यत् । स्थीयते सकलं त्यक्त्वा तदा चित्तं न जायते । अवासनत्वात्सततं यदा न मनुते मनः ॥ अमनस्ता तदोदेति परमोपशमप्रदेति ॥ अमनस्तानुदये शान्त्यभावमाह चित्तक्षयदृढाक्रान्तं न मित्राणि न बान्धवाः। शक्नुवन्ति परित्रातुं गुरवो न च मानवा इति ॥ आसनाशनयोगेनेति यदुक्तं तत्रासनस्य लक्षणमुपायं फलं च त्रिभिः सूत्रैः पतञ्जलिः सूत्रयामास । स्थिरसुखमासनं प्रयत्नशैथि-

---

चित्ताचा नाश होतो; ह्यास्तव, हे रामा, तुला वाटेल तसें तूं कर २. हे राघवा, दृश्य वस्तु सत्य आहे असें समजून त्या वस्तूविषयीं अभिलाष धरून जें अंतःस्थ चिंतन करणें तें चित्ताचें रूप मी समजत आहें ३. त्याज्य अथवा ग्राह्य अशा कसल्याही वस्तूचें जेव्हां चिंतन होत नाहीं ह्मणजे सर्वांचा त्याग करून जेव्हां पुरुष स्वस्थ बसतो तेव्हां चित्त उत्पन्न होत नाहीं ४. वासना नाहींशी झाल्यामुळें जेव्हां मनाला कांहीं चिंतनव्यापार रहात नाहीं तेव्हां मनाचा नाश होतो आणि त्याच्या योगानें उत्कृष्ट शांति प्राप्त होते ५. मनोनाश झाला नाहीं तर शांति प्राप्त होत नाहीं, हें वसिष्ठांनींच सांगितलें आहे; तें येणेंप्रमाणें:—चित्तरूप क्षयरोगानें अतिशय व्याप्त झालेल्या पुरुषाचें रक्षण करण्यास मित्र, बंधु, गुरु आणि इतरही मानव ह्यांपैकीं कोणीही समर्थ होत नाहींत १. आसन व योग्य आहार ह्यांच्या योगानें प्राणवायूचा निरोध होतो, असें पूर्वीं ह्मटलें आहे. त्यांपैकीं आसनाचें लक्षण, उपाय व फल हीं **स्थिरसुखमासनम् । प्रयत्नशैथिल्यानन्तसमापत्तिभ्याम् । ततो द्वन्द्वानभिघातः ।** ह्या तीन सूत्रांनीं भगवान् पतंजलींनीं

ल्यानन्तसमापत्तिभ्यां ततो द्वन्द्वानभिघात इति । पद्मकस्वस्तिकादिना यादृशेन देहस्थापनरूपेण यस्य पुरुषस्यावयवव्यथानुत्पत्तिलक्षणं सुखं देहचलनराहित्यलक्षणं स्थैर्यं च संपद्यते तस्य तदेव मुख्यमासनम् । तस्य च प्रयत्नशैथिल्यं लौकिक उपायः । गमनगृहकृत्यतीर्थयात्रास्नानयागहोमादिविषयो यः प्रयत्नो मानस उत्साहस्तस्य शैथिल्यं कर्तव्यम् । अन्यथा स उत्साहो बलाद्देहमुत्थाप्य यत्र क्वापि प्रेरयति । अलौकिकोपायश्च फणासहस्रेण धरणीं धारयित्वा स्थैर्येणावतिष्ठते योयमनन्तः स एवाहमस्मीति ध्यानं चित्तस्यानन्त समापत्तिः । तथा यथोक्तासनसंपादकमदृष्टं निष्पद्यते । सिद्धे चासने शीतोष्णसुखदुःखमानापमाना-

---

सांगितलीं आहेत. पद्मक, स्वस्तिक इत्यादि जशा प्रकारच्या देहस्थापनरूप आसनानें ज्या पुरुषाला शरीरविषयक अवयवांचे ठिकाणीं व्यथा उत्पन्न न होणें हें सुख व शरीराचें चलन न होणें हें स्थैर्य प्राप्त होतें त्या पुरुषाचें तेंच मुख्य आसन होय. प्रयत्नशैथिल्य हा तें आसन सिद्ध होण्याचा लौकिक उपाय होय. गमन, गृहकृत्य, तीर्थयात्रा, स्नान, याग, होम इत्यादिविषयक जो प्रयत्न ह्मणजे मानसिक उत्साह त्याचें शैथिल्य करावें ह्मणजे तो कमी करावा ( ह्मणजे आसन सिद्ध होतें ); नाहीं तर तो उत्साह बलात्कारानें देहाचें उत्थापन करून त्याला कोठें तरी नेतो. सहस्र फणांनीं पृथ्वी धारण करून स्थिर राहिलेला जो अनंत ह्मणजे शेष तोच मी असें जें चिंतन करणें ही चित्ताची अनंतसमापत्ति होय. ( अनंतसमापत्ति ह्मणजे अनंतरूप भावना. ) अनंतसमापत्ति हा अलौकिक उपाय होय. हा उपाय योजिला असतां वर सांगितलेलें आसन सिद्ध करणारें अदृष्ट उत्पन्न होतें आणि आसन सिद्ध झालें असतां शीत, उष्ण, सुख, दुःख, मान, अपमान इत्यादि

दिद्वन्द्वैर्यथा पूर्वं नाभिहन्यते । तथाविधस्य चासनस्य योग्यो देशः श्रूयते विविक्त देशे च सुखासनस्थः शुचिः समग्रीवशिरःशरीर इति ॥ समे शुचौ शर्करावह्निवालुकाविवर्जिते शब्दजलाशयादिभिः ॥ मनोनुकूले न तु चक्षुपीडने गुहानिवाताश्रयणे प्रयोजयेदिति च । सोयमासनयोगः । अशनयोगस्तु मिताहारत्वम् । अत्याहारमनाहारं नित्यं योगी विवर्जयेत् । इति श्रुतेः । भगवताप्युक्तम् । नात्यश्नतस्तु योगोस्ति न चैकान्तमनश्नतः । न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहेति ॥ जिता-

---

द्वंद्वांच्या तडाक्यांत पूर्वीप्रमाणें पुरुष सांपडेनासा होतो. तशा प्रकारच्या आसनाला योग्य देश कोणता हें पुढील श्रुतींत सांगितलें आहे. ग्रीवा, शिर आणि शरीर हीं सारखीं ठेवून व शुचि राहून एकांत प्रदेशामध्यें सुखासन घालून असावें. अशी एक श्रुति आहे आणि " सपाट, निर्दोष, शर्करासंज्ञक क्षुद्रपाषाण, अग्नि, वाळू, गडबड, जलाश्रय इत्यादिकांनीं रहित आणि नेत्रांना पीडा न देणारा ह्मणजे मशकांनीं युक्त नसलेला असा जो प्रदेश असेल त्या प्रदेशाचे ठिकाणीं अथवा गुहेचा किंवा इतर निवात स्थानाचा आश्रय करून योगाभ्यास करून " अशी दुसरी श्रुति आहे. असो. तो हा आसनयोग होय. अशनयोग ह्मणजे मित आहार करणें. कारण, अतिशय आहार किंवा निराहार योग्यानें कधींही करूं नये, असें श्रुतींत सांगितलें आहे आणि भगवानांनींही " प्रमाणापेक्षां अधिक अन्न भक्षण करणाऱ्याला, मुळींच न खाणाऱ्याला, अतिशय झोंप घेणाऱ्याला आणि त्याचप्रमाणें अतिशय जागरण करणाऱ्याला, हे अर्जुना, योग सिद्ध होत नाहीं १६. आहार, विहार, चेष्टा, निद्रा आणि जागरण हीं ज्याचीं नियमित आहेत त्याला दुःखनाशक योग

सनस्य प्राणायामेन मनोविनाशः श्वेताश्वतरैराम्नायते । त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं हृदीन्द्रियाणि मनसा संनिवेश्य । ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वान्स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ॥ प्राणान्प्रपीड्येह स युक्तचेष्टः क्षीणे प्राणे नासिकयोः श्वसीत । दुष्टाश्वयुक्तमिव वाहमेनं विद्वान्मनो धारयेताप्रमत्त इति ॥ योगी द्विविधो विद्यामदाद्यासुरीसंपद्रहितस्तत्सहितश्चेति । तयोराद्यस्य ब्रह्मध्यानेन मनसि निरुद्धे सति तन्नान्तरीयकतया प्राणो निरुध्यते । तं प्रति त्रिरुन्नतमिति मन्त्रः पठितः । द्वितीयस्याभ्यासेन प्राणे निरुद्धे तन्नान्तरीयकतया मनो निरुध्यते । तं प्रति प्राणान्प्रपीड्येति मन्त्रः प्रवृत्तः । प्राणपीडनप्रकारो वक्ष्यते । तेन च पीडनेन युक्तचेष्टो भवति । मन-

---

साध्य होतो १." असें भगवद्गीतेंतील सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे. आसन सिद्ध झालेल्या पुरुषाच्या मनाचा नाश प्रणायामानें होतो असें **त्रिरुन्नतं स्थाप्य० भयावहानि८। प्राणान्प्रपीड्येह० धारयेताप्रमत्तः।** ह्या श्वेताश्वतरोपनिषदांतील श्रुतींत सांगितलें आहे.

योगी दोन प्रकारचा असतो. विद्यामदप्रभृति आसुरी संपत्ति अंगीं नसलेला पहिला आणि ती अंगीं असलेला दुसरा. ह्यांपैकीं पहिला जो योगी त्याचें मन ब्रह्मचिंतनानें जखडून गेलें असतां प्राण मनापासून वेगळा होणारा नसल्यामुळें त्या योग्याच्या प्राणवायूचाही निरोध होतो. ह्या योग्याला उद्देशून **त्रिरुन्नतं** हा मंत्र श्रुतीमध्यें पठित आहे. विद्यामदप्रभृति आसुरी संपत्ति ज्याचे अंगीं असते असा जो दुसरा योगी त्याच्या प्राणवायूचा निरोध अभ्यासानें झाला असतां प्राणापासून मन वेगळें होत नसल्यामुळें आपोआप त्याच्या मनाचाही निरोध होतो. ह्या दुसऱ्या योग्याला उद्देशून **प्राणान्प्रपीड्य** हा मंत्र श्रुतीमध्यें पठित आहे. प्राणपीडनप्रकार पुढें सांगण्यांत येईल. त्या पीडनाच्या योगानें

श्चेष्टा विद्यामदादयो निरुध्यन्ते । प्राणनिरोधेन चित्तदोष-
निरोधे दृष्टान्तोन्यत्र श्रूयते यथा पर्वतधातूनां दह्यन्ते दहना-
न्मलाः । तथेन्द्रियकृता दोषा दह्यन्ते प्राणनिग्रहात् ॥ इति॥
अत्रोपपत्तिर्वसिष्ठेन दर्शिता यः प्राणपवनस्पन्दश्चित्तस्पन्दः स
एव हि । प्राणस्पन्दक्षये यत्नः कर्तव्यो धीमतोच्चकैरिति । मनो-
वाक्चक्षुरादीन्द्रियदेवताः स्वस्वव्यापारं निरन्तरं करिष्याम
इति व्रतं धृत्वा श्रमरूपेण मृत्युना ग्रस्ताः । स च मृत्युः
प्राणं नाप्नोत् । ततो निरन्तरमुच्छ्वासनिःश्वासौ कुर्वन्नपि प्राणो
न श्राम्यति । तदा विचार्य देवताः प्राणरूपं प्राविशन् ।
सोयमर्थो वाजसनेयिभिराम्नायते । अयं वै नः श्रेष्ठो यः संचरं-

---

मनुष्याच्या चेष्टा नियंत्रित होतात ह्मणजे विद्यामदप्रभृति मनोव्यापा-
रांचा निरोध होतो. प्राणवायूचा निरोध झाला असतां चित्तदोष नाहींसे
होतात, ह्याविषयीं दुसऱ्या एका श्रुतीमध्यें दृष्टांत आहे. " ज्याप्रमाणें
पर्वतसंबंधी धातूंचे मल दहनाच्या योगानें दग्ध होऊन जातात त्याच-
प्रमाणें इंद्रियकृत दोष प्राणवायूचा निरोध झाला असतां दग्ध होऊन
जातात. " ही ती श्रुति होय. ह्याविषयीं वसिष्ठमहर्षींनीं उपपत्ति दर्श-
विली आहे. ते ह्मणतातः— जें प्राणवायूचें चलन तेंच चित्ताचें चलन
होय. ह्यास्तव, प्राणवायूचें चांचल्य नाहींसें करण्याचा यत्न विचारी
पुरुषानें करावा.

मन, वाणी, चक्षु इत्यादि इंद्रियांच्या देवता " आह्मी आपआपले
व्यापार निरंतर सुरू ठेवीत जाऊं. " असें व्रत धारण करून बसल्या
असतांना श्रमरूप मृत्यूनें त्यांना ग्रस्त करून टाकिलें; परंतु, त्या श्रम-
रूप मृत्यूला प्राण धरितां आला नाहीं. ह्मणून प्राण हा निरंतर श्वासो-
च्छ्वास करीत असतांनाही कधीं थकत नाहीं. तेव्हां हा विचार मना-
मध्यें आणून इतर इंद्रियदेवता प्राणाच्या रूपामध्यें प्रविष्ट झाल्या. असें

श्वासंचरंश्च न व्यथते यो न रिष्यति हन्तास्यैव सर्वे रूपमसामेति। एतस्यैव सर्वे रूपमभवंस्तस्मादेत एतेनाख्यायन्ते प्राणा इति। अत इन्द्रियाणां प्राणरूपत्वं नाम प्राणाधीनचेष्टावत्त्वम्। तच्चान्तर्यामिब्राह्मणे सूत्रात्मप्रस्तावे श्रूयते वायुर्वै गौतम तत्सूत्रं वायुना वै गौतम सूत्रेणायं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि संदृब्धानि भवन्ति। तस्माद्वै गौतम पुरुषं प्रेतमाहुर्व्यस्रंसिषतास्याङ्गानीति वायुना हि गौतम सूत्रेण संदृब्धानि भवन्तीति॥ अतः प्राणमनस्पन्दनयोः सहभावित्वात्प्राणनिग्रहे मनो निगृह्यते। ननु सहस्पन्दो न युक्तः सुषुप्तौ चेष्टमानेपि प्राणे मनसोचेष्टमानत्वात्। विलीनत्वेन तदानीं मनस एवाभावात्। ननु क्षीणे प्राणे नासिकयोः श्वसीतेति व्याहतम्। न हि क्षीणप्राणस्य मृतस्य श्वासं क्वचित्पश्यामः। नापि श्वसतो जीवतः प्राण-

---

**अयं वै० एतेनाख्यायन्ते प्राणाः** ह्या वाजसनेयश्रुतींत सांगितलें आहे. इंद्रियें प्राणाच्या रूपामध्यें प्रविष्ट झालीं ह्याचा अर्थ इंद्रियव्यापार प्राणवायूच्या अधीन झाले. हा होय. अंतर्यामिब्राह्मणांत सूत्रात्म्याची प्रशंसा चालली असतांना असेंच सांगितलेलें आहे. **वायुर्वै गौतम० भवन्तीति** ही ती श्रुति होय. तस्मात्, प्राणस्पंद आणि मनस्पंद हे दोन्ही एककालींच होत असल्यामुळें प्राणवायूचा निरोध झाला असतां मनाचाही निग्रह होतो. आतां " एकाच वेळीं दोहोंचें चलन होतें, हें ह्मणणें योग्य दिसत नाहीं. कारण, सुषुप्ति ह्या अवस्थेमध्यें प्राणव्यापार सुरू असूनही मनोव्यापार बंद असतो. " अशी शंका कोणी करील तर ती योग्य नाहीं. कारण, त्या वेळीं मन लीन होऊन गेलें असल्यामुळें त्याचा अभावच असतो. " अहो, पण प्राण क्षीण झाला असतां नासिकेनें श्वासोच्छ्वास करावा, ह्या ह्मणण्याला बाध

क्षयोस्ति । नैवम् । अनुल्बणत्वस्य क्षयत्वेनात्र विवक्षितत्वात् । यथा खननच्छेदनादिषु व्याप्रियमाणस्य पर्वतमारोहतः शीघ्रं धावतो वा श्वासवेगो यावान्भवति न तावांस्त्ववस्थितस्यासीनस्य वा विद्यते तथा प्राणायामपाटवोपेतस्य तस्याल्पः श्वासो भवति । एतदेवाभिप्रेत्य श्रूयते भूत्वा तत्रायतप्राणः शनैरेव समुच्छ्वसेदिति । यथा दुष्टैरश्वैरुपेतो रथो मार्गं त्यक्त्वा यत्र क्वापि नीयते स च सारथिना दृढमश्वं रज्जुष्वाकृष्य मार्गेषु पुनर्धार्यते तथेन्द्रियैर्वासनादिभि-

---

येतो. कारण, ज्याचा प्राण क्षीण झाला आहे ह्मणजे जो मृत झाला आहे तो श्वासोच्छ्वास करीत असतांना कोठें आमच्या दृष्टीं पडत नाहीं आणि त्याचप्रमाणें जो श्वासोच्छ्वास करीत आहे ह्मणजे जो जिवंत आहे त्याचा प्राणक्षय झाला असल्याचेंही कोठें आढळण्यांत येत नाहीं." अशी जर शंका कोणी करील तर ती योग्य होणार नाहीं. कारण, येथील क्षयशब्दाचा अर्थ दुर्बलता इतकाच विवक्षित आहे. खणणें, तोडणें इत्यादि कार्यांत गढून गेलेल्याचा, पर्वत चढून जाणाऱ्याचा अथवा सत्वर धांवणाऱ्याचा श्वासवेग जितका दृष्टीं पडतो तितका नुसत्या उभ्या अथवा बसलेल्या पुरुषाचा श्वासवेग दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. त्याचप्रमाणें प्राणायाम करण्यांत जो पटु असतो त्याच्याही श्वासाचा वेग अगदीं अल्पच असतो. हाच उद्देश मनांत धरून **भूत्वा तत्रायतप्राणः शनैरेव समुच्छ्वसेत्** असें श्रुतीमध्यें सांगितलें आहे ( आणि " प्राणवायूचा निरोध करून हळूं हळूं तो बाहेर सोडावा." असा श्रुतीचा अर्थ आहे ). ज्याप्रमाणें आडदांड घोडे रथाला लाविले असतां ते मार्ग सोडून देऊन भलतीकडेच त्या रथाला घेऊन जातात, परंतु, अश्वांना लगामांनीं आंवरून धरून ज्याप्रमाणें सारथि तो रथ पुनरपि मार्गावर आणितो त्याचप्रमाणें इंद्रियांच्या योगानें ह्मणजे वासनादि-

रितस्ततो नीयमानं मनः प्राणरज्जौ दृढं धारितायां धार्यते। प्राणान्प्रपीड्येति यदुक्तं तत्र प्राणपीडनप्रकारोऽन्यत्र श्रूयते। सव्याहृतिं सप्रणवां गायत्रीं शिरसा सह। त्रिः पठेदायतप्राणः प्राणायामः स उच्यते॥ प्राणायामास्त्रयः प्रोक्ता रेचपूरककुम्भकाः। उत्क्षिप्य वायुमाकाशं शून्यं कृत्वा निरात्मकम्॥ शून्यभावेन युञ्जीयाद्रेचकस्येति लक्षणम्। वक्त्रेणोत्पलनालेन तोयमाकर्षयेन्नरः॥ एवं वायुर्गृहीतव्यः पूरकस्येति लक्षणम्॥ नोच्छ्वसेन्न च निःश्वासेन्नैव गात्राणि चालयेत्। एवं तावन्नियुञ्जीत कुम्भकस्येति लक्षणमिति॥ अत्र शरीरान्तर्गतं वायुं बहिर्निःसारयितुमुत्क्षिप्य शरीर-

---

कांच्या योगानें चित्त इकडे तिकडे जाऊं लागतें; परंतु, प्राणरज्जु खेंचून धरिली असतां तें मनही खेंचून धरितां येतें. असो.

**प्राणान्प्रपीड्य** ह्मणून जो मंत्र श्वेताश्वतरोपनिषदांत सांगितला आहे त्यांत विवक्षित असलेला प्राणपीडनप्रकार दुसऱ्या श्रुतीमध्यें पठित आहे, तो येणेंप्रमाणें:—

प्राणवायूचा निरोध करून प्रणव, व्याहृति आणि शिर ह्यांसहवर्तमान गायत्रीमंत्र तीन वेळ पठण करणें, ह्याला प्राणायाम असें ह्मणतात. रेचक, पूरक आणि कुंभक असे प्राणायामांत तीन प्रकार आहेत. शरीरांतील वायु बाहेर काढून शरीरांतील पोकळी वायुरहित करावी आणि आंत वायु न घेतां विवक्षित कालपर्यंत रहावें, हें रेचकाचें लक्षण होय. तोंडांत कमलाचा देंठ धरून ज्याप्रमाणें पुरुष त्या देंठांतून पाणी वर ओढून घेतो त्याप्रमाणें नासिकापुटानें वायु आंत ओढून घ्यावा, हें पूरकाचें लक्षण होय. वायु बाहेरही सोडूं नये, आंतही घेऊं नये आणि अवयवही हालवूं नयेत अशा अवस्थेमध्यें विवक्षित कालपर्यंत रहाणें, हें कुंभकाचें लक्षण होय. **उत्क्षिप्य वायुमा-**

माकाशं शून्यं निरात्मकं वायुरहितं कृत्वा स्वल्पमपि वायुमप्रवेश्य शून्यभावेनैव नियमयेत् । तदिदं रेचकं भवति । कुम्भको द्विविध आन्तरो बाह्यश्चेति । तदुभयं वसिष्ठ आह । अपानेऽस्तं गते प्राणो यावन्नाभ्युदितो हृदि । तावत्सा कुम्भकावस्था योगिभिर्यानुभूयते ॥ बहिरस्तं गते प्राणे यावन्नापान उद्भवः । तावत्पूर्णां समावस्था बहिःस्थं कुम्भकं विदुरिति ॥ तत्रोच्छ्वास आन्तरकुम्भकविरोधी निःश्वासो बाह्यकुम्भकविरोधी गात्रचालनमुभयविरोधि । तस्मिन्सति निःश्वासोच्छ्वासयोरन्यतरस्यावश्यंभावित्वात् । पतञ्जलि-

---

कारां ह्या रेचकविषयक श्रुतीचा अर्थ " शरीरांतील वायु बाहेर काढण्याकरितां श्वास सोडून शारीरिक आकाश वायुरहित करावें आणि असें केल्यावर बाहेरला यत्किंचित्‌ही वायु आंत प्रविष्ट न होऊं देतां कांहीं विवक्षित वेळपर्यंत असावें, ह्याला रेचक असें ह्मणतात " असा आहे. कुंभक दोन प्रकारचा; आंतर कुंभक आणि बाह्य कुंभक. हे दोन्ही प्रकार वसिष्ठमहर्षींनीं सांगितले आहेत. ते ह्मणतात " अपानवायूचे ठिकाणीं अस्तंगत झालेला प्राणवायु जोंपर्यंत हृदयामध्यें उदय पावत नाहीं तोंपर्यंत ती कुंभकावस्था समजावी; ह्याच कुंभकावस्थेचा योग्यांना अनुभव येत असतो. प्राणवायु बाह्य प्रदेशामध्यें लीन होऊन गेला असतां जोंपर्यंत अपानवायूचा उद्भव होत नाहीं तोंपर्यंत पूर्ण समावस्था होय. ह्याच अवस्थेला बाह्य कुंभक असें ह्मणत असतात. " उच्छ्वास आणि निःश्वास ह्यांपैकीं उच्छ्वास ह्मणजे श्वास सोडणें आंतर कुंभकाला विरुद्ध आहे आणि निःश्वास ह्मणजे श्वास घेणें बाह्य कुंभकाला विरुद्ध आहे. अवयव हालविणें दोन्ही कुंभकांना विरुद्ध आहे. कारण, गात्रचालन झालें असतां निःश्वास आणि उच्छ्वास ह्यांपैकीं कोणती तरी एक क्रिया अवश्य घडणारच.

रण्यासनानन्तरभाविनं प्राणायामं सूत्रयामास । तस्मिन्सति निःश्वासोच्छ्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः । ननु कुम्भके गत्यभावेपि रेचकपूरकयोरुच्छ्वासनिःश्वासगती विद्येत इति चेन्न । अधिकमात्राभ्यासेन स्वभावसिद्धायाः सम-प्राणगतेर्विच्छेदात् । तमेवाभ्यासं सूत्रयति बाह्याभ्यन्त-रस्तम्भवृत्तिर्देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घः सूक्ष्म इति । रेचको बाह्यवृत्तिः । पूरक आन्तरवृत्तिः । कुम्भकस्त-म्भवृत्तिः तत्रैकैको देशादिभिः परीक्षणीयः । तद्यथा स्वभावसिद्धे रेचके हृदयान्निर्गत्य नासाग्रसंमुखे द्वादशा-

---

पतंजलिमहर्षींनींही ( गात्रस्थैर्यकारक ) आसनानंतर प्रणायाम साध्य होतो, असें सांगितलें आहे. ते ह्मणतात " आसन सिद्ध झाल्यानंतर निःश्वास आणि उच्छ्वास ह्यांच्या गतींचा विच्छेद असा जो प्राणायाम तो साध्य होतो ". आतां " कुंभकप्राणायामांत निःश्वास आणि उच्छ्वास ह्यांच्या गतींचा जरी अभाव असतो तरी रेचक आणि पूरक ह्या दोन्ही प्रकारच्या प्राणायामांत उच्छ्वासगति आणि निःश्वासगति अनुक्रमें विद्यमान असतात. तेव्हां पतंजलिमहर्षींनीं सांगितलेलें प्रणायाम-लक्षण जुळत नाहीं. " अशी, शंका कोणी करील तर ती योग्य होणार नाहीं. कारण, अधिक वेळपर्यंत प्राणायामाचा अभ्यास केला असतां नैसर्गिक जी सामान्य प्राणवायूची गति तिचा विच्छेद होत असतो. तो अभ्यासच पंतजलिमहर्षींनीं **बाह्याभ्यन्तरस्त-म्भवृत्तिर्देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घः सूक्ष्मः** ह्या सूत्रानें सांगि-तला आहे. रेचक हा बाह्यवृत्ति होय, पूरक आंतरवृत्ति होय आणि कुंभक स्तंभवृत्ति होय. ह्या तिहींपैकीं प्रत्येकाचें देश, काल इत्यादिकांनीं परी-क्षण करणें अवश्य आहे. तें येणेंप्रमाणें—स्वभावसिद्ध रेचकामध्यें श्वास हृदयांतून निघून नासाग्रसंमुख बारा अंगुलें प्रदेशापर्यंत जाऊन

ङ्गुलपर्यन्ते श्वासः समाप्यते । अभ्यासेन तु क्रमेण नाभेराधाराद्वा वायुर्निर्गच्छति । चतुर्विंशत्यङ्गुलपर्यन्ते षट्त्रिंशदङ्गुलपर्यन्ते वा समाप्तिः । अत्र रेचके प्रयत्नातिशये सति नाभ्यादिप्रदेशक्षोभेणान्तर्निश्चेतुं शक्यम् । बहिस्तु सूक्ष्मं तूलं धृत्वा तच्चालनेन निश्चेतव्यम् । सेयं देशपरीक्षा । रेचककाले प्रणवस्यावृत्तयो दशविंशतित्रिंशदित्यादिभिः कालं परीक्ष्य। अस्मिन्मासे प्रतिदिनं दश रेचका आगामिमासे विंशतिरुत्तरमासे त्रिंशदित्यादिकालपरीक्षाभिः संख्यापरीक्षा । यथोक्तदेशकालविशिष्टाः प्राणायामाः एकस्मिन्दिने दशविंशतित्रिंशदित्यादिभिः संख्यापरीक्षा । पूरकेप्येवं योज-

---

पुढें समाप्त होतो; परंतु, अभ्यासानें क्रमाक्रमानें नाभीपासून अथवा आधारचक्रापासून वायु बाहेर निघतो आणि चोवीस अंगुलांपर्यंत अथवा छत्तीस अंगुलें प्रदेशाचे शेंवटीं तो समाप्त होतो. रेचकाविषयीं अभ्यासाचा प्रयत्न अतिशय झाला असतां नाभिप्रभृति प्रदेशामध्यें क्षोभ उत्पन्न होत असल्यामुळें वायु आंत कोठपासून निघालेला आहे ह्याचा निश्चय करितां येतो आणि त्याचा पल्ला बाहेर कोठपर्यंत गेलेला असतो हें नासिकेच्या बाहेर सूक्ष्म कापूस धरिला असतां त्याच्या हालण्यानें निश्चित ठरवितां येतें. ह्याला देशपरीक्षा असें ह्मणतात. रेचककालीं दहा, वीस, तीस इत्यादि प्रणवांच्या आवृत्तींनीं कालाचें परीक्षण करितां येतें आणि ह्या महिन्यांत प्रत्यहीं दहा रेचक, येणाऱ्या महिन्यांत प्रत्यहीं वीस, त्याच्या पुढल्या महिन्यांत प्रत्यहीं तीस इत्यादि कालपरीक्षणाच्या योगानें संख्यापरीक्षा करण्यांत येते. सारांश, वर सांगितल्याप्रमाणें देश आणि काल ह्यांनीं युक्त असे प्राणायाम एका दिवसांत दहा, वीस, तीस वगैरे संख्या होईपर्यंत नियमित करणें ही संख्यापरीक्षा होय. पूरकाविषयींही असाच प्रकार समजावा. कुंभक-

नीयम् । यद्यपि कुम्भके देशव्याप्तिविशेषो नावगम्यते तथापि कालसंख्याव्याप्तिरवगम्यत एव । यथा घनीभूतस्तूलपिण्डः प्रसार्यमाणो दीर्घो विरलतया सूक्ष्मश्च भवति तथा प्राणोपि देशकालसंख्याधिक्येनाभ्यस्यमानो दीर्घो दुर्लक्ष्यतया सूक्ष्मश्च संपद्यते । रेचकादिभ्यस्त्रिभ्योन्यं प्रकारं सूत्रयति बाह्याभ्यन्तरविषयानपेक्षी चतुर्थ इति । यथाशक्ति सर्वं वायुं विरेच्यानन्तरं क्रियमाणो बहिः कुम्भको यथाशक्ति वायुमापूर्यानन्तरं क्रियमाणोन्तःकुम्भक इति रेचकपूरकावनादृत्य केवलः कुम्भकोभ्यस्यमानः पूर्वत्रापेक्षया चतुर्थो भवति । निद्रातन्द्र्यादिप्रबलदोषप्रयुक्तानां रेचकादित्रयम् ।

---

प्राणायामामध्यें किती प्रदेश व्याप्त झाला आहे, हें जरी समजत नाहीं तरी काल आणि संख्या ह्यांच्या व्याप्तीचें ज्ञान होतेंच. ज्याप्रमाणें घट्ट आवळलेला कापसाचा गोळा ओढिला असतां लांब होऊन विरळ होतां होतां सूक्ष्म होतो त्याचप्रमाणें देश, काल व संख्या ह्यांचें प्रमाण उत्तरोत्तर जास्त होईल अशा रीतीनें प्राणायामाचा अभ्यास होऊं लागला असतां प्राणवायूही दीर्घ होऊन समजण्यांत येण्याला कठीण होत असल्यामुळें सूक्ष्म होत असतो. रेचक, पूरक व कुंभक ह्या तीन प्रकारांशिवाय चवथाही एक प्रकार **बाह्याभ्यन्तरविषयानपेक्षी चतुर्थः** ह्या सूत्रांत पतंजलींनीं दर्शविला आहे. शक्तीचें अतिक्रमण न करितां आंतील सर्व वायु उच्छ्वासानें बाहेर काढिल्यानंतर जो केला जातो तो बाह्य कुंभक आणि बाहेरील वायु शक्तीचें अतिक्रमण न करितां आंत ओढून घेतल्यानंतर जो केला जातो तो आंतर कुंभक. ह्या दोन नांवांनीं अनुक्रमें प्रसिद्ध असलेले जे रेचक आणि पूरक ह्यांची जरूर न बाळगितांच केवळ जो कुंभक केला जातो तो पूर्वी सांगितलेल्या तिहींहून वेगळा असा चवथा प्रकार

**दोषरहितानां चतुर्थ इति विवेकः। प्राणायामफलं सूत्रयति ततः क्षीयते प्रकाशावरणमिति । प्रकाशस्य सत्त्वस्यावरणं तमो निद्रालस्यादिहेतुस्तस्य क्षयो भवति । फलान्तरं सूत्रयति धारणासु योग्यता मनस इति आधारनाभिचक्रहृदयभ्रूमध्यब्रह्मरन्ध्रादिदेशविशेषे विकृष्य चित्तस्य स्थापनं धारणा देशबन्धश्चित्तस्य धारणेति सूत्रणात् । श्रुतिश्च मनः संकल्पकं ध्यात्वा संक्षिप्यात्मनि बुद्धिमान् । धारयित्वा तथात्मानं धारणा परिकीर्तितेति ॥ प्राणायामेन रजोगुणकारिताच्चाञ्चल्यात्तमोगुणकारितादालस्यादेश्च निवारितं मनस्तस्यां**

---

होय. निद्रा, तंद्रा इत्यादि प्रबल दोष ज्यांचे ठिकाणीं असतात त्यांच्याकरितां रेचक, पूरक आणि कुंभक हे प्राणायाम सांगितले असून हे दोष ज्यांचे ठिकाणीं नसतात त्यांच्याकरितां चवथा सांगितला आहे, असें समजावें. **ततः क्षीयते प्रकाशावरणम्** ह्या सूत्रानें पतंजलींनीं प्राणायामाचें फल सांगितलें आहे आणि “ निद्रा, आलस्य इत्यादि दोषांना हेतुभूत असणारें जें तमोगुणरूप प्रकाशाचें ह्मणजे सत्त्वगुणाचें आवरण त्याचा प्राणायामानें क्षय होतो. ” असा त्या सूत्राचा अर्थ आहे. शिवाय, **धारणासु योग्यता मनसः** ह्या सूत्रानें पतंजलींनीं प्राणायामाचें दुसरेंही फल सांगितलें आहे. आधार, नाभिचक्र, हृदय, भ्रूमध्य, ब्रह्मरंध्र इत्यादि विशेष प्रदेशांमध्यें चित्त आकर्षण करून त्याची स्थापना करणें ह्याला धारणा असें ह्मणतात. कारण, **देशबन्धश्चित्तस्य धारणा** असें योगसूत्र आहे ( आणि त्या सूत्राचा अर्थ “ विशेष प्रदेशामध्यें चित्त बद्ध करून ठेवणें ह्याचें नांव धारणा. ” असा आहे ). शिवाय **मनः संकल्पकं० धारणापरिकीर्तिता** अशी श्रुतिही आहे. तेव्हां “ रजोगुणामुळें उत्पन्न झालेल्या चांचल्यापासून आणि तमोगुणामुळें उत्पन्न झालेल्या आलस्य, निद्रा इत्यादिकांपासून प्राणायामाच्या योगानें मन

धारणायां योग्यं भवति ॥ प्राणायामदृढाभ्यासैर्युक्त्या च गुरुदत्तयेत्यत्रत्येन युक्तिशब्देन योगिजनप्रसिद्धं शिरोरूपमेरुचालनं जिह्वाग्रेण घण्टिकाभ्रामणं नाभिचक्रे ज्योतिर्ध्यानं विस्मृतिप्रदौषधसेवा चेत्येवमादिकं गृह्यते । तदेवमध्यात्मविद्यासाधुसंगमवासनाक्षयप्राणनिरोधाश्चित्तनाशोपाया दर्शिताः । अथ तदुपेयभूतं समाधिं वक्ष्यामः । ... रजोगुणेन चाल्यमानं चित्तं क्रमेण सर्वान्पदार्थान्गृह्णाति तस्य रजोगुणस्य निरोधाय क्रियमाणेन योगिनः प्रयत्नविशेषेण दिने दिने सर्वार्थता क्षीयत एकाग्रता चोदेति तादृशश्चित्तस्य परिणामः समाधिरित्युच्यते । तस्य समाधेरष्टाङ्गेषु यम-

---

अलग राहिलें असतां तें त्या धारणेला योग्य होतें. " हा **धारणासु योग्यता मनसः** ह्या सूत्राचा अर्थ होय.

**प्राणायामदृढाभ्यासैर्युक्त्या च गुरुदत्तया** असें जें वसिष्ठमुनींचें वचन पूर्वीं दिलें आहे त्यांतील युक्तिशब्दामध्यें योगिजनांना माहीत असलेलें शिरोरूप मेरुचालन, जिव्हाग्राच्या योगानें घंटिकाक्रमण, नाभिचक्राचे ठिकाणीं ज्योतिर्ध्यान, विस्मृतिप्रद औषधांचें सेवन इत्यादिकांचा अंतर्भाव होतो. असो. ह्याप्रमाणें अध्यात्मविद्या, साधुसमागम, वासनाक्षय आणि प्राणनिरोध हे चित्तनाशाचे उपाय दर्शविले. आतां ह्या उपायांच्या योगानें साध्य होणारी समाधि सांगतों.......रजोगुणाच्या योगानें चलित होत असलेलें चित्त क्रमानें सर्व पदार्थ ग्रहण करीत असतें. त्या रजोगुणाच्या निरोधाकरितां योग्याचा कांहीं विशेष प्रयत्न प्रत्यहीं होऊं लागला असतां चित्त सर्व पदार्थांकडे जाण्याचें हळूं हळूं बंद होऊन एकाग्र होऊं लागतें आणि अशा प्रकारचा जो चित्तामध्यें फेर होणें ह्याला समाधि असें ह्मणतात. ह्या समाधीचीं आठ अंगें आहेत. ह्या आठ अंगांपैकीं यम, नियम,

---

१ क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र आणि निरुद्ध अशा पांच प्रकारच्या चित्तभूमि

नियमासनप्राणायामप्रत्याहाराः पञ्च बहिरङ्गानि । तत्र यमान्सूत्रयति अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमा इति। हिंसादिभ्यो निषिद्धधर्मेभ्यो योगिनं यमयन्तीति यमाः। नियमान्सूत्रयति शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमा इति । जन्महेतोः काम्यधर्मान्निवर्त्य मोक्षहेतौ निष्कामधर्मे नियमयन्ति प्रेरयन्तीति नियमाः । यमनियमयोरनुष्ठानवैलक्षण्यं स्मर्यते यमान्सेवेत सततं न

---

आसन, प्राणायाम आणि प्रत्याहार हीं पांच बाह्यांगें ( असून धारणा, ध्यान व समाधि हीं तीन अंतरंगें ) आहेत. ह्या पांच बहिरंगांपैकीं " अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे यम होत. " ह्मणून पतंजलींनीं यमांचा निर्देश केला आहे. हिंसादि निषिद्ध धर्मापासून योग्याला जे आवरून धरितात ते यम, ही यमशब्दाची व्युत्पत्ति होय. शौच, संतोष, तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान, हे नियम ह्मणून पतंजलींनीं सांगितले आहेत. जन्माला कारणीभूत होणारा जो काम्यधर्म त्यापासून योग्याला निवृत्त करून मोक्षाला कारणीभूत होणाऱ्या निष्काम धर्मामध्यें त्याचें जे नियमन करितात ह्मणजे निष्कामधर्माचें अवलंबन करण्यास त्याला जे प्रेरणा करितात ते नियम, ही नियमशब्दाची व्युत्पत्ति होय. यम आणि नियम सेवन करण्याचे प्रकार भिन्न

---

मागील पृष्ठावरून

आहेत. पैकीं पहिल्या तीन समाधीला योग्य नसून शेंवटल्या दोन मात्र योग्य आहेत व समाधींतही संप्रज्ञात आणि असंप्रज्ञात असे दोन मुख्य भेद आहेत. हें सर्व प्रकरण समजून घेण्याची इच्छा असणाऱ्यानें योगशास्त्राचाच एकादा ग्रंथ पहावा हें बरें. येथें विस्तृत रीतीनें ह्याविषयीं वांटाघाट केली असतां मूळ विषयापेक्षां विषयांतरच फार होण्याचा संभव असल्यामुळें ती येथें केली नाहीं.

नित्यं नियमान्बुधः । यमान्पतत्यकुर्वाणो नियमान्केवला-न्भजन् ॥ पतति नियमवान्यमेष्वसक्तो न तु यमवान्नि-यमालसोवसीदेत् । इति यमनियमौ समीक्ष्य बुद्ध्या यमबहुलेष्वनु संदधीत बुद्धिमिति । ... आसनप्राणायामौ व्याख्यातौ । प्रत्याहारं सूत्रयति स्वविषयासंप्रयोगे चित्त-स्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहार इति । शब्दस्पर्शरूप-रसगन्धादिविषयास्तेभ्यो निवर्तिताः श्रोत्रादयश्चित्तस्वरूप-मनुकुर्वन्तीव व्यतिष्ठन्ते । श्रुतिश्च भवति शब्दादिविषयान्पञ्च मनश्चैवाति चञ्चलम् । चिन्तयेदात्मनो रश्मीन्प्रत्याहारः स

---

भिन्न आहेत ह्मणून स्मृतींत सांगितलें आहे. विचारी पुरुषानें यमांचें सेवन नेहमीं करावें; परंतु, नियमांचें नेहमीं केलेंच पाहिजे असें नाहीं. कारण, केवल नियमांचेंच सेवन करून यमांचें जर अवलंबन केलें नाहीं तर पुरुष पतित होतो. नियमांचें अवलंबन करून यमांचे ठिकाणीं तत्पर नसलेला पुरुष पतित होतो; परंतु, यमांचें अवलंबन करून नियमांवि-षयीं एकसारखी तत्परता न ठेवणारा पुरुष पतित होत नाहीं. ह्याक-रितां यम आणि नियम, यांचा नीट विचार करून यमाकडेच पुरुषानें आपलें चित्त विशेष लावावें *...

असो. आसन आणि प्राणायाम ह्यांची व्याख्या पूर्वी केलीच आहे. **स्वविषयासंप्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः** अशी पतंजलींनीं प्रत्याहाराची व्याख्या केलेली आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इत्यादि जे विषय त्यांच्यापासून निवृत्त झालेलीं श्रोत्रादि इंद्रियें जशीं कांहीं चित्तस्वरूपाचेंच अनुकरण करणारीं बनून रहातात. **शब्दादिविषयान्पञ्च० स उच्यते** अशी श्रुतिही आहे. शब्दादि

---

* वैरत्याग वगैरे यमांचीं फलें आणि सत्त्वशुद्धि वगैरे नियमांचीं फलें योगशास्त्रांत सांगितलीं आहेत.

उच्यत इति । शब्दादयो विषया येषां श्रोत्रादीनां ते श्रोत्रादयः पञ्च मनः षष्ठानामेतेषामनात्मरूपेभ्यः शब्दादिभ्यो निवर्तनमात्मरश्मित्वेन चिन्तनं प्रत्याहारः स इत्यर्थः। प्रत्याहारफलं सूत्रयति ततः परमावश्यतेन्द्रियाणामिति । धारणाध्यानसमाधीन्सूत्रैस्त्रिभिः सूत्रयति देशबन्धश्चित्तस्य धारणा । तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् । तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिरिति । आधारादिदेशाः पूर्वमुक्ताः। देशान्तरं श्रूयते मनः संकल्पकं ध्यात्वा संक्षिप्यात्मनि बुद्धिमान् । धारयित्वा तथात्मानं धारणा परिकीर्तितेति यत्सर्ववस्तुसंकल्पकं मनस्तदात्मानमेव संकल्पयतु न त्वन्यदित्येवंविधः प्रयत्न इत्यात्मनि संक्षेपः ॥ प्रत्ययस्यैकतानता

---

ज्यांचे विषय आहेत अशीं श्रोत्रादि पांच इंद्रियें आणि अत्यंत चंचल असें सहावें मन ह्या सहांना अनात्मरूप जे शब्दादि विषय त्यांपासून निवृत्त करून हे सहा आत्मरश्मि आहेत असें जें चिंतन करणें ह्याला प्रत्याहार असें ह्मणतात. हा प्रत्याहार सिद्ध झाला असतां इंद्रियें अगदीं स्वाधीन होतात, असें प्रत्याहाराचें फल पतंजलींनीं सांगितलें आहे. धारणा, ध्यान आणि समाधि हीं तीन योगांगें **देशबन्धश्चित्तस्य धारणा । तत्र प्रत्ययेकतानता ध्यानम् । तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः** । ह्या तीन सूत्रांनीं पतंजलींनीं सांगितलीं आहेत. चित्तस्थापनेचे आधारादि प्रदेश पूर्वीं सांगितलेच आहेत. ह्या आधारादि प्रदेशांशिवाय आणखीही एक प्रदेश श्रुतीमध्यें सांगितला आहे. **मनः संकल्पकं० धारणा परिकीर्तिता** अशी श्रुति आहे. सर्व वस्तूची इच्छा करणारें जें मन त्याचा, आत्म्याचीच इच्छा व्हावी व दुसऱ्या कोणत्याही वस्तूची इच्छा होऊं नये, अशा प्रकारचा जो प्रयत्न तो आत्म्यांचे ठिकाणीं मनाचा संक्षेप होय. प्रत्य-

**तत्त्वैकविषयः प्रवाहः । स च द्विविधः । विच्छिद्य विच्छिद्य जायमानः संततश्चेति । तावुभौ क्रमेण ध्यानसमाधी भवतः ॥**

याची एकतानता ह्मणजे केवल तत्त्वाविषयक प्रवाह. हा प्रवाह दोन प्रकारचा असतो. मधून मधून बंद होऊन फिरून फिरून उत्पन्न होणारा आणि एकसारखा कायम रहाणारा. पैकीं आत्म्याकडे मधून मधून बंद होऊन फिरून फिरून जें चित्ताचें लय लागणें तें ध्यान होय आणि विच्छेद न होतां एकसारखें आत्म्याचे ठिकाणीं चित्ताचें लय लागून रहाणें ही समाधि होय.

यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोस्त्ययज्ञस्य कुतोन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

---

एवं यथोक्तान्यज्ञान्निर्वर्त्य यज्ञशिष्टा० कुरुसत्तम ॥३१॥ यज्ञशिष्टामृतभुजो यज्ञानां शिष्टं यज्ञशिष्टं यज्ञशिष्टं च तदमृतं च यज्ञशिष्टामृतं तद्भुञ्जत इति यज्ञशिष्टामृतभुजो यथोक्तान्यज्ञान्कृत्वा तच्छिष्टेन कालेन यथाविधि चोदितमन्नममृताख्यं भुञ्जत इति यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति गच्छन्ति ब्रह्म सनातनं चिरंतनम् । मुमुक्षवश्चेत्कालातिक्रमापेक्षयेति सामर्थ्याद्गम्यते । नायं लोकः सर्वप्राणिसाधार-

---

यज्ञशेषरूप अमृत भक्षण करणाऱ्या पुरुषांना सनातन ब्रह्माची प्राप्ति होते; परंतु, यज्ञरहित पुरुषाला इहलोकही प्राप्त होत नाहीं; मग, हे कुरुवंशजश्रेष्ठा अर्जुना, दुसरा लोक प्राप्त होण्याची तर गोष्ट कशाला पाहिजे ? ॥ ३१ ॥

ह्याप्रमाणें सांगितलेले यज्ञ केल्यानंतर यज्ञशेषरूप अमृत सेवन कर णाऱ्या लोकांना सनातन ब्रह्माची प्राप्ति होते. हे कुरुवंशजश्रेष्ठा, स प्राण्यांना साध्य असलेला इहलोकही यज्ञरहित पुरुषाला प्राप्त ह नाहीं; मग विशेष प्रकारच्या साधनांनीं साध्य होणारा जो परल त्याची गोष्ट कशाला पाहिजे ? **यज्ञशिष्टामृतभुजः** । यज्ञांचें जें ह्मणजे यज्ञ करून राहिलेलें जें अवशिष्ट तें यज्ञशिष्ट होय. यज्ञशि रूप जें अमृत तें यज्ञशिष्टामृत होय. तें यज्ञशिष्टामृत जे भक्षण का तात ते यज्ञशिष्टामृतभुज होत. सारांश, पूर्वी सांगितल्याप्रमाणें करून अवशिष्ट राहिलेला जो काल त्या कालामध्यें भक्ष्य ह्मणू असलेलें अमृतसंज्ञक अन्न जे यथाविधि सेवन करितात ते यज्ञशिष्टामृतभुज लोक सनातन ह्मणजे चिरकाल कायम असणाऱ्या ब्रह्माप्रत जातात. ह्या ठिकाणीं **यान्ति** हें गतिबोधक क्रियापद असल्यामुळें यज्ञ-

**णोप्यस्ति यथोक्तानां यज्ञानामेकोपि यज्ञो यस्य नास्ति सोयज्ञस्तस्य कुतोन्यो विशिष्टसाधनसाध्यः कुरुसत्तम॥ ३१ ॥**

---

शिष्टामृत भक्षण करणारे पुरुष मोक्षाची इच्छा करणारे असल्यास कालेंकरून त्यांना सनातन ब्रह्माची प्राप्ति होते ( ह्मणजे त्यांना क्रम-मुक्ति प्राप्त होते ), असा ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचा अर्थ होतो. पूर्वीं सांगितलेल्या यज्ञांपैकीं एकाही यज्ञाचें अनुष्ठान ज्याच्या हातून होत नसेल तो **अयज्ञ** होय ॥ ३१ ॥

( पूर्वीं सांगितल्याप्रमाणें यज्ञानुष्ठान करणाऱ्यांना तें अनुष्ठान होऊन अवशिष्ट राहिलेल्या कालामध्यें केवल विहितान्न भक्षण झाल्यानेंच ब्रह्म-लोकाची प्राप्ति कशी होते ही शंका राहूं नये एतदर्थ " त्या यज्ञानु-ष्ठान करून विहित अन्न सेवन करणाऱ्या पुरुषांना मोक्षाची इच्छा असल्यास चित्तशुद्धीच्या द्वारानें त्यांना मोक्षप्राप्ति होते." हें दर्शवि-ण्याच्या उद्देशानें भाष्यामध्यें **मुमुक्षवश्चेत्** असें ह्मटलें आहे. परंतु, येव-ढ्यानें शंकेचें समाधान होत नाहीं. कारण, यज्ञशिष्टामृत सेवन करणाऱ्यांना प्रत्यक्ष मोक्ष होतो, असें ह्या वचनामध्यें विवक्षित आहे कीं काय ? जर विवक्षित असेल तर ह्या वचनाचा गतिश्रुतीशीं विरोध येतो. ही पुनरपि रहाणारच. तेव्हां ती राहूं नये ह्मणून " ज्याअर्थीं **यान्ति** गतिबोधक क्रियापदाचा प्रयोग ह्या ठिकाणीं केलेला आहे त्याअर्थीं यज्ञशिष्टामृत सेवन करणाऱ्या पुरुषांना अंतःकरणशुद्धि, ज्ञानप्राप्ति ह्या क्रमानेंच मुक्ति प्राप्त होते. " असें दर्शविण्याकरितां **कालातिक्रमापेक्षया [illegible]द्रूच्यते** । असें भाष्यामध्यें लिहिलें आहे ३१. )

नीलकंठपंडितांनीं " **सर्वेषामप्येतेषां मध्येन्यतममप्यनुष्ठातुमशक्तं प्रति प्राह यज्ञेति** " असें अवतरण ह्या श्लोकाला दिलें आहे आणि ह्या श्लोकांतील पूर्वार्धाचें व्याख्यान त्यांनीं " **यज्ञाः पञ्चमहा-**

**यज्ञास्तेभ्यः शिष्टमवशिष्टमन्नममृताख्यं ये भुञ्जते तेपि चित्तशुद्धि-द्वारा सनातनं ब्रह्म यान्ति प्राप्नुवन्ति** " असें केलें आहे. ह्यांच्या अवतरणाचें व पूर्वार्धाच्या व्याख्यानाचें तात्पर्य येणेंप्रमाणें--" ह्या सर्वही यज्ञांपैकीं एकाही यज्ञाचें अनुष्ठान करण्यास जो समर्थ नसेल त्याला उद्देशून **यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्** असें सांगितलें आहे. यज्ञ ह्मणजे पंचमहायज्ञ. ते करून अवशिष्ट राहिलेलें अमृतसंज्ञक अन्न जे सेवन करितात त्यांनाही चित्तशुद्धीच्या द्वारानें सनातन ब्रह्माची प्राप्ति होते. " हें नीलकंठपंडितांचें भाष्यविरुद्ध व्याख्यान बरोबर नाहीं. कारण, ह्यांनीं श्लोकाला दिलेल्या अवतरणांत जो उद्देश दर्शविला आहे त्याला श्लोकांतील पदांचा अर्थ लक्ष्यांत घेतला असतां कांहीं एक प्रमाण असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां प्रकरणावरून निघत असलेला जो अर्थ तो टाकून देऊन भलत्याच अर्थाची कल्पना करणें न्याय्य नव्हे. शिवाय पंचमहायज्ञ करून अवशिष्ट राहिलेलें अन्न असा जो **यज्ञशिष्ट** ह्या पदाचा अर्थ नीलकंठपंडितांनीं केला तो जुळतही नाहीं. कारण, पंचमहायज्ञ करून अवशिष्ट राहिलेलें अन्न असा अर्थ, पंचमहायज्ञांपैकीं प्रत्येक यज्ञाला अन्नाची अवश्यकता असते असें सिद्ध झाल्यावांचून **यज्ञशिष्ट** ह्या पदाचा, होणें संभवनीयच नाहीं आणि देवयज्ञ व ब्रह्मयज्ञ हे जे पंचमहायज्ञांपैकीं दोन यज्ञ त्यांना अन्नाची अवश्यकता असल्याचें सिद्ध होत नाहीं. ब्रह्मयज्ञाची अवश्यक सामग्री वेदाध्ययन आणि देवयज्ञाची अवश्यक सामग्री समिधा वगैरे. सारांश, सर्व पंचमहायज्ञांना अन्नाची अवश्यकता असल्याचें जर सिद्धच होत नाहीं तर पंचमहायज्ञ करून अवशिष्ट राहिलेलें जें अन्न तें यज्ञशिष्टामृत ह्या ह्मणण्यांत कांहीं अर्थच नाहीं. बरें, घटकाभर हाही विचार जरी बाजूला ठेविला तरी दैवादि श्रौतस्मार्त यज्ञामध्यें पंचमहायज्ञांचाही अंतरभाव होतच आहे. तेव्हां कोणत्याही रीतीनें पाहूं गेलें असतां नीलकंठपंडितांचें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान ग्राह्य मानितां येत

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

एवं० विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥ एवं यथोक्ता बहुविधा बहुप्रकारा यज्ञा वितता विस्तीर्णा ब्रह्मणो वेदस्य मुखे द्वारे वेदद्वारेणावगम्यमाना ब्रह्मणो मुखे वितता उच्यन्ते तद्यथा वाचि हि प्राणं जुहुम इत्यादयः । कर्मजान्कायिकवाचिकमानसकर्मोद्भवान्विद्धि तान्सर्वाननात्मजान् । निर्व्यापारो

नसून भाष्यकारांनीं जें ह्या श्लोकाचें व्याख्यान केलें आहे तेंच बरोबर आहे. )

( ह्या श्लोकामध्यें **कुरुसत्तम** असें संबोधन आहे. तें " कुरुवंशांतील सर्वही पुरुष यज्ञवेत्ते होते आणि तूं तर त्यांच्यामध्यें सत्तम ह्मणजे श्रेष्ठ आहेस. तेव्हां तुला तर यज्ञवित्त्व अवश्य संपादन केलें पाहिजे. " असें अर्जुनाला सुचविण्याकरितां भगवानांनीं घातलें आहे ३१. )

ह्याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ श्रुतीच्या द्वारानें अवगत झालेले आहेत आणि ते सर्वही कर्मजन्य आहेत असें तूं समज. असें ज्ञान झाल्यानें तूं मुक्त होशील ॥ ३२ ॥

ह्याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ ब्रह्माच्या मुखामध्यें ह्मणजे वेदाच्या द्वारामध्यें विस्तीर्ण आहेत; अर्थात् श्रुतीमध्यें दृष्ट आहेत. मुख ह्मणजे द्वार आणि ब्रह्म ह्मणजे वेद. वेदाच्या द्वारानें अवगत होणारें हा **वितता ब्रह्मणो मुखे** ह्या पदांचा अर्थ होय. **वाचि हि प्राणं जुहुमः** ( आह्मी वाणीचे ठिकाणीं प्राणाचें हवन करूं ) इत्यादि प्रकारचे यज्ञ श्रुतीमध्यें दृष्ट आहेत. हे सर्व कर्मज आहेत असें तूं समज. कर्मज ह्मणजे कायिक, वाचिक आणि मानसिक ह्या कर्मांपासून उद्भवलेले अर्थात् अनात्मजन्य.

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

---

ह्यात्मा । अत एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसेऽशुभात् । न मद्व्यापारा इमे निर्व्यापारोहमुदासीन इत्येवं ज्ञात्वास्मात्सम्यग्दर्शनान्मोक्ष्यसे संसारबंधनादित्यर्थः ॥३२॥

ब्रह्मार्पणमित्यादिश्लोकेन सम्यग्दर्शनस्य यज्ञत्वं संपादितं यज्ञाश्चानेका उपदिष्टास्तैः सिद्धपुरुषार्थप्रयोजनैर्ज्ञानं स्तूयते । कथं श्रेयान्द्रव्य० परिसमाप्यते ॥ ३३ ॥ श्रेयान्द्रव्यमयाद्द्रव्यसाधनसाध्याद्यज्ञाज्ज्ञानयज्ञो हे परंतप । द्रव्यमयो हि यज्ञः फलस्यारम्भको ज्ञानयज्ञो न फलारम्भकोतः श्रेयान्प्रशस्यतरः । कथं यतः सर्वं कर्म समस्तमखिलमप्रति-

---

कारण आत्मा हा व्यापाररहित आहे. तस्मात्, असें जाणिल्यावर तूं अशुभापासून मुक्त होशील. तात्पर्य, " हे सर्वही यज्ञ माझ्या व्यापारामुळें झालेले नाहींत. कारण, मी व्यापाररहित असा उदासीन आहें." ह्याप्रमाणें ज्ञान झालें असतां ह्या उत्कृष्ट ज्ञानामुळें तूं संसारबंधनापासून मुक्त होशील ३२.

हे शत्रुतापना, द्रव्यसाध्य यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. कारण, हे पार्था, ज्ञानामध्यें सर्व निःशेष कर्माचा अंतर्भाव होतो ॥ ३३ ॥

**ब्रह्मार्पणं** ब्रह्महविः ह्या श्लोकानें उत्कृष्ट ज्ञानाला यज्ञत्व सांगून पुढें अनेक यज्ञ कथन केले. आतां ज्या यज्ञांची अपेक्षा पुरुषाला असल्याचें सिद्ध आहे असे जे **ब्रह्मार्पणं** ह्या श्लोकानंतर निर्दिष्ट केलेले यज्ञ त्या यज्ञांनीं ज्ञानाची प्रशंसा **श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञात्** ह्या श्लोकांत भगवानांनीं केली आहे. ती कशी केली आहे तें पहा. भगवान् ह्मणतातः—हे परंतपा, द्रव्यमय ह्मणजे द्रव्यरूप साधनानें साध्य होणाऱ्या यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. कारण, द्रव्ययज्ञ फलाचा उत्पादक असून ज्ञानयज्ञ फलाचा

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

---

बद्धं पार्थ ज्ञाने मोक्षसाधने सर्वतः संप्लुतोदकस्थानीये परिसमाप्यतेन्तर्भवतीत्यर्थः । यथा कृताय विजितायाधरेयाः संयन्त्येवमेनं सर्वं तदभिसमेति यत्किंचित्प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेदेति श्रुतेः ॥ ३३ ॥

---

उत्पादक नाहीं; ह्मणून ज्ञानयज्ञ हा द्रव्ययज्ञापेक्षां श्रेष्ठ होय. श्रेष्ठ कसा ह्मणून ह्मणशील तर, हे पार्था, सर्वही कर्म पूर्णपणें ह्मणजे कसलीही आडकाठी न येतां मोक्षसाधनरूप ज्ञानामध्यें परिसमाप्त होतें ह्मणजे ज्ञानामध्यें सर्व कर्मांचा अंतर्भाव होतो; कारण, ज्ञान हें सर्व बाजूंनीं उदकानें परिपूर्ण असलेल्या जलाशयाच्या स्थानीं आहे ( ह्मणजे वापी, कूप, तडाग इत्यादि परिमित उदकानें युक्त असलेल्या अनेक जलाशयांमध्यें मिळून साध्य होणारीं स्नानपानादि फलें ज्याप्रमाणें सर्वही उदकानें सर्व बाजूंनीं तुडुंब भरलेल्या एका मोठ्या जलाशयाच्याच योगानें साध्य होतात त्याप्रमाणें द्रव्यसाध्य अशा भिन्न भिन्न कर्मांच्या योगानें प्राप्त होणारीं जीं फलें त्या सर्वांचाही अंतर्भाव ज्ञानानें प्राप्त होणाऱ्या मोक्षरूप फलामध्यें होत असतो ). कारण, ज्याप्रमाणें द्यूताचा खेळ चालला असतां चार बिंदूंनीं युक्त असलेला कृतसंज्ञक फांसा जिंकिला ह्मणजे त्या जिंकण्यामध्यें त्रेत, द्वापर व कलि हे अनुक्रमें तीन बिंदूंनीं, दोन बिंदूंनीं व एका बिंदूनें युक्त असलेले फांसे जिंकिल्यासारखें होतें, ह्मणजे चार बिंदूंनीं युक्त असलेल्या कृतसंज्ञक फांशामध्यें तीन, दोन व एक हे बिंदु असल्यामुळें त्रेत, द्वापर व कलि ह्या संज्ञांनीं प्रसिद्ध असलेल्या फांशांचा कृतसंज्ञक फांशामध्यें अंतर्भाव होतो त्याचप्रमाणें जगतांतील सर्व लोक जीं कांहीं वर्णाश्रमधर्मसंबंधीं कर्मे करितात त्या सर्वांचें फल रैक्वाप्रमाणें तें आत्मतत्त्व जाणणाऱ्या पुरुषाला प्राप्त होतें असें छांदोग्योपनिषदंतर्गत संवर्गविद्येमध्यें सांगितलें आहे ३३.

( मधुसूदनसरस्वतींनीं **सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते** ह्या उत्तरार्धाचें व्याख्यान भाष्याला अनुसरून न करितां वेगळ्या रीतीनें केलें आहे. ते ह्मणतातः—**सर्वं कर्म इष्टिपशुसोमचयनरूपं श्रौतमखिलं निरवशेषं स्मार्तमुपासनादिरूपं च यत्कर्म तज्ज्ञाने ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कारे समाप्यते प्रतिबन्धक्षयद्वारेण पर्यवस्यति । तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसानाशकेनेति धर्मेण पापमपनुदतीति च श्रुतेः सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववदिति न्यायाच्चेत्यर्थः ।**

ह्याचें तात्पर्य येणेंप्रमाणेंः—इष्टि, पशु, सोम, चयन इत्यादि सर्व जीं कांहीं श्रौत कर्मे आणि उपासना वगैरे जीं कांहीं निःशेष स्मार्त कर्मे त्या सर्वांचेंही पर्यवसान प्रतिबंधनाशाच्या द्वारानें ज्ञानामध्यें ह्मणजे ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कारामध्येंच आहे. कारण, **तमेतं वेदानुवचनेन० तपसानाशकेन** अशी व **धर्मेण पापमपनुदति** अशी श्रुति ह्याला प्रमाण असून **सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत्** हें उत्तरमीमांसेंतील अधिकरणही प्रतिबंधक्षयद्वारानें कर्मांचें पर्यवसान ज्ञानामध्यें ह्मणजे ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कारामध्यें होत असतें ह्याविषयीं प्रमाण आहे.

( मधुसूदनसरस्वतींचें हें भाष्याला अनुसरून नसलेलें व्याख्यान सकृद्दर्शनीं योग्य दिसतें खरें; परंतु, विचार करून पाहिला असतां हें व्याख्यान योग्य ठरेलच असें ह्मणतां येत नाहीं. कारण, त्यांनीं ज्या श्रुति तसें व्याख्यान करण्याला प्रमाण दिल्या आहेत त्या श्रुतींवरून निष्काम कर्मांचेंच पर्यवसान चित्तशुद्धिद्वारानें ज्ञानामध्यें होत असल्याचें सिद्ध आहे आणि उत्तरमीमांसेंतील अधिकरणावरूनही हेंच सिद्ध आहे. तेव्हां ज्याअर्थीं श्रुतीमध्यें निष्काम कर्मांचाच विनियोग ज्ञानोत्पत्तीकडे होत असल्याचें दर्शविलें आहे त्याअर्थीं ह्या श्रुतींच्या आधारानें ह्या श्लोकाच्या उत्तरार्धाचें व्याख्यान करावयाचें ह्मणजे सर्व

निष्काम कर्माचें पर्यवसान ज्ञानामध्यें होतें असें उत्तरार्धाचें तात्पर्य निघणार. परंतु, मधुसूदनसरस्वतींनीं **निरवशेष** ह्मणजे झाडून चटसाऱ्या श्रौत व स्मार्त कर्माचें पर्यवसान ज्ञानामध्यें होतें असें ह्याचें व्याख्यान केलें आहे आणि त्याला ह्या श्रुति आधार दिल्या आहेत. तेव्हां अर्थात्‌च दिलेल्या श्रुति आणि त्यांच्या आधारावर केलेलें व्याख्यान ह्यांचा मेळ बसण्याचा संभवच नसल्यामुळें हें भाष्यविरुद्ध व्याख्यान सर्वस्वीं योग्य ठरणें कठिणच आहे. श्लोकामध्यें **सर्वं** आणि **अखिलं** अशीं दोन पदें आहेत. हीं दोन्हींही पदें अर्थदृष्ट्या संकोचनिवारक ह्मणूनच मधुसूदनसरस्वतींनीं गृहीत धरलेलीं आहेत. तेव्हां **सर्वं कर्म** ह्या पदांचा अर्थ–कर्म ह्मणून जें जें आहे तें सर्व–असा होणार आणि पुढें दिलेल्या आधारभूत श्रुति लक्ष्यांत घेऊन **सर्वं कर्म** ह्या पदांचा अर्थ केला ह्मणजे जें जें ह्मणून कांहीं निष्काम कर्म असेल तें सर्व–असा तो होणार; परंतु, **अखिलं** हें जें आणखी एक पद शिलक राहिलें त्याची वाट काय ? ह्या पदाचा अर्थ **निरवशेषं** ह्मणजे झाडून चटसारें असाच मधुसूदनसरस्वतींनीं केलेला आहे. तात्पर्य, श्रुति व अधिकरण ह्यांच्या आधारावर जर ह्या श्लोकांतील उत्तरार्धाचें व्याख्यान केलें तर **सर्वं** आणि **अखिलं** ह्या पदांपैकीं कोणतें तरी एक पद निरर्थक ठरणार, हा त्या व्याख्यानावर दोष येतो आणि ह्मणूनच हें भाष्यविरुद्ध व्याख्यान सर्वस्वीं योग्य ठरत नसून भाष्यकारांनीं केलेलेंच व्याख्यान योग्य ठरतें. )

( ह्या श्लोकाच्या पूर्वार्धांत **परंतप** असें संबोधन अर्जुनाला उद्देशून भगवानांनीं योजिलें आहे; तें " ज्ञानप्राप्ति झाल्यावर अज्ञानरूप शत्रूला तापविण्यास ह्मणजे मारण्यास तूं समर्थ होशील. केवल कर्माच्या योगानें समर्थ होणार नाहींस. " असें अर्जुनाला सुचविण्याकरितां योजिलेलें आहे. पृथा हे कुंतीचें नांव आहे. तेव्हां पृथेचा पुत्र तो पार्थ, असा **पार्थ** ह्या शब्दाचा अर्थ होतो. तेव्हां " ज्याप्रमाणें युधिष्ठिर आणि

तदेवं विशिष्टं ज्ञानं तर्हि केन प्राप्यत इत्युच्यते । तद्विद्धि० तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥ तद्विद्धि विजानीहि येन विधिना प्राप्यत इत्याचार्यानभिगम्य प्रणिपातेन प्रकर्षेण नीचैः पतनं प्रणिपातो दीर्घनमस्कारस्तेन कथं बन्धः कथं मोक्षः का विद्या का चाविद्येति परिप्रश्नेन सेवया गुरुशुश्रूषयैवमादिना प्रश्रयेणावर्जिता आचार्या उपदेक्ष्यन्ति कथयिष्यन्ति ते ज्ञानं यथोक्तविशेषणं ज्ञानिनो ज्ञानवन्तोपि केचिद्यथावत्तत्त्वदर्शन-

---

भीमसेन ह्यांचाही पार्थ ह्या शब्दामध्यें अतर्भाव होत आहे त्याचप्रमाणें तत्त्वसाक्षात्कार हें जें ज्ञानकांडविषयक फल त्या फलामध्यें कर्मकांड-विषयक फलांचाही अंतर्भाव होतो." हें अर्जुनाला सुचविण्याचा उद्देश मनांत धरून भगवानांनीं **पार्थ हें** संबोधन उत्तरार्धामध्यें योजिलें आहे ३३.)

तें ज्ञान प्रणिपात, प्रश्न आणि गुरुशुश्रूषा ह्यांच्या योगानें प्राप्त होतें असें तूं समज. ह्यांचें अवलंबन केल्यानें तत्त्वदर्शी ज्ञानी तुला ज्ञानाचा उपदेश करितील॥ ३४ ॥

तर मग ह्याप्रमाणें विशिष्ट ज्ञान कोणत्या उपायानें प्राप्त होतें ह्मणून विचारशील तर, हे अर्जुना, सांगतों. कोणत्या उपायानें तें ज्ञान प्राप्त होतें हें तूं आतां समजून घे. आचार्यांकडे जाऊन त्यांना प्रणिपात केल्यानें ह्मणजे त्यांच्या समोर अगदीं सपशेल भूमीवर अधोमुख पड-ल्यानें ह्मणजे अर्थात् त्यांना साष्टांग नमस्कार घातल्यानें, बंध कसा होतो, मोक्ष कसा प्राप्त होतो, विद्या कोणती, अविद्या कोणती इत्यादि प्रश्न केल्यानें आणि गुरुशुश्रूषेनें ते ज्ञान प्राप्त होतें. सारांश, प्रणि-पात, शुश्रूषा इत्यादि विनयानें ते तत्त्वदर्शी ज्ञानी आचार्य सुप्रसन्न झाले असतां तुला वर सांगितल्याप्रमाणें विशिष्टज्ञानाचा उपदेश करितील. कांहीं लोक नुसते ज्ञानवान् ह्मणजे ग्रंथांतील शब्दांचें ज्ञान झालेले

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

शीला न भवन्ति । अतो विशिनष्टि तत्त्वदर्शिन इति । ये सम्यग्दर्शिनस्तैरुपदिष्टं ज्ञानं कार्यक्षमं भवति नेतरदिति भगवतो मतम् ॥ ३४ ॥

तथा च सतीदमपि समर्थं वचनं यज्ज्ञात्वा० मयि ॥ ३५ ॥

असतात; परंतु, त्यांना यथायोग्य रीतीनें तत्त्वसाक्षात्कार झालेला नसतो; ह्मणून **तत्त्वदर्शिनः** हें विशेषण योजिलेलें आहे. ज्यांना यथायोग्य रीतीनें तत्त्वसाक्षात्कार झालेला असेल त्यांनीं उपदेशिलेलें ज्ञान उपयुक्त होतें, दुसरें होत नाहीं. असा भगवानांचा अभिप्राय असल्याचें **तत्त्वदर्शिनः** ह्या विशेषणावरून सिद्ध होतें. प्रणिपात ह्मणजे साष्टांग नमस्कार ३४.

( **विद्धि** ह्या पदाचा अर्थ भाष्यकारांनीं **विजानीहि** ( जाण ) असा केला आहे आणि मधुसूदनसरस्वतींनीं **विद्धि** ह्या पदाचा अर्थ **लभस्व** ( प्राप्त करून घे ) असा केला आहे; परंतु, मधुसूदनसरस्वतींचा हा भाष्यविरुद्ध अर्थ योग्य आहेच असें ह्मणतां येणार नाहीं. कारण, अदादिगणांत पठित असलेला जो विद् धातु त्याचा—समजणें, जाणणें, ज्ञान करून घेणें—असाच अर्थ मुख्य आहे. तेव्हां मुख्य अर्थ ह्या ठिकाणीं चांगला जुळण्याचा संभव असतांना धातूचा गौण अर्थ स्वीकारणें योग्य नाहीं आणि ह्मणूनच तसा अर्थ भाष्यकारांनीं दर्शविला नाहीं. तस्मात् , भाष्यकारांचेंच व्याख्यान योग्य आहे. )

हे पांडुपुत्रा, तें ज्ञान प्राप्त झाल्यावर तुला पुनरपि असा मोह होणार नाहीं आणि त्या ज्ञानाच्या योगानें सर्व भूतें स्वतःचे ठिकाणीं आणि माझे ठिकाणीं तूं अवलोकन करशील ॥ ३५ ॥

तत्त्वसाक्षात्कार झालेल्या आचार्यांनीं उपदेशिलेलें ज्ञान उपयुक्त

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥

---

**यज्ज्ञात्वा यज्ज्ञानं तैरुपदिष्टमधिगम्य प्राप्य पुनर्भूयो मोहमेवं यथेदानीं मोहं गतोऽसि पुनरेवं न यास्यसि हे पाण्डव । किं च येन ज्ञानेन भूतान्यशेषेण ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि द्रक्ष्यसि साक्षादात्मनि प्रत्यगात्मनि मत्संस्थानीमानि भूतानीति । अथो अपि मयि वासुदेवे परमेश्वरे चेमानीति । क्षेत्रज्ञेश्वरैकत्वं सर्वोपनिषत्प्रसिद्धं द्रक्ष्यसीत्यर्थः ॥ ३५ ॥**

---

होतें असा भगवानांचा अभिप्राय असल्यामुळेंच **यज्ज्ञात्वा न पुनर्मोहं** ह्या वचनाची सार्थकता होते. **यज्ज्ञात्वा** त्या आचार्यांनीं उपदेशिलेलें जें ज्ञान तें प्राप्त झाल्यावर तुला पुनरपि ह्याप्रमाणें ह्मणजे जसा सध्यां झाला आहे तसा मोह, हे पांडवा, होणार नाहीं. शिवाय, त्या ज्ञानाच्या योगानें स्वतःचे ठिकाणीं निःशेष रीतीनें तूं भूतें अवलोकन करशील ह्मणजे ब्रह्मदेवापासून तो स्तंबापर्यंत विद्यमान असलेले ते सर्व प्राणी " माझ्या ठिकाणीं आहेत " असें तूं अवलोकन करशील; मज वासुदेवाचे ठिकाणीं ह्मणजे परमेश्वराचे ठिकाणीं सुद्धां हे सर्व प्राणी आहेत असें तुला आढळून येईल. तात्पर्य, जीव आणि ईश्वर ह्यांचें सर्व उपनिषदांमध्यें प्रसिद्ध असलेलें जें ऐक्य त्याचा तुला अनुभव येईल ३५.

( मी पांडूचा पुत्र आहें आणि भीष्म, दुर्योधन वगैरे हे माझे आहेत अशा प्रकारचा अहंकार आणि ममता ह्यांच्या योगानें जो तुला सांप्रत मोह पडला आहे त्याप्रमाणें त्या मोहाचा उच्छेद करणारें जें ज्ञान तें प्राप्त झालें असतां तुला मोह होणार नाहीं, असें अर्जुनाला सुचविण्याकरितां भगवानांनीं **पाण्डव** हें संबोधन त्याला उद्देशून योजिलें आहे ३५. )

सर्व पातक्यांपेक्षांही जरी तूं अत्यंत पातकी असलास तरी ज्ञानरूप होडग्याच्याच योगानें तूं सर्व पापसागर तरून जाशील ॥ ३६ ॥

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥

---

किं चैतस्य ज्ञानस्य माहात्म्यम् । अपि चेदसि० संतरिष्यसि ॥ ३६ ॥ अपि चेदसि पापेभ्यः पापकृद्भ्यः सर्वेभ्योऽतिशयेन पापकृत्पापकृत्तमः सर्वं ज्ञानप्लवेनैव ज्ञानमेव प्लवं कृत्वा वृजिनं वृजिनार्णवं पापं संतरिष्यसि धर्मोऽपीह मुमुक्षोः पापमुच्यते ॥ ३६ ॥

ज्ञानं कथं नाशयति पापमिति सदृष्टान्तमुच्यते । यथैधांसि० तथा ॥३७॥ यथैधांसि काष्ठानि समिद्धः सम्यगिद्धो दीप्तोऽग्निर्भस्मसाद्भस्मीभावं कुरुतेऽर्जुन ज्ञानमेवाग्निर्ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा निर्बीजीकरोतीत्यर्थः ।

---

शिवाय, ह्या ज्ञानाचें माहात्म्य काय आहे तें पहा. सर्व पाप करणाऱ्यांपेक्षांही तूं अतिशय जरी पाप करणारा असलास तरी ज्ञानफलाच्याच योगानें ह्मणजे ज्ञान हेंच तरण्याचें साधन करून तूं सर्व वृजिन=वृजिनार्णव=पापसमुद्र तरून जाशील. ह्या अध्यात्मशास्त्रामध्यें पुण्यही ( मोक्षाला प्रतिबंधक असल्यामुळें ) पापच समजलें जातें ॥ ३६ ॥

हे अर्जुना, चांगला प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणें काष्ठाचें भस्म करून टाकितो त्याप्रमाणें ज्ञानरूप अग्नि सर्व कर्मांचें भस्म करून टाकितो ॥ ३७ ॥

ज्ञान पापाचा नाश कसा करितें ह्याविषयीं भगवानांनीं ह्या वचनांत दृष्टांत सांगितला आहे. ते ह्मणतात " हे अर्जुना, समिद्ध अग्नि ह्मणजे उत्तम रीतीनें प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणें काष्ठांना भस्मरूप करून टाकितो त्याचप्रमाणें ज्ञानरूप अग्नि सर्व कर्मांना भस्मरूप करून टाकितो ह्मणजे निर्बीज करून टाकितो. प्रत्यक्ष अग्नि

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥३८॥

---

न हि साक्षादेव ज्ञानाग्निः कर्माणीन्धनवद्भस्मीकर्तुं शक्नोति तस्मात्सम्यग्दर्शनं सर्वकर्मणां निर्बीजत्वे कारणमित्यभिप्रायः। सामर्थ्याद्येन कर्मणा शरीरमारब्धं तत्प्रवृत्तफलत्वादुपभोगेनैव क्षीयते। ततो यान्यप्रवृत्तफलानि ज्ञानोत्पत्तेः प्राक्कृतानि ज्ञानसहभावीनि चातीतानेकजन्मकृतानि च तान्येव सर्वाणि भस्मसात्कुरुते ॥ ३७ ॥

यत एवमतो न हि ज्ञानेन० विन्दति ॥ ३८ ॥ न हि ज्ञानेन

---

ज्याप्रमाणें काष्ठांचें ( काष्ठत्व अगदीं नाहींसें करून ) भस्म करून टाकितो त्याप्रमाणें ज्ञानरूप अग्नि कर्मांचें ( स्वरूप सर्वस्वीं नाहींसें करून ) प्रत्यक्ष भस्म करून टाकण्यास समर्थ होत नाहीं. तस्मात्, उत्कृष्ट ज्ञान सर्व कर्मांचें बीज ( ह्मणजे फलोत्पादक सामर्थ्य ) नाहींसें होण्याला कारण होतें, असा ह्या श्लोकांतील उत्तरार्धाचा अभिप्राय समजावा. फलोत्पादक शक्ति विद्यमान असल्यामुळें ज्या कर्माच्या योगानें विद्यमान शरीर उत्पन्न झालेलें असतें तें कर्म फलभोगाला आरंभ झाला असल्यामुळें उपभोगानेंच नाहींसें होत असतें. तस्मात् , ज्यांच्या फलांना आरंभ झालेला नाहीं अशीं जीं ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वीं इहजन्मीं केलेलीं व ज्ञानासहवर्तमान आपले ठिकाणीं विद्यमान असलेलीं आणि त्याचप्रमाणें पूर्वीं होऊन गेलेल्या अनेक जन्मांमध्यें आपल्या हातून झालेलीं कर्में असतात तींच मात्र सर्व ज्ञानरूप अग्नि दग्ध करून टाकितो ३७.

ज्ञानासारिखें पवित्र ह्या जगतामध्यें नाहीं व तें आत्मविषयक ज्ञान स्वतःचे योगानें संस्कृत झालेल्या पुरुषाला कालेंकरून प्राप्त होत असतें ॥ ३८ ॥

श्रद्धावाँल्लँभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

---

सदृशं तुल्यं पवित्रं पावनं शुद्धिकरमिह विद्यते तज्ज्ञानं स्वयमेव योगसंसिद्धो योगेन कर्मयोगेन समाधियोगेन च संसिद्धः संस्कृतो योग्यतामापन्नो मुमुक्षुः कालेन महतात्मनि विन्दति लभत इत्यर्थः ॥ ३८ ॥

येनैकान्तेन ज्ञानप्राप्तिर्भवति स उपाय उपदिश्यते । श्रद्धावाँल्लँभते० गच्छति ॥ ३९ ॥ श्रद्धावाञ्छ्रद्धालुर्लभते ज्ञानम् । श्रद्धालुत्वेऽपि भवति कश्चिन्मन्दप्रस्थानोत आह तत्परो गुरूपासनादावभियुक्तो ज्ञानलब्ध्युपाये । श्रद्धावांस्तत्परोऽप्य-

---

( ज्यांच्या फलाला आरंभ झालेला नाहीं अशीं सर्व कर्में ज्ञानरूप अग्नीच्या योगानें जन्ममरणादिरूप फलें उत्पन्न करण्यास असमर्थ होऊन जातात ) असें ज्याअर्थीं आहे त्याअर्थीं ज्ञानाच्या जोडीची कोणतीही पवित्र ह्मणजे पुरुषाला शुद्धता आणणारी वस्तु ह्या जगतामध्यें नाहीं. कर्मयोगानें आणि समाधियोगानें जो संस्कृत झालेला असेल ह्मणजे कर्मयोग आणि समाधियोग ह्या साधनांच्या योगानें ज्या मुमुक्षूला ज्ञानप्राप्तीची योग्यता आलेली असेल त्याला स्वतःलाच बराच मोठा काल लोटल्यावर आत्मसंबंधीं तें ज्ञान प्राप्त होतें ३८.)

श्रद्धालु, ज्ञानार्जनाविषयीं तत्पर आणि जितेंद्रिय असा जो असेल त्याला ज्ञान प्राप्त होतें आणि तें ज्ञान प्राप्त झालें असतां मोक्षरूप उत्कृष्ट शांति त्याला सत्वरच प्राप्त होते ॥ ३९ ॥

आतां ज्या उपायानें ज्ञानप्राप्ति निःसंशय होते तो उपाय भगवानांनीं **श्रद्धावाँल्लँभते ज्ञानं** ह्या श्लोकांत सांगितला आहे. श्रद्धावान् ह्मणजे श्रद्धालु जो असेल त्याला ज्ञान प्राप्त होतें. आतां एखादा श्रद्धालु असूनही उद्योग करण्याविषयीं आळशी असतो ह्मणून **तत्परः** असें

जितेन्द्रियः स्यादित्यत आह संयतेन्द्रियः । संयतानि विषयेभ्यो निवर्तितानि यस्येन्द्रियाणि स संयतेन्द्रियः य एवंभूतः श्रद्धावांस्तत्परः संयतेन्द्रियश्च सोवश्यं ज्ञानं लभते । प्रणिपातादिस्तु बाह्योनैकान्तिकोपि भवति मायावित्वादिसंभवान्न तु तच्छ्रद्धावत्त्वादावित्येकान्ततो ज्ञानलब्ध्युपायः । किं पुनर्ज्ञानलाभात्स्यादित्युच्यते ज्ञानं लब्ध्वा परां

---

भगवांनानीं ह्मटलें आहे. " गुरुशुश्रूषा, श्रवण, मनन इत्यादि जे ज्ञानप्राप्तीचे उपाय ते करण्याविषयीं उद्युक्त " हा तत्परशब्दाचा अर्थ होय. पुरुष श्रद्धालु आणि तत्पर असूनही जर जितेंद्रिय नसेल तर त्यालाही ज्ञानप्राप्ति होणार नाहीं ह्मणून **संयतेन्द्रियः** असें ह्मटलें आहे. विषयांपासून ज्यानें आपलीं इंद्रियें आवरून धरलेलीं आहेत ह्मणजे परावृत्त केलेलीं आहेत तो **संयतेन्द्रिय** होय. जो अशा प्रकारचा असतो ह्मणजे श्रद्धावान्, तत्पर आणि संयतेंद्रिय असा जो असतो त्यालाच ज्ञान अवश्य प्राप्त होतें. ( प्रणिपात, गुरुशुश्रूषा वगैरे पूर्वीं सांगितलेले उपाय ज्ञानप्राप्तीचे आहेत खरे. परंतु, हे उपाय बाह्य आहेत आणि ह्मणूनच अनिश्चित. कारण, ( मनांत एक आणि बाहेर एक असा जो मायावी पुरुष असतो त्याचे ठिकाणींही प्रणिपात, गुरुशुश्रूषा वगैरे ज्ञानप्राप्तीचीं बाह्य साधनें दृष्टोत्पत्तीस येण्याचा संभव आहे. सारांश, ) प्रणिपातादि प्रकार ज्याचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतात त्याचे ठिकाणीं मायावीपणा वगैरेही असण्याचा संभव आहे ( आणि हा मायावीपणा वगैरे असला ह्मणजे प्रणिपातादि बाह्य साधनांचा ज्ञानप्राप्तीला कांहीं एक उपयोग होणार नाहीं हें उघड आहे ). श्रद्धालुपणा, तत्परता आणि जितेंद्रियत्व हे तीन गुण जेथें असतील तेथें मायावीपणा वगैरे असण्याचा संभवच नाहीं. तस्मात्, श्रद्धालुत्व, तत्परता आणि जितेंद्रियत्व हाच ज्ञानप्राप्तीचा निश्चित उपाय होय. आतां ज्ञानप्राप्ति झाल्यानें

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

---

मोक्षाख्यां शान्तिमुपरतिमचिरेण क्षिप्रमेवाधिगच्छति । सम्यग्दर्शनात्क्षिप्रं मोक्षो भवतीति सर्वशास्त्रन्यायप्रसिद्धः सुनिश्चितोऽर्थः ॥ ३९ ॥

अत्र संशयो न कर्तव्यः पापिष्ठो हि संशयः कथमुच्यते । अज्ञश्चा० संशयात्मनः ॥ ४० ॥ अज्ञश्चानात्मज्ञोऽश्रद्दधानश्च संशयात्मा च विनश्यति । अज्ञाश्रद्दधानौ यद्यपि विनश्यतस्तथापि न तथा यथा संशयात्मा । संशयात्मा तु पापिष्ठः सर्वे-

---

काय फल प्राप्त होतें तें उत्तरार्धांत सांगितलें आहे. ज्ञानप्राप्ति झाल्यावर मोक्षसंज्ञक जी उत्कृष्ट शांति ह्मणजे उपराति ती **अचिरेण** ह्मणजे सत्वरच प्राप्त होते. कारण, योग्य ज्ञान प्राप्त झालें असतां संसारापासून पुरुषाची मुक्तता सत्वर होते, हा अत्यंत निश्चित सिद्धांत सर्व शास्त्रांतील न्यायांनीं ठरलेला आहे ३९.

अज्ञानी, श्रद्धारहित आणि संशय घेणारा असा जो असेल तो स्वार्थापासून भ्रष्ट होतो. कारण, संशयी पुरुषाला इहलोक, परलोक व सुख ह्यांपैकीं कांहींच प्राप्त होत नाहीं ॥ ४० ॥

( श्रद्धा, तत्परता आणि जितेंद्रियत्व हीं ज्ञानप्राप्तीचीं अंतरंग साधनें ज्या मुमुक्षूचे ठिकाणीं असतात त्याला योग्य गुरूचा उपदेश झाला असतां ब्रह्मसाक्षात्कार सत्वर होतो आणि ब्रह्मसाक्षात्कार झाला असतां तो लवकरच मुक्त होतो ) ह्याविषयीं संशय धरूं नये. कारण, संशय हा अत्यंत वाईट आहे. कसा ह्मणून विचारशील तर सांगतों. अज्ञ आणि आत्मज्ञानरहित, श्रद्धारहित व संशयात्मा ह्या सर्वांचा नाश होतो. अज्ञ आणि श्रद्धारहित ह्यांचा जरी नाश होत असतो तरी जसा संशयात्म्याचा नाश होत असतो तसा

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय ॥ ४१ ॥

---

षाम् । कथम् । नायं साधारणोपि लोकोस्ति तथा न परो लोको न सुखं तत्रापि संशयोपपत्तेः संशयात्मनः संशयचित्तस्य । तस्मात्संशयो न कर्तव्यः॥ ४० ॥

कस्मात् । योगसंन्यस्तकर्माणं० धनञ्जय ॥ ४१ ॥ योगसंन्यस्तकर्माणं परमार्थदर्शनलक्षणेन योगेन संन्यस्तानि कर्माणि येन परमार्थदर्शिना धर्माधर्माख्यानि तं योगसं-

---

ह्यांचा नाश होत नाहीं. कारण, संशयात्मा ह्मणजे ज्याचें चित्त संशयग्रस्त झालें आहे असा पुरुष सर्वांमध्यें वाईट. कसा ह्मणून विचारशील तर पहा. संशयग्रस्त पुरुषाला, मनुष्यलोकहीं ( ह्मणजे द्रव्यार्जनादि साधनांनीं सामान्यतः सर्वांना प्राप्त होणारें जें ऐहिक सुख तेंही ) प्राप्त होत नाहीं; त्याचप्रमाणें ( उपासनादि साधनांनीं साध्य होणारा ) परलोकही प्राप्त होत नाहीं आणि सुखही मिळत नाहीं. कारण, त्याविषयींही ह्याला संशय असणारच. तस्मात्, संशय कधींही धरूं नये. संशयात्मा ह्मणजे ज्याचें चित्त संशययुक्त आहे असा पुरुष ४०.

हे धनंजया, योगानें ज्यानें कर्मांचा संन्यास केलेला असेल ह्मणजे ज्ञानाच्या योगानें ज्याचा संशय उच्छिन्न झाला असेल त्या जितेंद्रिय पुरुषाला कर्मांचें बंधन होत नाहीं ॥ ४१ ॥

( संशय सर्व प्रकारच्या अनर्थांना कारणीभूत होणारा असल्यामुळें तो धरणें जरी योग्य नाहीं तरी त्याची निवृत्ति करण्याचें साधन जोंपर्यंत आपलेपाशीं नाहीं तोंपर्यंत संशय न धरणें ही आपल्या स्वाधीनची गोष्ट नाहीं. अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून) संशयाची निवृत्ति कशानें होते तें ह्या वचनांत भगवानांनीं सांगितलें आहे. **योगसंन्यस्तकर्माणं** परमार्थदर्शनरूप योगानें ज्यानें पापपुण्यसंज्ञक कर्मांचा चांगल्या

न्यस्तकर्माणम् । कथं योगसंन्यस्तकर्मेत्याह । ज्ञानेनात्मेश्वरैकत्वदर्शनलक्षणेन संछिन्नः संशयो यस्य स ज्ञानसंछिन्नसंशयः । य एवं योगसंन्यस्तकर्मा तमात्मवन्तमप्रमत्तं गुणचेष्टारूपेण दृष्टानि कर्माणि न निबध्नन्त्यनिष्टादिरूपं फलं नारभन्ते हे धनञ्जय ॥ ४१ ॥

---

प्रकारें त्याग केला आहे तो पुरुष योगसंन्यस्तकर्मा होय. पुरुष योगसंन्यस्तकर्मा कसा होतो अशी अर्जुनाला शंका येईल ह्मणून भगवानांनीं **ज्ञानसंछिन्नसंशयम्** असें ह्मटलें आहे. जीवब्रह्मैक्यदर्शनरूप ज्ञानानें ज्याचा संशय अगदीं नाहींसा झाला असेल तो पुरुष ज्ञानसंछिन्नसंशय होय. तस्मात्, ह्याप्रमाणें जो ज्ञानसंछिन्नसंशय बनलेला असतो तो पुरुष योगसंन्यस्तकर्मा होण्यास योग्य होतो. असा असून जो आत्मवान् ह्मणजे अनवधानरहित असलेला पुरुष त्याला ( इंद्रियरूप ) गुणव्यापारांच्या रूपानें त्याचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येणारीं जीं कर्में तीं, हे धनंजया, बद्ध करीत नाहींत, ह्मणजे अनिष्ट, इष्ट आणि मिश्र असें जें त्रिविध कर्मफल तें त्याचे ठिकाणीं उत्पन्न करण्यास तीं समर्थ होत नाहींत ४१.

( " राजे अतिशय प्रबल असतांनाही त्यांचा पराजय करून द्रव्य आणण्याला मी समर्थ आहें किंवा नाहीं असा संशय, अत्यंत प्रबल अशा स्वस्वरूपाविषयीं तुझा निश्चय असल्यामुळें, यत्किंचित्‌ही मनामध्यें न आणितां तूं पूर्वीं धन जिंकून आणिलें आहेस. तेव्हां संशय न धरल्यानें कार्यसिद्धि कशी होत असते ह्याविषयीं तूंच प्रत्यक्ष उदाहरण आहेस. " असें अर्जुनाला सुचविण्याकरितां भगवानांनीं ह्या ठिकाणीं त्याला उद्देशून **धनंजय** हे संबोधन परमावधीचा दूरदर्शीपणा मनामध्यें आणून योजिलें आहे असें ह्मणणें भाग पडतें ४१. )

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

यस्मात्कर्मयोगानुष्ठानादशुद्धिक्षयहेतुकज्ञानसंछिन्नसंशयो न निबध्यते कर्मभिर्ज्ञानाग्निदग्धकर्मत्वादेव यस्माच्च ज्ञानकर्मानुष्ठानविषये संशयवान्विनश्यति तस्मादज्ञान० भारत ॥ ४२ ॥ तस्मात्पापिष्ठमज्ञानसंभूतमज्ञानादविवेकाज्जातं हृत्स्थं हृदि बुद्धौ स्थितं ज्ञानासिना शोकमोहादिदोषहरं सम्यग्दर्शनं ज्ञानं तदेवासिः खड्गस्तेन ज्ञानासिनात्मनः स्वस्या-

तस्मात्, हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, अज्ञानजन्य असा जो हृदयस्थ संशय तो आपल्या ज्ञानरूप खड्गानें तोडून टाकून तूं कर्मयोगाचें अवलंबन कर आणि युद्धाला तयार हो ॥ ४२ ॥

ह्याप्रमाणें महामुनिव्यासप्रणीत लक्षग्रंथात्मक श्रीमहाभारतांतर्गत भीष्मपर्वांतील ब्रह्मविद्या आणि योगशास्त्र एतद्विषयक व श्रीकृष्णार्जुन संवादात्मक श्रीमद्भगवद्गीतासंज्ञक उपनिषदपैकीं कर्मसंन्यासयोगनामक चवथा अध्याय समाप्त झाला ॥ ४ ॥

ज्याअर्थीं कर्मयोगाच्या अनुष्ठानामुळें अशुद्धीच्या नाशाला कारणीभूत असलेल्या ज्ञानानें संशय निवृत्त झालेला पुरुष ज्ञानाग्नीच्या योगानें कर्मफलबीज दग्ध झाल्याकारणानें कर्मांनीं बद्ध होत नाहीं आणि ज्याअर्थीं ज्ञानकर्मांच्या अनुष्ठानाविषयीं संशय घेणारा पुरुष स्वार्थापासून भ्रष्ट होतो त्याअर्थीं अत्यंत वाईट असा जो अज्ञानसंभूत ह्मणजे अविवेकजन्य व हृत्स्थ ह्मणजे बुद्धिस्थ संशय तो, शोकमोहादि दोषनाशक आहे असें जें सम्यग्दर्शनरूप स्वतःचें ज्ञान त्या ज्ञानरूप खड्गाच्या

त्मविषयत्वात्संशयस्य । न हि परस्य संशयः परेण च्छेत्तव्यतां प्राप्तो येन स्वस्येति विशेष्येत आत्मविषयोऽपि स्वस्यैव भवति । छित्त्वैनं संशयं स्वविनाशहेतुभूतं योगं सम्यग्दर्शनोपायकर्मानुष्ठानमातिष्ठ कुर्वित्यर्थः । उत्तिष्ठेदानीं युद्धाय भारतेति ॥ ४२ ॥ इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये कर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

---

योगानें, तोडून टाक ; स्वतःच्या नाशाला कारणीभूत होणारा हा संशय ज्ञानरूप खड्गानें तोडून टाकून तूं सम्यग्दर्शनप्राप्तीचा उपाय जें कर्म त्याचें अवलंबन कर आणि, हे भारता, सांप्रत युद्धाला तयार हो. **आत्मनः** ह्याचा अर्थ स्वतःचें कारण, संशयाचा संबंध स्वतःशींच असतो. आतां " दुसऱ्याचा संशय सर्वस्वीं दुसऱ्याच्या हातून निवृत्त होणें शक्यच नाहीं; तेव्हां **आत्मनः** हें विशेषण कशाकरितां ? " अशी शंका घेणें योग्य नाहीं. कारण, आपल्याला दुसऱ्याच्या वस्तूविषयीं जर संशय असेल तर तो दुसऱ्याच्या ज्ञानानें निवृत्त होणें संभवनीय आहे ; परंतु, आत्मविषयक जो संशय ह्याचा स्वतःशींच संबंध असल्यामुळें त्याची निवृत्तिही स्वतःच्याच ज्ञानानें होणार आहे. तस्मात्, **आत्मनः** हें पद व्यर्थ नाहीं ४२.

ह्याप्रमाणें श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य गोविंदभगवत्पूज्यपाद ह्यांचे शिष्य जे भगवान् श्रीमच्छंकराचार्य ह्यांनीं केलेल्या श्रीमद्भगवद्गीताभाष्यापैकीं कर्मसंन्यासयोगनामक चवथा अध्याय समाप्त झाला ॥ ४ ॥